3-6

॥ श्रीगजानन प्रसन्न ॥



# श्रीयाज्ञवल्क्यस्मृति

## ( मिताक्षरासारासह. )

मराठी भाषांतर.

भाषांतरकार

( वे. शा. सं. रा. रा. विष्णुशास्त्री बापट. )
अध्यापक गिडुमल पाठशाळा, हैदराबाद सिंध.

किंमत ७॥ रुपये

॥ श्रीगजानन प्रसन्न ॥



# श्रीयाज्ञवल्क्यस्मृति

## ( मिताक्षरासारासह. )

✻

मराठी भाषांतर.

भाषांतरकार

(वे. शा. सं. रा. रा. विष्णुशास्त्री बापट.)

अध्यापक गिडुमल पाठशाळा, हैदराबाद सिंध.

✻

किंमत ७॥ रुपये

केलें. स्वतः जनकानेंही त्यांना अनेक प्रश्न केले पण त्या सर्वांची समाधानकारक उत्तरें दिल्यावर महर्षींनी जनकानें केलेल्या पूजासत्काराचा स्वीकार केला.

या मुनींचे विद्यागुरु वैशंपायन हे होत, एकदां त्यांच्या हातून अकामतः ब्रह्महत्या घडली तेव्हां तिचें प्रायश्चित्त करण्याविषयीं त्यांनीं आपल्या शिष्यांना सांगितलें. पण तितक्यांत याज्ञवल्क्य, म्हणाले, 'भगवन्, आपण सांगितलेलें हें दुष्करही व्रत मीच करीन, हे अल्पबलवान् तें काय करितात?' तें ऐकून वैशंपायनांना क्रोध आला व 'तूं या इतर ब्राह्मणांचा अवमान करणारा उद्धट शिष्य आहेस. यास्तव मजपासून शिकलेली विद्या परत देऊन येथून निघून जा,' असें त्यांनीं त्यास सांगितलें. स्वतः हे शिष्यही गुरूपेक्षां कांकणभर अधिकच मानी होते. गुरूंच्या तोंडचीं वरील अक्षरें कानीं पडतांच त्यांच्यापासून शिकलेला कृष्णयजुर्वेद उलटी करून त्यांनीं भूमीवर टाकला व तात्काल तेथून निघून, एका घोर तपोवनांत जाऊन, दीर्घकाल सूर्योपासना केली. आणि प्रसन्न झालेल्या त्या त्रयीमय देवापासून स्वतंत्र वेद संपादन करून त्याची वाजसनेयी शाखा प्रवृत्त केली. ही कथा भागवताच्या बाराव्या स्कंधांत आहे. स्वतः याज्ञवल्क्यांनींही या स्मृतींत आपल्या आरण्यकाचा उल्लेख केला आहे. (पहा—प्रायश्चित्ताध्याय श्लोक ११०)

या प्रख्यात मुनींच्या कालाविषयीं थोडासा ऊहापोह करून बापुशास्त्री मोघ्यांनीं ते ४८१२ वर्षांपूर्वी होते, असें शके १८०३ सालीं मुंबईस छापलेल्या एका प्रतींत म्हटलें आहे. पण तो कालनिर्णय फारसा विश्वसनीय वाटत नाहीं. कारण, जनकाचे गुरु होणारे व वैशंपायनाचे वेद ओकणारे (शिष्य) याज्ञवल्क्य आणि जनमेजयाच्या सभेंतील वैशंपायन यांचा संबंध समाधानकारक लागत नाहीं. अशा प्रकारच्या क्लिष्ट अनुमानावर आमचा फारसा भरवसाही नाहीं. याज्ञवल्क्य, मनु, इत्यादिकांच्या कालाच्या केवल आनुमानिक व म्हणूनच संशयित निर्णयावांचून आम्हां वैदिक धार्मिकांचें कोणतेंही अनुष्ठान अडलेलें नाहीं. एवढ्यासाठीं आम्हीं अमका साहेब अमुक म्हणतो तमका प्रोफेसर तमुक म्हणतो, इत्यादि अश्रद्धेय प्रमाणांचा उल्लेख करून याज्ञवल्क्यांचा कांहीं तरी काल ठरविण्याच्या भानगडींत पडत नाहीं. धर्मशास्त्र या दृष्टीनें पाहिल्यास मनुस्मृतीच्या नंतर झालेली व तिच्याच खालोखाल योग्यतेची ही स्मृति आहे, इतकें मात्र निर्विवाद होय.

या स्मृतीवर विश्वरूप, श्रीकर, विज्ञानेश्वर इत्यादि प्राचीन व अपरार्कादि अर्वाचीन विद्वानांनीं केलेल्या अनेक टीका होत्या; पण हल्लीं त्यांतील दोन तीनच प्रसिद्ध आहेत. त्यांतूनही विज्ञानेश्वरयोगीकृत **मिताक्षराच** विद्वानांस अधिक मान्य झालेली आहे. ती सर्वांगसुंदर टीका केवल मूलग्रंथाचें व्याख्यान करूनच थांबत नाहीं तर मुळांत न सांगितलेल्या पण अन्यस्मृतींत वर्णिलेल्या अन्य विषयांचेंही सविस्तर व्याख्यान करते. विज्ञानेश्वर योग्यांनीं आपल्या **मिताक्षरा** टीकेंत धर्मशास्त्रसंबंधीं कोणताही प्रश्न प्रायः निर्णय केल्यावाचून सोडलेला नाहीं, त्यांच्या विषयप्रतिपादनाच्या शैलीप्रमाणेंच भाषाही सुंदर आहे. ती वाचतांना मनाला मोठा आनंद होतो आणि त्याबरोबरच टीकाकारांच्या धर्मशास्त्रसंबंधीं व्यापक ज्ञानाचीही कल्पना होते. असो; अशा त्या अनेक गुणसंपन्न टीकेला हल्लींच्या **राज—न्यायसभेंत**

ही योग्य मान मिळालेला असून निदान आपल्या या मुंबई इलाख्यांत तरी **हिंदुलॉ** पुष्कळांशी हिच्याच आधारानें रचलेला आहे. त्यामुळें **वकील** व **न्यायाधीश** इत्यादि न्यायाधिकारी यांनाही मूळ मिताक्षरा पाहण्याचा प्रसंग कधीं कधीं येत असतो. परंतु सामान्य संस्कृतज्ञाला ती टीका पांक्त समजलेच, असें वाटत नाहीं. भाषाशैली कितीही जरी उत्तम असली तरी पुष्कळ शास्त्रग्रंथ–विशेषतः वादविषयक शास्त्राचे ग्रंथ ज्यांनीं वाचलेले नसतात. त्यांना ती फारशी सुलभ वाटत नाहीं. शिवाय सामान्य मराठी वाचकांनाही तिचें रहस्य कळल्यास पुष्कळच उपयोग होऊन शिवाय धर्मशास्त्राचें बरेंच चांगलें ज्ञान होईल. धर्मशास्त्र किंवा षड्दर्शनें यांवरील ग्रंथांची रचना पुराणादि मूळ ग्रंथापेक्षां अधिक व्यवस्थित असते. स्मृतिवचनें तर प्रायः सूत्रासारखींच असतात. यास्तव, पूर्वोक्त वचनांचा संबंध दाखविणाऱ्या व अपेक्षित भागाची पूर्ति करणाऱ्या टीकांची आवश्यकता त्यांना फार असते. ह्या सर्व गोष्टींचा विचार करून आम्ही **मूळ याज्ञवल्क्यस्मृती** व तिच्याखालीं सरळ, शुद्ध व सुबोध आणि विस्तृत **मिताक्षरासार** अशा योजनेनें हें लोकोपयोगी पुस्तक वाचकांस अर्पण करीत आहों. त्याचा सर्वांना चांगला उपयोग व्हावा म्हणून विषयानुक्रमणिकेंत प्रत्येक प्रकरणाच्या खालीं मिताक्षरासारांत आलेले सर्व विषय क्रमानें दिले आहेत.

सारांश, सर्व प्रकारच्या वाचकांना या अप्रतिम ग्रंथाचें **मूळ ग्रंथांतील कोणताही महत्वाचा भाग थोडासाही न सोडतां लिहिलेलें** साररूप–**भाषांतर** प्रिय व्हावें म्हणून आम्हीं शक्य तितकी सर्व योजना केली आहे. सारलेखक व प्रकाशक यांच्यामध्यें सुमारें बाराशें मैलांचें अंतर असल्यामुळें व वाईस उचित द्रव्य खर्चूनही योग्य शोधक न मिळाल्यामुळें शोधनामध्यें कांहीं थोडेसे प्रमाद झाले आहेत, पण त्याला प्रकाशकांचा कांहीं इलाज चालला नाहीं.

टीकाकारांच्या कालाचाही समाधानकारक निणय होत नाहीं. स्वतः टीकाकार विज्ञानेश्वर योगीश्वरांनीं ग्रंथाच्या शेवटीं केलेल्या मंगलाचरणांत कल्याणकल्प नगर व श्रीविक्रमादित्य यांचा उल्लेख केला आहे. त्यावरून त्या राजाचा व या पंडिताचा संबंध व्यक्त होतो. दक्षिण हैद्राबादकर निजामसाहेबांच्या राज्यांत कल्याणकीर्ति या नांवाचें एक नगर अद्यापि प्रसिद्ध आहे. त्यांत मागें चौलुक्यवंशांतलि अनेक राजे राहात होते. त्यांची वंशावळी डॉ. भांडारकरांनीं दक्षिण इतिहास नांवाच्या ग्रंथांत दिली आहे. त्यांत विक्रमादित्य राजाचें नांव आहे. त्याच्या आश्रयानें राहणाऱ्या विद्वच्छ्रेष्ठ विज्ञानेश्वरानें ही टीका ( मिताक्षरा )लिहिली असा कित्येकांचा तर्क आहे. तो खरा असल्यास शके ९९८ पासून १०४८ पर्यंत केव्हांतरी या सुंदर व्याख्यानाचा जन्म झाला, असें म्हणतां येईल.

असो. गेल्या पांच महिन्यांत सतत परिश्रम करून यथामति लिहिलेला हा ग्रंथ सर्वेश्वरस्वरूप श्रीशंकराचार्यांच्या पूज्य पादकमलीं अर्पण करून ही लांबलेली प्रस्तावना संपवितों.

वाई मिति अधिक आषाढ<br>कृ. ७ शनिवार शके १८३४

सर्व आचार्यभक्तांचा भक्त<br>**विष्णु वामन बापट**

# अनुक्रमणिका.



॥ श्रीगजाननप्रसन्न ॥

# अथ याज्ञवल्क्यस्मृति.

## ( श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृतमिताक्षरासारासह )

## अथ उपोद्घातप्रकरणम् १.

ॐ योगीश्वरं याज्ञवल्क्यं संपूज्य मुनयोऽब्रुवन् ।
वर्णाश्रमेतराणां नो ब्रूहि धर्मानशेषतः ॥ १ ॥

**मिताक्षरासार**—श्रीगणेशाय नमः । श्रीसरस्वत्यै नमः । श्रीशंकराचार्यपूज्यपादाभ्यां नमः । मनुप्रोक्त धर्मशास्त्र जसें भृगूनें त्याप्रमाणें याज्ञवल्क्यप्रणीत प्रश्नोत्तररूप धर्मशास्त्र त्याच्या कोणीं शिष्यानें संक्षेपतः सांगितलें. त्याचा हा पहिला श्लोक आहे.–सनकादि योग्यांचे ईश्वर ( श्रेष्ठ ) अशा याज्ञवल्क्यमुनींची मन, वाणी व शरीर यांच्या-ध्यान, स्तुति व नमस्कार इत्यादि-कर्मांच्या योगानें पूजा करून सामःश्रव इत्यादि श्रवण-धारणयोग्य मुनि म्हणाले, ' महाराज, आम्हांस ब्राह्मणादि वर्ण, ब्रह्मचारी इत्यादि आश्रम व वर्णसंकर होऊन उत्पन्न आलेल्या जाति यांचे सर्व धर्म सांगा. ' येथील धर्म शब्दावरून सहाही प्रकारचे स्मार्त धर्म घ्यावे. वर्णधर्म, आश्रमधर्म, वर्णाश्रमधर्म, गुणधर्म, निमित्तधर्म व साधारणधर्म असे ते सहा-प्रकारचे धर्म होत. ब्राह्मणानें कधींही मद्य पिऊं नये हा वर्णधर्म, ब्रह्मचाऱ्यानें सायंप्रातर् होम करावा हा आश्रमधर्म, ब्राह्मण ब्रह्मचाऱ्याचा दंड पळसाचा असावा हा वर्णाश्रमधर्म, शास्त्रीय अभिषेकादि गुणानें युक्त असलेल्या राजानें प्रजेचें पालन करावें हा गुणधर्म, शास्त्रानें ज्याचें विधान केलें असेल तें न करणें व शास्त्रानें ज्याचा निषेध केला असेल तें करणें, या दोन दोषां-करितां करावें लागणारें जें प्रायश्चित्त तो निमित्तधर्म व अहिंसा, सत्यभाषण इत्यादि ब्राह्म-णापासून चांडलापर्यंत सर्व मनुष्यांस एकसारखा लागू असणारा जो धर्म तो साधारणधर्म होय. धर्मशास्त्राचें अध्ययन ' श्रुत्युक्त शौच व आचार शिकवावे ' इत्यादि आचार्यकरण-विधिप्रयुक्त असल्यामुळें त्याचें प्रयोजनादि सांगणें फारसें उपयोगी नाहीं. त्याचा क्रम असा-उप नयन झाल्यानंतर वेदाध्ययनास आरंभ करण्यापूर्वी धर्मशास्त्राचें अध्ययन करून त्यानंतर त्यांत

सांगितलेल्या यमनियमांनीं युक्त होऊन वेदाध्ययन करावें. नंतर त्यांच्या अर्थाचें ज्ञान करून घेऊन मग त्यांत सांगितल्याप्रमाणें अनुष्ठान करावें असा नियम आहे. या शास्त्रांत धर्म, अर्थ, काम व मोक्ष या चारी पुरुषार्थांचे जरी प्रतिपादन केलेलें आहे तरी त्यांत धर्म मुख्य असल्यामुळें यास धर्मशास्त्र असें म्हटलें आहे. धर्मच मुख्य कसा म्हणून म्हणाल तर सांगतों– अर्थादि पुढच्या तिन्ही पुरुषार्थांचें मूळ धर्म आहे. आतां–धर्मही द्रव्यमूलक आहे. कारण द्रव्यावाचून धर्म होणें शक्य नाहीं, असें कोणी म्हणेल पण त्यांत अर्थ नाहीं. कारण जप,तप, पायानें तीर्थाटन करणें इत्यादि धर्म द्रव्यावांचूनहि होऊं शकतात. पण द्रव्य मिळणें हें केवळ पूर्व शुभ कर्माचेंच फळ असल्यामुळें धर्मावाचून थोडेसें द्रव्य मिळणेंहि शक्य नाहीं. काम व मोक्ष यांचाही हाच प्रकार आहे १.

असो; वर सांगितल्याप्रमाणें सामःश्रवादि मुनींनीं प्रश्न केला असतां--

**मिथिलास्थः स योगीन्द्रः क्षणं ध्यात्वाब्रवीन्मुनीन् ।**
**यस्मिन्देशे मृगः कृष्णस्तस्मिन्धर्मान्निबोधत ॥ २ ॥**

मिथिलानामक नगरींत असलेला तो योगीश्वर कांहीं वेळ मनांत विचार (चित्त स्थिर) करून–हे धर्मशास्त्राचें श्रवण करण्यास योग्य आहेत व नम्रपणें प्रश्न करीत आहेत यास्तव यांस सांगणें उचित आहे–असें जाणून त्यांस म्हणाला--कृष्णसार मृग ( काळवीट ) जेथें स्वेच्छेनें फिरत असतो त्या प्रदेशांत राहून कोणत्या धर्मांचें अनुष्ठान करावें तें ऐका. अर्थात् हे पुढील धर्म अशा निर्जन प्रदेशींच आचरावे, अन्यथळीं यांचें अनुष्ठान करूं नये २.

आतां अगोदर धर्मज्ञानाचे उपाय सांगतात--

**पुराणन्यायमीमांसाधर्मशास्त्राङ्गमिश्रिताः ।**
**वेदाः स्थानानि विद्यानां धर्मस्य च चतुर्दश ॥ ३ ॥**

ब्राह्मादि अठरा पुराणें, तर्कविद्या, मीमांसा ( वेदांच्या वाक्यांचा विचार ), मनु इत्यादिकांचीं धर्मशास्त्रें, आणि शिक्षा, कल्प, व्याकरण, निरुक्त, छंद व ज्योतिष ह्या सहा अंगासह चार वेद हीं चवदा ज्ञानाचीं साधनें व धर्माचे हेतु आहेत. " ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य, या त्रैवर्णिकांनीं यांचें अध्ययन करावें. त्यांतूनही ब्राम्हणांनीं विद्याप्राप्तीकरितां व धर्मानुष्ठानाकरितां आणि क्षत्रियवैश्यांनीं केवल धर्मानुष्ठानाकरितां यांचें अध्ययन करावें. " असें शंख व मनु यांच्या स्मृतींवरून सिद्ध होतें. आयुर्वेद, धनुर्वेद, गांधर्ववेद, व अर्थशास्त्र अशीं आणखी चार ज्ञानसाधनें आहेत. पण तीं केवळ ज्ञानसाधनें असून धर्माचीं साधनें नसल्यामुळें त्यांचा येथें उल्लेख केलेला नाहीं. या चार शास्त्रांस उपवेद असेंहि म्हणतात पण परोपकारार्थ यांचा उपयोग केला असतां तीं धर्मसाधनेंही होऊं शकतात. अशा दृष्टीनें पाहिलें असतां विष्णुपुराणांतील अष्टादश विद्यांची उपपत्ति चांगली लागते ३.

ही याज्ञवल्क्यस्मृतिहि धर्मशास्त्र आहे, असें सुचविण्याकरितां धर्मशास्त्रांच्या मुख्य मुख्य कर्त्यांचीं नांवें सांगतात--

मन्वत्रिविष्णुहारीतयाज्ञवल्क्योशनोऽङ्गिरः ।
यमापस्तम्बसंवर्ताः कात्यायनबृहस्पती ॥ ४ ॥
पराशरव्यासशंखलिखिता दक्षगौतमौ ।
शातातपो वसिष्ठश्च धर्मशास्त्रप्रयोजकाः ॥ ५ ॥

मनु, अत्रि, विष्णु, हारीत, याज्ञवल्क्य, उशनस्, अंगिरस्, यम, आपस्तंब, संवर्त, कात्यायन, बृहस्पति, पराशर, व्यास, शंख, लिखित, दक्ष, गौतम, शातातप, वसिष्ठ इत्यादि धर्मशास्त्रकर्ते आहेत. येथें जरी वीसच शास्त्रकारांचीं प्रत्यक्ष नांवें सांगितलीं आहेत तरी प्रचेता, बुध, देवल, सोम, जमदग्नि, विश्वामित्र, प्रजापति, नारद, पैठीनसि, पितामह, बौधायन, छागलेय, जाबाली, च्यवन, मरीचि, व कश्यप या सोळा धर्मशास्त्रकारांचाही दुसऱ्या एका स्मृतींत उल्लेख केलेला आहे. या छत्तीसही ग्रंथकारांचीं वचनें जरी प्रमाण आहेत तरी एका ग्रंथांतील न्यूनता दुसऱ्या ग्रंथांतील वचनांनीं भरून काढावी व दोन शास्त्रांत विरोध आल्यास विकल्प मानावा म्हणजे त्यांतील कोणत्यातरी एकाद्या म्हणण्याप्रमाणें देशाचर, कुलाचार इत्यादिकांस अनुसरून अनुष्ठान करावें ४,५.

आतां दानाचें उदाहरण देऊन धर्माचें लक्षण सांगतात--

देशे काले उपायेन द्रव्यं श्रद्धासमन्वितम् ।
पात्रे प्रदीयते यत्तत्सकलं धर्मलक्षणम् ॥ ६ ॥

दुसऱ्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें जेथें कृष्ण मृग स्वेच्छेनें फिरत असेल तो किंवा कुरुक्षेत्रादि देश, संक्रांति, ग्रहण इत्यादि काल. शास्त्रोक्त *इतिकर्तव्यतारूप उपाय, प्रतिग्रहादि घेतल्यामुळें मिळालेलें गाय, सुवर्ण इत्यादि द्रव्य श्रद्धेनें युक्त होऊन सत्पात्रीं जें दिलें जातें तें व त्याचप्रमाणें जाति, गुण, याग, होम इत्यादि शास्त्रांत सांगितलेलें दुसरेंही सर्व धर्मास उत्पन्न करणारें आहे. श्रद्धा म्हणजे शास्त्र व गुरु यांच्या वचनांवर दृढविश्वास. हें धर्माचें मुख्य अंग आहे. ज्यास दान द्यावयाचें तें पात्र कसें असावें हें पुढें याच अध्यायाच्या २०० व्या श्लोकांत सांगितलें आहे. येथें सांगितलेले देशादि धर्माचे कारक हेतु आहेत ६.

आतां धर्माचीं प्रमाणें ( ज्ञापक हेतु ) सांगतात--

श्रुतिः स्मृतिः सदाचारः स्वस्य च प्रियमात्मनः ।
सम्यक् संकल्पजः कामो धर्ममूलमिदं स्मृतम् ॥ ७ ॥

वेद, धर्मशास्त्रें, शिष्टांचा आचार, ज्याच्याविषयीं विकल्प असेल अशा धर्मानुष्ठानांत आपणांस जें प्रिय वाटेल तें, उत्तम संकल्पापासून उत्पन्न झालेला व शास्त्राच्या विरुद्ध नसलेला काम ( इच्छा ) अशीं हीं पांच धर्माचीं प्रमाणें आहेत. पण त्यांच्यामध्यें परस्पर विरोध

* असें करावें; असें करावें इत्यादि प्रकारें शास्त्रांत सांगितलेला प्रकार.

आला असतां त्यांतील पूर्व पूर्व प्रमाण बलवान् आहे, असें जाणावें.: ( द्विजांनीं या श्लोकांत सांगितलेल्या प्रमाणांसच परम प्रमाण मानून शैव, शाक्त, पाशुपत पांचरात्र इत्यादि शास्त्रांतील यांच्याशीं विरुद्ध नसलेल्या भागासच प्रमाण समजावें व त्यांत जो विरुद्ध भाग असेल त्याचा त्याग करावा ) ७.

आतां सर्व धर्मांत परम धर्म कोणता तें अथवा देशादि कारक हेतूंचा अपवाद सांगतात—

**इज्याचारदमाहिंसादानस्वाध्यायकर्मणाम् ।**
**अयं तु परमो धर्मो यद्योगेनात्मदर्शनम् ॥ ८ ॥**

होमहवन, मनुष्याच्या उत्कर्षार्थ शास्त्रानें सांगितलेला आचार, मनाचें किंवा बाह्य इंद्रियांचें दमन, प्राण्यांस पीडा न देणें, आपली वस्तु दुसऱ्यास सर्वथैव अर्पण करणें, वेद व शास्त्रें यांचें अध्ययन आणि काम्य कर्मे वर्ज्य करून इतर सर्व शास्त्रोक्त कर्मांचें अनुष्ठान—या सर्वांत चित्ताचें ऐकाम्य करून आत्म्याचें साक्षात् दर्शन करणें म्हणजे त्याचा अनुभव घेणें हाच सर्वोत्तम धर्म होय. अशा रीतीनें आत्मसाक्षात्कार करून घेण्यास देश, काल इत्यादि वर सांगितलेल्या नियमांची आवश्यकता नाहीं. कारण अन्तःकरणाच्या बाह्यवृत्तींचा निरोध हें आत्मज्ञानाचें मुख्य साधन असल्यामुळें तो जेथें व जेव्हां होणें शक्य असेल तोच त्याचा देश व काल आहे, असें समजावें ८.

धर्माविषयीं संदेह उत्पन्न झाला असतां निर्णय कसा करावा तें सांगतात—

**चत्वारो वेदधर्मज्ञाः पर्षत्त्रैविद्यमेव वा ।**
**सा ब्रूते यं स धर्मः स्यादेको वाऽध्यात्मवित्तमः ॥ ९ ॥**

वेद व धर्मशास्त्र यांचा अर्थ जाणणाऱ्या चार ब्राह्मणांस पर्षत् म्हणतात, किंवा ऋग्वेदादि तीन वेदांस जाणणारे जे त्रैविद्य ब्राह्मण त्यांच्या समूहास पर्षत् म्हणतात. अशा प्रकारची पर्षत् ( सभा ) जो धर्म सांगते तोच धर्म होय. अथवा एकही सर्वोत्तम वेदान्तशास्त्रज्ञ ब्राह्मण जो निर्णय करील तोच धर्म होय ९.

इति उपोद्घातप्रकरणम् १

---

## अथ ब्रह्मचारीप्रकरणम् २.

वर्णादिकांचे धर्म सांगण्याकरितां आतां अगोदर वर्ण किती आहेत तें सांगतात.

**ब्रह्मक्षत्रियविट्शूद्रा वर्णास्त्वाद्यास्त्रयो द्विजाः ।**
**निषेकाद्याः श्मशानान्तास्तेषां वै मन्त्रतः क्रियाः ॥१०॥**

ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे चार वर्ण आहेत. त्यांतील पहिले तीन द्विज होत. त्यांच्या गर्भाधानापासून अंत्येष्टीपर्यंत सर्व क्रिया वैदिक मंत्रांनीं होतात.

आतां त्या गर्भाधानादि क्रिया कोणत्या तें सांगतात--

गर्भाधानमृतौ पुंसः सवनं स्यन्दनात्पुरा ।
षष्ठेऽष्टमे वा सीमन्तो मास्येते जातकर्म च ॥ ११ ॥
अहन्येकादशे नाम चतुर्थे मासि निष्क्रमः ।
षष्ठेऽन्नप्राशनं मासि चूडा कार्या यथाकुलम् ॥ १२ ॥

ऋतुकालीं गर्भाधान, गर्भाचें चलन होण्यापूर्वीं पुंसवन, सहाव्या किंवा आठव्या महिन्यांत सीमन्तोन्नयन, गर्भाशयांतून पुत्र बाहेर आला असतां जातकर्म, अकराव्या दिवशीं नामकरण, चवथ्या महिन्यांत निष्क्रमण ( सूर्यदर्शन करणें ), सहाव्या महिन्यांत अन्नप्राशन ( उष्टावण ) व कुलाचाराप्रमाणें ( पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षीं चूडा ) चौल करावी. यांतील पुंसवन व सीमन्तोन्नयन या दोन संस्कारांचा संबंध मातेशीं असतो.यास्तव ते एकदांच करावेत. प्रत्येक गर्भाचे वेळीं पुनः करावयास नकोत. आजोबा, पणजोबा इत्यादि पूर्वजांचें किंवा कुलदेवता, इष्टदेवता इत्यादि देवतांचें नांव ठेवावें ११,१२.

त्या क्रिया जरी नित्य आहेत, तरी त्यांचें आनुषंगिक फल सांगतात---

एवमेनः शमं याति बीजगर्भसमुद्भवम् ।
तूष्णीमेताः क्रियाः स्त्रीणां विवाहस्तु समन्त्रकः ॥१३॥

याप्रमाणें गर्भाधानादि संस्कार केले असतां माता व पिता यांच्या शरीरगत व्याधीं-मुळें, शोणित व शुक्र यांमध्यें आलेलें पाप ( दोष) नाहींसें होतें. मुलींच्या क्रिया मंत्रावांचून कराव्यात पण त्यांचा विवाह समंत्रकच होतो १३.

आतां पुत्राच्या उपनयनाचा काल सांगतात--

गर्भाष्टमेऽष्टमे वाब्दे ब्राम्हणस्योपनायनम् ।
राज्ञामेकादशे चैके विशामेके यथाकुलम् ॥ १४ ॥

ब्राह्मणाच्या पुत्राचें उपनयन गर्भधारणेपासून आठव्या वर्षीं किंवा जन्मापासून आठव्या वर्षी, क्षत्रियाच्या पुत्राचें गर्भापासून किंवा जन्मापासून अकराव्या वर्षीं व वैश्याच्या पुत्राचें गर्भापासून किंवा जन्मापासून बाराव्या वर्षीं करावें. कोणी म्हणतात कीं, तें कुलाचाराप्रमाणें करावें १४.

गुरुनें उपनयनानंतर काय करावें तें सांगतातः—

उपनीय गुरुः शिष्यं महाव्याहृतिपूर्वकम् ।
वेदमध्यापयेदेनं शौचाचारांश्च शिक्षयेत् ॥ १५ ॥

गुरूनें शिष्याचें उपनयन करून त्यास अगोदर भूः भुवः इत्यादि महाव्याहृति सांगून नंतर वेद शिकवावा. व पुढें सांगितलेलें शौच व आचार शिकवावें. मुलांच्या उपनयनाच्या जागीं मुलींचा विवाह आहे. यास्तव तो होण्याच्या पूर्वी मुलींनाही विशेष शौच व आचार उक्त नाहीं १५.

आतां शौच व आचार सांगतात—

दिवा संध्यासु कर्णस्थब्रम्हसूत्र उदङ्मुखः ।
कुर्यान्मूत्रपुरीषे च रात्रौ चेद्दक्षिणामुखः ॥ १६ ॥

यज्ञोपवीत उजव्या कानावर ठेवून दिवसा उत्तरेकडे तोंड करून व रात्रीं दक्षिणेकडे तोंड करून मूत्रपुरीषोत्सर्ग करावा. उजाडल्यावर सूर्योदयापर्यंत व सूर्यास्तानंतर काळोख पडेपर्यंत मूत्रादि उत्सर्ग करावयाचा झाल्यास उत्तरेकडेच तोंड करून बसावें १६. .

नंतर--

गृहीतशिश्नश्चोत्थाय मृद्भिरभ्युद्धृतैर्जलैः ।
गन्धलेपक्षयकरं शौचं कुर्यादतन्द्रितः ॥ १७ ॥

शिश्न धरून उठावें व जलाशयांतून वर काढिलेलें पाणी आणि मृत्तिका यांच्या योगानें गंध ( वास ) व लेप यांचा नाश करणारें शौच आळस न करितां करावें. विहीर, तळें, नदी इत्यादि जलाशयांत शौच करूं नये, हें सुचविण्याकरितां " वर काढलेलें पाणी " असें वर म्हटले आहे. १७

याप्रमाणें शौच केल्यावर--

अन्तर्जानुः शुचौ देश उपविष्ट उदङ्मुखः ।
प्राग्वा ब्राह्मेण तीर्थेन द्विजो नित्यमुपस्पृशेत् ॥ १८ ॥

पवित्र स्थळीं बसून उत्तरेकडे किंवा पूर्वेकडे तोंड करून दोन्ही हात गुडघ्याच्या आंत घेऊन ब्राह्मतीर्थानें द्विजानें सर्वदां आचमन करावें १८.

आतां तीर्थें सांगतात--

कनिष्ठादेशिन्यङ्गुष्ठमूलान्यग्रं करस्य च ।
प्रजापतिपितृब्रह्मदेवतीर्थान्यनुक्रमात् ॥ १९ ॥

करांगुली ( कनिष्ठे ) चें, तर्जनीचें व आंगठ्याचें मूळ आणि हाताचें अग्र हीं क्रमानें प्रजापति, पितृ, ब्रह्म व देवतीर्थें आहेत. अर्थात् आंगठ्याच्या मुळांत असलेल्या ब्राह्मतीर्थानें आचमन करावें. १९

आतां आचमन कोणत्या जलानें व कसें करावें तें सांगतात—

त्रिःप्राश्यापो द्विरुन्मृज्य खान्यद्भिः समुपस्पृशेत् ।
अद्भिस्तु प्रकृतिस्थाभिर्हीनाभिः फेनबुद्बुदैः ॥ २० ॥

तीन वेळ पाणी पोटांत घेऊन आंगठ्याच्या मुळानें दोन वेळ मुख पुसून नासिकादि छिद्रांस उदकस्पर्श करावा. दुसऱ्या कोणत्याहि द्रव्याचा संसर्ग न झालेल्या, व अस्वाभाविक वास, रूप, रस, स्पर्श आणि फेंस व बुडबुडे यांनीं रहित असलेल्या जलानें आचमन करणें उचित होय. पावसाच्या धारांचें वरच्यावर धरलेलें व शूद्रादिकांनीं दिलेलें पाणी आचमनास अयोग्य आहे २०.

हृत्कण्ठतालुगाभिस्तु यथासंख्यं द्विजातयः ॥
शुद्धयेरन्स्त्री च शूद्रश्च सकृत्स्पृष्टाभिरन्ततः ॥ २१ ॥

हृदय, कंठ, व तालु यांस जाऊन लागलेल्या जलानें अनुक्रमें ब्राम्हण, क्षत्रिय व वैश्य शुद्ध होतात. स्त्री व शूद्र यांनीं एकदांच तालूस जलस्पर्श केला असतां, तीं शुद्ध होतात. ज्यांचें उपनयन झालेलें नाहीं अशा द्विज बालकानेंहि शूद्राप्रमाणें एकदांच आचमन करावें. व आचमनाचें जल तालूपर्यंतच जाऊन पोंचेल त्याच्या पलीकडे जाणार नाहीं इतकेंच अल्प घ्यावें. इ, चवर्ग, य, श, हीं अक्षरें उच्चारतांना जीभ जेथें लागतें ती तालु होय २१.

आतां उपनयनानंतर प्रातःस्नानादिकांचें विधान करितात--

स्नानमब्दैवतैर्मन्त्रैर्मार्जनं प्राणसंयमः ॥
सूर्यस्य चाप्युपस्थानं गायत्र्याः प्रत्यहं जपः ॥२२ ॥

यथाशास्त्र प्रातःस्नान, " आपोहिष्ठा० " इत्यादि जलदेवताक मंत्रांनीं मार्जन, पुढें सांगितल्याप्रमाणें प्राणायाम, सूर्याचें उपस्थान व गायत्रीमंत्राचा जप हीं प्रत्यही करावीं २२.

प्राणायामाचा प्रकार सांगतात--

गायत्रीं शिरसा सार्धं जपेद्व्याहृतिपूर्विकाम् ।
प्रतिप्रणवसंयुक्तां त्रिरयं प्राणसंयमः ॥ २३ ॥

ॐ भूः, ॐ भुवः, इत्यादि प्रकारें प्रत्येक व्याहृतीच्या मागें प्रणव जोडून " आपोज्योति० " इत्यादि गायत्रीच्या मस्तकासह गायत्रीमंत्राचा जप प्राणांचें नियमन करून मनांतल्यामनांत तीन वेळ करावा. हाच प्राणायाम होय २३.

आतां सायंसंध्येचें विधान करितात--

प्राणानायम्य संप्रोक्ष्य तृचेनाब्दैवतेन तु ।
जपन्नासीत सावित्रीं प्रत्यगातारकोदयात् ॥ २४ ॥

वर सांगितल्याप्रमाणें प्राणायाम करून " आपोहिष्ठा० " इत्यादि मंत्रांनीं मस्तकावर प्रोक्षण करून पश्चिमेकडे तोंड करून नक्षत्रें दिसूं लागतात तों गायत्रीमंत्राचा जप करीत बसावें. ( सूर्यास्तसमयीं अर्धें सूर्यमंडल वर दिसत असतांनाच जपास आरंभ करावा ) २४.

आतां प्रातःसंध्येचें विधान--

संध्यां प्राक्प्रातरेवं हि तिष्ठेदासूर्यदर्शनात् ।

प्रातः संध्यासमयीं याचप्रमाणें विधान करीत पूर्वेकडे तोंड करून सूर्योदय होईपर्यंत उभें रहावें. ही संध्योपासना गृहांत बसून करण्यापेक्षां गोठ्यांत करणें चांगलें. त्याच्याहीपेक्षां नदीच्या कांठीं करणें उत्तम व विष्णुसन्निध करणें तर फारच प्रशस्त होय. द्विजांस व त्यांतूनही ब्राम्हणांस ही उपासना अतिशय अवश्य आहे. कारण जो संध्योपासना करीत नाहीं तो जिताच शूद्र होतो व तो जें जें कांहीं करितो तें तें सर्व निष्फळ होतें. इत्यादिप्रकारें धर्मशास्त्रांत संध्या न करणाऱ्या ब्राम्हणाची निंदा केलेली आहे (आधुनिक ब्राम्हणांनीं तिकडे लक्ष द्यावें).

याप्रमाणें संध्योपासना करून झाल्यावर--

**अग्निकार्यं ततः कुर्यात्संध्ययोरुभयोरपि ॥ २५ ॥**

दोन्हीं संध्यासमयीं आपापल्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधानानें अग्निकार्य म्हणजे अग्नींत समिधांचा होम करावा २५.

**ततोऽभिवादयेद्वृद्धानसावहमिति ब्रुवन् ।**

त्यानंतर माता, पिता, गुरु इत्यादि वडील माणसांस "हा मी अमुक आहें" असें आपलें नांव सांगून वंदन करावें.

**गुरुं चैवाप्युपासीत स्वाध्यायार्थं समाहितः ॥ २६ ॥**
**आहूतश्चाप्यधीयीत लब्धं चास्मै निवेदयेत् ।**
**हितं चास्याऽऽचरेन्नित्यं मनोवाक्कायकर्मभिः ॥ २७ ॥**

पुढें सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या गुरूंची परिचर्या करण्यास तयार होऊन रहावें. अध्ययनार्थ सावध होऊन रहावें. म्हणजे गुरूंनीं हांक मारतांच अध्ययनास जातां येईल अशा तयारीनें ते केव्हां बोलावितात म्हणून वाट पहात असावें. त्यांनीं हांक मारून "म्हणा" अशी आज्ञा केली असतां अध्ययनास आरंभ करावा. आपण स्वतः जाऊन त्यांस "आम्हांस पाठ सांगा" असें म्हणूं नये. त्यांच्यापासून जें अध्ययन प्राप्त झालें असेल तें त्यांस निवेदन करावें. त्याचप्रमाणें मन, वाणी व शरीर यांच्या व्यापारांनीं सर्वदा गुरूंचें हित करावें. त्यांच्या प्रतिकूल आचरण करूं नये. ( येथें सांगितलेले शिष्याचे धर्म किती उत्तम आहेत ) २६,२७.

आतां गुरूनें कोणाकोणास अध्ययन सांगावें तें सांगतात—

**कृतज्ञाद्रोहिमेधाविशुचिकल्पानसूयकाः ।**
**अध्याप्या धर्मतः साधुशक्ताप्तज्ञानवित्तदाः ॥ २८ ॥**

केलेले उपकार न विसरणारा, दयाळू, ग्रंथांचें ग्रहण व धारण करण्यास समर्थ, बाह्य व आंतर शौचसंपन्न, शारीरिक पीडा व मानसिक व्यथा यांनीं रहित, दुसऱ्यांचे दोष तोंडावाटें न काढितां गुण मात्र प्रकट करणारा, आचारसंपन्न, शुश्रूषा करण्यास समर्थ, बंधु ( आप्त नातेवाईक ), दुसरी एकादी विद्या शिकविणारा व द्रव्य देणारा, इतक्या शिष्यांस शास्त्राप्रमाणें

विद्या शिकवावी. ( वर सांगितलेले सर्वच गुण सर्व शिष्यांमध्यें असणें शक्य नाहीं, यास्तव त्यांतील कांहीं गुण असले तरी तो शिष्य शिकविण्यास योग्य होय ) २८.

**दण्डाजिनोपवीतानि मेखलां चैव धारयेत् ।**
**ब्राह्मणेषु चरेद्भैक्षमनिन्द्येष्वात्मवृत्तये ॥ २९ ॥**

पळस, वड इत्यादिकांचा दंड, कृष्णाजिनादि अजिन, कार्पासादिकांचें यज्ञोपवीत, मुञ्जादि तृणांची मेखला, इत्यादि उपकरणें ब्राह्मणादि ब्रह्मचाऱ्यांनीं धारण करावींत, व त्या दंडादिकांनीं युक्त होऊन त्यानें दोषरहित व आपल्या कर्मामध्यें निमग्न असलेल्या ब्राह्मणांच्या गृहीं आपल्या निर्वाहाकरितां भिक्षा मागावी. आचार्य, त्याची पत्नी व पुत्र यांच्यावांचून दुसऱ्या कोणाकरितांही ब्रह्मचाऱ्यानें भिक्षा मागूं नये. आतां ब्राह्मणाच्या गृहीं भिक्षा मागणें कांहीं कारणानें अशक्य झाल्यास क्रमानें क्षत्रिय व वैश्य यांच्या गृहीं ती मागावी. चारही वर्णांच्या लोकांच्या गृहीं भिक्षा मागावी असें जें कोठें कोठें सांगितलेलें आहे त्याचा अर्थ इतकाच समजावा कीं अगदींच उपाशी रहाण्याची व त्यामुळें प्राण जाण्याची वेळ आल्यास शूद्राकडील भिक्षा घ्यावी २९.

आतां भिक्षा कशी मागावी तें सांगतात—

**आदिमध्यावसानेषु भवच्छब्दोपलक्षिता**
**ब्राह्मणक्षत्रियविशां भैक्षचर्या यथाक्रमम् ॥ ३० ॥**

ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य ब्रह्मचाऱ्यांनीं क्रमानें " भवति भिक्षां देहि " ( अहो बाई भिक्षा घाला. ) " भिक्षां भवति देहि " " भिक्षां देहि भवति " असें म्हणून भिक्षा मागावी ३०.

याप्रमाणें भिक्षा मागून आणून—

**कृताग्निकार्यो भुञ्जीत वाग्यतो गुर्वनुज्ञया ।**
**आपोशनक्रियापूर्वं सत्कृत्यान्नमकुत्सयन् ॥ ३१ ॥**

ती गुरुस निवेदन करावी व त्याची आज्ञा झाली असतां अग्निकार्य ( होम ) करून, मौन धरून, अन्नाचा सत्कार करून, त्याची निंदा न करितां आगोदर अपोशन घेऊन भोजन करावें. मिताक्षरा कर्त्यांच्या मतें—"कांहीं कारणानें संध्या-समयीं अग्निकार्य केलें नसल्यास तें यावेळीं करावें " असें सांगण्याकरितां येथें अग्निकार्य करावें असें म्हटलें आहे. व अपरार्कांच्या मतें--" आचार्य आश्रमांत नसल्यास अर्थात् प्रवासांत असल्यास भिक्षान्नांतील कांहीं अन्न अग्नींत होमून भोजन करावें. पण आचार्य जवळ असल्यास त्यास भोजन घालून नंतर आपण जेवावें " हें सुचविण्याकरितां येथें अग्निकार्य सांगितलें आहे ३१.

**ब्रह्मचर्ये स्थितो नैकमन्नमद्यादनापदि ।**
**ब्राह्मणः काममश्नीयाच्छ्राद्धे व्रतमपीडयन् ॥ ३२ ॥**

ब्रह्मचर्य आश्रमांत असलेल्या बालकानें व्याधि इत्यादि नसतांना एकाच्याच घरचें अन्न खाऊं नये. पण ब्राह्मण ब्रह्मचाऱ्यास जर कोणी श्राद्धास बोलाविलें तर त्यानें मध व मांस यांचा त्याग करून एकाचेंच अन्न खुशाल खावें. अर्थात् क्षत्रिय व वैश्य ब्रह्मचाऱ्यांनीं श्राद्धीय भोजन करूं नये ३२.

आतां ब्रह्मचाऱ्याचे नियम सांगतात—

**मधुमांसाञ्जनोच्छिष्टशुक्तस्त्रीप्राणिहिंसनम् ।**
**भास्करालोकनाश्लीलपरिवादादि वर्जयेत् ॥ ३३ ॥**

मध, बकऱ्याचें वगैरे मांस, काजळ आपलें किंवा दुसऱ्याचें उष्टें, निष्ठुर भाषण, उपभोगार्थ स्त्री, जीवांचा वध, उदय व अस्तसमयीं सूर्याचें अवलोकन, अश्लील व असत्य भाषण, दुसऱ्यामध्यें विद्यमान किंवा अविद्यमान दोषांचें कथन, इत्यादि ब्रह्मचाऱ्यानें वर्ज करावें. '' परिवादादि '' येथें जो आदि शब्द आहे त्यावरून दुसऱ्या स्मृतींत सांगितलेलेहीं नियम पाळावें असें होतें. त्यांतील कांहीं येथें सांगतों—अंगास उटी लावणें, गळ्यांत माळा घालणें, दिवसां निजणें, पायांत जोडा घालणें, छत्री घेणें, काम, क्रोध, लोभ, मोह, वाद्यें वाजविणें, अंगास उटणें लावून उष्णोदकानें स्नान करणें, अति हर्ष, नृत्य, गीत, दुसऱ्यास भिवविणें इत्यादि ( हे व अशाच प्रकारचे नियम पाळणारा ब्रह्मचारी तेजस्वी व साहसी निपजणें किती शक्य आहे याचा आधुनिकांनीं विचार करावा ) ३३.

आतां गुरु व आचार्य यांचीं लक्षणें सांगतात—

**स गुरुर्यः क्रियाः कृत्वा वेदमस्मै प्रयच्छति ।**
**उपनीय ददद्वेदमाचार्यः स उदाहृतः ॥ ३४ ॥**

जो गर्भाधानादि उपनयनान्त क्रिया करतो तो (अर्थात् पिता) गुरु होय. तो ब्राह्मण असल्यास त्यानें उपनयनानंतर आपल्या पुत्रास वेदही शिकवावा. पण जो केवल उपनयन करून त्यास वेद व इतर विद्या शिकवितो तो आचार्य होय. ( यावरून व इतर स्मृति वचनें पाहिलीं असतां असें सिद्ध होतें कीं, पुत्रास विद्या शिकविण्याचा मुख्य अधिकार पित्याचाच आहे व पित्यापासून प्राप्त झालेली विद्याच पुत्राचें खरें हित करूं शकते. पण सर्वच पुत्र व पिते इतके भाग्यवान् नसतात. त्यामुळें शेंकडा नव्याण्णव बालकांस दुसऱ्यापाशीं जाऊन शिक्षण घ्यावें लागतें आणि त्यांतून गुरुही हल्लींच्या प्रमाणें प्रत्येक वर्षी बदलणारे व भाडोत्री असले म्हणजे तर काय आनंदच ) ३४.

आतां उपाध्यायादिकांचीं लक्षणें सांगतात—

**एकदेशमुपाध्याय ऋत्विग्यज्ञकृदुच्यते ।**
**एते मान्या यथापूर्वमेभ्यो माता गरीयसी ॥ ३५ ॥**

मंत्र व ब्राह्मणरूप वेदाचा कांहीं भाग किंवा व्याकरणासारखें एकादें अंग जो शिकवितो तो उपाध्याय होय. यजमानानें प्रार्थनापूर्वक वरण केलें ( वरणी दिली ) असतां जो

पाकयज्ञ, अग्निष्टोम इत्यादि यज्ञ करितो तो ऋत्विज होय. हे गुरु, आचार्य, उपाध्याय व ऋत्विज पूर्व क्रमानें मान्य होत म्हणजे गुरु सर्वांपेक्षां अधिक मान्य, आचार्य त्याच्या खालोखाल, उपाध्याय त्याच्याही खालोखाल व ऋत्विज उपाध्यायाहूनही कमी मान्य होय. पण माता या सर्वांहून अधिक मान्य आहे ३५.

वेदग्रहण करण्याकरितां ब्रह्मचर्य किती दिवस पाळावें तें सांगतात—

**प्रतिवेदं ब्रह्मचर्यं द्वादशाब्दानि पञ्च वा ।**
**ग्रहणान्तिकमित्येके केशान्तश्चैव षोडशे ॥ ३६ ॥**

हें ब्रह्मचर्य प्रत्येक वेदशाखेकरितां बारा वर्षें पाळावें. पण इतकें सामर्थ्य नसल्यास पांच वर्षें किंवा वेदाचें ग्रहण करीपर्यंत तें पाळावें व गोदान नामक कर्म सोळाव्या वर्षी करावें. ( विज्ञानेश्वर म्हणतात कीं, हें कर्म गर्भापासून सोळाव्या वर्षी करावें व अपरार्क म्हणतात जन्मापासून सोळाव्या वर्षी करावें. ) पण हें गोदानाचें कालमान बारा वर्षें ब्रह्मचर्य पाळावयाचें असल्यास समजावें. पांच किंवा त्याहून कमी वर्षें ब्रह्मचर्य पाळावयाचें असल्यास केशान्तही सोळा वर्षांपूर्वी करून टाकावा. क्षत्रिय व वैश्य यांच्या केशान्ताचा काल उपनयनाच्या गौण कालाप्रमाणें क्रमानें बाविसाव्या व चोविसाव्या वर्षी समजावा ३६.

आतां उपनयनाच्या कालाचा परमावधि सांगतात—

**आषोडशाद्द्वाविंशाच्चतुर्विंशाच्च वत्सरात् ।**
**ब्रह्मक्षत्रविशां काल औपनायनिकः परः ॥ ३७ ॥**

जन्मापासून सोळाव्या वर्षापर्यंत, बाविसाव्या वर्षापर्यंत व चोविसाव्या वर्षापर्यंत क्रमानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांच्या उपनयनाचा परम काल सांगितलेला आहे ३७.

**अत ऊर्ध्वं पतन्त्येते सर्वधर्मबहिष्कृताः ।**
**सावित्रीपतिता व्रात्या व्रात्यस्तोमादृते क्रतोः ॥ ३८ ॥**

पण या परमावधीचेंही उल्लंघन झालें असतां ते सर्वधर्मबहिष्कृत म्हणजे सर्व वर्णधर्मांविषयीं अनधिकारी व सावित्रीपतित म्हणजे सावित्रीदानास अयोग्य होतात. अशा ब्राह्मणादिकांस व्रात्य असें म्हणतात. आणि व्रात्यस्तोमनामक यज्ञावांचून तें संस्कारहीनच होत. अर्थात् व्रात्यस्तोम हें प्रायश्चित्त केल्यावांचून ते उपनयनाचे अधिकारी होत नाहींत ३८.

आतां ब्राह्मणादिकांस द्विज म्हणण्याचें कारण सांगतात—

**मातुर्यदग्रे जायन्ते द्वितीयं मौञ्जिबन्धनात् ।**
**ब्राह्मणक्षत्रियविशस्तस्मादेते द्विजाः स्मृताः ॥ ३९ ॥**

प्रथम मातेच्या उदरांतून जन्म होतो. व मौंजीबंधनामुळें दुसरा होतो. यास्तव ब्राह्मण क्षत्रिय व वैश्य यांस द्विज म्हटलें आहे. ( अर्थात् ज्यांचें मौंजीबंधन उक्त कालाच्या आंत होत नाहीं ते द्विज नव्हेत ) ३९.

आतां वेदाध्ययनाचें फल सांगतात—

यज्ञानां तपसां चैव शुभानां चैव कर्मणाम् ।
वेद एव द्विजातीनां निःश्रेयसकरः परः ॥ ४० ॥

वेदप्रोक्त व स्मृतिप्रोक्त यज्ञ, शरीरशोषण करणाऱ्या चांद्रायणादि तपश्चर्या व उपनयनादि शुभ संस्कार या सर्वांमध्यें वेद हाच द्विजास श्रेष्ठ मोक्षदाता आहे; अन्य कांहीं नाहीं ( वेदमूलक स्मृतीही वेदांप्रमाणेंच मोक्षदायी आहेत असें जाणावें ) ४०.

आतां वेदाध्ययनाचें महत्त्व किती आहे तें पुढील सहा श्लोकांत सांगतात—

मधुना पयसा चैव स देवांस्तर्पयेद्द्विजः ।
पितॄन्मधुघृताभ्यां च ऋचोऽधीते च योऽन्वहम् ॥ ४१ ॥

जो द्विज प्रत्यहीं ऋग्वेदाचें अध्ययन करतो तो मध व दूध यांनीं देवांस व मध आणि तूप यांनीं पितरांस तृप्त करितो ४१.

यजूंषि शक्तितोऽधीते योऽन्वहं स घृतामृतैः ।
प्रीणाति देवानाज्येन मधुना च पितॄंस्तथा ॥ ४२ ॥

जो आपल्या शक्तीप्रमाणें प्रत्यहीं यजुर्वेदाचें अध्ययन करितो तो घृत व अमृत यांच्या योगानें देवांस व आज्य आणि मध यांनीं पितरांस तृप्त करितो ४२.

स तु सोमघृतैर्देवांस्तर्पयेद्यो ऽन्वहं पठेत् ।
सामानि तृप्तिं कुर्याच्च पितॄणां मधुसर्पिषा ॥ ४३ ॥

जो प्रतिदिनीं सामवेद म्हणतो तो सोम व घृत यांनीं देवांस व मध आणि ताजें तूप यांनीं पितरांस तृप्त करितो ४३.

मेदसा तर्पयेद्देवानथर्वाङ्गिरसः पठन् ।
पितॄंश्च मधुसर्पिर्भ्यामन्वहं शक्तितो द्विजः ॥ ४४ ॥

जो द्विज यथाशक्ति प्रत्यहीं अथर्ववेद पढतो तो पश्वादिकांच्या शरीरांतील मेदानें देवांस व मध आणि ताजें तूप यांनीं पितरांस संतुष्ट करितो ४४.

वाकोवाक्यं पुराणं च नाराशंसीश्च गाथिकः ।
इतिहासांस्तथा विद्याः शक्त्याधीते हि योऽन्वहम् ॥४५॥
मांसक्षीरौदनमधुतर्पणं स दिवौकसाम् ।
करोति तृप्तिं कुर्याच्च पितॄणां मधुसर्पिषा ॥ ४६ ॥

त्याचप्रमाणें जो आपल्या शक्तीप्रमाणें प्रश्नोत्तररूप वेदवाक्यें, ब्राह्मादि पुराणें, मानवादि धर्मशास्त्रें, रुद्र ही ज्यांची देवता आहे असे मंत्र, यज्ञांतील इंद्रादिकांच्या गाथा, महा-

भारतादि इतिहास व वारुणी, मधु इत्यादि उपासना यांचा पाठ करितो तो मांस, भाताची क्षीर व मध यांच्या योगानें देवांस व मध आणि ताजें घृत यांच्या योगानें पितरास तृप्त करितो ४५,४६.

येणेंप्रमाणें—

**ते तृप्तास्तर्पयन्त्येनं सर्वकामफलैः शुभैः ।**
**यं यं क्रतुमधीतेऽसौ तस्य तस्याप्नुयात्फलम् ॥ ४७ ॥**

ते देव व पितर तृप्त होऊन वेदादिकांचें अध्ययन करणाऱ्या पुरुषांस सर्व इष्टफलदानानें तृप्त करितात. आतां या अध्ययनाची स्तुति करितात. द्विज ज्या ज्या यज्ञाचें प्रतिपादन करणारा वेदभाग नित्य म्हणतो त्या त्या यज्ञाचें फळ त्यांस मिळतें. ४७

त्याचप्रमाणें—

**त्रिर्वित्तपूर्णपृथिवीदानस्य फलमश्नुते ।**
**तपसो यत्परस्येह नित्यं स्वाध्यायवान् द्विजः ॥ ४८ ॥**

नित्य स्वाध्याय करणाऱ्या द्विजास धनानें भरलेल्या पृथ्वीचें तीन वेळ दान दिल्याचें व चांद्रायणादि परम तपाचें फल मिळतें. सारांश द्विजास वेदाध्ययन नित्य आहे व तें केल्यास तो परम फलास पात्र होतो. प्रत्यक्ष वेदसंहितेचें अध्ययन करणें अशक्य झाल्यास त्यानें निदान वेदाच्या थोड्याशा भागाचें तरी नित्य अध्ययन करणें अवश्य आहे. ( सांप्रतकाळीं द्विजांची तर गोष्टच राहूं द्या; पण प्रत्यक्ष ब्राह्मणांची तरी या बाबतींत काय अवस्था आहे हें पाहिलें असतां फार खेद होतो ) ४८

असो; याप्रमाणें सामान्यतः ब्रह्मचाऱ्याचे धर्म सांगून आतां नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याचे विशेष धर्म सांगतात—

**नैष्ठिको ब्रह्मचारी तु वसेदाचार्यसन्निधौ ।**
**तदभावेऽस्य तनये पत्न्यां वैश्वानरेऽपि वा ॥ ४९ ॥**

निष्ठा म्हणजे मरणकाल तेथपर्यंत मी ब्रह्मचर्य पाळणार असा ज्यानें निश्चय केला असेल त्यास नैष्ठिक ब्रह्मचारी म्हणतात. अशा ब्रह्मचाऱ्यानें यावज्जीव आचार्याजवळ रहावें वेद ग्रहण केल्यावर स्वतंत्र होऊं नये. आचार्य नसल्यास त्याच्या पुत्रासमीप रहावें पुत्राच्या अभावीं त्याच्या पत्नीपाशीं रहावें व पत्नीही जिवंत नसल्यास आचार्याच्या अग्नीचेंही सान्निध्य करावें ४९.

कारण—

**अनेन विधिना देहं साधयन्विजितेन्द्रियः ।**
**ब्रह्मलोकमवाप्नोति न चेह जायते पुनः ॥ ५० ॥**

जो ब्रह्मचारी या पूर्वोक्त प्रकारें आपल्या देहास क्षीण करीत मोठ्या प्रयत्नानें जितेंद्रिय राहतो तो ब्रह्मलोकास प्राप्त होतो. तो महात्मा पुनरपि या संसारांत जन्म घेत नाहीं. नैष्ठिक

ब्रह्मचारी राहून जो ब्रह्माची उपासना करितो तो तर इतर ब्रह्मज्ञ पुरुषाप्रमाणें ब्रह्मरूप होऊन मुक्त होतो. ब्रह्मचारी दोन प्रकारचे असतात. एक उपकुर्वाण व दुसरा नैष्ठिक. कांहीं काल ब्रह्मचर्य आश्रमांत राहणाऱ्यास उपकुर्वाण व यावजीव ब्रह्मचारी राहणाऱ्यास नैष्ठिक म्हणतात. वसिष्ठ, देवल इत्यादिकांनीं नैष्ठिक ब्रह्मचाऱ्याचे-एक वेळ भोजन, त्रिकालस्नान इत्यादि दुसरेही अनेक धर्म सांगितले आहेत. पण विस्तारभयास्तव त्यांचा येथें संग्रह केला नाहीं. द्विजांनीं आश्रमावांचून राहूं नये. चार आश्रमांतून कोणत्या तरी एका आश्रमांत अवश्य रहावें. एक आश्रम सोडून पुढचा दुसरा आश्रम घेतां येतो. पण पुढचा आश्रम सोडून कोणताही पूर्व आश्रम घेतां येत नाहीं ५०.

इति ब्रह्मचारीप्रकरणम् २

---

# अथ विवाहप्रकरणम् ३.



ज्याला विवाह करावयाचा असतो त्याच्या विवाहाकरितां प्रथम स्नान सांगतात—

**गुरवे तु वरं दत्वा स्नायीत तदनुज्ञया ।**
**वेदव्रतानि वा पारं नीत्वा ह्युभयमेव वा ॥ ५१ ॥**

वर सांगितल्याप्रमाणें मन्त्रब्राह्मणरूप वेद किंवा आरंभलेलीं ब्रह्मचाऱ्याचीं व्रतें यांतील कांहीं तरी एक अथवा दोन्ही संपवून चवतिसाव्या श्लोकांत सांगितलेल्या गुरूस जें इष्ट असेल तें आपल्या शक्तीप्रमाणें देऊन स्नान करावें. ब्राह्मणानें गाय, क्षत्रियानें गांव, व वैश्यानें घोडा द्यावा, असें कात्यायनानें सांगितलें आहे. पण गाय, गांव इत्यादि वर ( दक्षिणा ) देण्याची ज्यास शक्ति नसेल त्यानें मनूनें सांगितल्याप्रमाणें धान्य, वस्त्रें किंवा भाजी द्यावी. पण तेवढेंही सामर्थ्य नसल्यास कांहीं एक न देतां केवल त्याची आज्ञा घेऊन स्नान करावें. वेदाध्ययन याचा अर्थ केवल वेदाक्षरें तोंडपाठ म्हणणें इतकाच नाहीं; तर अक्षरग्रहणपूर्वक त्याच्या अर्थाचें ज्ञान करून घेणें असा आहे. अशा रीतीनें ज्यानें स्नान केलें आहे त्यास स्नातक म्हणतात. स्नातकाचे सांतानिक, यक्ष्यमाण इत्यादि नऊ प्रकार आहेत. या स्नातकांची योग्यता धर्मशास्त्रकारांनीं फार मोठी मानलेली आहे ५१.

असो; स्नानानंतर काय करावें तें सांगतात—

**अविप्लुतब्रह्मचर्यो लक्षण्यां स्त्रियमुद्वहेत् ।**
**अनन्यपूर्विकां कान्तामसपिण्डां यवीयसीम् ॥ ५२ ॥**

ज्याच्या ब्रह्मचर्याचें स्खलन झालें नसेल त्यानें बाह्य व आंतर लक्षणांनीं युक्त, वाग्दानानें किंवा उपभोगाच्या द्वारा पूर्वीं दुसऱ्या कोणाची न झालेली, वराच्या मनास आनंद देणारी, असपिंड आणि वयानें व अंगादि प्रमाणानें लहान अशा स्त्रीशीं ( अर्थात ही स्त्री

आहे अशी परीक्षा करवून) आपल्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीनें विवाह करावा. अंगावर केंस नसणें, कोणतेंहीं व्यंग नसणें, मंजुळ भाषण इत्यादि बाह्य लक्षणें होत. आंतर लक्षणें कशीं ओळखावीं तें आश्वलायनांनीं सांगितलें आहे. गोठा, वारुळ, जुगार खेळण्याचें स्थान, सरोवर (डोह), माळ शेत, चव्हाटा व स्मशान या आठ ठिकाणांतून आदल्या रात्रीं माती आणून तिचे निरनिराळे आठ गोळे करावेत व "ऋतमग्रे प्रथमं०" इत्यादि मंत्रानें त्यांचें अभिमंत्रण करावें. नंतर यांतील एका गोळ्यास स्पर्श कर असें त्या कन्येस सांगावें. गोठ्यांतील मातीच्या गोळ्यास तिनें स्पर्श केल्यास ती धान्यवाली होईल; दुसऱ्या मातीच्या गोळ्यास स्पर्श केल्यास ती गायी, बैल इत्यादि पशूंनीं संपन्न होईल; तिसऱ्या मृत्पिंडास तिनें स्पर्श केल्यास ती अग्निहोत्र्याची शुश्रूषा करणारी निपजेल; चवथ्या गोळ्यास स्पर्श केल्यास ती चतुर, विवेकी, व सर्व जनांस संतुष्ट राखण्यांत तत्पर होईल; पांचव्या पिंडास स्पर्श केल्यास ती रोगी होईल; सहाव्या म्हणजे शेतांतील मातीच्या गोळ्यास तिनें हात लाविल्यास ती वांझ होईल; सातव्या मृत्पिंडास स्पर्श केल्यास ती व्यभिचारिणी होईल व आठव्या पिंडास स्पर्श केल्यास ती विधवा होईल, असें समजावें. वर असपिंडा असें म्हटलें आहे. पण त्याचा अर्थ वाचकांस सहज समजण्यासारखा नाहीं म्हणून त्याच्याविषयीं थोडासा विस्तार केला पाहिजे. समान म्हणजे एक व पिंड म्हणजे देह—एकच आहे देह जिचा तिला सपिंडा म्हणतात. व जी अशी सपिंडा नसते ती असपिंडा. पण ही सपिंडता एका शरीराच्या अवयवाशीं संबंध ठेविल्यानें होते. याचें उदाहरण देतों म्हणजे समजेल. पुत्राचा पित्याच्या शरीरावयवाशीं संबंध असतो म्हणून त्याचें पित्याशीं सापिंड्य असतें त्याचप्रमाणें पित्याचा पिता, त्याचा पिता इत्यादिकांशीं पित्याच्या द्वारा नातु, पणतु इत्यादिकांचा संबंध असल्यामुळें त्यांचें परस्पर सापिंड्य ठरतें. याच न्यायानें मातेच्या शरीराच्या अवयवांशीं संबंध असल्यामुळें पुत्राचें मातेशीं सापिंड्य व मातेच्या द्वारा तिचा बाप, आई, भाऊ व बहिण इत्यादिकांशीं सापिंड्य असतें. काका, आते यांच्याशींही एकशरीरसंबंधामुळेंच पुतण्या व भाचा यांची सपिंडता असते. त्याचप्रमाणें पति व पत्नी हीं दोघें पुत्राच्या एका शरीरास निर्माण करणारीं असतात. यास्तव त्यांचेंही सापिंड्य असतें. याच न्यायानें जावाजावांचेंही परस्पर सापिंड्य ठरतें. सारांश जेथें जेथें सपिंड शब्द येईल तेथें तेथें वर सांगितल्याप्रमाणें प्रत्यक्ष किंवा परंपरेनें एकशरीरसंबंध आहे असें समजावें. सपिंड म्हणजे एकशरीरसंबंध असें जेथें म्हटलें आहे त्याला श्रुतिही प्रमाण आहे. त्यांतील गर्भोपनिषदाच्या एका वाक्याचाच येथें उल्लेख करून हें प्रकरण संपवितों. "पुत्राच्या शरीरांत सहा कोश असतात. त्यांतील तीन पित्याच्या शरीरापासून प्राप्त झालेले व तीन मातेच्या शरीरांतील. अस्थि, स्नायु व मज्जा हे तीन कोश पित्यापासून व त्वक्, मांस व रक्त हे तीन मातेपासून होतात" ५२.

कन्या आणखी कशी असावी तें सांगतात—

अरोगिणीं भ्रातृमतीमसमानार्षगोत्रजाम् ।
पञ्चमात्सप्तमादूर्ध्वं मातृतः पितृतस्तथा ॥ ५३ ॥

ज्याची चिकित्साच करतां येत नाहीं अशा रोगानें युक्त नसलेली कन्या असावी. तिला भाऊ असावेत. कारण ते नसल्यास तिला तिचा पिता पुत्रिका करील अशी शंका येणें साहजिक आहे. "हिला जो पुत्र होईल तो माझें और्ध्वदेहिकादि करणारा-पुत्र होईल" असा वराशीं करार करून मनांत किंवा केवल हेतु धरून पित्यानें कन्या दिली असतां ती पुत्रिका होते. तशीच ती प्रवर व गोत्र हीं समान नसलेल्या पुरुषापासून उत्पन्न झालेली असावी. अर्थात् श्वशुर व वर या दोघांचेही प्रवर व गोत्रें भिन्न भिन्न असावींत. ऋषीच्या नांवास प्रवर म्हणतात व गोत्र वंशपरंपरा प्रसिद्ध असतें. मातेच्या गोत्रांतील कन्येशींही विवाह करूं नये असें कित्येक म्हणतात. " पिता व माता यांची असपिंड कन्या " असें मनुस्मृतींत म्हटलें आहे. त्यावरून आते, मामा, मावशी यांच्या कन्येशीं विवाह करितां येत नाहीं. सारांश जिचें गोत्र, प्रवर व पिंड हीं समान नाहींत तिच्याशींच विवाह करावा असें ठरतें. पण देशस्थ ब्राह्मण आपल्या भाचीशीं व मामा, मावशी इत्यादिकांच्या कन्येशीं विवाह करतात. पराशर माधव ग्रंथांत माधवाचार्यांनीं श्रुतिप्रमाण देऊन मातुलकन्येशीं विवाह करण्यास श्रुतिप्रमाण आहे असेंही म्हटलें आहे. पण अपरार्कादि इतर शास्त्रकार त्याचा निषेध करीत असल्यामुळें, माधवाचार्यांचें म्हणणें सर्व विद्वानांस मान्य होईलच असें वाटत नाहीं. भाचीशीं वगैरे विवाह करण्यास तर प्रमाण कोठेंच मिळत नाहीं. क्षत्रिय व वैश्य यांस स्वतःचें गोत्र जरी नसलें तरी त्यांच्या पुरोहिताचें गोत्र त्यांनीं घ्यावें असें आश्वलायनांनीं म्हटलें आहे. असो; सपिंड सगोत्र व सप्रवर कन्यांशीं जरी कोणी विवाह केला तरी त्यांच्या ठिकाणीं शास्त्रीयदृष्ट्या पत्नीत्वच येत नाहीं व रोगिणी, भ्रातृरहित इत्यादि कन्यांचे ठायीं जरी पत्नीत्व आलें तरी त्यांत प्रत्यक्ष विरोध येतो.

वरच्या श्लोकांत " असपिंडा " या पदाचें व्याख्यान करितांना साक्षात् किंवा परंपरेनें एक शरीरसंबंधाच्या द्वारा सापिंड्य सांगितलें पण अशा प्रकारचें सापिंड्य या अनादि संसारामध्यें प्रत्येकाचें प्रत्येकाशीं असतें. कारण सर्व प्राणी ईश्वरापासून निर्माण झालेले असल्यामुळें त्यांचें परंपरेनें सापिंड्य असतेंच. अशी येथें शंका येणें साहजिक आहे. म्हणून तिचें निराकरण या श्लोकाच्या " पञ्चमात्सप्तमा० " इत्यादि उत्तरार्धानें करितात. " मातेच्या संतानांतील पांचव्या पिढीनंतर व पित्याच्या संतानांतील सातव्या पुरुषानंतर सापिंड्य निवृत्त होतें." पिता, पितामह इत्यादि वरील सहा व पुत्र, पौत्र इत्यादि पुढचे सहा पुरुष व मधला आपण एक अशा सात पुरुषानंतर सापिंड्य निवृत्त होतें. त्याचप्रमाणें माता, मातेचा पिता इत्यादि मोजून पांच पुरुषांच्या आंतील संतानांत असणारी कन्या मातृतः पांचवी होय. तिच्यापुढें सापिंड्यनिवृत्ति होते. असा प्रकार असल्यामुळें बहिणी बहिणी, भाऊ व बहिण, पुतणी व चुलता यांचा विवाह करावयाचा म्हटल्यास जरी त्यांच्या शाखा भिन्न असल्या तरी मूळ पुरुषामध्यें व त्यांच्यामध्यें दोन पुरुषांचेंच अंतर असल्यामुळें तो होऊं शकत नाहीं ५३.

त्याचप्रमाणें—

**दशपुरुषविख्याच्छ्रोत्रियाणां महाकुलात् ।**
**स्फीतादपि न संचारिरोगदोषसमन्वितात् ॥ ५४ ॥**

मातेकडील पांच व पित्याकडील पांच अशा दहा पुरुषांनी प्रसिद्ध वेदशास्त्राध्ययनसंपन्न व पुत्र, पौत्र, दास, पशु, ग्राम इत्यादिकांनीं समृद्ध अशा मोठ्या कुलांतील कन्येशींच विवाह करावा. पण तें कुल जर कुष्ठ, अपस्मार इत्यादि शुक्र व शोणित यांच्या द्वारा संतानामध्येंही प्रवेश करणाऱ्या रोगांनीं युक्त, पौरुषशून्य, आळशी, व्यसनी व अशाच प्रकारच्या दुसऱ्याही दोषांनीं युक्त असेल तर तें केवढेंही मोठें असलें तरी त्यांतील कन्या करूं नये ५४.

आतां वराविषयीं नियम सांगतात—

**एतैरेव गुणैर्युक्तः सवर्णः श्रोत्रियो वरः ।**
**यत्नात्परीक्षितः पुंस्त्वे युवा धीमान् जनप्रियः ॥ ५५ ॥**

याच वर सांगितलेल्या गुणांनीं युक्त, दोषरहित, कन्येच्या समान वर्णाचा किंवा तिच्यापेक्षां उच्च वर्णाचा, स्वतः वेदाध्ययनसंपन्न, पुरुषत्वाविषयीं मोठ्या प्रयत्नानें ज्याची परीक्षा करविली आहे असा तरुण, लौकिक व वैदिक व्यवहारामध्यें निपुण, व मृदु आणि हंसत हंसत भाषण केल्यामुळें लोकांस प्रिय होणारा वर असावा ५५.

रतीकरितां, पुत्राकरितां व धर्माकरितां असा तीन प्रकारचा विवाह आहे. त्यांतील पुत्राकरितां सवर्ण स्त्रीशीं विवाह करणें हा मुख्य पक्ष आहे तो वर सांगितला. आतां त्याचाच अनुकल्प ( गौण पक्ष ) सांगतात—

**यदुच्यते द्विजातीनां शूद्राद्दारोपसंग्रहः ।**
**नैतन्मम मतं यस्मात्तत्रायं जायते स्वयम् ॥ ५६ ॥**

ब्राह्मणानें चार वर्णांच्या भार्या कराव्या; क्षत्रियानें तीन वर्णांच्या व वैश्यानें दोन वर्णांच्या भार्या कराव्या, असें विधान असल्यामुळें द्विजांस शूद्र कन्येशीं विवाह करण्याचा अधिकार प्राप्त होतो.पण हें मला (याज्ञवल्क्यास) मान्य नाहीं. कारण त्या स्त्रीचे ठायीं हा द्विज स्वतः पुत्ररूपानें उत्पन्न होत असतो. अर्थात् ब्राह्मणानें ब्राह्मणादि तीन, क्षत्रियानें क्षत्रियादि दोन व वैश्यानें वैश्य जातीच्या एका स्त्रीशींच विवाह करावा; असें ठरतें. पण या कलियुगांत असवर्ण कन्येशीं विवाह होत नाहीं.

आतां ज्याला केवल रतीचीच इच्छा आहे, अथवा ज्याला पुत्र झाले असून भार्या मेली आहे, पण वानप्रस्थादि दुसरा आश्रम घेण्याचा तर अधिकार नाहीं, त्यामुळें गृहस्थाश्रमांत राहण्याचीच मात्र इच्छा आहे, अशा पुरुषाला कोणकोणत्या स्त्रिया होऊं शकतात तें सांगतात—

**तिस्रो वर्णानुपूर्व्येण द्वे तथैका यथाक्रमम् ।**
**ब्राह्मणक्षत्रियविशां भार्या स्वा शूद्रजन्मनः ॥ ५७ ॥**

वर्णांच्या अनुक्रमानें ब्राह्मणास तीन वर्णांच्या तीन, क्षत्रियास दोन व वैश्यास आपल्या वर्णाची एकच भार्या उक्त आहे. शूद्रास एक शूद्रा स्त्रीच सांगितलेली आहे. पण सर्वांना अशा प्रसंगींही सवर्णा भार्याच मुख्य आहे. पण ती न मिळाल्यास पुढची करावी ५७.

आतां पुढील चार श्लोकांत विवाहाचे प्रकार सांगतात—

**ब्राह्मो विवाह आहूय दीयते शक्त्यलंकृता ।**
**तज्जः पुनात्युभयतः पुरुषानेकविंशतिम् ॥ ५८ ॥**

ज्या विवाहांत वर सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या वरास बोलावून आपल्या शक्तीप्रमाणें वस्त्रें व भूषणें यांनीं अलंकृत केलेली कन्या, कन्यादानविधीनें दिली जाते तो ब्राह्म विवाह होय. या विवाहानें विवाहित स्त्रीच्या ठायीं जो पुत्र होतो तो सदाचरणी असल्यास पितरादि दहा, पुत्रादि दहा आणि आपण एक अशा एकवीस पुरुषांचा उद्धार करितो ५८.

**यज्ञस्थऋत्विजे दैव आदायार्षस्तु गोद्वयम् ।**
**चतुर्दश प्रथमजः पुनात्युत्तरजश्च षट् ॥ ५९ ॥**

यज्ञ करणाऱ्या ऋत्विजास दक्षिणा म्हणून यथाशक्ति अलंकृत केलेली कन्या देणें हा दैव विवाह होय. वरापासून गाय व बैल यांचें जोडपें घेऊन त्यास यथाशक्ति अलंकृत केलेली कन्या देणें हा आर्ष विवाह आहे. यांतील पहिल्या विवाहापासून झालेला पुत्र मागचे सात व पुढचे सात अशा चवदा पुरुषांचा आणि दुसऱ्या विवाहापासून झालेला मागचे तीन व पुढचे तीन अशा सहा पुरुषांचा उद्धार करितो ५९.

**इत्युक्त्वा चरतां धर्मं सह या दीयतेऽर्थिने ।**
**स कायः पावयत्तज्जः षट् षट् वंश्यान्सहात्मना ॥ ६० ॥**

तुम्ही दोघे मिळून धर्माचरण करा असें म्हणून कन्येची इच्छा करणाऱ्या वरास यथाशक्ति अलंकृत करून कन्या देणें हा प्राजापत्य विवाह होय. या विवाहापासून उत्पन्न झालेला पुत्र मागचे सहा, पुढचे सहा व स्वतः एक अशा तेरा पुरुषांचा उद्धार करितो ६०.

**आसुरो द्रविणादानाद्गान्धर्वः समयान्मिथः ।**
**राक्षसो युद्धहरणात्पैशाचः कन्यकाच्छलात् ॥ ६१ ॥**

वरापासून आपल्याकरितां किंवा कन्येकरितां द्रव्य घेऊन कन्या देणें हा आसुर. कन्या व पुरुष यांच्या आपसांतील " तूं माझी स्त्री व तूं माझा पति " अशा प्रतिज्ञेनें दानादि विधिवांचून होणारा जो विवाह तो गांधर्व, युद्ध करून कन्येच्या आप्तांस किंवा इतर राजांस जिंकून कन्येस नेणें हा राक्षस विवाह व कन्या निजलेली असतांना किंवा सावध नसतांना कपटानें तिचा अपहार किंवा स्वीकार करणें हा पैशाच होय. या विवाहांविषयींचें अधिक वर्णन मनुस्मृतीमध्यें पहावें ६१.

आतां सवर्ण कन्या व असवर्ण कन्या यांच्या विवाहाच्या विधींत काय अंतर आहे तें सांगतात—

पाणिर्ग्राह्यः सवर्णासु गृह्णीयात्क्षत्रिया शरम् ।
वैश्या प्रतोदमादद्याद्वेदने त्वग्रजन्मनः ॥ ६२ ॥

ब्राह्मणास सवर्ण कन्येशीं विवाह कर्तव्य असतां आपल्या गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें त्यानें कन्येचा हात आपल्या हातांत धरावा. क्षत्रिय कन्येनें ब्राह्मणाशीं विवाह करितांना आपल्या हातांत बाण धरावा व तो त्या वरानें आपल्या हातांत धरावा. वैश्य कन्येनें क्षत्रिय व ब्राह्मण यांच्याशीं विवाह करितांना आपल्या हातात चाबूक धरावा व तो त्या दोन्हीं वर्णांच्या वरांनीं धरावा. द्विजांनीं शूद्रा स्त्रीशीं विवाह करावा हें म्हणणें याज्ञवल्क्यांस मान्य नसल्यामुळें त्यांनीं शूद्रा कन्येशीं विवाह करतांना काय करावें हें येथें सांगितलें नाहीं. पण मनुस्मृतींत तिनें वस्त्राच्या दशा धराव्यात असें म्हटलें आहे ६२.

आतां कन्यादानाचा कोणकोणास अधिकार आहे तें क्रमानें सांगतात—

पिता पितामहो भ्राता सकुल्यो जननी तथा ।
कन्याप्रदः पूर्वनाशे प्रकृतिस्थः परः परः ॥ ६३ ॥
अप्रयच्छन्समाप्नोति भ्रूणहत्यामृतावृतौ ।
गम्यं त्वभावे दातॄणां कन्या कुर्यात्स्वयंवरम् ॥ ६४ ॥

पिता, पितामह, भ्राता, ( काका, मामा ) पित्याच्या कुळांतील कोणीही, व कन्येची माता यांस क्रमानें कन्यादानाचा अधिकार आहे. अर्थात् पिता नसल्यास किंवा त्याला वेड वगैरे लागलेलें असल्यास त्याचा पिता म्हणजे त्या कन्येचा आजोबा. तोही नसल्यास किंवा-जिवंत असून त्यास चित्तभ्रम झालेला असल्यास तिचा भाऊ इत्यादि या क्रमाचा अर्थ आहे. पण याप्रमाणें जर एकाद्या अधिकाऱ्यानें कन्यादान केलें नाहीं व विवाहापूर्वीच कन्या ऋतु-मती झाली तर प्रत्येक ऋतुसमयीं त्या अधिकाऱ्यास भ्रूणहत्या ( ब्राह्मणगर्भाची अथवा राज गर्भाची हत्या ) लागते. पण योग्य वर न मिळाल्यामुळें कन्या विवाहापूर्वीं ऋतुमती झाल्यास त्यांत दात्याकडे कांहीं दोष नाहीं. त्यानें वरप्राप्तीकरितां शक्य तितका प्रयत्न न केल्यास किंवा वेळीं सामान्य गुणवानासही ती न देतां उत्तम गुणवानाच्या आशेनें बसल्यास तो दोषी होतो. असो; कन्यादान करणारा कोणीच नसल्यास वरण्यास योग्य अशा वराशीं स्वतः कन्ये-नेंच विवाह करावा ६३,६४.

सकृत्प्रदीयते कन्या हरंस्तां चोरदण्डभाक् ।
दत्तामपि हरेत्पूर्वाच्छ्रेयांश्चेद्वर आव्रजेत् ॥ ६५ ॥

पिता इत्यादि जे कन्यादानाचे अधिकारी आहेत त्यांना एकदांच कन्या देतां येते, असा शास्त्रनियम आहे. यास्तव एकदां एकाला देऊन पुनः तिचा अपहार करणारा चोराप्र-माणें दंडास पात्र होतो. पण या सामान्य नियमास अपवाद आहे. तो असा-जर पहिल्या वरापेक्षां दुसरा एकादा विद्या, कुल इत्यादिकांनीं अति उत्तम वर आला व पहिला वर दुरा-

चरणी व पापी असला, तर दिलेलीही कन्या परत घ्यावी. सप्तपदी होण्याच्या पूर्वी या नियमाप्रमाणें कन्या परत घेतां येते. पुढें परत घेतां येत नाहीं. अपरार्क म्हणतात कीं— जिचें वाग्दान झालेलें आहे अशी कन्या परत घेतां येते. समंत्रक विहाहानंतर तिला परत घेतां येत नाहीं ६५.

अनाख्याय ददद्दोषं दण्ड्य उत्तमसाहसम् ।
अदुष्टां तु त्यजन्दण्ड्यो दूषयंस्तु मृषा शतम् ॥ ६६॥

कन्येच्या अंगीं असणारा दोष न सांगतां जो वरास कन्या देतो तो कन्यादाता उत्तमसाहस दंडास पात्र होतो. तसेंच त्याग करण्यास योग्य अशा दोषांनीं रहित असलेल्या स्त्रीचा जो एकदां स्त्रीकार करून त्याग करतो त्यासही उत्तमसाहसच दंड करावा. पण विवाहापूर्वींच द्वेषानें जो दीर्घरोगादि खोट्या दोषारोपानें कन्येस दूषित करितो त्यास शंभर पण दंड करावा. उत्तमसाहसाचें प्रमाण पुढें याच अध्यायाच्या ३६६ व्या श्लोकांत कळेल ६६.

५२ व्या श्लोकात " अनन्यपूर्विकां उद्वहेत् " असें म्हटलें आहे पण अन्यपूर्वा म्हणजे काय ? व ती कशी असते तें आतां सांगतात—

अक्षता च क्षता चैव पुनर्भूः संस्कृता पुनः ।
स्वैरिणी या पतिं हित्वा सवर्णं कामतः श्रयेत् ॥ ६७ ॥

अन्यपूर्वा दोन प्रकारची असते. एक पुनर्भू व दुसरी स्वैरिणी. पुनर्भू ही दोन प्रकारची असते. एक क्षता व दुसरी अक्षता. संस्कारापूर्वींच पुरुषसंबंधानें जी दूषित झालेली असते ती क्षता व जी पुनःसंस्कारानें मात्र दूषित झालेली असून पुरुषसंबंधानें दूषित झालेली नसते ती अक्षता होय. जी पहिल्या पतीस सोडून कामवश होत्साती आपल्या वर्णाच्याच दुसऱ्या पुरुषाचा कामतृप्त्यर्थ आश्रय करिते ती स्वैरिणी होय. या दोन्ही प्रकारच्या अन्यपूर्वा विवाहास अयोग्य होत ६७.

आतां नियोगविधि सांगतात—

अपुत्रां गुर्वनुज्ञातो देवरः पुत्रकाम्यया ।
सपिण्डो वा सगोत्रो वा घृताभ्यक्त ऋतावियात् ॥ ६८ ॥
आगर्भसंभवाद्गच्छेत्पतितस्त्वन्यथा भवेत् ।
अनेन विधिना जातः क्षेत्रजः स भवेत्सुतः ॥ ६९ ॥

जिला पुत्र झालेला नाहीं अशा स्त्रीशीं—पिता, माता, इत्यादि वडील मनुष्यांनीं पुत्रोत्पादनार्थ आज्ञा केली असतां धाकटा दीर, वर सांगितलेल्या प्रकारचा सपिंड किंवा सगोत्र यांतील कोणी तरी एकानें सर्व अंगास घृत लावून, गर्भ राहीपर्यंत, ऋतुसमयीं मात्र गमन करावें. वर सांगितलेल्या तीन पुरुषांपैकीं पहिला नसल्यास दुसऱ्यानें व दुसऱ्याच्या

अभावीं तिसऱ्यानें गमन करावें. पण गर्भधारणेनंतर किंवा वडिलांची आज्ञा, अंगास घृत लावणें व ऋतुकाल या नियमांस सोडून जर त्यानें गमन केलें तर तो पतित होतो. असो; या विधानानें झालेला पुत्र ज्याची ती विवाहित स्त्री असेल त्याचा क्षेत्रज होय ( हा नियोग कलियुगांत वर्ज्य आहे. ) ६८,६९.

आतां व्यभिचारिणी स्त्रीचें काय करावें तें सांगतात—

हृताधिकारां मलिनां पिंडमात्रोपजीविनीम् ।
परिभूतामधःशय्यां वासयेद्व्यभिचारिणीम् ॥ ७० ॥

जी व्यभिचार करिते तिचें दान, धर्म इत्यादि संबंधीं सर्व अधिकार काढून घ्यावे; न्हाणें, धुणें, उत्तम वस्त्र नेसणें इत्यादि करूं देऊं नये. तिचें शरीर व वस्त्रादि मलीन राहील असें करावें. तिचे प्राण मात्र राहतील इतकें हलकें अन्न द्यावें. तिचा ज्यानें त्यानें धिक्कार करावा. तिला भूमीवरच कांहीं तरी टाकून निजावयास लावावें व अशा व्यवस्थेनें ठेवावें. हा सर्व प्रकार तिला कृतकर्माविषयीं पश्चात्ताप व्हावा म्हणून आहे ७०.

आतां स्त्रियांस प्रायश्चित्त थोडेंच सांगितलेलें असतें हें सुचविण्याकरितां त्यांची प्रशंसा करितात—

सोमः शौचं ददौ स्त्रीणां गन्धर्वश्च शुभां गिरम् ।
पावकः सर्वमेध्यत्वं मेध्या वै योषितो ह्यतः ॥ ७१ ॥

विवाहापूर्वीं भोग घेऊन सोमदेवानें स्त्रियांस शौच दिलें आहे; गंधर्वानें शुभ वाणी दिली आहे; व अग्नीनें सर्व प्रकारची पवित्रता दिली आहे. यास्तव स्त्रिया स्पर्श, आलिंगन इत्यादि प्रसंगीं सदा पवित्र होत ७१.

पण असें असलें तरी त्यांस मुळींच दोष लागत नाहीं असें समजूं नये; हें आतां सांगतात--

व्यभिचाराहतौ शुद्धिर्गर्भे त्यागो विधीयते ।
गर्भभर्तृवधादौ च तथा महति पातके ॥ ७२ ॥

बाहेर कोणास न समजतां मानसिक संकल्पानें स्त्रीनें व्यभिचार केल्यास जें पाप उत्पन्न होतें तें रजोदर्शन झालें असतां नष्ट होतें. शूद्रापासून गर्भ राहिल्यास त्या द्विज स्त्रीचा त्याग करावा असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें गर्भाचा वध, पतीचा वध, ब्रह्महत्यादि महा पातक शिष्यसमागम इत्यादि केल्यासही तिचा त्याग करावा ७२.

आतां एक स्त्री असतांना दुसरा विवाह करण्याचीं कारणें सांगतात--

सुरापी व्याधिता धूर्ता वन्ध्याऽर्थघ्न्यप्रियंवदा ।
स्त्रीप्रसूश्चाधिवेत्तव्या पुरुषद्वेषिणी तथा ॥ ७३ ॥

सुरापान करणारी ( शूद्र स्त्रीही ), दीर्घ रोगानें ग्रस्त, लबाड, वांझ, द्रव्यादिकांचा नाश करणारी, अप्रिय भाषण करणारी, जिला कन्याच होतात अशी ( कन्याप्रसू ), आणि

पुरुषाचें अहित करणारी अशा स्त्रीचें अधिवेदन करावें. अधिवेदन म्हणजे दुसरी स्त्री करणें. पण येथें सांगितलेल्या कारणावांचून कोणीं अधिवेदन केल्यास तो दारव्यतिक्रम होय. दारव्यतिक्रम म्हणजे स्त्रीचा अतिक्रम, अपमान ७३.

अधिविन्ना तु भर्तव्या महदेनोऽन्यथा भवेत् ।
यत्रानुकूल्यं दम्पत्योस्त्रिवर्गस्तत्र वर्धते ॥ ७४ ॥

पण अशा रीतीनें जिचें अधिवेदन केलें असेल तिचें पूर्वीप्रमाणेंच अन्नवस्त्रादि–दान, मान, इत्यादिकांच्या योगानें पोषण करावें. कारण तसें न केल्यास मोठें पाप लागतें. इतकेंच नव्हे तर स्त्री व पुरुष यांचें जेथें आनुकूल्य असतें म्हणजे तीं दोघें एकमेकांच्या मनाप्रमाणें वागतात तेथें ( त्या ) गृहांत धर्म, अर्थ व काम यांची प्रत्यहीं वृद्धि होते ( ही गोष्ट प्रत्येक विवाहित स्त्रीपुरुषानें ध्यानांत ठेवण्यासारखी आहे ) ७४.

आतां पतिव्रता स्त्रीची प्रशंसा करितात––

मृते जीवति वा पत्यौ या नान्यमुपगच्छति ।
सेह कीर्तिमवाप्नोति मोदते चोमया सह ॥ ७५ ॥

पति जिवंत असतांना किंवा तो मेल्यावर जी स्त्री चंचल होऊन अन्य पुरुषाशा समागम करीत नाहीं तिची इहलोकीं कीर्ति होते व परलोकीं पुण्यप्रभावामुळें ती उमेसह क्रीडा करिते. ( मनुस्मृतींत पुरुषानें व्यभिचार न करितां आमरणान्त स्त्रीव्रतानें रहावें, असें म्हटलें आहे व तें प्रत्येकानें ध्यानांत ठेवणें इष्ट आहे ) ७५.

कारणावांचून दुसरी स्त्री करणाऱ्या पुरुषास कोणता दंड करावा तें सांगतात––

आज्ञासंपादिनीं दक्षां वीरसूं प्रियवादिनीम् ।
त्यजन्दाप्यस्तृतीयांशमद्रव्यो भरणं स्त्रियाः ॥ ७६ ॥

आज्ञेप्रमाणें वागणारी, गृहकृत्यांत हयगय न करणारी, पुत्रवती व प्रिय भाषण करणारी अशा स्त्रीचा त्याग करणाऱ्या पुरुषास राजानें त्याच्या धनाचा तिसरा भाग दंड करावा व अशा साध्वीचा अधिवेदनादिकाच्या द्वारा त्याग करणारा निर्धन असल्यास त्यास अन्नवस्त्रादिकांच्या योगानें तिचें पोषण करण्यास सांगावें ७६.

आतां स्त्रीधर्म सांगतात––

स्त्रीभिर्भर्तृवचः कार्यमेष धर्मः परः स्त्रियाः ।
आशुद्धेः संप्रतीक्ष्यो हि महापातकदूषितः ॥ ७७ ॥

स्त्रियांनीं सदा आपल्या पतीचें वचन मान्य करावें, कारण स्त्रीचा हा परम धर्म आहे. तो त्यांच्या स्वर्गप्राप्तीस कारण होतो. पण पति जेव्हां महापातकांनीं दूषित होतो तेव्हां तो प्रायश्चित्तादि उपायांनीं शुद्ध होई तों स्त्रीनें त्याची वाट पहावी. म्हणजे त्याच्या आधीन होऊं नये व स्वतंत्रतेनेंही वागूं नये. तो शुद्ध झाल्यावर पूर्वीप्रमाणें त्याच्या आधीन होऊन रहावें ७७.

आतां शास्त्रीय रीतीनें स्त्रियांचें संरक्षण केलें असतां कोणता लाभ होतो तें सांगतात—

**लोकानन्त्यं दिवः प्राप्तिः पुत्रपौत्रप्रपौत्रकैः ।**
**यस्मात्तस्मात्स्त्रियः सेव्याः कर्तव्याश्च सुरक्षिताः ॥७८ ॥**

ज्या अर्थी पुत्र, पौत्र व प्रपौत्र यांच्या योगानें वंशाचा अविच्छेद होतो ( म्ह० तो सतत चालतो ) व अग्निहोत्राच्या योगानें स्वर्गाची प्राप्ति होते म्हणजे स्त्रीच्या योगानेंच हीं दोन्हीं सिद्ध होतात त्या अर्थी स्त्रीचा प्रजेकरितां उपभोग घ्यावा व धर्माकरितां उत्तम प्रकारें रक्षण करावें. हा अर्थ मिताक्षराकारांच्या मतीं झाला. आतां अपरार्क या श्लोकाचा अर्थ कसा करितात तें पहा–पुत्राच्या योगानें हा लोक, पौत्राच्या योगानें आनन्त्य व प्रपौत्राच्या योगानें स्वर्ग मिळतो आणि असें असल्यामुळें पुत्रादिकांस कारण होणाऱ्या स्त्रीचें ऋतुकालीं सेवन करावें व उत्तम प्रकारें रक्षण करावें ७८.

आतां स्त्री सेवनाविषयीं कांहीं नियम सांगतात—

**षोडशर्तुनिशाः स्त्रीणां तस्मिन्युग्मासु संविशेत् ।**
**ब्रह्मचार्येव पर्वाण्याद्याश्चतस्रश्च वर्जयेत् ॥ ७९ ॥**

ज्या दिवशीं रजोदर्शन होते त्या दिवसापासून सोळा दिवस स्त्रियांचा गर्भधारण करण्यास योग्य काल असतो. या कालासच ऋतु असें म्हणतात. या सोळा रात्रींतील सहा, आठ, दहा, बारा, चवदा व सोळा या समरात्रीं स्त्रीसमागम करावा. या समरात्री सोडून बाकीच्या सर्व निषिद्ध रात्री वर्ज कराव्या. दिवसाही स्त्रीसंग करूं नये. शिवाय अमावास्या, पौर्णिमा, अष्टमी, चतुर्दशी हीं पर्वें व पहिल्या चार रात्रीं यांस वर्ज करावें. हे नियम पाळणारा गृहस्थ ब्रह्मचारीच होय. अनिषिद्ध रात्रींतील सर्व रात्रीं गमन केल्यासही प्रत्यवाय नाहीं ७९.

**एवं गच्छन्स्त्रियं क्षामां मघां मूलं च वर्जयेत् ।**
**सुस्थ इन्दौ सकृत्पुत्रं लक्षण्यं जनयेत्पुमान् ॥ ८० ॥**

याप्रमाणें गमन करणाऱ्या पुरुषानें मघा व मूळ या नक्षत्रांस वर्ज करून पुत्रच व्हावा या इच्छेनें थोडा व हलका आहार देऊन कृश केलेल्या स्त्रीशीं एकादशादि शुभ स्थानीं चंद्र असतां एकच वेळ गमन करावें. अर्थात् पशूप्रमाणें एका रात्रीं दोन किंवा तीन वेळां गमन करूं नये. अशा रीतीनें गमन करणारा पुरुष सर्व लक्षणसंपन्न पुत्रच निर्माण करील. वस्तुतः रजस्वला स्त्रीचें व्रतच असें आहे कीं, ती सहज क्षीण होते. तिचीं व्रतें थोडक्यांत येथें देतों— रजस्वला स्त्रीनें तीन रात्रीं अपवित्र व मलीन वस्त्रें नेसून रहावें. न्हाऊं नये; स्नान करूं नये; डोळ्यांत काजळ घालूं नये; भूमीवर निजावें; दिवसा निजूं नये; अग्नीस स्पर्श करूं नये; दोरी वळूं नये; मांस खाऊं नये; शुक्र, गुरु, मंगळ इत्यादि ग्रहांस पाहूं नये; दांत घासूं नयेत; गळ्यांत किंवा वेणींत फुलांची माळ घालूं नये; अत्तरासारख्या सुगंधी पदार्थांचें सेवन करूं नये; वीर्य वाढविणारे पदार्थ खाऊं नयेत; मोठमोठ्यानें हंसूं नये; डाव्या हातानें पाणी पिऊं नये; ओंजळींनें किंवा तांब्याच्या पात्रानें पाणी प्यावें इत्यादि ८०.

वरच्या श्लोकांत ऋतुकालीं गमन करण्याविषयीं नियम सांगितला. आतां ऋतुकाल नसतांना गमन कर्तव्य झाल्यास काय नियम आहेत ते सांगतात—

**यथाकामी भवेद्वापि स्त्रीणां वरमनुस्मरन् ।**
**स्वदारनिरतश्चैव स्त्रियो रक्ष्या यतः स्मृताः ॥ ८१ ॥**

अथवा " तुमच्या कामनेचा विघात करणारा पातकी होईल " असा जो इंद्रानें स्त्रियांस वर दिला आहे त्याचें स्मरण करून त्यांच्या इच्छेप्रमाणें ऋतुकालानंतर प्रवृत्ति करावी. त्याचप्रमाणें आपल्या स्त्रीचे ठायींच रत असावें. ( अन्य स्त्रीगमन करूं नये. ) कारण स्त्रियांचें उत्तम प्रकारें रक्षण करावें असें सांगितलें आहे; व तें रक्षण त्यांच्या इच्छेप्रमाणें गमन केल्यानें व परस्त्रीगमन न केल्यानें होतें. पण ऋतुकाल निघून गेल्यावर स्त्रीगमन न करितांही जो त्यांचें रक्षण करूं शकतो त्यास गौण ब्रह्मचर्याचें मोठें फळ मिळतें ८१.

तसेंच

**भर्तृभ्रातृपितृज्ञातिश्वश्रूश्वशुरदेवरैः ।**
**बन्धुभिश्च स्त्रियः पूज्या भूषणाच्छादनाशनैः ॥ ८२ ॥**

पति, भ्राता, पिता, आप्त, सासू, श्वशुर, दीर व इतर बंधु यांनीं यथाशक्ति भूषणें, वस्त्रें व अन्न यांच्या योगानें स्त्रियांचा सत्कार करावा. कारण त्या प्रसन्न झाल्या असतां धर्म अर्थ व काम यांची उत्तमप्रकारें वृद्धि करितात. " ज्या गृहांतील स्त्रिया प्रसन्न असतात तेथें देवता रममाण होतात व जेथें त्यांचा अपमान होत असतो तेथें सर्व क्रिया निष्फळ होतात " असें मन्वादि ऋषींनींही सांगितलें आहे ८२.

आतां स्त्रीनें गृहकृत्यांत कसें असावें तें सांगतात—

**संयतोपस्करा दक्षा हृष्टा व्ययपराङ्मुखी ।**
**कुर्यात् श्वशुरयोः पादवन्दनं भर्तृतत्परा ॥ ८३ ॥**

तिनें गृहांतील सर्व उपकरणें अर्थात् भांडीं, वस्त्रें, शय्या, पाट, इत्यादि जागच्याजागीं व व्यवस्थित ठेवावीं; गृहकृत्यांत दक्ष असावें; सदां हंसतमुख रहावें; ( वाईट तोंड करून राहूं नये. ) व फार खर्च करण्याचें शील ठेवूं नये. सासू, सासरा व इतर वडील माणसें यांचे तिनें नित्य पादवंदन करावें. आणि तिनें हें सर्व आपल्या पतीच्या आधीन राहून करावें. शंखस्मृतींत स्त्रियांचे आणखीही कांहीं उत्तम धर्म सांगितलेले आहेत. त्यांचा येथें उल्लेख करणें अवश्य आहे. " घरांतील वडील माणसास सांगितल्यावाचून कोठें बाहेर जाऊं नये. जातांना अंगावर उत्तरीय वस्त्र अवश्य घ्यावें. ( डोक्यावरून पदर घेणें हा उत्तरीयाचाच पर्याय आहे. पण त्याच्यावरूनही शाल किंवा शेला असल्यास फारच उत्तम. ) त्वरेनें जाऊं नये; ( अर्थात् पायाकडे पहात हळु हळू गमन करावें. ) वाणी, संन्यासी, वृद्ध व वैद्य यांच्यावाचून दुसऱ्या कोणत्याही परपुरुषांशीं भाषण करूं नये. आपलीं बेंबी कोणास दिसेल असें वस्त्र नेसूं नये; पायांच्या घोट्यापर्यंत वस्त्र नेसावें; स्तनावरील पदर दूर होईल व त्यामुळें तो भाग दृष्टो-

त्पत्तीस येईल अशा हलगर्जीपणानें राहूं नये. अस्ताव्यस्त तोंड वासून हसूं नये; तर तोंडावर पदर किंवा हात धरून हंसावें; पति व त्याचे बंधु यांच्याशीं द्वेष करूं नये; वेश्या, धूर्त, व्यभिचारिणी, संन्याशीण, शकुनादि पहाणारी, कपटी, चेटकी, व दुःशील इतक्या स्त्रियांचा सहवास करूं नये. कारण त्यांच्या सहवासानें साध्वीचेंही मन व चरित्र मलिन होतें. वाईट शब्द तोंडांतून काढूं नयेत इत्यादि ८३.

आतां पति प्रवासास गेला असतां स्त्रीनें कसें रहावें तें सांगतात—

**क्रीडां शरीरसंस्कारं समाजोत्सवदर्शनम् ।**
**हास्यं परगृहे यानं त्यजेत्प्रोषितभर्तृका ॥ ८४ ॥**

जिचा पति देशांतरास गेला आहे अशा स्त्रीनें चेंडू, सोंगट्या इत्यादिकांनीं खेळणें, अंगास उटणें वगैरे लावून न्हाणें, जनसमूह व विवाहादि उत्सव यांस पहाणें; थोडेंसें निमित्त झालें असतां मोठ्यानें हंसणें, व दुसऱ्याच्या गृहीं जाणें हीं वर्ज्य करावींत. " झोपाळ्यावर बसणें, नृत्य करणें, चित्रें पहाणें, फिरावयास जाणें, वाहनांत बसणें, उत्तम भोज्य व पेय पदार्थांचें सेवन करणें, पुष्पांच्या माळा डागिने वगैरे घालणें, काजळ घालणें, आरशांत पहाणें, वेणी फणी करणें, इत्यादि करूं नये. पति निर्वाहाची व्यवस्था करून गेला असतां पत्नीनें नियमानें रहावें व त्यानें निर्वाहाची सोय केलेली नसल्यास तिनें अनिन्द्य शिल्पावर आपला निर्वाह करावा असें शंखस्मृतींत आणखी अधिक सांगितलें आहे " ८४.

**रक्षेत्कन्यां पिता विन्नां पतिः पुत्रास्तु वार्धके ।**
**अभावे ज्ञातयस्तेषां स्वातन्त्र्यं न कचित्स्त्रियाः ॥ ८५ ॥**

कुमारी कन्येचें रक्षण पित्यानें करावें; विवाहानंतर तिचें रक्षण पतीनें करावें; वृद्धपणीं तिचें रक्षण पुत्रानें करावें. पण पिता, पति इत्यादिकांतील कोणीच नसल्यास तिच्या ज्ञातीच्या आप्तांनीं तिचें रक्षण करावें. आणि आप्तही नसल्यास राजानें तिचें रक्षण करावें. सारांश स्त्री स्वातंत्र्यास मुळींच योग्य नाहीं. येथें रक्षण म्हणजे दुष्कर्मांपासून रक्षण असें समजावें ८५.

**पितृमातृसुतभ्रातृश्वश्रुश्वशुरमातुलैः ।**
**हीना न स्याद्विना भर्त्रा गर्हणीयान्यथा भवेत् ॥ ८६ ॥**

पतिरहित स्त्रीनें पिता, माता, पुत्र, भ्राता, सासू, श्वशुर, व मामा यांच्यापैकीं कोणातरी एकाच्या आश्रयानें रहावें, त्यास सोडून स्वतंत्रपणें राहूं नये. कारण तसें न केल्यास ती निंदेस पात्र होते. पतीच्या मरणानंतर स्त्रीस दोन मार्ग असतात. एक त्याच्या बरोबर सती जाणें व दुसरा यावज्जीव ब्रह्मचर्यव्रतानें रहाणें. या श्लोकांत या दुसऱ्या पक्षीं स्त्रीचें कर्तव्य काय तें सांगितलें आहे. पतीबरोबर अन्वारोहण केलें असतां त्या स्त्रीपुरुषांचा परलोकीं मोठा अभ्युदय होतो. याविषयीं व्यास, शंख, आंगिरस, हारित इत्यापि स्मृतिकारांची अनेक वचनें प्रमाण आहेत. हा सहगमन धर्म चांडालस्त्रीपर्यंत सर्वांस सारखाच सांगितलेला आहे. ब्राह्मणस्त्रीविषयीं जीं निषेधपर वचनें आढळतात तीं ब्राह्मणस्त्रीनें पतीच्या चितेवाचून अन्य पृथक्

चिंतेंत देह विसर्जन करूं नये अशा विषयीं आहेत. आतां सती जाणें ही एक आत्महत्याच आहे व ती तर निषिद्ध होय असें कोणी म्हणेल पण त्यांत कांहीं अर्थ नाहीं. कारण क्षत्रियाच्या सन्मुख मरणाप्रमाणें किंवा प्रायोप्रवेशनादि व्रतांप्रमाणें हें एक काम्यव्रत आहे व अधिक सुखाकरितां क्षणिक दुःख सहन करण्यास तयार होणें हा मनुष्यमात्राचा धर्म आहे. तस्मात् सती जाणें म्हणजे आपला देह जाळून घेणें असा जरी त्याचा खरा अर्थ असला तरी तें कृत्य शास्त्रविहित असल्यामुळें आणि दोष व अदोष हे शास्त्रावरूनच सिद्ध असल्यामुळें परम श्रद्धाळु स्त्रीनें आपल्या प्राणांहून प्रिय पतीबरोबर सहगमन केल्यास त्यांत धर्मदृष्ट्या किंवा शास्त्रदृष्ट्या कांहीं दोष नाहीं. श्रद्धाळु मनुष्यास त्याच्या दृढश्रद्धेप्रमाणें फळ मिळत असतें, असा शास्त्रसिद्धांत आहे. तेव्हां स्वर्गसुखाच्या दृढ भावनेनें जिनें शरीरत्यागासारखा विलक्षण स्वार्थत्याग केला आहे तिला पतिसह स्वर्गसुख मिळणें अगदीं अवश्य व न्याय्य आहे, हें निराळे सांगावयास नकोच. आतां जिला स्वर्गसुखाची इच्छा नसेल व जी केवळ मुक्त होण्याचीच इच्छा करीत असेल तिनें सहगमन न करितां ब्रह्मचर्यादि इतर साधनांनीं युक्त होऊन चित्तशुद्धि संपादन करावी. ( पण जिला ऐहिक क्षणिक सुखाची व मन आणि शरीर पोसण्याचीच मात्र इच्छा असेल तिनें खुशाल पुनर्विवाहासारखे उपाय योजावेत व कामचार, कामभक्ष व कामवाद व्हावें ) ८६.

विधवा साध्वीनें आणखी कसें असावें व त्याचें तिला फळ कोणतें मिळतें तें सांगतात–

**पतिप्रियहिते युक्ता स्वाचारा संयतेन्द्रिया ।**
**सेह कीर्तिमवाप्नोति प्रेत्य चानुत्तमां गतिम् ॥ ८७ ॥**

जी पतीचें प्रिय व हित करण्यांत तत्पर व उत्तम आचारसंपन्न असते आणि जिनें सर्व इंद्रियें आपल्या अधीन ठेविलीं आहेत अशा स्त्रीस या लोकीं उत्तम कीर्ति व परलोकीं उत्तम गति प्राप्त होते ८७.

आतां ज्यास अनेक भार्या असतात त्याच्या धर्मकार्याविषयीं कांहीं नियम सांगतात–

**सत्यामन्यां सवर्णायां धर्मकार्यं न कारयेत् ।**
**सवर्णासु विधौ धर्म्ये ज्येष्ठया न विनेतरा ॥ ८८ ॥**

सवर्ण स्त्री असतांना असवर्ण स्त्रीस धर्मकार्यांत योजूं नये. पण सवर्ण म्हणजे आपल्या जातीच्याच अनेक स्त्रिया असल्यास धर्मकृत्यांत ज्येष्ठ ( वडील ) स्त्रीवांचून मध्यम, कनिष्ठ इत्यादि दुसऱ्या स्त्रियांस योजूं नये. तर तिच्यासह त्यांच्याकडून धर्मकृत्यें करावींत ८८.

आतां ज्याची भार्या मेली आहे त्यानें काय करावें तें सांगतात––

**दाहयित्वाग्निहोत्रेण स्त्रियं वृत्तवतीं पतिः ।**
**आहरेद्विधिवद्दारानग्नींश्चैवाविलम्बयन् ॥ ८९ ॥**

वर सांगितल्याप्रमाणें आचारसंपन्न विवाहित स्त्री मृत झाली असतां पतीनें तिला अग्निहोत्रानें ( अर्थात् श्रौत अग्नीनें व तो नसल्यास स्मार्त अग्नीनें ) जाळून विलंब न लावितां

दुसरी स्त्री व अग्नि यांचा यथाशास्त्र स्वीकार करावा. कारण तो संसाराविषयीं पूर्ण विरक्त झालेला नसल्यास त्यास पुत्रोत्पादन करणें व यज्ञयाग करणें अवश्य आहे. आणि स्त्रीवांचून तीं दोन्हीं होणें शक्य नाहींत. यास्तव पुत्र नसल्यास व अवश्य असलेले यज्ञादि केलेले नसल्यास पुरुषानें दुसरा विवाह करावा; असें येथें सांगितलें आहे. शिवाय पुरुषानें चार आश्रमांतील कोणत्या तरी एका आश्रमांत राहिलें पाहिजे. त्यानें एक क्षणभरही अनाश्रमी राहतां कामा नये असा शास्त्रनियम आहे. ( हीं दोन्हीं कारणें ध्यानांत धरिलीं असतां शास्त्रकारांनीं पक्षपात केला आहे असें म्हणण्यास फारसा अवकाश रहात नाहीं ) ८९.

इति विवाहप्रकरणम् ३.

---

# अथ वर्णजातिविवेकप्रकरणम् ४.



मन्वादिकांच्या मतीं ब्राह्मणाच्या चार वर्णांच्या चार भार्या होतात. क्षत्रियांच्या तीन इत्यादि सांगितलें. आतां त्यांच्या ठिकाणीं होणारे जे पुत्र त्यांची व्यवस्था लावण्याकरितां सांगतात—

**सवर्णेभ्यः सवर्णासु जायन्ते हि सजातयः ।**
**अनिन्द्येषु विवाहेषु पुत्राःसन्तानवर्धनाः ॥ ९० ॥**

विवाहित सवर्ण स्त्रीच्या ठायीं सवर्ण पुत्र होतात. म्हणजे विवाहित ब्राह्मणींच्या ठायीं ब्राह्मण पतीपासून होणारा पुत्र ब्राह्मण होय. क्षत्रियादिकांविषयींही हाच नियम समजावा. येथें पुत्र हा शब्द केवल उदाहरणार्थ आहे. अर्थात् समान जातीच्या विवाहित पतिपत्नीपासून होणारी कन्याही त्यांच्याच जातीची होते. ब्राह्म, दैव इत्यादि अनिन्द्य विवाहापासून होणारे पुत्र 'संतानवर्धन' म्हणजे निरोगी, दीर्घायु व धर्मप्रजासंपन्न होतात. कुंडगोलक, कानीन, इत्यादि पुत्र माता व पिता यांच्या समान वर्णाचे होऊं शकत नाहींत, हें उघडच आहे. क्षेत्रज पुत्र मातेच्या जातीचा असतो ९०.

वरच्या श्लोकांत वर्ण कसे होतात तें सांगितलें. आतां अनुलोम कसे होतात तें सांगतात—

**विप्रान्मूर्द्धावसिक्तो हि क्षत्रियायां विशः स्त्रियाम् ।**
**अम्बष्ठः शूद्र्यां निषादो जातः पारशवोऽपि वा ॥ ९१ ॥**

ब्राह्मणापासून विवाहित क्षत्रियेच्या ठायीं मूर्धावसिक्त पुत्र होतो. विवाहित वैश्य जातीच्या स्त्रीचे ठायीं अंबष्ठ होतो व विवाहित शूद्र स्त्रीच्या ठायीं पारशव नांवाचा निषाद पुत्र होतो. निषाद म्हणजे मासे मारून उपजीविका करणारी जाति आहे. ब्राह्मणापासून द्विज

स्त्रियांच्या ठायीं उत्पन्न झालेले जे मूर्द्धावसिक्तादि पुत्र त्यांस आपल्या मातेच्या जातीप्रमाणें क्षत्रियादिकांचे धर्म उक्त आहेत. यास्तव त्यांचें उपनयनादि करितां येतें ९१.

**वैश्याशूद्र्योस्तु राजन्यान्माहिष्योग्रौ सुतौ स्मृतौ ।**
**वैश्यात्तु करणः शूद्र्यां विन्नास्वेव विधिः स्मृतः ॥ ९२ ॥**

विवाहित वैश्य व शूद्र स्त्रीच्या ठायीं क्षत्रियापासून होणारे पुत्र क्रमानें माहिष्य व उग्र होत, असें म्हटलेलें आहे, आणि वैश्य पुरुषापासून विवाहित शूद्र स्त्रीचे ठायीं करण-जातीचा पुत्र होतो. विवाह केलेल्या स्त्रियांविषयींचा हा मूर्धावसिक्तादि संज्ञाविधि सांगितलेला आहे. मूर्धावसिक्त, अम्बष्ठ, निषाद, माहिष्य, उग्र व करण असे हे सहा अनुलोम पुत्र आहेत असें समजावें ९२.

आतां प्रतिलोमज पुत्र सांगतात—

**ब्राह्मण्यां क्षत्रियात्सूतो वैश्याद्वैदेहिकस्तथा ।**
**शूद्राज्जातस्तु चाण्डालः सर्वधर्मबहिष्कृतः ॥ ९३ ॥**

ब्राह्मणी स्त्रीचे ठायीं क्षत्रिय, वैश्य व शूद्र पुरुषापासून क्रमानें सूत, वैदेहिक व चांडाल नामक पुत्र होतात. त्यांतील चांडाल सर्व धर्मांपासून बहिष्कृत केलेला आहे ९३.

**क्षत्रिया मागधं वैश्याच्छूद्रात्क्षत्तारमेव च ।**
**शूद्रादायोगवं वैश्या जनयामास वै सुतम् ॥ ९४ ॥**

क्षत्रिया स्त्री वैश्यापासून मागधनामक पुत्रास उत्पन्न करिते. व तिला शूद्रापासून होणारा पुत्र क्षत्ता होय. वैश्य स्त्रीस शूद्रापासून होणारा पुत्र आयोगव होय. सूत, वैदेहिक, चाण्डाल, मागध, क्षत्तृ व आयोगव असे हे सहा अविवाहित व निकृष्ट पुरुषापासून उत्कृष्ट स्त्रीचे ठायीं झालेले प्रतिलोमज पुत्र होत. त्यांनीं आपला निर्वाह कसा करावा तें मनुस्मृतींत सांगितलेलें आहे ९४.

आतां या संकर पावलेल्या पुरुषापासून संकर पावलेल्या स्त्रीचे ठायीं उत्पन्न झालेल्या पुत्रांच्या जाति सांगतात—

**माहिष्येण करण्यां च रथकारः प्रजायते ।**
**असत्सन्तस्तु विज्ञेया प्रतिलोमानुलोमजाः ॥ ९५ ॥**

क्षत्रियानें वैश्या स्त्रीचे ठायीं उत्पन्न केलेला जो माहिष्य त्याच्यापासून करणीचे-( शूद्रा स्त्रीच्या वैश्योत्पन्न कन्येचे ) ठायीं होणारा पुत्र रथकार जातीचा होतो. त्याचें उपनयनादि सर्व करावें. कारण तसें करण्याविषयीं वचन आहे. त्याचप्रमाणें ब्राह्मण व क्षत्रिय यांच्यापासून झालेले जे मूर्धावसिक्त व माहिष्य यांच्यापासून अनुलोमसंकर होऊन उत्पन्न झालेल्या पुत्रांची जाति त्यांच्याहून निराळी होते. पण त्यांच्या द्विजातित्वामुळें उपनयनादिकांचा त्यांस अधिकार आहे, असें समजावें. त्यांच्या जातींचीं नांवें मनुसारख्या दुसऱ्या मान्य स्मृतींत पहावींत. येथें आम्ही केवल दिग्दर्शन केलें आहे. कारण अशा प्रकारें होणाऱ्या संकीर्ण संकरजाति

अनंत आहेत. येथें एवढें मात्र सांगणें उचित आहे कीं, प्रतिलोमज संतति असत् व अनुलोमज संतति सत् म्हणजे उत्तम आहे ९५.

९० व्या श्लोकांत सवर्णापासून सवर्ण स्त्रीच्या ठायीं सवर्ण पुत्र होतात असें वर्णप्राप्तीचें एक कारण सांगितलें. आतां तिचेंच दुसरें कारण सांगतात—

**जात्युत्कर्षे युगे ज्ञेयः पञ्चमे सप्तमेऽपि वा ।**
**व्यत्यये कर्मणां साम्यं पूर्ववच्चाधरोत्तरम् ॥ ९६ ॥**

मूर्धावसिक्तादि ज्या जाति वर सांगितल्या आहेत त्यांचा उत्कर्ष ( म्हणजे ब्राह्मणादि जातिप्राप्ति ) सातव्या सहाव्या किंवा पांचव्या जन्मीं होतो असें समजावें. सातव्या, सहाव्या व पांचव्या जन्मांत असें म्हणून उत्कर्षाचे जे तीन काल सांगितलेले आहेत, त्यांची व्यवस्था अशी—ब्राह्मणानें शूद्र स्त्रीच्याठायीं उत्पन्न केलेली जी निषादी तिला दुसऱ्या ब्राह्मणानें वरून तिच्याठायीं कन्याच झाली; तिलाही ब्राह्मणानेंच वरिलें व त्याच्यापासून कन्याच झाली; अशाप्रकारें सहावी कन्या सातव्या ब्राह्मणास उत्पन्न करिते. म्हणजे तिचा मुलगा ब्राह्मणजातीचा होतो. तसेंच ब्राह्मणानें वैश्यस्त्रीशीं विवाह करून तिला अंबष्ठा जातीची कन्या झाली, तिलाही ब्राह्मणानेंच वरिलें; तिच्या कन्येला पुनः ब्राह्मणानेंच वरिलें; अशा रीतीनें पांचव्या कन्येस होणारा सहावा पुत्र ब्राह्मणजातीचा होतो. याचप्रमाणें मूर्धावसिक्ता ही पांचव्या ब्राह्मणास उत्पन्न करिते. क्षत्रियानें उग्रा व माहिष्याजातीच्या कन्येशीं विवाह करून त्यांच्या कन्येशीं पुनः पुनः क्षत्रियानेंच विवाह केला असतां क्रमानें सहावा व पांचवा क्षत्रिय पुत्र होतो. वैश्यानें करणीजातीच्या स्त्रीशीं विवाह करून तिची मुलगी व नात यांच्याशीं वैश्यानेंच विवाह केला असतां तिच्या वंशांतील पांचवा पुत्र वैश्य होतो. त्याचप्रमाणें उपजीविकेकरितां करावयाचीं जीं कर्में त्यांचा विपर्यास झाला असतांही पांचव्या, सहाव्या किंवा सातव्या जन्मीं त्या त्या वर्णाशीं साम्य प्राप्त होतें. आतां हीच गोष्ट अधिक स्पष्ट करून सांगतों—ब्राह्मण आपल्या मुख्य वृत्तीनें निर्वाह करण्यास जेव्हां असमर्थ होतो तेव्हां त्यानें क्षत्रियाचें कर्म करून निर्वाह करावा असा अनुकल्प आहे; पण तो क्षत्रिय वृत्तीनेंही आपला निर्वाह करण्यास असमर्थ झाल्यास वैश्यवृत्तीनें व तिच्या योगानेंहि निर्वाह होत नसल्यास शूद्र वृत्तीनें त्यानें निर्वाह करावा. क्षत्रियानें आपल्या कर्मानें निर्वाह होत नाहीं असें वाटल्यास वैश्य वृत्तीनें व शूद्रवृत्तीनें निर्वाह करावा; व वैश्यानेही प्रसंगीं शूद्रवृत्तीनें निर्वाह करावा असें सांगितलें आहे. याप्रमाणें आपत्कालीं आपलें निर्वाहाचे मुख्य कर्म सोडून आपल्यापेक्षां हीन वर्णाचे कर्म करूं लागणें यास कर्माचा व्यत्यय म्हणतात; पण अशा रीतीनें आपत्समयीं कर्मव्यत्यय केल्यावर, आपत्ति निघून गेली असतांही, जो तो कर्मव्यत्यय टाकीत नाहीं, अर्थात् तें अन्यवर्णाचेंच काम करीत राहतो, तो ब्राह्मणादिवर्णक्रमानें पांचव्या, सहाव्या किंवा सातव्या जन्मीं ज्या हीन वर्णाच्या कर्मानें आपली उपजीविका करीत असेल त्याच्या जातीचा होतो. हीच गोष्ट उदाहरणानें स्पष्ट करितो. समजा कीं एका ब्राह्मणानें याजन, अध्यापन व प्रतिग्रह या आपल्या मुख्य उपायांवर निर्वाह होईनासा झाल्यामुळें शूद्र वृत्तीचें अवलंबन केलें;

पुढें त्याचा आपत्काल जाऊन ब्राह्मण वृत्तीनें सहज निर्वाह होण्याचे दिवस आले; पण शूद्र वृत्तीची गोडी लागल्यामुळें तो ती सोडीना. पुढें त्यास पुत्र झाला; तोही त्या परकीय वृत्तीवरच निर्वाह करूं लागला. त्याच्या पुत्रालाही तोच धंदा आवडला. अशा रीतीनें त्याच धंद्यांत सहा पिढ्या राहिलेलें तें ब्राह्मणकुल सातव्या पिढीस शूद्र जातीचें होतें. वैश्य वृत्तीनें राहणारें ब्राह्मणाचें कुल सहाव्या पिढीस वैश्य जातीचें होतें. व क्षत्रियवृत्तीनें राहणारे ब्राह्मणाचें कुल पांचव्या पिढीस क्षत्रिय जातीचें होतें, तसेंच शूद्र वृत्तीनें निर्वाह करणारें क्षत्रिय कुलही साहव्या पिढीस शूद्र जातीचें व वैश्यवृत्तीनें राहणारें पांचव्या पिढीस वैश्य जातीचें होतें. त्याचप्रमाणें वैश्यही शूद्रवृत्तीनें राहून आपत्काल निघून गेल्यावरही त्या वृत्तीस न सोडल्यामुळें पुत्रपरम्परेनें पांचव्या पिढीस शूद्र जातीचा होतो. आतां या श्लोकांतील " **पूर्ववच्चाधरोत्तरं** " या चवथ्या चरणाचा अर्थ सांगतो—

वर वर्णसंकरामध्यें अनुलोमज व प्रतिलोमज पुत्र सांगितले व संकर पावलेल्या स्त्रीपुरुषांपासून रथकारादि जाती निर्माण होतात हेंही सांगितलें. आतां येथे वर्णांचे लोक व संकरपार झालेल्या जाती यांच्यापासून उत्पन्न होणारी संतति सांगावयाची आहे. अधर व उत्तर या दोन्ही प्रकारची संतति पूर्वीप्रमाणेंच म्हणजे असत् समजावी. आतां ह्याचें उदाहरण देतों. मूर्धावसिक्त स्त्रीच्या ठायीं क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांनीं उत्पन्न केलेलें, त्याचप्रमाणें अंबष्ठेच्या ठायीं वैश्य व शूद्र यांनीं उत्पन्न केलेले व निषादीच्या ठायीं शूद्रानें उत्पन्न केलेले पुत्र अधरप्रतिलोमज होत. त्याचप्रमाणें मुर्धावसिक्ता, अंबष्ठा व निषादी यांच्या ठायीं ब्राह्मणानें उत्पन्न केलेले, माहिष्या व उग्रा यांच्या ठायीं ब्राह्मणानें व क्षत्रियानें उत्पन्न केलेलें आणि करणीच्या ठायीं ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांनीं उत्पन्न केलेलें उत्तरप्रतिलोमज होत ९६.

इति वर्णजातिविवेकप्रकरणम् ४.

---

# अथ गृहस्थधर्मप्रकरणम् ५.



अग्नीच्या योगानें सिद्ध होणारीं श्रौत व स्मार्त कर्मे दाखवून कोणत्या अग्नीमध्यें कोणतें कर्म करावें तें सांगतात—

**कर्म स्मार्तं विवाहाग्नौ कुर्वीत प्रत्यहं गृही ।**
**दायकालाहृते वापि श्रौतं वैतानिकाग्निषु ॥ ९७ ॥**

स्मृतीनें सांगितलेलें वैश्वदेवादिकर्म व प्रतिदिनीं करावें लागणारें पाकादि लौकिक कर्म विवाहाग्नीवर किंवा विभक्त होतांना आणिलेल्या वडिलोपार्जित अग्नीवर गृहस्थानें करावें. व श्रुतीनें सांगितलेलें अग्निहोत्रादि कर्म वैतानिकाग्नींवर म्हणजे आहवनीयादि अग्नीमध्यें करावें.

आतां गृहस्थाचे धर्म सांगतात—

**शरीरचिन्तां निर्वर्त्य कृतशौचविधिर्द्विजः ।**
**प्रातस्संध्यामुपासीत दन्तधावनपूर्वकम् ॥ ९८ ॥**

ब्राह्म मुहूर्तावर उठून आपलें शरीर रोगी आहे कीं निरोगी आहे अशाविषय योग्य विचार करून द्विजानें शौचमुखमार्जन करावें. आणि अगोदर दंतधावन करून नंतर प्रातः संध्येची उपासना करावी. मिताक्षरेमध्यें " शरीरचिन्ता " ह्याचा अर्थ—अत्यावश्यक मूत्र-पुरीषोत्सर्ग—असा केला आहे. दंतधावनाचें काष्ठ बाभळीसारख्या काटेच्या व चिकाळ वृक्षाचें बारा अंगुळें लांब व कनिष्ठिकेच्या अग्रा इतकें मोठें असावें. पण आपल्या महाराष्ट्रांत प्रायः राखुंडीनेंच दंतधावन करण्याची चाल आहे. संध्यावंदन ब्रह्मचाऱ्यासही अवश्य आहे. पण गृहस्थानें अगोदर काष्ठानें दंतधावन करावें,नंतर संध्या करावी असें येथें अधिक सांगितलें आहे. कारण ब्रम्हचाऱ्यानें दंतधावन, नाच, गाणें इत्यादिकांस वर्ज्य करावें असा निषेध आहे ९८.

प्रातःसंध्या झाल्यानंतर—

**हुत्वाग्नीन्सूर्यदैवत्यान् जपेन्मन्त्रान्समाहितः ।**
**वेदार्थानधिगच्छेच्च शास्त्राणि विविधानि च ॥ ९९ ॥**

यथोक्तविधीनें आहवनीय-आदि अग्नींत किंवा स्मार्त अग्नींत होम करावा; त्यानंतर सूर्य ही ज्यांची देवता आहे अशा " उदुत्यं जातवेदसं " इत्यादि मंत्रांचा एकाग्र मनानें जप करावा;. त्यानंतर निरुक्त, व्याकरण इत्यादिकांचें श्रवण करून वेदार्थ समजून घ्यावा व पूर्वी जें अध्ययन झालें असेल त्याची आवृत्ति करावी; आणि मीमांसा इत्यादिक, धर्म, अर्थ, आरोग्य इत्यादिकांचें प्रतिपादन करणारीं नाना प्रकारचीं शास्त्रें पहावींत. अपरार्क म्हणतात-वेदार्थ समजून घेणें हें मुख्य साध्य असून इतर शास्त्रांचें अवलोकन करणें हें साधन आहे. अर्थात् वेदार्थ समजण्यास उपयोगीं असलेलीं शास्त्रेंच वाचावीं. बौद्धादि इतर शास्त्रांकडे पाहूंही नये ९९.

त्यानंतर—

**उपेयादीश्वरं चैव योगक्षेमार्थसिद्धये ।**
**स्नात्वा देवान्पितॄंश्चैव तर्पयेदर्चयेत्तथा ॥ १०० ॥**

योगक्षेमाकरितां अभिषिक्त राजाकडे किंवा आचारसंपन्न श्रीमानाकडे जावें. आपल्या-जवळ नसलेल्या अपेक्षित वस्तूचा लाभ करून घेणें यास योग व प्राप्त झालेल्या धनादिकांचें परिपालन करणें यास क्षेम म्हणतात. या श्लोकांत " उपेयात् " असें म्हटलें आहे. त्यावरून सेवेचा निषेध केलेला आहे असें समजावें. कारण वेतन घेऊन दुसऱ्यानें सांगितलेलें काम करणें यास सेवा म्हणतात; व ती श्ववृत्ति असल्यामुळें तिचा निषेध केला आहे. निदान ब्राह्मणानें तरी तिचा अंगीकार करणें अयोग्य आहे. त्यानंतर मध्याह्न समयीं शास्त्रोक्त विधीनें

नदी, सरोवर इत्यादि जलाशयांत स्नान करून आपल्या गृह्यसूत्रांत सांगितल्याप्रमाणें देव ऋषि, व पितर यांचें तर्पण दैव, आर्ष व पैत्र तीर्थानें करावें. त्यानंतर, गंध, पुष्पें, अक्षता इत्यादिकांच्या योगानें हरि, हर, इत्यादि आपल्या इष्ट देवतांचें समन्त्रक पूजन करावें. पूजनाचे मन्त्र ऋग्वेदादिकांच्या आपल्या शाखेंतील व त्या त्या देवतांचें प्रकाशन करणारे असावेत, किंवा " ॐ शिवाय नमः ॐ वासुदेवाय नमः " असे त्या त्या देवतेच्या नांवाचे मन्त्र योजावेत. अपरार्कांत नित्य, नैमित्तिक, काम्य इत्यादि सहा प्रकारचीं स्नानें सांगून स्नानविधि सविस्तर वर्णिला आहे. पण विस्तार होईल या भीतीनें तो येथें देत नाहीं १००.

त्यानंतर ब्रह्मयज्ञ करावा असें सांगतात—

**वेदाथर्वपुराणानि सेतिहासानि शक्तितः ।**
**जपयज्ञप्रसिद्ध्यर्थं विद्यां चाध्यात्मिकीं जपेत् ॥ १०१ ॥**

वेद, इतिहास, पुराणें व त्याचप्रमाणें आध्यात्मिकविद्या यांचा जपयज्ञाच्या सिद्ध्यर्थ पूर्वोक्त विधीनें यथाशक्ति जप करावा. वेदादि ग्रंथ एकाच दिवसांत संपणें शक्य नाहीं. यास्तव त्याचा कांहीं नियमित भाग वाचण्याची किंवा म्हणण्याची पद्धत ठेवावी. उपनिषदांस आध्यात्मिक विद्या म्हणतात व तिचें अध्ययन मुख्य आहे १०१.

आतां पंचमहायज्ञांचें विधान करितात—

**बलिकर्मस्वधाहोमस्वाध्यायातिथिसत्क्रियाः ।**
**भूतपित्रमरब्रह्ममनुष्याणां महामखाः ॥ १०२ ॥**

भूतयज्ञ, पितृयज्ञ, देवयज्ञ, ब्रह्मयज्ञ व मनुष्ययज्ञ या पांच महायज्ञांसच बलिकर्म, स्वधा, होम, स्वाध्याय व अतिथिसत्कार म्हणतात. हे पंचमहायज्ञ नित्य आहेत; यास्तव ते प्रत्यहीं करावेत. आतां त्यांचें जें कोठें कोठें फल सांगितलेलें आहे, तें त्यांचें पावनत्व प्रकट करण्याकरितां आहे, ते काम्य आहेत, असें प्रतिपादन करण्याकरितां नव्हे १०२.

**देवेभ्यश्च हुतादन्नाच्छेषाद्भूतबलिं हरेत् ।**
**अन्नं भूमौ श्वचाण्डालवायसेभ्यश्च निक्षिपेत् ॥ १०३ ॥**

स्वगृह्योक्त विधानें वैश्वदेव होम करून त्यांतून राहिलेल्या अन्नानें भूतांस बलि द्यावा. अपक्व वस्तूचा बलि देऊं नये हें सुचविण्याकारितां या श्लोकांत अन्न शब्दाचें ग्रहण केलें आहे. त्यानंतर आपल्या शक्तीप्रमाणें कुत्रे, चांडाल, कावळे, कृमि, पापी, रोगी, पतित इत्यादिकांकरितां भूमीवर अन्न ठेवावें. हें वैश्वदेवकर्म सायंकालीं व प्रातःकालींही करावें. पण कित्येक विद्वान् हें कर्म अन्नसंस्काराकरितां आहे; व कित्येक हें पुरुषार्थाकरितां आहे असें म्हणतात. तथापि हें वैश्वदेवसंज्ञक कर्म पुरुषार्थाकरितांच आहे, असें विज्ञानेश्वरांनीं स्पष्ट सांगितलें आहे १०३.

**अन्नं पितृमनुष्येभ्यो देयमप्यन्वहं जलम् ।**
**स्वाध्यायं चान्वहं कुर्यान्न पचेदन्नमात्मने ॥ १०४ ॥**

पितर व मनुष्यें यांस उद्देशून प्रत्यहीं यथाशक्ति अन्न द्यावें. अन्न नसल्यास कन्द-मूळ-फलादि व त्यांच्याही अभावीं जल समर्पण करावें. शिकलेल्या ग्रंथांचें विस्मरण होऊं नये म्हणून सतत स्वाध्याय करावा. आपल्याच जिव्हेची तृप्ति करण्याकरितां कोणताही खाण्याचा पदार्थ तयार करूं नये, तर देवादिकांच्या उद्देशानें खाद्य पदार्थ बनवून प्रथम तो देवादिकांस अर्पण करावा व नंतर गृहस्थानें त्याचा स्वाद घ्यावा १०४.

बालस्ववासिनीवृद्धगर्भिण्यातुरकन्यकाः ।
संभोज्यातिथिभृत्यांश्च दम्पत्योः शेषभोजनम् ॥ १०५ ॥

बालक, विवाहानंतर पित्याच्या गृहीं राहिलेली कन्या, वृद्ध, गर्भिणी, रोगी, कुमारिका, अतिथि व सेवक यांस अगोदर भोजन घालून नंतर शेष अन्न गृहस्थ व त्याची पत्नी यांनीं खावें १०५.

आपोशनेनोपरिष्टादधस्तादश्नता तथा ।
अनग्नममृतं चैव कार्यमन्नं द्विजन्मना ॥ १०६ ॥

भोजन करणाऱ्या द्विजानें भोजनाच्या पूर्वी व तें समाप्त झालें असतां आपोशनसंज्ञक आचमनानें तें अन्न अनग्न व अमृत करावें. उपनयनानंतर सर्व आश्रमांच्या लोकांस हें आपोशन सारखेंच लागू आहे. बोधायनादि इतर स्मृतिकारांनीं अन्नपात्राखालीं मंडल करून त्यांतील अन्न परमात्म्यास अर्पण करून व त्या अन्नाची मोठ्या भक्तीनें मानसिक पूजा करून आपोशन व प्राणाहुति घेऊन शांत चित्तानें भोजन करावें, इत्यादि पुष्कळ नियम सांगितलेले आहेत १०६.

वैश्वदेव झाल्यानंतर—

अतिथित्वेन वर्णानां देयं शक्त्यानुपूर्वशः ।
अप्रणोद्योऽतिथिः सायमपि वाग्भूतृणोदकैः ॥ १०७ ॥

एकाच कालीं ब्राह्मणादि चारी वर्णांचे अनेक अतिथि प्राप्त झाल्यास त्यांस त्यांच्या वर्णांच्या क्रमानें यथाशक्ति अन्न द्यावें. सायंकालीं जरी एकादा अतिथि आला तरी त्याला "नाहीं." म्हणूं नये. आपल्याजवळ खावयास देण्यासारखें कांहीं नसल्यास सत्य व प्रिय वाणी, बसावयास भूमि, जल इत्यादिकांनीं तरी त्याचा सत्कार करावा १०७.

सत्कृत्य भिक्षवे भिक्षा दातव्या सुव्रताय च ।
भोजयेच्चागतान्काले सखिसंबन्धिबान्धवान् ॥ १०८ ॥

यति व व्रतसंपन्न ब्रम्हचारी यांस चांगला सत्कार करून भिक्षा द्यावी. भिक्षेचें एक ग्रास प्रमाण सांगितलें आहे व तो ग्रास मोराच्या अंड्या एवढा असावा. भोजनाच्यावेळीं आलेल्या मित्र, संबंधी व मातृपितृसंबंधी बान्धव यांस भोजन घालावें १०८.

महोक्षं वा महाजं वा श्रोत्रियायोपकल्पयेत् ।
सत्क्रियान्वासनं स्वादु भोजनं सूनृतं वचः ॥ १०९ ॥

श्रोत्रिय अतिथि प्राप्त झाला असतां गाड्यास जोडतां येण्यासारखा मोठा बैल, किंवा मोठा बकरा त्याच्याजवळ आणून उभा करावा व तुमच्याकरितां हा तयार केलेला आहे, असें सांगावें. त्याचें हनन किंवा दान करण्याचें प्रयोजन नाहीं. कारण प्रत्येक श्रोत्रिय आला असतां त्यास एक बैल देणें किंवा त्याच्याकरितां एका बैलास मारणें संभवनीय दिसत नाहीं. असो; याप्रमाणे त्याचें स्वागत करून, आसन, पाद्य, अर्घ्य इत्यादि देऊन तो बसला असतां त्याच्याजवळ बसून, मिष्ट भोजन देऊन, आपल्या आगमनानें आम्ही आज धन्य झालों इत्यादि सत्य व प्रिय भाषण करून, सत्कार करावा. पण तो अतिथि श्रोत्रिय नसल्यास त्याचें उदक, आसन इत्यादिकांनीं आतिथ्य करावें. " मधुपर्क विधीनें श्रोत्रियाकरितां बैलाचें हनन करणें हें श्रुतिप्राप्त असल्यामुळें येथें हननाकरितांच त्याची उपकल्पना करावी " असें अपरार्क म्हणतात १०९.

प्रतिसंवत्सरं त्वर्घ्याः स्नातकाचार्यपार्थिवाः ।
प्रियो विवाह्यश्च तथा यज्ञं प्रत्यृत्विजः पुनः ॥ ११० ॥

स्नातक, आचार्य, राजा, मित्र व जामात आणि ऋत्विज हे घरीं आले असतां प्रतिवर्षी मधुपर्कविधीनें त्यांचें पूजन करावें. ऋत्विजांचें लक्षण पूर्वी (३५ व्या श्लोकांत) सांगितलें आहे त्याचें एका वर्षाच्या आंतही पुनः यज्ञ करावयाचा असतां मधुपर्क विधीनें पूजन करावें. विद्यास्नातक, व्रतस्नातक व विद्याव्रतस्नातक असे स्नातकाचे तीन प्रकार आहेत. वेद संपूर्ण करून व्रत समाप्ति न करितां जो गुरुकुलांतून परत येतो तो विद्यास्नातक, व्रत संपूर्ण करून वेद न संपवितां जो परत फिरतो तो व्रतस्नातक व दोन्ही संपवून जो परत येतो तो विद्याव्रतस्नातक होय. श्वशुर, पितृव्य, मातुल इत्यादिकांचेंही प्रतिवर्षी मधुपर्कविधीनें पूजन करावें असें आश्वलायनांनीं सांगितलें आहे ११०.

आतां अतिथीचें लक्षण सांगतात—

अध्वनीनोऽतिथिर्ज्ञेयः श्रोत्रियो वेदपारगः ।
मान्यावेतौ गृहस्थस्य ब्रह्मलोकमभीप्सतः ॥ १११ ॥

मार्गांत असणारा ( वाटसरू ) श्रोत्रिय व वेदपारग हे अतिथि होत. ब्रम्हलोकाची इच्छा करणाऱ्या गृहस्थास हे दोघेही मान्य आहेत. केवळ अध्ययनानेंच श्रोत्रिय होतो हें जरी खरें आहे तरी येथें शास्त्राध्ययन व वेदपठण यांनीं संपन्न असलेला श्रोत्रिय व केवल आपल्या शाखेचें अध्ययन करण्यास समर्थ असलेला वेदपारग होय. अपरार्कांत पहिल्या अर्धाचा अर्थ असा केला आहे—वाटसरू अतिथि होय व यथाविधि वेदाध्ययन करून त्याच्या पार झालेला श्रोत्रिय होय १११.

त्याचप्रमाणें—

परपाकरुचिर्न स्यादनिन्द्यामन्त्रणादृते ।
वाक्पाणिपादचापल्यं वर्जयेच्चातिभोजनम् ॥ ११२ ॥

दुसऱ्याच्या अन्नामध्यें रुचि ठेवूं नये. पण एखाद्या अनिंद्य पुरुषानें आमंत्रण दिलें असतां तें अवश्य स्वीकारावें. वाणी, हात, पाय यांचें चापल्य व अति भोजन यांस वर्ज करावें. असभ्य व असत्य भाषण करणें हें वाक्चापल्य, शङ्कु ठोकणें, मांडीवर हात मारणें हें हाताचें चापल्य, व उड्या मारणें, वडील माणसांवरून ओलांडून जाणें हें पादचापल्य होय. शिश्नचापल्य, नेत्रचापल्य इत्यादि दुसऱ्या चापल्यांचाही येथें स्वीकार करावा. अति भोजनानें आरोग्य बिघडतें. यास्तव त्याचा येथें निषेध केला आहे ११२.

तसेंच—

अतिथिं श्रोत्रियं तृप्तमासीमान्तमनुव्रजेत् ।
अहःशेषं समासीत शिष्टैरिष्टैश्च बन्धुभिः ॥ ११३ ॥

भोजनादिकांच्या योगानें तृप्त झालेल्या श्रोत्रिय अतिथीस सीमेपर्यंत पोंचवीत जावें. वास्तुसीमा, ग्रामसीमा व क्षेत्रसीमा अशा तीन प्रकारच्या सीमा आहेत.त्यांतील कोणत्या सीमेपर्यंत अतिथींच्या मागून जावयाचें हें त्याच्या गुणांप्रमाणें ठरवावें.कारण उत्तम मध्यम व अधम अतिथींचा सत्कार उत्तम, मध्यम व अधम प्रकारचा करावा असें सांगितलेलें आहे. "कांहीं कारणानें अतिथि त्या दिवशीं जाणार नसल्यास त्याच्याजवळ शास्त्रीय चर्चा करीत बसावें, रात्रीं त्याची आज्ञा घेऊन शयन करावें, पहाटे त्याच्यापूर्वीं उठावें व तो जाऊं लागला असतां त्याच्या मागून जावें, आणि पुढील मार्ग दाखवून त्याच्या संमतीनें परत यावें" असें शंखस्मृतींत सांगितलें आहे. असो; भोजनानंतर राहिलेला काल इतिहासपुराणादि जाणणाऱ्या शिष्टांबरोबर, काव्य, कथा, इत्यादि रचण्यांत व सांगण्यांत, कुशल असलेल्या रसिकांबरोबर व आप्तांबरोबर बोलण्यांत घालवावा. "दिवसाचा आठवा भाग निर्वाहाचें साधन मिळविण्यांत खर्च करावा" असें दक्षस्मृतींत सांगितलें आहे ११३.

पुढें--

उपास्य पश्चिमां सन्ध्यां हुत्वाग्नींस्तानुपास्य च ।
भृत्यैः परिवृतो भुक्त्वा नातितृप्याथ संविशेत् ॥ ११४ ॥

त्यानंतर पूर्वोक्त विधीनें सायंसंध्या करून, अग्नींत होम देऊन, त्याचें उपस्थान करून एकशेपांचव्या श्लोकांत सांगितलेल्या सर्व लोकांसह मितभोजन करावें. अतिभोजन करूं नये. पुढें जमाखर्च, देवघेव इत्यादि गृहकृत्यांचा विचार करून निजावें. "रात्रीच्या दुसऱ्या व तिसऱ्या प्रहरीं झोंप घ्यावी. पहिल्या व चवथ्या प्रहरीं कांहीं अध्ययन करावें ओल्या पायांनीं उत्तरेकडे किंवा पश्चिमेकडे मस्तक करून, अंतराळीं, तुळशीखालीं, मोडक्या, जळक्या, जुन्या व अनेक बिळांनीं युक्त असलेल्या गृहांत; श्मशानांत, शून्य मठांत किंवा देवालयांत निजूं नये. ओल्या जागीं, धूळ, राख इत्यादिकांनीं युक्त असलेल्या भूमीवर व डोंगरावर निजणें प्रशस्त नाहीं. संध्यासमयीं झोंपीं जाणें महापाप आहे. डोक्यास तेल लावून निजणें शास्त्रविरुद्ध आहे," इत्यादि दुसरेहि अनेक नियम या निजण्याविषयीं अन्य स्मृतींत सांगितले आहेत ११४.

त्यानंतर--

ब्राह्मे मुहूर्ते चोत्थाय चिन्तयेदात्मनो हितम् ।
धर्मार्थकामान्स्वे काले यथाशक्ति न हापयेत् ॥ ११५ ॥

ब्राह्म मुहूर्तावर उठून पूर्वी केलेलें व पुढें करावयाचें आपलें हित आणि वेदाच्या अर्थाविषयीं असलेले संशय यांचा विचार करावा. कारण त्यावेळीं चित्त व्याकुळ नसतें व त्यामुळें खरा प्रकार काय आहे हें सहज समजतें. रात्रीच्या चवथ्या प्रहराचा शेवटचा अर्ध प्रहर म्हणजेच पावणे चार घटिका रात्र राहिली असतां, त्या कालास ब्राह्म मुहूर्त म्हणतात. असो; त्यानंतर धर्म, अर्थ व काम यांचें योग्यसमयीं यथाशक्ति सेवन करावें. धर्मास प्राधान्य देऊन त्यास बाध होणार नाहीं अशा व्यवस्थेनें द्रव्य संपादन करावें व स्त्रियादि विषयभोगही घ्यावे असा याचा भावार्थ समजावा ११५.

आतां कोणास कशा क्रमानें मान द्यावा तें सांगतात—

विद्याकर्मवयोबन्धुवित्तैर्मान्या यथाक्रमम् ।
एतैः प्रभूतैः शूद्रोऽपि वार्धके मानमर्हति ॥ ११६ ॥

पूर्वी सांगितलेली विद्या, श्रौत व स्मार्त कर्म, आपल्याहून अधिक किंवा सत्तर वर्षांहून अधिक वय, स्वजनसंपत्ति व द्रव्य यांनीं युक्त असणारे पुरुष क्रमानें पूज्य होत. वयावाचून यातील दुसऱ्या कोणत्याही एक, दोन, तीन, चार अशा पुष्कळ गुणांनीं युक्त असलेला शूद्रही ऐंशी वर्षांनंतर मानास योग्य होतो. विद्वान सर्वांत अधिक पूज्य आहे ११६.

वृद्धभारिनृपस्नातस्त्रीरोगिवरचक्रिणाम् ।
पन्था देयो नृपस्तेषां मान्यः स्नातश्च भूपतेः ॥ ११७ ॥

वृद्ध, डोक्यावर, पाठीवर किंवा खांद्यावर भार घेतलेला, अभिषिक्त राजा, ११० व्या श्लोकांत सांगितलेला त्रिविध स्नातक, स्त्री, रोगी, विवाहास जाणारा वर, व गाडींतून येणारा (त्याचप्रमाणें अमली पदार्थ खाल्ल्यामुळें मत्त झालेला, वेडा, गाय, संन्यासी, बालक) यांस मार्ग द्यावा. म्हणजे ह्यांतील कोणी समोरून येत असतां आपण एकीकडे होऊन त्यांस सरळ मार्गानें जाऊं द्यावें. वृद्धादि इतरांस राजा मान्य आहे. व राजास स्नातक मान्य होय. यास्तव वृद्धादिकांनीं राजास व राजानें कोणत्याही वर्णाच्या स्नातकास मान दिला पाहिजे. ब्राह्मण तर सर्वांहून अधिक पूज्य आहे. यास्तव त्यास सर्वांनीं मान द्यावा हें सांगणेंच व्यर्थ आहे. आतां दोन वृद्ध, दोन रोगी इत्यादि सारख्या योग्यतेचे दोघे समोरासमोर आल्यास त्या दोघांत जो अधिक वृद्ध, अधिक पीडित इत्यादि असेल त्यास दुसऱ्यानें मार्ग द्यावा ११७.

ब्राह्मणादिकांचीं धर्मसंपादनाचीं कर्मे कोणतीं व ब्राह्मणांचीं उपजीविकेचीं कर्मे कोणतीं तें सांगतात—

इज्याध्ययनदानानि वैश्यस्य क्षत्रियस्य च ॥
प्रतिग्रहोऽधिको विप्रे याजनाध्यापने तथा ॥ ११८ ॥

ब्राह्मणादि तिन्हीं द्विजांस यजन, अध्ययन व दान हीं कर्मे धर्म संपादन करून देणारीं आहेत. अर्थात् तीं तिघांनाही सारखींच लागू आहेत. पण प्रतिग्रह म्हणजे दान घेणें, यज्ञ करविणें व अध्ययन सांगणें हीं ब्राह्मणास उपजीविकेकरितां अधिक सांगितलेलीं आहेत. आपत्काली अब्राह्मणानें वेदशास्त्रांचें अध्यापन करावें. पण त्यांवर वृत्ति चालवूं नये; असें शास्त्रीय विधान आहे. ब्राह्मणांचीं जीं हीं सहा कर्मे सांगितलीं आहेत त्यांतील प्रतिग्रहादि शेवटचीं तीन त्यानें केलींच पाहिजेत असा कांहीं नियम नाहीं. पहिलीं तीन मात्र अवश्य अनुष्ठेय आहेत ११८.

आतां क्षत्रियांचें व वैश्यांचें वृत्तिसाधन सांगतात—

**प्रधानं क्षत्रिये कर्म प्रजानां परिपालनम् ।**
**कुसीदकृषिवाणिज्यपाशुपाल्यं विशः स्मृतम् ॥ ११९ ॥**

प्रजेचें परिपालन करणें हें क्षत्रियांचें धर्म व उपजीविका यांचें मुख्य साधन आहे. व्याजवट्टा, शेती, व्यापार व पशूंचें पोषण हीं वैश्यांचीं उपजीविकेचीं मुख्य साधनें होत ११९.

आतां शूद्रांचें उपजीविकेचें साधन सांगतात—

**शूद्रस्य द्विजशुश्रूषा तयाजीवन्वणिक् भवेत् ।**
**शिल्पैर्वा विविधैर्जीवेद्द्विजातिहितमाचरन् ॥१२०॥**

द्विजांची शुश्रूषा करणें हें शूद्रांचें मुख्य कर्म आहे. पण त्यांतूनही ब्राह्मणसेवा करणें हा परम धर्म आहे. कारण त्यांच्या योगानें वृत्ति व धर्म हीं दोन्ही सिद्ध होत असतात. पण द्विजशुश्रूषेवर निर्वाह होईनासा झाल्यास, शूद्रानें वाण्याचें काम करावें. किंवा द्विजशुश्रूषेंत बाध येणार नाहीं अशा नानाप्रकारच्या शिल्पांनीं (कलाकौशल्यावर) निर्वाह चालवावा. चित्रें काढणें, गायन, नृत्य, वाद्यें वाजविणें, कारागिरी करणे, इत्यादि शुद्ध कौशल्यें होत. कातडीं कमावणें, जोडे शिवणें इत्यादि निंद्य अथवा अमंगल कर्मे शूद्रानेंही आपत्कालीं करूं नयेत. आपल्या कर्मांवर निर्वाह न होणें हा आपत्काल होय. अशा वेळीं आपल्याहून हीन वर्णाचें कर्म करून निर्वाह करावा. उच्च वर्णाच्या कर्मावर निर्वाह करूं नये. असा शास्त्रनिर्बंध आहे १२०.

आतां शूद्रांचा धर्म सांगतात—

**भार्यारतिः शुचिर्भृत्यभर्ता श्राद्धक्रियापरः ।**
**नमस्कारेण मन्त्रेण पञ्चयज्ञान्न हापयेत् ॥ १२१ ॥**

आपल्या भार्येच्या ठायींच रति ठेवावी. वेश्यागमन अथवा परस्त्रीगमन कधींही करूं नये. बाह्याभ्यंतर शौच करावें. मृत्तिका व जल यांच्या योगानें शरीर शुद्ध करणें हें बाह्य शौच व कामक्रोधादि दोषांचा त्याग करणें हें अंतःशौच होय. द्विजाप्रमाणेंच स्त्री, पुत्र, वृद्ध मातापिता यांचें पोषण करावें. नित्य, नैमित्तिक व काम्य श्राद्धें व शूद्रवर्णाच्या विरुद्ध नसलेलीं स्नातक

व्रतें यामध्यें रत असावें. अथवा नित्यादि श्राद्धानुष्ठानामध्यें तत्पर असावें. १०२ ऱ्या श्लोकांत सांगितलेले पंचमहायज्ञ " नमः " या मंत्रानें करावेत. त्यांतील वैश्वदेवकर्म शूद्रानें लौकिक म्हणजे चुलींतील अग्नीवर करावें १२१.

आतां चारी वर्णांच्या लोकांचे साधारण धर्म सांगतात—

**अहिंसा सत्यमस्तेयं शौचमिन्द्रियनिग्रहः ।**
**दानं दमो दया क्षान्तिः सर्वेषां धर्मसाधनम् ॥ १२२ ॥**

प्राण्यास पीडा न देणें, प्राण्यास पीडा न होईल अशा प्रकारचें यथार्थ भाषण करणें, दिल्यावाचून दुसऱ्याची वस्तु न घेणें, बाह्य व आभ्यंतर शौच, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें यांची नियमित किंवा अनिषिद्ध विषयांमध्येंच प्रवृत्ति होणें, यथाशक्ति अन्न, जल इत्यादि देवून प्राण्यांची पीडा कमी करणें, निषिद्ध विषयांपासून अंतःकरणास परत फिरविणें, (म्हणजे त्यास निषिद्ध विषयांचें चिंतन न करूं देणें ) जे आपत्तींत पडलेले असतील त्यांचें रक्षण करणें, कोणी कांहीं अपकार केला असतांहीं चित्तास क्षुब्ध न होऊं देणें हीं ब्राह्मणापासून चांडाळापर्यंत सर्वांचीं धर्मसाधनें आहेत १२२.

**वयोबुद्ध्यर्थवाग्वेषश्रुताभिजनकर्मणाम् ।**
**आचरेत्सदृशीं वृत्तिमजिह्मामशठां तथा ॥ १२३ ॥**

वय ( बाल्ययौवनादि शरीरावस्था ); लौकिक व वैदिक व्यवहारांतील स्वाभाविक बुद्धि; गृह, क्षेत्र इत्यादि वित्त; भाषण; वस्त्रें, भूषणें इत्यादि धारण करणें; पुरुषार्थांच्या उपयोगीं असलेल्या शास्त्रांचें श्रवण करणें; कुल व उपजीविकेकरितां करावयास लागणारें प्रतिग्रहादि कर्म; यांस उचित असेल तेंच आरण करावें व तें सरळ आणि मत्सररहित असावें. सारांश, तरुणास उचित असलेलें काम तरुणानें करावें; म्हाताऱ्यानें किंवा लहान मुलानें करूं नये. बुद्धिमानास उचित असलेलें कर्म त्यानें करावें; मूर्खांनें करूं नये. इत्यादि याचा भावार्थ समजावा १२३.

येणेंप्रमाणें स्मार्तकर्में सांगून आतां श्रौतकर्में सांगतात—

**त्रैवार्षिकाधिकान्नो यः स हि सोमं पिबेद्द्विजः ।**
**प्राक्सौमिकीः क्रियाः कुर्याद्यस्यान्नं वार्षिकं भवेत् ॥ १२४ ॥**

सर्व कुटुंबाच्या निर्वाहास तीन वर्षें पुरेल इतकें किंवा त्याहून अधिक अन्न ज्याच्याजवळ असेल त्याच द्विजानें सोमपान करावें. ज्याच्याजवळ त्याच्यापेक्षां कमी अन्न असेल त्यानें सोमपान करूं नये. पण हें काम्यसोमयागाविषयीं म्हणणें आहे. नित्य सोमयाग तर अवश्य केलाच पाहिजे. त्याच्याविषयीं असा नियम करतां येत नाहीं. ज्याच्याजवळ एका वर्षापुरतेंच अन्न असेल त्यानें प्राक्सौमिकी म्हणजे अग्निहोत्र, दर्शपूर्णमास, पशु व चातुर्मास्य कर्में आणि त्यांच्या विकृति ह्या क्रिया कराव्या १२४.

याप्रमाणें काम्य श्रौतकर्मे सांगून आतां नित्य श्रौतकर्मे सांगतात—

**प्रतिसंवत्सरं सोमः पशुः प्रत्ययनं तथा ।**
**कर्तव्याग्रयणेष्टिश्च चातुर्मास्यानि चैव हि ॥ १२५ ॥**

प्रतिवर्षी सोमयाग करावा. दक्षिणायन व उत्तरायण अशा प्रति अयनास पशुयाग करावा. हा पशुयाग प्रतिवर्षी किंवा प्रतिअयनीं करावा, असेंही स्मृतिवचन आहे. धान्याची उत्पत्ति झाली असतां आग्रयणेष्टि करावी व प्रतिवर्षी चातुर्मास्यकर्मे करावीं १२५.

पण—

**एषामसंभवे कुर्यादिष्टिं वैश्वानरीं द्विजः ॥**
**हीनकल्पं न कुर्वीत सति द्रव्ये फलप्रदम् ॥ १२६ ॥**

या वर सांगितलेल्या सोमादि नित्यक्रियांचा असंभव झाल्यास त्याचवेळीं वैश्वानरी इष्टि करावी.पण हा जो हीन कल्प (न्यून पक्ष) सांगितलेला आहे तो द्रव्य असतांना करूं नये.जवळ द्रव्य नसल्यास त्याचा आश्रय करावा. तसेंच काम्यकर्म अशा न्यूनकल्पानें करूं नये १२६.

**चाण्डालो जायते यज्ञकरणाच्छूद्रभिक्षितात् ।**
**यज्ञार्थं लब्धमददद्भासः काकोऽपि वा भवेत् ॥ १२७ ॥**

जो ब्राह्मण यज्ञाकरितां शूद्राजवळ धन मागतो तो दुसऱ्या जन्मीं चांडाळ होतो व जो यज्ञाकरितां मिळविलेलें सर्व धन यज्ञाच्या कामीं लावीत नाहीं तो शंभर वर्षे गिधाड किंवा कावळा होतो १२७.

**कुशूलकुम्भीधान्यो वा त्र्याहिकोऽश्वस्तनोऽपि वा ।**
**जीवेद्वापि शिलोञ्छेन श्रेयानेषां परः परः ॥ १२८ ॥**

कुशूल म्हणजे कोष्टक या नांवाचें एक माप व कुंभी म्हणजे त्याच्याही पेक्षां कमी प्रमाणाचें आणखी एक माप. गृहस्थानें कुशूलभर धान्य संग्रहीं ठेवावें, किंवा कुंभीभर धान्य घरांत राखावें. आपल्या कुटुंबास बारा दिवस पुरेल इतकें धान्य संग्रहीं ठेवणारा कुशूलधान्य, कुटुंबाची सहा दिवसांची पोटगी जवळ बाळगणारा कुंभीधान्य, तीन दिवसापुरतें धान्य ठेवणारा त्र्याहिक व उद्यांच्या पुरतेंही धान्य संग्रहीं न ठेवणारा अश्वस्तनिक होय. विशेषतः केवल धर्मप्रधान ब्राह्मणानें यांतील एका प्रकारचें व्हावें. ( याहून अधिक संग्रहाची हांव धरूं नये व धरल्यास हल्लीं त्यांची जशी दुर्दशा झाली आहे तशी होते. मान, विद्या, योग्यता अधिकार, सुख, शांति, इहलोक व परलोक या सर्वांस तो अंतरतो. ) अथवा शिल व उञ्छ यांवर त्यानें निर्वाह करावा. शेतांत पडलेली कणसें वेंचून आणणें हें शिल व बाजारांत पडलेला एक एक धान्यकण वेंचून आणणें हें उञ्छ होय. मिताक्षराकार म्हणतात—कुशूल धान्य, कुंभीधान्य इत्यादि धान्यांच्या संचयाचे शिल व उञ्छ हे दोन उपाय आहेत. पण अपरार्कांनीं

कुसूल धान्याप्रमाणें शिल व उञ्छ हेही स्वतंत्र जीवनोपाय मानले आहेत. यांतील पुढच्या पुढच्या उपायानें निर्वाह करणारा गृहस्थ अधिक प्रशस्त होय. या श्लोकांतील हे चारी किंवा सहाही उपाय ब्राह्मण गृहस्थाकरितांच सांगितलेले आहेत. कारण विद्या, शांति इत्यादि गुणांनीं युक्त असलेल्या त्यांच्याकडून जसें हें होणें शक्य आहे तसें क्षत्रियादि गृहस्थांच्या हातून होणें शक्य नाहीं. पण सर्व ब्राह्मणांच्या हातून तरी हें थोडेंच होणार आहे ! अति धर्मसंपन्न व अति निग्रही जो असेल त्याच्याच हातून शिल, व उञ्छ होणें शक्य आहे. व शास्त्रानेंही अशा यायावर ब्राह्मण गृहस्थास उद्देशूनच हे उपाय सांगितलेले आहेत. असें न मानल्यास वर १२४ व्या श्लोकांत जें सागितलें आहे त्याच्याशीं विरोध येईल. एवढ्याकरितांच गृहस्थांचे दोन प्रकार ठिकठिकाणीं सांगितलेले आहेत. देवल म्हणतातः— यायावर व शालीन असा गृहस्थ दोन प्रकारचा आहे. त्यांतील यायावर श्रेष्ठ होय. कारण याजन, अध्यापन, प्रतिग्रह, व धनसंचय यांचा तो त्याग करितो. दास, पशु, गृह, ग्राम, धन, धान्य यांनीं संपन्न असणारा, लौकिक मर्यादेनें चालणारा व यजनयाजन इत्यादि षट्कर्मांमध्यें तत्पर असणारा शालीन नामक गृहस्थ होय. हा शालीनही चार प्रकारचा असतो. त्यांतील पहिला यज्ञ करविणें, शिकविणें, प्रतिग्रह घेणें, शेती करणें, व्यापार करणें व पशु पालणें या सहा कर्मांवर निर्वाह करितो. दुसरा यज्ञ करविणें, अध्यापन व प्रतिग्रह या तिहींवर निर्वाह करितो. तिसरा याजन व अध्यापन यांच्यावरच उपजीविका चालवितो व चवथा केवल अध्यापनावरच उदरभरण करितो. मनुस्मृतींतही हा भेद अस्पष्टपणें सांगितला आहे. येथेंही ११८ व्या श्लोकांत शालीन गृहस्थाची वृत्ति व या श्लोकांत यायावराची वृत्ति सांगितली आहे १२८.

इति गृहस्थधर्मप्रकरणम् ५.

---

# अथ स्नातकधर्मप्रकरणम् ६.



मागच्या प्रकरणांत गृहस्थाचीं श्रौत व स्मार्त कर्में सांगून आतां ५१ व्या श्लोकांत सांगितलेल्या स्नानापासून ( म्ह० स्नान केलेल्या दिवसापासून ) ब्राह्मणास अवश्य कर्तव्य, विधिप्रतिषेधरूप व मानससंकल्पमय स्नातक व्रतें सांगतात—

**न स्वाध्यायविरोध्यर्थमीहेत न यतस्ततः ।**
**न विरुद्धप्रसंगेन संतोषी च भवेत्सदा ॥ १२९ ॥**

ब्राह्मणांत प्रतिग्रहादि उपायांनीं द्रव्यसंपादन करण्याविषयीं वर सांगितलें आहे. आतां त्याविषयींच कांहीं अधिक नियम सांगतात. स्वाध्याय म्हणजे वेदपठण. त्यास विघ्न करणारें द्रव्य अप्रतिषिद्ध जरी असलें म्हणजे शास्त्रानें त्याचा निषेध केलेला नाहीं असें जरी तें असलें,

तरी त्याची इच्छा करूं नये. तसेंच ज्याचा आचार व विचार आपणांस माहित नाहीं, अशा पुरुषापासूनही द्रव्य घेऊं नये, द्यूतादि विरुद्ध कर्मांनें किंवा नृत्य, गीत इत्यादि प्रसंगानें द्रव्य संपादन करण्याची हांव धरूं नये. नृत्य, गीत इत्यादि कृत्यें प्राण्यांस आसक्त करीत असतात म्हणून त्यास येथें " प्रसंग " असें नांव दिलें आहे. द्रव्य न मिळालें तरी सदा संतुष्ट व जितेंद्रिय रहावें १२९.

तर मग द्रव्यसंपादन कोणापासून करावें ? तें सांगतात—

राजान्तेवासियाज्येभ्यः सीदन्निच्छेद्धनं क्षुधा ।
दम्भिहैतुकपाखण्डिबकवृत्तींश्च वर्जयेत् ॥ १३० ॥

क्षुधेनें पीडित होणाऱ्या स्नातकानें ज्याचा वृत्तांत आपणांस ठाऊक आहे अशा शुद्ध राजापासून, ज्याचें लक्षण पुढें सांगणार आहों अशा अन्तेवासी ( शिष्या ) पासून व यज्ञ करविण्यास योग्य यजमानापासून द्रव्य संपादन करावें. वर क्षुधेनें पीडित होणारा असें म्हटलें आहे त्यावरून ज्याच्याजवळ कुटुंबपोषणास पुरेसें वडिलोपार्जित धन असेल त्यानें कोणाकडूनच धन मिळविण्याची इच्छा करूं नये असें ठरतें. दम्भि, हैतुक, पाखण्डि व बकवृत्ति यांस सर्व लौकिक, वैदिक व शास्त्रीय कर्मांत वर्ज करावें. मनुस्मृतींत सांगितलेल्या विकर्मस्थ, वैडालवृत्तिक व शठ यांचेंही येथें ग्रहण करावें. केवळ लोकरंजनाकरिताच जो कर्मानुष्ठान करितो तो दंभी, युक्तिसामर्थ्यानें स्वर्ग, नरक, ईश्वर इत्यादि सर्वांविषयीं लोकांच्या मनांत संशय उत्पन्न करणारा हैतुक, वेदविरुद्ध शास्त्रांत सांगितल्याप्रमाणें चालणारा पाखंडी, बगळ्याप्रमाणें मनांत कपट व बाहेर साधुवृत्ति धारण करणारा बकवृत्ति, शास्त्रानें ज्याचा निषेध केला आहे त्याचें आचरण करणारा विकर्मस्थ, दंभी, लोभी, कपटी, हिंस्र व सर्वांस फसविणारा असा जो असतो त्यास वैडालव्रतिक, व सर्वत्र वक्र चालणारा शठ होय. त्यांच्याशीं संसर्गही करूं नये. असें सांगितलेलें असल्यामुळें अर्थात् कोणत्याही स्नातकानें स्वतः त्यांच्याप्रमाणें होऊं नये हें उघड झालें १३०.

शुक्लाम्बरधरो नीचकेशश्मश्रुनखः शुचिः ।
न भार्यादर्शनेऽश्नीयान्नैकवासा न संस्थितः ॥ १३१ ॥

स्नातकानें नित्य दोन शुभ्र वस्त्रें धारण करावींत; केंस, श्मश्रु ( मिशा ) व नखें कापावींत. व त्याचप्रमाणें सर्वदा शुचि असावें. द्विविध शौच मागें सांगितलेंच आहे स्नान, चंदन, सुवासिक पुष्पांच्या माळा यांचें आदरानें सेवन करावें. लाल व दुसऱ्यानें वापरलेलें वस्त्र नेसूं नये. दुसऱ्याचें वस्त्र धुवून नेसलें तरी चालेल. वैभव असल्यास सुवर्णाच्या व रत्नांच्या माळा घालाव्या. भार्या समोर असतांना जेऊं नये. कारण " भार्येच्या समोर बसून भोजन केल्यास वीर्यशून्य संतति होते " असें श्रुतींत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें एक वस्त्रानें व उभ्यानें खाऊं नये १३१.

**न संशयं प्रपद्येत नाकस्मादप्रियं वदेत् ।**
**नाहितं नानृतं चैव न स्तेनः स्यान्न वार्धुषी ॥ १३२ ॥**

ज्यांत प्राण जाण्याचा संभव आहे असें कर्म करूं नये. अथवा पहिल्या चरणाचा दुसरा अर्थ असा—निश्चित अर्थाविषयीं संशय घेऊं नये. कारणावांचून कठोर व उद्वेग उत्पन्न करणारें वाक्य बोलूं नये. पण प्रिय बोलावयाचें एवढाच एक हेतु धरून अहितकर व असत्य वचनही शास्त्रीय कारणावांचून बोलूं नये. तसेंच असभ्य व व बीभत्स वचनही उच्चारूं नये. दुसऱ्यानें न दिलेली वस्तु घेऊं नये. ज्याचा शास्त्रानें निषेध केला आहे अशा व्याजावर उपजीविका करणारास वार्धुषी म्हणतात. व त्याचा येथें " वार्धुषी होऊं नये " असें म्हणून निषेध केला आहे. अपरार्कांत दुसऱ्याही अनेक स्मार्त हितकर धर्मांचा येथें संग्रह केला आहे. त्याचा मीही येथें थोडक्यांत उल्लेख करितों.—मत्त, नेत्ररोगांनीं पीडित, ज्यांचे खुर मोडले आहेत, शिंगें तुटलीं आहेत व शेपूट तुटलें आहे अशा बैलांच्या गाडीत बसून जाऊं नये. मोठ्या पहाटेस, अगदीं सायंकाळीं, भर दोनप्रहरीं, ज्याची आपली ओळख नाहीं अशा-बरोबर प्रवास करूं नये. बैलांच्या पाठीवर बसून जाणें तर सर्वदां निंद्य आहे. रात्रीं वृक्षाच्या खालीं वसूं नये. हिंसास्थान व मारावयाच्या पशूंस बांधावयाचें स्थान यांत बसूं नये किंवा राहूं नये. कारण नसतांना नदींतून तरून जाऊं नये. देवता व पितर यांस जल दिल्यावांचून नदी व सरोवर यांच्या तीरावर बसूं नये. विहिरींत वांकून पाहूं नये; व विहिरींवरून इकडून तिकडे उड्या मारूं नयेत. एकट्यानें मार्गक्रमण करूं नये. शत्रु व अधार्मिक यांच्या सोबतीनेंही प्रवासास निघूं नये. प्रवासांत पाणी जवळ बाळगावें. वेगानें चालूं नये व मार्गानें एकसारखें चालत राहूं नये. पतित व परकीय स्त्रियांच्या बरोबर प्रवास करूं नये. पाऊस पडत असतांना व उन्हाच्या वेळीं छत्री घ्यावी. रात्रीं व अरण्यांतून जातांना हातांत काठी घ्यावी. शरीरसंरक्षणार्थ सदा पायांत जोडा किंवा वाहाणा घालून चालावें. जातांना वर इकडे तिकडे व फार दूर पाहूं नये तर पायाखालीं पुढच्या चार हात मार्गाकडे पहात चालावें. रात्रीं कोठें जावयाचें झाल्यास कोणाला तरी बरोबर घेऊन जावें. वेदवेत्त्या ब्राह्मणाशीं भाषण केल्यावांचून पुढें जाऊं नये. गाय, ब्राह्मण व अग्नि यांच्यामधून जाऊं नये. किंवा ब्राह्मणांची आज्ञा घेऊन त्यांच्या मधून जावें. दोन ब्राह्मण वेदाध्ययन करीत असतांना त्यांच्यामधून जाणाऱ्या द्विजास मोठें पाप लागतें. " कारणावांचून अप्रिय भाषण करूं नये " असें मूळ श्लोकांत म्हटलें आहे, त्याच्याविषयींच आतां आणखी कांहीं विशेष सांगतों—अप्रिय भाषणांत परुषवचन, अपवाद, पैशुन्य, अनृत, वृथालाप व निष्ठुर असे सहा दोष होतात. त्यांतील प्रत्येकाचें लक्षण व उदारण देतों.—१ दुसऱ्यांचा देश, कुल, जाति, विद्या शिल्प, रूप, वृत्त, आचरण, उपकरण, शरीर, कर्म व आजीविका यांच्या विषयींचे दोष त्यांच्या समक्ष सांगणें व तशाच प्रकारचे दुसऱ्यास क्रोध येईल किंवा भीति वाटेल असें वचन उच्चारणें हें परुषवचन होय. जसें—आंधळ्यास डोळस म्हणणें, चांडाळास ब्राम्हण म्हणणें इत्यादि. शूद्रास शूद्र म्हणणें व पतितास पतित म्हणणें

र्‍यांतही दोष आहे. व अशा प्रकारचे कोणावर खोटे आरोप केल्यास त्यांत तर दुप्पट दोष लागतो. २ वर सांगितलेलें परुषवचन एकाद्याच्या तोंडावर न बोलतां त्याच्या मागें बोलणें हा अपवाद होय. ३ गुरु, राजा, बंधु, पति, व मित्र यांच्यापाशीं दुसर्‍याच्या कामाचा घात करण्याकरितां त्यांचे दोष सांगणें यास पैशुन्य म्हणतात. ४ असत्य व विसंवाद, असें दोन प्रकारचें अनृत आहे. पाहिलेलें, ऐकलेलें व अनुमानानें जाणलेलें जें असेल त्याच्या उलट सांगणें हें असत्य व पूर्वी कबूल केल्याप्रमाणें न चालणें हा विसंवाद होय. राग, द्वेष, भय, लोभ, दाक्षिण्य, दुसर्‍याची मर्जी न मोडणें, शंका, लज्जा, दंभ व प्रमाद हीं अनृतभाषणाचीं कारणें आहेत. यास्तव सुज्ञानें त्यांचा परिहार करावा. ५ थट्टा, मस्करी, ज्यांचा कांहीं एक उपयोग नाहीं अशा शब्दांचें उच्चारण हा वृथालाप होय. व ६ स्त्रियांच्या गुह्य अंगांचीं नांवें उच्चारणें व स्त्रीपुरुषांच्या संबंधाविषयीं नीच वचन ( म्हणजे शिवीगाळ ) बोलणें हें निष्ठुरवचन होय. या सहाही प्रकारच्या दुष्टभाषणांचा त्याग करावा. कारण मनुष्याचें हित व अहित केवल त्याच्या वाणीमध्येंच असतें. यास्तव जें बोलावयाचें तें विचारपूर्वक बोलावें. एकाद्याचा दोष आपणास जरी कळला असला तरी तो कोणास सांगूं नये. आपण मात्र त्याच्याशीं संबंध ठेवूं नये. एकाद्यावर खोटा आरोप केला असतां त्यामुळे दुःखी झालेल्या त्याच्या नेत्रांतून जे अश्रु गळतात ते त्या खोटें बोलणार्‍या पुरुषाच्या-पुत्र, पशु-इत्यादिकांचा नाश करितात. दक्ष म्हणतो-असत्य, परस्त्रीगमन, अभक्ष्यभक्षण, चांडालादि अगम्य स्त्रीशीं गमन, हिंसा, स्तेय, वेदविरुद्ध धर्माचें आचरण व मैत्रीचा विघात करणारें आचरण यांचा त्याग करावा. दुसर्‍याचीं रहस्यें आपल्या गृहांत येऊनही जरी कोणी सांगूं लागला तरी ऐकूं नयेत व दुसर्‍याचीं रंध्रें आपणांस जरी ठाऊक असलीं तरी उघड उघड लोकसमूहांत तीं प्रकट करूं नयेत. दुष्ट वाक्य आपण स्वतः बोलूं नये व कोणी बोलत असल्यास ऐकूं नये. आपली कोणी निंदा करूं लागल्यास ती मुकाट्यानें ऐकून घ्यावी. निंदकास उत्तर देण्याच्या भानगडींत पडूं नये १३२.

शिवाय—

दाक्षायणी ब्रह्मसूत्री वेणुमान्सकमण्डलुः ।
कुर्यात्प्रदक्षिणं देवमृद्गोविप्रवनस्पतीन् ॥ १३३ ॥

स्नातकानें सुवर्णयुक्त, यज्ञोपवीतयुक्त, वेळूच्या दंडानें युक्त व कमंडलुयुक्त असावें. येथें सुवर्ण शब्दाचा अर्थ—कानांतील शुद्ध सुवर्णाचीं कुंडलें असा समजावा. कारण स्नातकानें हातांत वेळूची काठी, उदकयुक्त कमंडलु, गळ्यांत दोन यज्ञोपवीतें, नेसावयाचें एक व उत्तरीय दुसरें अशीं दोन वस्त्रें, मस्तकास रुमाल, पागोटें इत्यादि कांहीं, पायांत जोडे, छत्री व कानांत शुद्ध सुवर्णाचीं कुंडलें धारण करावींत; असें इतर स्मृतींत सांगितलें आहे. त्याचप्रमाणें देवाची मूर्ति, तीर्थांतून वर काढलेली माती, गाय, ब्राह्मण, तुळस, अश्वत्थ इत्यादि वनस्पती व घृत, मध, चव्हाटा, इत्यादि यांस उजवें घालून जावें. सारांश मार्गांत जें जें मंगलरूप दिसेल त्यास उजवें घालावें व जें जें अमंगल दिसेल त्यास डावें घालावें. अपरार्कांत बाहेर जाऊं लागलें

असतां समोर आलेल्या पदार्थांतील अशुभ पदार्थ कोणते वशुभसूचक पदार्थ कोणते तें सांगितलें आहे. आधुनिकांची जरी त्याच्यावर फारशी श्रद्धा नसली तरी धार्मिक श्रद्धाळूंच्या माहितीकरितां मी ते येथें सांगतों–नियुक्त औषधें, काळें धान्य, कापूस, वाळलेलें गवत, वाळलेलें शेण ( शेणी, गोवऱ्या ) जळण, कोळसे, अशुभ सर्प, अंगास तेल लाविलेला, मलिन, पंडुरोगी व नागवा मनुष्य, केस मोकळे सोडलेला, रोगानें पीडलेला, काषाय ( लाल ) वस्त्र धारण करणारा, वेडा, दीन, जन्मतःच नपुंसक असलेला, कांहीं कारणानें ज्याचें पुरुषत्व गेलें आहे असा षंढ, लोखंड, चिखल, चांबडें, ज्यांतील स्नेह ( सार ) काढून घेतला आहे असा चोथा ( पेंड वगैरे ) चांडाल, कुत्र्यांस शिजवून खाणारे श्वपाक, मांग, बेरड, पापकर्मे करणारे, गरोदर स्त्री, मरणोन्मुख, भूस, राख, खापरें, हाडें, फुटकीं भांडीं, रिकामीं भांडीं, मृतप्राणी व आक्रोश करणारा प्राणी हे पुढें आले असतां तो अपशकुन समजावा. तसेंच फुटक्या व भयंकर वाद्यांचा शब्द,कोठें जातोस, थांब जाऊं नकोस, तूं गेलास तरी कांहीं होणार नाहीं,हे व अशाच प्रकारचे दुसरेही अनेक शब्द हीं सर्व अशुभ चिन्हें होत. ध्वजांवर अपक्व मांस खाणाऱ्या पक्ष्यांनीं येऊन बसणें अप्रशस्त आहे. जातांना वाहनाचें स्खलन होणें ( म्हणजे घोडा, बैल, यांचा पाय घसरणें, गाडी पडणें इत्यादि ) पुढें वस्त्राचे गांठोडें येणें, बाहेर पडत असतांना दारांत वर डोकें हापटणें, छत्र ध्वज व वस्त्र भूमीवर पडणें, चोहोंकडून कर्कश व रुक्ष वायु वाहणें, समोरून वायु चालणें, नीच व भयंकर ब्राह्मण आणि क्रूर व कर्कश शब्दाचे, अपक्व मांस खाणारे पक्षी समोरून येणें हीं सर्व अशुभ चिन्हें होत. यांतील एकादेंच चिन्ह दिसलें असतां अमंगलाचा नाश करणाऱ्या शंकराचें स्तवन करावें. व त्याचप्रमाणें मधुसूदनाचें स्तोत्र म्हणावें. व आणखी दुसरें अमंगल चिन्ह झाल्यास घरांत परत फिरावें. बाहेर जाऊं लागलें असतां पुढून " ये " असा शब्द ऐकूं येणें प्रशस्त होय; पण तोच शब्द मागून येणें चांगलें नाही. जाणाऱ्याच्या मागच्या बाजूनें " जा " असा शब्द येणें चांगलें पण तोच पुढून येणें प्रशस्त नाहीं. जाणाऱ्याच्या मागच्या बाजूनें हळु हळु व शीतळ वायु वाहणें उत्तम होय. आतां शुभ शकुन कोणते ते सांगतों. पांढरीं पुष्पें, भरलेली घागर, कमळें, मांस, मत्स्य, गाई, घोडे, हत्ती, बांधलेला एकच घोडा, देव, ब्राह्मण, मित्र, पेटलेला अग्नि, वेश्या, दूर्वा, ओलें शेण, सोनें, रुपें, तांबें, सर्व रत्नें, कोंवळ्या औषधि, वेखंड, हळद, कुंकू, राजाचीं सर्व चिन्हें, ज्याच्याबरोबर कोणी रडत नाहींत असें मढें, घृत, दहीं, दूध, नानाप्रकारचीं फळें, उत्तम चित्रें, अक्षता, शंखादि वाद्यांचा उत्तम शब्द, गडगडणारे मेघ, अनुकूल वीज, इंद्रधनुष्य, अनुकूल ग्रह, आस्तिक्य, श्रद्धालुत्व, पूज्यांचें पूजन, व मनास शुभ वाटणारें सर्व कांहीं शुभसूचक चिन्ह होय. मनाचा संतोष किंवा उत्साह हा जाणारास सर्वोत्तम शकुन आहे. घरांतून बाहेर पडतांच गाडी, घोडा, इत्यादि रिकामें वाहन पुढें येणें चांगलें. व्यंग, विरक्त, मुंड, जटिल, ठेंगू, संन्यासी, मीठ, दोरी व खोडे ( बेडी वगैरे ) हीं पुढें आल्यास परत फिरावें व वीणा, चंदन, ओली पालेभाजी, पागोटें, अलंकार आणि कुमारी यांचें प्रस्थानसमयीं अभिनंदन करावें १३३.

न तु मेहन्नदीछायावर्त्मगोष्ठाम्बुभस्मसु ।
न प्रत्यग्न्यर्कगोसोमसंध्याम्बुस्त्रीद्विजन्मनः ॥ १३४ ॥

जिच्यामधील पाणी सुकून गेलें आहे अशा नदींत, जिच्यामध्यें लोक उन्हाच्या वेळीं येऊन बसत असतात अशा छायेंत, रस्त्यावर, गाईच्या गोठ्यांत, पाण्यांत व राखेंत, मूत्रपुरीषोत्सर्ग करूं नये. त्याचप्रमाणें अग्नि, सूर्य, गाय, चंद्र, संध्यासमय, जल, व ब्राह्मण यांच्या समोर किंवा यांच्याकडे पहातही मूत्रादि त्याग करूं नये. शेण, नांगरलेली व पेरलेली भूमि, ओलें गवत, चिता, स्मशान, खळें ( जेथें कापलेले धान्य मळतात तें स्थान ) पर्वत, वाळवंट इत्यादि स्थळींही अमंगळ कर्मे करणें प्रशस्त नाहीं. पायांत जोडे घालून, मूत्रपुरीषोत्सर्ग करूं नये असेंही आपस्तंबांनीं सांगितलें आहे. देवांच्यापुढें, देवांकडे पाय पसरून बसूं नये. वर सांगितलेल्या स्थळांवाचून इतर स्थळीं यज्ञाच्या उपयोगीं न पडणारें गवत किंवा पाचोळा घालून मस्तक वस्त्रानें आच्छादित करून ब्रम्हसूत्र ( यज्ञोपवीत ) कानावर ठेवून, बसून, न बोलतां व मनांत कांहीं चिंतन न करितां मूत्रपुरीषोत्सर्ग करावा १३४.

नेक्षेतार्कं न नग्नां स्त्रीं न च संसृष्टमैथुनाम् ।
न च मूत्रं पुरीषं वा नाशुचा राहुतारकाः ॥ १३५ ॥

उदय, अस्त, ग्रहण, व मध्याह्न यावेळीं सूर्यास पाहूं नये. त्याचप्रमाणें पाण्यांतील त्याचें प्रतिबिंबही पाहूं नये. इतर वेळीं पहावयाचें झाल्यास डोळ्यापुढें वस्त्रादि धरून पहावें. नग्न परस्त्रीस पाहूं नये. संभोगावाचून इतर समयीं स्वस्त्रीसही नग्न पाहूं नये. उपभोगानंतर नग्न नसलेल्या स्त्रीसही पाहूं नये. त्याचप्रमाणें स्त्रीबरोबर एका पात्रांत जेऊं नये. ती जेवीत असतांना तिच्याकडे पाहूं नये. तसेंच ती शिंकत असतांना, जांवई देत असतांना, अस्ताव्यस्त बसलेली असतांना, डोळ्यांत काजळ घालीत असतांना, अंगास लावीत असतांना, उघडी असतांना, व प्रसूत होतांना तिच्याकडे तेजाची इच्छा करणाऱ्या द्विजानें पाहूं नये. आपलें मूत्र व विष्ठा पाहूं नये व अपवित्र असतांना ग्रहण व नक्षत्रें पाहूं नयेत. रागावलेल्या गुरूंच्या तोंडाकडे पाहूं नये. तेल, जल व मलिन आरसा यांत आपलें प्रतिबिंब पाहूं नये. कोणी विष्ठा त्याग करीत बसला असतां त्याच्याकडे, बंधनस्थानापासून सुटलेल्या हत्तीकडे, बैलांची झुंज लागली असतां त्यांच्याकडे, आणि वेडा, अमली, पतित, व्यंग, चंडाल व उष्टा मनुष्य यांकडे बुद्धिपूर्वक कधींही पाहूं नये १३५.

अयं मे वज्र इत्येवं सर्वं मन्त्रमुदीरयेत् ।
वर्षत्यप्रावृतो गच्छेत्स्वपेत्प्रत्यक्शिरा न च ॥ १३६ ॥

पाऊस पडत असतांना "अयं मे वज्रः पाप्मानमपहन्तु" हा सर्व मंत्र म्हणत उघड्या अंगानेंच खुशाल जावें. पश्चिमेकडे मस्तक करून निजूं नये. त्याचप्रमाणें शून्य गृहांत एकट्यानें व नग्न होऊन निजूं नये १३६.

ष्ठीवनासृक्शकृन्मूत्ररेतांस्यप्सु न निक्षिपेत् ।
पादौ प्रतापयेन्नाग्नौ न चैनमभिलङ्घयेत् ॥ १३७ ॥

थुंकी, रक्त, विष्ठा, मूत्र व रेत हीं पाण्यांत टाकूं नयेत. अग्नीपुढें धरून पाय शेकूं नयेत व अग्नीचें उल्लंघन करूनही जाऊं नये. शिवाय श्मशानांतील वृक्ष तोडूं नये, पाण्यांत विष, कांटे, हाडें, राख, खापऱ्या व केंस टाकूं नयेत, तोंडानें अग्नीस फुंकूं नये व त्याच्यावर पंख्यानेंही वारा घालूं नये. अग्नीच्या योगानें कोणाच्या प्राणांस बाधा होईल, असें आचरण करूं नये; त्यांत कांहीं अमंगल पदार्थ टाकूं नयेत; एकीकडचा अग्नि दुसऱ्या अग्नींत टाकूं नये. आणि जल व अग्नि यांस एकदम नेऊं नये १३७.

जलं पिबेन्नाञ्जलिना शयानं न प्रबोधयेत्
नाक्षैः क्रीडेत धर्मघ्नैर्व्याधितैश्च न संविशेत् ॥ १३८ ॥

ओंजळीनें पाणी ( किंवा दुसरें कोणतेंही पेय ) पिऊं नये. विद्या, गुण, जाती इत्यादिकांनीं आपल्याहून श्रेष्ठ असलल्या निद्रित पुरुषास झोंपेतून उठवूं नये. फाशांनीं खेळूं नये. धर्मघातक रोगी यांच्याशीं संसर्ग करूं नये. मिताक्षराकार म्हणतात–ज्वरादि रोगांनीं व्याकुळ झालेल्या मनुष्याजवळ निजूं नये. येथें खेळण्याचा जो निषेध केलेला आहे त्याचा अर्थ असा समजावा कीं तेंच व्यसन होऊन बसेल इतकें खेळूं नये व द्रव्यादि पण लावून खेळणें घातक आहे. कारण विनोदाकरितां कधीं कधीं खेळल्यास त्यांत गृहस्थास प्रत्यवाय लागत नाहीं. तसेंच पोट भरण्याकरितां नाचूं नये, गाऊं नये, वाद्ये वाजवूं नयेत, दंड थोपटूं नयेत, मोठ्यानें ओरडूं नये, व्यर्थ चेष्टा ( हातवारे ) करूं नये. खाद्य मांडीवर ठेवून खाऊं नये, व कोणत्याही गोष्टीं-विषयीं फार उत्सुक होऊं नये १३८.

विरुद्धं वर्जयेत्कर्म प्रेतधूमं नदीतरम् ।
केशभस्मतुषाङ्गारकपालेषु च संस्थितिम् ॥ १३९ ॥

देश, ग्राम, कुलाचार, आरोग्य व आयुष्य यांच्याविरुद्ध असलेलें कर्म, प्रेताचा धूर व नदींतून पोहून जाणें, हीं वर्ज्य करावींत. केंस, राख भूंस, अग्नि व खापऱ्या यांच्यावर बसूं किंवा उभे राहूं नये. कोवळें ऊन, व फुटकें आसन यांसही वर्ज करावें. नखें व केंस यांस तोडूं नये; दातांनीं नखें काढूं नयेत, नखांनीं गवताच्या काड्या खुडूं नयेत, ज्यांचा परिणाम दुःखामध्यें होणार असेल तें कर्म करूं नये. दोन्ही हात जुळून त्यांनीं डोकें खाजऊं नये, उष्टयानें डोक्यास स्पर्श करूं नये, डोक्यावरून पाणी न घेतां स्नान करूं नये, केंस धरून ओढणें व मस्तकावर प्रहार करणें हीं दोन्ही घातक कर्मे आहेत. तेल लावून डोक्यावरून स्नान केल्यावर पुनः दुसऱ्या कोणत्याही अंगास तेल लावूं नये, फुटक्या नावेंतून प्रवास करूं नये. कापूस, हाडें, भात, व इतर शुभ व अशुभ पदार्थ यांच्यावरही बसूं नये १३९.

नाचक्षीत धयन्तीं गां नाद्वारेण विशत्क्वचित् ।
न राज्ञः प्रतिगृह्णीयाल्लुब्धस्योच्छास्त्रवर्तिनः ॥ १४० ॥

दुसऱ्याचें दूध इत्यादि गाय पिऊं लागल्यास दुसऱ्यास सांगूं नये. अपरार्क म्हणतात–गाय आपल्या वासरास पाजूं लागली असतां दुसऱ्यास सांगूं नये. मुख्य द्वार टाकून आड–मार्गानें नगरांत, गावांत किंवा मंदिरांत शिरूं नये. धन असूनही तें सत्कर्मास खर्च न करणाऱ्या व शास्त्रीय मार्गास सोडून वागणाऱ्या राजापासून धनाचा प्रतिग्रह करूं नये १४०.

कारण—

प्रतिग्रहे सूनिचक्रिध्वजिवेश्यानराधिपाः ।
दुष्टा दशगुणं पूर्वात्पूर्वादेते यथाक्रमम् ॥ १४१ ॥

सूनी म्हणजें प्राणिघातक ( कसाई ), चक्री म्हणजे तेली, ध्वजी म्हणजे दारू विकणारा कलाल, वेश्या व राजा यांतील प्रतिग्रहाविषयीं पहिल्या पेक्षां पुढचा पुढचा क्रमानें दसपट अधिक दोषी असतो. पण येथें शास्त्रमार्गानें न चालणारा राजा समजावा. कारण त्याचाच प्रतिग्रह वर्ज करण्याविषयीं येथें सांगावयाचें आहे. व असें न मानल्यास १००,१३०व१४० या श्लोकांतील अर्थाशीं विरोध येईल. मनुस्मृतींतही–दहा सहस्र हिंसा करणाऱ्या कसाया इतका राजा पापी असतो; यास्तव उन्मार्गानें चालणाऱ्या व कृपण राजापासून जो प्रतिग्रह घेतो तो तामिस्रादि एकवीस नरकांत पडतो व हें जाणणारे विद्वान्, ब्रह्मवेत्ते व परलोकी परम पुरुषार्थांची इच्छा करणारे ब्राह्मण असल्या राजाचें दान घेत नाहींत— असें म्हटले आहे १४१.

आतां अध्ययनधर्म सांगतात––

अध्यायानामुपाकर्म श्रावण्यां श्रवणेन वा ।
हस्तेनौषधिभावे वा पञ्चम्यां श्रावणस्य तु ॥ १४२ ॥

अध्याय म्हणजे स्वाध्याय, ( आपला वेद ) त्यास संस्कार करणारें उपाकर्मनामक कर्म श्रावणीपौर्णिमेस श्रवण नक्षत्र असेल त्या दिवशीं किंवा हस्तयुक्त पंचमीस, भूमींत पेरलेलीं धान्यें उगवलीं असतां, आपल्या शाखेच्या गृह्यसूत्रांत सांगितलेल्या विधीनें करावें. अपरार्कांत श्रावण शुक्ल पंचमी किंवा हस्त नक्षत्र असे हे दोन भिन्न काल सांगितले आहेत. उपाकर्म याचा अर्थ––उपक्रम किंवा आरंभ––असा आहे. श्रावणांत शेतें उगवलीं नसल्यास भाद्रपदांत श्रवण नक्षत्र असेल त्या दिवशीं उपाकर्म करावें. त्यानंतर साडेचार महिने वेदाध्ययन करावें १४२.

आतां उत्सर्जन विधि सांगतात—

पौषमासस्य रोहिण्यामष्टकायामथापि वा ।
जलान्ते छन्दसां कुर्यादुत्सर्गं विधिवद्बहिः ॥ १४३ ॥

पौष महिन्यांत रोहिणी नक्षत्र असेल त्या दिवशीं किंवा कृष्ण अष्टमीस गांवाच्या बाहेर जलाजवळ यथाविधि वेदांचा उत्सर्ग करावा. उत्सर्ग म्हणजे परित्याग. उपाकर्म भाद्र-

पदांत केलें असल्यास माघ शुक्ल प्रतिपदेस उत्सर्जन करावें. त्यानंतर पक्षिणी ( म्ह० तो दिवस, ती रात्र व दुसरा दिवस ) किंवा अहोरात्र विश्रांति घेऊन शुक्ल पक्षांत वेद व कृष्ण पक्षांत अंगें म्हणावींत. अर्थात् वेदोत्सर्ग म्हणजे वेदाध्ययन सोडणें नव्हे तर उपाकर्म केल्यानंतर जसें तें एकसारखें साडे:चार महिने करण्याविषयीं सांगितलेलें आहे तसें यापुढें न करतां प्रत्येक महिन्याच्या शुक्ल पक्षांत वेदाध्ययन व कृष्ण पक्षांत व्याकरणादि अंगांचें अध्ययन करावें, असें समजावें. ( पण सांप्रत कालीं कर्मठ व वेदाध्यायी म्हणून प्रख्यात असलेल्या आपल्या महाराष्ट्रांत उपाकर्म व उत्सर्जन हे दोन्ही वेदसंस्कार प्रायः श्रावणांतच करून टाकण्याचा बऱ्याच दिवसांचा प्रघात आहे ! व वेदाध्ययनही प्रायः बाराही महिने चालतें !! यजुर्वेदी वेदाचीं अंगें म्हणतच नाहींत. पण ऋग्वेदीही तीं अनध्यायांच्या दिवशीं नुसतीं तोंडपाठ करितात. वेदांचीं व अंगांचीं केवळ अक्षरें पोपटाप्रमाणें पाठ करण्याची काहीं कारणानें संवय लागल्यामुळें व त्यांच्या अर्थज्ञानाकडे अगदीं दुर्लक्ष्य झाल्यामुळें हें असें होत असावें असा माझा तर्क आहे. ही चाल आजचीच नसून निदान पांचशें वर्षांची तरी जुनी असावी. कारण निर्णयसिंधूमध्यें व हेमाद्रीमध्येंही असें करण्याविषयीं सांगितलें आहे. ) १४३.

आतां अनध्याय सांगतात--

**त्र्यहं प्रेतेष्वनध्यायः शिष्यर्त्विग्गुरुबन्धुषु ।**
**उपाकर्मणि चोत्सर्गे स्वशाखाश्रोत्रिये तथा ॥ १४४ ॥**

याप्रमाणें अध्ययन करणाऱ्याचें-शिष्य, ऋत्विज, आचार्य व असपिण्ड आप्त-यांतील कोणी मेलें असतां; उपाकर्म व उत्सर्ग केल्यानंतर आणि आपल्या शाखेचा श्रोत्रिय ( वेदाध्यायी ) मरण पावला असतां तीन दिवस अनध्याय करावा. मनूनीं पक्षिणी किंवा अहोरात्र अनध्याय करण्याविषयीं सांगितलें आहे. यास्तव उपाकर्म व उत्सर्जन यानंतर अध्ययन करणारे व अध्यापक यांच्या इच्छेप्रमाणें व पद्धतीप्रमाणें तीन दिवस पक्षिणी किंवा अहोरात्र अनध्याय करावा. आपस्तंबादिकांनीं आणखीही कांहीं नियम सांगितले आहेत. उपाकर्मानंतर एक महिना, प्रदोष कालीं म्हणजे सूर्यास्तानंतर सहा घटिका अध्ययन करूं नये. त्याचप्रमाणें वेदार्थ सांगणारानें वर्षा व शरत् या दोन ऋतूंत स्त्रीसंभोग करूं नये. अध्यापन सांगणारानें उत्सर्जन होईतों क्षौर, मांस, श्राद्धान्न व स्त्रीसंभोग हीं वर्ज करावींत. केवल ऋतु कालीं स्त्रीसमागम करावा १४४.

**संध्यागर्जितनिर्घातभूकम्पोल्कानिपातने ।**
**समाप्य वेदं द्युनिशमारण्यकमधीत्य च ॥ १४५ ॥**

सायं व प्रातःसंध्याकालीं मेघध्वनि झाला असतां, आकाशांत उल्कांचा गडगडाट झाला असतां ( अपरार्कांत निर्घात शब्दाचा अर्थ-संध्याकालानंतर मेघध्वनि-असा केला आहे) भूकंप झाला असतां व उल्कापात झाला असतां वेदाध्ययन समाप्त करून व आरण्यकांतील वेदभाग म्हणून अहोरात्र अनध्याय करावा १४५.

पञ्चदश्यां चतुर्दश्यामष्टम्यां राहुसूतके ।
ऋतुसंधिषु भुक्त्वा वा श्राद्धिकं प्रतिगृह्य वा ॥ १४६ ॥

शुक्ल व कृष्ण पक्षाच्या पंचदशीस ( अर्थात् पौर्णिमा व अमावास्या या तिथींस ) चतुर्दशीस व अष्टमीस आणि चंद्रसूर्य ग्रहणाचें सूतक असतांना, वसंतादि ऋतूंच्या संधिसमयीं, श्राद्धाचें अन्न खाऊन किंवा शास्त्रीय प्रतिग्रह घेऊन अहोरात्र अनध्याय करावा. ग्रहण व राजाचें सूतक आलें असतां तीन दिवस अनध्याय करावा असें जें सांगितलें आहे तें खग्रास ग्रहणाविषयीं होय असें समजावें व " श्राद्धिकं " याचा अर्थ एकोद्दिष्ट श्राद्धास सोडून इतर श्राद्धाचें पक्क अन्न खाल्लें असतां व अपक्क अन्नादि घेतलें असतां असा समजावा. कारण एकोद्दिष्ट श्राद्धाचें अन्नादि घेतलें असतां तीन दिवस अनध्याय करण्याविषयीं सांगितलें आहे. आश्विन शुक्ल नवमी, कार्तिक शुक्ल द्वादशी, भाद्रपद कृष्ण पक्षांत भरणी नक्षत्र तो दिवस, वैशाख शुक्ल तृतीया व माघ शुक्ल सप्तमी या दिवशीं अनध्याय करावा. प्रतिपदेचा अनध्याय करण्याविषयींही शातातपांनीं सांगितलें आहे १४६.

पशुमण्डूकनकुलश्वाहिमार्जारमूषकैः ।
कृतेऽन्तरे त्वहोरात्रं शक्रपाते तथोच्छ्रये ॥ १४७ ॥

पशु, बेडूक, मुंगूस, कुत्रा, सर्प, मांजर व उंदिर यांतील एकादा प्राणी अध्यापक व शिष्य यांच्या मधून गेल्यास अहोरात्र अनध्याय करावा. त्याचप्रमाणें इंद्रध्वज उभारणें हीं कर्में ज्या दिवशीं होतात त्यादिवशीं म्हणजे भाद्रपद शुक्ल द्वादशीस व कृष्णपक्षांत भरणी असेल त्या दिवशीं वर सांगितल्याप्रमाणें अनध्याय करावा. पण येथील अहोरात्र शब्दाचा अर्थ वरील निमित्तांतील एकादें निमित्त झालें असतां त्यावेळेपासून दुसऱ्यादिवशीं सूर्योदय होईपर्यंत असा समजावा. प्रथम अध्ययनसमयीं कुत्रें, मुंगूस इत्यादि मधून गेल्यास तीन दिवस उपवास व प्रवास करावा १४७.

श्वक्रोष्टुगर्दभोलूकसामबाणार्तनिःस्वने ।
अमेध्यशवशूद्रान्त्यश्मशानपतितान्तिके ॥ १४८ ॥

कुत्रा, कोल्हा, गाढव, घुबड, साम, वेळु व दुःखित प्राणी यांचा ध्वनि झाला असतां व अपवित्र पदार्थ, प्रेत, शूद्र, चांडाल, श्मशान व पतित यांच्याजवळ, त्याचप्रमाणें—

देशेऽशुचावात्मनि च विद्युत्स्तनितसंप्लवे ।
भुक्त्वार्द्रपाणिरम्भोन्तरर्धरात्रेऽतिमारुते ॥ १४९ ॥

पांसुवर्षे दिशां दाहे संध्यानीहारभीतिषु ।
धावतः पूतिगन्धे च शिष्टे च गृहमागते ॥ १५० ॥

खरोष्ट्रयानहस्त्यश्वनौवृक्षेरिणरोहिणे ।
सप्तत्रिंशदनध्यायानेतांस्तात्कालिकान्विदुः ॥ १५१ ॥

अपवित्र प्रदेशीं, स्वतः अध्ययन कर्ता अशुचि असतांना, पुनः पुनः वांज होऊं लागली असतां, वारंवार मेघगर्जना होत असतांना, भोजनानंतर हात ओले असत तों, जलामध्यें, महानिशासंज्ञक रात्रीच्या मधल्या दोनप्रहरीं, दिवसाही सोंसाटयाचा वायु वहात असेपर्यंत, धुळीचा वर्षाव होणें हा उत्पात झाला असतां, दिशा जळत आहेत असें दिसत असतांना, दोन्ही संध्यासमयीं, धुकें पडलें असतां, चोर, राजे यांचें भय असतां, अपवित्र दुर्गंध येत असतांना, कोणी शिष्ट घरीं आला असतांना, गाढव, उंट, रथादि वाहन, हत्ती, घोडा, नौका, वृक्ष व माळ भूमि, यांच्यावर आरोहण केलें असतां अध्ययन करूं नये. म्हणजे त्या त्या कालापुरते हे सदतीस अनध्याय आहेत असें मुनि समजतात. त्याचप्रमाणें गाईचा ध्वनि ऐकूं येत असतांना, निजून, मांडीवर पाय चढवून, मांस खाऊन, सुतक्याचें अन्न खाऊन व जेठा मारून बसून अध्ययन करूं नये. हे अनध्याय म्हणजे ब्राम्हणांचीं छिद्रेंच होत. यास्तव जो ब्राम्हण अशा प्रसंगीं अध्ययय करितो त्याचें ज्ञान, आयुष्य, प्रजा, पशु, बुद्धि व पुण्य हीं नष्ट होतात. सर्व अनध्यायांत अपवित्र प्रदेश व अपवित्र अध्येता हे दोन मुख्य आहेत १४८–१५१.

याप्रमाणें प्रसंगोपात्त अनध्याय सांगून आतां प्रकृत विषय पुढें चालवितात—

देवर्त्विक्स्नातकाचार्यराज्ञां छायां परस्त्रियाः ॥
नाक्रामेद्रक्तविण्मूत्रष्ठीवनोद्वर्तनादि च ॥ १५२ ॥

देवाची मूर्ति, ऋत्विज, स्नातक, आचार्य, राजा व परस्त्री यांच्या छायेचें व तसेंच रक्त, विष्ठा, मूत्र, थुंकी व अंगास लावावयाचीं उटणें यांचें बुद्धिपूर्वक उल्लंघन करूं नये. कपिलवर्ण मुंगुसासारख्या रंगाच्या पशुचेंही उल्लंघन करूं नये, असें मनु सांगतात. नपुंसक, पतित, चांडाल, शत्रु व सतत रोगी यांस आपली छाया ओलांडूं देऊं नये, असें यम म्हणतात. दीक्षितांच्या छायेचेंही आक्रमण करणें प्रशस्त नव्हे. मध्यान्हीं, रात्रीं, मांसयुक्त श्राद्धान्न खाऊन व दोन्ही संध्याकाळीं चव्हाटयावर बसूं नये. वैरी, त्याचे सहाय, अधार्मिक, चोर व परस्त्री यांचें सेवन ( संगति ) करूं नये. उद्धट व कपटी लोकांजवळ बसूंही नये १५२.

विप्रा हि क्षत्रियात्मानो नावज्ञेयाः कथंचन ।
आमृत्योः श्रियमाकांक्षेन्न कंचिन्मर्मणि स्पृशेत् ॥ १५३ ॥

बहुश्रुत ब्राह्मण, सर्प व क्षत्रिय, यांचा आणि त्याचप्रमाणे आपलाच आपण अपमान करूं नये. ( " मला धिक्कार असो; माझा जन्म व्यर्थ होय यापेक्षां मी मेलों असतों तर बरें झालें असतें " इत्यादि प्रकारें आपला अपमान करूं नये. ) मनु म्हणतात–दरिद्री पुरुषांचाही अपमान करूं नये. यावज्जीव द्रव्य मिळविण्याची इच्छा करावी. म्हणजे लक्ष्मी दुर्लभ आहे, असें समजून तिच्या प्राप्तीचे उपाय सोडूं नयेत. शत्रु, मित्र व उदासीन यांतील कोणाचाही शब्दांनीं मर्मच्छेद करूं नये. १५३.

दूरादुच्छिष्टविण्मूत्रपादाम्भांसि समुत्सृजेत् ।
श्रुतिस्मृत्युदितं सम्यङ्नित्यमाचारमाचरेत् ॥ १५४ ॥

उष्टें अन्न व पानें, पत्रावळी इत्यादि, विष्ठा, मूत्र व पाय धुतलेलें जल हीं घरापासून दूर अंतरावर टाकावींत. श्रुतीनें व स्मृतीनें सांगितलेला आचार नित्य व उत्तम प्रकारें करावा. आचार म्हणजे लौकिक कर्मसंबंधीं व पुरुषार्थांच्या उपयोगी असणारा शास्त्रीय विधि किंवा प्रतिषेध. हा आचार अनेक प्रकारचा आहे व तो वेद आणि स्मृत्या यांवरूनच समजून घेतला पाहिजे. अपरार्कांत त्याचीं अनेक उदाहरणें दिलीं आहेत. पण विस्तार होईल म्हणून मी तीं येथें देत नाहीं. पण अशा प्रकारचा आचार ठेवणें फार लाभदायक आहे. कारण मनूंनीं त्याची अशी प्रशंसा केली आहे. आचारामुळें दीर्घ आयुष्य, मनासारखी संतति, व अक्षय धन यांची प्राप्ति होते. आचाराच्या योगामें दुष्ट लक्षण नाहींसें होतें. दुराचरणी पुरुषाची लोकांत निंदा होते.त्यास दुःख भोगावें लागतें व तो रोगी आणि अल्पायु होतो इत्यादि १५४.

गोब्राह्मणानलान्नानि नोच्छिष्टो न पदा स्पृशेत् ।
न निन्दाताडने कुर्यात्पुत्रं शिष्यं च ताडयेत् ॥ १५५ ॥

गाय, ब्राम्हण, अग्नि व अन्न यांस उच्छिष्ट म्हणजे अशुचि असतांना स्पर्श करूं नये. व अशुचि नसतांनाही पायानें स्पर्श करूं नये. पण चुकीनें पाय लागल्यास आचमन करून मस्तकापासून नाभीपर्यंत सर्व इंद्रियद्वारांस जल लावावें. त्याचप्रमाणे कोणाची निंदा करूं नये व कोणास ताडन करूं नये. पुत्र व शिष्य यांस शिक्षणाकरितां ताडन करावें. प्रसंगीं सेवकास ताडन केले तरी चालेल पण दोरीनें किंवा बारिक कामटीनें पाठीवर ताडन करावें. डोक्यावर व उरावर करूं नये १५५.

कर्मणा मनसा वाचा यत्नाद्धर्मं समाचरेत् ।
अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्म्यमप्याचरेन्न तु ॥ १५६ ॥

शरीर, मन व वाणी यांच्या योगानें जो धर्म करावयाचा तो मोठ्या प्रयत्नानें म्हणजे मोठ्या आदरानें करावा. तपश्चर्या, यागदानादि व वेदाध्ययन हीं त्या त्रिविध धर्माचीं क्रमानें उदाहरणें आहेत. मिताक्षराकारांनीं कर्मणा इत्यादि श्लोकार्धाचा अर्थ असा केला आहे. कर्मणा म्हणजे शरीरानें यथाशक्ति धर्मानुष्ठान करावें. मनानें त्याचेंच ध्यान करावें. व वाणीनें त्याचाच उच्चार करावा. स्वर्ग न देणारें व लोकांनीं निन्द्य मानलेलें धर्मकृत्यही म्हणजे शास्त्रविहित कर्मही करूं नये. उदाहरणार्थ—मधुपर्कांतील गोवध, विधवानियोग, ब्राह्मण व शूद्र स्त्री यांचा विवाह हीं जरी शास्त्रविहित असलीं तरी लौकिकांत त्याची निन्दा होत असते. व त्यापासून अग्निष्टोम यज्ञांतील पशुवधाप्रमाणें स्वर्गही मिळत नाहीं. कारण त्यांचें केवल ऐहिक फल आहे ( कलियुगांत गोवधादिकांचा निषेधच आहे ) १५६.

मातृपित्रतिथिभ्रातृजामिसंबन्धिमातुलैः ।
वृद्धबालातुराचार्यवैद्यसंश्रितबान्धवैः ॥ १५७ ॥
ऋत्विक्पुरोहितापत्यभार्यादाससनाभिभिः ॥
विवादं वर्जयित्वा तु सर्वाँल्लोकाञ्जयेद्गृही ॥ १५८ ॥

माता, पिता, वाटसरू, अतिथि, सावत्र व चुलतभाऊ, भगिनी, भावजय इत्यादि स्ववासिनी स्त्रिया, ज्यांच्याशीं शरीरसंबंध केला आहे असे संबंधी, मामा, सोळा वर्षांच्या आंतील बालक, सत्तरवर्षांचा वृद्ध, रोगी, आचार्य, वैद्य, आश्रित, पित्याकडील व मातेकडील नातेवाईक, ऋत्विक्, पुरोहित, पुत्र, कन्या इत्यादि अपत्यें, भार्या, दास ( चाकर ) व सख्खे भाऊ किंवा सापिण्डांतील लोक यांच्यांशीं वाक्कलह सोडल्यानें प्राजापत्यादि सर्व लोक प्राप्त होतात. मनुस्मृतींत—यांच्याशीं कलह न करणारा गृहस्थ सर्व पापापासून मुक्त होऊन ब्राह्मादि लोकांस प्राप्त होतो—असें म्हटलें आहे. व कोणांशीं न भांडल्यानें कोणता लोक मिळतो हेंही सांगितलें आहे १५७, १५८ .

पञ्च पिण्डाननुद्धृत्य न स्नायात्परवारिषु ।
स्नायान्नदीदेवखातह्रदप्रस्रवणेषु च ॥ १५९ ॥

दुसऱ्याच्या जलाशयांतील पांच गोळे माती किंवा चिखल बाहेर काढल्याशिवाय त्यांत स्नान करूं नये. " सर्व लोकांच्या उपयोगाकरितां मी हीं विहिर किंवा तळें अर्पण केलें आहे " असें म्हणून पूर्त विधीनें ज्या जलाशयाचा उत्सर्ग केलेला नसतो अशा दुसऱ्याच्या जलाशयांतील जलास " परवारि " म्हणतात. अशा जलाशयांत स्नान करितांना पांच गोळे माती काढावी. अर्थात् सार्वजनिक उपयोगाकरितां समर्पण केलेल्या जलाशयांत स्नान करावयाचें झाल्यास त्यांतून माती काढून टाकण्याचें कारण नाहीं. त्याचप्रमाणें ज्याचें तें जल असेल त्यास विचारून स्नान केल्यासही माती काढून टाकावयास नको. नदी, देवखात, ह्रद व प्रस्रवण यांमध्यें माती वगैरे न काढतांच नित्य स्नान करावें. साक्षात् किंवा दुसऱ्या जलप्रवाहास मिळून समुद्रास जाऊन पोंचणाऱ्या चलप्रवाहास नदी; मनुष्याच्या प्रयत्नावांचून अनंत कालापासून आपोआप तयार होऊन राहिलेल्या अर्थात् देवनिर्मित सरोवरास देवखात; उदकाच्या प्रवाहाचा आघात होऊन आपोआप तयार झालेल्या जलयुक्त अतिखोल प्रदेशास ह्रद व पर्वतादि उंच प्रदेशावरून खालीं वाहणाऱ्या जलास प्रस्रवण म्हणतात. विहिरींतून ओढून काढलेल्या पाण्यापेक्षां भूमीवरील पाणी स्नान, आचमन इत्यादिकांस चांगलें. त्याच्यापेक्षां प्रस्रवण—जल चांगलें; प्रस्रवणजलाहून सरोवराचें जल प्रशस्त; सरोवराहून नदीचें जल पुण्यदायक; नदीपेक्षां तीर्थजल उत्तम व सर्वांत गंगेचें जल अधिक पुण्यकर होय. अतिमनोहर व विपुल जल असतांना तें सोडून अल्पजलांत स्नानादि करूं नये. नदीस सोडून विहिरीवर स्नान करणें अप्रशस्त होय. वर पांच पिंड माती काढून परकीय जलांत स्नान

करावें, असें जें सांगितलें आहे तें नित्य स्नानाविषयींच समजावें. शौचादिकांकरितां परकीय जल घेतलें असतां माती काढण्याचें कारण नाहीं १५९.

परशय्यासनोद्यानगृहयानानि वर्जयेत् ।
अदत्तान्यग्निहीनस्य नान्नमद्यादनापदि ॥१६०॥

दुसऱ्याची शय्या, आसन, बाग, गृह व रथादि वाहनें यांचा धन्याच्या आज्ञेवाचून उपभोग घेऊं नये. आतां हें प्रकरण संपेपर्यंत अभोज्य ( म्हणजे भोजन करण्यास अयोग्य ) अन्न कोणतें तें " अग्निहीनस्य० " येथपासून सांगतात—ज्याला श्रौत व स्मार्त अग्नि ठेवण्याचा अधिकार नाहीं अशा शूद्रादिकांपासून व अधिकार असूनही ज्यानें अग्नि ठेविला नाहीं अशा द्विजापासूनही आपत्काल नसतांना प्रतिग्रह घेऊं नये व त्याचें अन्न खाऊं नये १६०.

कदर्यबद्धचोराणां क्लीबरङ्गावतारिणाम् ।
वैणाभिशस्तवार्धुष्यगणिकागणदीक्षिणाम् ॥ १६१ ॥

कदर्य म्हणजे लुब्ध. लोभानें जवळ असलेल्या धनाचाही उपभोग न घेणारा. "स्वतःस, धर्मास आणि पुत्र, स्त्री, माता, पिता व सेवक यांस लोभानें जो पीडा देतो तो कदर्य होय" असें त्याचें लक्षण सांगितलें आहे. बद्ध, वाणींनें किंवा दोऱ्या, बेड्या इत्यादिकांनीं प्रतिबंध केलेला, चोर, नपुंसक, नट, मल्ल इत्यादि रंगस्थानीं जाणारा, वेळू कापून किंवा त्याच्या कामट्या करून त्यावर निर्वाह करणारा, पापकर्मांनीं युक्त असलेला, निषिद्ध व्याजावर निर्वाह करणारा, वेश्या व अनेकांचा यज्ञ करणारा, यांचें अन्न खाऊं नये. अपरार्कांत गण व दीक्षी असें दोन शब्द मानून गण म्हणजे संघ, समुदाय व दीक्षी म्हणजे यज्ञादिकांची दीक्षा घेतलेला असें म्हटलें आहे १६१.

चिकित्सकातुरक्रुद्धपुंश्चलीमत्तविद्विषाम् ।
क्रूरोग्रपतितव्रात्यदाम्भिकोच्छिष्टभोजिनाम् ॥ १६२ ॥

वैद्यवृत्तीवर निर्वाह करणारा, महारोगी, (वात, अश्मरी, कुष्ठ, मेह, उदर, भगंदर व अर्शस् म्हणजे मूळव्याध हे आठ महारोग होत ) रागावलेला, व्यभिचारिणी स्त्री, विद्या, धन इत्यादिकांनीं गर्वित झालेला, शत्रु, क्रूर ( मनांत दृढ कोप धरणारा ), उग्र ( वाणी व शरीर यांच्या व्यापारानें उद्वेग उत्पन्न करणारा ), दुसऱ्यांस दुःख देण्यांत पटु किंवा क्षत्रियापासून शूद्रस्त्रीच्या ठायीं उत्पन्न झालेला, ब्रह्महत्यादि महापापें करणारा, ३८ व्या श्लोकांत सांगितलेला व्रात्य, दांभिक व उच्छिष्ट भोजन करणारा यांचें अन्न वर्ज करावें १६२.

अवीरास्त्रीस्वर्णकारस्त्रीजितग्रामयाजिनाम् ।
शस्त्रविक्रयकर्मारतन्तुवायश्ववृत्तिनाम् ॥ १६३ ॥

पतिपुत्ररहित स्वतंत्र, स्त्री, सोनार, स्त्रीच्या अधीन रहाणारा, ग्रामयाजक ( जोशी किंवा ग्रामोपाध्याय ) शस्त्रें विकणारा, लोहार, सुतार इत्यादि कारागीर, शिंपी व सेवा करणारा, यांचेंही अन्न भक्षण करूं नये १६३.

नृशंसराजरजककृतघ्नवधजीविनाम् ।
चैलधावसुराजीवसहोपपतिवेश्मनाम् ॥ १६४ ॥
पिशुनानृतिनोश्चैव तथा चाक्रिकबन्दिनाम् ।
एषामन्नं न भोक्तव्यं सोमविक्रयिणस्तथा ॥ १६५ ॥

निर्दय राजा, राजाचा पुरोहित, रंगारी, केलेले उपकार विसरणारा, प्राण्यांस मारून त्याच्यावर निर्वाह करणारा, वस्त्रें धुणारा ( परीट ), मद्य विकणारा, ज्याच्या घरांत स्वभार्येचा जार आहे, दुसऱ्याचे दोष प्रसिद्ध करणारा, मिथ्याभाषण करणारा, तेली किंवा गाडीवान, स्तुतिपाठक ( भाट ) व त्याचप्रमाणें सोमरस विकणारा यांचें अन्न अभोज्य होय. १६१ व्या श्लोकापासून कदर्यादि जे जे सांगितलेले आहेत ते सर्व द्विज समजावेत. कारण जे द्विज नाहींत अशा कदर्यादिकांचें अन्न अभोज्य आहेच. त्याकरितां निराळा निषेध करण्याचें कारण नाहीं १६४, १६५.

शूद्रेषु दासगोपालकुलमित्रार्धसीरिणः ।
भोज्यान्ना नापिताश्चैव यश्चात्मानं निवेदयेत् ॥ १६६ ॥

दासीच्या उदरीं जन्मलेला गर्भदास, गायींस राखणारा, पिता-पितामह यांच्यापासून मित्र असलेला कुलमित्र, शेतीच्या उत्पन्नाचा भागीदार, न्हावी व गृहांतील कामें करणारा किंवा " मी तुमचा आहें " असें म्हणून आत्मनिवेदन करणारा इतके हे शूद्रांतील भोज्यान्न आहेत. म्हणजे यांचें अन्न खाण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. यांतच कुंभाराचीहि गणना करावी.

इति स्नातकधर्मप्रकरणम् ६.

---

# अथ भक्ष्याभक्ष्यप्रकरणम् ७.



१२९ व्या श्लोकापासून ब्राह्मणाचीं स्नातकव्रतें सांगून आतां द्विजांचे धर्म सांगतात:—

अनर्चितं वृथामांसं केशकीटसमन्वितम् ।
शुक्तं पर्युषितोच्छिष्टं श्वस्पृष्टं पतितेक्षितम् ॥ १६७ ॥
उदक्या स्पृष्टसंघुष्टं पर्यायान्नं च वर्जयेत् ।
गोघ्रातं शकुनोच्छिष्टं पदास्पृष्टं च कामतः ॥ १६८ ॥

पूजनास ( सत्कारास ) योग्य असलेल्या पुरुषास अवज्ञेनें दिलेलें अन्न, देवादिकांस अर्पण न केलेलें व केवळ आपल्या उदरभरणार्थ तयार केलेलें, मांस, केंस, किडे यांनीं युक्त असलेलें व दह्यावाचून स्वतः आंबट नसतांना दुसरा पदार्थ त्यांत पडल्यामुळें किंवा कांहीं काल राहिल्यामुळें आंबणारे पदार्थहि खाऊं नयेत. शिळें, खाऊन झाल्यावर पानांत राहिलेलें, कुत्र्यानें किंवा कावळा इत्यादिकांनीं ज्यास स्पर्श केला आहे; पतितादिकांनीं पाहिलेलें, विटाळशी, चांडाळ इत्यादिकांनीं ज्यास स्पर्श केला आहे, " कोणास खावयास हवें असलें तर हें घ्यारे बाबा " असें ओरडून दिलेलें व आदित्यवारीं एकाचें, सोमवारीं दुसऱ्याचें अशा पर्यायानें प्राप्त होणारें अन्न, ( मिताक्षरेंत–ब्राह्मणाचें अन्न शूद्रानें देणें किंवा शूद्राचें अन्न ब्राह्मणानें देणें–हेंच पर्यायान्न होय असें म्हटलें आहे. ) किंवा पर्याचान्त असा पाठ घेतल्यास गुळणी केल्यानंतर आचमनापूर्वी भोजन करूं नये, असा त्याचा अर्थ होतो व पार्श्वाचान्त असा पाठ घेतल्यास एका पंक्तींतील जवळच्या भोजन करणारानें आपोशन घेतल्यावर भोजन करूं नये असा अर्थ करावा. गाईनें ज्याचा वास घेतला आहे, कावळा इत्यादि पक्ष्यांचें उष्टें व बुद्धिपूर्वक ज्यास कोणी पाय लाविला आहे, असें अन्न खाऊं नये १६७,१६८.

शिळें अन्न खाऊं नये असें वर म्हटलें आहे. पण त्यांतील कोणतें खाल्लें तरी चालेल तें सांगतात.—

अन्नं पर्युषितं भोज्यं स्नेहाक्तं चिरसंस्थितम् ।
अस्नेहा अपि गोधूमयवगोरसविक्रियाः ॥ १६९ ॥

तुपांत तळलेलें अन्न ( अर्थात् पुऱ्या इत्यादि ) कांहीं काल गेल्यावर खाल्लें तरी चालेल. त्याचप्रमाणें गहूं, जवस व गोरस यांचे विकार तुपांत तळलेलें नसले तरी कांहीं कालानंतर खाण्यास प्रत्यवाय नाहीं. पण त्यांस वास किंवा बुरा आलेला नसावा. चपात्या, भाकरी, खवा पेढे, लाडू, वगैरे पदार्थ शिळे झाले तरी खराब झालेले नसल्यास खावे. असा याचा भावार्थ समजावा १६९.

संधिन्यनिर्दशावत्सागोपयः परिवर्जयेत् ।
औष्ट्रमैकशफं स्त्रैणमारण्यकमथाविकम् ॥ १७० ॥

ज्या गायीचा बैलाशी समागम होतो तिला संधिनी म्हणतात. किंवा जिचें एकवेळ सोडून दुसऱ्या वेळीं दूध काढितात अथवा जिला पान्हावण्याकरितां दुसरें वासरूं खालीं सोडतात तिला संधिनी म्हणावें. जिला विऊन दहा दिवस झाले नाहींत ती अनिर्दशा, जिचें वासरूं मेलें आहे ती अवत्सा, ( जिच्या स्तनांतून दुधाच्या धारा आपोआप पडतात व जिला दोन वासरें झालीं आहेत ) अशा गायीचें दूध पिऊं नये. सुवेर फिटण्याच्या पूर्वी म्हशीचें व बकरीचेंही दूध प्रशस्त नाहीं. घोडी, गाढवी, उंटीण, स्त्री, अरण्यांतील हरिणी इत्यादि पशुस्त्रिया, व मेंढी यांचें दूध वर्ज करावें. येथें जरी केवल दुधाचा निषेध केलेला असला तरी त्यांच्याबरोबर त्या दुधाच्या दहीं, लोणी, खरवस इत्यादि विकारांचाही निषेध

समजावा. स्त्री या शब्दावरून मनुष्यस्त्रीचें ग्रहण करून बकरी वांचून इतर सर्व दोन स्तनांच्या स्त्रियांचें दूध वर्ज आहे असें समजावें. उंट, घोडा, गाढव, मेंढी यांचें दूधच नव्हे तर मूत्र, शेण हीं सुद्धां सदा वर्ज करावींत. गाई, म्हशी यांचें शेण व मूत्र वर्ज नाहींत.

**देवतार्थं हविः शिग्रुं लोहितान्व्रश्चनांस्तथा ।**
**अनुपाकृतमांसानि विड्जानि कवकानि च ॥ १७१ ॥**

देवांस समर्पण करण्याकरितां तयार केलेलें अन्न समर्पण करण्याच्या पूर्वी अभक्ष्य आहे. तसेंच होम करण्याकरितां तयार केलेलें हवि होमापूर्वी अभक्ष्य समजावें. अथवा "देवतार्थं हविः " म्हणजे देवांस उद्देशून द्यावयाचा हवि समर्पण करीपर्यंत अभक्ष्य आहे; असें समजावें. शेवगा, लाल चीक, व वृक्षास तोडल्यामुळें त्या छेदेकरून निघालेले लाल नसलेलेही चीक, यज्ञामध्यें ज्याचें हवन केलें नाहीं असें पशूचें मांस, मनुष्यादिकांच्या विष्टेपासून झालेल्या तांदळजासारख्या भाज्या व छत्र्या हीं वर्ज करावींत. हिंग व कापूर हे जरी चीकच आहेत तरी ते अनिषिद्ध समजावे १७१.

**क्रव्यादपक्षिदात्यूहशुकप्रतुदटिट्टिभान् ।**
**सारसैकशफान्हंसान्सर्वांश्च ग्रामवासिनः ॥ १७२ ॥**

गृध्रादि—अपक्व मांस खाणारे पक्षी, चातक, पोपट, चोंचीनें तोडून खाणारे श्येनादि पक्षी, टिटवी, सारस, घोडा, गाढव, हंस व पारव्यासारिखे सर्व ग्रामवासी पक्षी अभक्ष्य होत १७२.

**क्रोयष्टिप्लवचक्राह्वबलाकाबकविष्किरान् ।**
**वृथाकृसरसंयावपायसापूपशष्कुलीः ॥ १७३ ॥**

क्रौंचपक्षी, पाणकोंबडा, चक्रवाक, बलाका, बगळा व नखांनीं उकरून खाणारे चकोरादि पक्षी वर्ज आहेत. लावापक्षी व मोर हे भक्ष्य असून गांवकोंबडा निषिद्ध आहे. देवता, पितर व अतिथि यांच्याकरितां तयार न केलेली खिचडी, क्षीर, गुड व घृत इत्यादिकांच्या योगानें केलेला गव्हाचा शिरा, दुधांत शिजविलेला भात म्हणजेच तांदुळाची खीर, पुऱ्या, अनरसे, करंज्या इत्यादि अभक्ष्य होत. ' आपल्याच पोटाची भरती करण्याकरितां अन्न शिजवूं नये. ' असें एकदां वर ( श्लोक १०४ ) मध्यें सांगितलें असतांना येथें पुनरपि कृसरादिकांचा निषेध करून हे पदार्थ आपल्या जिव्हेच्या तृप्तीकरितांच तयार केल्यास अधिक प्रायश्चित्त सुचविलें आहे १७३.

**कलविंकं सकाकोलं कुररं रज्जुदालकान् ।**
**जालपादान्खञ्जरीटानज्ञातांश्च मृगद्विजान् ॥ १७४ ॥**

चिमणी, डोमकावळा, कुरर, सुतारपक्षी, बदकांसारिखे पक्षी (ज्याचे पाय जाळ्यासारिखे असतात ) व खंजन पक्षी आणि अप्रसिद्ध पशु व पक्षी वर्ज करावेत. वर ग्राम्य पशुपक्ष्यांचा

निषेध केला आहे खरा; पण चिमणी हा प्राणी ग्रामांत व अरण्यांतही असतो म्हणून येथें त्याचा निषेध केला आहे १७४.

चाषांश्च रक्तपादांश्च सौनं वल्लूरमेव च ।
मत्स्यांश्च कामतो जग्ध्वा सोपवासस्त्र्यहं वसेत् ॥ १७५ ॥

चाष,कादंब इत्यादि लालपायांचे पक्षी, हिंसास्थानचें ( कसाईखान्यांतील ) मांस, सुकलेलें मांस व मासे, यांस वर्ज करावें. ( वांगीं, राळे, कुसुंबा, अकालीं झालेलीं फळें व फुलें, विकार उत्पन्न करणारा प्रत्येक पदार्थ, वड, पिंपरी, अश्वत्थ, कवठ, नींपें व महाळुंगी यांचीं फळें इत्यादि अन्य स्मृतींत निषिद्ध मानलेले पदार्थही वर्ज करावेत. ) १७० व्या श्लोकापासून येथपर्यंत सांगितलेले पदार्थ बुद्धिपूर्वक व कामतः ( इच्छापूर्वक ) खाल्ल्यास तीन दिवस उपवास करावा. व कामतः न खाल्ल्यास एक दिवस उपवास करावा. " बकादि पक्ष्यांचें मांस खाल्ल्यास बारा दिवस उपवास करावा " असें जें शंखस्मृतींत सांगितलें आहे तें दीर्घ काल बुद्धिपूर्वक खात राहिल्यास त्याकरितां आहे, असें समजावें १७५.

पलाण्डुं विड्वराहं च छत्राकं ग्रामकुक्कुटम् ।
लशुनं गृञ्जनं चैव जग्ध्वा चान्द्रायणं चरेत् ॥ १७६ ॥

कांदा, गांवांतील डुकर, छत्री, गांवांतील कोंबडें, लसूण व लाल गाजर हे सहा पदार्थ स्वेच्छेनें एकदां खाल्ल्यास चांद्रायण करावें. चांद्रायण कसें करावयाचें तें पुढें ( ३ ऱ्या अध्यायांत ) सांगतील. गांवकोंबडें व छत्री यांचा निषेध वर एकदां केलेला आहे. तरी पण कांदा, लसूण इत्यादिकांच्या बरोबरीनें त्याचें प्रायश्चित्त केलें पाहिजे असें सुचविण्याकरितां पुनः निर्देश केला आहे. " हे पदार्थ बुद्धिपूर्वक दीर्घकाल खात राहिल्यास द्विज पतित होतो " असें मनुस्मृतींत सांगितलें आहे. अर्थात् अशा प्रसंगीं सुरापानप्रायश्चित्त केलें पाहिजे. पण ते अबुद्धिपूर्वक दीर्घकाल खाल्ल्यास कृच्छ्रसांतपन अथवा यतिचांद्रायण प्रायश्चित्त करावें. अशा प्रसंगीं बारा दिवस दूध प्यावें, असें शंखानें सांगितलें आहे १७६.

भक्ष्याः पञ्चनखाः सेधागोधाकच्छपशल्लकाः ।
शशश्च मत्स्येष्वपि हि सिंहतुंडिकरोहिताः ॥ १७७ ॥
तथा पाठीनराजीवसशल्काश्च द्विजातिभिः ।
अतः शृणुध्वं मांसस्य विधिं भक्षणवर्जिते ॥ १७८ ॥

कुत्रें, मांजर, वानर इत्यादि पांच नखांच्या प्राण्यांतील सेधा म्हणजे साळशिंदर, गोधा म्हणजे घोरपड, कासव, शल्की व ससा हे पांच प्राणी खावेत. गेंडाही भक्ष्य आहे. त्याचप्रमाणें माशांतील सिंहतुण्डादिक मासे भक्ष्य आहेत. ज्याचें तोंड सिंहाप्रमाणें असतें त्या माशास सिंहतुण्डक, जो लाल असतो त्यास रोहित, आणि चंद्रक व पद्मवर्ण माशांस क्रमानें पाठीन व राजीव म्हणतात. शिंपांच्या आकारानें असणाऱ्या माशांस सशल्क

म्हणावें. हें सिंहतुण्डादिक मासे कव्य हव्यामध्येंच भक्ष्य आहेत व तेही कलियुगांत वर्ज समजावे. १६७ व्या श्लोकापासून येथपर्यंत द्विजांच्या मांसाशनाविषयीं नियम सांगून आतां येथून प्रकरण समाप्त होईतों चारी वर्णांच्या लोकांचे धर्म सांगतात. अहो सामश्रवःप्रभृति मुनींनो, आतां येथून पुढें प्रोक्षितादि मांसाचा भक्षणविधि व तादितर मांसाचा निषेध सांगतों ऐका १७७, १७८.

अगोदर भक्षणविधि सांगतात—

**प्राणात्यये तथा श्राद्धे प्रोक्षितं द्विजकाम्यया ।**
**देवान्पितॄन्समभ्यर्च्य खादन्मांसं न दोषभाक् ॥१७९॥**

अन्न न मिळाल्यामुळें प्राण जाण्याचा प्रसंग आल्यास मांस भक्षण करावें. तसेंच एखाद्या रोगावर मांस हेंच औषध असल्यास व त्यावांचून प्राण रक्षण होणें अशक्य झाल्यास मांस खाऊन प्राण वांचवावे. कारण जीवसंरक्षण हा परमधर्म आहे. त्याचप्रमाणें श्राद्धामध्यें निमंत्रण घेतलेल्या ब्राह्मणानें नियमानें मांस भक्षण करावें. [ कलियुगांत हें निषिद्ध आहे. ] प्रोक्षण हा एक श्रुतिप्रोक्त संस्कार आहे. त्या संस्कारानें संस्कृत केलेल्या यज्ञोपयोगी पशूचें होम केल्यावर राहिलेलें मांस भक्ष्य आहे. कारण तें न खाल्यास यागाचीच निष्पत्ति होत नाहीं. ब्राह्मणाच्या इच्छेनें त्याच्या भोजनार्थ किंवा देव व पितर यांच्याकरितां तयार केलेलें मांस त्यांस अर्पण करून त्यांतून राहिलेलें मांस खाणारा यजमान दोषी होत नाहीं. द्विजकाम्यया याचा अर्थ अपरार्कांत-तूं हें मांस खावेंस असें द्विज ज्यास सांगत असेल त्यानें तें खाल्यास त्यांत तो दोषी होत नाहीं—असा केला आहे. ज्यांचें पोषण करणें अवश्य आहे अशा गृहांतील मनुष्यांस अर्पण केल्यावर राहिलेलें मांस खाणें अप्रशस्त नाहीं. यांतील प्रोक्षित व श्राद्धीय मांस अवश्य खाल्लेंच पाहिजे; पण द्विजकाम्यादि निमित्तानें प्राप्त मांस न खाल्लें तरी चालतें. त्याचप्रमाणें ज्यांचा निषेध केलेला नाहीं असें ससा इत्यादिकांचें मांस प्राण जाण्यासारिखा प्रसंग जोंपर्यंत आलेला नाहीं तोंपर्यंत शूद्रानेंही खाऊं नये असें समजावें १७९.

आतां वर सांगितलेल्या प्रोक्षितादि मांसास सोडून बाकीचें वृथा मांस खाणाराची निन्दा करितात—

**वसेत्स नरके घोरे दिनानि पशुरोमभिः ।**
**संमितानि दुराचारो यो हन्त्यविधिना पशून् ॥ १८० ॥**

देवादिकांच्या उद्देशावांचून जो दुराचारी पशूंस मारतो तो त्या पशूच्या अंगावर जितके केंस असतात तितके दिवस घोर नरकांत राहतो. येथें केवल पशूंस मारणाराच नरकांत पडतो असें समजूं नये; तर मनूंनीं सांगितल्याप्रमाणें " अनुमोदन देणारा, स्वतः मारणारा, तुकडे करणारा, क्रय व विक्रय करणारा, शिजविणारा, आणणारा व खाणारा " असे आठ पुरुष नरकांत पडतात १८०.

आतां ज्याचें विधान केले आहे अशा मांसावाचून इतर मांस सोडल्यानें कोणतें उत्तम फळ मिळतें तें सांगतात—

सर्वान्कामानवाप्नोति हयमेधफलं तथा ।
गृहेऽपि निवसन्विप्रो मुनिर्मांसविवर्जनात् ॥ १८१ ॥

प्रोक्षितादि मांसातिरिक्त मांस मी खाणार नाहीं, असा संकल्प करून त्याप्रमाणें जो चालतो त्याचे सर्व मनोरथ परिपूर्ण होतात. हें मांसत्यागाचें गौण फळ होय. आतां मुख्य फळ सांगतात—त्यास अश्वमेध यज्ञाचें फळ मिळतें. म्हणजे जो एक वर्ष संकल्पपूर्वक मांसत्याग करितो त्यास अश्वमेधाचें श्रेय मिळतें. तसेंच तो ब्राह्मण गृहस्थाश्रमांत रहाणारा असला तरी मांस सोडल्यामुळें मुनि ( तापसी, मान्य ) होतो १८१.

इति भक्ष्याभक्ष्यप्रकरणम् ७.

---

# अथ द्रव्यशुद्धिप्रकरणम् ८.



आतां द्रव्यशुद्धि सांगतात—द्रव्यांत असलेला दोष घालविणें ही द्रव्यशुद्धि होय. शास्त्रानें सांगितलेल्या प्रक्षालनादि उपायानें दोष जातात. कांहीं दोष प्रत्यक्ष असतात व कांहीं अप्रत्यक्ष असतात. अप्रत्यक्ष दोषांचीं सिद्धि शास्त्रावाचून होत नाहीं. कावळा शिवला असतां प्रत्यक्ष दोष कांहींच आढळत नाहीं; पण शास्त्रावरून त्याच्या बोध होतो. आणि शास्त्रीय उपायांनींच तो जातो. अशुद्ध द्रव्यानें व्यवहार करणारा पुरुषही अशुद्ध होतो व त्यामुळें त्यास विहित कर्म करण्याचा अधिकार नसतो. यास्तव या प्रकरणांत बाह्य द्रव्यशुद्धि सांगतात—

सौवर्णराजताब्जानामूर्ध्वपात्रग्रहाश्मनाम् ।
शाकरज्जुमूलफलवासोविदलचर्मणाम् ॥ १८२ ॥
पात्राणां चमसानां च वारिणा शुद्धिरिष्यते ।
चरुस्रुक्स्रुवसस्नेहपात्राण्युष्णेन वारिणा ॥ १८३ ॥

सोन्याचे व रुप्याचे पदार्थ; मोत्यें, शंख, शिंपा इत्यादि; यज्ञाचीं उखळादि पात्रें; ग्रह नांवाचीं ऐंद्रवायवादि व षोडशी इत्यादि पात्रें; पाटा, वरवंटा इत्यादि; शाका, दोरी, आलें इत्यादि मूळें; आम्रादि फळें; वस्त्रें, सुपें, परड्या इत्यादि वेळूचीं पात्रें किंवा कामटया, बकऱ्यादिकांचें चर्म अथवा त्याच्या वस्तु, प्रोक्षणी, प्रणीता इत्यादि पात्रें व होमाचे चमचे, यांस कांहीं लेप लागलेला नसून केवल उच्छिष्ट स्पर्शादिकांमुळें तीं अशुद्ध झालेलीं असल्यास पाण्यानें धुवावीं म्हणजे शुद्ध होतात. चरु शिजवण्याची मातीची किंवा धातूची स्थाली, स्रुक्, स्रुवा ( हीं दोन पळीं व कलथा यांच्या आकाराचीं होम करण्याचीं साधनें आहेत. ) व स्नेहयुक्त पात्रें हीं लेपरहित असल्यास उष्णजलानें शुद्ध होतात. पण सुवर्णादि सर्व धातूंची, रत्नांची व पाषाणांचीं पात्रें लेपयुक्त असल्यास माती किंवा राख यांनीं घासून पाण्यानें विसळलीं असतां

शुद्ध होतात. धातूंच्या पात्रांस मूत्रादि अपवित्र पदार्थ लागला असतां त्यांस खरवडून काढावें व केवल स्पर्श झाल्यास तीं एकवीस वेळ राखेनें घासावींत. कावळ्यानें चोंच घालून अशुद्ध केलेलें पात्र झिजेपर्यंत घासावें. मांजरावांचून दुसऱ्या कोणत्याही पशूनें उष्टें केलेलें पात्र पवित्र कर्मांत घेऊं नये. अति अशुद्धपात्रें भाजून व पुष्कळ खरवडून घेतां येतात. पुनः पुनः घांसून पुनः पुनः विसळण्यानेंही पात्रें शुद्ध होतात. १८२, १८३.

**स्फ्यशूर्पाजिनधान्यानां मुसलोलूखलानसाम् ।**
**प्रोक्षणं संहतानां च बहूनां धान्यवाससाम् ॥ १८४ ॥**

यज्ञोपयोगी-- स्फ्य म्हणजे वज्र, सूप, चर्म, धान्य, मुसळ, उखळ व गाडा या पदार्थांस अशुचिस्पर्श झाला असतां ते प्रोक्षणानें शुद्ध होतात. त्याचप्रमाणें यज्ञाच्या उपयोगीं नसलेल्याही अनेक वस्त्रांच्या व धान्याच्या राशीस अपवित्र प्राण्याचा किंवा वस्तूचा स्पर्श झाल्यास प्रोक्षणानेंच शुद्ध करावें. याचा अर्थ असा--रास करून ठेवलेल्या धान्याच्या किंवा वस्त्राच्या कांहीं थोडया भागास चांडालादिकांचा स्पर्श झाल्यास ज्यास प्रत्यक्ष स्पर्श झाला असेल तेवढ्याच धान्यास किंवा वस्त्रांस पूर्वी सांगितल्याप्रमाणें प्रक्षालनादिकांच्या योगानेंच शुद्ध करावें. पण त्या राशींत प्रत्यक्ष स्पर्श न झालेलें जें पुष्कळसें धान्य किंवा वस्त्रें असतील त्यांस प्रोक्षणानें शुद्ध करावें. पण राशींतील पुष्कळ भागास स्पर्श झाला असून अस्पृष्ट भाग थोडाच असल्यास राशींतील सर्व धान्य व वस्त्रें प्रक्षालनावांचून शुद्ध होत नाहींत. राशींतील अर्ध्या भागास स्पर्श होऊन अर्ध्या भागास स्पर्श झालेला नसल्यासही प्रोक्षणानें शुद्धि होते पण त्यांतील अमुक एका भागास स्पर्श झाला आहे व अमुक भागास स्पर्श झालेला नाहीं, असा निर्णय होत नसल्यास सर्व राशींस प्रक्षालनानेंच शुद्ध करावें. अनेक पुरुषांनीं डोक्यावरून वाहून आणिलेल्या धान्याच्या व वस्त्रांच्या राशींतील कांहीं ओझांस चांडालादिकांचा स्पर्श झाला असल्यास स्पृष्ट व अस्पृष्ट अशा दोन्ही भागांचें प्रोक्षणच करणें प्रशस्त आहे १८४.

कोणत्याही अमंगल पदार्थाचा लेप लागलेला नसून केवळ स्पर्शानें दूषित झालेल्या वस्तूंची शुद्धि सांगून आतां ज्यास अशुद्ध पदार्थांचा लेप लागला आहे अशा वस्तूंची शुद्धि सांगतात—

**तक्षणं दारुशृङ्गास्थ्नां गोवालैः फलसंभवान् ।**
**मार्जनं यज्ञपात्राणां पाणिना यज्ञकर्मणि ॥ १८५ ॥**

लांकडांच्या, बकरे, रेडे इत्यादिकांच्या, शिंगांच्या व हत्ती, डुक्कर, शंख इत्यादिकांच्या, हाडांच्या व हस्तिदंताच्या वस्तूस अमंगल पदार्थांचा लेप लागला असतां माती किंवा भस्म यानीं त्यांस घांसून जलानें धुवावें. पण तेवढ्यानें त्यांचा लेप व वास न गेल्यास तो लिप्त भाग कापून काढावा. बेलफळ, भोपळा, नारळ इत्यादिकांच्या योगानें केलेल्या वस्तूंस अमंगल पदार्थांचा लेप लागला असतां गोवालानें घांसावें म्हणजे त्या शुद्ध होतात. गोवाल म्हणजे, गाईच्या पुच्छाचे शेवटचे केंस. यज्ञाच्या उपयोगीं पडणाऱ्या लांकडी वस्तूंस उजव्या हातानें

किंवा दर्भांनीं अथवा नूतन वस्त्राच्या दशांनीं यथाशास्त्र मार्जन करावें. कारण, हें मार्जन कर्माचें अंग आहे. पण हें श्रौतकर्मांतील पात्रशुद्धीचें उदाहरण आहे. आणि तें–स्मार्त लौकिक कर्मांमध्यें सुवर्णादि इतर धातूंचीं पात्रेंही यथाशास्त्र शुद्ध केलीं असतांच तीं त्या कर्मांच्या उपयोगाचीं होतात–हें सुचविण्याकरितां येथें दिलें आहे. यज्ञांगभूत पात्रांस यथाविधि शुद्ध केल्यावर पुनः दर्भांनीं जें मार्जन सांगितलें आहे तें त्यांस संस्कार करण्याकरितां होय १८५.

आतां कांहीं लेपयुक्त वस्तूंस शुद्ध करण्याचे कांहीं विशेष प्रकार सांगतात—

सोरवैरुदकगोमूत्रैः शुद्धत्याविककौशिकम् ।
सश्रीफलैरंशुपट्टं सारिष्टैः कुतपं तथा ॥ १८६ ॥

लोकरीचें व रेशमी वस्त्र, खारी माती व जल, अथवा लेप, अधिक असल्यास खारी माती व गोमूत्र यांनीं धुतलें असतां शुद्ध होतें. एकदां धुवून लेप न गेल्यास वारंवार जल व गोमूत्र यांनीं धुवावें. पण शेवटीं जलानेंच धुतलें पाहिजे. ताग, आपट्याचे दोर इत्यादिकांच्या तंतूंनीं केलेल्या वस्त्रास बेलफळाचा गर व जल यांनीं शुद्ध करावें आणि पर्वतांतील बकऱ्याच्या लोकरींचें वस्त्र, रिठे व जल किंवा गोमूत्र यांनीं धुवून निर्मल करावें.पण ही शुद्धि फार लेप लागला असतां करणें इष्ट आहे. थोडासाच लेप लागला असतां किंवा नुसता स्पर्श झाला असतां मार्जनानेंच त्यांस शुद्ध करावें. कारण त्या वस्त्रांस धुणें सहन होत नाहीं. या शुद्धिप्रकरणांत द्रव्याचा नाश न होईल अशा बेतानेंच शुद्धि सांगितलेली आहे. गाद्या, गिरद्या, कुसुंभाहळद–इत्यादिकांनीं रंगविलेले पदार्थ, इत्यादिकांस अल्प दोष लागला असतां उन्हांत वाळवून व पुष्कळ वेळां त्यांच्यावर मार्जन करून पुनः उपयोगांत आणावे. जीं रंगीं वस्त्रें कितीही धुतलीं तरी चालतात म्हणजे ज्यांचा रंग पक्का असतो त्यांस धुवूनच शुद्ध करावें १८६.

सगौरसर्षपैः क्षौमं पुनःपाकान्महीमयम् ।
कारुहस्तः शुचिः पण्य भैक्षं योषिन्मुखं तथा ॥ १८७ ॥

पिंवळ्या सरसू व उदक किंवा गोमूत्र यांच्या योगानें अतसीच्या म्हणजे जवसीच्या सुतानें केलेल्या वस्त्राची शुद्धि करावी. मृन्मय भांड्यास ( मडक्यास ) उष्ट्या घृतादिकांचा लेप लागल्यास तें पुनः भाजलें असतां शुद्ध होतें; पण त्यास मद्य, मूत्र इत्यादि अति अशुद्ध पदार्थांचा लेप लागल्यास तें भाजून शुद्ध होत नाहीं. चांडालादिकांचा स्पर्श झाल्यास मातीचें भांडें टाकूनच दिलें पाहिजे. रंगारी, शिंपी, धोबी इत्यादिकांचे हात सदा पवित्र असतात म्हणजे त्यांस सूतकादि असलें तरी वस्त्रें धुणें, रंगविणें इत्यादि कर्में करावयाचीं झाल्यास तो शुद्धच होय. कारण दुसऱ्या एका स्मृतींत " कारागीर, शिल्पकार, वैद्य, दासी, दास, राजे व राजांचे सेवक हे आपापल्या कामाचे वेळीं शुद्धच असतात. बाजारांत विकण्याकरितां मांडून ठेवलेले धान्यादि पदार्थ, त्यास अनेक जातींच्या लोकांनीं स्पर्श केला तरी शुद्ध आहेत. किंवा दुकानदारास सूतक असलें तरी त्याच्याकडून जिन्नस घेण्यास प्रत्यवाय नाहीं. कारण बाजा-

रांतील वस्तु सदा पवित्र असते. ब्रह्मचारी, संन्यासी इत्यादिकांच्या हातांत असलेलें भिक्षान्न ते रस्त्यांतून फिरून आलेले असले तरी किंवा आचमनादि न केलेल्या स्त्रीनें तें दिलेलें असलें तरी, अपवित्र होत नाहीं. त्याचप्रमाणें संभोगसमयीं स्त्रीचें मुख पवित्र होय १८७.

आतां भूमीची शुद्धि सांगतात—

भूशुद्धिर्मार्जनाद्दाहात्कालाद्गोक्रमणात्तथा ।
सेकादुल्लेखनाल्लेपाद्गृहं मार्जनलेपनात् ॥ १८८ ॥

केरसुर्णीनें झाडणें, गवत व लांकडें घालून जाळणें, आपोआप लेप नाहींसा होईतों काल जाऊं देणें; त्या भूमीवरून गायींस चालविणें, क्षीर, गोमूत्र व शेणखळा शिंपडणें, खणणें, व शेणानें सारवणें यांतील सर्व किंवा शक्य तितक्या उपायांनीं अपवित्र, दूषित व मलिन भूमि शुद्ध होते. जेथें स्त्री बाळंत होते, मनुष्य मरतें, प्रेतास जाळितात, चांडाल रहातो; व विष्ठा इत्यादि टाकितात, ती अमेध्य ( अपवित्र ) भूमि होय. कुत्रें, डुक्कर, गाढव इत्यादिकांच्या संसर्गामुळें भूमि दूषित होते. व कोळसे, कोंडा, केंस, हाडें, राख इत्यादिकांच्या योगानें ती मलिन होते. यांतील मोठ्या, मध्यम व लहान दोषांप्रमाणें निरनिराळे उपाय योजावे. कसें तें सांगतों—जेथें मनुष्यांस जाळीत होते व जेथें चांडाल रहात असत ती भूमी शुद्ध करावयाची असल्यास वरील उपायांतील दहन, काल, गोक्रमण, सेक व उल्लेखन हे पांच उपाय योजावेत. जेथें मनुष्यें उत्पन्न झालीं आहेत किंवा मेलीं आहेत अथवा जेथें विष्ठा इत्यादि पदार्थांचा संसर्ग झाला आहे त्या भूमीची शुद्धि कालादि चार उपायांनीं करावी. कुत्रें इत्यादि प्राणी फार दिवस जेथें रहात असतील ती भूमि गोक्रमणादि तीन उपायांनीं शुद्ध होते. उंट, कोंबडीं इत्यादि जेथें रहात असतील ती भूमि सेक व उल्लेख ( खणणें ) यांनीं पवित्र करून घ्यावी आणि कोळसे इत्यादिकांच्या योगानें मलिन झालेली भूमि खणून, झाडून व सारवून शुद्ध करावी. त्याचप्रमाणें आपलें राहण्याचें घर प्रत्यहीं झाडून व सारवून शुद्ध करावें १८८.

गोघ्रातेऽन्ने तथा केशमक्षिकाकीटदूषिते ।
सलिलं भस्म मृद्वापि प्रक्षेप्तव्यं विशुद्धये ॥ १८९ ॥

खावयाचें अन्न गायीनें हुंगून अपवित्र केल्यास व त्याच प्रमाणें केंस, माश्या, किडे यानीं तें दूषित झालेलें असल्यास त्याच्यावर जल, भस्म, माती इत्यादि टाकून शुद्ध करून घ्यावें. “ केंसादिकांनीं अपवित्र झालेलें अन्न कधींही खाऊं नये. ” असें जें गौतमांनीं सांगितलें आहे त्याचा अर्थ—केंसादिकांसह अन्न शिजलें असल्यास तें खाऊं नये. पण शिजल्यावर त्यांत केंस, माशी, मुंग्या इत्यादि पडल्यास त्यांस काढून टाकून वरील शुद्धि करून तें खावें—असा समजावा. भाकरीसारख्या पदार्थास भस्म किंवा मातीची चिमटी फेंकून शुद्ध करितां येणें शक्य आहे. पण वरण, भाजी, भात इत्यादिकांत माती व भस्म फेंकणें प्रशस्त नाहीं. यास्तव जेथें माती व भस्म फेंकतां येणें शक्य असेल तेथेंच त्यांनीं शुद्धि करून इतर प्रसंगीं उदकानें शुद्धि करावी १८९.

त्रपुसीसकताम्राणां क्षाराम्लोदकवारिभिः
भस्माद्भिः कांस्यलोहानां शुद्धिः प्लावो द्रवस्य तु ॥१९०॥

दस्त, शिसें व तांबें यांच्या पात्रादिकांस मिठासारखे क्षार व चिंचेसारिखे आंबट पदार्थ आणि जल यांच्यायोगानें शुद्ध करावें. म्हणजे ज्या मानानें त्यांस लेप लागला असेल त्या मानानें यांतील एक, दोन किंवा तीन उपाय योजावेत. नुसत्या पाण्यानेंच लेप जात असल्यास क्षार व चिंच लावण्याचें कारण नाहीं. कांसें व लोखंड यांच्या पात्रादिकांस राख व जल यांच्यायोगानें शुद्ध करावें. पितळेच्या भांड्यासही तांब्याच्या भांड्याप्रमाणेंच शुद्ध करावें. त्यांच्यावर फारच मळ सांचलेला असल्यास वारंवार आंबट पदार्थ लावून वारंवार धुवावें. पातळ पदार्थांस शुद्ध करावयाचें असल्यास त्यांचा प्लाव करावा. एक शेर किंवा त्याहून अधिक घृतादि पदार्थांस कुत्रें, कावळा इत्यादिकांनीं तोंड लावून अपवित्र केल्यास त्याच्याच जातीच्या पातळ पदार्थांनें तें भांडें तोंडातोंड भरून त्यांतील कांहीं भाग खालींही वाहून जाईल असें करावें. यासच प्लाव म्हणतात. पण तो घृतादि पातळ पदार्थ शेराहून कमी असल्यास त्याचा त्याग करावा. पण हा सर्व शौचप्रकार देश, काल, आपली स्थिती, तीं अपवित्र झालेली वस्तु, तिचा उपयोग इत्यादिकांचा विचार करून योजावा. कोणत्याही पातळ पदार्थांत किडे, मुंग्या, माशा इत्यादि जीव पडल्यास ते वस्त्रानें दुसऱ्या भांड्यांत गाळले असतां शुद्ध होतात. कारण त्यावांचून त्यांतील किडे निघणें शक्य नसतें. शूद्राच्या भांड्यांत असलेल्या–मध, उसाचा रस–इत्यादि पदार्थांस आपल्या शुद्ध भांड्यांत ओतून घेणें हीच त्यांची शुद्धि आहे. मध, तूप इत्यादि पदार्थ नीच मनुष्यांच्या हातांतून प्राप्त झालेले असल्यास त्यांस दुसऱ्या पात्रांत काढून घेऊन कढविल्यानें शुद्ध होतात १९०.

येणेंप्रमाणें उच्छिष्ट, स्नेह इत्यादिकांच्या योगानें विटाळलेल्या सुवर्णादि पात्रांची शुद्धि सांगून आतां तींच पात्रें अमंगल पदार्थांनीं भ्रष्ट झालीं असतां काय करावें तें सांगतात–

अमेध्याक्तस्य मृत्तोयैः शुद्धिर्गन्धादिकर्षणात् ॥
वाक्शस्तमम्बुनिर्णिक्तमज्ञातं च सदा शुचि ॥ १९१ ॥

चरबी, शुक्र, रक्त, मज्जा, मूत्र, विष्ठा, कानांतील मळ, नखें, थुंकी ( कफ ), अश्रु, डोळ्यांतील पू, घाम, मनुष्याचीं हाडें, प्रेत व मद्य यांस अमेध्य ( अमंगल, अपवित्र ) म्हणतात. त्यांनीं भरलेल्या किंवा त्यांचा ज्यांस संसर्ग झाला आहे अशा सौवर्णादि पात्रांची शुद्धि माती व जल यांनीं घांसून व विसळून करावी. ज्याचा लेप लागला असेल त्याचा वास व लेप जाईपर्यंत ही शुद्धि कर्तव्य आहे. येथें जे अमेध्य मळ सांगितले आहेत ते सर्वच सारखे अमंगल नाहींत. कारण मद्य, पुरीष ( विष्ठा ), मूत्र, कफ, पू, अश्रु व रक्त यांचा ज्यांस स्पर्श होतो तें पात्र शुद्ध होतच नाहीं. ( अर्थात हे अति अमेध्य पदार्थ आहेत ) असेंही एके ठिकाणीं सुचविलें आहे. हे सर्व पदार्थ शरीरांत आपापल्या स्थानीं स्थित असेपर्यंत अपवित्र नसतात तर ते स्वस्थानास सोडून च्युत झाले असतां अपवित्र होतात. पुरुषाच्या नाभीवरील

हाताशिवाय दुसऱ्या कोणत्याही अवयवास अमेध्य वस्तूचा लेप झाल्यास स्नान करावें. व नाभीच्या खालच्या अंगास व हातास लेप झाल्यास माती व जल यांनीं धुवून ते भाग शुद्ध करावेत व आचमन करून शुचि व्हावें. पण वर सांगितल्याप्रमाणें शौच करूनही जर मनाची मळमळ जात नसेल किंवा हा पदार्थ शुद्ध झाला कीं नाहीं याविषयीं संशय असेल तर " हें शुद्ध होवो " असें ब्राह्मणांच्या मुखानें म्हणविल्यानें तें शुद्ध होतें. यास "वाक्शस्त" असें म्हणतात. ज्याच्याविषयीं विशेष शुद्धि सांगितलेली नाहीं त्याची प्रक्षालनानें शुद्धि होते व ज्याचें प्रक्षालन करितां येत नाहीं अशा वस्तूवर जलमार्जन केल्यानेंही काम भागतें. कावळा, कुत्रें इत्यादिकांनीं एखाद्या वस्तूस तोंड लाविलें असतां तें जर कोणास समजलें नसेल तर ती वस्तु शुद्धच होय. तिचा व्यवहारांत उपयोग केल्यास कोणत्याही प्रकारचा अदृष्ट दोष नाहीं १९१.

शुचि गोतृप्तिकृत्तोयं प्रकृतिस्थं महीगतं ।
तथा मांसं श्वचाण्डालक्रव्यादादिनिपातितम् ॥ १९२ ॥

एका गायीची तहान भागेल इतकें, ज्यांत वाईट ( अस्वाभाविक ) रंग, वास व रस नाहीं आणि चांडालादिकांनीं ज्यास स्पर्श केला नाहीं असें शुद्ध भूमीवरील जल आचमनादि करण्यास शुद्ध समजावें. पाणी नासलें असतां त्याचा रंग बदलतो, वास येऊं लागतो व रुचींतही अंतर पडतें; पण असलें जल आचमनास उक्त नाहीं; हें सुचविण्याकरतां श्लोकांत " प्रकृतिस्थ " हा शब्द घातला आहे. शुद्ध पात्रांतून वर काढलेलें पाणी शुद्ध आहे. पण तें एक रात्र राहिल्यानंतर अशुद्ध होतें. यास्तव त्याचा त्याग करावा. त्याचप्रमाणें चांडालादिकांनीं केलेल्या तडागांतील पाणी स्नानपानास योग्य समजावें. कुत्रा, चांडाल, गृध्रादि पक्षी यांनीं मारलेल्या व न खातां टाकिलेल्या मांसास पवित्र समजावें १९२.

रश्मिरग्निरजश्छाया गौरश्वो वसुधाऽनिलः ।
विप्रुषो मक्षिकास्पर्शे वत्सः प्रस्नवने शुचिः ॥ १९३ ॥

सूर्यादि प्रकाशक द्रव्यांचे किरण, अग्नि, ( कुत्रा, कावळा, उंट, गाढव, घुबड, डुक्कर, कोंबड्यासारिखे ग्राम्य पक्षी, बकरी व मेंढी यांच्या अंगावरील रजःकणास सोडून इतर ) रजःकण ( धूळ ), ( छाडणें इत्यादि कर्तव्य असतां ) वृक्षादिकांची छाया, गाय, अश्व, पृथ्वी, भूमि, वायु, दंवाचें बिंदु, व माशा यांस चांडालादिकांचा स्पर्श झालेला असला तरी ते अस्पृश्य होत नाहीत. ओटींतील दूध चोखावयाच्या वेळीं वासराचें तोंड पवित्र समजावें. दुग्ध पितांना बालकाचें मुखही शुचि होय१९३.

अजाश्वयोर्मुखं मेध्यं न गोर्न नरजा मलाः ।
पन्थानश्च विशुध्यन्ति सोमसूर्यांशुमारुतैः ॥ १९४ ॥

बकरी व बकरा आणि अश्व यांचें मुख पवित्र आहे. पण गायीचें मुख पवित्र नाहीं. मनुष्यांच्या शरीरांतील किंवा शरीरापासून निघणारे मळ पवित्र नाहींत. चांडालादिकांनीं

ज्यास स्पर्श केला आहे, असा मार्ग दिवसा सूर्याच्या किरणांनीं व वायूनें आणि रात्रीं चंद्राच्या किरणांनीं किंवा वायूनें शुद्ध होतो १९४.

मुखजा विप्रुषो मेध्यास्तथाचमनबिन्दवः ।
श्मश्रु चास्यगतं दन्तसक्तं त्यक्त्वा ततः शुचिः ॥ १९५ ॥

मुखांतील खाकऱ्याचे बिन्दु अंगावर न पडल्यास शुद्ध होत. त्याचप्रमाणें आचमनाच्या जलाचे जे बिन्दु पायांस स्पर्श करितात ते शुद्ध असतात. तोंडांत गेलेले मिशांचे केस पुरुषास उच्छिष्ट करीत नाहींत. दांतांत अडकलेलें अन्नादि आपोआप निघालें असतां थुंकून टाकिल्यानें पुरुष शुद्ध होतो व तें दांतांतच अडकून राहिल्यास दांतासारखेंच होय. पण त्यांस जीभ लाविल्यास तें अशुद्ध होतें. शिवाय तें दांतांतून बाहेर येतांच गिळून टाकिलें तरी एक वेळ चालेल; पण त्यास पुनः चावणें किंवा चघळणें चांगले नव्हे. कारण तसें केल्यास आचमनावाचून मुख शुद्ध होत नाहीं. पण विडा, फळें इत्यादि चघळल्यास व भोजनोत्तर तोंडास तुपादिकांचा बुळबुळितपणा राहिल्यास त्याच्या योगानें द्विजांचें मुख उच्छिष्ट होत नाहीं १९५.

स्नात्वा पीत्वा क्षुते सुप्ते भुक्त्वा रथ्योपसर्पणे ॥
आचान्तः पुनराचामेद्वासो विपरिधाय च ॥ १९६ ॥

स्नान व दुग्धादि पेय पदार्थांचें प्राशन केलें असतां, शिंक आली असतां, निजून उठल्यावर, भोजनोत्तर, मार्गांतून चालून आल्यानंतर व एक वस्त्र सोडून दुसरें नेसलें असतां दोनदां आचमन करावें. त्याचप्रमाणें रडल्यानंतर, अध्यानाच्या आरंभीं व थोडेसें खोटें भाषण केलें असतां आचमन करावें. भोजनाच्या पूर्वी पवित्र असतांनाही दोन वेळ आचमन करावें. स्नान करावयाच्या वेळीं व पाणी प्यावयाचें झाल्यास आरंभीं एकदां, अध्ययनाच्या पूर्वीं दोन वेळ व बाकी सर्व प्रसंगीं शेवटीं दोनदां आचमन करावें १९६.

रथ्याकर्दमतोयानि स्पृष्टान्यन्त्यश्ववायसैः ॥
मारुतेनैव शुध्यन्ति पक्केष्टिकाचितानि च ॥ १९७ ॥

रथ्या म्हणजे कोणताही मार्ग त्यांतील चिखल, शेण, जल इत्यादिकांस चांडाळ, कुत्रीं व अमंगल पक्षी यांचा स्पर्श झाला असतां तीं वायूच्या योगानेंच शुद्ध होतात. त्याचप्रमाणें पक्क्या विटांनीं बांधलेलीं घरें, फरशा इत्यादिकांस चांडालदिकांचा स्पर्श झाला असतां वायूच्या योगानें शुद्ध होतात. अर्थात् १८४ व्या श्लोकाच्या दुसऱ्या अर्धांत "समूहरुपानें असणाऱ्या वस्तूंची शुद्धि प्रोक्षणानें करावी असें जें सांगितलें आहे तें पक्क्या विटांच्या समूहास लागू नाहीं. पण गवत, लांकडे, पानें इत्यादिकांच्या समूहाची शुद्धि प्रोक्षणानेंच करावी. अपरार्कानीं या शुद्धिप्रकरणांत आणखी कांहीं अधिक माहिती दिली आहे, तिचा येथें थोडक्यांत उल्लेख करितों.सुवर्ण, तांबे,रुपें,कांसें,जस्त व शिसें यांच्या पात्रांस तैजसपात्रें म्हणतात. तीं राख प्रमाणें गायीच्या शेणानेंही शुद्ध होतात.गायीनें हुंगलेल्या व शूद्राच्या उष्ट्या कांशाच्या भांड्यांस

दहावेळ राखेन घासावें. कांशावाचून बाळंतिणीचीं उष्टीं तैजस पात्रें जवसाच्या चूर्णानें एकवीस वेळ घांसून विसळलीं असतां शुद्ध होतात. दारू ठेविल्यामुळें भ्रष्ट झालेल्या भांड्याची शुद्धिही अशीच करावी. काशावाचून इतर तैजस भांड्यास तापवूनही शुद्ध करितां येतें. द्विजांचें उष्टें तैजस भांडें एकदां घासल्यानेंच शुद्ध होतें. काशाच्या भांड्यांत चूळ टाकूं नये व पाय धुवूं नयेत. लांकडांचीं भांडीं उष्टीं झाल्यास त्यांस तासून शुद्ध करावें. तैजसभांड्यांसही साणेवर घासावें. मूत्र, विष्टा, रेत व रक्त यांनीं लिप्त झालेलें वस्त्र पाण्यानें धुवून शुद्ध करावें. पण त्यांचा लेप धुवून न गेल्यास तेवढेंच तें फाडून अथवा जाळून टाकावें. देवकर्मांत व पितृकर्मांत नेहमीं धुतलेलें वस्त्र नेसावें. अति मूल्यवान् लोकरीचीं वस्त्रें वायु, अग्नि, सूर्यकिरण व चंद्रकिरण यांच्या योगानें शुद्ध होतात. आपली शय्या, आसन, वस्त्र, स्त्री, अपत्य व कमंडलु हीं आपल्याच वारंवार उपभोग घेण्यानें अशुद्ध होत नाहींत. तीं दुसऱ्याच्या उपभोगानें अशुद्ध होतात. त्याचप्रमाणें दुसऱ्याच्या शय्या, आसन इत्यादि वस्तु अशुद्ध समजाव्या. पापी व इतर वर्णाचे लोक यांच्या शय्या, आसनादि वस्तु सतत त्याज्य समजाव्या. त्याचप्रमाणें रोग्याच्या वस्त्रादि वस्तूंशीं नीरोग्यानें संबंध ठेवूं नये. पण एकादेवेळीं आपली शय्या, आसन, वाहन इत्यादि न मिळाल्यास नाइलाजास्तव दुसऱ्याच्या शय्या इत्यादिकांवर आपलें एकादें वस्त्र घालून निजावें किंवा बसावें. सारांश जल, माती, रिठे, बेलफळ, तांदुळ, सरशी इत्यादिकांचा कल्क, क्षार, गोमूत्र, गोमय इत्यादि द्रव्यें सर्व पदार्थांस कमी अधिक प्रमाणानें शुद्ध करणारीं आहेत. चर्म, अस्थि, काष्ट, मणि, वज्र, प्रवाल, मोत्यें, शंख व उत्तम दगड यांच्या पात्रादिकांस खरवडून काढून शुद्ध करावें. पिंवळ्या मोहऱ्यांच्या किंवा तिळाच्या कल्कानें सर्व प्रकारच्या बकऱ्यांच्या चर्मादिकांची शुद्धि करावी. कल्क म्हणजे पाण्यांत भिजविलेलें पीठ. वड, उदंबर, अश्वत्थ, पिंपरी, जांभूळ, आंबा व आंवळा हे चामड्यास शुद्ध करितात. मूत्र व विष्टा यांनीं अपवित्र झालेलीं दगडांचीं, रत्नांचीं व मोतीं, शंख इत्यादिकांचीं पात्रें भूमींत सात दिवस पुरून ठेवावीं. शिंगें, हाडें व दांत यांच्या वस्तूंस तासून पवित्र करावें. मूत्रादिकांनीं अपवित्र झालेले लांकडी व मातीचे पदार्थ टाकून द्यावे. एका पुरुषास उचलून नेतां येतील अशा काष्टांस चांडालादिस्पर्श झाला असतां तीं धुवून वाळवावीं. पण त्याहून अधिक असलेल्या काष्टांस व दगडांस भूमीप्रमाणें समजावें. थोड्याशाच तांदुळांना चांडालादिकांचा स्पर्श झाल्यास ते टाकून द्यावे. पुष्कळ धान्याच्या राशीस प्रोक्षणाप्रमाणेंच, जेवढ्या भागास मूत्रादिकांचा स्पर्श झाला असेल तेवढ्याचा त्याग करून व अपवित्र रजःकणादिकांचा संसर्ग झाला असतां त्याच्यावरील तुप काढूनहीं त्यास शुद्ध करितां येतें. पण पुष्कळ मनुष्यांस वाहून नेतां येण्याइतके तांदूळ, गहु किंवा जव असल्यास त्यांस क्रमानें प्रोक्षण, अवगाहन व पर्यग्निकरण यांच्यायोगानें शुद्ध करावें. प्रोक्षण म्हणजे हातानें पाणी शिंपडणें, अवगाहन म्हणजे धुणें व पर्यग्निकरण म्हणजे सभोंवार अग्नीचीं ज्वाला फिरविणें; मुगादिकांच्या शेंगांस सोलून किंवा हातानें चोळून शुद्ध करावें. घरास आग लागून त्यांत जर मनुष्यें व पशु जळून मेले असतील तर त्यांतील बाहेर काढलेलें धान्य व द्रव्य अभोज्य आहे. पण तें भूमींत पुरलेलें

असल्यास भोज्य समजावें. जेव्हां घरास आग लागलेली असूनही प्राणिवध झालेला नसतो तेव्हां त्यांतील सर्व वस्तु शुद्ध समजाव्या. कमंडलु व लांकडी पात्रें अत्यंत अशुद्ध झालेलीं असल्यास त्यांचा त्याग करावा. विधवा स्त्रीनें व पुरुषांनीं काळें वस्त्र नेसूं नये इत्यादि १९७.

इति द्रव्यशुद्धिप्रकरणम् ८.

---

# अथ दानप्रकरणम् ९.



आतां येथून पुढें दानधर्माचें प्रतिपादन करावयाचें आहे. पण अगोदर दानाच्या अंगभूत पात्राचें प्रतिपादन करण्याकरितां त्या पात्राची प्रशंसा करितात—

तपस्तप्त्वासृजद्ब्रह्मा ब्राह्मणान्वेदगुप्तये ।
तृप्त्यर्थं पितृदेवानां धर्मसंरक्षणाय च ॥ १९८ ॥

ब्रह्मदेव सृष्टीच्या आरंभीं—"कोणत्या मुख्य प्राण्यास मीं अगोदर उत्पन्न करूं वें." असा विचार-हेंच तप करून प्रथम वेदांच्या रक्षणार्थ, पितर व देव यांच्या तृप्त्यर्थ व धर्मानुष्ठानाच्या द्वारा धर्मसंरक्षणार्थ ब्राह्मणांस निर्माण करिता झाला. ईश्वराचें ज्ञान-विचार-ध्यानमयच तप असतें. किंवा तप म्हणजे सर्व इंद्रियांचा जय. यास्तव अशा ब्राह्मणांस दिलेलें दान अक्षय्य फल देतें, असा या प्रशंसेचा अभिप्राय जाणावा १९८.

सर्वस्य प्रभवो विप्राः श्रुताध्ययनशीलिनः ।
तेभ्यः क्रियापराः श्रेष्ठास्तेभ्योऽप्यध्यात्मवित्तमाः ॥ १९९ ॥

क्षत्रियादि इतर सर्व प्राण्यांहून ब्राह्मण जातीनें व कर्मानें श्रेष्ठ आहेत. ब्राह्मणांतही शास्त्राध्ययन व वेदाध्ययन करणारे उत्कृष्ट होत. त्यांच्याहूनही शास्त्रविहित अनुष्ठान करणारे चांगले. पण त्यांच्याहूनही आत्मज्ञानी व शमदमादिसंपन्न ब्राह्मण श्रेष्ठ आहेत. अपरार्कांनीं पहिल्या अर्धाचा अर्थ असा केला आहे—श्रुत म्हणजे गुरूपासून सांगोपांग श्रुतिस्मृतिवाक्यांचा अर्थ समजून घेणें व अध्ययन म्हणजे श्रुत्यादिकांचा केवळ पाठ. याचा सतत अभ्यास करण्याचें ज्यांचें शील असतें ते श्रुताध्ययनशील ब्राम्हण पृथ्वीतील सर्व वस्तूंचे प्रभु ( धनी ) आहेत १९९.

या प्रमाणें ब्राह्मणांची प्रशंसा करून सत्पात्राचें लक्षण सांगतात—

न विद्यया केवलया तपसा वापि पात्रता ।
यत्र वृत्तमिमे चोभे तद्धि पात्रं प्रकीर्तितम् ॥ २०० ॥

केवल श्रुताध्ययन संपत्तीच्या योगानें किंवा केवल शमदमादि तपाच्या योगानें संपूर्ण पात्रता येत नाहीं. त्याचप्रमाणें केवल जाती किंवा केवळ अनुष्ठान यांच्या योगानेंही संपूर्ण पात्रता येत नाहीं. तर ज्या पुरुषाचे ठायीं वर्तन ( अनुष्ठान ) व हीं दोन्हीं म्हणजे विद्या व तप आणि ब्राह्मण जातीही असते तेंच संपूर्ण पात्र होय, असें मन्वादिकांनीं सांगितलें आहे. अर्थात् अशा पुरुषाहून उत्कृष्ट पात्रच नाहीं. जाती, विद्या, अनुष्ठान व तप यांतील एकेकाच्या योगानेंही पात्रत्व येतें. पण त्यांतील उत्तरोत्तर अधिक प्रशस्त असतें. म्हणजे केवल जातीपेक्षां विद्या, विद्येपेक्षां अनुष्ठान व अनुष्ठानापेक्षां तप प्रशस्त होय. अथवा केवल जातीच्या ब्राह्मणापेक्षां जाती व विद्या यांनीं युक्त असलेला ब्राह्मण अधिक प्रशस्त. जाती, विद्या व अनुष्ठान यांनीं युक्त असलेला त्याहून उत्तम व जाती, विद्या इत्यादि चारी पात्रधर्मांनीं संपन्न असलेला पुरुष उत्तमोत्तम पात्र होय. या चार प्रकारच्या पात्रांतील ज्यास दान दिलें असेल त्याच्या योग्यतेप्रमाणें दात्यास कमी किंवा अधिक फल मिळतें. दात्यास पापापासून तारणाऱ्यास पात्र म्हणतात. यास्तव सत्पात्र पाहून प्रसन्न मनानें दान द्यावें. स्वाध्यायसंपन्न, कुलीन, सत्यपरायण, शूद्रांचा प्रतिग्रह न घेणारे, अति शांत, अग्निहोत्री, पापभीरु, बहुश्रुत, स्त्रियांवर क्रोध न करणारे, धार्मिक, गायीची सेवा करणारे, अनेक व्रतें करून कृश झालेले, क्षमा व इंद्रियनिग्रह यांनीं युक्त, प्राण्याची शरीरानें, वाणीनें किंवा नुसत्या संकल्पानेंही हिंसा न करणारे व अगदीं नियमित प्रतिग्रह घेणारे ब्राह्मणच दात्यास तारण्यास समर्थ होतात. माता, पिता, भाऊ, बहीण, बहिणीची मुलें, स्त्री, पुत्र, कन्या इत्यादि माणसें गुणहीन व विद्याहीन असलीं तरी त्यांस यथाशक्ति देणें हें एक उत्तम कर्म आहे. पित्यास दिलेलें दान शतपट, मातेस दिलेलें सहस्रपट, कन्येस दिलेलें अनन्तपट व सख्या भावास दिलेलें दान अक्षय फल देतें. आपले आप्त दुःखानें निर्वाह करीत असतांना जो शक्तिमान् पुरुष परक्यांस दान देतो तो विषयुक्त मधाप्रमाणें अधर्मयुक्त धर्म करितो, असें समजावें. दया आल्यामुळें पात्र नसलेल्या आंधळ्या-पांगळ्यास जें काहीं कोणी देतो तें त्यास अनंत फळ देतें. आपल्याजवळ असलेल्या सत्पात्रास सोडून दूरच्या त्याच्या बरोबरीच्या किंवा त्याहून अधिक पात्राची संभावना करणें अप्रशस्त आहे. सर्व संबंधी, कन्येचा पुत्र, जामाता, भगिनीचा पुत्र, व बंधू मूर्ख असले तरी त्यांचा त्याग करूं नये. त्यांस यथाशक्ति अन्नादि द्यावें ज्यांना धनाची अगदीं आवश्यकता आहे, ज्यांच्या सर्वस्वाचें चोरादि बलाढ्यांनीं हरण केलें आहे, जे भिक्षेवर निर्वाह करून तपोनिष्ठ होऊन रहातात व ज्यांस एखाद्या संकटांतून पार पाडण्याकरितां अथवा कुटुंबपोषणार्थ द्रव्याची आवश्यकता आहे अशा पुरुषांस दान अवश्य द्यावें २००.

**गोभूतिलहिरण्यादि पात्रे दातव्यमर्चितम् ।**
**नापात्रे विदुषा किंचिदात्मनः श्रेय इच्छता ॥ २०१ ॥**

वरच्या श्लोकांत सांगितलेल्या पात्रास गाय, भूमि, तिल, हिरण्य इत्यादि शास्त्रोक्त उदक दानादि इतिकर्तव्यता करून द्यावें. विशेष पात्रीं दान केल्यानें विशिष्ट फळ मिळतें

असें जाणणाऱ्या व आपलें कल्याण इच्छिणाऱ्या अर्थात् संपूर्ण फलाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें जें पात्र नसेल अशा क्षत्रियादिकांस किंवा पतित ब्राह्मणास दान देऊं नये. अपात्रीं दान दिल्यास तामस फळ मिळतें, असें श्रीकृष्ण द्वैपायनांनीं श्रीमद्भगवद्गीतेंत सांगितलें आहे. अपात्रीं दान देऊं नये असें सांगणाऱ्या याज्ञवल्क्यमुनींनीं विशिष्ट देश, काल व द्रव्यसंपत्ति यांचें सांनिध्य असून योग्य पात्र नसल्यास किंवा देश, काल व पात्र असून द्रव्य नसल्यास केवल संकल्प करून ठेवावा व पात्र किंवा द्रव्य मिळेल तेव्हां दान करावें; पण अपात्रीं दान करूं नये. तसेंच मी आपणांस अमुक दान देणार आहें; पण आज मजजवळ द्रव्य नाहीं. तें हातीं येतांच देईन—असें संकल्पपूर्वक सांगितल्यानंतरही जर त्या पात्रभूत मानलेल्या ब्राह्मणाचे पातकादि दोष समजले तर तें त्यांस देऊं नये, असें येथें सुचविलें आहे. अपरार्क म्हणतात कीं-मुख्य पात्र न मिळाल्यास जे अपात्र आहेत असें स्पष्ट सांगितलें आहे त्यांस सोडून इतरांस दान द्यावें,असा येथें तात्पर्यार्थ समजावा.मनुस्मृतींत सांगितलेला बैडालव्रतिक व बकवृत्ति, वेदास न जाणणारा, व्रतें न करणारा, मंत्र न उच्चारणारा, केवल जातीवर उपजीविका करणारा, अग्निहोत्राचा नाश करणारा, माता, पिता इत्यादिकांचें अप्रिय करणारा, सतत पापाचरण करणारा,शूद्रास शिकविणारा, अश्रोत्रिय, धूर्त, कपटी, मल्ल, निंद्यविद्या जाणणारा, जुगारी, लुच्चा, स्तुतिपाठक, चोर, क्रियाहीन, दान घेऊन त्याचा वाईट कृत्यांत विनियोग करणारा, प्रतिग्रह घेऊन द्रव्यसंचय करणारा व त्याचा धर्मकृत्यांत उपयोग न करणारा, तीन पुरुषांपासून ज्याच्या कुलांतील वेद व अग्निहोत्र बंद झालें आहे; देवपूजा करून निर्वाह करणारा, व्याजबट्टा करणारा, अपूज्यांची पूजा करणारा, राजाच्या आश्रयानें राहणारा; क्रयविक्रय करणारा, अनेक यजमानांकडून यज्ञ करविणारा, ग्रामोपाध्याय, दुष्ट कर्में करणाऱ्या ब्राह्मणांच्या आश्रयानें राहणारा व योग्यसमयीं संध्यावंदनादि कर्में न करणारा, या इतक्या ब्राह्मणांस दान देऊं नये, असें सांगितलें आहे. उत्तम पात्र पाहून द्रव्यादि श्रद्धेनें यथाशक्ति देणें यास दान म्हणतात. धर्म, अर्थ, काम, व्रीडा, हर्ष व भय हीं दानाचीं सहा निमित्तें आहेत. केवल दानबुद्धीनें फलाची अपेक्षा न करिता सत्पात्रीं जें दान देतात तें धर्मदान; फलाच्या इच्छेनें प्रसंग पाहून जें दान देतात तें अर्थदान; स्त्रिया, मद्य, मृगया व द्यूत यामध्यें आसक्त होऊन अयोग्य स्त्रीपुरुषांस जें दिलें जातें तें कामदान; भरसभेंत सर्वांसमक्ष एकाद्या याचकानें याचना केली असतां, केवल लज्जा राखण्यासाठीं जें दान दिलें जातें तें व्रीडादान; एकादी प्रिय व इष्ट वार्ता ऐकून हर्षाच्या भरांत जें दिलें जातें तें हर्षदान व शिव्या, अनथ व प्राणहानि यांस भिऊन पीडा देणारांस जें दान देतात तें भयदान होय. दाता, प्रतिग्रह करणारा (ह्म० दान घेणारा), श्रद्धा, धर्मयुक्त देय, देश व काल हीं धर्माचीं सहा अंगें आहेत. त्यांतील दाता पापरोगानें युक्त नसणारा, धार्मिक, दानेच्छु, व्यसनशून्य, शुचि व अनिंद्य कर्मांवर निर्वाह करणारा असावा. प्रतिग्रह करणाराविषयीं वर पात्रशब्दाच्या व्याख्यानसमयीं सर्व कांहीं सांगून झालेंच आहे. याचकाचें दर्शन होतांच मुख प्रसन्न होणें, त्याच्याविषयीं मनांत प्रेम उत्पन्न होणें,

त्याचा सत्कार करावा असें मनांत येणें व त्याच्याविषयीं असूया न वाटणें हीं श्रद्धेचीं चिन्हें आहेत. स्वतः संपादन केलेलें व ज्याच्या दानानें दुसऱ्या कोणास अथवा स्वतः दात्यास कोणत्याही प्रकारें क्लेश होण्यासारिखे नसतील असें थोडें किंवा फार द्रव्य हें देय होय. जें द्रव्य, जेथें आणि ज्या कालीं दुर्लभ असेल त्याच्या दानाचा तो उत्तम व मुख्य देश आणि काल होय. दुष्फल, निष्फल, हीनफल, तुल्यफल, विपुलफल व अक्षयफल अशीं सहा-प्रकारचीं दानाचीं फलें आहेत. नास्तिक, चोर, हिंसक, हीन जातीचा क्षत्रियादि, पतित, चाहाडखोर व बालघातक यांस दिलेलें दान दुष्फळ होतें म्हणजे त्याचें अनिष्ट फल मिळतें. श्रद्धेवांचून दिलेलें दान मोठें जरी असलें तरी तें निष्फल होतें. दुसऱ्या प्राण्यांस पीडा देणारें दान हीनफल होतें. म्हणजे त्याचें फल न्यून होतें. शास्त्रोक्त दान देतांना जर दात्याचें चित्त कलुषित झालें तर संकल्पदोषामुळेंच तें जितकें दिलें असेल तितकेंच फल देणारें होतें. वर सांगितलेल्या सहाहि अंगांनीं युक्त असलेलें दान विपुल फल देतें व दयेच्या योगानें दिलेलें दान अक्षय फलदायि होतें. हा वैदिक दानमार्ग ध्रुव, आजस्त्रिक, काम्य व नैमित्तिक असा चार प्रकारचा आहे. प्रपा, आराम, ( बाग ) तडाग इत्यादिकांच्या दानांस ध्रुवदानें म्हण-तात. कारण त्यांच्या योगानें दात्याचे सर्व मनोरथ पूर्ण होत असतात. प्रत्यहीं फलाची इच्छा न धरितां जें दान दिलें जातें तें आजस्त्रिक म्हणजे नित्य होय. अपत्य, विजय, ऐश्वर्य इत्या-दिकांच्या इच्छेनें जें दान देतात तें काम्य होय. व ग्रहणादि काल, यज्ञादि क्रिया व द्रव्यादि प्राप्ति या निमित्तांच्या योगानें दिलेलें दान नैमित्तिक होय. सारांश या सर्व गोष्टींचा विचार करून दान दिलें असतां तें कामधेनूप्रमाणें फल देतें. दानादि धर्म करून त्याची आपल्याच मुखानें प्रशंसा करूं नये. इष्ट व पूर्त असे दानाचे दोन विभाग आहेत. वेदीवर बसून दान देणें, अग्निहोत्र, आतिथ्य व वैश्वदेव हीं इष्ट दानें व मोठीं तळीं, विहिरी, मंदिरें, मठ, धर्म-शाळा, अन्नछत्रें, बागा इत्यादि तयार करून त्यांचा लोकोपयोगार्थ उत्सर्ग करणें हीं पूर्त दानें होत. इष्ट व पूर्त दानें सर्व द्विजांनीं करावीं व शूद्रांनीं केवल पूर्त कर्मे करावींत असा शास्त्राचा नियम आहे २०१.

अपात्रीं दान देऊं नये इतकेंच नव्हे तर त्या अपात्रभूत पुरुषांनीं तें घेऊंही नये, असें आतां सांगतात—

विद्यातपोभ्यां हीनेन न तु ग्राह्यः प्रतिग्रहः ।
गृह्णन्दातारमधो नयत्यात्मानमेव च ॥ २०२ ॥

विद्या, तप इत्यादि पात्राची लक्षणें आहेत. त्या लक्षणांनीं हीन असलेल्या पुरुषानें प्रतिग्रह घेऊं नये. कारण सुवर्णादिकांचा प्रतिग्रह घेणारा पात्रलक्षणहीन पुरुष दात्यासही अधोगतीस पोंचवितो व आपणही नरकांत पडतो २०२.

दातव्यं प्रत्यहं पात्रे निमित्ते तु विशेषतः ।
याचितेनापि दातव्यं श्रद्धापूतं तु शक्तितः ॥ २०३ ॥

गाय, सुवर्ण इत्यादि प्रतिदिवशीं आपल्या शक्तीप्रमाणें वर सांगितलेल्या विधीनें पात्रास द्यावें. पण तें दान आपल्या कुटुंबाच्या निर्वाहास बाध करणारें नसावें. म्हणजेच कुटुंबांतील माणसांस उपाशीं किंवा दुःखी ठेवून दानधर्म करूं नये. संक्रांति, ग्रहण इत्यादि निमित्तें झालीं असतां तर तें मुद्दाम व अधिक द्यावें. कोणी येऊन याचना केली असतां त्यासही श्रद्धायुक्त चित्तानें यथाशक्ति द्यावें. पण यावरून असें ठरतें कीं, याचना केल्यावाचून स्वेच्छेनें दान करण्यांत मोठें फल आहे. शातातपांनीं सांगितलें आहे कीं, समुद्राचाही अंत लागेल पण अयाचित दानाच्या फलाचा अंत लागणार नाहीं. पात्र जेथें असेल तेथें स्वतः जाऊन त्यानें मागितल्यावाचून देणें हें अयाचित दान व पात्रभूत ब्राह्मणास आपल्या घरीं बोलावून त्यानें मागितलें नसतां त्यांस सुवर्णादि देणें हें आहूय दान होय. अयाचित दानाचें फल अनंत, आहूय दानाचें फल सहस्रपट व याचितदानाचें फल त्याच्या निम्में मिळतें. पात्र, श्रद्धा व शक्ति हीं दानाचीं मुख्य अंगें आहेत २०३.

आतां गोदान कसें करावें तें सांगतात—

हेमशृङ्गी खुरै रौप्यैः सुशीला वस्त्रसंयुता ।
सकांस्यपात्रा दातव्या क्षीरिणी गौः सदक्षिणा ॥२०४॥

जिचें दान करावयाचें असेल त्या गायीच्या शिंगास सोनें लावावें, खुरांस रुप्याचीं टोपणें बसवावीं व दुभती ( किंवा पुष्कळ दूध देणारी ) ती गाय चांगल्या शीलाची ( म्हणजे गरीब ) असावी. अशी गाय वस्त्रानें वेष्टित करून कांशाच्या पात्रासह व दक्षिणेसह द्यावी. सर्व द्रव्यदानांत गोदान उत्तम मानिलेलें आहे. अग्निहोत्राच्या होमाकरितां जो अयाचित गोदान करितो त्यास तीन वेळ पृथ्वीदान केल्याचें पुण्य लागतें २०४.

दातास्याः स्वर्गमाप्नोति वत्सरान्रोमसंमितान् ।
कपिला चेत्तारयति भूयश्चासप्तमं कुलम् ॥ २०५ ॥

गोप्रदान करणारा दाता त्या गायीच्या अंगावर जितके रोम असतात तितकीं वर्षे स्वर्गांत रहातो. पण ती गाय जर कपिला ( म्ह. पिंगट वर्णाची ) असेल तर ती केवल दात्यासच नव्हे तर त्याच्या कुलांतील सात पुरुषांसही तारिते २०५.

सवत्सारोमतुल्यानि युगान्युभयतोमुखीम् ।
दातास्याः स्वर्गमाप्नोति पूर्वेण विधिना ददत् ॥२०६ ॥

वत्सयुक्त असलेल्या गायीच्या ( म्हणजे त्या दोघांच्याही ) अंगावर जितके रोम असतात तितकीं युगें उभयतोमुखी गायीचें दान करणारा पुरुष ( किंवा स्त्री ) स्वर्गांत राहतो. येथील युग देवयुग समजावें. कारण स्वर्गलोकीं मनुष्यांच्या युगमानानें गणना होत नाहीं. मनुष्यांचीं कृत, त्रेता, द्वापर व कलि हीं चार युगें म्हणजेच देवाचें एक युग होय २०६.

आतां उभयतोमुखी गाय कोणती तें सांगतात—

यावद्वत्सस्य पादौ द्वौ मुखं योन्यां च दृश्यते ।
तावद्गौः पृथिवी ज्ञेया यावद्गर्भं न मुञ्चति ॥ २०७ ॥

जोपर्यंत गर्भाशयांतून बाहेर येणाऱ्या वत्साचे ( वासराचे ) दोन पाय व मुख हीं गायीच्या योनींत दिसत असतात तोंपर्यंत ती गाय उभयतोमुखी होय, व जोंपर्यंत तिचा तो गर्भ बाहेर पडला नाहीं तोंपयत ती पृथ्वी आहे असें समजावें. आणि त्यामुळेंच दात्यास पुष्कळ फळ मिळतें २०७.

आतां सामान्य गोदानाचें फळ सांगतात—

यथाकथंचिद्दत्वा गां धेनुं वाऽधेनुमेव वा ।
अरोगामपरिक्लिष्टां दाता स्वर्गे महीयते ॥ २०८ ॥

पण शृंगांस सुवर्ण, खुरास रुपें इत्यादि उपकरणें देण्याचें सामर्थ्य नसल्यास त्यावाचूनच दुभती किंवा दूध न देणारी पण वांझ नसलेली; नीरोगी व अत्यंत दुर्बल नसलेली गाय दिल्यानें दाता स्वर्गलोकीं मान्य होतो. अपरार्कांत-धेनु म्हणजे नुकतीच व्यालेली व अधेनु म्हणजे जिला विऊन पुष्कळ दिवस झाले आहेत-असें म्हटलें आहे. ज्यास अशा प्रकारची नुसती गाय देण्याचेंही सामर्थ्य नसेल त्यानें गुडधेनु, तिलधेनु, घृतधेनु, जलधेनु, लवणधेनु व शर्करा धेनु द्यावी. गूळ, तिळ इत्यादि पदार्थांचे ठायीं गायीची कल्पना करून तिचें सत्पात्रीं दान करणें यांस गुडादिधेनुदान म्हणतात. त्याचप्रमाणें तुलापुरुषदान, हिरण्यगर्भदान, ब्रह्मांडदान, कल्पवृक्षदान, गोसहस्रदान, हिरण्याश्वदान, हस्तिरथदान, पंचलांगलप्रदान, हैमपृथ्वीदान, विश्वचक्रदान, कल्पलतादान, सप्तसागरदान, रत्नधेनुदान, महाभूतवटदान, धान्यपर्वतदान, लवणपर्वतदान, गुडपर्वतदान, सुवर्णपर्वतदान, तिलपर्वतदान, कार्पासपर्वतदान, घृतपर्वतदान, रत्नपर्वतदान, रजतपर्वतदान, शर्कराचलदान, कृष्णाजिनदान, कालपुरुषदान, नक्षत्रदानें व मासदानें अपरार्कांत पुराणादिकांच्या आधारानें सांगितलेल्या विधानानें द्यावीं. ( दानें किती प्रकारचीं आहेत हें तरी वाचकांस माहीत असावें या हेतूनें येथें त्यांचा केवल नामनिर्देश केला आहे ) २०८.

आतां गोप्रदानाच्या बरोबरीचीं दुसरीं दानें व कर्मे सांगतात--

श्रान्तसंवाहनं रोगिपरिचर्या सुरार्चनम् ।
पादशौचं द्विजोच्छिष्टमार्जनं गोप्रदानवत् ॥ २०९ ॥

जे थकले असतील त्यांस आसन, शयन इत्यादि देऊन त्यांचे श्रम दूर करणें, रोग्यांस यथाशक्ति औषधादि देऊन त्यांची परिचर्या करणें, हरि, हर इत्यादि देवतांची गंधपुष्पादिकांनीं पूजा करणें, ब्राह्मणाचे पाय धुणें व आपल्या बरोबरीच्या किंवा आपणांहून अधिक योग्यतेच्या ब्राह्मणादिकांचीं उष्टीं काढणें हीं वर सांगितलेल्या गोदानाच्या बरोबरचीं कर्मे आहेत. मोठमोठ्या आरोग्यशाला तयार करवून, त्यांत सर्व प्राण्यांच्या सर्व प्रकारच्या रोगांची

चिकित्सा करविणें; अनेक औषधांचा व वैद्यांचा संग्रह करणें आणि रोग्यांस रहाण्याकरितां जागा, त्यांच्या अन्नवस्त्रादिकांकरितां द्रव्य व शुश्रूषेकरितां मनुष्यें यांची व्यवस्था करणें हें एक उत्तमोत्तम पुण्यकर्म आहे. कारण, हें आरोग्य सर्व पुरुषार्थांचें मूळ आहे, शिवाय उपचारांच्या योगानें प्राण्यांच्या पीडेचा नाश कसा होतो, हें प्रत्यक्ष अनुभवास येण्यासारखें आहे. क्षुधितास अन्न, तहानेल्यास पाणी व भीतास अभय दिलें असतां जितका आनंद होतो तितकाच आनंद आरोग्यदानानें रोग्यास होणें साहजिक आहे २०९.

भूदीपांश्चान्नवस्त्राम्भस्तिलसर्पिःप्रतिश्रयान् ॥
नैवेशिकं स्वर्णधुर्यं दत्वा स्वर्गे महीयते ॥ २१० ॥

धान्यादि फळ देणारी भूमि, देवालयादिकांत दीप, अन्न, वस्त्र, तिळ, तूप, प्रवाशी लोकांस राहण्याकरितां धर्मशाला, गृहस्थधर्मार्थ कन्या, सुवर्ण व धुरेस बांधण्यास योग्य झालेला बैल यांचें दान दिलें असतां दाता स्वर्गलोकीं पूज्य होतो. भूदानादिकांचें हें सामान्य फल आहे व ज्ञानतः किंवा अज्ञानतः केलेल्या पापाचा नाश होणें हें गोचर्मप्रमाण भूदानाचें; उत्तम नेत्र प्राप्त होणें हें दीपदानाचें, अक्षयसुख मिळणें हें अन्नदानाचें, चंद्र-सालोक्य मिळणें हें वस्त्रदानाचें, तृप्ति होणें हें जलदानाचें, अनुकूल प्रजा होणें हें तिलदानाचें, दीर्घायुष्य हें घृतदानाचें, उत्तम गृहें मिळणें हें प्रतिश्रय ( धर्मशाला ) दानाचें, असंख्य पुण्यप्राप्ति हें नैवेशिक दानाचें; सर्व देवतादानाचें फल हें सुवर्ण दानाचें, आणि गोलोकवास हें वृषभदानाचें विशेष फल आहे. " नैवेशिक " असा जो एक श्लोकांत शब्द आहे त्याचा अर्थ गृहस्थधर्मार्थ कन्या देणें असा वर केला आहे. पण त्याचा शास्त्रीय अर्थ ज्यास माता, पिता व आप्त नाहींत अशा अनाथ बालकाचें पोषण करून, त्याचे सर्व संस्कार करवून, त्यास विद्यादि निर्वाहाचीं व पुरुषार्थांचीं साधनें शिकवून व त्याचा विवाह करून त्यास रहावयास गृहादि देणें—असा आहे. गोचर्मप्रमाणाचें कोष्टक असें–७ हात म्हणचे दंड, ३० दंड म्हणजे निवर्तन व १० निवर्तन म्हणजे गोचर्म, अर्थात् २१०० हात भूमि २१०.

गृहधान्याभयोपानच्छत्रमाल्यानुलेपनम् ।
यानं वृक्षं प्रियं शय्यां दत्वात्यन्तं सुखी भवेत् ॥ २११॥

रहावयास गृह, तांदुळ, गहूं इत्यादि धान्य, भीतास अभयदान, पायांत घालावयाचे जोडे, छत्री, पुष्पें, केशर, चंदन इत्यादिकांच्या उट्या, रथादि वाहनें, आम्रादिवृक्ष, जें ज्यास प्रिय असेल तें धर्मादि व शय्या हीं देणारा दाता अत्यंत सुखी होतो. सुवर्णादि वस्तूंप्रमाणें धर्मादिकांचें दान करितां येणें शक्य नाहीं असें कोणास वाटेल; पण दान देणें याचा अर्थ उचलून हातांत देणें एवढाच नाहीं कारण तसें समजल्यास भूमिदानही करितां येणार नाहीं. तर दान म्हणजे ज्या वस्तूवर आपलें स्वत्व असतें ती वस्तु संकल्पानें स्वत्व सोडून दुसऱ्याची करणें, म्हणजे तिच्यावरील आपला हक्क काढून घेणें व असा संकल्प करून पुण्यादिकांवरीलही आपला हक्क काढून घेतां येणें शक्य आहे. कारण अमुक एक वस्तु माझी

आहे किंवा तीं माझी नाहीं असें समजणें हें मनाच्या अधीन आहे व संकल्प हें मनाचें कर्म आहे. शिवाय दुसऱ्या स्मृतींत–देवता, गुरु, माता, पिता इत्यादिकांस पुण्यदान करावें–असें सांगितलें आहे. आपलें अपुण्य मात्र कोणास देऊं नये. कारण जो तें देतो व जो भिक्षुक दक्षिणेच्या लोभानें तें घेतो ते दोघेही सहस्रपट अधिक पापी होतात २११.

आतां वेदविद्येच्या दानाचें फल सांगतात—

**सर्वधर्ममयं ब्रह्म प्रदानेभ्योऽधिकं यतः ।**
**तद्ददत्समवाप्नोति ब्रह्मलोकं विमुच्य तम् ॥ २१२ ॥**

ज्याअर्थी वेद सर्व धर्मांचें ज्ञान करून देणारा आहे त्याअर्थी तो सर्व धर्ममय आहे आणि त्यामुळेंच त्याचें अध्यापनाच्या द्वारा दान देणें सर्व दानांहून अधिक आहे. यास्तव वेद शिकविणारा प्रलयकालपर्यंत ब्रह्मलोकीं रहातो. या वेददानामध्यें इतर दानाप्रमाणें देय वस्तूवरील आपला हक्क काढून घेतां येत नाहीं. यास्तव, दुसऱ्यास शिकविणें एवढाच त्याचा अर्थ समजावा. अपरार्कांत या ब्रह्मदानप्रसंगानें इतर विद्यादानांचा व वेद, स्मृत्या, इतिहास, पुराणें इत्यादि ग्रंथांच्या दानाचाही विधि सांगितला आहे. विद्यादानाची प्रशंसा जितकी करावी तितकी थोडीच होय. कारण विद्या हें एक नरकांतून वर निघण्याचें साधन आहे. अन्न, पान, अभय व आरोग्य हीं दानें प्राण्यांस तृप्त करितात हें खरें; पण त्यांची ती तृप्ति फार वेळ टिकत नाहीं. कारण दुसऱ्या दिवशीं पुनः भूक लागते; दोन घटिकांनीं पुनः तहान लागते, चार दिवसांनीं पुनः दुसऱ्या कोणापासून भय उद्भवतें; व महिना पंधरा दिवस लोटले असतां पुनः एकादा रोग होतो. पण विद्यादानापासून होणारी तृप्ति व ऐहिक दुसरा लाभ यावज्जीव टिकतो आणि तिचे उत्तमोत्तम संस्कार तर तो प्राणी मुक्त होई तों राहतात–या प्रकरणांत सांगितलेल्या सर्व दानांचें सविस्तर व सप्रमाण विधान कोणास पहावयाचें असेल्यास त्यानें तें अपरार्कांत पहावें. आतां वर २११ व्या श्लोकाच्या व्याख्यानांत सांगितलेल्या अपुण्याप्रमाणें आणखी कोणत्या वस्तु अदेय आहेत तें सांगतों. समायिक वस्तु, दुसऱ्याची मागून आणलेली वस्तु, ठेव, गहाण, स्त्री, स्त्रीधन, दुसऱ्या कोणास पोंचविण्याकरितां कोणीं दिलेली वस्तु, अमानत वस्तु व कुलामध्यें लोक जिवंत असतांना आपलें सर्वस्व ( म्हणजे सर्व इस्टेट ) या नऊ वस्तु अदेय ( दान न देतां येण्यासारख्या ) आहेत. स्त्रीप्रमाणेंच पुत्राचेंही दान करितां येत नाहीं. व आपत्कालावाचून त्यांचा विक्रयही करितां येत नाहीं. वेदविक्रय करून व स्त्रियांस विकून मिळविलेलें धन आणि नपुंसकापासून मिळालेलें धन देवपितृकार्यांत देऊं नये. अन्यायानें मिळविलेल्या द्रव्यानें जो आपलें किंवा दुसऱ्याचें पारलौकिक कर्म करितो त्यास त्याचें फळ मिळत नाहीं. सोनें, रुपें व तांबें यतीस देऊं नये. गाय, गृह, शय्या व स्त्री यांचें दान एकेक ब्राम्हणासच द्यावें. यांतील एकच वस्तु अनेकांस उद्देशून देऊं नये, कारण त्यांचा विभाग करिता येत नाहीं. कोणी कोणास दान देत असतां " देऊं नको " असें म्हणूं नये २१२.

आतां दान न देतांही दानाचें फल कोणत्या उपायानें मिळतें तें सांगतात--

**प्रतिग्रहसमर्थोऽपि नादत्ते यः प्रतिग्रहम् ।**
**ये लोका दानशीलानां तान्स प्राप्नोति पुष्कलान् ॥ २१३ ॥**

जो पात्रभूत असूनही गाय, भूमि इत्यादिकांचें दान घेत नाहीं, तो जें जें प्राप्त झालेलें दान घेत नाहीं त्याचें त्याचें दान करणारे दाते ज्या ज्या लोकास जातात त्या त्या लोकास जातो २१३.

पण—

**कुशाः शाकं पयो मत्स्या गन्धाः पुष्पं दधि क्षितिः ।**
**मांसं शय्यासनं धानाः प्रत्याख्येयं न वारि च ॥ २१४ ॥**

दर्भ, भाजी, दूध, मासे, सुवासिक द्रव्यें, फुलें, दही, माती, मांस, शय्या, आसन, भाजलेले जवस व जल हे पदार्थ कोणी आपण होऊन आणून दिल्यास त्यांचा स्वीकार करावा. "घेत नाहीं" असें म्हणूं नये. त्याचप्रमाणें गृह, मणी, जळण, फळें, पुढें आलेलें अन्न, मध, घृत व अभय दक्षिणा यांस "नाहीं" म्हणून त्यांचा अव्हेर करूं नये २१४.

कारण--

**अयाचिताहृतं ग्राह्यमपि दुष्कृतकर्मणः ।**
**अन्यत्र कुलटापण्ढपतितेभ्यस्तथा द्विषः ॥ २१५ ॥**

न मागतां आणून दिलेले हे पदार्थ दुष्कर्में करणारापासूनही घ्यावे. मग सत्कर्मी पुरुषांपासून घ्यावे हें सांगणेंच नलगे. पण कुलटा ( व्यभिचारिणी ), स्त्री, नपुंसक, पतित व शत्रु यांच्यापासून ते कधींही घेऊं नयेत. त्याचप्रमाणें वैद्य, शिकार करणारा, वेश्या व नाचणारा यांच्यापासून प्रतिग्रह घेऊं नये. शस्त्र, विष व सुरा हे तीन पदार्थही अप्रतिग्राह्य आहेत २१५.

परंतु—

**देवातिथ्यर्चनकृते गुरुभृत्यार्थमेव च ।**
**सर्वतः प्रतिगृह्णीयादात्मवृत्त्यर्थमेव च ॥ २१६ ॥**

देवता व अतिथि यांचें पूजन अति अवश्य आहे. यास्तव त्यांच्याकरितां व माता, पिता, गुरु इत्यादि व भार्या, पुत्र इत्यादि यांच्याकरितां आणि केवल आपल्या शरीरसंरक्षणाकरितां पतितादि अति निंद्य लोकांस सोडून बाकी दुसऱ्या कोणापासूनही प्रतिग्रह घेण्यास हरकत नाहीं. आपल्या संरक्षणाचा हेतु एकीकडे ठेवून केवल आपल्या तृप्तीकरितां जर कोणी प्रतिग्रह घेऊं लागला तर तो मात्र त्यास पाहिजे त्याच्याकडून घेतां येणार नाहीं. तडाग, आराम इत्यादिकांच्या प्रतिष्ठेचा विधि, वृक्षविधि, प्रपादानविधि व वृषोत्सर्गविधि

अपरार्कांत पहावें. थकलेल्या व उन्हानें संतप्त झालेल्या प्रवाशांच्या मार्गांवर वृक्ष लावणें, सर्व लोकांच्या उपयोगाकरितां बाग व तडाग तयार करून समर्पण करणें व चैत्रादि तीन किंवा चार महिने मुक्तद्वार जल पाजणें हीं सर्व परोपकाराचीं व पुण्यकारक कृत्यें आहेत २१६.

इति दानप्रकरणम् ९.

---

# अथ श्राद्धप्रकरणम् १०.



श्राद्ध हें सुद्धां एकप्रकारचें दानच आहे, यास्तव दानप्रकरण संपतांच श्राद्धकल्पास आरंभ केला आहे. श्राद्ध म्हणजे खाण्यास योग्य असलेल्या पदार्थांचा किंवा त्यांच्याकरितां द्यावयाच्या द्रव्याचा मृत मनुष्यास उद्देशून श्रद्धेनें त्याग ( दान ) करणें. हें श्राद्ध पार्वण व एकोद्दिष्ट असें दोन प्रकारचें आहे. पिता, पितामह व प्रपितामह किंवा माता, पितामही व प्रपितामही अथवा मातामह, मातुःपितामह व मातुःप्रपितामह अशा तीन पितरांस उद्देशून जें श्राद्ध केलें जातें त्यास पार्वण व एकेक पितरासच उद्देशून जें श्राद्ध करितात तें एकोद्दिष्ट श्राद्ध होय. नित्य, नैमित्तिक व काम्य असे आणखी श्राद्धाचे तीन भेद आहेत. नियत निमित्तामुळें होणारें जें श्राद्ध तें नित्य. जसें प्रत्यहीं करावयाचें श्राद्ध, अमावास्या, अष्टका इत्यादि श्राद्धें. अनित्य निमित्तामुळें होणारें जें श्राद्ध तें नैमित्तिक, जसें—पुत्रजन्म, ग्रहण इत्यादिकालीं म्हणजे वर्षांतून केव्हां तरी अनियत समयीं करावयास लागणारें श्राद्ध, व फलकामनेमुळें करावयास लागणारें जें श्राद्ध तें काम्य, जसें-ज्यास स्वर्गाची इच्छा असेल त्यानें कृत्तिका नक्षत्रावर श्राद्ध करावें इत्यादि. अहरहः श्राद्ध, पार्वणश्राद्ध, वृद्धिश्राद्ध, एकोद्दिष्ट श्राद्ध व सपिंडीकरण श्राद्ध असे श्राद्धाचे आणखी पांच भेद आहेत. त्यांतील अहरहः श्राद्ध, " अन्नं पितृमनुष्येभ्यो " १०४ या श्लोकांत सांगितलें आहे.आतां पार्वण व वृद्धिश्राद्ध यांचें प्रतिपादन करण्याकरितां त्यांचे काल सांगतात. कारण काल हा एक अधिकाराचा हेतु आहे. व कोणत्याही कर्माचें अनुष्ठान अधिकारावर अवलंबून असतें—

**अमावास्याऽष्टका वृद्धिः कृष्णपक्षोऽयनद्वयम् ।**
**द्रव्यं ब्राह्मणसंपत्तिर्विषुवत्सूर्यसंक्रमः ॥ २१७ ॥**
**व्यतीपातो गजच्छाया ग्रहणं चंद्रसूर्ययोः ।**
**श्राद्धं प्रति रुचिश्चैव श्राद्धकालाः प्रकीर्तिताः ॥ २१८ ॥**

अमावास्या म्ह० कृष्णपक्षाची पंचदशी (पंधरावी तिथि). चतुर्दशीयुक्त अमावास्येस सिनीवाली व प्रतिपदायुक्त अमावास्येस कुहू म्हणतात. ज्या तिथीस चंद्र दिसत नाहीं ती

अमावास्या अशी हिची व्याख्या मिताक्षरेंत थोडक्यांत सांगितलेली आहे. पण अमावास्या दोन्ही दिवस असल्यास ज्या दिवशीं ती अपराह्णसमयीं असेल ती तिथि श्राद्धास घ्यावी. कारण अपराह्ण हा पितरांचा काल आहे. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत जो काल त्यास दिवस म्हणतात. त्याचे पांच सारिखे भाग केले असतां त्यांतील जो चवथा भाग तोच अपराह्ण होय. जेव्हां तीस घटि दिनमान असतें तेव्हां त्याचे पांच भाग केले असतां सहा घटिकांचा एकेक भाग होतो व चवथा भाग म्हणजे अठराव्या घटिकेच्या अंतापासून चोविसाव्या घटिकेच्या अंतापर्यंतचा काल येतो. अष्टका चार आहेत. हेमंत व शिशिर या ऋतूंच्या म्हणजेच मार्गशीर्ष, पौष, माघ व फाल्गुन या महिन्यांच्या कृष्णपक्षांतील चार अष्टमीस अष्टका कराव्या असें आश्वलायनांनीं सांगितलें आहे. वृद्धि म्हणजे पुत्रजन्मादि उत्सवकाल, कृष्णपक्ष, दक्षिणायन व उत्तरायण ( अर्थात् कर्क व मकर संक्रान्ति ), कृष्णसार मृगाचें मांस इत्यादि द्रव्य, पुढें सांगितल्याप्रमाणें ब्राह्मण मिळणें, मेष व तुला राशींत सूर्याचें संक्रमण, ( ग्रहाचें एका राशींतून दुसऱ्या राशींत आणें यास संक्रमण किंवा संक्रान्ति म्हणतात. ) व्यतीपातसंज्ञक योग, चंद्र मघानक्षत्रांत व सूर्य हस्त नक्षत्रांत असतांना जी त्रयोदशी येते तिला गजच्छाया म्हणतात; अशी गजच्छाया, चंद्र व सूर्य यांचें ग्रहण, कर्त्याची श्राद्धविषयीं रुचि होईल तेव्हां म्हणजे आपण आज श्राद्ध करावें असें वाटेल तो दिवस व त्याचप्रमाणें युगादि, मन्वादि तिथि हे श्राद्धकाल आहेत. " रात्रीं श्राद्ध करूं नये " असा जरी निषेध आहे तरी ग्रहणसमयीं तो प्रवृत्त होत नाहीं. शिवाय ग्रहणसमयीं भोजनाचा जरी निषेध आहे तरी भोजन करणारास दोष लागतो; पण दात्याचा ह्यामुळें मोठा उत्कर्ष होतो. वैशाख शुक्ल तृतीया, कार्तिक शुक्ल नवमी, भाद्रपद कृष्ण त्रयोदशी व माघी पौर्णिमा या चार युगादि व चैत्र शुक्ल तृतीया व पौर्णिमा, ज्येष्ठ शुक्ल पौर्णिमा, आषाढशुक्ल दशमी व पौर्णिमा, श्रावणकृष्णाष्टमी, भाद्रपदशुक्ल तृतीया, आश्विन शुक्ल नवमी, कार्तिक शुक्ल द्वादशी व पौर्णिमा, पौष शुक्ल एकादशी, माघ शुक्ल सप्तमी आणि फाल्गुनी पौर्णिमा व अमावास्या अशा चवदा मन्वादि आहेत. अपरार्कांत याच स्थळीं श्राद्धाचे अधिकारी सांगितलेले आहेत. पण विस्तारभयास्तव मी ते येथें देत नाहीं. शिवाय धर्मसिंधु व निर्णयसिंधु या ग्रंथांत त्यांचा स्पष्ट उल्लेख आहे व त्या ग्रंथांचीं मराठींत भाषांतरेंही झालेलीं आहेत २१७, २१८.

अहरहः श्राद्धास सोडून बाकीचीं जीं चार प्रकारचीं श्राद्धें पुढें सांगावयाचीं आहेत त्यांच्याकरितां ब्राह्मण कसे असावेत ते सांगतात—

अग्र्याः सर्वेषु वेदेषु श्रोत्रियो ब्रह्मविद्युवा ।
वेदार्थविज्ज्येष्ठसामा त्रिमधुस्त्रिसुपर्णिकः ॥ २१९ ॥

ऋग्वेदादि चारी वेदांमध्यें श्रेष्ठ म्हणजे अनन्यमनानें सतत वेदाध्ययन करणारे, शास्त्रार्थज्ञान व वेदाध्ययन यांनीं संपन्न, ब्रह्मज्ञ, तरुण, मंत्रब्राह्मणरूप वेदांचा अर्थ जाणणारा, ज्येष्ठसाम या नांवाचें व्रत करून ज्येष्ठसामाचें अध्ययन करणारा, त्रिमधु हा एक ऋग्वेदाचा

भाग आहे व त्याच नांवाचें व्रत आहे. तें करून तो वेदभाग म्हणणारा, त्रिसुपर्ण म्हणून एक ऋग्वेद व यजुर्वेद यांचा भाग आहे त्याचें त्रिसुपर्ण व्रत करून अध्ययन करणारा, २१९;

स्वस्रीयऋत्विग्जामातृयाज्यश्वशुरमातुलाः ।
त्रिणाचिकेतदौहित्रशिष्यसंवन्धिवान्धवाः ॥ २२० ॥

कर्मनिष्ठास्तपोनिष्ठाः पञ्चाग्निर्ब्रह्मचारिणः ।
पितृमातृपराश्चैव ब्राह्मणाः श्राद्धसंपदः ॥ २२१ ॥

भगिनीपुत्र, ३५ व्या श्लोकांत सांगितलेला ऋत्विज, जामात, आपणास पूज्य असलेला, सासरा, मातुल, त्रिणाचेत व्रत करून त्याच नांवाचा वेदभाग म्हणणारा, कन्येचा पुत्र, शिष्य, संबंधी, मातामहादि बांधव २२०; शास्त्रविहित कर्माचें अनुष्ठान करण्यांत तत्पर असणारे, तपःशील, सभ्य, आवसथ, गार्हपत्य, दक्षिण व आहवनीय हे पांच अग्नि ज्यानें ठेविले आहेत तो व पंचाग्निविद्या पढणारे, उपकुर्वाण व नैष्ठिक असे दोन्ही प्रकारचे ब्रह्मचारी, पिता व माता यांची सेवा करणारे व त्याचप्रमाणें ज्ञाननिष्ठादि ब्राह्मण ( अर्थात् क्षत्रियादि नव्हेत) श्राद्धाच्या अक्षय फलप्राप्तीचे हेतु आहेत. पण २२० व्या श्लोकांत सांगितलेले स्वस्रीयादि ब्राह्मण श्राद्धाकरितां मुख्य नाहींत तर २१९ व्या व या श्लोकांत सांगितलेले ब्राह्मण न मिळाल्यास त्यांस सांगावें २२१.

आतां वर्ज ब्राह्मण सांगतात—

रोगी हीनातिरिक्ताङ्गः काणः पौनर्भवस्तथा ।
अवकीर्णी कुण्डगोलौ कुनखी श्यावदन्तकः ॥२२२॥

ज्यास महारोग झाला आहे; ज्याचे अंग हीन किंवा अधिक आहे, ज्यास एकच नेत्र आहे, अंध, बधिर, वृद्ध, ज्याच्या मस्तकास टक्कल पडलें आहे तो, ज्याची कातडी वाईट आहे, म्हणजे ज्याच्या अंगावर शिरें आहे,तो ६७ व्या श्लोकांत सांगितलेल्या पुनर्भूचा पुत्र, ज्याचें ब्रम्हचर्य स्खलित ( भ्रष्ट ) झालें आहे असा ब्रह्मचारी, ( पति जीवंत असतांना परपुरुषापासून झालेला कुंड व पति मेला असतां दुसऱ्यापासून होणारा गोलक पुत्र होय. हे ) कुंड व गोळक, ज्याचीं नखें संकुचित आहेत तो; ज्याचे दांत स्वभावतांच काळे असतात तो २२२.

भृतकाध्यापकः क्लीबः कन्यादूष्यभिशस्तकः ।
मित्रध्रुक्पिशुनः सोमविक्रयी परिविन्दकः ॥ २२३ ॥

वेतन घेऊन वेदविद्या शिकविणारा व वेतन देऊन शिकणारा; नपुंसक, खऱ्या किंवा खोट्या दोषांनीं कन्येस दूषित करणारा, ब्रह्महत्यादि पापांचा खरा किंवा खोटा आरोप ज्याच्यावर आला आहे तो, मित्रांचा द्रोह करणारा, दुसऱ्याचे दोष सांगत सुटणारा, यज्ञांत

सोमाचा विक्रय करणारा, वडीलभावाचा विवाह झालेला नसतांना विवाह करणारा किंवा त्याने अग्निपरिग्रह केला नसतांना अग्निग्रहण करणारा कनिष्ठ भ्राता ( परिवेत्ता ) २२३.

**मातापितृगुरुत्यागी कुण्डाशी वृषलात्मजः ।**
**परपूर्वापतिः स्तेनः कर्मदुष्टाश्च निन्दिताः ॥ २२४ ॥**

कारणावाचून माता, पिता व गुरु यांचा व त्याचप्रमाणें भार्यापुत्रादिकांचा त्याग करणारा, वर सांगितलेल्या कुंडाचें व गोलकाचें अन्न भक्षण करणारा, धर्मभ्रष्टाचा पुत्र, पुनर्भूचा पति, कोणी न देतांच दुसऱ्याची वस्तु घेणारा, शास्त्रविरुद्ध आचरण करणारे, जुगारी, देवपूजेवर निर्वाह करणारा इत्यादि ब्राह्मण श्राद्धास उक्त नाहींत. अर्थात् त्यांचा प्रतिषेध केलेला आहे. अर्थात् वर सांगितलेले योग्य ब्राह्मण न मिळाल्यास या निषिद्ध ब्राह्मणांवाचून इतर सांगावेत. यांस मात्र कधींही सांगूं नये. वेदाक्षररहित, खोटी साक्षी देणारा, प्राण्यांचा व्यापार करणारा, कृतघ्न, स्त्रींजित, सार्वजनिक वस्तूंचा नाश करणारा, विधर्म शिकणारा इत्यादि दुसरेही आणखी अनेक निषिद्ध ब्राह्मण अपरार्कांत सांगितलेले आहेत. व त्यांत ब्रह्मपुराणाचें वचन देऊन द्रविड, कर्नाटकी व कोंकणस्थ ब्राह्मणांसही वर्ज करावें असें पर्यायानें म्हटलें आहे २२४.

याप्रमाणें श्राद्धकाल व ब्राह्मण सांगून आतां पार्वणप्रयोग सांगतात--

**निमन्त्रयेत पूर्वेद्युर्ब्राह्मणानात्मवान्शुचिः ॥**
**तैश्चापि संयतैर्भाव्यं मनोवाक्कायकर्मभिः ॥ २२५ ॥**

वर सांगितलेल्या प्रकारच्या ब्राह्मणांस " श्राद्धे क्षणः क्रियतां " असें म्हणून श्राद्धाच्या पूर्वदिवशीं किंवा श्राद्ध असेल त्याच दिवशीं निमंत्रण द्यावें. श्राद्धकर्त्यानें त्या वेळेपासून आत्मवान् म्हणजे शोक, उन्मादादिरहित किंवा जितेंद्रिय व शुचि ( शुद्ध ) रहावें. त्याचप्रमाणें ज्यांस निमंत्रण दिलें आहे त्या ब्राह्मणांनींही कायिक वाचिक व मानसिक व्यवहार नियमित करावे. क्रोध न करणें, मंद भाषण करणें, चित्त शांत ठेवणें, श्रद्धायुक्त होणें, त्वरा न करणें, कर्मामध्यें तत्पर होणें इत्यादि नियम श्राद्धकर्त्यास व श्राद्धांत भोजन करणाऱ्या ब्राह्मणास अवश्य पाळले पाहिजेत २२५.

**अपराह्णे समभ्यर्च्य स्वागतेनागतांस्तु तान् ।**
**पवित्रपाणिराचान्तानासनेषूपवेशयेत् ॥२२६ ॥**

२१७ व २१८ या श्लोकांच्या व्याख्यानांत सांगितलेल्या अपराह्णसमयीं त्या निमंत्रित ब्राह्मणांस बोलावून आणून आपल्या घरीं आलेल्या त्यांचें " स्वागत असो " या वचनानें पूजन करून ज्यांनीं आपले पाय धुतले आहेत, आचमन केलें आहे व हातांत पवित्रकें घातलीं आहेत अशा त्यांस पवित्रकें घातलेल्या यजमानानें आसनांवर बसवावें. येथें जरी सामान्यतः अपराह्णकाल सांगितलेला आहे तरी श्राद्धकर्म कुतपमुहूर्तावर आरंभून त्या मुहूर्तापासून पांचव्या

मुहूर्ताच्या आंत तें संपविणें श्रेयस्कर होय. दोन घटिका म्हणजे एक मुहूर्त. दिनमानाचे पंधरा भाग केले असतां त्यांतील आठवा भाग कुतपमुहूर्त होय. कुतप पापाचा नाश करणारा आहे. श्राद्धप्रकरणीं मध्यान्ह, खड्गपात्र, शाल, रुपें, दर्भ, तिल, गाय व कन्येचा पुत्र हे आठ कुतप मानलेले आहेत. यास्तव, दिवसाच्या आठव्या मुहूर्तावर आरंभ करून बारावा मुहूर्त संपण्याच्या आंत श्राद्धकर्म आटपून घ्यावें २२६.

युग्मान्दैवे यथाशक्ति पित्र्ये युग्मांस्तथैव च ।
परिस्तृते शुचौ देशे दक्षिणाप्रवणे तथा ॥ २२७ ॥

वृद्धिश्राद्धामध्यें आपल्या शक्तीप्रमाणें दोन किंवा चार किंवा सहा किंवा याहूनही अधिक पण सम ब्राह्मण बसवावेत. त्यांतही विश्वेदेवांच्या स्थानीं दोन दोन, माता, पितामही व प्रपितामही या तिघींच्या स्थानीं दोन अथवा प्रत्येकींच्या स्थानीं दोन दोन, त्याचप्रमाणें पिता, पितामह व प्रपितामह यांच्या स्थानीं दोन किंवा प्रत्येकाच्या स्थानीं दोन दोन व मातामहादि तिघांच्या स्थानीं दोन अथवा प्रत्येकाच्या स्थानीं दोन दोन ब्राह्मण बसवावेत अथवा तिन्हीं वर्गांत विश्वेदेवांच्या स्थानीं दोनच ब्राह्मण बसवावे. प्रत्येक पार्वणास भिन्न भिन्न विश्वेदेव करण्याचें कारण नाहीं. पण पार्वणश्राद्धांत विषम ब्राह्मण बसवावेत व हें सर्व श्राद्धकर्म गोमयानें सारविलेल्या, पवित्र, दर्भादिकांनीं सर्वतः आच्छादित व दक्षिणेकडे उतरत्या भूमीवर करावें २२७.

पार्वण श्राद्धांत विषम ब्राह्मण बसवावेत असें सांगितलें आहे; पण त्यांतील विश्वेदेवांच्या स्थानींही विषम ब्राह्मणच बसवावेत कीं काय अशी शंका येऊं नये म्हणून सांगतात—

द्वौ दैवे प्राक्त्रयः पित्र्ये उदगेकैकमेव च ।
मातामहानामप्येवं तन्त्रं वा वैश्वदेविकम् ॥ २२८ ॥

विश्वेदेवांच्या स्थानीं पार्वण श्राद्धांतही दोनच ब्राह्मण पूर्वेकडे तोंड करून बसवावे, व पिता, पितामह इत्यादिकांच्या स्थानीं तीन ब्राम्हण उत्तराभिमुख बसवावेत. किंवा इतके ब्राम्हण मिळणें अशक्य झाल्यास देव व पितर या दोघांच्याही स्थानीं एकेकच ब्राह्मण बसवावा. मातामहादिकांच्या श्राद्धामध्येंही असेंच करावें. किंवा पितृश्राद्ध व मातामहश्राद्ध यांमध्यें वैश्वदेविक तंत्र करावें. म्हणजे दोन्ही श्राद्धांत एकच वैश्वदेवस्थान करावें किंवा दोनच ब्राह्मण मिळाल्यास विश्वेदेवांच्या स्थानीं पान ठेवून दोन्ही श्राद्धांत एकेक ब्राह्मण बसवावा व त्या विश्वेदेवांच्या पानावरील अन्नाचा अग्नींत होम करावा अथवा तें ब्रह्मचाऱ्यास द्यावें २२८.

त्या नंतर—

पाणिप्रक्षालनं दत्वा विष्टरार्थं कुशानपि ।
आवाहयेदनुज्ञातो विश्वेदेवास इत्यृचा ॥ २२९ ॥

विश्वेदेवांच्या स्थानीं बसविलेल्या ब्राह्मणांच्या हातावर जल देऊन व आसनाकरितां दक्षिणबाजूस समदर्भ दुहेरी करून देऊन " तुमच्या ठायीं विश्वेदेवांचें आवाहन करूं काय ?" असें त्या ब्राह्मणांस विचारून त्यांनीं " आवाहन कर " अशी आज्ञा दिली असतां " विश्वेदेवास आगत० " या ऋचेनें व " आगच्छन्तु महाभागा० " या स्मार्त मंत्रानें त्यांचें आवाहन करावें. हें यज्ञोपवीतीनें व उजवीकडून करणें प्रशस्त आहे २२९.

यवैरन्ववकीर्याथ भाजने सपवित्रके।
शन्नोदेव्या पयः क्षिप्त्वा यवोसीति यवांस्तथा ॥२३०॥
या दिव्या इति मन्त्रेण हस्तेष्वर्घ्यं विनिक्षिपेत् ।
दत्वोदकं गन्धमाल्यं धूपदानं सदीपकम् ॥ २३१ ॥
तथाच्छादनदानं च करशौचार्थमम्बु च ।
अपसव्यं ततः कृत्वा पितॄणामप्रदक्षिणम् ॥ २३२ ॥
द्विगुणांस्तु कुशान्दत्वा ह्युशन्तस्त्वेत्यृचा पितॄन् ।
आवाह्य तदनुज्ञातो जपेदायन्तु नस्ततः ॥ २३३ ॥

त्यानंतर विश्वेदेवस्थानीं बसविलेल्या ब्राम्हणांच्या समीप भूमीवर उजवीकडून यव पसरून त्यावर तैजसादि पात्र ठेवावें, नंतर त्यांत दोन कुशांचें पवित्र घालून "शन्नो देवी:०" या मंत्रानें पाणी; " यवोसि धान्यराजो वा० " या मंत्रानें यव व गंधपुष्पादि घालावें. त्यानंतर अर्घ्यपात्रांतील पवित्र ब्राह्मणाच्या हातावर धरून " या दिव्या आपः " या मंत्रानें " विश्वेदेवा इदं वो अर्घ्यं " असें म्हणून तें पात्रांतील अर्घ्य द्यावें. पुढें हस्तशुद्ध्यर्थ उदक देऊन क्रमानें गंध, पुष्प, धूप व दीप अर्पण करावा. आच्छादन द्यावें. गंधपुष्पें इत्यादिकांविषयीं विष्णु, शंख, इत्यादि स्मृतिकारांनीं विशेष सांगितला आहे तो असा—चंदन, केशर, कर्पूर, अगरु, इत्यादि उपलेपनाकरितां द्यावें. श्राद्धांत जाईचीं फुलें प्रशस्त आहेत. मोगरीचीं फुलें, जुईचीं फुलें व जलांत उत्पन्न होणारीं सर्व पुष्पें युक्त आहेत. पण उग्र वासाचीं व ज्यास मुळींच वास नाहीं अशीं व स्मशानादि अपवित्र जागेंतील फुलें वर्ज आहेत. लाल पुष्पें, कांटेऱ्या वृक्षाचीं फुलें श्राद्धकर्मांत प्रशस्त नाहींत. कांह्यावांचून शुभ्र व सुगंधी पुष्पें तसेंच लाल कमल व कुंकूं हीं ब्राह्मणांस अर्पण करावींत. प्राण्यांच्या अंगापासून झालेला पदार्थ अर्थात् कस्तुरी इत्यादि धूपाकरितां देऊं नये. तर घृत व मध यांसह गुग्गुल, चंदन, अगरु, देवदारु, राळ इत्यादि पदार्थांचा धूप द्यावा. तुपाचा किंवा तिळाच्या तेलाचा दीप लावावा. ब्राह्मणांस जें आच्छादन द्यावयाचें तें नवें, एकदांच धुतलेलें, शुभ्र व दशांसह असावें. हें सर्व विश्वेदेवस्थानीय ब्राह्मणांचें अर्चन उत्तराभिमुख बसून करावें. त्यानंतर अपसव्य करून पित्रादि तिघांच्या स्थानीं बसलेल्या ब्राह्मणांस डावीकडे, विषम दर्भ, मध्यें दुमडून, त्याचें आसन द्यावें. या आसनार्थ दर्भदानापूर्वी व नंतर जल द्यावें. त्यानंतर पिता,

पितामह व प्रपितामह यांचें आवाहन करितों असें ब्राह्मणांस विचारून " आवाहय " अशी त्यांनीं अनुज्ञा दिली असतां " उशन्तस्त्वा० " या ऋचेनें पितरांचें आवाहन करून " आयन्तु नः पितरः " या मंत्रानें त्यांचें उपस्थान करावें. ( उपस्थान म्हणजे उभें राहून मंत्रपाठपूर्वक स्तुति करणें. ) २३०–२३३.

अपहता इति तिलान्विकीर्य च समन्ततः ।
यवार्थास्तु तिलैः कार्याः कुर्यादर्घ्यादि पूर्ववत् ॥ २३४ ॥
दत्वार्घ्यं संस्रवांस्तेषां पात्रे कृत्वा विधानतः ।
पितृभ्यः स्थानमसीति न्युब्जं पात्रं करोत्यधः ॥ २३५ ॥

या पितृपूजेमध्यें देवपूजेंतील यवांचीं सर्व कार्यें तिळांनीं करावीं, व अर्घ्यपात्र ठेवणें येथपासून आच्छादन देणें येथपर्यंत सर्व कर्म वर सांगितल्याप्रमाणें करावें. पण त्यांतील विशेष सांगतों. " अपहतासुरारक्षांसि० " या मंत्रानें भूमीवर डावीकडून तिळ पसरून त्यांवर रुप्यांचीं तीन पात्रें ठेवावीं‌त. रुप्याचें पात्र नसल्यास पानांचे द्रोण चालतील. त्यांच्यावर विषम दर्भांचे केलेले कूर्च ठेवावे. " शंनो देवीः " या मंत्रानें पाणी ओतावें; "तिलोसि सोम० " या मंत्रानें तिळ, गंध, पुष्पें इत्यादि घालून "स्वधार्घ्याः" असें म्हणून ब्राह्मणांच्यापुढें अर्घ्यपात्रें स्थापून " दिव्या० " इत्यादि मंत्राच्या शेवटीं " पितरिदं तेऽर्घ्यं " इत्यादि म्हणून ब्राह्मणांच्या हातावर अर्घ्य द्यावें. वर सांगितल्याप्रमाणें देव व पितर यांच्या स्थानीं एकेक ब्राह्मण जरी असला तरी तीन अर्घ्यपात्रें करावीं. या प्रमाणें अर्घ्य देऊन त्या अर्घ्याचे संस्रव म्हणजे ब्राह्मणांच्या हातांवरून गळलेलें जल पितृपात्रांत धरून दक्षिणेकडे अग्रें केलेला कुशस्तंब भूमीवर ठेवून त्याच्यावर " पितृभ्यः स्थानमसि " यामंत्रानें तें पात्र उपडें करावें व त्याच्यावर अर्घ्यपात्रांतील पवित्रें ठेवावीं‌त. त्यानंतर गंध, पुष्पें, धूप,दीप, आच्छादन इत्यादि समर्पण करावें. २३४,२३५

आतां अग्नौकरणाचा प्रकार सांगतात—

अग्नौ करिष्यन्नादाय पृच्छत्यन्नं घृतप्लुतम् ॥
कुरुष्वेत्यभ्यनुज्ञातो हुत्वाग्नौ पितृयज्ञवत् ॥ २३६ ॥
हुतशेषं प्रदद्यात्तु भाजनेषु समाहितः ॥
यथालाभोपपन्नेषु रौप्येषु च विशेषतः ॥ २३७ ॥

त्यानंतर अग्नौकरण करण्याकरितां तुपानें भिजलेला भात हातांत घेऊन श्राद्धकर्त्यानें " मी अग्नौकरण करूं ? " असें ब्राह्मणांस विचारावें. त्या अन्नांत वरण, भाजा इत्यादि कांहींएक मिसळूं नये. ब्राह्मणांनीं " कर " असें म्हणून आज्ञा दिली असतां प्राचीनावीति करून अग्नीस प्रज्वलित करावें. त्यानंतर त्यांत पिंडपितृयज्ञकल्पानें होम करावा व होम करून

राहिलेलें अन्न पितृस्थानीय ब्राह्मणांच्या पानांत (शक्य असल्यास पितरांकरितां रुप्याचीं पात्रें प्रशस्त होत ) घालावें. देवस्थानीं बसलेल्या ब्राह्मणांच्या पानांत घालूं नये. तें अन्न घालतांना चित्त दुसऱ्या कोणत्याही कृत्यांत लावूं नये. तर त्यावेळीं अनन्यमनस्क व्हावें. या अग्निकरणाचे, साग्निक, निराग्निक, आश्वलायन, हिरण्यकेशी इत्यादिकांस उद्देशून अनेक विकल्प व अनुष्ठानभेद आहेत. पण त्यांचा सर्वसाधारण वाचकांस फारसा उपयोग नाहीं, म्हणून येथें विस्तार करणें व्यर्थ आहे २३६, २३७.

नंतर—

दत्वान्नं पृथिवीपात्रमिति पात्राभिमन्त्रणम् ।
कृत्वेदं विष्णुरित्यन्ने द्विजाङ्गुष्ठं निवेशयेत् ॥ २३८ ॥

ब्राह्मणांच्या पात्रांमध्यें भात, वरण, भाज्या, क्षीर, घृत इत्यादि सर्व पदार्थ वाढून झाल्यावर " पृथिवी ते पात्रं०" इत्यादि मंत्रानें पात्रांचें अभिमंत्रण करावें व " इदं विष्णुर्विचक्रमे० " या मंत्रानें ब्राह्मणाचा आंगठा त्या अन्नांत घालावा. देवस्थानीय ब्राह्मणांचें पात्राभिमंत्रण करतांना सव्य करावें व "विष्णो हव्यं रक्ष" असें म्हणावें. व पितरांच्या पात्राभिमंत्रणाच्या वेळीं अपसव्य करावें आणि " विष्णो कव्यं रक्ष " असें म्हणावें २३८.

सव्याहृतिकां गायत्रीं मधुवाता इति तृचम् ।
जप्त्वा यथासुखं वाच्यं भुञ्जीरंस्तेऽपि वाग्यताः ॥२३९॥

त्यानंतर विश्वेदेव आणि पितर यांस तें पात्रांत वाढलेलें व वाढावयाचें अन्न निवेदन करून ब्राह्मणांस आपोशन द्यावें. व २३ व्या श्लोकांत सांगितलेल्या व्याहृतींसह गायत्रीचा व " मधुवाता० " या तीन ऋचांचा जप करून " मधु, मधु, मधु " असें तीन वेळ म्हणून " यथासुखं जुषध्वं " म्हणजे आनंदानें भोजनाचें सेवन करावें असें ब्राह्मणांस सांगावें. त्या ब्राह्मणांनींही वाणीचें नियमन करून म्हणजे मौन धरून भोजन करावें २३९.

अन्नमिष्टं हविष्यं च दद्यादक्रोधनोऽत्वरः ।
आतृप्तेस्तु पवित्राणि जप्त्वा पूर्वजपं तथा ॥ २४० ॥

ब्राह्मणांस, मृतपुरुषांस किंवा कर्त्यास आवडणारें भक्ष्य, भोज्य, लेह्य, चोष्य व पेय असें पांच प्रकारचे श्राद्धहवीस योग्य असलेलें अन्न क्रोध व त्वरा न करितां ब्राह्मणांच्या तृप्तीपर्यंत द्यावें. अर्थात् त्यांच्या पानांत कांहीं राहील इतकें अन्न वाढावें. कारण ते तृप्त झाल्यावर त्यांच्या पानांत जें अन्न राहिलेलें असतें तो दासवर्गाचा भाग असतो. तयार केलेल्या पदार्थांतील जो हवा असेल तो ब्राह्मणांनीं मागून घ्यावा. नको असेल तर तो खुशाल टाकावा. असो. ब्राह्मणांचें—तृप्त होई तों—भोजन चाललें असतांना यजमानानें स्वतः किंवा दुसऱ्याकडून पुरुषसूक्त, पवमान इत्यादि सूक्तें, यजुमंत्र, सामें, व उपनिषदादि म्हणवावीं. ते तृप्त झाले आहेत असें जाणून व्याहृतिसह गायत्रीचा जप करावा २४०.

त्यानंतर—

**अन्नमादाय तृप्ताः स्थ शेषं चैवानुमान्य च ॥**
**तदन्नं विकिरेद्भूमौ दद्याच्चापः सकृत्सकृत् ॥ २४१ ॥**

थोडें थोडें अन्न एका पात्रांत घेऊन " तृप्त ब्राह्मणांनीं जें जें अन्न खाल्लें असेल त्यातील झालां ? " असें त्यांस विचारून त्या ब्राह्मणांनीं " होय. आम्हीं तृप्त झालों आहों " असें सांगितलें असतां " शेष अन्नही आहे; त्याचें काय करावें ? " असें विचारावें. म्हणजे ते " इष्टमित्रांसह तें भक्षण करा " असें सांगतात. त्यानंतर पितृस्थानीं बसलेल्या ब्राह्मणांच्या पुढें उच्छ्याजवळच भूमीवर दक्षिणाग्र दर्भ हांतरून त्यांवर अगोदर तिलोदकाचा प्रक्षेप करून " ये अग्निदग्धा० " या ऋचेनें तें अन्न ठेवावें व पुनः तिलोदक द्यावें. पुढें ब्राह्मणांच्या हाता-वर आपोशनाकरितां एकेकदां जल द्यावें २४१.

**सर्वमन्नमुपादाय सतिलं दक्षिणामुखः ॥**
**उच्छिष्टसन्निधौ पिण्डान्दद्याद्वै पितृयज्ञवत् ॥ २४२ ॥**

पिण्डापितृयज्ञाच्या विधिप्रमाणें करावें असें म्हटलें आहे. यास्तव चरु शिजविलेला असल्यास अग्नौकरणांतून राहिलेल्या चरूसह सर्व अन्नांतील थोडा थोडा भाग घेऊन अग्निवें-जवळच पिंड द्यावे. पण चरु शिजविलेला नसल्यास ब्राह्मणांकरितां केलेल्या अन्नांतील सर्व प्रकारचें अन्न एका पात्रांत घेऊन व त्यांत तिळ घालून उच्छ्याजवळच दक्षिणामुख होऊन पिंडापितृयज्ञविधीनें पिंड द्यावेत २४२.

**मातामहानामप्येवं दद्यादाचमनं ततः ॥**
**स्वस्तिवाच्यं ततः कुर्यादक्षय्योदकमेव च ॥ २४३ ॥**

मातामहादिकांचेंही विश्वेदेवांच्या आवाहनापासून पिंडप्रदानापर्यंत सर्व कर्म असेंच करावें. त्यानंतर ब्राह्मणांस आचमन द्यावें. पुढें ब्राह्मणांकडून " स्वस्ति ब्रूत " म्हणचे स्वस्तिवाचन करा असें सांगून स्वस्ति वाचन करवावें. त्यांनीं " स्वस्ति " असें म्हटल्यावर " अक्षय्यम-स्त्विति ब्रूत " म्हणजे हें अक्षय्य होवो असें म्हणा अशी प्रार्थना करून ब्राह्मणांच्या हाता-वर उदक द्यावें व त्यांनीं " अक्षय्यमस्तु " असें म्हणावें २४३.

अनंतर—

**दत्वा तु दक्षिणां शक्त्या स्वधाकारमुदाहरेत् ।**
**वाच्यतामित्यनुज्ञातः प्रकृतेभ्यः स्वधोच्यताम् ॥ २४४॥**

पितरांस रुप्याची व देवांस सुवर्णाची दक्षिणा यथाशक्ति द्यावी. व आतां मी स्वधा-म्हणवितों असें म्हणून पित्रादिकांस व मातामहादिकांस उद्देशून स्वधाकार म्हणावा २४४.

ब्रूयुरस्तु स्वधेत्युक्ते भूमौ सिञ्चेत्ततो जलम् ।
विश्वेदेवाश्च प्रीयन्तां विप्रैश्चोक्त इदं जपेत् ॥ २४५ ॥

त्या ब्राह्मणांनीं " अस्तु स्वधा " असें म्हणावें. पुढें त्यांनीं असें म्हटलें असतां कमंडलूनें भूमीवर उदक शिंपडावें. त्यानंतर विश्वेदेव संतुष्ट होवोत, असें म्हणावें व ब्राह्मणांनीं त्याचा अनुवाद करावा. नंतर पुढील श्लोकांत सांगितल्याप्रमाणें म्हणावें २४५.

दातारो नोऽभिवर्धन्तां वेदाः संततिरेव च ॥
श्रद्धा च नो मा व्यगमद्बहु देयं च नोऽस्तु ॥ २४६ ॥

हिरण्यादिकांचें दान करणारे आमच्या कुलांत अनेक होवोत. अध्ययन, अध्यापन, अर्थज्ञान व त्याप्रमाणें अनुष्ठान यांच्या योगानें वेदांची वृद्धि होवो. पुत्र, पौत्र इत्यादिकांच्या द्वारा आमची संतति वाढो. आमची पितृकर्मावरील आस्था न उडो व सुवर्णादि-दान करावयाचे-पदार्थ आम्हांस पुष्कळ मिळोत २४६.

इत्युक्त्वोक्त्वा प्रिया वाचः प्रणिपत्य विसर्जयेत् ॥
वाजे वाज इति प्रीतः पितृपूर्वं विसर्जयेत् ॥ २४७ ॥

याप्रमाणें वरील प्रार्थनामंत्राचा जप करून " आम्ही आज तुमच्या दर्शनानें धन्य झालों, आपल्या चरणकमलावरील धुळीनें आमचें मंदिर पवित्र झालें. शाका ( भाज्या ) इत्यादि पदार्थांच्या योगानें आम्ही आपणांस फार क्लेश दिले; पण त्याचा विचार न करतां आपण आमच्यावर मोठा अनुग्रह केलात. " इत्यादि प्रिय भाषणें बोलून—व प्रदक्षिणा-पूर्वक नमस्कार करून त्यांचें विसर्जन करावें. " वाजे वाजे ० " या मंत्रानें प्रथम पितृगण किंवा मातामहादि गण व नंतर विश्वेदेव या क्रमानें दर्भांच्या स्पर्शानें " उत्तिष्ठत पितरः " असें संतुष्ट मनानें म्हणून त्यांचें विसर्जन करावें २४७.

यस्मिंस्ते संस्रवाः पूर्वमर्घ्यपात्रे निवेशिताः
पितृपात्रं तदुत्तानं कृत्वा विप्रान्विसर्जयेत् ॥ २४८ ॥

पण पूर्वी ज्या अर्घ्यपात्रांत अर्घ्य दिल्यानंतर ब्राह्मणाच्या हातावरील जल ( संस्रव ) सांठविलें होतें व ज्याचें स्थापन केलें होतें तें उपडें असलेलें पितृपात्र अगोदर उताणें करावें व नंतर वर सांगितल्याप्रमाणें ब्राह्मणांचें विसर्जन करावें. अर्थात् २४६ व्या श्लोकांत सांगितलेल्या आशीर्वादरूप मंत्राच्या जपानंतर व " वाजे वाजे ० " या मंत्राच्यापूर्वी हें कर्म करावें २४८.

त्यानंतर—

प्रदक्षिणमनुव्रज्य भुंजीत पितृसेवितम् ।
ब्रह्मचारी भवेत्तां तु रजनीं ब्राह्मणैः सह ॥ २४९ ॥

गृहाच्या सीमेपर्यंत ब्राह्मणांच्या मागून त्यांस पोंचवीत जावें व त्यांनीं "बरें, बसा आतां" असें सांगितलें असतां त्यांस प्रदक्षिणा घालून श्राद्धकर्त्यानें घरांत परत यावें व पितरांनीं खाऊन राहिलेलें अन्न इष्टमित्रांसह अवश्य खावें. ज्या दिवशीं श्राद्ध केलें असेल त्या रात्रीं ब्राह्मणांसह श्राद्धकर्त्यानें ब्रह्मचारी रहावें व पुनः भोजनही करूं नये २४९.

याप्रमाणें पार्वणश्राद्ध सांगून आतां वृद्धिश्राद्ध सांगतात—

**एवं प्रदक्षिणावृत्को वृद्धौ नान्दीमुखान्पितॄन् ।**
**यजेत दधिकर्कन्धुमिश्रान्पिण्डान्यवैः क्रियाः ॥ २५० ॥**

पुत्रजन्मादि निमित्तामुळें करावयास लागणारें जें वृद्धिश्राद्ध त्यांत वर सांगितल्याप्रमाणेंच पण उजवीकडून सर्व कर्म करावें. त्या श्राद्धांतील पितरांस नान्दीमुख असें म्हणतात. यास्तव मी नान्दीमुख पितरांचें आवाहन करितों; नान्दीमुख मातामहाचें आवाहन करितों; असा उच्चार करावा; व दहीं व बोरें यांनीं मिश्रित असे पिंड देऊन त्यांचें पूजन करावें. पार्वणश्राद्धांत तिळांनीं करावयाच्या सर्व क्रिया या श्राद्धांत यवांनीं कराव्या. या श्राद्धांत ब्राह्मण किती सांगावेत ते २२७ व्या श्लोकांत सांगितलेंच आहे. या श्राद्धांत आणखी कांहीं विशेष ध्यानांत ठेवण्यासारिखे आहेत ते असेः—दर्भ मुळांसह घेऊं नयेत; पूर्वेकडे तोंड करून सव्य यज्ञोपवीतानें पितृपूजन करावें. दोन दोन सरळ दर्भांचें आसन द्यावें. स्वधा या शब्दाचा उच्चार करूं नये. तर जेथें "स्वधा" म्हणावयाचें असेल तेथें स्वाहा म्हणावें. अग्नौकरणांतील अग्नींत द्यावयाचा होम हातावर करावा. मधुव्रता या तीन ऋचांच्या जागीं "उपास्मै गायत०" या पांच व "अक्षंममीमदन्त" ही सहावी अशा सहा ऋचा म्हणाव्यात. ब्राह्मणांचें भोजन होऊन त्यांनीं आचमन केलें असतां तेथील उच्छिष्ट भूमि गाईच्या शेणानें सारवून पूर्वेकडे अग्रें करून दर्भ पसरावे. व त्यांवर दहीं व घृत यांनीं मिश्रित केलेल्या अवशिष्ट अन्नाचे प्रत्येकास दोन दोन पिंड द्यावेत. या श्लोकांत "पितॄन्" असें जरी म्हटलें आहे तरी प्रथम मातृश्राद्ध, नंतर पितृश्राद्ध व शेवटीं सपत्नीक मातामहश्राद्ध, अशीं क्रमानें तीन श्राद्धें करावींत २५०.

आतां एकोद्दिष्ट श्राद्ध सांगतात—

**एकोद्दिष्टं दैवहीनमेकार्घ्यैकपवित्रकम् ।**
**आवाहनाग्नौकरणरहितं ह्यपसव्यवत् ॥ २५१ ॥**

ज्या श्राद्धांत एकाच मृत मनुष्याचा उद्देश करावयाचा असतो त्यास एकोद्दिष्ट असें म्हणतात. "पार्वण श्राद्धाप्रमाणेंच बाकी सर्व कर्म करावें" असें पुढें २५४ व्या श्लोकांत सांगणार आहेत. यास्तव या श्राद्धांत पार्वणापेक्षां अधिक काय आहे तेवढेंच सांगतात–हें श्राद्ध विश्वेदेवरहित होतें. यांत अर्घ्यपात्र एकच असतें. पवित्रक एका दर्भाचें करितात. या श्राद्धांत पितरांचें आवाहन करीत नाहींत. अग्नौकरण होमही नाहीं, व सर्व कर्म अपसव्यानें करावें २५१.

उपतिष्ठतामक्षय्यस्थाने विप्रविसर्जने ॥
अभिरम्यतामिति वदेद्ब्रूयुस्तेऽभिरताः स्म ह ॥ २५२ ॥

त्यानंतर स्वस्तिवाचन करवावें असें वर २४३ व्या श्लोकांत म्हटलें आहे. पण या श्राद्धांत त्या स्वस्तिवाचनाच्या जागीं " अक्षय्यस्थाने उपतिष्ठताम् " असें म्हणावें व ब्राह्मण-विसर्जन प्रसंगीं " वाजे वाजे० " या जपानंतर ब्राह्मणांच्या हातास दर्भाचा स्पर्श करून ' अभिरम्यतां " असें म्हणावें आणि ब्राह्मणांनीं " अभिरताः स्मः " असें प्रतिवचन द्यावें हें एकोद्दिष्ट श्राद्ध मध्याह्नसमयीं करावें. कारण दैव कर्म पूर्वाह्णीं, पितृकर्म अपराह्णीं, एकोद्दिष्ट मध्याह्नीं व वृद्धिश्राद्ध प्रातःकालीं ( म्हणजे सूर्योदयानंतर सहा घटिका दिवस येईतों ) करावें असें देवलांनीं सांगितलें आहे. " पितरांनीं खाऊन राहिलेलें अन्न श्राद्धकर्त्यानें सर्वांसह भक्षण करावें " असें वर म्हटलें आहे. पण तें येथें लागू नाहीं. कारण " नवश्राद्धांत राहिलेलें अन्न, घरांत एका रात्रीचें शिळें अन्न, यजमान व पत्नी यांनीं खाऊन राहिलेलें अन्न कधींही खाऊं नये " असा निषेध आहे. मृत मनुष्याच्या पहिल्या, तिसऱ्या, पांचव्या, सातव्या, नवव्या व अकराव्या दिवशीं होणाऱ्या श्राद्धास नवश्राद्ध म्हणतात. या नवश्राद्धांची एकोद्दिष्ट श्राद्धांत गणना होते. कारण एकोद्दिष्ट श्राद्धाचे नव, मिश्र व पुराण असे भेद आहेत. अकराव्या दिवसापर्यंत होणाऱ्या एकोद्दिष्टास नव; अकराव्या दिवसापासून वर्षश्राद्धापर्यंत होणाऱ्या मासिकादिकांस मिश्र व त्यानंतर होणाऱ्या प्रतिवार्षिकादि एकोद्दिष्टास पुराण म्हणतात. पण शेषान्न भोजनाचा निषेध नवश्राद्धापुरताच असावा असें वाटतें २५२.

आतां सपिंडीकरण सांगतात—

गन्धोदकतिलैर्युक्तं कुर्यात्पात्रचतुष्टयम् ॥
अर्घ्यार्थं पितृपात्रेषु प्रेतपात्रं प्रसिञ्चयेत् ॥ २५३ ॥
ये समाना इति द्वाभ्यां शेषं पूर्ववदाचरेत् ॥
एतत्सपिण्डीकरणप्रेतोद्दिष्टं स्त्रिया अपि ॥ २५४ ॥

गंध, उदक, व तिल यांनीं युक्त असलेलीं चार पात्रें अर्घ्य सिद्ध करण्याकरितां पूर्वोक्त विधीनें तयार करावीं. चार पात्रांच्या निर्देशावरूनच पितृवर्गांत चार ब्राह्मण सांगावेत असें ठरतें. विश्वेदेवस्थानीं दोन ब्राह्मण सांगावेत हें वर सिद्ध झालेंच आहे. असो. त्यांतील प्रेत-पात्रांत थोडें जल राखून—बाकीचें तिन्ही पितृपात्रांत वाटून घालावें. व त्यावेळीं "ये समाना" इत्यादि दोन मंत्र म्हणावेत. विश्वेदेवाच्या आवाहनापासून विसर्जनापर्यंत बाकीचें सर्व कर्म वर पार्वणप्रकरणीं सांगितल्याप्रमाणेंच करावें. प्रेतास म्हणजे मृत मनुष्यास उद्देशून जें अर्घ्यपात्र केलें असेल त्यांत वर सांगितल्याप्रमाणें राखून ठेविलेल्या जलानें प्रेतस्थानीं बसलेल्या ब्राह्म-णाच्या हातावर अर्घ्य द्यावें. व बाकीचें विधान एकोद्दिष्टाप्रमाणें करावें. हें सपिंडीकरण होय. एकोद्दिष्ट तर वर सांगितलेंच आहे. तें मातेचेंही करावें. या सपिंडीकरणांत प्रेतास उद्देशून दिलेला पिंड पितृपिंडांत म्हणजे प्रेताच्या पितरांस उद्देशून दिलेल्या तीन पिंडांत मिळवाव-

वयाचा असतो. यास पिंडसंयोजन असें म्हणतात. याच्या योगानें मृत मनुष्याच्या प्रेतत्वाची निवृत्ति होते. ज्या अवस्थेंत मरणोत्तर क्षुधा, तृषा यांच्या योगानें अत्यंत दुःख होत असतें त्या अवस्थेस प्रेतत्व म्हणतात. प्रेतत्वाची निवृत्ति झाली असतां त्या मृतास पितृत्वप्राप्ति होते. पितृत्वप्राप्ति म्हणजे वसु, रुद्र व आदित्य या श्राद्धदेवतांशीं संबंध होणें. वर सांगितलेल्या एकोद्दिष्टासह सपिंडीकरण केल्यानें मृताच्या प्रेतत्वाची निवृत्ति होऊन त्यास पितृत्वप्राप्ति होते असें ठरतें. पिता मरण पावला असतां त्याच्या पूर्वीचे तीन पुरुष मृत झाले असल्यासच त्याची सपिंडी करितां येते. पण पिता मेला असून पितामह ( आजा ) किंवा प्रपितामह जीवंत असल्यास पित्याची सपिंडी होत नाहीं. अपरार्कांत, पितामह किंवा प्रपितामह जीवंत असून पिता मेल्यास त्याचा पिंड जीवंत व्यक्तीस सोडून त्याच्या पूर्वींच्या मृत पितरांशीं त्याचें सपिंडन करावें असें म्हटलें आहे. धर्मसिंधु व निर्णयसिंधु यामध्येंही असेंच सांगितलें आहे व आपल्या महाराष्ट्रांत प्रायः असाच शिष्टाचार आहे. या परस्पर विरुद्ध वचनांची व्यवस्था कशी केली आहे हें कोणास पहावयाचें असल्यास धर्मसिंधु व निर्णयसिंधूच्या भाषांतरांत पहावें. ज्यांस संतति नाहीं त्यांची व गाय, ब्राह्मण इत्यादिकांच्या संबंधानें मेले असतील त्यांची सपिंडी करूं नये. तर त्यांच्या प्रेतत्वनिवृत्त्यर्थ नारायणबलि करावा. या सपिंडीकरणाचा मुख्य अधिकार ज्येष्ठ पुत्रासच आहे. त्याच्या अभावीं कनिष्ठ, दत्तक भ्राता, भ्रात्याचा पुत्र, सपिंडांतील कोणीही, शिष्य व शेवटीं पत्नी यांस क्रमानें अधिकार प्राप्त होतो. पण पुत्र असल्यास दुसऱ्या कोणीही हें सपिंडीकरण करूं नये. मातेच्या सपिंडनादिकांविषयीं मतभेद आहे. कारण पतीच्या किंवा पित्याच्या गोत्रानें मातेचा उच्चार करावा अशा प्रकारचीं वचनें आढळतात. त्यांची व्यवस्था अशी —

आसुरादि विवाहपद्धतींनें विवाहित किंवा पुत्रिका केलेल्या स्त्रीचा उच्चार श्राद्धादिदानसमयीं पित्याच्या गोत्रानें करावा. ब्राह्मादि विवाहानें विवाहित स्त्रीचा आपल्या कुलाचार व देशाचाराप्रमाणें पतीच्या किंवा पित्याच्या गोत्रानें करावा. कुलाचार व देशाचार व्यवस्थित नसल्यास कर्त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें मातेच्या गोत्राचा उच्चार करावा. मातेच्या सपिंडनाविषयींही असाच वाद आहे व त्याविषयीं विरुद्ध वचनेंही आढळतात. मातेचें सपिंडन पितामहीशीं, पतीशीं किंवा तिच्या पित्याशीं करावें असें सांगणारीं वाक्यें आहेत. त्यांची व्यवस्था अशी–पुत्ररहित भार्येचें सपिंडन पतीनें आपल्या मातेशींच करावें. माता सती गेली असल्यास पुत्रानें केवल पित्याशींच तिचा पिंड मिळवावा. आसुरादि विवाहोत्पन्न व पुत्रिकापुत्र यांनीं मातेच्या पिंडास मातामहादिकांच्या पिंडांत मिळवावें व ब्राह्मादि विवाहोत्पन्न पुत्रानें देशाचार व कुलाचार असेल त्याप्रमाणें पितामहीशीं, पित्याशीं किंवा मातामहाशीं मातृसपिंडन करावें. यांतील कोणत्याही जरी पक्षानें सपिंडन केलेलें असलें तरी अन्वष्टका, गया, वृद्धि व सांवत्सारिक श्राद्ध या प्रसंगीं मातेचें पृथक् श्राद्ध करावें. मातामहाशीं मातेचें सपिंडन केलेलें असल्यास पित्याच्या श्राद्धाप्रमाणें मातामहाचें श्राद्धही अवश्य केलें पाहिजे. पण तसें नसल्यास मातामहाचें श्राद्ध केलें तरी चालेल, न केलें तरी कांहीं दोष नाहीं २५३, २५४

अर्वाक्सपिण्डीकरणं यस्य संवत्सराद्भवेत् ।
तस्याप्यन्नं सोदकुम्भं दद्यात्संवत्सरं द्विजे ॥ २५५ ॥

वर्ष समाप्त होण्यापूर्वीं ज्याचें सपिंडीकरण केलें असेल त्यासही उद्देशून आपल्या शक्तीप्रमाणें प्रतिदिवशीं किंवा प्रतिमासीं वर्ष पूर्ण होईतों ब्राह्मणास उदकुम्भासह अन्न द्यावें. यावरून सपिंडीकरण वर्ष पुरें झालें असतां किंवा पूर्वीं करावें असें ठरतें. आश्वलायन व कात्यायन यांच्या वचनाप्रमाणें सपिंडीकरणाचें–द्वादशाह, त्रिपक्ष, वृद्धिप्राप्ति किंवा वर्ष समाप्त होईल तो दिवस असे चार पक्ष प्राप्त होतात. त्यांतील अग्निहोत्री पुत्रानें आपल्या पित्याचें सपिंडीकरण बाराव्या दिवशीं करावें. कारण त्यावाचून पिंडपितृयज्ञ होत नाहीं व अग्निहोत्र्यास अमावास्येच्या दिवशीं तो अवश्य कर्तव्य आहे. पण जो अग्निहोत्री नसेल त्यानें पित्यास मरून तीन पक्ष झाले असतां; किंवा आपल्या कुलांत वृद्धि ( मंगलकृत्य ) प्राप्त झाली असतां अथवा वर्ष पूर्ण झालें असतां तें करावें. वर्ष होण्यापूर्वीं सपिंडीकरण केल्यास–षोडश श्राद्धें अगोदर करून मग तें करावें कीं सपिंडीकरण करून मग त्या त्या श्राद्धाच्या योग्य कालीं ती करावींत असा संशय येतो. कारण शास्त्रांमध्यें दोन्ही पक्षास अनुकूल वचनें मिळतात. पण त्याचा निर्णय असा–सपिंडीकरण करून सोळा श्राद्धें आपापल्या योग्यकालीं करणें हा उत्तम पक्ष होय. कारण त्यांचा योग्य काल येण्यापूर्वीं तीं करण्याचा अधिकार कर्त्यास नसतो. आतां–सोळा श्राद्धें करून नंतर सपिंडीकरण करावें असें जें म्हणणें आहे तो गौण पक्ष आहे. या पक्षाचा आश्रय करून जो सपिंडीपूर्वीं प्रेतश्राद्धें करितो त्यानें तीं एकोद्दिष्ट विधीनें करावीं व मुख्य पक्षाचा स्वीकार करून त्या त्या श्राद्धाच्या योग्यकालीं जो षोडश श्राद्धें करितो त्यानें तीं वार्षिक श्राद्धाप्रमाणें पार्वण किंवा एकोद्दिष्ट विधीनें करावींत. बारा महिन्यांची बारा मासिकें, ऊन मासिक, त्रैपाक्षिक, ऊन षाण्मासिक व ऊनाब्दिक हीं तीं सोळा श्राद्धें होत. धनाची वाटणी करून वेगळे झालेले अनेक भ्राते असले तरी या प्रेतश्राद्धासह सपिंडीकरण एकाच भ्रात्यानें करावें. सर्वांस करावयास नको. व जे संन्यास न घेतां मेले असतील त्यांचें तें अवश्य करावें. कारण त्यावांचून मृताच्या प्रेतत्वाची निवृत्ति होत नाहीं. ज्यांनीं संन्यास घेतला असेल त्यांच्या पुत्रादिकांस प्रेतश्राद्धांसह सपिंडी करावयास नको. पुत्र जवळ नसल्यास ज्या दुसऱ्या अधिकाऱ्यानें दाहसंस्कार केला असेल, त्यानेंच दशाहान्त प्रेतकर्म करावें. मंत्रोच्चार न करितां शूद्रांचेही सपिंडीकरण बारावे दिवशीं होतें. सपिंडीनंतर सांवत्सरिक पार्वणादि श्राद्धें पुत्रास अवश्य केलीं पाहिजेत. इतरांनीं न केलीं तरी चालतील. २५५.

आतां एकोद्दिष्टाचे काल सांगतात—

मृतेऽहनि तु कर्तव्यं प्रतिमासं तु वत्सरम् ॥
प्रतिसंवत्सरं चैवमाद्यमेकादशेऽहानि ॥ २५६ ॥

वर्ष पूर्ण होईतों प्रत्येक महिन्यास मृतदिवशीं एकोद्दिष्ट करावें. सपिंडीकरणानंतरही

प्रतिवर्षी एकोद्दिष्टच करावें. सर्व एकोद्दिष्टांच्या प्रकृतिरूप पहिलें एकोद्दिष्ट अकराव्या दिवशीं करावें. एकाद्याच्या मरणाचा दिवस बरोबर समजला नसल्यास ज्या दिवशीं मरणाची वार्ता समजेल त्या दिवशीं किंवा तो मृत ज्या दिवशीं आपल्या गृहांतून प्रवासास निघाला असेल त्या महिन्याच्या अमावास्येस त्याचें प्रतिवार्षिक श्राद्ध करावें. वार्षिक श्राद्ध एकोद्दिष्ट करावें कीं पार्वण करावें, याविषयीं मतभेद आहे. दाक्षिणात्य विद्वान् त्या विरुद्ध वचनांची अशी व्यवस्था लावितात—औरस व क्षेत्रज पुत्रांनीं आईबापांचें प्रतिसांवत्सरिक श्राद्ध पार्वणच करावें व दत्तकादि इतर पुत्रांनीं एकोद्दिष्ट करावें. पण ही त्यांची व्यवस्था बरोबर दिसत नाहीं. उदीच्य लोक—अमावास्येस किंवा भाद्रपदांतील प्रेतपक्षांत एकाद्याचा मृत दिवस आल्यास त्याचें पार्वण करावें व अन्यत्र मृत दिवशीं एकोद्दिष्ट करावें—असें म्हणतात. पण तेंही बरोबर दिसत नाहीं. आतां याचा निर्णय सांगतों—पुत्रांनीं संस्थाशाचें पार्वणच करावें व इतरांचें देशाचार व कुलाचार असेल त्याप्रमाणें पार्वण किंवा एकोद्दिष्ट करावें. पण अमावास्येच्या दिवशीं मृत दिवस आल्यास आणि पितृपक्षांतील क्षयाहदिवशीं पुत्रांनीं आपल्या आई बापांचें पार्वणच करावें ( पार्वण व एकोद्दिष्ट यांचा भेद या प्रकरणाच्या आरंभीं सांगितलाच आहे ) २५६.

नित्य श्राद्धावांचून इतर सर्व श्राद्धांतील आणखी कांहीं अवशिष्ट भाग सांगतात—

पिंडांस्तु गोऽजविप्रेभ्यो दद्यादग्नौ जलेऽपि वा ॥
प्रक्षिपेत्सत्सु विप्रेषु द्विजोच्छिष्टं न मार्जयेत् ॥ २५७ ॥

पूर्वी पितरांस उद्देशून दिलेले ( एक किंवा अधिक ) पिंड गाईस, बकऱ्यास किंवा त्यांची इच्छा करणाऱ्या ब्राह्मणांस द्यावे. अथवा अग्नीमध्यें किंवा खोल पाण्यांत टाकावेत. भोजनस्थळीं ब्राह्मण बसले असतांना त्यांचीं उष्टीं काढूं नयेत २५७.

आतां विशेष प्रकारच्या भोज्य पदार्थांचें कोणतें विशेष फळ मिळतें तें सांगतात—

हविष्यान्नेन वै मासं पायसेन तु वत्सरम् ।
मात्स्यहारिणकौरभ्रशाकुनच्छागपार्षतैः ॥ २५८ ॥
एणरौरववाराहशाशैर्मांसैर्यथाक्रमम् ।
मासवृद्ध्याऽभितृप्यन्ति दत्तैरिह पितामहाः ॥ २५९ ॥

तिल, व्रीहि, यव, माष, जल, मूल, फल इत्यादि हविष्यान्नानें पितर एक महिनाभर तृप्त होतात. गाईच्या दुधाच्या पायसानें त्यांची एक वर्षभर तृप्ति होते. पाठिनादि मासे, ताम्रमृग, कृष्णमृग, मेंढा, भक्षण करण्यासारखे पक्षी, चित्रमृग, काळवीट, सांवर, अरण्यांतील सूकर व ससे यांचें मांस पितरांस उद्देशून पितृस्थानीय ब्राह्मणांस दिलें असतां पितर क्रमानें दोन महिने, तीन महिने इत्यादि उत्तरोत्तर एकेक महिना अधिक तृप्त होतात २५८, २५९.

त्याचप्रमाणें—

खड्गामिषं महाशल्कं मधु मुन्यन्नमेव च ।
लोहामिषं महाशाकं मांसं वार्ध्रीणसस्य च ॥ २६० ॥
यद्ददाति गयास्थश्च सर्वमानन्त्यमश्नुते ।
तथा वर्षात्रयोदश्यां मघासु च विशेषतः ॥ २६१ ॥

गेंड्याचें मांस, महाशल्क या नांवाचा मासा, मध, अरण्यांत होणारें मुनींचें अन्न, लाल बकऱ्याचें मांस, अळूं, पांढऱ्या म्हाताऱ्या व लांब कानांच्या बकऱ्याचें मांस त्रागया, हरिद्वार, पुष्कर इत्यादि स्थळीं पितरांस उद्देशून दिलेलें पत्रपुष्पादि अनंत फल देतें. त्याचप्रमाणें भाद्रपदकृष्ण त्रयोदशीस व विशेषतः ती मघा नक्षत्रानें युक्त असतां पितरांस उद्देशून अर्पण केलेलें सर्व कांहीं अनंतफल देतें. या ठिकाणीं मुनींचें अन्न, मांस, मध इत्यादि पदार्थ सर्व वर्णांच्या लोकांस श्राद्धप्रसंगीं देण्यास जरी सामान्यतः सांगितले आहेत, तरी पुलस्त्यांनीं सांगितल्याप्रमाणें त्यांची व्यवस्था करावी. म्हणजे ब्राह्मणांनीं मुख्यतः मुनींचें अन्न द्यावें. क्षत्रिय, वैश्य यांनीं मांस द्यावें व शूद्रांनीं मध द्यावा. शिवाय शास्त्रानें ज्याचा निषेध केलेला नाहीं अशा हविष्यान्नादि दानानें सर्वांस सारखेंच समग्र फळ मिळतें २६०,२६१.

आतां विशेष तिथींस केलेल्या श्राद्धाचें कोणतें विशेष फळ मिळतें तें सांगतात—

कन्यां कन्यावेदिनश्च पशून्वै सत्सुतानपि ।
द्यूतं कृषिं च वाणिज्यं द्विशफैकशफं तथा ॥ २६२ ॥
ब्रह्मवर्चस्विनः पुत्रान्स्वर्णरूप्ये सकुप्यके ।
ज्ञातिश्रैष्ठ्यं सर्वकामानाप्नोति श्राद्धदः सदा ॥ २६३ ॥
प्रतिपत्प्रभृतिष्वेकां वर्जयित्वा चतुर्दशीम् ।
शस्त्रेण तु हता ये वै तेभ्यस्तत्र प्रदीयते ॥ २६४ ॥

भाद्रपद कृष्ण पक्षांतील एका चतुर्दशीस सोडून बाकींच्या प्रतिपदादि चौदा तिथींस श्राद्धें करणाऱ्या गृहस्थास क्रमानें १ रूप, लक्षण व शील यांनीं युक्त असलेली कन्या, २ बुद्धि, रूप व लक्षण यांनीं युक्त असलेले जामात, ३ अजादि क्षुद्र पशु, ४ सन्मार्गानें चालणारे पुत्र, ५ द्यूतांत विजय, ६ शेतकींचें फल, ७ व्यापारांत मोठा लाभ, ८ गाई, म्हशी इत्यादि दोन खुराचे व ९ अश्वादि एक खुराचे पशु, १० ब्रह्मवर्चस्व तेजानें युक्त असलेले पुत्र, ११ सुवर्ण व रौप्य, १२ जस्त, शिसें इत्यादि दुसरे धातु, १३ आपल्या ज्ञातींमध्यें श्रेष्ठता, व १४ सर्व मनोरथ प्राप्त होतात. महालयांतील चतुर्दशीस शस्त्रादिकांच्या योगानें मेलेल्या पितरांचेंच एकोद्दिष्ट श्राद्ध करावें; दुसऱ्या कोणाचेंही करूं नये असें सांगितलें आहे. शस्त्रादिकांच्या योगानें मेलेल्या पुरुषांचें वार्षिकादि श्राद्ध मृत तिथींस निराळें केलें पाहिजेच २६२,६३,६४.

आतां नक्षत्रश्राद्धाचें फल सांगतात—

स्वर्गं ह्यपत्यमोजश्च शौर्यं क्षेत्रं बलं तथा ।
पुत्रं श्रैष्ठ्यं च सौभाग्यं समृद्धिं मुख्यतां शुभम् ॥२६५॥
प्रवृत्तचक्रतां चैव वाणिज्यप्रभृतीनपि ।
अरोगित्वं यशो वीतशोकतां परमां गतिम् ॥ २६६ ॥
धनं वेदान् भिषक्सिद्धिं कुप्यं गा अप्यजाविकम् ।
अश्वानायुश्च विधिवद्यः श्राद्धं संप्रयच्छति ॥ २६७ ॥

कृत्तिका नक्षत्रापासून आरंभ करून भरणीपर्यंत प्रतिनक्षत्रीं जो आस्तिकभावानें, श्रद्धेनें व मदमत्सरांचा त्याग करून यथाशास्त्र श्राद्ध करतो त्यास क्रमानें स्वर्गनामक परमसुख, अपत्य, अतिशय सामर्थ्य, शौर्य, क्षेत्र, बल, गुणवान् पुत्र, ज्ञातीमध्यें श्रेष्ठता, लोकप्रियता, धनादिकांची समृद्धि, मुख्यत्व, शुभ, ज्याची आज्ञा सर्वांस मान्य होत आहे अशा प्रकारची योग्यता, वाणिज्य–शेती, व्याज; गोरक्षण–इत्यादि. आरोग्य, प्रख्याति, शोकराहित्य, ब्रह्मलोकप्राप्ति, सुवर्णादि, धन, वेद, औषधाची फलप्राप्ति, सुवर्ण व रुपें यांवाचून ताम्रादि धातु, गाई, बकऱ्या, मेंढ्या, घोडे व दीर्घ आयुष्य हीं प्राप्त होतात २६५–२६७.

पण ह्या श्राद्धाविषयीं अशी एक शंका येते कीं, ब्राम्हणांस भोजन घातल्यानें व पिंडदान केल्यानें पितरांची तृप्ति कशी होऊं शकेल? कारण आपापल्या शुभाशुभ कर्मांप्रमाणें स्वर्ग–नरकादि भिन्न भिन्न स्थळीं गेलेल्या मृतांची तृप्ति त्यांच्या पुत्रादिकांनीं दिलेल्या अन्नपानादिकांच्या योगानें– होणें संभवत नाहीं. व जरी कदाचित् ती होते असें घेऊन चाललें तरी स्वतः आपलें हित करून घेण्यासही पराधीनतेमुळें जे असमर्थ आहेत ते पितर, पुत्रादि श्राद्ध–कर्त्यांस स्वर्गादि फल कसें देऊं शकतील? या शंकेचें निरसन करण्याकरितां सांगतात—

वसुरुद्रादितिसुताः पितरः श्राद्धदेवताः ।
प्रीणयन्ति मनुष्याणां पितॄञ्श्राद्धेन तर्पिताः ॥ २६९ ॥
आयुः प्रजां धनं विद्यां स्वर्गं मोक्षं सुखानि च ।
प्रयच्छन्ति तथा राज्यं प्रीता नृणां पितामहाः ॥ २७० ॥

श्राद्धकर्मामध्यें ज्या मृत मनुष्यांचीं नांवें उच्चारून पिंडादि देतात तीं मृत मनुष्येंच पितरादि शब्दांचा मुख्य अर्थ आहे, असें समजूं नये. तर वसु, रुद्र व आदित्य या तीन अधिष्ठातृदेवतांसह मृतमनुष्यें हा पित्रादि शब्दांचा अर्थ आहे. म्हणजे आपण व्यवहारांतही, देवदत्त, विष्णुमित्र इत्यादि शब्दांनीं केवल शरीर किंवा केवल आत्मा यांचें ग्रहण न करितां शरीरविशिष्ट आत्म्याचें जसें ग्रहण करितों त्याप्रमाणें अधिष्ठातृदेवतांसह मृतमनुष्यांचा श्राद्धामध्यें पित्रादि शब्दांनीं निर्देश करितात. वास्तव वसु, रुद्र इत्यादिक अधिष्ठातृदेवता पुत्रादिकांनीं दिलेल्या अन्नपानादिकांच्या योगानें स्वतः तृप्त होऊन ज्या मृतमनुष्यास उद्देशून श्राद्ध

केलेलें असतें त्यास तृप्त करितात. व श्राद्धकर्त्या पुत्रादिकांसही योग्य फल देतात. ज्याप्रमाणें माता गर्भाशयांतील गर्भाच्या पोषणार्थ दुसऱ्यानें दिलेल्या इष्ट वस्तूंचा उपभोग घेऊन स्वतः तृप्त होते; आपल्या उदरांतील गर्भास तृप्त करिते व इष्ट वस्तू देणाऱ्यास कांहीं तरी मोबदला देऊन आनंदित करिते त्याप्रमाणेंच वसु-आदि श्राद्धदेव करितात. वसु, रुद्र व आदित्य हेच पितृ-पितामह—प्रपितामह शब्दांनीं उच्चारले जाणारे पितर होत. श्राद्धकर्मांतील त्याच श्राद्धदेवता आहेत. विलक्षण ज्ञान व अचाट शक्ति यांच्या योगानें त्या मृत मनुष्यांस तृप्त करितात आणि श्राद्धकर्त्यास आयुष्य, प्रजा, धन, विद्या, राज्य, स्वर्गसुख व मोक्षसुख देतात. २६९, २७०.

इति श्राद्धप्रकरणम् १०.

---

# अथ गणपतिकल्पप्रकरणम् ११.



कांहीं कर्में दृष्ट फलाचीं साधनें असतात व कांहीं अदृष्ट फलाचीं साधनें असतात. त्यांतील कांहीं कर्में मागें सांगितलीं आहेत व कांहीं सांगावयाचीं आहेत. पण तीं निर्विघ्न-पणें पार पडावींत व त्यांनीं दोन्ही प्रकारच्या फलांचें साधन व्हावें याकरितां विघ्नांचें निर-सन करणारें कर्म सांगण्याच्या उद्देशानें विघ्नाचे कारक व ज्ञापक हेतु सांगतात.—

**विनायकः कर्मविघ्नसिद्ध्यर्थं विनियोजितः ।**
**गणानामाधिपत्ये च रुद्रेण ब्रह्मणा तथा ॥ २७१ ॥**

रुद्र, ब्रह्मदेव व विष्णु यांनीं पुरुषार्थाचीं साधनें जीं कर्में त्यांस विघ्नें करण्याकरितां विनायकास पुष्पदन्तादि गणांच्या आधिपत्याचें ठायीं योजिलें. अर्थात् विनायक ही देवता कर्मास विघ्न करणारी व पूजनादिकांच्या योगानें संतुष्ट झाली असतां त्यांचा नाश करणारी आहे. २७१.

याप्रमाणें विघ्नांचा कारक हेतु सांगून आतां पुढील पांच श्लोकांत ज्ञापक हेतु सांगतात. विघ्नांस उत्पन्न करणारा कारक हेतु व तीं उत्पन्न झालीं आहेत असें ज्यांच्यावरून समजतें त्या चिन्हांस ज्ञापक हेतु म्हणतात—

**तेनोपसृष्टो यस्तस्य लक्षणानि निबोधत ।**
**स्वप्नेऽवगाहतेऽत्यर्थं जलं मुण्डांश्च पश्यति ॥ २७२ ॥**
**काषायवाससश्चैव क्रव्यादांश्चाधिरोहति ।**
**अन्त्यजैर्गर्दभैरुष्ट्रैः सहैकत्रावतिष्ठते ॥ २७३ ॥**
**व्रजन्नपि तथात्मानं मन्यतेऽनुगतं परैः ।**

त्या विनायकानें ज्यास उपसर्ग केला आहे त्याचीं लक्षणें मी सांगतों तीं ऐका. स्वप्नामध्यें पाण्याच्या मोठ्या प्रवाहांत आपण वहात जात आहों किंवा बुडत आहों असें पाहणें, ज्यांच्या मस्तकांचें मुंडन केलें आहे अशा पुरुषांस, व लाल, काळीं इत्यादि वस्त्रें नेसलेल्या व पांघरलेल्या मनुष्यांस पाहणें, कच्चें मांस खाणाऱ्या गृध्रादि पक्ष्यांवर व व्याघ्रादि पशूंवर आरोहण करणें; चांडालादि अंत्यज, गर्दभ, उंट यांनीं परिवेष्टित असणें व आपण जात असून आपल्या मागून आपले शत्रु येत आहेत, असें वाटणें २७२ २७३.

हीं स्वप्नांतील चिन्हें झालीं. आतां प्रत्यक्ष चिन्हें सांगतात—

विमना विफलारम्भः संसीदत्यनिमित्ततः ॥ २७४ ॥
तेनोपसृष्टो लभते न राज्यं राजनन्दनः ।
कुमारी च न भर्तारमपत्यं गर्भमङ्गना ॥ २७५ ॥
आचार्यत्वं श्रोत्रियश्च न शिष्योऽध्ययनं तथा ।
वणिग्लाभं न चाप्नोति कृषिं चापि कृषीवलः ॥ २७६ ॥

चित्त नेहमीं विक्षिप्त असणें; कोणत्याही कामांत यश न येणें; कांहीं एक कारण नसतांना मन उदास होणें; राजकुलांत उत्पन्न झालेल्या व विद्या, शौर्य, धैर्य इत्यादि गुणांनीं युक्त असलेल्याही राजपुत्रास राज्य न मिळणें; रूप, लक्षण, कुल इत्यादिकांनीं संपन्न असलेल्याही कुमारीस योग्य वर न मिळणें; गर्भिणी स्त्रीस अपत्य न होणें; ऋतुमती स्त्रीनें गर्भधारण न करणें; अध्ययन व त्याचें अर्थज्ञान असतांनाही आचार्यत्व प्राप्त न होणें; विनय, आचार इत्यादिकांनीं युक्त असलेल्या शिष्यास विद्या न येणें; व्यापारांत कुशल,वैश्यास धान्यादि व्यापारामध्ये लाभ न होणें; शेतकीचें काम उत्तमप्रकारें जाणत असूनही शेतकऱ्यास त्यांत चांगले फल न मिळणें आणि अशाच रीतीनें आपापल्या उपजीविकेच्या साधनांचा योग्य उपयोग न होणें हीं सर्व विघ्नेश्वरानें विघ्न केल्याचीं चिन्हें आहेत २७४—२७६.

या प्रमाणें दोन्ही प्रकारचे हेतु सांगून विघ्नोपशांत्यर्थ कर्म करण्यास सांगतात—

स्नपन तस्य कर्तव्यं पुण्येऽह्नि विधिपूर्वकम् ।

विनायकाचा ज्यास उपसर्ग झाला आहे अथवा विघ्नांच्या द्वारां त्याचा उपसर्ग होऊं नये अशी ज्याची इच्छा आहे त्या पुरुषास अनुकूल नक्षत्रादियुक्त पुण्यदिवशीं यथाशास्त्र अभिषेक करावा. हें कर्म रात्रीं करूं नये.

आतां त्याचा विधि सांगतात—

गौरसर्षपकल्केन साज्येनोत्सादितस्य च ॥ २७७ ॥
सर्वौषधैः सर्वगन्धैर्विलिप्तशिरसस्तथा ।
भद्रासनोपविष्टस्य स्वस्ति वाच्या द्विजैः शुभाः ॥२७८॥

पांढऱ्या शिरसांचें पीठ पाण्यांत कालवून व त्यांत तूप घालून तें उटणें त्याच्या अंगांस

लावावें. सर्व औषधि व चंदन, अगरु, कस्तूरी इत्यादि सर्व गंध यांचा त्याच्या मस्तकास लेप द्यावा. नंतर त्यास पुढें सांगितलेल्या भद्रासनावर बसवून श्रुत, अध्ययन व वर्तन यांनीं संपन्न असलेल्या चार सुंदर ब्राह्मणांकडून स्वगृह्योक्त विधीनें पुण्याहवाचन करवावें २७७, २७८.

अश्वस्थानाद्गजस्थानाद्वल्मीकात्संगमाद्ध्रदात् ।
मृत्तिकां रोचनां गन्धान्गुग्गुलं चाप्सु निक्षिपेत् ॥२७९॥
या आहृता ह्येकवर्णैश्चतुर्भिः कलशैर्ह्रदात् ।
चर्मण्यानडुहे रक्ते स्थाप्यं भद्रासनं ततः ॥ २८० ॥

अश्वस्थान, गजस्थान, वारुळ, नद्यांचा संगम व कधीं न सुकून जाणारा डोह या पांच ठिकाणांहून आणलेली मृत्तिका, गोपीचंदन, चंदन, कुंकुम, अगरु इत्यादि गंध, व गुग्गुल हे पदार्थ अभिषेकाच्या पाण्यांत टाकावेत. एकाच रंगाच्या व न फुटलेल्या चार मृन्मय घटांनीं अगाध डोहांतून अथवा संगमावरून अभिषेकाकरितां पाणी आणावें. त्यानंतर लाल बैलाचें चामडें उत्तरेकडे केंस व पूर्वेकडे ग्रीवा करून हांतरावें व त्यावर शिवणीच्या लाकडांचें सुंदर आसन ठेवावें. नंतर वर सांगितलेल्या—मृत्तिका, जल, गंध—इत्यादिकांनीं युक्त, आम्रादि पल्लवांनीं सुशोभित, चंदनानें चर्चित, एकदांच धुतलेल्या नूतन वस्त्रानें भूषित व अनेक प्रकारच्या पुष्पमालांनीं अलंकृत केलेल्या चार घटांस पूर्वादि चार दिशेस स्थापावें. सारांश सारवून पवित्र केलेल्या स्थंडिलावर पंचरंगी स्वस्तिक काढून त्याच्यावर वर सांगितल्याप्रमाणें बैलाचें चर्म हांतरून त्यावर शुभ्र वस्त्रानें आच्छादित केलेलें भद्रासन ठेवावें व त्यावर बसलेल्या यजमानास उद्देशून ब्राह्मणांनीं स्वस्तिवाचन करावें २७९, २८०.

सहस्राक्षं शतधारमृषिभिः पावनं कृतम् ।
तेन त्वामभिषिञ्चामि पावमान्यः पुनन्तु ते ॥ २८१ ॥

स्वस्तिवाचन झाल्यानंतर ज्यांचा पति व पुत्र जीवंत आहेत, अशा रूपगुणयुक्त व उत्तम वेष धारण करणाऱ्या स्त्रियांनीं ज्यास मंगल केलें आहे अशा यजमानास पूर्व दिशेंत असलेला कलश घेऊन " सहस्राक्षं० " इत्यादि मंत्रानें गुरुनें अभिषेक करावा. " अनेक शक्तियुक्त व ज्यास अनेक प्रवाह आहेत असें उदक मन्वादिकांनीं पवित्र करण्याकरितां उत्पन्न केलें आहे. त्या उदकानें विनायकाचा उपसर्ग शांत व्हावा म्हणून मी तुजवर अभिषेक करतों. तें पवित्र जल तुला पवित्र करो " असा त्या मंत्राचा अर्थ आहे २८१. त्यानंतर भद्रासनाच्या दक्षिणभागीं आलेला दुसरा कलश घेऊन " भगं ते० " इत्यादि पुढील मंत्रानें अभिषेक करावा.—

भगं ते वरुणो राजा भगं सूर्यो बृहस्पतिः ।
भगमिन्द्रश्च वायुश्च भगं सप्तर्षयो ददुः ॥ २८२ ॥

वरुण राजा, सूर्य, बृहस्पति, इंद्र, वायु व सप्तऋषि तुझें कल्याण करोत. असा या दुसऱ्या मंत्राचा अर्थ आहे २८२.

त्यानंतर तिसरा कलश घेऊन या मंत्रानें अभिषेक करावा—

यत्ते केशेषु दौर्भाग्यं सीमन्ते यच्च मूर्धनि ॥
ललाटे कर्णयोरक्ष्णोरापस्तद्घ्नन्तु सर्वदा ॥ २८३ ॥

या मंत्राचा अर्थ—तुझ्या केशांमध्यें, भांगांत, मस्तकावर, ललाटाचें ठायीं, दोन्ही कर्णांमध्यें व दोन्ही नेत्रांमध्यें जें दुर्भाग्य आहे तें सर्व या जलदेवता सर्वदा नाहींसें करोत. त्यानंतर चवथा कलश घेऊन वर सांगितलेल्या तिन्ही मंत्रांनीं यजमानाच्या मस्तकावर अभिषेक करावा २८३.

स्नातस्य सार्षपं तैलं स्रुवेणौदुम्बरेण तु ॥
जुहुयान्मूर्धनि कुशान्सव्येन परिगृह्य तु ॥ २८४ ॥

याप्रमाणें ज्यास अभिषेक केला आहे अशा त्या यजमानाच्या डाव्या हातांत घेतलेल्या कुशांनीं आच्छादित केलेल्या मस्तकावर आचार्यानें शिरसाचें तेल उदुंबराच्या स्रुवेनें पुढील मंत्रांनीं सोडावें २८४.

मितश्च संमितश्चैव तथा शालकटङ्कटौ ॥
कूश्माण्डो राजपुत्रश्चेत्यन्ते स्वाहासमन्वितैः ॥२८५॥

नामभिर्बलिमन्त्रैश्च नमस्कारसमन्वितैः
दद्याच्चतुष्पथे शूर्पे कुशानास्तीर्य सर्वतः ॥ २८६ ॥

कृताकृतांस्तन्दुलांश्च पललौदनमेव च ॥
मत्स्यान्पक्वांस्तथैवामान्मांसमेतावदेव तु ॥ २८७ ॥

पुष्पं चित्रं सुगन्धं च सुरां च त्रिविधामपि ।
मूलकं पूरिकापूपं तथैवोण्डेरकस्रजः ॥ २८८ ॥

दध्यन्नं पायसं चैव गुडपिष्टं समोदकम् ।
एतान्सर्वान्समाहृत्य भूमौ कृत्वा ततः शिरः ॥ २८९ ॥

विनायकस्य जननीमुपतिष्ठेत्ततोऽम्बिकाम् ।
दूर्वासर्षपपुष्पाणां दत्वार्घ्यं पूर्णमञ्जलिम् ॥ २९० ॥

ॐ मिताय स्वाहा; ॐ संमिताय स्वाहा; ॐ शालाय स्वाहा; ॐ कटंकटाय स्वाहा; ॐ कूश्मांडाय स्वाहा; ॐ राजपुत्राय स्वाहा; या सहा मंत्रांनीं वर सांगितल्याप्रमाणें तेल सोडावें. त्यानंतर लौकिक अग्नीवर स्थालीपाक विधीनें चरु शिजवून याच सहा मंत्रांनीं त्याच अग्नींत होम करावा. नंतर शेष राहिलेल्या अन्नानें बलिमंत्र म्हणून इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, सोम, ईशान, ब्रह्मा व अनंत यांचा " इंद्राय नमः, अग्नये नमः " इत्यादि प्रकारें उच्चार करून, त्यांस उद्देशून बलि द्यावा. एकदांच सडलेले तांदुळ, तिळपिष्टमिश्र भात, पक्व व अपक्व मांस, पक्व व अपक्व मासे, लाल, पिवळें इत्यादि नानाप्रकारचीं पुष्पें, चंदनादि सुगंधि द्रव्यें, गुळाची, मधाची व पिठाची अशी तीन प्रकारची सुरा, मुळा, पुऱ्या, अनरसे, उंड्यांच्या माळा, दहिंभात, पायस, गूळ घातलेलें तांदुळाचें पीठ व लाडू या पदार्थांचा विनायकास व त्याच्या मातेस उपहार अर्पण करून भूमीवर मस्तक ठेवून " तत्पुरुषाय विद्महे० " या मंत्रानें विनायकास व " सुभगायै विद्महे० " या मंत्रानें अंबिकेस नमस्कार करावा. त्यानंतर उपहारांतून राहिलेलें पदार्थ दर्भ हांतरलेल्या सुपांत घालून स्थंडिलावर ठेवावे व "बलिं गृहान्त्विमे देवा०" इत्यादि मंत्र म्हणावे. हें सर्व कृत्य झालें असतां पुष्पयुक्त जलानें अर्घ्य व दूर्वा व शिरसाचीं पुष्पें यांची पूर्ण अंजलि द्यावी आणि उपस्थान म्हणावें २८५–२९०

आतां उपस्थानाचे मंत्र सांगतात—

रूपं देहि यशो देहि भगं भवति देहि मे ।
पुत्रान्देहि धनं देहि सर्वकामांश्च देहि मे ॥ २९१ ॥
ततः शुक्लाम्बरधरः शुक्लमाल्यानुलेपनः ।
ब्राह्मणान्भोजयेद्दद्याद्वस्त्रयुग्मं गुरोरपि ॥ २९२ ॥

हे भगवति, व हे भगवन् विनायक, रूप दे; यश दे; कल्याण कर; पुत्र दे, धन दे व माझे सर्व मनोरथ पूर्ण कर. याप्रमाणें अभिषेक झाल्यावर शुभ्र वस्त्र, शुभ्र पुष्पांच्या माळा व चंदन धारण करणाऱ्या यजमानानें ब्राह्मणांस भोजन घालावें. शास्त्रार्थ, वेदाध्ययन व सदाचरण यांनीं संपन्न असलेल्या व विनायकस्नपनविधि जाणणाऱ्या गुरूस यथाशक्ति दोन वस्त्रें द्यावीं. विनायकाच्या उद्देशानें गुरूस व ब्राह्मणांस यथाशक्ति दक्षिणा द्यावी. या विनायकाच्या स्नपनाचा प्रयोगक्रम असा–चार ब्राह्मणांसह वर सांगितलेल्या प्रकारच्या गुरूनें भद्रासनाची रचना करून त्याच्या समीप विनायक व त्याची माता यांची पूर्वोक्त मंत्रांनीं गंधपुष्पादिकांच्या योगानें पूजा करून चरु शिजवून भद्रासनावर बसलेल्या यजमानास पुण्याहवाचनपूर्वक चार कलशांतील जलानें अभिषेक करावा. त्याच्या मस्तकावर शिरसाचें तेल ओतावें. चरुहोम करावा. अभिषेकशाळेंत चारी दिशेस इंद्रादिलोकपालांस उद्देशून बलि द्यावा. यजमानानें अभिषेकानंतर शुभ्र वस्त्रें, माळा इत्यादि धारण करून गुरूंसह विनायक व अंबिका यांस उपहार देऊन, भूमीवर मस्तक ठेवून पुष्पयुक्त जलानें अर्घ्य आणि दूर्वा व शिरसाचीं पुष्पें यांची

पूर्ण अंजलि देऊन विनायक व अंबिका यांचें उपस्थान करावें. गुरूनें उपहार देऊन राहिलेलें सर्व सुपांत घालून भूमीवर मस्तक ठेवून तें सूप स्थंडिलावर ठेवावें. शेवटीं गुरूस दोन वस्त्रें व दक्षिणा देऊन ब्राह्मणभोजन करावें २९१,२९२. इति विनायकस्नपनविधिः ११.

आतां या विनायकस्नपनाचा उपसंहार करून त्याचा दुसऱ्या कर्मांशीं संयोग कसा करावयाचा तें सांगतात—

**एवं विनायकं पूज्य ग्रहांश्चैव विधानतः ।**
**कर्मणां फलमाप्नोति श्रियं चाप्नोत्यनुत्तमाम् ॥ २९३ ॥**

या-वर सांगितलेल्या-प्रकारें विनायकाचें पूजन केलें असतां त्या पूजकास कर्माचें फल निर्विघ्नपणें प्राप्त होतें. त्यास उत्तम श्री प्राप्त होते. यास्तव ज्यास लक्ष्मीची इच्छा असेल त्यानें याच विधानानें विनायकाचें पूजन करावें. आदित्यादि ग्रहांची पीडा होत असून तिची शांति व्हावी व लक्ष्मी प्राप्त व्हावी अशी ज्याची इच्छा असेल त्यानें यथाशास्त्र ग्रहपूजन करावें. त्याचें विधान आतांच सांगणार आहेत २९३.

आतां नित्य व काम्य संयोग सांगतात—

**आदित्यस्य सदा पूजां तिलकं स्वामिनस्तथा ॥**
**महागणपतेश्चैव कुर्वन्सिद्धिमवाप्नुयात् ॥ २९४ ॥**

भगवान आदित्याची प्रतिदिवशीं रक्तचंदन, कुंकू, रक्तपुष्पें इत्यादिकांच्या योगानें पूजा करणारास व स्कंद आणि महागणपति यांची जो नित्य पूजा करितो त्यास आत्मज्ञानाच्या द्वारा मोक्षलक्षण सिद्धि प्राप्त होते. हा पूजेचा नित्यसंयोग झाला. आदित्य, स्कंद व गणपति यांतील कोणातरी एकाचा किंवा सर्वांचाच सुवर्णाचा किंवा रुप्याचा तिलक (व नेत्र) जो करितो त्याचे सर्व मनोरथ पूर्ण होतात. हा काम्यसंयोग आहे २९४.

इति गणपतिकल्पः प्रकरणम् ११.

---

# अथ ग्रहशांतिप्रकरणम् १२.



२९३ श्लोकांत कर्मांच्या फलांची सिद्धि निर्विघ्नपणें होणें व लक्ष्मी प्राप्त होणें, हें ग्रहपूजेचें फल सांगितलें. आतां तिचीं दुसरीं फलें सांगतात—

**श्रीकामः शान्तिकामो वा ग्रहयज्ञं समाचरेत् ॥**
**वृष्टयायुःपुष्टिकामो वा तथैवाभिचरन्नपि ॥ २९५ ॥**

ज्यास लक्ष्मीची इच्छा आहे; आपत्ति शांत व्हावी, अशी इच्छा आहे; धान्यादिकांच्या वृद्धीकरितां वृष्टि व्हावी अशी इच्छा आहे; अपमृत्यूचा नाश होऊन आयुष्य वाढावें व उत्तमप्रकारें शरीर पुष्ट व्हावें अशी इच्छा आहे त्यानें ग्रहयज्ञ करावा. त्याचप्रमाणें अभिचार करण्याची ज्यास इच्छा असेल त्यानेंही ही ग्रहपूजा करावी. अदृष्ट उपायानें शत्रूस पीडा करणें यास अभिचार म्हणतात. श्रीकामः असें जें येथें म्हटलें आहे तो मागच्या फलाचाच अनुवाद केला आहे २९५.

आतां कोणत्या ग्रहांचें पूजन करावयाचें तें सांगतात—

सूर्यः सोमो महीपुत्रः सोमपुत्रो बृहस्पतिः ॥
शुक्रः शनैश्चरो राहुः केतुश्चेति ग्रहाः स्मृताः ॥ २९६ ॥

सूर्य, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु व केतु हे नवग्रह आहेत २९६.
ग्रहांचें पूजन कसें करावें तें सागतातः—

ताम्रकात्स्फाटिकाद्रक्तचन्दनात्स्वर्णकादुभौ ।
राजतादयसः सीसात्कांस्यात्कार्या ग्रहाः क्रमात् ॥ २९७ ॥

स्ववर्णैर्वा पटे लेख्या गन्धैर्मण्डलकेषु च ।
यथावर्णं प्रदेयानि वासांसि कुसुमानि च ॥ २९८ ॥

गन्धश्च बलयश्चैव धूपो देयश्च गुग्गुलुः ।
कर्तव्या मन्त्रवन्तश्च चरवः प्रतिदेवतम् ॥ २९९ ॥

सूर्यादि ग्रहांच्या मूर्ति क्रमानें तांबें, स्फटिक, रक्तचंदन, सुवर्ण, रुपें, लोखंड, शिसें व कांसें यांच्या कराव्या. पण त्या धातूंचा लाभ न झाल्यास त्यात्या वर्णांच्या गंधांनीं वस्त्रावर किंवा मंडलावर ते ग्रह काढावे. द्विभुज, सप्ताश्वरथारूढ इत्यादि त्यात्या ग्रहाचा विशेष मत्स्यादि पुराणांत पहावा. विस्तार होईल, या भीतीनें तो सर्व प्रकार येथें देत नाहीं. ज्या ग्रहाचा जो रंग असेल त्याच रंगाचीं वस्त्रें व गंधपुष्पें त्यांस द्यावीं. सर्वांस बलि समर्पण करावा. गुग्गुलाचा धूप द्यावा. अग्निस्थापन, अन्वाधान इत्यादि विधिपूर्वक " अमुष्मै त्वा जुष्टं निर्वपामि " इत्यादि मंत्रोच्चारानें चार चार मुष्टि धान्य घेऊन प्रत्येक ग्रहास उद्देशून निरनिराळा चरु शिजवावा. नंतर उत्तमप्रकारें प्रज्वलित झालेल्या अग्नीमध्यें इध्माधानापासून आघारहोमापर्यंत कर्म करून आदित्यादि ग्रहांस उद्देशून क्रमानें पुढील मंत्रांनीं, पुढें सांगितलेल्या समिधांचा पुढें सांगितल्याप्रमाणें होम करून चरुहोम द्यावा २९७, २९८, २९९.

मंत्र सांगतात—

आकृष्णेन इमं देवा अग्निर्मूर्धा दिवः ककुत् ।
उद्बुध्यस्वेति च ऋचो यथासंख्यं प्रकीर्तिताः ॥ ३०० ॥
बृहस्पते अतियदर्यस्तथैवान्नात्परिश्रुतः ।
शन्नो देवीस्तथा काण्डात्केतुं कृण्वन्निमांस्तथा ॥ ३०१ ॥

"आकृष्णेन रजसा वर्तमान" इत्यादि नऊ मंत्र क्रमानें आदित्यादि देवतांचे आहेत ३००,३०१.

आतां समिधा सांगतात—

अर्कः पलाशः खदिर अपामार्गोऽथ पिप्पलः ।
औदुम्बरः शमी दूर्वा कुशाश्च समिधः क्रमात् ॥ ३०२ ॥

रुई, पळस, खैर, आघाडा, पिंपळ, उदुंबर, शमी, दूर्वा व दर्भ यांच्या सूर्यादि क्रमानें समिधा कराव्यात; त्या ओल्या, न तुटलेल्या, स्वचा न निघालेल्या, व टीचभर लांब असाव्यात ३०२.

एकैकस्य त्वष्टशतमष्टाविंशतिरेव च ।
होतव्या मधुसर्पिर्भ्यां दध्ना क्षीरेण वा युताः ॥ ३०३ ॥

आदित्यादि नवग्रहांतील प्रत्येकास उद्देशून यथासंभव अष्टोत्तरशत किंवा अठ्ठावीस समिधा मध, ताजें तूप, दहीं किंवा दूध यांसह अग्नींत द्याव्या ३०३.

आतां त्यांचीं भोजनें सांगतात—

गुडौदनं पायसं च हविष्यं क्षीरषाष्टिकम् ।
दध्योदनं हविश्चूर्णं मांसं चित्रान्नमेव च ॥ ३०४ ॥
दद्याद्ग्रहक्रमादेव द्विजेभ्यो भोजनं द्विजः ।
शक्तितो वा यथालाभं सत्कृत्य विधिपूर्वकम् ॥ ३०५ ॥

गूळभात; पायस; हविष्यान्न; साठ दिवसांत होणाऱ्या तांदुळाचा भात व दूध; दहीं-भात; तूपभात; ज्यांत तिळाचें चूर्ण मिसळलें आहे असा भात; भक्ष्यमांसमिश्र भात; व अनेक वर्णांचा भात क्रमानें आदित्यादिकांस उद्देशून ब्राह्मणांस भोजनार्थ द्यावा. ब्राह्मणांच्या संख्येविषयीं नियम केलेला नाहीं; मिळतील तितक्या ब्राह्मणांस भोजन घालावें. गुडौदनादिकांच्या अभावीं आपल्या शक्तीप्रमाणें नुस्ता भातच पादप्रक्षालनादिविधिपूर्वक सन्मानपुरःसर द्यावा ३०४, ३०५.

आतां दक्षिणा सांगतात—

धेनुः शंखस्तथानड्वान्हेम वासो हयः क्रमात् ।
कृष्णा गौरायसं छाग एता वै दक्षिणाः स्मृताः ॥ ३०६ ॥

एकदांच व्यालेली गाय, शंख, भार वाहण्यास समर्थ असलेला बैल, सुवर्ण, वस्त्र, पांढरा घोडा, काळी गाय, शस्त्रादि लोखंड व बकरा या दक्षिणा क्रमानें आदित्यादि नवग्रहांस उद्देशून ब्राह्मणांस याव्या; असें मनु-प्रभृति मुनींनीं सांगितलें आहे. पण यांतील ज्या दक्षिणेचा असंभव असेल तिच्या स्थानीं आपल्या शक्तीप्रमाणें दुसरें कांहीं यावें ३०६.

आतां ब्रह्मदेवाचा वर सांगून अनिष्ट ग्रहांचें पूजन करण्याविषयीं उपदेश करितात—

**यस्य यस्य यदा दुःस्थः स तं यत्नेन पूजयेत् ।**
**ब्रह्मणैषां वरो दत्तः पूजिताः पूजयिष्यथ ॥ ३०७ ॥**

ज्यास जो ग्रह दुष्ट म्हणजे अष्टम, चतुर्थ इत्यादि स्थानीं असेल त्यानें त्याची पूजा विशेषरीतीनें करावी. कारण या ग्रहांस ब्रह्मदेवानें पूर्वी असा वर दिला आहे कीं, तुमची जर कोणी पूजा केली तर तुम्हीही त्या पूजकास इष्ट वस्तु देऊन व अनिष्ट परिहार करून संतुष्ट करा ३०७.

सामान्यतः सर्व द्विजांस उद्देशून शांतिक-पौष्टिक कर्में सांगितलेलीं आहेत; पण त्या कर्मांमध्यें अभिषिक्त राजाचा विशेष अधिकार आहे, असें आतां सांगतात—

**ग्रहाधीना नरेन्द्राणामुच्छ्रायाः पतनानि च ।**
**भावाभावौ च जगतस्तस्मात्पूज्यतमा ग्रहाः ॥ ३०८ ॥**

अभिषिक्त क्षत्रिय राजांस हे ग्रह अतिशय पूज्य आहेत. इतरांसही पूज्य आहेत असा येथें ध्वन्यर्थ समजावा. कारण सर्व प्राण्यांचा अभ्युदय व नाश या ग्रहांच्या अधीन असतो. यास्तव अधिकाऱ्यांनीं त्यांची अवश्य पूजा करावी. चराचर जगाची उत्पत्ति व प्रलय हीं दोन्हीं ग्रहांच्या अधीन आहेत. त्यांचें पूजन केल्यास उत्पत्तिप्रलय योग्य समयीं होतात. राजा सर्व प्रजेचा ईश्वर आहे. यास्तव तिच्या योगक्षेमाकरितां ग्रहांस संतुष्ट करणें हें त्याचें कर्तव्य आहे. शांतिक व पौष्टिक कर्मांचा अव्हेर न करणें हें सर्वांसच हितकर आहे ३०८.

इति ग्रहशांतिप्रकरणम् १२.

---

# अथ राजधर्मप्रकरणम् १३.



गृहस्थांचे सामान्य धर्म सांगितले. आतां राज्याभिषेकादि गुणयुक्त गृहस्थांचे विशेष धर्म सांगतात—

**महोत्साहः स्थूललक्ष्यः कृतज्ञो वृद्धसेवकः ।**
**विनीतः सत्यसंपन्नः कुलीनः सत्यवाक्शुचिः ॥ ३०९ ॥**

अदीर्घसूत्रः स्मृतिमानक्षुद्रोऽपरुषस्तथा ।
धार्मिकोऽव्यसनश्चैव प्राज्ञः शूरो रहस्यवित् ॥ ३१० ॥
स्वरन्ध्रगोप्तान्वीक्षिक्यां दण्डनीत्यां तथैव च ।
विनीतस्त्वथ वार्तायां त्रय्यां चैव नराधिपः ॥ ३११ ॥

उत्साह म्हणजे धर्मादि पुरुषार्थांस सिद्धि करणाऱ्या कर्मांचा आरंभ करण्याचा निश्चय. ज्यास मोठा उत्साह आहे त्यास महोत्साह म्हणतात. राजानें महोत्साह असावें. पुष्कळ द्रव्य देण्याकडे त्याचें लक्ष्य असावें. दुसऱ्यानें केलेला उपकार व अपकार विसरूं नये. तप, ज्ञान इत्यादिकांच्या योगानें जे वृद्ध असतील त्यांची त्यानें सेवा करावी आणि विनयसंपन्न व सत्वसंपन्न असावें. संपन्न स्थितींत हर्ष व विपन्न स्थितींत विषाद न मानणारा पुरुष सत्वसंपन्न असतो. त्याचप्रमाणें माता व पिता या दोन्ही पक्षीं कुलीन, सत्य भाषण करणारा, बाह्य व आभ्यंतर शौचयुक्त, अवश्य कर्तव्यकर्मांच्या आरंभास व आरंभिलेल्या कर्मांच्या समाप्तीस जो उशीर लावीत नाहीं, समजलेल्या गोष्टीस न विसरणारा, असद्गुणांचा द्वेष करणारा, परदोषांचें कीर्तन न करणारा म्हणजे दुसऱ्याचे दोष कोणास न सांगणारा; वर्णाश्रमधर्मयुक्त; व्यसनरहित, गंभीर अर्थ जाणण्यास समर्थ, शूर ( निर्भय ), गुप्त अर्थ गुप्त कसा ठेवावा, हें जाणणारा; आपल्या प्रभु—अमात्यादि सात अंगांत कांहीं न्यूनता असल्यास ती प्रकट न होऊं देणारा आणि आत्मविद्या, अर्थशास्त्र, कृषि, वाणिज्य, पशुपालन इत्यादि वार्ता व व्याकरणादि अंगें, स्मृत्या, पुराणें, मीमांसा इत्यादिकांसह वेदविद्या यांत प्रवीण, असा राजा असावा. महोत्साहादि गुण ज्याच्यामध्यें असतील त्या क्षत्रियासच राज्याभिषेक करणें युक्त होय. राजाच्या अंगीं कोणतीं अठरा व्यसनें नसावीं तें मनुस्मृतींत सांगितलें आहे. ३०९—३११.

याप्रमाणें राजाचे अंतरंग धर्म सांगून आतां बहिरंग धर्म सांगतात—

स मन्त्रिणः प्रकुर्वीत प्राज्ञान्मौलान्स्थिराञ्शुचीन् ॥
तैः सार्द्धं चिन्तयेद्राज्यं विप्रेणाथ ततः परम् ॥ ३१२ ॥

महोत्साहादि गुणसंपन्न राजानें हिताहितविवेककुशल, स्ववंशपरंपराप्राप्त ( म्हणजे आपल्या वंशपरंपरेनें मन्त्री होत आलेले ) मोठ्या हर्षविषादप्रसंगींही हर्षादि न मानणारे; व शुद्धचित्त सात किंवा आठ मंत्री करावेत. नंतर अशा मंत्र्यांसह संधिविग्रह इत्यादि लक्षणकार्यांचा विचार करावा. तो सर्वांशीं मिळून किंवा एकेकट्यास पृथक् पृथक् बोलावून करावा. त्यांचा विचार घेऊन सर्व शास्त्रार्थविचारांत कुशल असलेल्या ब्राह्मणा-( पुरोहिता ) बरोबर त्याचाच खल करावा व शेवटीं राजानें एकांतात बसून आपल्याशींच त्या गोष्टीचा चांगला विचार करून काय करावयाचें तें ठरवावें ३१२.

पुरोहित कसा असावा तें सांगतात—

पुरोहितं प्रकुर्वीत दैवज्ञमुदितोदितम् ।
दण्डनीत्यां च कुशलमथर्वाङ्गिरसे तथा ॥ ३१३ ॥

ग्रहदशा, उत्पात इत्यादिकांस व त्यांच्या शांतीस जाणणारा, शास्त्रोक्त विद्या, कुल, अनुष्ठान इत्यादिकांनीं समृद्ध आणि अर्थशास्त्रांत व शांतिक पौष्टिक कर्मांत कुशल, असा पुरोहित करावा. सर्व दृष्ट व अदृष्ट फलदायी कर्मांमध्यें पुढें केलेल्या ब्राह्मणास पुरोहित म्हणतात. अशा द्विजोत्तमास दान, मान, सत्कार इत्यादिकांच्या योगानें आपल्याशीं संबद्ध करून घ्यावें ३१३.

त्याचप्रमाणें—

श्रौतस्मार्तक्रियाहेतोर्वृणुयादेव चर्त्विजः ।
यज्ञांश्चैव प्रकुर्वीत विधिवद्भूरिदक्षिणान् ॥ ३१४ ॥

अग्निहोत्रादि श्रौत व उपासनादि स्मार्त कर्मांचें अनुष्ठान सिद्ध व्हावें यास्तव ऋत्विज करावेत. म्हणजे वरणविधिपूर्वक ब्राह्मण नियत करावेत. राजसूयादि पुष्कळ दक्षिणायुक्त यज्ञ यथाशास्त्र करावेत ३१४.

भोगांश्च दत्वा विप्रेभ्यो वसूनि विविधानि च ॥
अक्षयोऽयं निधी राज्ञां यद्विप्रेषूपपादितम् ॥ ३१५ ॥

ब्राह्मणास नानाप्रकारचें द्रव्य, पशु, क्षेत्र इत्यादि सुख-साधनांचें दान देऊन भोग अर्पण करावे. कारण ब्राह्मणांस दानादि देणें, हा राजांचा अक्षय निधि आहे. पूर्वीं दानप्रकरणांत सांगितल्याप्रमाणें सामान्यतः धर्म या नात्यानें दानाची प्राप्ति झाली असतां राजास दान हें प्रधान आहे, असें सुचविण्याकरितां पुनः येथें त्याचें प्रतिपादन केलें आहे ३१५.

अस्कन्नमव्ययं चैव प्रायश्चित्तैरदूषितम् ।
अग्नेः सकाशाद्विप्राग्नौ हुतं शेषमिहोच्यते ॥ ३१६ ॥

अग्नीच्या योगानें सिद्ध होणाऱ्या व बहुदाक्षिणायुक्त अशा राजसूयादि यज्ञांहून ब्राह्मणरूपी अग्नींत अर्पण केलेलें द्रव्य श्रेष्ठ होय. कारण त्याचें कधीं क्षरण होत नाहीं. तें अव्यय व पशुहिंसारहित असतें. शिवाय या होमांत प्रायश्चित्ताचे आयास नाहींत ३१६.

पण ब्राह्मणांस जें द्रव्य द्यावयाचें तें कोणत्या रीतीनें द्यावें तें सांगतात—

अलब्धमीहेद्धर्मेण लब्धं यत्नेन पालयेत् ।
पालितं वर्धयेन्नीत्या वृद्धं पात्रेषु निक्षिपेत् ॥ ३१७ ॥

जें प्राप्त नसेल तें मिळविण्याचा प्रयत्न धर्मशास्त्राच्या अनुरोधानें करावा. जें प्राप्त झालें असेल तें मोठ्या प्रयत्नानें राखावें. म्हणजे त्याचें स्वतः अवलोकन करीत असावें. राखिलेल्या त्या द्रव्याची व्यापारादिकांच्या द्वारा वृद्धि करावी व अशारीतीनें वाढविलेलें धन धर्म, अर्थ व काम या तीन पुरुषार्थांकडे खर्च करावें ३१७,

तीन पुरुषार्थांच्या उद्देशानें सत्पात्रीं धन अर्पण करून पुढें काय करावें तें सांगतात—

दत्वा भूमिं निबन्धं वा कृत्वा लेख्यं तु कारयेत् ।
आगामिभद्रनृपतिपरिज्ञानाय पार्थिवः ॥ ३१८ ॥

राजानें पूर्वोक्त विधीनें भूमि देऊन म्हणजे तिच्यावरील आपलें स्वत्व निवृत्त करून किंवा एका भांडें भरणाराचें इतकें जल, एका पर्णभराचीं इतकीं पानें, इत्यादि निबंध करून पुढें होणाऱ्या साधु राजांच्या माहितीकरितां लेख्य ( सनद ) करावें. कारण शास्त्रास प्रमाण मानणाऱ्या पुढच्या राजांस हें दान अमक्यानें अमक्यास दिलें, असें समजण्यास त्यावाचून दुसरा मार्गच नसतो. येथें " पार्थिवः " असें पद आहे. त्यावरून भूमिदानाचा अधिकार राजासच आहे असें ठरतें. " या ग्रामांत प्रतिक्षेत्रामागें क्षेत्राच्या स्वामीनें हें धन, यास प्रतिवर्षी किंवा प्रतिमासीं द्यावें" असा जो नियम करितात त्यास निबंध म्हणावें असें अपरार्कांत म्हटलें आहे ३१८.

लेख्य कसें करावें, तें सांगतात—

पटे वा ताम्रपट्टे वा स्वमुद्रोपरिचिह्नितम् ।
अभिलेख्यात्मनो वंश्यानात्मानं च महीपतिः ॥ ३१९॥
प्रतिग्रहपरीमाणं दानच्छेदोपवर्णनम् ।
स्वहस्तकालसंपन्नं शासनं कारयेच्छुभम् ॥ ३२० ॥

कापसाच्या वस्त्रावर किंवा तांब्याच्या पत्र्यावर राजानें आपला प्रपितामह, पितामह व पिता यांचीं नावें, त्यांची कीर्ती व आपलें नांव लिहावें. ज्यास दान दिलें असेल त्याच्या नावाचाही निर्देश करावा. प्रतिग्रहाचें परिमाण व दानच्छेदाचें वर्णन करावें. प्रतिग्रह म्हणजे निबंध. त्याचें परिमाण व दान म्हणजे क्षेत्रादि त्याच्या सीमा असा या दोन शब्दांचा अर्थ समजावा. पण नदी, मार्ग, ग्राम इत्यादि सीमा केल्यास म्हणजे या दान दिलेल्या क्षेत्राच्या दक्षिणेस अमुक नदी आहे; पूर्वेस अमुक गांव आहे, पश्चिमेस अमुक गांवचा रस्ता आहे इत्यादि लिहून ठेविल्यास कालांतरानें त्यांत फरक पडण्याचा संभव असतो. त्यामुळें त्या भूमीच्या च्छेदांत कमी अधिकपणा होणें अशक्य नाहीं. यास्तव आपल्या हस्ताक्षरानें मला अमुकास, अमुकाच्या पुत्रास हें वर लिहिलेलें मान्य आहे, असें लिहावें. शक व संवत्सर यांचा निर्देश करावा. चंद्रग्रहण, सूर्यग्रहण, संक्रांति इत्यादिकांतील ज्या कालीं तें दान दिलें असेल त्याचा उल्लेख करावा; व आपल्या मुद्रेनें तें लेख्य चिन्हित करावें. शेवटीं या शासनाचें अनुपालन करणें पुढील राजांस श्रेयस्कर होईल, असें शासन स्थिर करावें ३१९, ३२०.

आतां राजाचें निवासस्थान कसें असावें तें सांगतात—

रम्यं पशव्यमाजीव्यं जाङ्गलं देशमावसेत् ।
तत्र दुर्गाणि कुर्वीत जनकोशात्मगुप्तये ॥ ३२१ ॥

अशोक, चांफे इत्यादि वृक्षांच्या योगानें रम्य, पशूंस हितकर म्हणजे त्यांची वृद्धि करणारें, कन्द, मूल, फल, पुष्पें इत्यादिकांवर उपजीविका करण्यास योग्य; व जल, तरु, पर्वत इत्यादिकांनीं युक्त असलेलें स्थान पाहून तेथें रहावें. अशा प्रकारच्या त्या प्रदेशीं लोक, सुवर्णादिकांचे निधि व स्वतः राजा यांच्या संरक्षणार्थ दुर्ग करावा. मनुस्मृतींत सहा प्रकारचे दुर्ग सांगितले आहेत. चोहोंकडून पांच योजन निर्जल प्रदेशानें व्याप्त असलेलें स्थान हा धन्वदुर्ग होय. पाषाण, किंवा पक्क्या विटा यांच्या बारा हात उंच, अति विस्तृत, युद्धाकरितां वरून हिंडण्यास योग्य व सामान्य झरोक्यांनीं युक्त अशा तटानें चोहोंकडून वेष्टित व द्वारयुक्त स्थानास महीदुर्ग म्हणतात. अगाध जलानें परिवेष्टित असलेल्या स्थानास अब्दुर्ग म्हणतात. वृक्षवेष्टित स्थानास वार्क्षदुर्ग, चतुरंग बलयुक्त स्थानास नृदुर्ग व पर्वतवेष्टित प्रदेशास गिरिदुर्ग म्हणतात ३२१.

**तत्र तत्र च निष्णातानध्यक्षान्कुशलाञ्शुचीन् ।**
**प्रकुर्यादायकर्मान्तव्ययकर्मसु चोद्यतान् ॥ ३२२ ॥**

धर्म, अर्थ, काम इत्यादि कृत्यांत दुसरा व्यापार न करणारे, त्या त्या व्यापारांत चतुर, चार प्रकारच्या कपटांनीं रहित, सुवर्णादिकांचीं उत्पत्तिस्थानें व दानस्थानें यांत आळस न करणारे आणि प्राज्ञत्वादि गुणयुक्त असे योग्य अधिकारी नेमावे. " धर्मकृत्यांत धार्मिकांस, अर्थकृत्यांत पंडितांस, स्त्रियांच्या अंतःपुरांत नपुंसकांस व नीचकृत्यांत नीचांस योजावें " असें अन्यत्र सांगितलें आहे ३२२.

वर ( ३१५ व्या श्लोकांत ) सामान्यतः दान द्यावें म्हणून सांगितलें आहे. आतां येथें राजांनीं आपल्या पराक्रमानें मिळविलेल्या धनाचें दान केल्यास मोठें फल मिळतें असें सांगतात—

**नातः परतरो धर्मो नृपाणां यद्रणार्जितम् ।**
**विप्रेभ्यो दीयते द्रव्यं प्रजाभ्यश्चाभयं सदा ॥ ३२३ ॥**

रण करून मिळविलेलें द्रव्य ब्राह्मणास देणें व प्रजेस अभयदान देणें यासारिखा राजांचा दुसरा कोणताही अत्युत्कृष्ट धर्म नाहीं ३२३.

रणामध्यें मिळविलेलें द्रव्य द्यावें असें वर सांगितलें खरें; पण रणांत प्रवृत्त झालेल्या राजास द्रव्याबद्दल मृत्यु येणेंही संभवनीय आहे. मेल्यावर धर्म नाहीं व अर्थही नाहीं. यास्तव असल्या संकटापासून दूर होणेंच बरें, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात—

**य आहवेषु वध्यन्ते भूम्यर्थमपराङ्मुखाः ।**
**अकूटैरायुधैर्यान्ति ते स्वर्गं योगिनो यथा ॥ ३२४ ॥**

जे भूमि, द्रव्य इत्यादिकांकरितां संग्राम करण्यास प्रवृत्त होऊन विषानें लिप्त न केलेल्या, इत्यादि शुद्ध आयुधांनीं लढत असतांना सन्मुख मारिले जातात ते योगाभ्यासी पुरुषांप्रमाणें स्वर्गास जातात ३२४.

पदानि क्रतुतुल्यानि भग्नेष्वविनिवर्तिनाम् ।
राजा सुकृतमादत्ते हतानां विपलायिनाम् ॥ ३२५ ॥

आपली ( हत्ती, घोडे, रथ व पदाति अशी ) चतुरंग सेना पराभूत झाली असतांही शत्रूच्या सैन्यावर चालून जाणाऱ्या शूर क्षत्रियाचें एकेक पाऊल एकेक अश्वमेधाबरोबर पुण्यदायक होतें. पण असें न करितां जे पाठ फिरवून पळत सुटतात त्यांस शत्रूंनीं मारलें असतां त्यांचें सर्व पुण्य त्यांच्या राजास प्राप्त होतें ३२५.

तवाहंवादिनं क्लीबं निर्हेतिं परसंगतम् ।
न हन्याद्विनिवृत्तं च युद्धप्रेक्षणकादिकम् ॥ ३२६ ॥

" मी तुझा आहें, " असें म्हणणारास, नपुंसकास, आयुधरहितास, दुसऱ्याशीं लढणारास, युद्धांतून परत फिरलेल्यास व युद्ध पाहात असणारास मारूं नये. या श्लोकांत–प्रेक्षणकादिकम्–येथें जो आदिशब्द आहे त्यावरून आणखी कोण कोण अवध्य आहेत ते गौतम व शंख यांनीं असे सांगितले आहेत–घोडे, सारथी, हात जोडून शरणागत, केंस मोकळे सोडलेला, पराङ्मुख झालेला ( म्हणजे पाठ दाखवून पळणारा ), बसलेला, स्थल व वृक्ष यांवर आरूढ झालेला, दूत, मी गाय आहें किंवा ब्राह्मण आहें असें सांगणारा, पाणी पीत असलेला, भोजन करणारा, कवच, पादत्राण, शिरस्त्राण इत्यादिकांनीं रहित असलेला, कवचादि अंगांत घालीत असणारा, स्त्री व दूत हे अवध्य आहेत. राजास राजावांचून इतरानें मारूं नये ३२६.

कृतरक्षः समुत्थाय पश्येदायव्ययौ स्वयम् ।
व्यवहारांस्ततो दृष्ट्वा स्नात्वा भुञ्जीत कामतः ॥३२७॥

नगराची व आपली रक्षा करून प्रतिदिनीं प्रातःकाळीं उठून आपणच आयव्यय ( जमाखर्च ) पहावे. त्यानंतर न्यायाचीं कामें पाहून, मध्यान्हसमयीं स्नान करावें व आपल्या इच्छेप्रमाणें योग्य समयीं भोजन करावें ३२७.

हिरण्यव्यापृतानीतं भाण्डागारेषु निक्षिपेत् ।
पश्येच्चारांस्ततो दूतान्प्रेषयेन्मन्त्रिसंगतः ॥ ३२८ ॥

त्यानंतर सुवर्णादि आणण्याकरितां ज्यांची योजना केली असेल त्यांनीं आणलेलें सुवर्णादि धन स्वतः पाहून भांडागरांत ( खजिन्यांत ) ठेवावें. त्यानंतर परराज्यांतील वृत्तांत जाणण्याकरितां संन्यासी, तापसी इत्यादिकांच्या वेषानें गुप्तपणें पाठविलेले विश्वासु चार परत आले असतील त्यांस भेटावें व त्यांस कोठें तरी रहावयास सांगावें. त्यानंतर उघड उघड दुसऱ्या राजाकडे जाऊन व परत येऊन वृत्तांत कळविणाऱ्या दूतास भेटावें. दूत निसृष्टार्थ, संदिष्टार्थ व शासनहर असे तीन प्रकारचे असतात. राजांचीं कार्यें देशकालानुरूप आपणच करणारे निसृष्टार्थ, सांगितलें असेल तेवढेंच दुसऱ्यास कळविणारे संदिष्टार्थ व राजाचा लेख इत्यादि

नेणारे शासनहर होत. यांतील पूर्वपूर्व दूतांची योग्यता अधिक असते. असो. पूर्वी कांहीं कामाकरितां पाठविलेले जे दूत परत आले असतील त्यांस मंत्र्यांसह भेटावें. त्यांच्या तोंडची वार्ता ऐकून ध्यावी व पुनः कोठें पाठवावयाचें असल्यास पाठवावें ३२८.

ततः स्वैरविहारी स्यान्मन्त्रिभिर्वा समागतः ।
बलानां दर्शनं कृत्वा सेनान्या सह चिन्तयेत् ॥ ३२९॥

त्यानंतर अपराह्णकालीं राजानें आपल्या इच्छेप्रमाणें अंतःपुरांत विहार करावा, किंवा कलाकुशल व विश्वासु मंत्र्याबरोबर व रूप, यौवन, चातुर्य इत्यादि गुणयुक्त स्त्रियांसह विनोदाच्या गोष्टी सांगाव्या. याप्रमाणें थट्टामस्करींत कांहीं काल घालविल्यावर उत्तम वस्त्रें, पुष्पें, उटया, अलंकार इत्यादिकांनीं सुशोभित होऊन चतुरंग सेना पहावी. सेनापतीबरोबर रक्षणसंबंधीं गोष्टींचा त्या त्या देशकालास अनुसरून विचार करावा ३२९.

त्यानंतर—

संध्यामुपास्य शृणुयाच्चाराणां गूढभाषितम् ।
गीतनृत्यैश्च भुञ्जीत पठेत्स्वाध्यायमेव च ॥ ३३० ॥

सायंसंध्योपासना करून पूर्वी भेटून कोठें तरी ठेंविलेल्या चारांचें गुप्त भाषण अंतर्गृहांत सशस्त्र होऊन ऐकावें. त्यानंतर नृत्य, गीत इत्यादिकांनीं कांहीं काल क्रीडा करून भोजनालयांत जाऊन भोजन करावें. भोजनोत्तर विस्मरण होऊं नये म्हणून यथाशक्ति स्वाध्यायाचा पाठ करावा ३३०.

संविशेत्तूर्यघोषेण प्रतिबुध्येत्तथैव च ।
शास्त्राणि चिन्तयेद्बुध्वा सर्वकर्तव्यतास्तथा ॥ ३३१ ॥
प्रेषयेच्च ततश्चारान्स्वेष्वन्येषु च सादरान् ।
ऋत्विक्पुरोहिताचार्यैराशीभिरभिनन्दितः ॥ ३३२ ॥
दृष्ट्वा ज्योतिर्विदो वैद्यान्दद्याद्गां काञ्चनं महीम् ।
नैवेशिकानि च ततः श्रोत्रियेभ्यो गृहाणि च ॥ ३३३ ॥

त्यानंतर मंगल वाद्यें व शंख यांचा घोष होत असतांना निजावें. त्याचप्रमाणें मंगलवाद्यांच्या गजरांत उठावें. ब्राह्ममूहूर्तावर जागें झाल्यावर विश्वासु शास्त्रज्ञांसह अथवा एकट्यानेंच शास्त्रचिंतन करावें, व सर्व कर्तव्यकर्मांविषयीं विचार करावा. पण शरीरस्वास्थ्य नसल्यास या कामीं दुसऱ्या योग्य पुरुषाची योजना करावी. त्यानंतर तेथें बसूनच विश्वासु चारांची दान, मान, सत्कार इत्यादिकांनीं पूजा करून त्यांस आपल्या राज्यांतील अधिकाऱ्यांची व अन्य राजांची हालचाल पहाण्याकरितां पाठवावें. त्यानंतर प्रातःसंध्या व अग्नीचें हवन करावें. पुरोहित, ऋत्विज, आचार्य इत्यादिकांनीं आशीर्वादांच्या योगानें ज्याचें अभिनंदन केलें आहे, अशा त्या राजानें ज्योतिष्यांचें दर्शन घेऊन त्यांच्याकडून ग्रहादिकांची स्थिति समजून

घ्यावी. अनिष्ट ग्रहांची शांति करण्यास पुरोहितास सांगून वैद्यास आपली प्रकृति दाखवावी. कांहीं अस्वास्थ्य असल्यास तें त्यांस कळवून त्याची चिकित्सा करवावी. आणि दुभती गाय, सुवर्ण, पृथ्वी, विवाहोपयोगी कन्या, अलंकार इत्यादि व उत्तम गृहें वेदवेत्त्या ब्राह्मणांस द्यावीं ३३१–३३३.

ब्राह्मणेषु क्षमी स्निग्धेष्वजिह्मः क्रोधनोऽरिपु ।
स्याद्राजा भृत्यवर्गेषु प्रजासु च यथा पिता ॥ ३३४ ॥

ब्राह्मण धिक्कार करीत असले तरी त्यांच्याविषयीं क्षमावान् व्हावें. मित्रादि स्नेहयुक्त लोकांविषयीं अवक्र म्हणजे सरळस्वभावानें रहावें. व सेवकवर्ग आणि प्रजा यांचें हित करून व अहिताचें निवर्तन करून त्यांच्यावर पित्याप्रमाणें दया करावी ३३४.

प्रजापालन केल्यानें कोणतें फल मिळतें तें सांगतात—

पुण्यात्षड्भागमादत्ते न्यायेन परिपालयन् ।
सर्वदानाधिकं यस्मात्प्रजानां परिपालनम् ॥ ३३५ ॥

न्यायानें व शास्त्रोक्तमार्गानें प्रजेचें परिपालन केलें असतां प्रजेंतील लोकांनीं संचित केलेल्या पुण्याचा सहावा भाग राजास मिळतो. अर्थात् भूमि, गाय इत्यादिकांच्या दानापेक्षां प्रजापरिपालन अधिक फलदायक आहे. यास्तव प्रजेचें पित्याप्रमाणें पालन करावें ३३५.

चाटुतस्करदुर्वृत्तमहासाहसिकादिभिः ।
पीड्यमानाः प्रजा रक्षेत्कायस्थैश्च विशेषतः ॥ ३३६ ॥

विश्वासघात करून परधन नेणारे, चोर, गारुडी, ठग, बलात्कार करणारे, महालुटारू व इतर कपटी इत्यादि लोक यांच्या पीडेपासून प्रजेचें रक्षण करावें. विशेषतः लेखक व गणक यांच्यापासून पीडलेल्या प्रजेचें रक्षण करावें. कारण ते राजाचे सेवक राजास फार प्रिय असतात. त्यामुळें ते अति कपटी व दुर्निवार होतात ३३६.

अरक्ष्यमाणाः कुर्वन्ति यत्किंचित्किल्बिषं प्रजाः ।
तस्मात्तु नृपतेरर्धं यस्माद्गृह्णात्यसौ करान् ॥ ३३७ ॥

अरक्षित प्रजा जें कांहीं पाप करिते त्याचा अर्धाभाग राजाच्या वाट्यास येतो. कारण हा राजा लोकांच्या संरक्षणाकरितांच त्यांच्यापासून कर घेत असतो. ( राजा हा एकप्रकारें प्रजेचा सेवक आहे ही कल्पना आम्हांस नवीन नाहीं ) ३३७.

ये राष्ट्राधिकृतास्तेषां चारैर्ज्ञात्वा विचेष्टितम् ।
साधून्संमानयेद्राजा विपरीतांश्च घातयेत् ॥ ३३८ ॥
उत्कोचजीविनो द्रव्यहीनान्कृत्वा विवासयेत् ।
सदानमानसत्कारान् श्रोत्रियान्वासयेत्सदा ॥ ३३९ ॥

राष्ट्रांत जे अधिकारी नेमलेले असतील त्यांचें आचरण कसें काय चाललें आहे हें वर सांगितलेल्या चारांच्या द्वारा चांगल्या रीतीनें जाणून त्यांत जे सज्जन असतील त्यांची दान, मान, सत्कार इत्यादिकांच्या योगानें पूजा करावी व जे दुष्ट आचरण करणारे असतील त्यांचे अपराध सूक्ष्म दृष्टीनें पाहून त्यांस योग्य शासन करावें. जे लाच खाऊन मौज करणारे असतील त्यांचें सर्व द्रव्य घेऊन त्यांस देशाच्या बाहेर घालवून द्यावें. विद्वान श्रोत्रियास दान, मान व सत्कार यांच्या योगानें प्रसन्न करून आपल्या राष्ट्रांत सदा ठेवून घ्यावें ३३८, ३३९.

अन्यायेन नृपो राष्ट्रात्स्वकोशं योऽभिवर्धयेत् ।
सोऽचिराद्विगतश्रीको नाशमेति सबान्धवः ॥ ३४० ॥

जो राजा आपल्या राष्ट्रांतून अन्यायानें द्रव्य घेऊन आपला कोश ( खजिना ) वाढवितो तो थोड्याच कालांत लक्ष्मीहीन होऊन आपल्या बांधवांसह नाश पावतो ३४०.

प्रजापीडनसंतापात्समुद्भूतो हुताशनः ।
राज्ञः कुलं श्रियं प्राणांश्चादग्ध्वा न निवर्तते ॥ ३४१ ॥

प्रजेस चोरादिकांच्या योगानें होणारा जो संताप त्यापासून उत्पन्न झालेला अग्नीसारिखा पापसमूह राजाचें कुल, लक्ष्मी व प्राण यांचा नाश केल्यावांचून स्वतः शांत होत नाहीं ३४१.

य एव नृपतेर्धर्मः स्वराष्ट्रपरिपालने ।
तमेव कृत्स्नमाप्नोति परराष्ट्रं वशं नयन् ॥ ३४२ ॥

आपल्या राष्ट्राचें न्यायानें परिपालन केल्यानें राजास जो धर्म प्राप्त होतो, तो सर्व व प्रजेच्या धर्मसंचयाचा सहावा भाग पुढें सांगितलेल्या न्यायानें परराष्ट्र आपल्या अधीन करणाऱ्या राजास प्राप्त होतो ३४२.

यस्मिन्देशे य आचारो व्यवहारः कुलस्थितिः ।
तथैव परिपाल्योऽसौ यदा वशमुपागतः ॥ ३४३ ॥

जेव्हां दुसरा देश आपल्या वश येईल तेव्हां आपल्या देशाचा आचार इत्यादि तेथें सुरू करून आचारादिसंकर करूं नये. तर ज्या देशांत जो आचार, कुलमर्यादा व व्यवहार असेल तो शास्त्रविरुद्ध नसल्यास तसाच पाळावा. पण तो देश आपल्या वश येण्यापूर्वी या आचारादिकांचें पालन केलेंच पाहिजे असा नियम नाहीं. कारण शत्रूंच्या राष्ट्रास पीडा द्यावी, त्यांचें अन्न, उदक इत्यादिकांस दूषित करावें असें सांगितलें आहे. व लढाईच्या वेळीं या सर्व युक्तींचा उपयोग करितात ३४३.

मन्त्रमूलं यतो राज्यं तस्मान्मन्त्रं सुरक्षितम् ।
कुर्याद्यथास्य न विदुः कर्मणामाफलोदयात् ॥ ३४४ ॥

३१२ व्या श्लोकांत ":त्यांच्याशीं कार्याविषयीं विचार करावा" असें सांगितलें आहे. पण ज्याअर्थी राज्य मंत्रमूलक आहे त्याअर्थी त्या मंत्रास ( आपल्या कर्तव्याविषयींच्या संकेतास ) इतकें गुप्त ठेवावें कीं, संधि, विग्रह इत्यादि कार्यें सफल होत तों तो कोणास समजूं नये ३४४.

अरिर्मित्रमुदासीनोऽनन्तरस्तत्परः परः ।
क्रमशो मण्डलं चिन्त्यं सामादिभिरुपक्रमैः ॥ ३४५ ॥

शत्रु, उपकार करणारा व उदासीन (म्हणजे जो मित्रही नाहीं व शत्रुही नाहीं असा) हे तिघे सहज, कृत्रिम व प्राकृत असे तीन प्रकारचे असतात. सापत्न बंधु,: पितृव्य, त्याचा पुत्र इत्यादि सहज जन्मतःच होणारे शत्रु होत. ज्याला आपण कांहीं अपकार केला असेल किंवा ज्यानें आपणास अपकार केला असेल तो कृत्रिम शत्रु होय. व आपल्या देशास लागून ज्याचा देश आहे तो प्राकृत शत्रु होय. भगिनीचा पुत्र, आतेचा पुत्र, मावशीचा पुत्र इत्यादि हे सहज मित्र, ज्यानें उपकार केला असेल किंवा ज्याच्यावर उपकार केला असेल तो कृत्रिम मित्र व वर सांगितलेल्या प्राकृत शत्रूच्या देशास ज्याचा देश लागला असेल तो ( म्हणजे एक सोडून पलीकडचा राजा हा ) प्राकृत मित्र होय. जो सहजशत्रुही नाहीं व मित्रही नाहीं, तो सहज उदासीन; जो कृत्रिम शत्रुही नाहीं व कृत्रिम मित्रही नाहीं, तो कृत्रिम उदासीन व आपल्या देशाजवळचे एकापुढील एक असे दोन देश सोडून पलीकडच्या तिसऱ्या देशाचा राजा, ( म्हणजेच प्राकृत मित्राच्या पलीकडील राजा ) प्राकृत उदासीन होय. यातव्य, उच्छेत्तव्य पीडनीय, व कर्शनीय असे शत्रूचे चार प्रकार आहेत. आपल्या देशास लागून ज्याचा देश असेल तो यातव्य ( म्हणजे चालून जाण्यास योग्य ) आहे. व्यसनी, बलहीन, ज्याची प्रजा असंतुष्ट आहे, ज्याला दुर्ग नाहीं, जो मित्रहीन व दुर्बल आहे, तो उच्छेत्तव्य ( म्हणजे उच्छेद करण्यास योग्य ) आहे. मंत्र व बल यांनीं हीन असलेला राजा पीडनीय ( म्हणजे सैन्याचा निग्रह करून पीडा देण्यास योग्य ) व प्रबलमित्र आणि बल यांनीं युक्त असलेला कर्शनीय ( म्हणजे कोश व दंड यांचा अपकर्ष करण्यास योग्य ) होय. बृंहणीय व कर्शनीय असा दोन प्रकारचा मित्र आहे. कोश व बल यांनीं जो हीन असेल तो बृंहणीय ( म्हणजे कोशादिकांचें सहाय देऊन पुष्ट करण्यास योग्य ) व जो आपल्याहून कोश व बल यांनीं अधिक असतो तो कर्शनीय ( म्हणजे न्यून करण्यास योग्य ) असतो. या श्लोकांत अनन्तरः, तत्परः व परः या पदांनीं क्रमानें प्राकृत शत्रु, मित्र व उदासीन यांचा निर्देश केला आहे. हें सर्व राजमंडल होय. पूर्व दिशेंतील, दक्षिण दिशेंतील इत्यादि क्रमानें, त्या सर्व मंडलांतील राजांचे व्यवहार कस काय चालले आहेत, ते समजून घ्यावे व पुढें सांगितलेल्या सामादि उपायांनीं त्याचें अनुसंधान करावें.याप्रमाणें पुढचे मागचे व दोन्ही बाजूंचे ( अरि, मित्र व उदासीन असे ) प्रत्येकीं तीन तीन ( मिळून बारा) व आपण एक मिळून तेरा राजांचें एक मंडल होतें. पार्ष्णिग्राह, आक्रंद इत्यादिकांचा या अरिमित्रादिकांतच अंतर्भाव होतो. म्हणून त्यांचा येथें निराळा उल्लेख केला नाहीं ३४५.

आतां सामादि उपाय सांगतात--

**उपायाः साम दानं च भेदो दण्डस्तथैव च ।**
**सम्यक्प्रयुक्ताः सिध्येयुर्दण्डस्त्वगतिका गतिः ॥ ३४६ ॥**

साम म्हणजे प्रियभाषण; सुवर्णादि दान; मंत्री इत्यादिकांमध्यें परस्पर वैर उत्पन्न करणें हा भेद व दंड म्हणजे गुप्तरीतीनें किंवा उघड उघड धनापासून प्राणापर्यंत हानि करणें हे सामादि उपाय विघ्न करणारास आपल्या वश करून घेण्याच्या उपयोगी आहेत. देश काला-दिकांचा विचार करून यांचा उपयोग केला असतां ते सफल होतात. त्यांतील शेवटचा दंड ही अगतिका गति आहे. (म्हणजे गत्यंतर नाहीं, असें झाल्यास त्याचा उपयोग करावा.) दुसरा उपाय शक्य असतांना त्याचा उपयोग करूं नये. हें पीडनीय व कर्शनीय शत्रूच्या अभिप्रायानें सांगितलें आहे. कारण यातव्य व उच्छेत्तव्य शत्रूंचे ठायीं दण्डच मुख्य होय. हे सामादि उपाय केवल राजाच्या व्यवहारांतच उपयोगी पडतात असें नाहीं, तर लोकांच्या सर्व व्यवहारांतही त्यांचा उपयोग होतो. जसें-अरे पुत्रा, अध्ययन कर म्हणजे मी तुला हा लाडू देईन; नाहीं तर दुसऱ्यास देईन, इत्यादि पण असल्या सामवचनांनीं पुत्रानें अध्ययन न केल्यास शेवटीं तुझे कान उपटीन; मार देईन अशी दंडाची भीति घालावी. त्यानेंही इष्ट सिद्धि न झाल्यास दंड करावा; इत्यादि ३४६.

**सन्धिं च विग्रहं चैव यानमासनसंश्रयौ ।**
**द्वैधीभावं गुणानेतान्यथावत्परिकल्पयेत् ॥ ३४७ ॥**

आम्हीं उभयतांनीं एकमेकांस अपकार करूं नये , अशी व्यवस्था करणें यास संधि म्हणतात. विग्रह म्हणजे अपकार, यान म्हणजे दुसऱ्यावर चालून जाणें, आसन म्हणजे उपेक्षा, संश्रय म्हणजे बलवानाचा आश्रय करणें; व आपल्या सैन्याचे दोन भाग करणें; या सहा गुणांची-देश, काल, शक्ति, मित्र, इत्यादिकांचा विचार करून- योजना करावी ३४७.

आतां यानाचा काल सांगतात--

**यदा सस्यगुणोपेतं परराष्ट्रं तदा व्रजेत् ।**
**परश्च हीन आत्मा च हृष्टवाहनपूरुषः ॥ ३४८ ॥**

जेव्हां परराष्ट्र धान्यानें परिपूर्ण व जल, जळण, तृण इत्यादिकांनीं युक्त असतें; शत्रु सैन्यादिकांनीं हीन असतो; व आपलीं वाहनें आणि सैन्यांतील लोक हृष्टपुष्ट असतात, तेव्हां परराष्ट्र जिंकण्यास जावें ३४८.

प्राण्यांचा अभ्युदय व क्षय दैवायत्त असतो. दैव असल्यास परराष्ट्र आपणच आपल्या अधीन होईल नसल्यास प्रयत्न केला तरीं कांहीं होणार नाहीं. यास्तव शत्रूवर चाल करून जाणें युक्त नव्हे, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात—

**दैवे पुरुषकारे च कर्मसिद्धिर्व्यवस्थिता ।**
**तत्र दैवमभिव्यक्तं पौरुषं पौर्वदैहिकम् ॥ ३४९ ॥**

इष्ट व अनिष्ट फलसिद्धि केवल दैवाच्याच अधीन नसते तर ती पुरुषकाराच्या म्हणजे प्रयत्नाच्याही अधीन असते, कारण व्यवहारांत कोणीही केवल दैवावर विश्वास ठेवून रहात नाहीं. शिवाय प्रयत्न व्यर्थ आहे असें समजल्यास वैद्यकादिशास्त्रें व्यर्थ होतात. तसेंच प्रयत्न नाहींच असें म्हटल्यास दैवही नाहींसें होणार. कारण पूर्वजन्मार्जित कर्म म्हणजे दैव होय. थोड्याशा पुरुषार्थानंतर मोठें फल देणारें जें पौर्वदैहिक पौरुष तेंच दैव असल्या-मुळें प्रयत्न केल्यावांचून गत्यंतर नाहीं ३४९.

आतां याविषयीं मतांतरें सांगतात—

**केचिद्दैवात्स्वभावाद्वा कालात्पुरुषकारतः ।**
**संयोगे केचिदिच्छन्ति फलं कुशलबुद्धयः ॥ ३५० ॥**

कोणी इष्ट व अनिष्ट फल दैवामुळेंच मिळतें असें समजतात. कोणी कारणावांचूनच ( म्हणजे स्वभावतःच ) फलसिद्धि मानितात. कोणी कालाच्या द्वारां व कोणी प्रयत्नाच्या योगानें फलप्राप्ति होते असें म्हणतात. पण दैव, स्वभाव, काल व पौरुष यांच्या समुच्चयामुळें फल मिळतें म्हणजे हीं सर्व अनुकूल असल्यास इष्ट फल व प्रतिकूल असल्यास अनिष्ट फल मिळतें, असें मनु इत्यादि कुशलबुद्धि पुरुष समजतात व तेंच आम्हांसही मान्य आहे ३५०.

यांतील एकेकामुळें फलसिद्धि होत नाहीं, हें दृष्टांत देऊन सिद्ध करितात—

**यथा ह्येकेन चक्रेण रथस्य न गतिर्भवेत् ।**
**एवं पुरुषकारेण विना दैवं न सिद्ध्यति ॥ ३५१ ॥**

ज्याप्रमाणें एकाच चाकाच्या योगानें रथाची गति होत नाहीं ( म्हणजे तो चालत नाहीं ) त्याप्रमाणें पुरुषकारावाचून दैव सिद्ध होत नाहीं ३५१.

लाभाकरितां परराष्ट्रावर चालून जावें, असें वर सुचविलें आहे. पण तो लाभ—हिरण्य-भूमि व मित्र—यांच्या योगानें तीन प्रकारचा होणें संभवनीय आहे. त्यांत तिसरा ( म्हणजे मित्रलाभ ) श्रेष्ठ आहे. यास्तव त्याच्याकरितां यत्न करावा. सत्यवचन हा त्याच्या प्राप्तीचा उपाय आहे, असें आतां सांगतात—

**हिरण्यभूमिलाभेभ्यो मित्रलब्धिर्वरा यतः ।**
**अतो यतेत तत्प्राप्त्यै रक्षेत्सत्यं समाहितः ॥ ३५२ ॥**

सुवर्ण व भूमि यांच्या लाभापेक्षां मित्रलाभ श्रेष्ठ असल्यामुळें त्याच्याकरितां यत्न करावा. सावधान राहून सामादिकांच्या द्वारां सत्य राखावें. कारण मित्रलाभाचें सत्य हें मूळ आहे ३५२.

आतां राजाचीं अंगें सांगतात—

**स्वाम्यमात्या जनो दुर्गं कोशो दण्डस्तथैव च ।**
**मित्राण्येताः प्रकृतयो राज्यं सप्ताङ्गमुच्यते ॥ ३५३ ॥**

स्वामी ( म्हणजे ३०९-३११ श्लोकांत सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेला राजा, अमात्य—( मंत्रि-पुरोहितादि ), जन-( ब्राम्हणादि प्रजा ), दुर्ग-( धन्वदुर्गादि ), कोश-( सुवर्णादि धनसंग्रह ), दण्ड-( हत्ती, अश्व, रथ व पायदळ असें चतुरंग सैन्य ) व ३४५ व्या श्लोकांत सांगितलेले त्रिविध मित्र हीं सात राज्याचीं मूलकारणें आहेत. यांनीं युक्त असलेलें राज्य सप्तांग राज्य होय ३५३.

तदवाप्य नृपो दण्डं दुर्वृत्तेषु निपातयेत् ।
धर्मो हि दण्डरूपेण ब्रह्मणा निर्मितः पुरा ॥ ३५४

अशाप्रकारचें राज्य संपादन करून राजानें वंचक, शठ, धूर्त, परस्त्री व परधन यांचा अपहार करणारे, हिंसक इत्यादि दुर्वृत्त लोकांच्या ठायीं दंडाची योजना करावी. कारण ब्रह्मदेवानें पूर्वीं धर्मासच दंडरूपानें उत्पन्न केलें. उद्धट लोकाचें दमन करणारा, म्हणून यास दंड हें नांव पडलें आहे ३५४.

स नेतुं न्यायतोऽशक्यो लुब्धेनाकृतबुद्धिना ।
सत्यसन्धेन शुचिना सुसहायेन धीमता ॥ ३५५ ॥

पण लोभी व चंचलबुद्धि पुरुषास ह्या दंडाचा न्यायानें उपयोग करितां येत नाहीं. तर सत्यप्रतिज्ञ, शुचि ( म्हणजे ज्यानें कामादि षड्रिपूंस जिंकलें आहे ), ज्यास वर सांगितलेलें चांगलें सहाय आहे व जो नय आणि अनय यांमध्यें कुशल आहे, अशा पुरुषास धर्माप्रमाणें दंड करितां येणें शक्य आहे ३५५.

यथाशास्त्रं प्रयुक्तः सन् सदेवासुरमानवम् ।
जगदानन्दयेत्सर्वमन्यथा तत्प्रकोपयेत् ॥ ३५६ ॥

त्या दंडाचा शास्त्रोक्त मार्गानें प्रयोग केला असतां देव, असुर, मानव इत्यादिकांसह हें जग आनंदित होतें व शास्त्राचें अतिक्रमण करून त्याचा उपयोग केला असतां तो सर्व जगामध्यें क्रोध उत्पन्न करितो ३५६.

अधर्म-दंडानें केवल जगत्कोप होतो इतकेंच नव्हे, तर दंड देणाऱ्या पुरुषाची दृष्ट व अदृष्ट हानिही होते, असें सांगतात—

अधर्मदण्डनं स्वर्गं कीर्तिं लोकांश्च नाशयेत् ।
सम्यक्तु दण्डनं राज्ञः स्वर्गकीर्तिजयावहम् ॥ ३५७ ॥

लोभादिकांच्या योगानें शास्त्राचें अतिक्रमण करून केलेला दंड पापास कारण होणारा असल्यामुळें स्वर्ग कीर्ति व उत्तम लोक यांचा नाश करितो. पण शास्त्रोक्त मार्गानें केलेला दंड धर्मास कारण होणारा असल्यामुळें तो धर्मद्वारा स्वर्ग, कीर्ति व जय यांसही कारण होतो ३५७.

अपि भ्राता सुतोऽर्घ्यो वा श्वशुरो मातुलोऽपि वा ।
नादण्ड्यो नाम राज्ञोऽस्ति धर्माद्विचलितः स्वकात् ॥ ३५८ ॥

भाऊ, पुत्र, अर्घ्यास योग्य असलेले आचार्यादि, सासरा, मामा यांतीलही कोणी जरी आपल्या धर्मापासून च्युत झाला असला तरी तो राजास दंड्य ( म्हणजे दंड करण्यास योग्य ) आहे. माता, पिता, स्नातक, संन्यासी, पुरोहित, वानप्रस्थ व वेदाध्ययन, शील, शौच व आचार यांनीं युक्त असलेले, हे सर्व राजाच्या दंडास पात्र नसतात. कारण ते धर्माचे अधिकारी आहेत ३५८.

यो दण्ड्यान्दण्डयेद्राजा सम्यग्वध्यांश्च घातयेत् ।
इष्टं स्यात्क्रतुभिस्तेन समाप्तवरदक्षिणैः ॥ ३५९ ॥

स्वधर्मापासून च्युत होणें इत्यादि निमित्तामुळें दंडास योग्य झालेल्या लोकांस जो दंड करितो व वधास योग्य असलेल्यास चांगला वधदंड करतो त्या राजानें पुष्कळ दक्षिणा देऊन यज्ञ केल्याप्रमाणें होतें. म्हणजे पुष्कळ दक्षिणायुक्त यज्ञाचें फळ त्यास मिळतें. धिग्दंड, धनदंड इत्यादि दंड व वध अनेकप्रकारचे आहेत. त्या सर्वांचें वर्णन दुसऱ्या अध्यायांत येईल. येथें योग्य दंड देणाऱ्या राजास जरी यज्ञफल सांगितलें आहे तरी दंड देणें हें राजाचें काम्य कर्म आहे ( म्हणजे त्यास यज्ञाच्या फलाची इच्छा असल्यास त्यानें तें करावें; नसल्यास करूं नये ) असें समजूं नये. कारण राजानें अपराध्यास दंड न केल्यास त्यास दोष लागतो व तो घालविण्याकरितां त्यास प्रायश्चित्त करावें लागतें. असें वसिष्ठांनीं सांगितलें आहे. अर्थात् राजाचें हें नित्य कर्म आहे ३५९.

दुष्टांस चांगला (योग्य) दंड करावा असें वर म्हटलें आहे. पण दुष्टाचें ज्ञान व्यवहारदर्शनावांचून ( म्हणजे न्याय केल्यावांचून ) होत नाहीं यास्तव प्रत्यहीं न्यायदर्शन स्वतः करावें असें सांगतात-

इति संचिन्त्य नृपतिः क्रतुतुल्यफलं पृथक् ॥
व्यवहारान्स्वयं पश्येत्सभ्यैः परिवृतोऽन्वहम् ॥ ३६० ॥

याप्रमाणें दंड्यास दंड केल्यानें यज्ञतुल्य फळ मिळतें व अदंड्य पुरुषास दंड केल्यानें स्वर्गादिकांचा नाश होतो या गोष्टींचा पूर्ण विचार करून राजानें पुढें सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या सभासदांनीं परिवाष्टित होऊन ( म्हणजे त्यांच्या सहवर्तमान ) पुढें सांगितल्याप्रमाणें दुष्ट व अदुष्ट यांच्या ज्ञानार्थ प्रत्यहीं स्वतः व्यवहार पहावेत ३६०.

कुलानि जातीः श्रेणीश्च गणान् जानपदानपि ।
स्वधर्माच्चलितान्राजा विनीय स्थापयेत्पथि ॥ ३६१ ॥

ब्राह्मणादिकांचीं कुलें, मूर्धावसिक्तादि जाती, तेली, तांबोळी इत्यादिकांच्या श्रेणी, एकच काम करणाऱ्या अनेक जातींच्या लोकांचे गण व लोहार, सुतार इत्यादि कारागीर हे

आपल्या धर्मापासून च्युत झाले असतां राजानें अपराधानुरूप दंड करून त्यांस स्वमार्गामध्यें स्थापावें. पूर्वी एकेक अपराध्यास दंड करण्याविषयीं विधान केलें होतें. व आतां येथें समूहास दंड करण्याचें विधान केलें आहे. शारीरिक व अर्थदंड असा दंड दोन प्रकारचा आहे. ताडन करणें, इत्यादि शारीरिक दंड आहे. यासच वधदंड म्हणतात. एका कवडी-पासून सर्वस्वापर्यंत द्रव्य घेणें हा अर्थदंड होय ३६१.

कृष्णल, माष, सुवर्ण, पल इत्यादिशब्दांनीं अर्थदंड सांगावयाचे आहेत. पण ते कृष्णलादि सर्व देशांत सारख्याच परिमाणाचे नसतात. यास्तव एकाच प्रकारच्या अपराधांस निरनिराळ्या देशीं न्यूनाधिक दंड होऊं नये म्हणून त्यांचें दंडव्यवहारांतील निश्चित परिमाण ठरविण्याकरितां सांगतात—

जालसूर्यमरीचिस्थं त्रसरेणू रजः स्मृतम् ।
तेऽष्टौ लिक्षा तु तास्तिस्रो राजसर्षप उच्यते ॥३६२॥
गौरस्तु ते त्रयः षट् ते यवो मध्यस्तु ते त्रयः ।
कृष्णलः पंच ते माषस्ते सुवर्णस्तु षोडश ॥
पलं सुवर्णाश्चत्वारः पञ्च वापि प्रकीर्तितम् ॥ ३६३ ॥

घरांत पडलेल्या उन्हाच्या कवडशांतील बारिक रजास त्रसरेणु असें तत्त्वदर्शी योगी याज्ञवल्क्यांनीं म्हटलें आहे. आठ त्रसरेणु म्हणजे एक लिक्षा ( लीख, उवेचें अंडें ) तीन लिखा म्हणजे एक राजगिरा, तीन राजगिरे म्हणणे एक गौर सर्षप ( पांढरी शिरसु ), सहा गौर सर्षप म्हणजे एक मध्य यव; ( मध्य म्हणजे मध्यम फार मोठा नव्हे व फार लहानही नव्हे असा. ) येथें त्याच्या भारंभार तोलाचें नांव यव असें समजावें. सर्व देशांत एकच परिमाण ठरविण्याकरितां मध्यम यव असा येथें नियम केला आहे. तीन मध्यम यव म्हणजे एक कृष्णल पांच कृष्णल म्हणजे माष, सोळा माष म्हणजे एक सुवर्ण व चार सुवर्ण म्हणजे एक पल पांच सुवर्णांचें पण असेंही नारदादिकांनीं सांगितलें आहे. मिताक्षरेंत देशदेशांतरचीं प्रमाणें येथें सांगितलीं आहेत. पण सांप्रतकालीं तीं प्रचारांत नाहींत म्हणून त्यांचा येथें निर्देश करणें व्यर्थ आहे ३६२,३६३.

याप्रमाणें सुवर्णाचें उन्मान सांगून आतां रुप्याचें सांगतात—

द्वे कृष्णले रूप्यमाषो धरणं षोडशैव ते
शतमानं तु दशभिर्धरणैः पलमेव तु ॥ ३६४ ॥
निष्कं सुवर्णाश्चत्वारः कार्षिकस्ताम्रिकः पणः॥ ३६५ ॥

वर सांगितलेले दोन कृष्णल म्हणजे एक रुप्याचा माष. सोळा रूप्यमाष म्हणजे धरण-यासच पुराण असेंही म्हणतात. दहा धरण म्हणजे शतमान किंवा रुप्याचें पल होतें. वर सांगि-तलेले चार सुवर्ण म्हणजे रुप्याचें एक निष्क होतें. पलाचा चवथा भाग, हाच कर्ष होय.

त्याच्या भारंभार तोललेला तांब्याचा विकार हाच तांब्याचा पण होय. याला मनुस्मृतींत कार्षापण असेंही म्हटलें आहे. याप्रमाणें दंडाच्या उपयोगीं असलेल्या-सुवर्ण, रूप्य व ताम्र यांचें उन्मान सांगितलें. लोकव्यवहारांगभूत कांशाचें, पितळेचें वगैरे असेंच उन्मान समजावें ३६४,३६५.

या स्मृतींत उत्तम साहसादिक कशास म्हटलें आहे तें सांगतात—

साशीतिः पणसाहस्रो दण्ड उत्तमसाहसः ।
तदर्धं मध्यमः प्रोक्तस्तदर्धमधमः स्मृतः ॥ ३६६ ॥

एक सहस्र ऐशीं ( १०८० ) पणांचा जो दंड तो उत्तम साहस नांवाचा दंड होय. त्याच्या अर्ध प्रमाणाचा म्हणजे ५४० पणांचा मध्यमसाहस नांवाचा दंड होतो व २७० पणांचा अधमसाहस नामक दंड होतो. सहस्र, पांचशें व अडीचशें पणांचे क्रमानें उत्तम, मध्यम व अधमसाहस दंड होतात असें जें मनुस्मृतींत सांगितलें आहे तें नकळत घडलेल्या अपराधास उद्देशून होय ३६६.

आतां दंडाचे प्रकार सांगतात—

धिग्दण्डस्त्वथ वाग्दण्डो धनदण्डो वधस्तथा ।
योज्या व्यस्ताः समस्ता वा ह्यपराधवशादिमे ॥३६७॥

तुला धिक्कार असो; इत्यादि बोलणें हा धिग्दंड, कठोर वचनें बोलणें व शिव्या देणें हा वाग्दंड, धन घेणें हा धनदंड, व अडकवून ठेवणें, मारणें, फांशी देणें इत्यादि वधदंड होय. अपराधाप्रमाणें यांतील एकेक अथवा दोन, तीन, चार, दंड करावे. पण वर सांगितलेल्या या दंडांतील पहिल्या पहिल्या दंडानें कार्य न साधल्यास पुढच्या पुढच्या दंडाची योजना करावी ३६७.

आतां दंडव्यवस्थेचीं निमित्तें सांगतात—

ज्ञात्वापराधं देशं च कालं बलमथापि वा ।
वयः कर्म च वित्तं च दण्डं दण्ड्येषु पातयेत् ॥ ३६८ ॥

अपराध जाणून त्याच्या अनुरोधानें दंड करावा. त्याचप्रमाणें देश, काल, बल, वय, कर्म व द्रव्य यांचाही विचार करून अपराध्यांस शिक्षा करावी. त्यानें हा अपराध जाणूनबुजून केला आहे कीं न जाणतां झाला आहे,पहिलाच आहे कीं वारंवार घडलेला आहे,याचाही विचार दंड देतांना अवश्य करावा. राजास उद्देशून जरी हे धर्म सांगितलेले आहेत तरी देश, देशाचा कांहीं भाग इत्यादिकांचें रक्षण करण्याचा अधिकार ज्यांस प्राप्त झाला आहे, अशा क्षत्रियातिरिक्त वर्णाच्या पुरुषाचे व स्त्रीचेही तेच आहेत असें समजावें. कारण प्रजा कोणत्याही राजास स्वरक्षणाकरितांच कर देत असते व दुष्टांस दंड दिल्यावाचून रक्षण होत नाहीं, असा सामान्य नियम आहे ३६८.

इति राजधर्मप्रकरणम् १३.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत श्रीयाज्ञवल्क्यस्मृतीच्या आचारसंज्ञक प्रथमाध्यायाचें मिताक्षरेच्या अनुरोधानें केलेलें मराठी विवरण समाप्त झालें.

॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

---

# अथ व्यवहाराध्यायः २



## साधारणव्यवहारमातृकाप्रकरणम् १

**मिताक्षरासार**--अभिषेकादि गुणांनीं युक्त असलेल्या राजाचा प्रजापालन हा परम धर्म आहे. पण तें प्रजापालन दुष्टांचा निग्रह केल्यावाचून संभवत नाहीं. दुष्ट कोण आहे व निर्दोष कोण आहे, हें व्यवहारदर्शनावाचून संभवत नाहीं. यास्तव, तें व्यवहारदर्शन प्रत्यहीं करावें, असें पूर्वी ( श्लोक ३६० उत्तरार्ध यांत ) सांगितलें आहे. पण तो व्यवहार कशाप्रकारचा आहे, किती प्रकारचा आहे व कसा करावा इत्यादि कांहीं तेथें सांगितलेलें नाहीं. यास्तव, तें सांगण्याकरितां हा दुसरा अध्याय आरंभिला आहे-

व्यवहारान्नृपः पश्येद्विद्वद्भिर्ब्राह्मणैः सह ।
धर्मशास्त्रानुसारेण क्रोधलोभविवर्जितः ॥ १ ॥

**मिता०**--दुसऱ्याच्या विरोधानें आपल्यासंबंधीं राजसभेंत कांहीं सांगणें याला व्यवहार म्हणतात. जसें-एखाद्यानें हें क्षेत्र, किंवा गृहादि माझें आहे असें म्हणणें व दुसऱ्यानें त्याच्या विरुद्ध तें माझें आहे, असें म्हणणें अशा स्वरूपाच्या व्यवहाराचे प्रकार अनेक आहेत, हें **व्यवहारान्** या बहुवचनानें सुचविलें आहे. ' नृपः ' या शब्दानें-नुसत्या क्षत्रियाचा हा धर्म नव्हे; तर प्रजापालनाचा अधिकार ज्याला प्राप्त झाला आहे, अशा दुसऱ्या-( क्षत्रियेतरा ) चाही आहे; असें सुचविलें आहे. ' पश्येत् ' हा पूर्वी सांगितलेल्या गोष्टीचाच अनुवाद,विशेषधर्माचें विधान करण्यासाठीं केला आहे.'**विद्वद्भिः**' म्ह० वेद, व्याकरण, धर्मशास्त्र इत्यादिकांस जाणणाऱ्या ब्राह्मणांसह, ( अर्थात क्षत्रियांसह नव्हे. ) पण त्यांतही ब्राह्मणांचें प्राधान्य समजूं नये. तर कोणत्याही व्यवहारांत प्राधान्य राजालाच आहे. म्हणूनच एखादा व्यवहार न पाहिल्यास किंवा त्याचा विपरीत निर्णय केल्यास दोष राजाला लागतो; ब्राह्मणांना नाहीं. धर्मशास्त्राच्या अनुरोधानें व्यवहार पहावा. अर्थशास्त्राच्या अनुरोधानें नव्हे. धर्मशास्त्राशीं विरुद्ध नसलेले देशादिसमयधर्मही धर्मशास्त्राचे विषय असल्यामुळें त्यांचा या श्लोकांत पृथक् निर्देश केलेला नाहीं. ' धर्मशास्त्रानुसार ' असें म्हटलेलें असल्यामुळें ' क्रोधलोभरहित होऊन' असें जे पुनः म्हटलें आहे तें आदरार्थ आहे, असें समजावें. क्रोध म्हणजे अमर्ष, असहनशीलता व लोभ म्हणजे अधिक मिळण्याची इच्छा, १.

आतां राजानें सभासद कसे करावे, तें सांगतात--

**श्रुताध्ययनसंपन्ना धर्मज्ञाः सत्यवादिनः ।**
**राज्ञा सभासदः कार्या रिपौ मित्रे च ये समाः ॥ २ ॥**

**मिताक्षरासार**--श्रुत-मीमांसा, व्याकरण, न्याय इत्यादि शास्त्रश्रवण व अध्ययन वेदाध्ययन यांनीं संपन्न, धर्मशास्त्रज्ञ, सत्यवचनशील, राग-द्वेषरहित, अशाप्रकारचे-योग्य पुरुष आपल्या सभेंत येऊन बसतील, असें राजानें द्रव्यदान, मान, सत्कार इत्यादिकांच्या योगानें करावें. येथें, श्रुताध्ययनसंपन्न असें स्पष्ट मोघम जरी म्हटलें आहे, तरी ब्राह्मणच सभासद करावे. कारण कात्यायनानें 'द्विजोत्तम' असें स्पष्ट म्हटलें आहे. 'सभासदः' हें बहुवचन असल्यामुळें ते ( निदान ) तीन असावेत. कारण त्यावाचून बहुवचन सार्थ होत नाहीं. शिवाय मनुस्मृतींत ' वेदविदस्त्रयः ' म्हणजे तीन वेदवत्ते, असें म्हटलें आहे. पहिल्या श्लोकांतील विद्वान् ब्राह्मण व या श्लोकांतील हे श्रुताध्ययनादिसंपन्न सभासद एकच, असें समजूं नये. कारण येथील भिन्न विभक्तीवरून जसा त्यांचा विशेषणविशेष्यभाव संभवत नाहीं त्याचप्रमाणें ब्राह्मण व सभासद एकच समजल्यावर पुनरुक्त दोषही येतो. कात्यायनानें-न्यायाधीश, अमात्य, ब्राह्मण, पुरोहित व सभासद, यांसह व्यवहार पाहणारा राजा धर्मतः स्वर्गांत राहतो.—असें म्हणून ब्राह्मण व सभासद यांचा भेद स्पष्ट दाखविला आहे. त्यांतील ब्राह्मण अनियुक्त ( वेतनादि देऊन न नेमलेले ) व सभासद नियुक्त ( वेतनादि देऊन मुद्दाम नेमलेले ), असतात. एवढ्यासाठींच-नियुक्त किंवा अनियुक्त धर्मज्ञ सभासद निर्णय सांगण्यास योग्य आहे-असें म्हटलें आहे. पण त्यांतूनही जे नियुक्त असतात त्यांस-योग्य निर्णय सांगितल्यावरही राजा त्याच्या उलट कांहीं करूं लागल्यास-त्याचे निवारण करणें अवश्य आहे. नाहींतर त्यांस दोष लागतो. कारण कात्यायन व मनु यांनीं तसें सांगितलें आहे. या श्लोकांतील ' रिपौ मित्रे च ' येथील चकारावरून राजानें आपली सभा कांहीं शिष्ट व कुलीन व्यापारी वैश्यांकडूनही भूषित करवावी, असें वाटतें २.

राजानें व्यवहार पहावेत, असें पहिल्या श्लोकांत म्हटलें आहे; पण आतां त्याचाच अनुकल्प ( गौण पक्ष ) सांगतात—

**अपश्यता कार्यवशाद्व्यवहारान्नृपेण तु ।**
**सभ्यैः सह नियोक्तव्यो ब्राह्मणः सर्वधर्मवित् ॥ ३ ॥**

**मिताक्षरासार**--दुसऱ्या कामांत व्यग्र झाल्याकारणानें राजाला व्यवहार पाहतां न आल्यास त्यानें पूर्वोक्त सभ्यांसह सर्व शास्त्रोक्त सामायिक धर्मांचें विवेचन करणाऱ्या ब्राह्मणाची ( क्षत्रियाची नव्हे ) व्यवहारदर्शनांत योजना करावी. तो ब्राम्हण कात्यायनानें सांगितल्याप्रमाणें ' दान्त, कुलीन, मध्यस्थ ( अपक्षपाती ) कोणास उद्वेग न करणारा, स्थिर, परलोकाची भीति बाळगणारा, धर्मिष्ठ, उद्युक्त व क्रोधरहित ' असावा. पण या सर्व गुणांनीं युक्त असा ब्राह्मण दुर्लभ झाल्यास या गुणांनीं युक्त असलेल्या क्षत्रियास अथवा वैश्यासही

नियुक्त करावें; पण शूद्राला कधींही नेमूं नये. कारण कात्यायनानें 'शूद्राला यत्नानें वर्ज करावें' असें सांगितलें आहे. पण नारदानें हाच ( राजानें नेमलेला व्यवहारदर्शी ) मुख्य होय, असें सांगितलें आहे. कारण 'धर्मशास्त्रास अनुसरून प्राड्विवाकाच्या (न्यायाधीशाच्या) मतामध्यें स्थित असलेल्या शांतचित्त राजानें क्रमानें व्यवहार पहावे, ' असें त्यानीं म्हटलें आहे. या वचनांत प्राड्विवाकाच्या मतांत स्थित होऊन, ( अर्थात् न्यायाधीशाच्या मतानें, आपल्या मतानें नव्हे, ) असें सांगितलें आहे. अर्थी ( वादी ) व प्रत्यर्थी ( प्रतिवादी ) यांना प्रश्न करतो तो प्राड्; व त्यांच्या सांगण्यांत विरुद्ध किंवा अविरुद्ध काय आहे याचें सभ्यांसह विवेचन करतो तो विवाक. या दोन शब्दांचा मिळून प्राड्विवाक असा कर्मधारय समास झाला आहे व त्याचा अर्थ प्रश्न करणारा व निर्णय करणारा, असा होतो ३.

आतां प्राड्विवाकादि-सभ्य स्मृतिशास्त्राच्या विरुद्ध जर व्यवहाराचा निर्णय करूं लागले, तर राजानें काय करावें तें सांगतात—

रागाल्लोभाद्भयाद्वापि स्मृत्यपेतादिकारिणः ।
सभ्या पृथक् पृथक् दण्ड्या विवादाद्द्विगुणं दमम् ॥४॥

**मिताक्षरासार**—पूर्वोक्त सभासद ( सभ्य ) राजोगुण निरंकुश असल्यामुळें त्याच्याकडून पराभूत होत्साते राग ( अतिशय स्नेह ) लोभ ( मिळविण्याची अधिक इच्छा )अथवा भय यांच्या योगानें धर्मशास्त्र व आचार यांच्या विरुद्ध जर वादाचा निर्णय करूं लागले तर त्यांतील प्रत्येक सभासदास त्या वादांत पराभव पावणाऱ्यास जो दंड सांगितला असेल त्याच्या दुप्पट दंड करावा. मूळ श्लोकांत 'विवादात् द्विगुणं' म्हणजे विवादाहून दुप्पट, असें म्हटलें आहे..पण त्याचा अर्थ विवादास कारण होणाऱ्या द्रव्याच्या दुप्पट असा समजूं नये. कारण तसें समजल्यास स्त्रीसंग्रहादि विवादांत दंडाचा अभाव होण्याचाच प्रसंग येईल. रागादि कारणानेंच विरुद्ध निर्णय केल्यास सभासदास दुप्पट दम करावा, अज्ञान, मोह इत्यादि कारणानें तो विरुद्ध झाल्यास करूं नये, असा नियम करण्याकरितांच या श्लोकांत राग, लोभ व भय यांचें ग्रहण केलें आहे. 'राजा ब्राह्मणावाचून बाकी सर्वांचा ईश आहे,' असें गौतमाचें वचन असल्यामुळें ब्राह्मण अदंड्य ( म्हणजे दंड न करण्यास योग्य ) आहेत, असें समजूं नये. कारण तें वचन विशेष प्रकारच्या ब्राह्मणाची प्रशंसा करण्याकरितां आहे. तसेंच-राजानें ब्राह्मणाच्या- देह-दंड, बंधन, धनदंड, देशांतून घालविणें, निंदा करणें, व सभेंतून घालविणें-या सहा प्रकारच्या दंडाचा परिहार करावा असें जें सांगितलें आहे तें बहुश्रुत, लोक, वेद, वेदांग, इतिहास, पुराण इत्यादिकांस जाणणारा, ब्राह्मणाचीच वृत्ति करणारा, अठ्ठेचाळीस संस्कारांनीं युक्त असणारा, तीव्र कर्मे व सहा समयाचार यांत निमग्न असणारा इत्यादि गुणविशिष्ट ब्राह्मणाविषयीं आहे; नुसत्या जातिब्राह्मणाविषयीं नाहीं ४.

आतां व्यवहाराचा विषय सांगतात—

स्मृत्याचारव्यपतेने मार्गेणाधर्षितः परैः ।
आवेदयाति चेद्राज्ञे व्यवहारपदं हि तत् ॥ ५ ॥

**मिताक्षरा**—धर्मशास्त्र व समयाचार ( त्या काळचे सदाचार ) यांच्या विरुद्ध मार्गानें दुसऱ्या कोणाकडून पराभूत झालेला एखादा तें राजाला किंवा प्राड्विवाकाला कळवितो. त्यानें जर आपल्या अभिभवाची वार्ता निवेदन केली तर तेंच व्यवहाराचें स्थान झालें. म्हणजे प्रतिज्ञा, उत्तर, संशय, हेतु, परामर्श, प्रमाण, निर्णय व प्रयोजनरूप जो व्यवहार त्याचा तें आवेदन विषय झाला. व्यवहाराविषयाचें हें सामान्य लक्षण झालें. अभियोग या नांवाचा हा व्यवहारविषय दोन प्रकारचा आहे. एक शंकाभियोग व दुसरा तत्वाभियोग. खोट्या गोष्टी मिळवून केलेला जो अभियोग तो शंकाभियोग व कांहीं चिह्न अथवा साक्षात् पाहणें यांवरून होणारा जो अभियोग तो तत्त्वाभियोग. हा तत्त्वाभियोगही दोन प्रकारचा आहे. एक प्रतिषेधात्मक व दुसरा विध्यात्मक. जसें—१ हा माझें सोनें, वस्त्र, पात्र इत्यादि घेऊन आतां परत देत नाहीं, व २ हा माझ्या क्षेत्रादिकाचा अपहार करतो. कात्यायनानें हेच दोन भेद ' न्याय्य कर्म न करणें व अन्याय्य करणें ' या वाक्यानें थोडक्यांत सांगितले आहेत.

असो; या व्यवहाराचे अठरा भेद मनुस्मृतींत असे सांगितले आहेत—ऋणादान ( कर्ज घेणें ), निक्षेप ( ठेव ), जो स्वामी नव्हे अशा पुरुषानें वस्तूचा विक्रय करणें, संभूय समुत्थान ( अनेकांनीं मिळून केलेला व्यापार ), दिलेलें धन क्रोधानें किंवा अपात्रबुद्धीनें परत घेणें, सेवकाचें वेतन न देणें, केलेल्या संकेताचें उल्लंघन करणें, विकत दिलेली अथवा घेतलेली वस्तु पसंत न पडल्यामुळें देणारास अथवा घेणारास पश्चात्ताप होऊन त्यामुळें उत्पन्न होणारा वाद, स्वामी व पशुपाल यांच्या मधील पशुविषयींचा वाद, ग्रामादि सीमांचा वाद, शिव्यागाळी देणें, हें वाक्पारुष्य व ताडनादि दंडपारुष्य, स्तेय ( चोरी किंवा दुसऱ्याचें धन घेऊन नाहीं म्हणणें ), साहस ( बलात्कारानें धनादि ग्रहण करणें ), स्त्री व परपुरुष यांच्या समागमापासून होणारा वाद, स्त्रिया व पुरुष यांची धर्मामध्यें व्यवस्था, पितृसंबंधीं धनाचा विभाग, द्यूतादि क्रीडांचे धर्म निश्चित करणें व पक्षी, बकरे इत्यादि प्राण्यांची लढाई.

पण निरनिराळ्या साध्यामुळें या अठरा प्रकारच्या व्यवहाराचेही अनेक भेद झाले आहेत. व त्यासाठींच नारदानें त्याचे एकशें आठ भेद सांगितले आहेत. असो. या श्लोकांत 'त्यानें जर स्वतः येऊन निवेदन केलें,' असें म्हणून राजानें किंवा त्याच्या अधिकारी पुरुषानें प्रेरणा केली असतां नव्हे, असें सुचविलें आहे. ' परैः ' असें जरी मुळांत म्हटलें आहे तरी एकानें किंवा दोघांनी एकाशीं किंवा दोघांशीं काहीं अन्याय केल्यास तोही व्यवहारविषय होतो, असें समजावें. पण— एकाचा पुष्कळांशीं होणार वाद, स्त्रियांचा वाद अथवा भृत्यजनांचा वाद धर्मज्ञानें मनास आणूं नये— असें जें नारदवचन आहे तें भिन्न साध्याविषयीं आहे, असें जाणावें. ( जसें— एकाच मनुष्यानें भिन्न भिन्न कालीं अनेक लोकांना मारलें व ते सर्व मिळून त्याच्यावर एकाच वेळीं आरोप करीत आहेत, तर असा व्यवहार राजानें विचाराकरितां घेऊं नयें इत्यादि ). मुळांत ' आवेदयति चेद्राज्ञे ' असें म्हटलें आहे. त्यावरूनच राजानें प्रश्न केला असतां निवेदन करणारानें नम्रवेषानें आवेदन करावें. ( आपल्याशीं

दुसऱ्यानें केलेला अन्याय सांगावा ). तें आवेदन केलेलें जर योग्य असेल तर राजानें मुद्रा इत्यादि ( आपलें ठरलेलें चिह्न, दूत इत्यादि ) पाठवून प्रतिवाद्यास आह्वान करणें व जे अकल्प ( सभेंत येण्यास अयोग्य ) असतील त्यांस न बोलावणें इत्यादि पुढील सर्व विधि अर्थसिद्ध असल्यामुळें येथें पृथक् सांगितला नाहीं. पण दुसऱ्या स्मृतींत तोच प्रकार स्पष्टपणें असा सांगितला आहे.—

आपल्याला न्याय मिळावा अशी इच्छा करणाराला व पुढें उभा राहून सांगत असणाराला राजानें योग्यसमयीं काय कार्य आहे ? तुला काय पीडा आहे ? भिऊं नको; सांग. कोणीं, कोठें, केव्हां, कां, इत्यादि प्रश्न करावे. या प्रश्नांचें त्यानें दिलेलें उत्तर ऐकून त्याचा सभ्य व ब्राह्मण यांसह विचार करावा. त्याचें कार्य न्याय्य असल्यास अपराध करणाराच्या नांवावर मुद्राक्षेप करावा; अथवा अधिकारी राजपुरुषाला त्याला आणावयास सांगावें. पण व्याधीनें पीडलेला, बालक, वृद्ध, संकटांत पडलेला, नित्यनैमित्तिक कर्म करण्यांत व्यग्र असलेला, ज्याला त्याच वेळीं आणल्यास त्याच्या दुसऱ्या मोठ्या कार्याचा घात होणार असेल, ज्याच्या पुत्रप्रभृति इष्ट जनाचा नुक्ताच वियोग झाला आहे, राजाचें कार्य, उत्सव ( यात्रा ) इत्यादिकांत आकुल झालेला, ( मदिरादि मदानें ) मत्त, उन्मत्त ( वेडा ), प्रमत्त ( दर्पयुक्त, महा अभिमानी ), आर्त व भृत्य यांना राजानें बोलावूं नये. जिचा पक्ष ( पतिप्रभृति–वियोगामुळें ) हीन झाला आहे अशी स्त्री, कुलीन तरुणी, बाळंत व सर्ववर्णोत्तम ( ब्राह्मण ) कन्या या स्त्रियांचा प्रभु त्यांची ज्ञाति आहे. ( यास्तव अशा स्त्रियांना न बोलावितां त्यांच्या ज्ञातीच्या लोकांना आह्वान करणें उचित होय. ) ज्यांच्या अधीन त्यांचें सर्व कुटुंब असतें अशा स्त्रिया, स्वैरिणी, गणिका ( वेश्या ), अकुलीन व पतित स्त्रिया यांस आह्वान करण्यास कांहीं हरकत नाहीं.

राजानें काल, देश, व कार्याचें बलाबल पाहून वर सांगितलेल्या व्याधितादिकांस हळू हळू शिबिकादि वाहनांतून बोलवावें. एकाद्या अभियोगांत ( खटल्यांत ) वनस्थ वानप्रस्थ, संन्यासी, इत्यादिकांवाचून निर्णयसिद्धि होणें शक्य नाहीं, असें वाटल्यास राजानें त्यांनाही तसल्या महत्वाच्या प्रसंगीं ( त्यांना कोप न येईल, अशा रीतीनें ) नम्रपणें आह्वान करावें.

आसेध व्यवस्थाही अर्थसिद्ध आहे. ( आसेध म्हणजे राजाच्या आज्ञेनें प्रतिबंध. ) नारदानें तिच्याविषयीं असें म्हटलें आहे.—एकादी अवश्य सांगण्यासारखी गोष्ट सांगण्यास जो उभा रहात नाहीं अथवा जो त्याच्या वचनाचें उल्लंघन करीत आहे त्याला विवादार्थी पुरुषानें आह्वानदर्शन होई तों आसेध ( प्रतिबंध ) करवावा. त्याचे चार प्रकार आहेत. १ स्थानासेध, २ कालकृत, ३ प्रवासाचा निषेध व ४ कर्मांचा निषेध. या चारी प्रकारच्या आसेधाचें उल्लंघन आसेध केला गेलेल्या पुरुषानें करूं नये. कारण तसें केल्यास तो राजाच्या दंडास पात्र होतो. पण तो आसेधाचा अतिक्रम करणारा पुरुष मोठ्या नदीच्या पलीकडे असून तिला पूर आलेला असल्यामुळें वेळीं येऊं शकला नाहीं, अथवा महा अरण्य, दुर्देश,

आपत्ति इत्यादिकांत अडकून पडल्यामुळें आला नाहीं, तर अशा प्रसंगीं तो दंड्य होत नाहीं. विवाह करण्याची इच्छा करणारा, रोगार्त, यज्ञ करण्याची इच्छा करणारा, संकटांत सांपडलेला, ज्याच्यावर दुसऱ्या कोणी पूर्वींच अभियोग ( आरोप ) केला आहे, राजकार्यांत उद्यत असलेला, गायींना चारावयास दूर घेऊन गेलेले गोपाल, धान्याची पेरणी करीत असलेले शेतकरी, एकाद्या शिल्पामध्यें निमग्न असलेले शिल्पी, युद्धांत शस्त्र धारण केलेले योद्धे यांस त्याचवेळीं बोलावूं नये.

वर सांगितलेल्या आह्वानास अयोग्य असलेल्या व्याधितादिकांनीं आपल्याच कुटुंबांतील पुत्रादिकांस अथवा दुसऱ्या सुहृदांस पाठविल्यास त्यांचें म्हणणें ऐकून घेणें अवश्य आहे. ते परार्थवादी नव्हेत. कारण ' भ्राता, पिता, पुत्र, किंवा ज्याला आह्वान केलें आहे त्याच्या आज्ञेनें आलेला, यांतील एकही नव्हे, असा कोणी भलताच एकादा येऊन कांहीं सांगूं लागला तर तो परार्थवादी होतो. सर्व व्यवहारामध्यें याप्रमाणें बोलणारा पुरुष दंडास पात्र होतो. ' असें नारदानें सांगितलें आहे ५.

प्रतिवाद्यास मुद्रा, लेख्य व पुरुष यांतील एखाद्या उपायानें आणल्यावर काय करावें तें सांगतात—

प्रत्यर्थिनोऽग्रतो लेख्यं यथावेदितमर्थिना ।
समा–मास–तदर्धाहर्नामजात्यादिचिह्नितम् ॥ ६ ॥

**मिताक्षरासार**—ज्याची प्रार्थना ( इच्छा ) केली जाते तो अर्थ म्हणजे साध्य, तो ज्याला आहे तो अर्थी ( वादी ) व त्याचा जो प्रतिपक्षभूत तो प्रत्यर्थी ( प्रतिवादी ) त्याच्यापुढें राजानें आपल्या भृत्याकडून पूर्वीं आवेदन ( फिर्यादीच्या ) समयीं अर्थीनें ज्याप्रकारें सांगितलें होतें त्याप्रमाणें लिहवावें. अन्यथा ( निराळ्याप्रकारें ) लिहविल्यास अन्यथावादित्व, हा दोष घडून, त्यामुळें व्यवहाराचा भंग होईल. अन्यवादी, क्रियेचा द्वेष करणारा, बोलाविलेल्या वेळीं व स्थानीं उपस्थित न होणारा, विचारलें असतां निरुत्तर होणारा व बोलाविलें असतां पळून जाणारा असे हे पांचजण हीन (व्यवहारभंग पावलेले) होत. आवेदनाच्या वेळींच अर्थी पुरुषाचें वचन लिहून घेतलेलें असल्यामुळें पुनः लेख्य करणें व्यर्थ आहे, असें कोणाला वाटेल पण आतां–संवत्सर, मास, पक्ष, तिथि, वार,अर्थी व प्रत्यर्थी यांचें नांव, ब्राह्मणादि जाति इत्यादिक त्याच्यावर घालावें. मूळ श्लोकांत ' जात्यादि ' असें आहे. तेथील आदि शब्दानें द्रव्य, त्याची संख्या, स्थान, वेळ, लिंगादि घ्यावीं. राजाला आवेदन करणें याला भाषा असें म्हणतात. भाषा, प्रतिज्ञा व पक्ष यांचा एकच अर्थ आहे. (म्हणजे हे तिन्हीं समानार्थक शब्द आहेत. ) असो; पूर्वीं आवेदनसमयीं केवल कार्य लिहिलें होतें; आतां प्रतिवाद्याच्यासमोर संवत्सरादि लिहिलें जातें; हा या दोन वेळच्या लेख्यांत फरक आहे. संवत्सराचा सर्वच व्यवहारांत कांहीं उपयोग होत नाहीं. पण आधि, प्रतिग्रह, क्रय इत्यादिकांमध्यें निर्णयाकरितां ते फार उपयोगी आहेत. अर्थ–धन –व्यवहारांतही–एका संवत्सरांत जितकें द्रव्य, ज्याच्यापासून ज्यानें घेतलें होतें तितकें तें त्याला त्याच वर्षी परत दिलें. पण दुसऱ्या-

वर्षी पुनः जें धन घेतलें तें धनको मागूं लागला असतां ऋणको ' मी याचें धन घेतलें होतें खरें, पण ते परत दिलें, असें म्हणूं लागल्यास—या संवत्सराच्या उल्लेखाचा उपयोग होतो. कारण त्यावरून मागच्यावर्षी घेतलेलें परत केलें, यावर्षी घेतलेलें नव्हे, असा बोध होतो. याचप्रमाणें मासादिकांचाही उपयोग जाणावा. १ देश, २ स्थान, ( ग्रामादि ), ३ वर्तुळ, लांब इत्यादि आकार, ( अथवा पूर्वपश्चिमादि दिशांनीं मर्यादित झालेलें गृह, क्षेत्र इत्यादि संनिवेश ) ४ वादी व प्रतिवादी यांची ब्राह्मणत्वादि जाति, ५ देवदत्त, विष्णुशर्मा इत्यादि नांव, ६ समीप प्रदेशीं राहणारा जन, ७ काठ्या, बिघे इत्यादि भूमीचें परिमाण, ८ शालीचें शेत, सुपारीचें आगर, काळी भूमि, पांढरी भूमि इत्यादि क्षेत्राचें नांव, ९ वादी व प्रतिवादी यांच्या बापाचें व आजाचें नांव, आणि १० पूर्वीच्या तीन राजांचें नांव हीं दहा स्थावर-संबंधीं विवादांत घालावीं ( लिहावीं ), असें स्मृतिवचन आहे. त्यावरून संवत्सरादि वर सांगितलेल्या विशेषणांतील ज्या व्यवहारांत ज्यांचा उपयोग असेल तेवढ्यांचाच उल्लेख लेखांत करावा, असें ठरतें.

याप्रमाणें पक्षलक्षण ठरलें असतां यानें रहित असलेल्या पण पक्षाप्रमाणें भासणाऱ्या सर्व पक्षांस पक्षाभासत्व आहे, मुख्य पक्षत्व नाहीं हें उघडच झालें. म्हणून योगीश्वरानें येथें पक्षाभास पृथक् सांगितलें नाहींत. पण दुसऱ्या स्मृतिकारांनीं ते स्पष्ट करण्यासाठीं असे सांगितले आहेत. —अप्रसिद्ध ( माझें शशाचें शिंग घेऊन आतां हा देत नाहीं. ), निराबाध ( आमच्या घरांतील दिव्याच्या प्रकाशानें हा आपल्या घरांतील व्यवहार करतो ), निरर्थ ( कचटतप, जबगडद ), निष्प्रयोजन ( देवदत्त माझ्या घरापाशीं येऊन सुस्वर अध्ययन करतो. ), असाध्य ( या देवदत्तानें भुंवया वांकड्या करून माझी टर उडाविली. ) व विरुद्ध ( या मुक्यानें मला शाप दिला अथवा नगर, राष्ट्र इत्यादिकांच्या विरुद्ध ) हे पक्षाभास आहेत. यांना वर्ज करावें राजानें वर्ज केलेला, पौरजनाशीं विरोध करणारा अथवा सर्व प्रजा व राष्ट्र, यांच्याशीं विरोध करणारा आणि असेच दुसरही पुर, ग्राम, महाजन इत्यादिकांच्या विरुद्ध असलेले सर्व व्यवहार अग्राह्य आहेत.

अनेकपदसंकीर्ण पूर्वपक्ष सिद्ध होत नाहीं, असें म्हटलें आहे. पण अनेक वस्तुसंकीर्ण पूर्वपक्ष सांगितल्यास कांहीं दोष नाहीं. जसें—यानें माझें सोनें, वस्त्रें, रुपये, भांडीं इत्यादि चोरलें. अशा प्रकारचा पूर्वपक्ष करण्यास कांहीं हरकत नाहीं. ऋण घेणें इत्यादि पक्षांमध्यें पदांचा संकर झाल्यास तो पक्ष नसून पक्षाभास आहे, असें म्हणावें तर तें ही तसें नाहीं. 'माझे रुपये यानें व्याजानें घेतले. मीं याच्या हातांत सोनें ठेव म्हणून ठेवलें. माझें क्षेत्र हा लुबाडून घेत आहे ' इत्यादिकांचें पक्षत्व इष्टच आहे. पण असल्या पक्षांतील क्रियांचा भेद असल्यामुळें क्रमानें व्यवहार करावा. सर्वांचा एकदम करूं नये. एवढाच त्यांत कायतो विशेष आहे.कारण कात्यायनानें तसें सांगितलें आहे. ( व्यवहाराविषयीं अगदीं निश्चित असलेलें पण अनेक प्रतिज्ञायुक्त, असें कार्यही राजानें तत्त्व जाणण्याच्या इच्छेनें खुशाल घ्यावें, असा त्यांच्या वचनाचा सारांश आहे. ) म्हणजे याचें तात्पर्य इतकेंच की, अनेकपदसंकीर्ण पूर्वपक्ष एकाचवेळीं सिद्ध होत नाहीं. अर्थी असें येथें म्हटलें आहे, त्यावरून त्याचे पुत्र, पौत्र

इत्यादिकांचें ग्रहण करावें. कारण त्यांचा अर्थ एकच असतो. एकाद्या अर्थीनें आपल्या जागीं दुसऱ्या कोणाची योजना केली असतां त्या नियोगाच्या योगानेंच त्याचा तो अर्थ होतो. वादी व प्रतिवादी यांनी नेमलेले ( वकील वगैरे ) वाद करीत असतांना त्यांतील ज्याचा जय किंवा पराजय होईल त्याच्या स्वामीचाच तो जय किंवा पराजय झाला असें समजावें.

असो; याप्रमाणें सांगितलेला पूर्वपक्ष न्यायाधीशानें प्रथम खडूनें फळ्यावर अथवा भूमीवर लिहावा. नंतर त्यांत कांहीं कमी-जास्त करावयाचें असल्यास तें करून चांगला शुद्ध केलेला तोच पूर्वपक्ष मागून कागदावर लिहावा. कारण कात्यायनानें तसें सांगितलेले आहे. आणि शोधन करणें, तेंही प्रतिवादीनें उत्तर देण्यास आरंभ केला नाहीं तोंवरच करावें, त्यानंतर करूं नये. कारण, तसें केल्यास मोठीच अनवस्था होईल. नारदानेंही तसेंच सांगितलें आहे. पण सभ्य पूर्वपक्षाचें शोधन न करवितांच जेव्हां उत्तर देववितात-तेव्हां राजानें चवथ्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें त्यांना ( सभ्यांना ) दंड देऊन पुनः प्रतिज्ञापूर्वक नवा व्यवहार सुरू करवावा ६.

याप्रमाणें पूर्वपक्षाचें शोधन करून त्याला पत्रावर लिहिलें असतां त्यानंतर काय करावें तें सांगतात—

## श्रुतार्थस्योत्तरं लेख्यं पूर्वावेदकसन्निधौ ।

**मिताक्षरासार**-राजाला जें निवेदन केलें जातें त्याला भाषा, प्रतिज्ञा किंवा पक्ष असें म्हणतात. ज्यानें भाषार्थ ऐकला आहे, अशा प्रतिवाद्याचें उत्तर ( हें पूर्वपक्षानंतर होतें म्हणून याला उत्तर असें म्हणतात ) लिहावें. तें प्रथम राजाकडे येऊन निवेदन करणाऱ्या वाद्याच्या समक्ष लिहावें. पूर्वी निवेदन केलेल्या गोष्टीचें निराकरण हेंच उत्तर होय. तें पूर्वोक्त पक्षाचें निराकरण करण्यास समर्थ, न्याय्य, संदेहरहित, पूर्वापरविरोधरहित व अप्रसिद्ध शब्दादिकांचा उपयोग केल्यामुळें व्याख्येस पात्र न झालेलें ( अन्य देशाच्या भाषेनें सांगितलेलें उत्तरही व्याख्येस पात्रच आहे. ) असावें. कारण, तेंच सत्-उत्तर आहे. त्याचे संप्रतिपत्ति, मिथ्या, प्रत्यवस्कंदन व पूर्वन्याय असे चार प्रकार आहेत. त्यांचीं क्रमानें उदाहरणें देतों—हा माझे शंभर रुपये कर्ज लागतो; असा कोणी पूर्वपक्ष केला असतां, हो; मी याचे शंभर रुपये देणें आहे, असें उत्तर देणें, हे, संप्रतिपत्ति उत्तर आहे. मी याचें कांहीं लागत नाहीं, हें मिथ्या-उत्तर असून त्याचे चार पोटभेद आहेत. १ हें खोटें आहे, २ मला ठाऊकही नाहीं. ३ मी त्यावेळीं येथें नव्हतों. त्यावेळीं जन्मालाही आलों नव्हतो. ४ मी याच्यापासून शंभर रुपये घेतले होते पण मीं ते त्याला परत दिले, अथवा ते मीं दान म्हणून घेतले होते. अशा उत्तराला प्रत्यवस्कंदन असें म्हणतात. आतां शेवटच्या पूर्व न्यायाचें उदाहरण देतों—याच विषयीं यानें पूर्वी मजवर दोषारोप केला होता; पण त्यांत तो व्यवहारमार्गानें हरला, असें वाद्यानें सांगणें हाच पूर्वन्याय आहे.

याप्रमाणें उत्तराचें लक्षण ठरलें असतां, या उत्तर लक्षणानें रहित असलेलीं तीं सर्व उत्तरें नसून उत्तराभास आहेत, हें उघड आहे. तथापि दुसऱ्या स्मृतींत उत्तराभास स्पष्ट करण्यासाठीं असें सांगितलें आहे. संदिग्ध, प्रकृताहून अन्य, फार थोडें, अतिशय अधिक,

पक्षाच्या एक भागास व्यापणारें, ज्याचीं पदें व्यस्त आहेत, अव्यापी, निगूढार्थ, आकुल, व्याख्यागम्य व असार उत्तर स्वार्थसिद्धीच्या उपयोगीं नसतें. यांचीं आतां क्रमानें उदाहरणें देतों. १ यानें माझे शंभर रुपये घेतले असा पूर्वपक्ष असतां त्यावर–' होय; मीं शंभर रुपये किंवा पावले, कांहींसें याच्यापासून घेतलें खरें' २ शंभर रुपयांच्या आरोपांत'मीं याचे शंभर पैसे घेतले आहेत' असें म्हणणें. ३ वरील खटल्यांतच ' मी याचे फक्त ५ रुपये लागतों ' असें म्हणणें.' ४ शंभर रुपयांचा दावा लागला असतां ' मी याचे शंभरच कां पाचशें रुपये लागतों. '५. सोनें, वस्त्रे, पात्रें इत्यादिकांचा दावा लागला असतां ' मीं याचें फक्त सोनें घेतलें आहे; दुसरें कांहीं नाहीं. ' असे सांगणें हें पक्षैकदेशव्यापी. ६ कर्जाचा कज्जा असतां त्यांत ' यानें मला मारलें ' असें सांगणें, हें व्यस्तपद होय. ७ मध्यदेशांत वाराणसींतील पूर्वेकडचें माझें क्षेत्र यानें हरण केलें, असा पूर्वपक्ष असतां ' क्षेत्र हरण केलें ' एवढेंच कंबूल करणें हें अव्यापि उत्तर आहे. ८ शंभर रुपयांचा दावा लागला असतां ' मीच ' मात्र याचे शंभर रुपये घेतले कीं काय? असें म्हणून न्यायाधीश, सभ्य, अर्थी इत्यादिकांनाही देणें आहे असें ध्वनित करणें हें निगूढार्थ उत्तर होय. ९ पूर्वापर विरुद्ध उत्तराला आकुल म्हणतात, जसें– मी याचे शंभर घेतले आहेत पण लागत नाहीं. १० जें उत्तर दुःश्लिष्ट विभक्ति, समास, अध्याहार इत्यादिकांच्या योगानें अथवा भिन्न देशच्या भाषेनें सांगितलेलें असतें तें व्याख्यागम्य होय. जसें–पित्यानें शंभर रुपये घेतले असा पूर्वपक्ष असतां ' गृहीतशतवचनात् सुवर्णानां पितुर्न जानामि ' असें उत्तर देणें. याचा अक्षरशः—घेतलेल्या शतवचनावरून सुवर्णांचा पित्याचा मीं जाणत नाहीं—असा अर्थ आहे. पण त्यावरून कांहीं अर्थबोध होत नाहीं. म्हणून ज्यानें शंभर सुवर्णमुद्रा घेतल्या आहेत अशा पित्याच्या तोंडून मी ऐकलेलें नाहीं, असें व्याख्यान करावें लागतें. ११ न्यायविरुद्ध उत्तरास असार म्हणतात. जसें–यानें शंभर रुपये व्याजावर घेतलें. पण व्याज मात्र दिलें. मुद्दल दिलें नाहीं. या खटल्यांत खरेंच व्याज दिलें नाहीं व मुद्दल घेतले नाहीं, असें सांगणें. मूळ श्लोकांत ' उत्तर ' असें एकवचन असल्यामुळें उत्तरांच्या संकराचा निरास होतो. अर्थात् अनेक उत्तरें कांहीं कामाचीं नाहींत. कात्यायनानें तेंच सांगितलें आहे–जें पक्षाच्या एक देशांत सत्य, एक देशांत कारण व एक देशांत मिथ्या असतें तें संकरामुळें योग्य उत्तरच नव्हे. त्याचें कारणही त्यानेंच सांगितलें आहे—एका विवादांत दोघां वाद्यांची क्रिया होणार नाहीं, दोघांची अर्थसिद्धि होणार नाहीं व एकत्र दोन क्रिया होत नाहींत, असा नियम आहे. पण मिथ्या उत्तर व कारण उत्तर यांचा संकर केल्यास अर्थी व प्रत्यर्थी या दोघांचीही क्रिया प्राप्त होते. कारण मिथ्या–उत्तरांत पूर्वपक्षाची क्रिया व कारण–उत्तरांत प्रतिवाद्याची क्रिया उचित आहे, असें स्मृति-वचन आहे. त्या कारणानें मिथ्या व कारण उत्तरांचा संकर एका व्यवहारांत करणें विरुद्ध आहे. जसें–यानें माझें सोनें व शंभर रुपये घेतले अशा प्रकारच्या आरोपांत सुवर्ण घेतलें नाहीं, रुपये घेतले होते पण परत दिले,' असें सांगणें. कारण व प्राङ्न्याय यांचा संकर करून उत्तर दिल्यास प्रतिवाद्याच्याच दोन क्रिया प्राप्त होतात. कारण प्राङ्न्याय व कारण

उत्तर दिल्यास प्रतिवाद्यानें क्रियानिर्देश करावा असें सांगितलें आहे. जसें—सुवर्ण घेतलें होतें तें दिलें. पण रूपकाविषयींच्या खटल्यांत मागें हा पराजित झाला होता अशा या संकरयुक्त उत्तरांत पूर्वखटल्यांतील जयपत्र अथवा पूर्वीचा न्याय पहाणारे साक्षी प्रतिवाद्यानें दाखविले पाहिजेत. व कारण-उत्तराचा निर्णय करण्याकरितां त्याला लेख ( पावती ) किंवा ( ज्यांच्या समोर सुवर्ण परत दिलें ते ) साक्षी दाखविणें भाग आहे.

याचप्रकारें तीन उत्तरांचा संकर केला असतांही जाणावें. जसें-यानें सुवर्ण, शंभर रुपये व वस्त्रें घेतलीं, अशा आरोपांत-सोनें घेतलें होतें खरें पण तें परत दिलें. शंभर रुपये मी मुळीं घेतलेच नाहींत. वस्त्रांविषयीं पूर्वी व्यवहार झालेला असून त्यांत हा हरला आहे; इत्यादि. चार उत्तरांचा संकर केल्यास त्यांतही असेंच जाणावें. पण अशा संकरयुक्त उत्तरांना उत्तरत्वच नाहीं, असें क्रमाला सोडून एकाच प्रसंगीं विचार करावयाचा झाल्यास समजावें. पण त्यांतील प्रत्येक अंशाचा क्रमानें विचार करावयाचा असल्यास असलीं संकरयुक्त उत्तरेंही निर्दोष उत्तरेंच होत. आतां त्यांचा क्रम जो ठरवावयाचा तो वादी, प्रतिवादी किंवा सभ्य यांच्या इच्छेप्रमाणें ठरवावा. ज्यांत दोन उत्तरांचा संकर केलेला असेल त्यांत जें पुष्कळ द्रव्यविषयक असेल त्याची क्रिया ग्रहण करून प्रथम व्यवहार चालवावा. व नंतर अल्पविषयक उत्तराचा स्वीकार करून व्यवहार पाहावा. संप्रतिपत्ति ( म्हणजे पूर्वपक्ष मान्य करणें ) उत्तरांत क्रिया करण्याचें कारणच नाहीं. आतां याचें एक उदाहरण देतों–' यानें सुवर्ण, शंभर रुपये व वस्त्रें घेतलीं ' अशाप्रकारच्या खटल्यांत 'होय, मीं सुवर्ण घेतलें आहे. शंभर रुपये कांहीं घेतले नाहींत. वस्त्रें घेतलीं होतीं पण तीं परत दिलीं.' असें उत्तर आलें. यांत मिथ्या उत्तराचा विषयच पुष्कळ आहे. यास्तव वाद्याची क्रिया स्वीकारून प्रथम व्यवहार सुरू करावा. तो झाल्यावर वस्त्रविषयक व्यवहार चालवावा. मिथ्या उत्तर व प्राङ्न्यायउत्तर यांचा संकर अथवा कारण व प्राङ्न्याय उत्तरें यांचा संकर केला असतांही अशीच योजना करावी. जसें-पूर्वीच्याच अभियोगांत सुवर्ण व शंभर रुपये, मीं घेतले आहेत, ते देतों. पण वस्त्रें घेतलीं नाहींत. अथवा घेतलीं होतीं पण तीं परत दिलीं किंवा वस्त्राविषयींच्या वादांत हा मागें एकदां हरला आहे असें उत्तर दिलें असतां यांतील संप्रतिपत्ति उत्तराचा सोनें व शंभर रुपये हा विषय पुष्कळ असला तरी त्यासंबंधीं क्रियाच करावयाची नसल्यामुळें मिथ्या कारण व प्राङ्न्याय यांची क्रिया स्वीकारून व्यवहार सुरू करावा. ज्या आरोपांतील मिथ्या व कारण उत्तर उर्वे पक्षास व्यापणारें असतें त्यांत प्रतिवाद्याची क्रिया स्वीकारून व्यवहार चालवावा. जसें—एकाद्या गायीला प्रत्यक्ष दाखवून कोणी एकादा ' ही माझी गाय आहे. अमुक वेळीं सांडली व तीं आज मला याच्या येथें दिसली ' असें ह्मणतो. पण दुसरा 'हें अगदीं खोटें आहे. हा सांगतो त्याच्या पूर्वीं पासून ही आमच्या येथें आहे, किंवा ही माझ्या घरीं झालेली आहे ' असें सांगतो. हें सांगणें पक्षाचें निराकरण करण्यास समर्थ असल्यामुळें उत्तर नव्हे, असें म्हणतां येत नाहीं. तें केवल मिथ्याही नव्हे. कारण त्यामध्यें ' ही माझ्या येथें पूर्वीपासूनच आहे किंवा माझ्या येथें झाली ' असा कारणाचाही निर्देश केलेला आहे. तसेंच या उत्तराला कारण उत्तरही ह्मणतां येत नाहीं. कारण, यांत आरोपांतील एकदेशाचा स्वीकार

केलेला नाहीं. यास्तव अशा प्रकारच्या उत्तराला सकारण मिथ्योत्तर म्हटलें पाहिजे. हें सर्व पक्षास व्यापणारें आहे; यास्तव अशा प्रसंगीं प्रतिवाद्याच्या बाजूनें फिर्याद चालवावी. कोणतेंही उत्तर मिथ्यायुक्त असतें. शुद्ध कारणोत्तराचा अभावच आहे. यास्तव प्रतिवाद्याची क्रिया घेणेंच युक्त होय.

आतां ज्या आरोपांत मिथ्या व प्राङ्न्याय उत्तरें पक्षास व्यापीत असतील त्यांतही प्रतिवाद्याचीच क्रिया घ्यावी. जसें—' हा माझे शंभर रुपये कर्ज लागतो ' या आरोपांत ' हें खोटें आहे, याच आरोपांत पूर्वी हा पराजित झाला आहे. ' असें उत्तर देणें हें मिथ्या व प्राङ्न्याय उत्तर आहे. यास्तव यांत प्रतिवाद्याची क्रिया घ्यावी. शुद्ध प्राङ्न्यायाचा अभावच असल्यामुळें शुद्ध प्राङ्न्याय हें आरोपाचें उत्तरच नव्हे. संप्रतिपत्तीला उत्तर म्हणतां येतें. कारण त्यांत साध्य म्हणून सांगितलेला पक्ष सिद्धच आहे. ( म्ह.होय; मी याचें देणें आहे ), असें म्हणून साध्याचें निराकरण केल्यानेंच त्याला उत्तरत्व आहे. ज्या आरोपांत कारण व प्राङ्न्याय यांचा संकर केलेला असतो,—तेथें प्रतिवाद्याच्या इच्छेप्रमाणें व्यवहार करावा; जसें–' यानें शंभर रुपये घेतले ' या आरोपांत प्रतिवादी 'होय, घेतले होते. पण ते दिले. व याच खटल्यांत हा पूर्वी पराभूत झाला आहे. ' असें उत्तर देऊं लागल्यास त्याच्या इच्छेप्रमाणें व्यवहार चालवावा. येणेंप्रमाणें केव्हांही वादी व प्रतिवादी यांच्या एका व्यवहारांत दोन क्रियांचा प्रसंगच येत नाहीं. हा निर्णय झाला.

असो; याप्रमाणें उत्तर पत्रांत लिहिलें असतां साध्यासिद्धि करण्याचा प्रसंग येतो. पण ती साधनाधीन असते. यास्तव साधनांचा निर्देश कोणी करावा, असा प्रश्न आला असतां योगीश्वर म्हणतात.—

ततोऽर्थी लेखयेत्सद्यः प्रतिज्ञातार्थसाधनम् ॥ ७ ॥

उत्तरानंतर साध्यवानानें ( वाद्यानें ) तत्काल साध्यार्थाचें प्रमाण लिहवावें. येथें "सद्यो लेखयेत्" म्हणजे तत्काल लिहवावें, असें म्हणणाऱ्या मुनींनीं उत्तरकथनाला कालविलंब लागला तरी चालेल, असें म्हटल्यासारखेंच आहे. याचें अधिक विवेचन पुढें करूं. ' अर्थी प्रतिज्ञातार्थसाधनं लेखयेत्' म्हणजे वाद्यानें साध्यार्थाचें प्रमाण लिहवावें, असें म्हणून ज्याचें साध्य असेल त्यानें तें लिहावें असें सुचविलें आहे. त्यावरून प्राङ्न्याय उत्तरांत प्राङ्न्यायच साध्य असल्यामुळें प्रतिवादीच अर्थी मानला जातो, यास्तव त्यानेंच साधन प्रमाण लिहवावें. कारणोत्तरातही कारणच साध्य असल्यामुळें कारणवादीच अर्थी आहे. यास्तव त्यानेंच प्रमाण लिहवावें. मिथ्योत्तरांत पूर्ववादी अर्थी आहे; यास्तव त्यानें प्रमाण निर्देश करावा. ' अर्थी ', असें मुळांत म्हटलें आहे, त्यावरून त्यानेंच लिहवावें. दुसऱ्यानें लिहवूं नये, असें होतें. संप्रतिपत्ति उत्तरांत साध्याचाच अभाव झाल्यामुळें भाषावादी व उत्तरवादी, या उभयतांनाही अर्थित्व येत नाहीं म्हणून साधननिर्देशच करावयास नको. कारण त्या उत्तरानेंच व्यवहार संपतो ७.

त्यानंतर—

**ततसिद्धौ सिद्धिमाप्नोति विपरीतमतोऽन्यथा ।**

**चतुष्पाद्व्यवहारोऽयं विवादेषूपदर्शितः ॥ ८ ॥**

त्या ( पुढें सांगितल्याप्रमाणें लिहिवलेल्या साक्षीप्रभृति लक्ष्यरूप ) साधना (प्रमाणा) ची सिद्धि झाली असतां, अर्थी साध्याच्या जयरूप सिद्धीस प्राप्त होतो. पण याहून निराळा प्रकार घडला असतां म्हणजे साधनाची सिद्धि न झाल्यास अर्थी पुरुषाला फलही विपरीत मिळतें ( म्हणजे पराजयरूप साध्याची असिद्धि प्राप्त होते. )

याप्रमाणें व्यवहाराचें रूप सांगून उपसंहार करितात—

**चतुष्पाद्व्यवहारोऽयं विवादेषूपदर्शितः ।**

या अध्यायाच्या पहिल्या श्लोकांत सांगितलेला व्यवहार हा अशाप्रकारें चतुष्पाद आहे. त्याच्या चार अंशांची कल्पना करून, ऋणादानादि विवादांमध्यें वर्णन केलें आहे. त्यांतील ' प्रत्यर्थीच्या पुढें लिहावें' हा भाषापाद पहिला; 'ज्यानें भाषार्थ ऐकला आहे अशा प्रत्यर्थीचें उत्तर लिहावें ' हा उत्तरपाद दुसरा; त्यानंतर–'अर्थीनें तत्काल प्रमाण लिहावें' हा क्रियापाद तिसरा व 'प्रमाणाची सिद्धि झाल्यास अर्थी विजयी होतो' हा साध्यसिद्धिपाद चवथा होय. संप्रतिपत्ति उत्तरांत तर साधनाचा निर्देश करावा लागत नाहीं व भाषार्थाची सिद्धिही करावयाची नसते. यास्तव त्यांत क्रियापाद व साध्यसिद्धिपाद असत नाहींत. अर्थात् त्याला दोनच पाद आहेत. उत्तर सांगितल्यानंतर ' अर्थी व प्रत्यर्थी यांतील क्रिया कोणाची घ्यावी याचा विचार करणें, एतद्रूप प्रत्याकलित हा व्यवहाराचा पाद आहे ' असे योगीश्वरानें सांगितलेलें नसल्यामुळें व व्यवहार करणाराचाही त्याच्याशीं संबंध नसल्यामुळें त्याला व्यवहाराचें पादत्व नाहीं म्हणजे प्रत्याकलित हा व्यवहाराचा भाग नव्हे.

इति साधारणव्यहारमातृकाप्रकरणम् १.

# अथ असाधारणमातृकाप्रकरणम् २

याप्रमाणें सर्व व्यवहारोपयोगिनी व्यवहारमातृका सांगून आतां कांहीं विशेष व्यवहारांत कांहीं विशेष सांगण्याकरितां म्हणतात—

**अभियोगमनिस्तीर्य नैनं प्रत्यभियोजयेत् ।**

अभियोग म्हणजे अपराध त्याचा परिहार केल्यावांचून आरोप करणारावर प्रत्यभियोग ( उलट आरोप ) करूं नये. ( त्याला अपराधी करूं नये ). प्रत्यवस्कंदन जरी प्रत्यभियोगरूपच आहे तथापि तें स्वापराधपरिहारात्मक असल्यामुळे, निषेधाचा विषय होत नाहीं. (प्रत्यवस्कंदनास कांहीं हरकत नाहीं). यास्तव आपल्या अपराधाचा परिहार करण्याच्या उपयोगी नसलेल्या प्रत्याभियोगाचाच हा निषेध आहे, असें जाणावें. हें प्रत्यर्थीला उद्देशून सांगितलें आहे.

आतां अर्थास उद्देशून सांगतात--

अभियुक्तं च नान्येन नोक्तं विप्रकृतिं नयेत् ॥ ९ ॥

दुसऱ्यानें ज्याच्यावर आरोप केला आहे तो त्या आरोपांतून पार ( मुक्त ) झाल्यावाचून आणखी तिसऱ्यानें त्याच्यावर दुसरा अभियोग करूं नये. त्याचप्रमाणें आवेदनसमयीं जें सांगितलें असेल त्यांत विरोध येईल असें करूं नये. म्हणजे याचा सारांश असा-आवेदनसमयीं जी वस्तु ज्या रूपानें सांगितली असेल ती तशीच भाषाकालींही लिहावी. त्यांत विपरीतपणा येऊं देऊं नये. पण सहाव्या श्लोकाच्या प्रथमार्धांत हेंच सांगितलेलें असतां पुनः येथें सांगण्याचें कारण काय, तें सांगतों-तेथें आवेदनसमयीं जें सांगितलें असेल तें तसेंच एकाद्या पदाचाही व्यत्यास न करितां प्रत्यर्थीच्या समोर लिहावें, असें सांगितलें आहे. जसें-यानें शंभर रुपये मजपासून व्याजीं घेतले, असें आवेदनसमयीं प्रतिपादन करून प्रत्यर्थीच्या समोर भाषासमयीं शंभर वस्त्रें व्याजीं घेतलीं, असें सांगूं नये. कारण,एक निराळें पद आल्यानेंही वस्तु बदलत असल्यामुळें असें हीन भाषण करणारा दंडास पात्र होतो. पण जें सांगितलें असेल त्यांत बदल करूं नये, असें आतां येथें सांगितलें आहे. त्यावरून वस्तु जरी बदलत नसली तरी पदेंही बदलूं नयेत, असा निषेध सिद्ध होतो. जसें-हा व्याजीं शंभर रुपये घेऊन आतां देत नाहीं, असें आवेदनसमयीं निवेदन करून भाषासमयीं-यानें शंभर रुपये बलात्कारानें घेतले, असें बोलूं नये. अर्थात् सहाव्या श्लोकांत वस्तूचा बदल करूं नये व या श्लोकांत पदाचाही बदल करूं नये, असें सांगितलें आहे. त्यामुळें येथें पुनरुक्त दोष येत नाहीं.

पण असा हीनवादी दंडास पात्र होतो. प्रकृत अर्थापासून हीन होत नाहीं. यास्तव प्रत्यर्थी व अर्थी यांच्या हातून घडणाऱ्या प्रमादांचा परिहार करण्यास्तवच हा येथील उपदेश आहे. प्रकृत अर्थाची सिद्धि व असिद्धि यांविषयीं नाहीं. एवढ्यासाठींच 'छलाचें निरसन करून राजानें सत्यानें व्यवहार करावा ' असें पुढें ( श्लोक १९ ) सांगणार आहेत. पण हा उपदेश प्रकृत-अर्थाच्या सिद्धि--असिद्धीविषयीं नाहीं, हें म्हणणें अर्थव्यवहारासच लागूं आहे, असें समजावें. कारण मन्युकृत ( क्रोधकृत ) व्यवहारांत प्रमादकथनानेंही कथक प्रकृत व्यवहारांत पराभूत होतो. नारदानें-परस्त्री, भूमि, ऋण घेणें इत्यादिकांमध्यें प्रमादानें भाषण केल्यानें भाषणकर्ता जरी दंडास पात्र झाला तरी प्रकृत अर्थापासून जसा हीन होत नाहीं त्याप्रमाणें सर्व अर्थविवादांतही प्रमादभाषणानें पराभूत होत नाहीं. दंड्य मात्र होतो--असें म्हटलें आहे. येथें अर्थविवाद असें म्हटलेलें असल्यामुळें मन्युकृतविवादास हा न्याय लागूं नाहीं, असें उघडच होतें. जसें-'मला यानें मस्तकावर लाथ मारली' असें निवेदनसमयीं सांगून भाषासमयीं हातानें किंवा पायानें मारलें, असें सांगणारा अर्थी केवल दंडार्हच होऊन राहत नाहीं तर पराभूतही होतो ९.

आतां वरच्या श्लोकांतील सामान्य नियमाचा अपवाद सांगतात—

**कुर्यात्प्रत्यभियोगं च कलहे साहसेषु च ।**

तोंडानें भांडण करणें, मारामारी करणें इत्यादि ( वाग्दंडपारुष्यरूप ) कलहांत व विष-शस्त्र इत्यादि निमित्तांनीं प्राण घेणें इत्यादिरूप साहसांमध्यें प्रत्यभियोगाचा ( प्रति-आरोपाचा ) संभव असल्यास, आपल्यावरील आरोपाचें निराकरण न करितां आरोप कर-णारावर उलट आरोप ( प्रत्यभियोग ) करावा. पण, अशा प्रसंगींही प्रत्यभियोग हें उत्तर होऊं शकत नाहीं. कारण पूर्वपक्षाच्चें उपमर्दन निराकरण करणारें जें असेल तेंच उत्तर व तसें नसेल तें उत्तर नव्हे, असें ठरलें आहे. त्यामुळें प्रत्यभियोग ही निराळीच प्रतिज्ञा असून दोन्ही आरोपांचा एकाचवेळीं व्यवहार होणें संभवत नाहीं, हें खरें; तथापि या श्लोकांत प्रत्यभियोगाचा जो उपदेश केलेला आहे तो दोन्ही आरोपांचा व्यवहार एकाचवेळीं व्हावा; यासाठीं नव्हे. तर आरोपीला न्यून दंड व्हावा किंवा अधिक दंड होऊं नये, म्हणून केला आहे. जसें-यानें मला मारलें किंवा गाळी ( शिव्या ) दिल्या. असा कोणी आरोप केला असतां त्यावर 'पूर्वी यानें मला मारलें अथवा शिव्या दिल्या' असा प्रत्यभियोग केल्यास आरोपीस दंड थोडा होतो. पण जेव्हां दोघेही एकाचवेळीं परस्परांस मारावयास किंवा शिव्या द्यावयास आरंभ करितात तेव्हां अधिक दंडाची निवृत्ति होते. सारांश येणेंप्रमाणें एकाचवेळीं दोन्ही व्यवहार चालणें जरी शक्य नसलें तरी कलहादिकांमध्यें प्रत्यभियोग अर्थवान् ( सार्थ ) आहे. पण ऋण घेणें इत्यादिकांमध्यें तो निरर्थकच आहे.

येणेंप्रमाणें अर्थी व प्रत्यर्थी यांचें कर्तव्य सांगून सभ्यांसह सभापतीचें कर्तव्य सांगतात—

**उभयोः प्रतिभूर्ग्राह्यः समर्थः कार्यनिर्णये ॥ १० ॥**

अर्थी व प्रत्यर्थी या दोघांचाही निर्णयाच्या कार्याविषयीं समर्थ असा प्रतिभू ( जामीन ) सर्व विवादांमध्यें घ्यावा. निर्णयाचें कार्य कोणतें ? शाबीत झालेलें धन व दंड देणें हें निर्णयाचें कार्य आहे. तें करण्यास समर्थ असा प्रतिभू असावा. या शब्दाची व्युत्पत्ति प्रतिभवति इति प्रतिभूः ह्मणजे त्याच्या कार्यांत त्याच्यासारखा होतो, अशी आहे. सभ्यांसह सभापतीनें असा प्रतिभू घ्यावा. पण त्याचा असंभव झाल्यास अर्थी व प्रत्यर्थी यांचें रक्षण करण्याकरितां राजपुरुषांस नियुक्त करावे ( ठेवावे ) व त्यांचें वेतन प्रत्यहीं अर्थी व प्रत्यर्थी यांच्याकडून देववावें १०.

निर्णयकार्याकरितां अर्थी व प्रत्यर्थी यांचा प्रतिभू ( जामीन ) सभ्यांसह सभापतीनें घ्यावा असें सांगितलें. पण ज्याच्याकरितां तो घ्यावयाचा तें निर्णयकार्य कोणतें तें सांगतात—

**निन्हवे भावितो दद्याद्धनं राज्ञे च तत्समम् ।**
**मिथ्याभियोगी द्विगुणमभियोगाद्धनं वहेत् ॥ ११ ॥**

अर्थीनें निवेदित केलेल्या अभियोगाचा प्रत्यर्थीनें अपन्हव केला असतां ( प्रतिवादीनें अपराध नाकबूल केला असतां ) अर्थीनें साक्षी पुरावा देऊन तो अपराध त्याच्यावर शाबीत करावा. नंतर याप्रमाणें ज्याला अपराध कबूल करणें भाग पडलें आहे, अशा प्रत्यर्थीनें वाद-विषयक धन अर्थीस द्यावें व राजालाही अपराधाचा अपलाप केल्याबद्दल तितकाच दंड द्यावा. पण अर्थी ह्मणजे फिर्याद करणारा आरोपीवर आरोप शाबीत करण्यास समर्थ न झाल्यास तो मिथ्याभियोगी ( खोटा आरोप करणारा ) होतो. यास्तव, त्यानें जितक्या धनाचा आरोप दुसऱ्यावर केला असेल त्याच्या दुप्पट धन राजास द्यावें. प्राङ्न्याय व प्रत्यवस्कंद यांमध्येंही याचीच योजना करावी. म्हणजे त्यांत प्रत्यर्थीनें-मला अमुक परत दिलें नाहीं,- असें ह्मणणाऱ्या अर्थीकडून साक्षिपुराव्यानें तें परत दिलें असें कबूल करविलें असतां अर्थीनें राजाला वादविषयभूत धनाइतका दंड द्यावा. परंतु, प्रत्यर्थी प्राङ्न्याय अथवा कारण सिद्ध करण्यास समर्थ न झाल्यास तोच मिथ्याभियोगी ठरतो. यास्तव त्यानें राजाला दुप्पट दंड द्यावा. प्रत्यर्थीनें अर्थीचें धन मान्य करून संप्रतिपत्ति उत्तर दिल्यास त्याला दंड मुळींच करूं नये. पण हें ऋणादानाविषयींच आहे. कारण दुसऱ्या पदार्थाविषयीं जागजागीं दंड सांगितलेला आहे व धनरहित व्यवहारांतही त्याचा असंभव आहे. तस्मात् वरील दंडाचें विधान सर्व अभियोगांत लागू पडण्यासारखें नाहीं. राजानें ऋणकोला दंड करावा, हें वचन ऋणविषयकच जरी असलें तरी त्यासंबंधीं विशेष कोणता आहे तें आम्ही पुढें सांगूं. ह्या विधानाचीच सर्व व्यवहारविषयतेनेंही योजना करितां येते. कशी म्हणून ह्मणाल तर सांगतों— आरोप्यानें आरोप नाकबूल केला असतां फिर्यादीनें साक्षिपुरावा देऊन तो जर त्याच्यावर शाबीत केला तर आरोपीनें त्या त्या ठिकाणीं सांगितला असेल तितकाच दंड राजाला द्यावा. पण अभियोग करणारा ( अर्थी, वादी, फिर्यादी ) अभियोग सिद्ध करण्यास समर्थ न झाल्यास तो मिथ्यायोगी ठरतो. यास्तव त्याला उक्त धनाच्या दुप्पट दंड करावा, असें विधान केलें आहे. या स्थानींही प्राङ्न्याय व प्रत्यवस्कंध यांत सुद्धां पूर्वी प्रमाणेंच योजना करावी ११.

सातव्या श्लोकांत ' त्यानंतर अर्थीनें तत्काल प्रतिज्ञात अर्थाचें प्रमाण लिहवावें ' असें सांगणाऱ्या योगीश्वरानें उत्तरपाद लिहिण्यास कालप्रतीक्षा सुचविली होती. पण तिचाच आतां अपवाद सांगतात—

**साहसस्तेयपारुष्यगोभिशापात्यये स्त्रियाम् ।**

**विवादयेत्सद्य एव कालोऽन्यत्रेच्छया स्मृतः ॥ १२ ॥**

साहस ( विष, शस्त्र इत्यादिकांच्या योगानें प्राण्यास मारणें वगैरे ), स्तेय ( चौर्य ), पारुष्य ( वाक्पारुष्य, दण्डपारुष्य इत्यादि पुढें सांगणार आहों ), दुभती गाय, अभिशाप ( पातकाचा आरोप ), अत्यय ( प्राण व धन यांवर अतिपात-घाला ) व स्त्री ( कुलस्त्रीच्या आचरणाविषयीं व दासीच्या स्वत्वा-मालकी-विषयीं वाद ), या विवादांमध्यें आरोपी,

करून तत्काल उत्तर ( जबाब ) घ्यावें. असल्या वादांत उत्तराला कालावधि लावूं नये. या वादांस सोडून बाकीच्या वादांत उत्तरदानाचा काल अर्थी, प्रत्यर्थी, सभ्य व सभापति यांच्या इच्छेप्रमाणें ठरवावा १२.

आतां दुष्ट लक्षणें सांगतात—

देशाद्देशान्तरं याति सृक्किणी परिलेढि च ।
ललाटं स्विद्यते चास्य मुखं वैवर्ण्यमेति च ॥ १३ ॥

परिशुष्यत्स्खलद्वाक्यो विरुद्धं बहु भाषते ।
वाक्चक्षुः पूजयति नो तथोष्ठौ निर्भुजत्यपि ॥ १४ ॥

स्वभावाद्विकृतिं गच्छेन्मनोवाक्कायकर्मभिः ।
अभियोगे च साक्ष्ये वा दुष्टः स परिकीर्तितः ॥ १५ ॥

जो मन, वाणी व शरीरचेष्टा यांच्या योगानें स्वभावतःच ( भयादि निमित्तानें नव्हे विकारास प्राप्त होतो तो अभियोग किंवा साक्ष्य यांमध्यें दुष्ट आहे, असें सांगितलें आहे ( दुष्ट म्हणजे दोषयुक्त. ) आतां, त्याच विकारांचीं उदाहरणें देऊन स्पष्ट करून दाखवितात. १ एका जाग्यावरून दुसऱ्या जागीं जातो; एका जागीं स्थिर उभा रहात नाहीं. २ जिभल्या चाटतो. ( हा कर्मांचा विकार आहे. ) ३ ललाट ( कपाळ ) घामाच्या बारीक थेंबांनीं चिन्हित होतें. ४ मुख पांढरें ( फिक्कट ) किंवा काळें ( ठिक्कर ) होतें. ( हा शरीराचा विकार आहे. ) ५ कांपऱ्या आवाजानें अडत बोलतो. ६ पूर्वापर विरुद्ध पुष्कळ भाषण करतो ( ही वाणीची विकृति आहे. ) ७ दुसऱ्यानें बोललेल्या वाणीचें उत्तर देऊन प्रतिपूजन करीत नाहीं; अथवा उलट पाहून पाहणाऱ्याच्या नेत्राचें प्रतिपूजन करीत नाहीं; ( हीं दोन मनोविकाराचीं चिन्हें आहेत.) त्याचप्रमाणें ओंठ वाकडा करणें (ही सुद्धां शरीराची विकृति आहे. ) असो. हें जें येथें सांगितलें आहे तें या या दोषांची संभावना आहे असें समजून सांगितलें आहे. दोषांचा निश्चय करावा, किंवा इतकेंच काय ते दोष आहेत, अशा उद्देशानें सांगितलेलें नाहीं. कारण असले दोष स्वाभाविक आहेत, की नैमित्तिक आहेत याचा विवेक होणें फार कठीण आहे. आणि कदाचित् जरी कोणी निपुण मतिमानानें त्याचा विवेक केला तरी त्यापासून पराजयाच्या निमित्तानें होणारें असें कांहींच कार्य होत नाहीं. कारण एकादा मनुष्य आतां मरणार, असें जरी चिन्ह दिसलें तरी तेवढ्यावरून मृतकार्य (दाहादि) जसें होत नाहीं त्याप्रमाणें याचा पराजय होणार असें वर सांगितलेल्या चिन्हासारख्या चिन्हांवरून जरी कळलें तरी पराजयनिमित्तक ( दंडादि ) कार्य होण्याचा प्रसंग येत नाहीं १३,१४,१५.

संदिग्धार्थं स्वतन्त्रो यः साधयेद्यश्च निष्पतेत् ।
न चाहूतो वदेत्किंचद्धीनो दण्ड्यश्च स स्मृतः ॥ १६ ॥

तसेंच—ऋणकोनें ज्याचा अंगीकार केलेला नाहीं, असें संदिग्ध धन जो स्वतंत्रपणें म्हणजे प्रमाणाची अपेक्षा न करितांच प्रतिबंध करणें, इत्यादि उपायानें ऋणकोपासून काढून घेतो तो हीन (पराभूत) व दंड्य (दंडास पात्र) होतो. जो संप्रतिपन्न उत्तरानें (म्हणजे होय, मी याचें देणें आहे, असें) म्हणून कबूल केलेलें अथवा प्रमाणानें शाबीत केलेलें धन अर्थी मागूं लागला असतां पळून जातो किंवा जो अभियुक्त (आरोप केला गेलेला प्रत्यर्थी) राजानें सभेंत बोलाविलें असतां कांहीं बोलत नाहीं,. तोही हीन व दंड्य आहे.' तो अभियोग व साक्ष्य यांत दुष्ट आहे.' असें वरून प्रकरण चालू असल्यामुळें, येथेंही हा हीन आहे, पराभूत झालेला आहे, एवढेंच कोणी समजूं नये म्हणून तो दंड्य आहे, असें पुनः अधिक सांगितलें आहे. त्याचप्रमाणें कांहीं ठिकाणीं एकादा दंडास पात्र झालेला अर्थीही अर्थापासून पराभूत होत नाहीं. म्हणजे त्याची फिर्याद चालते, ती रद्द होत नाहीं. वादास कारण झालेलें त्याचें धन दुडत नाहीं असेंही आढळतें. म्हणून या श्लोकांत हीन असें पद घातलें आहे. म्हणजें येथें सांगितलेले दोष करणारा अर्थी अथवा प्रत्यर्थी केवल दंड्यच होत नाहीं तर अर्थापासून हीनही होतो १६.

आतां एका खटल्यांत असें झालें कीं, दोघेही भाषावादी एकाच वेळीं धर्माधिकाऱ्यापाशीं आले. जसें—कोणी एकानें एक शेत राजापासून संपादन केलें. त्याचा कांहीं दिवस उपभोग घेतला, व तो (प्रतिग्रह घेणारा) कांहीं कामाकरितां कुटुंबासह गावाला गेला. नंतर दुसऱ्या एकानेंही तसेंच तें क्षेत्र प्रतिग्रहानें घेऊन व कांहीं काल त्याचा उपभोग घेऊन देशांतरीं गमन केलें. त्यानंतर ते दोघेही एकाचवेळीं परत आले व 'हें माझें शेत आहे' असें म्हणून आपसांत भांडत धर्माधिकाऱ्यापाशीं आले. तेव्हां अशा प्रसंगीं क्रिया कोणाची घ्यावी असा प्रश्न आला असतां सांगतात—

साक्षिषूभयतः सत्सु साक्षिणः पूर्ववादिनः ।
पूर्वपक्षेऽधरीभूते भवन्त्युत्तरवादिनः ॥ १७ ॥

दोन्ही वाद्यांचें साक्षी असल्यास त्यांतील—पूर्वीं मीं हें शेत घेतलें व त्याचा उपभोग घेतला, असें जो सांगत असेल त्या पूर्ववाद्याच्या साक्षीस प्रथम विचारावें. जो धर्माधिकाऱ्याला पूर्वीं येऊन निवेदन करतो त्याच्या साक्षीस प्रथम विचारूं नये. पण दुसरा जर असें सांगूं लागला, कीं– यानें पूर्वीं तें घेतलें व त्याचा उपभोग घेतला हें खरें; पण राजानें त्याच्यापासून हेंच शेत विकत घेऊन मला दिलें, किंवा यानें प्रतिग्रहानें (दानानें) मिळवून मला दिलें. तर अशा प्रसंगीं पूर्वपक्ष असाध्य झाल्यामुळें हीन (अधर) होतो. त्यामुळें मागून तें घेऊन त्याचा उपभोग घेणाऱ्या उत्तर-वाद्याच्या साक्षीस प्रश्न करावा. या श्लोकाचें असें व्याख्यान करणेंच अधिक युक्त आहे. मिथ्योत्तर दिल्यास पूर्ववाद्याचे साक्षी होतात व प्राङ्न्याय आणि कारण–उत्तरांत पूर्वपक्ष अधर झाल्यावर उत्तरवाद्याचे साक्षी होतात; हें अपरार्कांचें व्याख्यान युक्त नव्हे. कारण हा प्रकार या प्रकरणाच्या सातव्या श्लोकांत (उत्तरा-

र्थात ) च सांगितला आहे. यास्तव तेंच पुनः येथें सांगूं लागल्यास पुनरुक्त दोष येईल. नारदानेंही आमच्या वरील व्याख्यानाप्रमाणेंच सांगितलें आहे. म्हणजे ( आमचें व्याख्यान नारदस्मृतीलाही अनुसरून आहे ) या श्लोकांत सांगितलेल्या प्रकारचे वाद इतर व्यवहारांहून विलक्षण असल्यामुळें त्यांचा येथें पृथक् निर्देश केला आहे १७.

सपणश्चेद्विवादः स्यात्तत्र हीनं तु दापयेत् ।
दण्डं च स्वपणं चैव धनिने धनमेव च ॥ १८ ॥

आतां तो विवाद जर पण लावून केलेला असेल तर त्या सपण व्यवहारांत ज्याचा पराभव होईल त्याच्याकडून पूर्वोक्त दंड व त्यानें स्वतः केलेला पण राजाला आणि विवादाला कारण झालेलें धन अर्थीला देववावें. एका वादांत एकजण कोपवश होऊन ' मी जर या वादांत पराजित झालों तर तुला शंभर पण देईन ' अशी प्रतिज्ञा करून बोलला व दुसरा प्रतिज्ञेनें कांहींच बोलला नाहीं, तरीही व्यवहार ( खटला ) होतो. त्यांत पणाची प्रतिज्ञा करणारा जर हरला तर त्यालाच पणासह दंड करावा; आणि दुसरा ( प्रतिज्ञा न करणारा ) हरला तर त्याला नुस्ता दंड करावा; पण द्यावयास लावूं नये. या श्लोकांत दंड व स्वपण असें म्हटलें आहे. त्यावरून-ज्या वादांत एकानें शंभराचा व दुसऱ्यानें पन्नासाचा पण लाविला असेल त्यांतही ज्याचा पराजय होईल त्याला त्याचा प्रतिज्ञात पणच द्यावयास लावावें. " सपण विवाद असल्यास " असें म्हणून योगीश्वरानें पणरहित विवादही होतो, असें सुचविलें आहे १८.

छलं निरस्य भूतेन व्यवहारान्नयेन्नृपः ॥
भूतमप्यनुपन्यस्तं हीयते व्यवहारतः ॥ १९ ॥

प्रमादानें सांगितलेल्या वचनांचा निरास करून राजानें वस्तुतत्त्वानुसार व्यवहाराचा अंत ( निर्णय ) करावा. ज्याअर्थी वस्तुतत्त्वही न सांगितल्यास व तें साक्षी इत्यादिकांच्या द्वारा शाबीत न केल्यास ( कायद्यानें ) हीन होतें ( खोटें ठरतें ) त्याअर्थी तत्त्वार्थाचें ( सत्याचें ) अनुसरण करावें. म्हणजे अर्थी व प्रत्यर्थी सत्यच भाषण करतील, असा सभ्यांसह सभापतीनें सामादि उपायांनीं प्रयत्न करावा. कारण तसें केल्यानें साक्षि-इत्यादिकांची अपेक्षा न ठेवतांच निर्णय करतां येतो. पण कांहीं केलें तरी सत्यानुसरण होतच नाहीं ( म्हणजे सामादि उपायांनीं आरोपी सत्य काय आहे तें सांगून आपला अपराध कबूल करीतच नाहीं ) असें झाल्यास साक्षी इत्यादिकांच्या योगानें निर्णय करावा. अर्थात् छल व भूत असा व्यवहार दोन प्रकारचा आहे. मिथ्या भाषण, कांहीं तरी भलतेंच बोलणें इत्यादिकांनीं युक्त असलेला छल व सत्यार्थानें युक्त असलेला भूतव्यवहार होय. यांतील भूतानुसारी व्यवहार मुख्य असून छलानुसारी अमुख्य ( गौण ) आहे. कारण साक्षी, लेख इत्यादिकांच्या योगानें व्यवहाराचा निर्णय करूं लागल्यास कदाचित् सत्यानुसरण होतें व कदाचित् होतही नाहीं. कारण साक्षी, लेख इत्यादि बनावट ( खोटे ) असण्याचाही संभव असतो १९.

सत्यार्थही न्यायासनापुढें न मांडल्यास ( न सांगितल्यास ) तो व्यवहारापासून हीन होतो, असें वरच्या श्लोकांत म्हटलें आहे. त्याचेंच आतां उदाहरण देतात—

निन्हुते लिखितं नैकमेकदेशे विभावितः
दाप्यं सर्वं नृपेणार्थो न ग्राह्यस्त्वनिवेदितः ॥२०॥

अर्थीनें सुवर्ण, रुपें, वस्त्र इत्यादि अनेक वस्तु ( निवेदन समयीं ) लिहिलेल्या असून प्रत्यर्थी त्या सर्व नाकबूल करूं लागला असतां अर्थीनें त्यांतील एकदेशाची ( म्हणजे सुवर्ण किंवा रुपें इत्यादि एकाद्या वस्तूचीच ) त्याच्यावर साक्षी इत्यादिकांच्या योगानें शाबिती करावी व त्यानें असें केलें असतां राजानें अर्थीला प्रत्यर्थीकडून त्यानें लिहिलेलें सर्व देववावें. पण अर्थीनें भाषासमयीं न निवेदन केलेला असा एकादा अर्थ तो 'मी पूर्वी विसरलों' असें म्हणून मागून जर निवेदन करूं लागला तर राजानें तो अर्थ प्रतिवादीकडून त्याला ( अर्थीला ) देववूं नये. प्रत्यर्थी एकदेशीं ( म्हणजे आरोपांतील एका गोष्टीविषयीं ) मिथ्या भाषण करीत आहे, असा निश्चय झाला म्हणजे त्याचें बाकीचें भाषणही मिथ्या असण्याचा संभव आहे, व अर्थी एकदेशीं सत्यवक्ता ठरला म्हणजे इतर भागांमध्येंही तो सत्यवक्ता असण्याचा संभव आहे, असें तर्कावरून ठरत असल्यामुळें संभावनाप्रत्ययानुग्रहीत अशा या योगीश्वराच्या वचनावरून राजानें अर्थीला सर्व देववावें, असा निर्णय होतो. यावरील तर्कवाक्यानुसार निर्णय करीत असतांना वस्तुस्थिति जरी विपरीत असली तरी व्यवहारदर्शकाकडे कांहीं दोष येत नाहीं. कारण गौतमानेंही तसें स्पष्ट सांगितलें आहे. यावरून ज्याच्यावर आरोपांतील एकदेश सिद्ध केला आहे, अशा प्रत्यर्थीचें कोणतेंही वचन ग्राह्य नाहीं, एवढेंच नुस्तें ठरत नसून मिथ्यावादी प्रत्यर्थीकडून राजानें अर्थीचें आरोपित सर्व धनादि देववावें, असेंही ठरतें.

आतां कात्यायनानें--अनेक वस्तूविषयीं अभियोग असला तरी त्यांतील जेवढा भाग अर्थी साक्षिपुराव्यानें प्रत्यर्थीवर शाबीत करील तेवढाच त्याला मिळतो--असें जें सांगितलें आहे तें पुत्रादिकांस पिता, पितामह इत्यादिकांचें ऋण द्यावयाचें असतां त्याविषयीं होय. अशा खटल्यांत पुत्रादिकांवर पित्रादिकांनीं घेतलेल्या अनेक वस्तूंचा अभियोग केलेला असतो. त्यामुळें 'या वस्तु माझ्या पित्यानें घेतलेल्या होत्या कीं काय, हें मला माहीत नाहीं.' असें त्यानें उत्तर दिल्यास व मागून त्यांतील एकदेशाची सिद्धि अर्थीनें साक्षी, लेख इत्यादिकांच्या द्वारा केल्यास पुत्रादि प्रत्यर्थी असत्यवादी होत नाहीं. यास्तव, प्रस्तुत श्लोक तेथें लागू होत नाहीं. अर्थात् कात्यायनाचें वरील वचन सामान्यविषय आहे. यास्तव, निवेदनसमयीं लिहिलेल्या सर्व अर्थांच्या साधना ( शाबिती ) करितां दिलेल्या साक्षींनीं एकदेशाची सिद्धि केली असतां अथवा अधिक कांहीं सांगितलें असतां त्यावरून सर्वच साध्य सिद्ध होत नाहीं. तर त्याला दुसऱ्या प्रमाणाची अपेक्षा असते. पण साहसादिकांत साक्षींच्या द्वारा एकदेशाची सिद्धि झाली असतां सर्व साध्याची सिद्धि होतेच. कारण, तेवढ्यावरूनच

साहसादिकांची सिद्धि होऊं शकते. शिवाय-स्त्रीसंग, साहस, चौर्य इत्यादिकांत जें साध्य असेल त्यांतील एकदेशाची जरी साक्षीपुराव्यानें सिद्धि झाली तरी सर्व साध्य सिद्ध होतें-असें कात्यायनानेंही सांगितलें आहे २०.

' निन्हुते लिखितं० ' हें वरील वचन व ' अनेकार्थाभियोगेऽपि० ' असें कात्यायनाचें वचन या दोन स्मृतिवचनांत परस्पर विरोध आला असतां विषयव्यवस्था कशी करावी तें सांगतात:—

## स्मृत्योर्विरोधे न्यायस्तु बलवान्व्यवहारतः ।

दोन स्मृतिवचनांचा परस्पर विरोध आला असतां त्याचा परिहार करण्यास्तव त्या दोन वचनांच्या विषयाची व्यवस्था लावण्यास उत्सर्ग-अपवाद-न्याय समर्थ आहे. ( उत्सर्ग म्हणजे सामान्यशास्त्र व अपवाद म्हणजे विशेषशास्त्र.) वृद्धलोकांच्या व्यवहारावरून तो न्याय कळतो. यास्तव वरील प्रकृत उदाहरणांतही विषयव्यवस्थाच युक्त आहे. याचप्रमाणें इतरत्रही विषयव्यवस्था, विकल्प इत्यादिकांची यथासंभव योजना करावी. पण कोठें कोठें या नियमाचाही अपवाद आढळतो. कोणता तो सांगतों—

## अर्थशास्त्रात्तु बलवद्धर्मशास्त्रमिति स्थितिः ॥ २१ ॥

' राजानें धर्मशास्त्राच्या अनुरोधानें व्यवहार पहावा ' असें या अध्यायाच्या पहिल्याच श्लोकांत सांगितलेलें असल्यामुळें औशनसादिकांच्या अर्थशास्त्रांचें निरसन होतें, व राजनीति-लक्षण अर्थशास्त्राचा अंतर्भाव धर्मशास्त्रांतच होतो. असल्या अर्थशास्त्रांच्या व धर्मशास्त्रांच्या स्मृतिवचनांचा परस्पर विरोध आला असतां अर्थशास्त्राहून धर्मशास्त्र बलवान् आहे, अशी मर्यादा जाणावी. त्या दोन्हीं शास्त्रांचा कर्ता एकच असल्यामुळें त्यांमध्यें स्वरूपासंबंधीं विशेष कांहीं नाहीं. तथापि प्रमेयभूत धर्माला प्राधान्य व अर्थाला अप्राधान्य असल्यामुळें धर्मशास्त्र बलवान् होय. धर्माचें प्राधान्य शास्त्र, लोकव्यवहार इत्यादिकांवरून सिद्ध होतें. यास्तव धर्मशास्त्राशीं विरोध असल्यास अर्थशास्त्र बाधितच होतें. त्याच्या विषयाची व्यवस्था अथवा विकल्प होत नाहीं. हेंच आतां एक उदाहरण देऊन स्पष्ट करतों—शस्त्र उचलून आपल्या अंगावर मारण्याकरितां धावून येणारा आततायी गुरु, बाल, वृद्ध, बहुश्रुत ब्राह्मण इत्यादिकांतीलही जरी कोणी आला तरी कांहीं विचार न करितां त्याला मारावें.कारण आततायीला मारल्यानें मारणारास कांहीं दोष लागत नाहीं. ' मारावयासाठीं समोर येणारा एकादा वेदांती महाब्राह्मण जरी असला तरी त्याला मारावें, अशा हिंसेपासून ब्रह्मघाताचा दोष लागत नाहीं. ' इत्यादि अर्थशास्त्र आहे. पण त्याच्या उलट ' इच्छेवांचून अबुद्धिपूर्वक ब्राह्मणाचा वध घडल्यास त्याचें हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. पण जाणूनबुजून स्वेच्छेनें ब्राह्मणाचा वध केल्यास प्रायश्चित्तच नाहीं ' असें धर्मशास्त्र आहे. येथें या दोन शास्त्रांच्या वचनांचा परस्पर विरोध आहे. तथापि यांतील धर्मशास्त्र बलाढ्य असून त्याच्या योगानें अर्थशास्त्र बाधित होणेंच युक्त आहे. पण या दोघांचा विषय एक नसल्यामुळें त्याच्या

बलाबलाचा विचार करण्याचें कांहीं कारणच नसतें. तें कसें म्हणून विचाराल तर पहा— ' धर्माला प्रतिबंध होऊं लागल्यास ब्राह्मणांनीं शस्त्र धरावें ' असा आरंभ करून स्वतःचें रक्षण, दक्षिणा, यज्ञोपकरणें यांचें रक्षण, दुद्ध, स्त्री, ब्राह्मण इत्यादिकांची हिंसा इत्यादि प्रसंगीं हिंसकाला अकूटशस्त्रानें मारणारा पुरुष राजदंडाला पात्र होत नाहीं. असें सांगून त्याच्या अर्थवादाकरितां ( स्तुति करण्यासाठीं ) गुरु, बाल, वृद्ध, ब्राह्मण, वेदान्ती इत्यादि अत्यंत अवध्य अशाही आततायींना मारावें, मग इतरांची काय कथा ? ' अशाप्रकारचें हें वचन प्रवृत्त झालें आहे. पण तसल्या त्या स्तुतिवाक्याकरून गुरु, बाल, इत्यादि वध्य आहेत, असें मुळींच सिद्ध होत नाहीं. शिवाय ब्राह्मण, गाय इत्यादिकांस सोडून बाकीच्या आतताईस मारण्यांत कांहीं दोष नाहीं, असें सुमंतूनें व ' आचार्य, विद्यादाता, माता, पिता, गुरु, ब्राह्मण, गाय व सर्व तपस्वी यांची हिंसा कधींही करूं नये ' असें मनूनें सांगितलें आहे. यास्तव आचार्यादिक जरी आततायी असले तरी ते अवध्य आहेत, असाच त्याचा तात्पर्यार्थ निघतो. कारण नुसत्या हिंसेचा निषेध तर ' न हिंस्यात् सर्वभूतानि ' या सामान्य श्रौतशास्त्रानेंच सिद्ध आहे. यास्तव ' नातता-यिवधे दोषो हन्तुर्भवति कश्चन ' हें वचनही ब्राह्मणादिकांस सोडून बाकीच्या आततायी-विषयींच सार्थ आहे. आग लावणारा, विष घालणारा. मारण्यासाठीं हातांत शस्त्र घेणारा, धनाचा अपहार करणारा, क्षेत्र व स्त्री यांचें हरण करणारा हे सहा आततायी आहेत. दुसऱ्या एका वचनांत-शाप द्यावयास उद्यत झालेला, अभिचार कर्मानें मारणारा, राजाला चाहाडी सांगणारा, भार्येचा अतिक्रम करणारा, रंध्रान्वेषण करणारा-इत्यादि आणखी अधिक आततायी सांगितले आहेत. यास्तव ब्राह्मणादिक व आततायी ( किंवा आततायी ब्राह्मणा-दिक ) यांचें कोणी आत्मरक्षणार्थ निवारण करीत असतांना प्रमादानें ( मारण्याची इच्छा नसतांना ) जर त्यांचा वध झाला तर त्या आत्मरक्षकाला प्रायश्चित्त थोडें करावें लागतें व राजदंडही होत नाहीं. असा त्या वचनावरून निर्णय होतो. यास्तव याविषयीं दुसरें उदा-हरण देणें भाग आहे तें असें—

सोनें व भूमि यांच्या लाभाहून मित्रलाभ श्रेष्ठ आहे. यास्तव त्याच्या प्राप्तीकरितां यत्न करावा हें अर्थशास्त्र व ' धर्मशास्त्रानुसार क्रोधलोभरहित होऊन व्यवहार करावा ' हें धर्मशास्त्र. यांचा क्वचित् प्रसंगीं विरोध येतो. जसें-चतुष्पाद पशूंचा व्यवहार चाललेला असून त्यांत एकाचा जय झाला असतां मित्रलाभ होत असून धर्माचें अनुसरण होत नाहीं. व दुसऱ्याचा जय झाला असतां धर्माचें परिपालन होत असून मित्रलाभ होत नाहीं, अशा प्रसंगीं अर्थशास्त्रापेक्षां धर्मशास्त्र बलाढ्य समजावें. एवढ्यासाठींच आपस्तंबानें धर्म व अर्थ यांचा संबंध आला असतां त्यांतील अर्थग्रहण करणाऱ्या पुरुषास द्वादश वार्षिक हें अधिक प्रायश्चित्त सांगितलें आहे २१.

या अध्यायाच्या सातव्या श्लोकांत 'त्यानंतर अर्थानें लागलेंच प्रतिज्ञात अर्थाचें साधन लिहवावें, असें सांगितलें आहे. पण तें साधन कोणतें तें सांगतात—

**प्रमाणं लिखितं भुक्तिः साक्षिणश्चेति कीर्तितम् ।**
**एषामन्यतमाभावे दिव्यान्यतममुच्यते ॥ २२ ॥**

ज्याच्या योगानें विषयाचें ज्ञान होतें, तें प्रमाण. प्रमाण मानुष व दैव असें दोन प्रकारचें असून मानुष प्रमाणाचे लिखित, भुक्ति व साक्षी असे तीन पोटभेद आहेत. लिखित-शासन व चीरक असें दोनप्रकारचें असतें. त्यांतील शासनाचें लक्षण मागें ( आचाराध्याय श्लोक ३२० ) सांगितलेलें असून चीरकाचें पुढें सांगणार आहों. भुक्ति म्हणजे उपभोग. साक्षीचें स्वरूप व लक्षण पुढें सांगूं. लिखित व साक्षी शब्दांच्या अभिव्यक्तीच्या द्वारा ( म्ह. लेख वाचून व साक्षीला विचारून ) शाब्दबोध होत असल्यामुळें त्यांना प्रमाण म्हणण्यास योग्य कारण तरी आहे. पण भुक्तीला प्रामाण्य कसें ? असें कोणी विचारील; म्हणून सांगतों— कांहीं विशेषणांनीं युक्त असलेली भुक्तिही भोग घेणाऱ्याच्या क्रयादिकाच्या योगानें स्वत्वाचें अनुमान करविते. कारण ही अमुक वस्तु अमक्याची जर नसती तर त्याला तिचा अव्याहतपणें उपभोग घेतां आला नसता. पण ज्याअर्थी हा तिचा उपभोग अव्याहतपणें घेत आहे त्याअर्थी ही त्याचीच आहे. असें अनुमान होऊन भुक्तीचा अर्थापत्तींत अंतर्भाव होतो त्यामुळें ती प्रमाणच आहे.

या लिखितादि तीन प्रमाणांतील एकाद्याही प्रमाणाचा अभाव असतां ज्यांचें स्वरूप व भेद पुढें सांगणार आहों त्या दिव्य प्रमाणांतील एकादें, देश-काल-जाति-क्रिया-द्रव्य इत्यादिकांच्या अपेक्षेनें, प्रमाण होतें. अर्थात् मानुषप्रमाणाचा सर्वथा अभाव असला तरच दिव्यप्रमाणाला प्रमाण समजावें, असें याच वचनावरून सिद्ध होतें. कारण दिव्यप्रमाणाचें स्वरूप व प्रामाण्य हीं दोन्हीं आगम ( शास्त्र ) गम्य आहेत. यास्तव परस्पर विवाद करीत एकाच मेळीं धर्माधिकाऱ्यापाशीं आलेल्या दोघांपैकीं एक मानुष प्रमाण व दुसरा दैवप्रमाण जर देऊं लागला तर मानुष प्रमाणाचें ग्रहण करावें. कारण कात्यायनानें तसें सांगितलें आहे. ज्या अभिप्रयोगांत मानुषप्रमाणानें मुख्य एकदेशाची सिद्धि होत असेल त्यांतही दैवप्रमाणाचा आश्रय करूं नये. जसें—शंभर रुपये इतक्या व्याजानें देऊन हा आतां देत नाहीं, असा कोणी एकाद्यानें कोणावर अभियोग केला, व प्रतिवाद्यानें मी त्याचे रुपये घेतलेच नाहींत असें उत्तर दिलें असतां अर्थीनें रुपये घेतल्याविषयीं साक्षी दिले. पण ते किती व कोणत्या व्याजानें याविषयीं त्यांनीं कांहीं सांगितलें नाहीं; म्हणून तो ( अर्थी ) मी त्याविषयीं दिव्य करतों, असें म्हणूं लागला असतां, त्याचें दिव्य प्रमाण घेऊं नये. कारण साक्षीच्या सांगण्यावरून रुपये घेतले, एवढी प्रधान गोष्ट सिद्ध झाली असतां एकदेशभावित न्यायानें प्रतिवादी नाकबूल करीत असलेली संख्या व व्याजाचा दर यांचीही सिद्धि होते. यास्तव अर्थीच्या दिव्याला अवकाशच रहात नाहीं. कात्यायनानें असेंच सांगितलें आहे. गुप्त साहस करणारांचें दिव्य प्रमाणांनीं परीक्षण करावें, असें जें त्यानें सांगितलें आहे किंवा नारदानें—निर्जन अरण्यांत, रात्रीं व अंतर्गृहांत साहस केलें असतां किंवा ठेव नाकबूल केल्यास दिव्य संभवतें असें जें

म्हटलें आहे तेंहीं मानुषप्रमाणांचा असंभव असला तरच समजावें. अर्थात् मानुषप्रमाण नसल्यास दिव्यप्रमाणानें निर्णय करावा. हा सामान्य नियम ( उत्सर्ग ) होय. याचा अपवादही दिसतो; तो असा-साहसवाद, दंडपारुष्य व वाक्पारुष्य, बलात्कार इत्यादिकांमध्यें साक्षीकडून दिव्यच करवावें.त्याचप्रमाणें लेख्यादिकांचाही क्वचित् नियम दिसतो. जसें-जाती, श्रेणी, गण इत्यादिकांची जी स्थिति ( मर्यादा ) ठरलेली असेल तिचें साधन लेख्यच आहे. दिव्य किंवा साक्षी नव्हे. त्याचप्रमाणें द्वार, मार्ग, क्रिया, भोग, जलवाह इत्यादिकांमध्यें उपभोग हेंच मुख्य प्रमाण आहे. दिव्य किंवा साक्षी नव्हे. त्याचप्रमाणें स्वामीनें भृत्यांना वेतन दिलें कीं, नाहीं ? याचा निर्णय कर्तव्य असतां, विक्रय, देवघेवीचा संबंध, वस्तु विकून तिचें मूल्य न घेणें, द्यूत इत्यादिकांविषयीं वाद लागला असतां साक्षी हेंच साधन सांगितलेलें आहे. अशा प्रसंगीं लेख्य किंवा दिव्य यांचा कांहीं उपयोग नाहीं २२.

दोन्हीं पक्षीं प्रमाणें आहेत. पण प्रमाणाविषयीं बलाबलविचार झालेला नाहीं. ( म्हणजे त्यांतील बलवत्( समर्थ ) प्रमाण कोणतें व अबलवत् (दुर्बळ) कोणतें? याचा निर्णय झालेला नाहीं. ) तेव्हां अशा प्रसंगीं पूर्वापार कार्यांतील अधिक बलवत् कार्य कोणतें ? असा प्रश्न उपस्थित झाला असतां सांगतात—

## सर्वेष्वर्थविवादेषु बलवत्युत्तरा क्रिया।

ऋणादि सर्व अर्थविवादांमध्यें उत्तरा क्रिया ( कार्य ) बलवती आहे. कारण उत्तरकार्य साधलें असतां उत्तरवादी विजयी होतो, व पूर्वकार्यसिद्ध असलें तरी पूर्ववादी पराभूत होतो. जसें-कोणी एकानें-या ऋणकोनें मजपासून अमुक धन घेतलें व म्हणून तें त्याच्याकडे येणें-आहे असें सिद्ध केलें असतां प्रतिवादी मी तें सर्व त्याला परत दिलें व म्हणून मी आतां त्याचें कांहीं देणें नाहीं- असें सांगून तें सिद्ध करावयास समर्थ झाल्यास प्रमाणतः सिद्ध होणाऱ्या या दोन्हीं पक्षांतील प्रतिदान ( परत दिल्याविषयींचा ) पक्ष बलाढ्य आहे. यास्तव असल्या वादांत प्रतिदानवादी ( म्हणजेच उत्तरवादी ) विजयी होतो. तसेंच पूर्वी दोनशें घेऊन पुढें ( कालांतरीं ) तीनशें मान्य केल्यास दोन्हीं पक्षांविषयीं प्रमाणें असलीं तरी उत्तरपक्षानें सिद्ध होणारा तीनशेंचा पक्षच बलाढ्य होय. कारण उत्तर पश्चाद्भावि असल्यामुळें तें पूर्वपक्षाचा बाध केल्यावांचून उत्पन्नच होत नाहीं.

आतां याचा अपवाद सांगतात—

## आधौ प्रतिग्रहे क्रीते पूर्वा तु बलवत्तरा ॥२३॥

आधि, प्रतिग्रह व क्रीत या तीन प्रकारच्या वादांत पूर्वक्रियाच अधिक बलवती आहे. असें-एकच क्षेत्र एकाकडे गहाण ठेवून व त्याच्यापासून कांहीं धन घेऊन दुसऱ्याकडे पुनः तेंच ठेवणें व त्याच्यापासनही धन घेणें. असल्या वादांत पूर्वी ज्यानें तें धन देऊन गहाण घेतलें असेल त्याचेंच तें होतें. मागून धन देऊन घेणाराचें होत नाहीं. प्रतिग्रह ( दानानें घेणें ) व क्रय ( विकत घेणें ) यांतही असेंच समजावें. वस्तुतः मालकानें एकादी ( क्षेत्र-गृहादि )

वस्तु दुसऱ्याकडे गहाण ठेवलेली असतां, दान दिली असतां किंवा विकली असतां तिच्यावर त्या मालकाचें स्वत्व ( स्वामित्व ) च रहात नाहीं. यास्तव दुसऱ्याकडे गहाण वगैरे टेवलेल्या, दान दिलेल्या किंवा विकलेल्या वस्तूला पुनः गहाण ठेवतां वगैरे येत नाहीं, त्यामुळें हें प्रस्तुत वचन व्यर्थ आहे, असें वाटतें. पण एकाद्याचें अशारीतीनें एकाद्या वस्तूवर स्वत्व जरी नसलें तरी त्यानें मोहानें किंवा लोभानें पुनः तेंच गहाण वगैरे ठेवल्यास पूर्वपक्ष बलवान् आहे, असें हें वचन सांगत असल्यामुळें तें न्यायमूलच होय, व्यर्थ नव्हे २३.

कांहीं विशेषणांनीं युक्त असलेल्या भुक्तीला प्रामाण्य कसें असतें, तें दाखवीत असतां कांहीं भुक्तीचें निराळें कार्य सांगतात—

**पश्यतोऽब्रुवतो भूमेर्हानिर्विंशतिवार्षिकी ।**
**परेण भुज्यमानाया धनस्य दशवार्षिकी ॥ २४ ॥**

ज्याचा एकाद्या भूमीशीं अथवा धनाशीं कांहीं ( स्वस्वामिभाव ) संबंध नाहीं असा कोणी दुसराच एकाद्या भूमीचा अथवा धनाचा मालकासमक्ष उपभोग घेत असतांनाही मालकानें ' ही माझी भूमि आहे. तूं हिचा उपभोग घेऊं नकोस. ' असें म्हणून त्याचा निषेध न केल्यास बीस वर्षांच्या अव्याहत उपभोगानें मालकाची हानि होते. हत्ती, घोडा इत्यादि धनाची तर दहा वर्षांच्या उपभोगानेंच हानि होते.

पण मालकानें दया, भीति इत्यादि निमित्तानें त्याचा निषेध केला नाहीं, एवढ्याच कारणानें त्याची ( ती वस्तूच नव्हे, अशाप्रकारची ) हानि होणें योग्य नव्हे. कारण अप्रतिषेध हाही दान, विक्रय इत्यादिकाप्रमाणें स्वत्वाची ( मालकीची ) निवृत्ति करणारा आहे, असें लोक व शास्त्र यांवरुन सिद्ध झालेलें नाहीं. तसेंच— वीस वर्षें नुस्ता उपभोग घेतला. एवढ्याच कारणानें एकाद्या वस्तूवर एकाद्या परक्याचें स्वत्व येणें न्याय्य नव्हे. कारण उपभोग हें स्वत्वाचें प्रमाणच नव्हे. आपलें स्वत्व, विभागानें प्राप्त झालेलें पितृधन, विक्रय, विभाग, परिग्रह, ब्राह्मणास प्रतिग्रहार्थ मिळालेलें, क्षत्रियांस विजयानें प्राप्त झालेलें व वैश्य—शूद्रांस उद्यमानें मिळविलें, अशा गौतमानें सांगितलेल्या या आठ स्वत्वकारणामध्यें उपभोगाची गणना केलेली दिसत नाहीं. याच योगीश्वरांच्या वचनावरुन उपभोग हेंही एक नवें स्वत्वोत्पादक प्रमाण ( किंवा निमित्त ) आहे असें म्हणावें तर तेंही योग्य नव्हे. कारण, स्वत्व किंवा स्वत्वाचे हेतू लोकप्रसिद्ध असतात. परलोकाप्रमाणें ते केवळ शास्त्रावरुन ज्ञात होणारे नसतात. विभागप्रकरणामध्यें आम्ही यांचें अधिक चांगलें उपपादन करूं.

शिवाय ' कोणत्याही योग्य कारणानें आपल्यास प्राप्त न झालेल्या ( अनागम ) वस्तूचा जो उपभोग घेतो त्या प्राण्याला राजानें चोरास योग्य असलेला दंड करावा ' असें स्मृतिवचन असून त्यावरून उपभोग हें स्वत्वाचें कारण नव्हे, असें ठरतें. हें येथील वचन परोक्ष ( मालकाच्या न कळत ) उपभोगाविषयीं असून प्रस्तुत श्लोक प्रत्यक्ष ( मालकाच्या समक्ष ) उपभोगाविषयीं आहे, म्हणून म्हणावें तर तसेंही या येथील वचनावरुन ठरत नाहीं.

कारण येथें सामान्यतः ‘ आपल्यास न्यायानें प्राप्त न झालेल्या वस्तूचा जो उपभोग घेतो ’ असें म्हटलें आहे. ‘ पशू, स्त्री, पुरुष इत्यादिकांस युद्धादिकांत जिंकून किंवा धन देऊन आणणाऱ्या पुरुषानें अथवा त्याच्या पुत्रानें त्यांच्या उपभोगासाठीं त्यांच्यावर बलात्कार करूं नये, हा धर्म निश्चित झालेला आहे, असें कात्यायनानेंही सांगितलें आहे.

आधि, प्रतिग्रह व क्रय यांमध्यें पूर्वक्रियेला प्राबल्य असल्यामुळें या वचनानें त्याचा अपवाद सांगत आहेत. भूमीचा वीस वर्षें व धनाचा दहा वर्षें समक्ष उपभोग घेतल्यास उत्तरक्रियेलाच प्राबल्य असतें, असें सांगून तो ( अपवाद ) येथें स्पष्ट व्यक्त केला आहे. अर्थात् मालकाच्या हानीचें कारणच नसल्यामुळें त्याची हानि होण्याचा कांहीं संभवच नाहीं, असें कोणी म्हणेल पण तें बरोबर नव्हे. प्रस्तुत प्रसंगीं उत्तर क्रियाच तत्वतः उत्पन्न होत नाहीं, कारण जें स्वधन असतें तेंच कोणापाशीं गहाण ठेवितां, दान देतां व विकतां येतें. जें एकदां गहाण ठेविलें, दान दिलें किंवा विकलें त्यावर त्याचें स्वत्वच रहात नाहीं. पण अशा अस्वत्वाचें दान किंवा प्रतिग्रह केल्यास चोरासारखा दंड सांगितलेला आहे. शिवाय या श्लोकांत आधि, प्रतिग्रह व विक्रय यांचा अपवाद सांगितला आहे, असें म्हटल्यास पुढच्या श्लोकांतील अपवाद उपपन्न होत नाहीं. यास्तव नुसत्या उपभोगानें मालकाची भूमि व धन यांची हानि होणें योग्य नव्हे, व्यवहारहानि होते म्हणून म्हणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारण आपल्या वस्तूचा उपभोग घेणाऱ्या दुसऱ्याची उपेक्षा केल्यास व त्या उपेक्षेचें कांहीं विशेष कारण नसल्यास व्यवहारहानि होते; पण वस्तु मालकाची नव्हे असें कधींही होत नाहीं, असें नारदानें सांगितलें आहे. मनूनेंही—एकाद्या वस्तूचा धनी मूढ नसून व्यवहारांत चांगला सावध आहे व तो पौंगड ( पंधरा वर्षांच्या आंत ) नसून तरुण आहे. असें असतांना त्याच्या समक्ष दुसरा कोणी त्याच्या त्या भूम्यादि वस्तूचा उपभोग घेत आहे. पण तो त्याला प्रतिबंध करीत नाहीं. अशा अवस्थेंत तो व्यवहारतः भंग ( पराभव ) पावतो, असें म्हणून त्याचा व्यवहारदृष्ट्या पराभव होतो, म्हणून सांगितलें आहे. वस्तुतः त्याची हानि होते असें म्हटलेलें नाहीं. उपभोग घेणारा व्यवहारभंग असा सांगतो—हा वादी मूढ किंवा बाल नाहीं. आज वीस वर्षें मी या भूमीचा एकसारखा याच्या समक्ष उपभोग घेत आहें. याविषयीं अनेक साक्षी आहेत. मी याचें धन जर अन्यायानें उपभोगीत होतों तर इतके दिवस हा असा मुकाट्यानें कां बसला ?

प्रत्यर्थीच्या या प्रश्नाचें समर्पक उत्तर देण्यास वादी समर्थ होत नाहीं. तो निरुत्तर होतो. तथापि त्याचा वास्तव्य व्यवहार होतोच. कारण छलाचें निरसन करून राजानें सत्यार्थानें व्यवहार करावा असें वर ( याच अध्यायाच्या १९ व्या श्लोकांत ) सांगितलें आहे.

आतां कोणी असें म्हणेल कीं, वस्तुहानि किंवा व्यवहारहानिही जरी होत नसली तरी आपल्या वस्तूचा दुसरा उपभोग घेत आहे, हें पहात असूनही त्याचा निषेध न करणाऱ्या मालकाची व्यवहारहानि होईल कीं काय? अशी शंका येत असून तिचें निरसन करण्यासाठीं धन्यानें मुकाट्यानें बसूं नये, असा उपदेश योगीश्वर येथें करीत आहेत. पण तो बरोबर

नाहीं. कारण अशा प्रसंगीं मुकाट्यानें राहूं नये, एवढाच जर उपदेश करावयाचा असता तर वीस वर्षांच्या अव्याहत उपभोगानें हानि होते, असें म्हणून वीस वर्षे या कालावधीचा निर्देश करणें व्यर्थ होतें.

पुनः आणखी कोणी म्हणेल कीं, येथें वीस वर्षांचें जें ग्रहण केलें आहे तें पत्रदोषाचें निराकरण करण्याकरितां आहे. कारण कात्यायनानें— लेखी करार करून समर्थ मालकाच्या समक्ष जर एकाद्यानें एकाद्या वस्तूचा वीस वर्षांहून अधिक उपभोग घेतला आहे व त्या पत्रांत मालकानें कांहीं दोष काढलेला नाहीं, तर तें ( करारपत्र ) निर्दोष होय—असें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें-सीमाविवादाचा निर्णय झाला असतां सीमापत्र करावें व त्यांत कांहीं दोष राहिलेले असल्यास ते वीस वर्षांच्या आंत दाखवावेत. असेंही त्यानें म्हटलें आहे. यास्तव वीस वर्षांनंतर आधि, प्रतिग्रह व क्रय यांमध्यें दोष काढणें पत्रदोषांप्रमाणेंच व्यर्थ आहे.

तस्मात् येथील हानि शब्दाचा दुसराच कांहीं योग्य अर्थ सांगणें उचितआहे. व तो हा– भूमि किंवा धन यांच्या फलाची हानि होते, वस्तुहानि किंवा व्यवहारहानि होत नाहीं. कोणत्याही प्रकारच्या प्रतिषेधावाचून एकाद्यानें दुसऱ्या एकाद्याच्या भूमीचा वीस वर्षे उपभोग घेतला तरी तिच्या स्वामीला ती प्राप्त होते. वीस वर्षांत त्यानें भोगलेले धान्यादि फल मात्र त्याला परत मिळत नाहीं. कारण आपल्या समक्ष दुसरा आपल्या भूमीचा उपभोग घेत असतांना त्याला प्रतिबंध न करणें हाच त्याचा अपराध होय. व हें वचनही तसें सांगत आहे. पण मालकाच्या परोक्ष जर कोणी उपभोग घेत असलें तर वीस वर्षांनंतरही त्याला ( मालकाला ) फळ मिळतेंच. वीस वर्षांपूर्वी प्रत्यक्ष उपभोग घेत असतांनाही हरकत केलेली नसली तरी मालकाला फलही परत मिळतें.

पण कोणी म्हणेल कीं, त्या भूमींत उत्पन्न झालेलें फळ मालकाला न मिळणें हें योग्य नव्हे. त्यावरही त्याचेंच स्वत्व असणें योग्य आहे तर तें खरें आहे. स्वरूपाचा नाश न होतां जें जसेंच्या तसेंच असेल त्याच्यावर मालकाचेंच स्वत्व आहे. जसें—त्या भूमींत उत्पन्न झालेलीं सुपारींचीं, फणसाचीं, आंब्याचीं वगैरे झाडें. पण जें उपभोगानें नष्ट झालें असेल तें त्याला परत मिळणें शक्य नाहीं.

न्यायानें प्राप्त न झालेल्या दुसऱ्याच्या वस्तूचा उपभोग घेणारास राजानें चोराला जितका दंड करावयाचा तितका करावा, असें म्हणून वीस वर्षांनीं होणाऱ्या हानीचा अपवाद सांगितला आहे. वीस वर्षांनंतरही त्याला राजदंड होतोच. तस्मात् स्वामीच्या उपेक्षालक्षण स्वापराधामुळें व या वचनामुळें वीस वर्षांनंतर नष्ट झालेलें फळ स्वामीला परत मिळत नाहीं. धनाच्या–दहावर्षांनंतर होणाऱ्या– हानीचाही असाच निर्णय समजावा २४.

आतां याचा अपवाद सांगतात—

**आधिसीमोपनिक्षेपजडबालधनैर्विना ।**
**तथोपनिधिराजस्त्रीश्रोत्रियाणां धनैरपि ॥ २५ ॥**

आधि, सीमा, उपनिक्षेप, जड व बाल यांचें धन यांस सोडून, त्याचप्रमाणें उपनिधि, राजा, स्त्री व श्रोत्रिय यांच्या धनांस सोडून बाकीच्याविषयीं हा वरील ( वीस वर्षांनंतर फलहानि होण्याचा ) नियम लागू करावा. आधि म्हणजे गहाण, सीमा म्हणजे क्षेत्रादिकांची मर्यादा, उपनिक्षेप म्हणजे वस्तूचें स्वरूप व संख्या दाखवून विश्वासानें दुसऱ्यापाशीं रक्षणार्थ ठेवलेलें धन ( ठेव ), उपनिधि म्हणजे ज्यांत काय आहे तें न दाखवितां पेटीचें किंवा थाग-रीचें तोंड बंद करून व त्यावर मोहोर करून दुसऱ्यापाशीं ठेवणें, राजा म्हणजे देशाचा रक्षक, स्त्री व श्रोत्रिय म्हणजे वेदांचें अध्ययन, अध्यापन, विचार वगैरे करणारा. आधि इत्यादि-कांचा उपभोग घेत आहे, असें पाहूनही मालक कांहीं न बोलल्यास भूमि व धन यांची वीस किंवा दहा वर्षांनीं हानि होत नाहीं. कारण, अशा प्रसंगीं मालकाचा तसा कांहीं अपराध नसतो. यांतील प्रत्येक पक्षीं मालकाच्या उपेक्षेचें निरनिराळें कारणही संभवतें. आधीमध्यें गहाण ठेवल्यामुळेंच तो या माझ्या वस्तूचा उपभोग घेत आहे, असें समजून मालकानें उपेक्षा केल्यास त्यास त्याचा फारसा अपराध आहे असें म्हणतां येत नाहीं. त्याचप्रमाणें फार दिवसांपासून तुष, कोळसे इत्यादि घालून चिन्हें केलेलीं असल्यामुळें सीमेविषयीं उपे-क्षाही संभवते. उपक्षेप व उपनिधि यांमध्यें उपभोगाचा प्रतिषेध केलेला आहे. पण कोणी त्याचें उल्लंघन करून उपभोग घेऊं लागल्यास मालकाला फलाचा लाभ होत असल्यामुळें त्याची उपेक्षा संभवते. बाल व जड, बालपण व जडपण यांमुळेंच उपेक्षा करितात. राजा अनेक कार्यांमध्यें व्यग्र असतो. स्त्रिया अज्ञ व अप्रगल्भ असतात. श्रोत्रिय अध्ययन, अध्यापन, त्याचा अर्थविचार व अनुष्ठान यांत निमग्न असतो, त्यामुळें त्याची उपेक्षा संभवते, यास्तव आधि, सीमा इत्यादिकांमध्यें उपेक्षेचें कारण संभवत असल्यामुळें दुसऱ्याच्या समक्ष उपभो-गानें स्वामीची फलहानि होत नाहीं २५.

आधि, सीमा इत्यादिकांचा उपभोग घेतल्यास विशेष दंडाचें प्रतिपादन करण्याक-रितां सांगतात—

**आध्यादीनां विहर्तारं धनिने दापयेद्धनम् ।**
**दण्डं च तत्समं राज्ञे शक्त्यपेक्षमथापि वा ॥ २६ ॥**

आधीपासून श्रोत्रियधनापर्यंत वस्तूंचा चिरकाळ भोग घेणें याच एका बलानें त्यांचा अपहार करणारास विवादाला कारण होणारें धन धन्याला द्यावयास लावावें. ( हा केवळ-अनुवाद आहे. ) आणि तितकाच दंड राजाला देववावा. ( हा विधि आहे. ) गृह, क्षेत्र इत्यादिकांमध्यें विवादाला निमित्त होणाऱ्या धनाइतका दंड जरी संभवत नाहीं तरी ' मर्या-दायाः प्रभेदे च० ' इत्यादि पुढें सांगितलेला दंड करावा. पण उपभोग घेणारा श्रीमान् अस-ल्यामुळें तेवढ्या दंडानें त्याचा दर्प शांत न झाल्यास तो शांत होईल इतका दंड करावा. सारांश, शक्त्यनुसार दंड करावा. कारण तो अपराध्याच्या दमनार्थ करावयाचा असतो. तसेंच ज्याच्यापाशीं तितका दंड देण्याइतकें धन नसेल त्यालाही जेवढ्या दंडानें त्याला पीडा होईल तेवढा करावा, ज्याच्यापाशीं मुळीं धन नसेल त्याचें धिग्दंडानें दमन करावें, कारण

मनूनें—प्रथम धिग्दंड, नंतर वाग्दंड, त्यानंतर ( तिसऱ्यावेळीं ) धनदंड व शेवटीं वधदंड करावा, असें सांगितलें आहे. शरीरसंबंधी वधदंडही ब्राह्मणावांचून इतरांना करावयाचा असून तो मनूनें दहाप्रकारचा सांगितलेला आहे. उपस्थ, उदर, जिह्वा, हात, पाय, नेत्र, नाक, कान मन व देह या स्थानांतील ज्याच्या योगानें अपराध घडला असेल त्याचाच निग्रह करावा. त्याच्याकडून काम करवावें किंवा त्याला कारागारांत ठेवावें. कारण, कात्यायनानें तसें सांगितलें आहे. ब्राह्मणापाशीं द्रव्यादि नसल्यास कर्म, वियोग इत्यादिकांची योजना करावी. वधावाचून सर्वस्व हरण, पुरांतून बाहेर घालविणें, अंगावर डाग देऊन चिह्न करणें, इत्यादि उत्तम साहसदंड ब्राह्मणांनाही द्यावा असें नारदाचें म्हणणें आहे. मुंडन, गाढवावर बसून धिंड काढणें, ललाटावर चिह्न करणें इत्यादि दुसरे दंडही ब्राह्मणाकरितां सांगितले आहेत. चिह्नाविषयीं व्यवस्थाही दाखविली आहे. गुरुतल्पगमनप्रसंगीं ललाटावर भगचिह्न करावें. सुरापान केल्यास मद्यध्वज करावा. चोरी केल्यास कुत्र्याच्या पायाचें चिह्न करावें. ब्रह्महत्या घडल्यास मस्तकरहित पुरुषाचें चिह्न मस्तकावर करावें.

ब्राह्मणाच्या नेत्रांचा निरोध करावा असें जें अपस्तंबाचें वचन आहे, त्याचा अर्थ ब्राह्मणाला नगरांतून घालवून देतांना वस्त्रादिकांच्या योगानें त्याचे नेत्र बांधावे असा आहे. त्याचे ' डोळे उपटून काढावे. ' असा नव्हे. कारण तसा अर्थ केल्यास ' अक्षतो ब्राह्मणो व्रजेत् ' व ' न शारीरो ब्राह्मणे दंडः ' इत्यादि मनु व गौतम यांच्या वचनाशीं विरोध येतो २६.

स्वत्वामध्यें कांहीं अंतर न पडतां सतत भोग घेणें, हें स्वत्वाविषयीं प्रमाण आहे, असें सांगितलें. पण नुस्ता भोग स्वत्वावाचूनही होऊं शकतो. यास्तव कोणत्या प्रकारचा भोग स्वत्वाचें प्रमाण होऊं शकतो तें सांगतात—

## आगमोऽभ्यधिको भोगाद्विना पूर्वक्रमागतात् ।

प्रतिग्रह, क्रय इत्यादि आगमप्राप्ति हा स्वत्वाचा हेतु आहे. तो भोगाहूनही अधिक प्रबळ आहे. कारण स्वत्वाचें ज्ञान करून देण्यास भोगाला आगमाची अपेक्षा असते. ज्याचा आगम फारसा शुद्ध नाहीं असा भोग प्रमाण होऊं शकत नाहीं. नुस्त्या भोगावरून स्वत्वाचा निश्चय होत नाहीं. कारण तसें होऊं लागल्यास प्रबल पुरुष दुर्बलांच्या वस्तूंचा अपहार करून भोग घेऊं लागतील, म्हणूनच ' जो नुस्ता भोग हेंच आपल्या स्वत्वाचें कारण सांगत असून आगम मुळींच सांगत नाहीं तो भोगाच्या मिषानें चोरी करणारा चोर आहे, असें समजावें ' असें स्मृतिवचन आहे. यास्तव सागम, दीर्घकाल, निरन्तर, निराक्रोश, व प्रत्यर्थीच्या समक्ष अशा या पांच विशेषणांनीं युक्त असलेला जो भोग तोच प्रमाण होय. कारण तसें स्मृतींत सांगितलें आहे.

कांहीं प्रसंगीं आगमनिरपेक्ष भोगालाही प्रामाण्य आहे, असें श्लोकाच्या ' विना पूर्वक्रमागतात् ' या दुसऱ्या चरणानें सांगतात. पूर्व म्हणजे पिता, पितामह व प्रपितामह. या तिघांचा जो क्रम तो पूर्वक्रम. अशा पूर्व क्रमानें आलेला जो भोग त्यावांचून ( त्याला

मात्र सोडून ) बाकीच्या सर्व भोगांहून आगम अधिक आहे. पूर्वक्रमागत भोग मात्र आगमाहून बलाढ्य आहे. अर्थात् तो आगमाची अपेक्षा न धरितांच प्रमाण होतो. पण त्यांतही आगमाच्या ज्ञानाची अपेक्षा नसते; त्या ( आगमा )च्या सत्तेचीही अपेक्षा नसते, असें नव्हे. कारण आगमाचें अस्तित्व तर पूर्वक्रमप्राप्त भोगावरूनच सिद्ध होत असतें, असें जाणावें.

या श्लोकाचा हा दुसरा चरण स्मार्तकाल दाखविण्यासाठीं असून पहिला चरण स्मार्तकालविषय आहे. यास्तव स्मरणयोग्यसमयीं योग्याची उपलब्धी न झाल्यास आगमाचा अभावच आहे, असा निश्चय होण्याचा संभव असल्यामुळें आगमज्ञानसापेक्ष भोगालाच प्रामाण्य आहे. पण अस्मार्त कालीं म्हणजे स्मरणास योग्य नसलेल्या कालीं योग्य उपलब्धीचा अभाव असल्यामुळें आगमाचाही अभाव आहे, असा निश्चय संभवत नाहीं. यास्तव तसल्यावेळीं आगमज्ञाननिरपेक्ष सतत भोगाला प्रामाण्य असतें. कात्यायनानें ' स्मार्तकाले क्रिया भूमेः० ' या वचनांत हेंच सांगितलें आहे. पुरुषाचें आयुः— प्रमाण शंभर वर्षे असतें. यास्तव स्मार्तकाल शंभर वर्षांपर्यंत मानलेला आहे. यास्तव शंभराहून अधिक वर्षांपासून, एकसारखा कोणाच्या निषेधावांचून प्रत्यर्थीच्या समक्ष घेतलेला भोग भोक्त्याचें स्वत्व सुचवितो. म्हणजे आगमाचा अभाव जरी निश्चित असला तरी अव्यभिचरित भोग आगमाची सिद्धि करतो. पण अस्मार्तकालींही अनागमाची ( आगमरहित भोगाची ) स्मृतिपरंपरा असल्यास ( म्हणजे अमुक एक घराणें अमक्या भूमीवर वारसा नसतांना शंभर वर्षांहून अधिक वर्षे तिचा एकसारखा बलात्कारानें भोग घेत आहे, असें जाणणाऱ्या लोकांची पुत्र, पौत्र इत्यादि रूपानें परंपरा असल्यास ) तो भोग प्रमाण होऊं शकत नाहीं. एवढ्यासाठींच गौतमानें ' अनागमं तु यो भुङ्क्ते बहून्यब्दशतान्यपि । चौरदण्डेन तं पापं दण्डयेत्पृथिवीपतिः ॥ ' असें म्हटलें आहे ' जो आगमरहित वस्तूंचा पुष्कळ वर्षेंही भोग घेतो त्या पाप्याला राजानें चोरदंडानें दंडावें ' असा त्याचा भावार्थ आहे. पण या मूळवचनांत ' अनागमं ' असा एकवचनी प्रयोग केलेला असून ' बहून्यब्दशतान्यपि ' येथें ' अपि ' शब्दही योजलेला असल्यामुळें प्रथम पुरुषाला, तो आगमरहित उपभोग दीर्घकाल घेत असला तरी दंड करावा, असें समजूं नये. कारण तसें म्हटल्यास दुसरा व तिसरा पुरुष घेत असलेला निरागम उपभोग प्रमाण होईल. पण तसें होणें मुळींच इष्ट नाहीं. कारण नारदानें ' प्रथम दान हें स्वत्वाचें कारण असून मध्यें आगमयुक्त भोग हें आहे ' असें सांगितलें आहे. तस्मात् सर्व निरागम भोगांत वरील गौतमवचनाचा उपयोग करावा.

आतां—पित्यानें तीन पूर्वजांसह अन्यायानेंही ज्याचा उपभोग घेतला असेल तें त्रिपुरुष क्रमानें चवथ्या वंशजास प्राप्त झालेलें धनादि मालकाला त्याच्यापासून परत घेतां येत नाहीं.— असें जें म्हटलें आहे त्यांतही त्रिपुरुषक्रमानें या शब्दाचा अर्थ–अस्मार्त काल ( स्मरणास योग्य नसलेला काल ) असा समजावा. नाहींतर एक वर्षांतही क्रमानें तीन पुरुष उपभोग घेऊं शकतील, व दुसऱ्या वर्षी निरागम भोग प्रमाण होऊं लागेल. त्यामुळें

वरील कात्यायनाच्या वचनाशींही विरोध येईल. यास्तव, ' अन्यायानेंही ज्याचा भोग घेतला असेल ' या वचनांतील ही-शब्दावरून अन्यायानेंही उपभोगिलेलेंही जरः परत घेतां येत नाहीं तर अन्यायाचा निश्चय होत नसल्यास तें परत कसें घेतां येईल असा अर्थ काढावा. हारिताच्या अशाच अर्थाच्या वचनांत ' विनागममत्यन्तं ' असें म्हटलें आहे. त्याचें अत्यंत उपलब्ध होणाऱ्या आगमावांचून असें व्याख्यान करावें. ' आगमस्वरूपावांचून ' असें करूं नये. कारण, आगमाच्या स्वरूपाचाही अभाव असल्यास शतशः उपभोगानेंही स्वत्व येत नाहीं, हें वर सांगितलेंच आहे.

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, स्मरणयोग्यकालीं आगमसापेक्ष भोग प्रमाण आहे, असें म्हणणें युक्त नव्हे. कारण, आगम जर दुसऱ्या प्रमाणानें ज्ञात झाला तर त्याच्यावरूनच स्वत्वाचें ज्ञान होत असल्यामुळें भोग स्वत्वाचें किंवा आगमाचें प्रमाण होऊं शकत नाहीं. बरें आगम दुसऱ्या प्रमाणानें ज्ञात झाला नाहीं; तर आगमविशिष्ट भोग तरी प्रमाण कसा होणार ?

याचें समाधान सांगतो—दुसऱ्या प्रमाणानें ज्ञात झालेल्या आगमासहवर्तमानच निरंतर भोग कालांतरीं स्वत्व सिद्ध करितो. कारण, आगम जरी कळला तरी निरंतर भोग न घेतल्यास तो कालांतरीं स्वत्वसिद्धि करण्यास समर्थ होत नाहीं. कारण मध्यें दान, विक्रय इत्यादिकांच्या योगानेंही स्वत्वाची हानि अथवा आगम होण्याचा संभव असतो.

भोग आगमाची अपेक्षा ठेवूनच ( म्हणजे सागम भोगच ) प्रमाण होतो, असें सांगितलें. पण— तर मग आगम भोग निरपेक्षच प्रमाण होतो कीं काय—अशी कोणी शंका घेईल म्हणून सांगतात—

**आगमेऽपि बलं नैव भुक्तिः स्तोकापि यत्र नो ॥ २७ ॥**

ज्या आगमामध्यें थोडीशीसुद्धां भुक्ति नसते त्या आगमांतही संपूर्ण बल नसतें. या वाक्याचा गूढ अभिप्राय असा आहे.—आपल्या स्वत्वाची निवृत्ति व दुसऱ्याच्या स्वत्वाचें आपादन हें दान होय. पण परस्वत्वाचें आपादन ( संपादन ) त्या ( परा ) नें याचा अंगीकार केल्यासच होणार; त्यावाचून नाहीं, हें उघड आहे. स्वीकार मानसिक, वाचिक व कायिक असा तीन प्रकारचा आहे. त्यांतील हें माझें असा संकल्परूप हा मानस; हें माझें असा शब्दोच्चारपूर्वक सविकल्प प्रत्यय हा वाचिक व घेणें, स्पर्श करणें इत्यादिरूप कायिक. कायिक स्वीकार अनेक प्रकारचा आहे. त्याविषयीं स्मृतिशास्त्रांत नियमही सांगितलेला आहे; तो असा-कृष्णाजिन व गाय यांचें पुच्छ धरून, हत्तीची सोंड धरून, घोड्याचे मानेवरील केंस धरून, व दासीच्या मस्तकावर हात ठेऊन दान व स्वीकार करावा. त्यापैकीं सुवर्ण, वस्त्र इत्यादिकांचें उदकदानानंतरच ग्रहणादि करितां येतें. यास्तव, त्यांचा तिन्ही प्रकारचा स्वीकार लागलाच होतो. पण क्षेत्रादिकांचा फलोपभोगावाचून कायिक स्वीकार संभवत नाहीं यास्तव, थोडासा तरी उपभोग झाला पाहिजे. त्यावांचून दान, क्रय इत्यादिकांची संपूर्णता होत नाहीं. तस्मात्, फलभोगरूप कायिक स्वीकारानें रहित असलेला आगम दुर्बल

होतो. पण हें त्या दोघांच्या पूर्वापर कालाचें परिज्ञान नसल्यास जाणावें. कारण पूर्वापर-कालाचें ज्ञान असल्यास विगुण असलेलाही पूर्वकालागमच बलवान् होय.

अथवा लिखित, साक्षी व भोग हीं तिन्हीं प्रमाणें एकत्र जमलीं असतां त्यांतील कोणत्या प्रमाणाचें कोठें प्राबल्य असतें, अशी शंका आली असतां तिचें निराकरण करण्या-साठीं हा श्लोक प्रवृत्त झाला आहे. त्याचा अर्थ असा—आद्य पुरुषाच्या वेळीं साक्षींनीं ( अनुकूल साक्षी देऊन ) सिद्ध केलेला आगम भोगाहूनही अधिक बलवान् आहे; पण तोही पूर्वक्रमागत भोगावाचून. पूर्वक्रमागत भोग तर चवथ्या पुरुषाच्या वेळीं लिखितानें शाबित केलेल्या आगमाहून बलवान् आहे; पण मधल्या पुरुषाच्या वेळीं भोगरहित आगमाहून अल्प-भोगयुक्तही आगम बलवान् आहे. नारदानेंही ' आदौ तु कारणं दानं, इत्यादि वचनांत हेंच स्पष्ट केलें आहे. या वचनाचा अर्थ—पहिल्या पुरुषाच्या स्वत्वाचें कारण दान, मध्यम पुरुषाच्या स्वत्वाचें कारण सागम भोग व पुढच्या पुरुषाच्या स्वत्वाचें कारण एक संतत दीर्घकाल भोगच होय २७.

दुसरा आपल्या वस्तूचा भोग घेत आहे, असें पाहूनही त्याचा निषेध न केल्यास भूमीचें वीस वर्षांच्या उपभोगानंतर व धनाचें दहा वर्षांच्या उपभोगानंतर धन्याला फळ मिळत नाहीं, असें वर सांगितलें. पण आगमावाचून उपभोग घेणाराला जसें भुक्त फलें द्यावें लागत नाहीं. तसाच दंडही द्यावा लागत नाहीं कीं काय ? अशी शंका आली असतां पुरुषव्यवस्था व प्रामाण्यव्यवस्था यांच्या अनुरोधानें दंडव्यवस्था दाखविण्यासाठीं म्हणतात—

**आगमस्तु कृतो येन सोऽभियुक्तस्तमुद्धरेत् ।**
**न तत्सुतस्तत्सुतो वा भुक्तिस्तत्र गरीयसी ॥ २८ ॥**

ज्या पुरुषानें भूमि इत्यादिकांच्या आगम (स्वीकार) केला असेल त्याला ' या क्षेत्रा-दिकांचा तूं स्वामी कसा झालास ?' असा प्रश्न केला असतां त्यानें प्रतिग्रहादि ज्या निमित्ता-पासून त्याचा आगम झाला असेल त्याची लिखितादि योग्य प्रणाणाच्या योगानें सिद्धि करावी. या सांगण्यावरून आगमाचें प्रमाण न दाखविणाऱ्या पहिल्या पुरुषाला दंड करावा, हें उघड होतें. त्याच्या पुत्रानें म्हणजे दुसऱ्या पुरुषानें त्याला वरील प्रश्न केला असतां, आगमच दाखविला पाहिजे असा कांहीं नियम नाहीं. पण कोणत्याही प्रकारच्या आक्रो-शावांचून ( मालकाच्या प्रतिषेधावाचून ) अविच्छिन्न भोग दाखविला पाहिजे. यावरून आगम न दाखविणाऱ्या पुरुषाला दंड होत नाहीं; पण अविच्छिन्न भोग न दाखविणाऱ्याला त्याला दंड होतो, असें प्रतिपादिलें. त्याचा पुत्र म्हणजे तिसरा पुरुष, त्याला आगम किंवा वरील विशिष्ट भोग दाखविण्याची ( प्रत्ययास आणून देण्याची ) गरज नव्हीं. तर त्यानें क्रमागत भोग प्रत्ययास आणून दिला म्हणजे झालें. यावरून तिसरा पुरुष क्रमप्राप्त भोग दाखविण्यास असमर्थ झाल्यासच दंडाला पात्र होतो, असें ठरतें. या तीन पुरुषांतील दुसऱ्या व तिसऱ्याची भुक्तिच श्रेष्ठ आहे. त्यांतल्यात्यांत दुसऱ्याचा भोग श्रेष्ठ व तिसऱ्याचा

तर त्याहूनहीं अधिक श्रेष्ठ होय. आगम न दाखविल्यास तिघांचीही अर्थहानि एकसारखीच होते पण दंडामध्यें विशेष ( फरक ) असतो. हारीतानेंहीं असेंच सांगितलें आहे २८.

स्मरणास योग्य नसलेल्या काळीं होणारा पूर्वक्रमागत भोग आगमज्ञानाची अपेक्षा न करितांच प्रमाण होतो, म्हणून वर सांगितलें होतें. त्याचा आतां अपवाद सांगतात--

**योऽभियुक्तः परेतः स्यात्तस्य रिक्थी तमुद्धरेत् ।**
**न तत्र कारणं भुक्तिरागमेन विनाकृता ॥ २९ ॥**

दुसऱ्याचें क्षेत्रादि हरण करणाऱ्यावर अभियोग केलेला असून त्या व्यवहाराचा निर्णय करण्यापूर्वींच तो परलोकवासी झाल्यास त्याच्या रिक्थी ( पुत्रादि वारसा ) नें आगम दाखवावा. कारण असल्या व्यवहारांत आगमरहित भोग साक्षी इत्यादिकांच्या योगानें सिद्ध केला तरी प्रमाण होत नाहीं. कारण त्याकरितां पूर्वींच केलेल्या अभियोगानें तो भोग अपवादयुक्त झालेला असतो. नारदानेंही असेंच सांगितलें आहे २९.

एकाद्या व्यवहाराचा निर्णय होण्यापूर्वींच व्यवहार करणारा ( अर्थात् येथें प्रतिवादी) मरण पावल्यास व्यवहार निवृत्त होत नाहीं, असें सिद्ध झालें. आतां व्यवहाराचा निर्णय झाला किंवा व्यवहार करणारा जिवंत असला तरी व्यवहार एखादेवेळीं पुनः प्रवृत्त होतो व एखादेवेळीं प्रवृत्त होत नाहीं; अशी व्यवस्था ठरविण्याकरितां व्यवहार पाहणारांचें बलाबल सांगतात---

**नृपेणाधिकृताः पूगाः श्रेणयोऽथ कुलानि च ।**
**पूर्वं पूर्वं गुरु ज्ञेयं व्यवहारविधौ नृणाम् ॥ ३० ॥**

' राज्ञा सभासदः कार्याः० ' ( अध्याय २ श्लोक २ या वचनांत सांगितल्याप्रमाणें राजानें व्यवहार पहावयास नेमलेले अधिकारी, पूग, ( म्हणजे भिन्न जातीच्या भिन्न वृत्ति ( व्यवहार, निर्वाहसाधन ) करणाऱ्या पण एकास्थानीं निवास करणाऱ्या लोकांचा समूह. जसें-ग्राम, नगरें इत्यादि ) श्रेणी, ( नानाजातींच्या किंवा एकाच जातीच्याही एकाच प्रकारच्या कर्मावर निर्वाह करणाऱ्या लोकांचा संघ. जसें-तांबोळी, तेली, चांभार इत्यादि ) व कुलें (.ज्ञातिसंबंधी बंधूंचे समूह. ) या चार प्रकारच्या व्यवहार पहाणारांमध्यें पूर्व पूर्व व्यवहारदर्शी व्यवहारकर्त्यांच्या व्यवहाराचा निर्णय करण्यांत बलवान् होय. याचा अभिप्राय असा-राजानें नेमलेल्या न्यायाधिशादिकांनीं निर्णय केलेल्या व्यवहारांत पराभव पावलेल्या पुरुषाचा कुदृष्टिबुद्धीळें असंतोष जरी होत असला तरी तोच व्यवहार पुनः पूग, श्रेणी व कुलें यांच्या पुढें चालूं शकत नाहीं. ( त्यावर अपील होत नाहीं कारण राजाधिकृत सर्वांच्या आरंभीं आहेत. यास्तव व्यवहार निर्णयांत ते सर्वांहून· श्रेष्ठ होत. ) त्याचप्रमाणें पूगानें ज्याचा निर्णय केला आहे तो व्यवहार श्रेणी व कुल यांच्याकडे व श्रेणांनें निर्णय केलेला व्यवहार वरच्या तिघांकडे ( श्रेणी,पूग व राजाधिकारी यांजकडे, श्रेणीनें निर्णीत व्यवहार वरच्या दोघां

कडे व पूगानें निवडलेला न्याय राजाधिकाऱ्याकडे जाऊं शकतो ) नारदानें याच्याही पुढें ' राजाधिकाऱ्यांनीं निवडलेला व्यवहार राजाकडे जातो, असें म्हटलें आहे. पण अशा रीतीनें व्यवहार राजांपुढें गेला असतां राजानें श्रेष्ठ, सभ्य व पूर्वीचे सभ्य यांसह सपण ( पण करून ) व्यवहाराचा निर्णय करावयास आरंभ करावा. मग त्यांत राजाच्या अधिकाऱ्यांनीं अन्यायानें माझ्या व्यवहाराचा निर्णय केला, असें म्हणणाऱ्या वाद्याचा पराभव झाल्यास त्याला दंड करावा व त्याचा विजय झाल्यास अधिकारी सभ्यांना दंड करावा ३०.

कुलादि दुर्बल व्यवहार पाहणाऱ्यांनीं पाहिलेला व्यवहार पुनः सबल व्यवहारदर्शीपुढें चालू शकतो व. राजाधिकाऱ्यासारख्या प्रबलांनीं निवडलेला न्याय बदलत नाहीं. असें वर सांगितलें. आतां प्रबलांनीं ज्याचा निर्णय केला आहे, असाही एखादा न्याय बदलतो, असें सांगतात—

**बलोपाधिविनिर्वृत्तान् व्यवहारान्निवर्तयेत् ।**
**स्त्रीनक्तमन्तरागारबहिःशत्रुकृतांस्तथा ॥ ३१ ॥**

बलात्कार, भयादि उपाधि इत्यादिकांच्या योगानें ज्यांचा निर्णय विपरीत झाला आहे अशा व्यवहारास बदलावें. त्याचप्रमाणें स्त्रियांनीं केलेल्या, रात्रीं पुरुषांनींही केलेल्या, घरामध्यें बसून केलेल्या किंवा गावाबाहेर शत्रूंनीं केलेल्या व्यवहारास निवृत्त करावें ३१.

त्याचप्रमाणें—

**मत्तोन्मत्तार्तव्यसनिबालभीतादयो जिताः ।**
**असंबन्धकृतश्चैव व्यवहारो न सिध्यति ॥ ३२ ॥**

मद आणणाऱ्या मद्यादि द्रव्यानें मत्त झालेला, वात, पित्त, कफ, संनिपात व ग्रह या पांचजणांतील एकाद्याच्या उपसर्गानें युक्त असलेला ( उन्मत्त ), व्याधीनें आर्त, इष्ट वस्तु किंवा मनुष्य यांचा वियोग अथवा अनिष्टाची प्राप्ति यामुळें होणाऱ्या दुःखानें युक्त ( व्यसनी ), व्यवहारास योग्य नसलेला बालक, शत्रूपासून भ्यालेला इत्यादिकांनीं केलेला व्यवहार सिद्ध होत नाहीं. ' भीतादि ' येथील आदि—शब्दानें पुर व राष्ट्र यांच्या विरुद्ध असलेला व राजानें ज्याला सोडलें आहे, अशा व्यवहारांचें ग्रहण करावें. त्याचप्रमाणें ज्याला कोणी नेमलेलें नाहीं अथवा ज्याचा कांहीं संबंध नाहीं अशा पुरुषानें केलेला व्यवहारही सिद्ध होत नाहीं.

' गुरु–शिष्य, पिता–पुत्र, भार्या–पति, स्वामि–भृत्य, ( धनी व चाकर ) यांचा परस्पर विरोध असला तरी व्यवहार सिद्ध होत नाहीं, असें जें स्मृति वचन आहे तें गुरुशिष्य इत्यादिकांचा व्यवहार कधींच होऊं शकत नाहीं, हें सांगण्याकरितां प्रवृत्त झालेलें नाहीं. कारण त्यांचाही केव्हां केव्हां व्यवहार होतो. जसें—शिष्याला ताडन करावयाचें झाल्यास

गुरूनें बारीक दोरी, वळूची कामठी यांनीं पाठीवर ताडन करावें, डोक्यावर मुळींच ताडन करूं नये, असें गौतम, मनु इत्यादिकांनीं सांगितलेलें आहे. पण अतिशय कोप आल्यामुळें गुरूनें मोठ्या काठीनें शिष्याच्या डोक्यावर प्रहार केल्यास व शिष्यानें तो त्याचा स्मृतिविरुद्ध आचार राजाला निवेदन केल्यास तें व्यवहारपद होतेंच. त्याचप्रमाणें—पितामहानें मिळविलेल्या भूमि, गृह इत्यादिकांवर पिता व पुत्र यांचें एकसारखेंच स्वत्व ( स्वामित्व ) असल्यामुळें पिता पितामहानें मिळविलेलें स्थावर धन विकून नासूं लागल्यास व पुत्रानें तो व्यवहार न्यायाधीशापुढें नेल्यास पिता—पुत्रांचाही व्यवहार होतो. दुर्भिक्ष ( म्ह० दुष्काळ ) इत्यादि संकटावांचून दुसऱ्या कोणत्याही कामांत पति स्त्रीचें धन खर्च करून पुढें ती मागूं लागली असतां जवळ द्रव्य असूनही जर तो तें देईनासा झाला तर पतिपत्नीचाही व्यवहार होतो. केवळ भक्तदासाचाच नव्हे तर गर्भदासाचाही स्वामीशीं व्यवहार होतो, हें पुढें याच ग्रंथांत सांगतील. नारदानेंही गर्भदासांविषयीं असें म्हटलें आहे—गर्भदासांतील जो कोणी आपल्या स्वामीला प्राणसंकटांतून सोडवितो तो दास्यातून मुक्त होतो व त्याला पुत्राचा भाग मिळतो. पण पुढें स्वामीनें त्याला दास्यांतून मुक्त न करितां पुत्राचा भागही न दिल्यास त्याच्याशीं होणाऱ्या व्यवहाराचें निवारण कोण करणार ? यास्तव वरील स्मृतिवचनाचें तात्पर्य असें समजावें—गुरु, पिता इत्यादिकांच्या विरुद्ध शिष्य, पुत्र, भार्या व भृत्य यांनीं न्यायासनापुढें निवेदन केलें असतां राजादिकांनीं गुरु, पिता, पति व स्वामी यांच्याविरुद्ध व्यवहार करणें शिष्यादिकांना इहलोकीं व परलोकींही श्रेयस्कर होत नाहीं, असा ( शिष्यादिकांस ) उपदेश करून त्यांचें निवारण करावें. पण त्यांचा जर फारच आग्रह दिसला तर व्यवहार चालवावा.

'एकाचा अनेकांशीं होणारा वाद, स्त्रियांचा व चाकरांचा वाद धर्मवेत्त्यांनीं विचाराकरितां घेऊं नये, असें जें नारदानें सांगितलें आहे तें सुद्धां एकाचें धन अनेकांनीं हरण करणें, एकाला अनेकांनीं मारणें इत्यादि प्रसंगीं लागू पडत नाहीं. यास्तव, एकाशीं अनेकांचा भिन्न भिन्न अर्थांविषयीं एकाच वेळीं होणारा वाद या वचनानें निषिद्ध मानलेला आहे, असें समजावें. त्याचप्रमाणें गोप ( धनगर ), कलाल इत्यादिकांच्या स्त्रिया स्वतंत्र असल्यामुळें त्यांचा पतीशीं होणारा वाद अवश्य ग्रहण करावा. पण कुलस्त्रिया पतीच्या जीवित-दशेंत सदा तत्परायण व त्यामुळेंच त्याच्या अधीन असल्यामुळें त्यांचा व्यवहार अग्राह्य आहे असेंच त्या वचनाचें व्याख्यान करावें. प्रेष्यजन ( चाकर ) हीं स्वामीच्या अधीन असल्यामुळें त्यांचा स्वार्थ व्यवहारही स्वामीच्या अनुज्ञेनेंच होतो. त्यावांचून होत नाहीं, अशी योजना करावी ३२.

बदलण्यास योग्य असलेला व्यवहार कोणता, तें सांगून आतां बदलण्यास योग्य असलेलें द्रव्य सांगतात—

प्रनष्टाधिगतं देयं नृपेण धनिने धनम् ।
विभावयेन्न चेल्लिङ्गैस्तत्समं दण्डमर्हति ॥ ३३ ॥

कोणाचें हरवलेलें सुवर्णादि धन शौल्किक ( नाकेदार, कर घेणारे ), स्थानपाल ( पोलिस ) इत्यादिकांस सांपडून तें त्यांनीं राजाला आणून दिलें असतां राजानें त्याच्या धन्याला त्या वस्तूचें रूप, संख्या इत्यादि विचारावें. व तें त्यानें बरोबर सांगून तें त्याचेंच आहे, अशी खात्री केल्यास राजानें त्यास द्यावें. पण त्याचें स्वरूपादि चिन्ह सांगून तो ( धनी ) राजाची खात्री करण्यास असमर्थ झाल्यास राजानें त्याला त्या धनाइतका दंड करावा.कारण त्यामुळें तो असत्यवादी ठरत असतो. एकादी वस्तू मिळणें, हें स्वत्याचें निमित्त आहे. यास्तव तें स्वत्व प्राप्त झालें असतां त्याची निवृत्ति या वचनानें सांगितली. धन्यानें एका वर्षाच्या आंत सांडलेल्या वस्तूच्या स्वामित्वाविषयीं पूर्वोक्त चिह्नादिकांच्या योगानें खात्री पटविल्यास राजानें ती वस्तू त्यास परत द्यावी व एका वर्षानंतर ती त्यानें आपल्या भांडारांत घ्यावी—असा याविषयीं कालाचा अवधीही पुढें सांगितलेला आहे; पण मनूनें तीन वर्षांची अवधि सांगितली आहे. यास्तव, या दोन्ही वचनांची व्यवस्था अशी करावी. कोणाचीही सांडलेली वस्तु भृत्यांनीं आणून दिल्यास राजानें तीन वर्षेपर्यंत तिचें रक्षण अवश्य करावें. पहिलें वर्ष संपण्यापूर्वी तिचा धनी आल्यास राजानें त्याला ती सर्व द्यावी. पण वर्षानंतर जर तो येऊन मागूं लागला तर त्यांतील कांहीं भाग रक्षणमूल्य म्हणून घेऊन बाकीचा भाग स्वामीस द्यावा. त्याची व्यवस्था अशी—पहिल्या वर्षी कांहीं घेऊं नये. दुसऱ्या वर्षी त्या वस्तूचा बारावा भाग रक्षणमूल्यरूपानें घ्यावा. तिसऱ्या वर्षी दहावा भाग घ्यावा. चवथ्या वर्षी व त्यापुढें केव्हांही सहावा भाग घेऊन सांडलेली वस्तु धन्याला परत द्यावी. याप्रमाणें राजाला प्राप्त होणाऱ्या द्रव्याचा चवथा भाग त्यानें ती वस्तु आणणाऱ्या भृत्यास द्यावा. पण तीन वर्षे होऊन गेल्यावरही स्वामी न आल्यास सर्व धनाचा चवथा भाग तें आणणाऱ्या भृत्यास देऊन राजानें बाकीचें तें सर्व घ्यावें. तीन वर्षांच्या पुढेंही स्वामी न आल्यास राजानें तें सांपडलेलें धन खर्च करून टाकलें तरी चालेल; पण त्यानंतर स्वामी येऊन तें मागूं लागल्यास आपला भाग काढून घेऊन बाकीचें धन ( त्याची किंमत ) राजानें स्वामीला परत द्यावें. हें सुवर्ण इत्यादिकांविषयीं झालें. गाय, घोडा इत्यादिकांविषयीं पुढें सांगतील ३३.

रथादिकांचा मार्ग, चौक्या, कर वसूल करण्याचे अड्डे इत्यादिकांमध्यें सांडलेलें सोनें वगैरे मिळाल्यास काय करावें तें सांगून आतां भूमीमध्यें फार दिवसांपासून पुरून ठेवलेल्या सुवर्णाची (निधींची), प्राप्ति झाल्यास काय करावें तें सांगतात—

राजा लब्ध्वा निधिं दद्याद्द्विजेभ्योऽर्द्धं द्विजःपुनः ।
विद्वानशेषमादद्यात्स सर्वस्य प्रभुर्यतः ॥ ३४ ॥
इतरेण निधौ लब्धे राजा षष्ठांशमाहरेत् ।
अनिवेदितविज्ञातो दाप्यस्तं दण्डमेव च ॥ ३५ ॥

वर सांगितलेल्या प्रकारचा निधि राजास प्राप्त झाला असतां त्यानें त्यांतील अर्धा निधि

ब्राह्मणांस देऊन बाकीचा आपल्या कोशांत मिळवावा. श्रुत, अध्ययन व सदाचार यांनीं संपन्न असलेल्या ब्राह्मणास जर निधि मिळाला तर त्यानें तो सर्व घ्यावा, कारण असला ब्राह्मण सर्व जगाचा प्रभु आहे. पण राजा व विद्वान् ब्राह्मण यांस सोडून दुसऱ्या कोणालाही ( म्हणजे सामान्य क्षत्रियादि व अविद्वान् ब्राह्मण यांतील कोणास ) तो लाधल्यास राजानें ज्याला तो मिळाला असेल त्याला सहावा भाग द्यावा. बाकीचा आपल्या कोशांत मिळवावा. कारण असें करण्यास वसिष्ठ व गौतम यांची संमति आहे; पण एकाद्याला निधि सांपडला असून तो राजाला न कळवितां त्यानें आपल्यापाशींच ठेवल्यास व पुढें तें त्याचें कृत्य राजाला कळल्यास त्यानें त्याला त्याच्या शक्तीप्रमाणें दंड करून सर्व निधि परत घ्यावा. पण निधी-चाही स्वामी ' हा माझा आहे ' असें म्हणून पुढें येऊन त्यांतील धनाची संख्या, प्रकार इत्यादिकांच्या योगानें आपलें स्वत्व सिद्ध करूं शकल्यास राजानें तो त्याला द्यावा व त्याचा सहावा किंवा बारावा अंश स्वतः घ्यावा. ब्राह्मणादि वर्ण, काल इत्यादिकांच्या अपेक्षेनें पूर्वोक्त अंशांतील कोणता अंश घ्यावा, तें ठरवावें ३४,३५.

आतां चोरानें हरण केलेल्या द्रव्याविषयीं सांगतात—

**देयं चौरहृतं द्रव्यं राज्ञा जानपदाय तु ।**
**अददद्धि समाप्नोति किल्बिषं यस्य तस्य तत् ॥ ३६ ॥**

चोरांनीं चोरी करून नेलेलें द्रव्य राजानें त्यांस जिंकून आपल्या देशांत राहणाऱ्या ज्याचें तें ( द्रव्य ) असेल त्यास परत द्यावें. कारण असें न करणारा ( म्ह. न देणारा ) राजा ज्याचें धन चोरांनीं चोरलें होतें त्याच्या व चोराच्या पापाचा धनी ( भागी ) होतो. ( म्हणजे त्या दोघांचेंही पाप राजाला लागतें. ) मनूनें ' त्या द्रव्याचा स्वतः उपभोग घेणाऱ्या राजाला ' चोराचें पाप लागतें ' असें म्हटलें आहे. यास्तव या दोन्ही वचनांची व्यवस्था अशी-राजा चोराकडून चोरलेलें धन परत घेऊन जर स्वतः त्याचा उपभोग घेऊं लागला तर त्याला चोराचें पाप लागतें व चोरानें चोरलेल्या धनाची जर तो उपेक्षा करूं लागला तर त्याच्या देशांतील त्या धन्याचें पाप त्याला लागतें. पण तें चोरलेलें धन चोराचा निग्रह करून परत आणावें, म्हणून राजा पुष्कळ यत्न करीत असूनही जर तें परत आणूं शकला नाहीं तर त्यानें धन्याला तितकें धन आपल्या कोशांतून द्यावें. कारण कृष्णद्वैपायनानें तसें सांगितलें आहे ३६.

इति असाधारणव्यवहारमातृकाप्रकरणं समाप्तम् २.

---

# अथ ऋणादानप्रकरणम् ३



साधारण व असाधारण व्यवहार मातृका सांगून आतां अठरा व्यवहारस्थानांपैकीं पहिलें ऋणादानपद दाखवितात. या श्लोकापासून ६४ व्या श्लोकाच्या अंतापर्यंत हें प्रकरण

चालेल. ऋणादान ( कर्ज काढणें ) सात प्रकारचें आहे. १ अशाप्रकारचें ऋण द्यावें, २ अशा-प्रकारचें देऊं नये, ३ असल्या अधिकाऱ्यानें द्यावें, ४ असल्यावेळीं द्यावें, ५ व असल्या प्रकारानें द्यावें असे ऋणकोसंबंधीं पांच प्रकार व धनकोसंबंधीं ६ दानविधि व ७ अदानविधि असे दोन प्रकार. ( मिळून ७. ) नारदानें हे सर्व प्रकार स्पष्ट सांगितले आहेत. त्यांतील उत्तमर्णाच्या ( धनकोच्या ) दानविधीपासूनच पुढचे सर्व प्रकार होत असल्यामुळें प्रथम तोच ( दानविधीच ) सांगतात—

**अशीतिभागो वृद्धिः स्यान्मासि मासि सबन्धके ।**
**वर्णक्रमाच्छताद्द्वित्रिचतुःपञ्चकमन्यथा ॥ ३७ ॥**

बंधक म्हणजे विश्वासाकरितां जें कांहीं ठेवलें जातें, ज्याला शास्त्रांत आधि व प्राकृतांत गहाण म्हणतात. त्यावर जें धन व्याजीं लावलें जातें त्यावर त्याचा ऐशींवा भाग व्याज प्रतिमासीं घेणें न्याय्य ( धर्म्य ) आहे. पण गहाणावांचून ( बंधकरहित ) धन व्याजीं द्यावयाचें असतें तेव्हां ब्राह्मणादिकांच्या क्रमानें दरशेंकडा दोन, तीन, चार व पांच हा व्याजाचा दर न्याय्य आहे. या वृद्धीचे ( व्याजाचे ) चक्रादि चार प्रकार आहेत. व्याजाच्या व्याजाला चक्रवृद्धि, दरमहा—व्याजाला कालिकावृद्धि, इच्छाकृत वृद्धीला कारितावृद्धि व शरीरकर्माच्या रूपानें दिलेली कायिकावृद्धि होय. या चारी प्रकारच्या वृद्धीचें वर्णन नारदानें केलें आहे ३७.

विशेष प्रकारच्या ऋणकोला उद्देशून व्याजाचे आणखी दोन प्रकार सांगतात—

**कान्तारगास्तु दशकं सामुद्रा विंशकं शतम् ।**

अरण्यांतून फिरणारे जे कोणी व्याजावर कर्ज काढून अधिक लाभाकरितां अति गहन प्राण-( धन-विनाशक व भयंकर ) स्थानीं प्रवेश करितात त्यांनीं शेकडा दहा व्याज दरमहा द्यावें. व समुद्रगामी-लोकांनीं दरमहा दरशेकडा वीस व्याज द्यावें. कारण सदा मृत्यूच्या मुखांतून वावरणाऱ्या त्यांना दिलेलें मूल धनच नष्ट होण्याचा बरेच वेळां संभव असतो. म्हणून उत्तमर्णानें ( धनकोनें ) त्यांच्यापासून क्रमानें दहा व वीस टक्के व्याज दरमहा दरशेकडा घ्यावें.

आतां कारिता वृद्धि सांगतात—

**दद्युर्वा स्वकृतां वृद्धिं सर्वे सर्वासु जातिषु ॥ ३८ ॥**

अथवा ब्राह्मणादि सर्व वर्णांच्या लोकांनीं ( ऋणकोंनीं ) स्वतः मान्य केलेली ( स्वेच्छेनें ) वृद्धि सर्व जातींमध्यें द्यावी. कांहीं प्रसंगीं अकृत ( पूर्वी न ठरलेली ) वृद्धिहि होते. कारण नारदानें ' प्रीतीनें दिलेल्या धनाची वृद्धि नसते, असें सांगितलें आहे. केव्हां केव्हां अनाकारिता ( तुझ्या इच्छेस येईल तें व्याज दे असें म्हणून न ठरलेली ) वृद्धिहि असते-

पण अनाकारित धन सहा महिन्यानंतर वृद्धि पावतें. एखाद्यापासून काहीं उसनें घेऊन तें परत न देतांच जो परदेशीं जातो त्यानें उसनें घेतलेलें धन एका वर्षानंतर व्याजास योग्य होतें. उसनें घेऊन व तें मालकानें मागितलें असतांहीं परत न देतां जो देशांतरास जातो त्याच्या त्या धनावर तीन महिन्यानंतर व्याज सुरू होतें. पण जो स्वदेशांत असतांनाच मालक मागूं लागला तरी त्याचें उसनें घेतलेलें धन देत नाहीं त्याच्याकडून राजानें मागितलेल्या दिवसापासून व्याज देववावें. विकत घेतलेल्या वस्तूंचें मूल्य, वेतन ( पगार ), ठेव, केलेला दंड, वृथा ( अविहित ) दान व जुगारीतले पण यांवरही अनाकारिता वृद्धि ( इच्छारहित व्याज ) सुरू होत नाहीं इत्यादि आणखीही नारदानें सांगितलें आहे ३८.

आतां विशेषप्रकारच्या द्रव्याची विशेषप्रकारची वृद्धि या श्लोकाच्या एका चरणानें सांगून बाकीच्या तीन चरणांनीं व्याजीं लावलेलें द्रव्य व्याज घेतल्यावाचूनच दीर्घकाल राहिल्यास कोणत्या द्रव्याची सर्वांत अधिक वृद्धि किती घ्यावी तें सांगतात—

**संततिस्तु पशुस्त्रीणां रसस्याष्टगुणा परा ।**
**वस्त्रधान्यहिरण्यानां चतुस्त्रिद्विगुणा परा ॥ ३९ ॥**

गाय, म्हैस इत्यादि पशूंच्या स्त्रियांची वृद्धि त्यांची संतति होय. त्यांचा धनी दारिद्र्यामुळें त्यांचें पोषण करण्यास असमर्थ झाल्यास तो आपलीं गुरें दुसऱ्यास पोसावयास देतो व दूध, गोपरिचर्या इत्यादिकांची कामना करणारा त्यांचें ग्रहणही करतो. अशा प्रसंगीं त्यांना जी संतति होईल तीच धन्याला मिळावयाची वृद्धि होय.

तेल, तूप इत्यादि रस कांहीं वृद्धि ठरवून नेले; पण पुढें वृद्धि घेतल्यावाचूनच ते पुष्कळ दिवस राहिले, तर त्यांची अधिकांत अधिक आठपट वृद्धि घ्यावी. त्याहून अधिक घेऊं नये त्याचप्रमाणें वस्त्र, धान्य व सोनें यांची क्रमानें चौपट, तिप्पट व दुप्पट ही सर्वांत अधिक वृद्धि होय. वसिष्ठानें रस व धान्य यांची तिप्पट, सोन्याची दुप्पट व तोललेली पुष्पें, मुळें व फळें यांची आठपट पराकाष्ठेची वृद्धि सांगितली आहे, मनूनें—धान्य, पुष्पें, मुळें, फळें, लोकर व चवरीचे केस, बैल, घोडा इत्यादि यांची वृद्धि पांचपटीहून अधिक होऊं नये, असें म्हटलें आहे. यास्तव ऋणकोच्या योग्यतेप्रमाणें व दुर्भिक्षादि कालांनुसार या तिघांच्या वावयाची व्यवस्था करावी; पण वृद्धीच्या पराकाष्ठेचा हा नियम एकाला एकदाच द्रव्य दिल्यास व एकदाच घेतल्यास समजावा. कारण पित्यानें कर्ज घेऊन तें कांहीं दिवसांनीं त्याच्या पुत्रानें आपल्या अंगावर घेतल्यास किंवा एकानें घेऊन कांहीं दिवसांनीं तें दुसऱ्यास दिल्यास वरील नियमापेक्षां अधिक व्याज होणारच. किंवा त्या एकाच पुरुषाला वारंवार धन दिल्यासही व्याज वाढणारच. हळु हळु दिवस, मास, वर्ष इत्यादि क्रमानें थोडथोडी वृद्धि घेत राहिलें तर अशा प्रसंगीही सुवर्णादिकांची दुपटीहून अधिक वृद्धि होणारच. याविषयीं गौतम व मनु यांची संमति आहे ३९.

ऋण देण्याचे प्रकार सांगितले. आतां व्याजी लावलेलें धन उत्तमर्णानें अधमर्णापासून वसूल कसें करावें तें सांगतात—

**प्रपन्नं साधयन्नर्थं न वाच्यो नृपतेर्भवेत् ।**
**साध्यमानो नृपं गच्छन् दण्ड्यो दाप्यश्च तद्धनम् ॥ ४० ॥**

अधमर्णानें अंगिकार केलेलें अथवा साक्षी पुराव्यानें त्याच्यावर शाबीत केलेलें धन उत्तमर्ण धर्मादि उपायांनीं परत घेऊं लागल्यास राजानें त्याचें निवारण करूं नये. धर्म ( प्रीतियुक्त सत्यवचन ), व्यवहार ( साक्षी, लेख्य इत्यादि उपाय ), छल ( उत्सवादि निमित्तानें ऋणकोपासून भूषणादि घेणें ), अचरित ( ऋणकोच्या दारांत उपाशीं बसणें ) व बल ( बांधून ठेवणें, मारणें इत्यादि ) या धर्मादि पांच उपायांनीं कर्ज दिलेलें धन परत घ्यावें. प्रसन्न ( ऋणकोनें मान्य केलेलें ) असें म्हणून त्यानें अमान्य केलेलें धन धनको वसूल करूं लागल्यास राजानें त्याचें निवारण करावें, असें सुचविलें आहे. कात्यायनानें ' जो धनी न्याय्य भाषण करणाऱ्या ऋणीला पीडा देईल त्याला त्याचें धन परत मिळणार नाहीं. उलट तो दंडास प्राप्त होईल ' असें सांगून हेंच स्पष्ट केलें आहे. धनी धर्मादि उपायांनीं ऋणकोला मान्य असलेल्या धनाची याचना करीत असतांनाही जो ऋणी राजाकडे जाऊन धनकोच्या विरुद्ध अभियोग करील त्याला त्याच्या शक्तीप्रमाणें राजानें दंड करावा व धनी ( सावकारा )ला त्याचें धन देववावें. त्याचे प्रकार असे सांगितले आहेत—ऋणी ब्राह्मण असल्यास त्याच्याकडून राजानें सांत्वनानेंच धन देववावें. बाकीच्या दुष्टांकडून देशाचाराप्रमाणें त्यांना पीडा देऊनच धन देववावें. ऋणको धनकोचा मित्र अथवा वारस असल्यास पूर्वोक्त छलानें धन वसूल करवावें. ' स्मृत्याचारव्यपेतेन० ' ( अ. २ श्लोक ५ ) याचें—' साध्यमानो नृपं गच्छेत्० ' हा—या श्लोकाचा उत्तरार्ध—हें प्रत्युदाहरण ( उलट उदाहरण ) आहे ४०.

अनेक धनको एकाचवेळीं एका ऋणकोच्या विरुद्ध अभियोग करूं लागल्यास राजानें त्याचें ऋण कोणत्या क्रमानें देववावें, तें सांगतात—

**गृहीतानुक्रमाद्दाप्यो धनिनामधमर्णिकः ।**
**दत्वा तु ब्राह्मणायैव नृपतेस्तदनन्तरम् ॥ ४१ ॥**

धनी समानजातीचे असल्यास ऋणकोनें ज्या क्रमानें ऋण घेतलें असेल त्याच क्रमानें ( म्हणजे ज्याचें प्रथम घेतलें असेल त्याला प्रथम, दुसऱ्यानें घेतलें असेल त्याला त्यानंतर इत्यादि क्रमानें )राजानें ऋणकोकडून फेड करवावी. पण धनको भिन्न भिन्न जातीचे असल्यास ब्राह्मणादि वर्ण क्रमानें ऋण परत करवावें ४१.

आतां उत्तमर्ण दुर्बल असल्यामुळें ऋणकोपासून त्यानें मान्य केलेलें धनही वसूल करण्यास असमर्थ झाल्यास राजानें त्याचें धन वसूल करून द्यावें; पण अशा प्रसंगीं राजानें अधमर्णापासून दंड व उत्तमर्णापासून वेतनदान किती घ्यावें तें सांगतात—

राज्ञाधमर्णिको दाप्यः साधितादशकं शतम् ।
पञ्चकं च शतं दाप्यः प्राप्तार्थो ह्युत्तमर्णिकः ॥ ४२ ॥

राजानें कर्ज कबूल केलेल्या ऋणकोपासून कर्ज देववून झाल्यावर, शेंकडा दहा या प्रमाणानें दंड घ्यावा व ज्याला धन परत मिळालें आहे, अशा उत्तमर्णापासून शेंकडा पांच या हिशोबानें वेतन घ्यावें. पण जो मुळीं कर्ज मान्यच करीत नसेल त्या ऋणकोवर त्याची शाबिती झाल्यास त्याला दंड किती करावा, तें निन्हवे भावितो दद्यात्० ' ( अ. २ श्लोक ११ ) या श्लोकांत सांगितलें आहे ४२.

सधन अधमर्णिकांविषयीं सांगितलें. आतां निर्धन अधमर्णिकांविषयीं सांगतात—

हीनजातिं परिक्षीणमृणार्थं कर्म कारयेत् ।
ब्राह्मणस्तु परिक्षीणः शनैर्दाप्यो यथोदयम् ॥ ४३ ॥

ब्राह्मणादि उत्तम वर्णाच्या उत्तमर्णानें क्षत्रियादि हीन जातीच्या दरिद्री अधमर्णाकडून आपल्या ऋणाच्या फेडीकरितां, त्याच्या कुटुंबाच्या उपजीविकेस विरोध ( हरकत ) येणार नाहीं अशा रीतीनें, त्याच्या जातीस शोभेल, असें आपलें काम करवावें. पण अधमर्ण निर्धन ब्राह्मण असल्यास त्यानें हळु हळु मिळेल तसें कर्ज फेडावें. येथें हीन जाति असा जरी शब्द असला तरी समानजातीच्या निर्धन ऋणकोकडूनहीं यथोचित कर्म करवावें. तसेंच येथें ब्राह्मण असें जरी ह्मटलें आहे तरी निर्धन क्षत्रियादि उत्तम वर्णाच्या ऋणकोपासून वैश्यादि न्यून वर्णाच्या धनकोनीं हळु हळु धन वसूल करावें. कारण मनूनें " कर्मणापि समं० " ( मनुस्मृति अ० ८ श्लोक १०६ ) यांत तसें स्पष्ट सांगितलें आहे ४३.

दीयमानं न गृह्णाति प्रयुक्तं यः स्वकं धनम् ।
मध्यस्थस्थापितं चेत्स्याद्वर्धते न ततः परम् ॥ ४४ ॥

वृद्धीकरितां व्याजीं लावलेलें धन अधमर्ण परत देऊं लागला असतांही उत्तमर्ण व्याजाच्या लोभानें तें जर परत घेत नसला तर अधमर्णानें तें एका मध्यस्थापाशीं ठेवावें. ह्मणजे त्या दिवसापासून त्यावर व्याज चढेनासें होतें. पण नुस्ते मध्यस्थापाशीं ठेवून धनी मागूं लागला असतां त्यानें त्याला तें लागलेंच परत न दिल्यास पूर्वीप्रमाणेंच व्याज अवश्य वाढूं लागतें ४४.

आतां अवश्य द्यावयाचें ऋण कोणीं व केव्हां द्यावें तें सांगतात–

अविभक्तैः कुटुंबार्थे यदृणं तु कृतं भवेत् ।
दद्युस्तद्रिक्थिनः प्रेते प्रोषिते वा कुटम्बिनि ॥ ४५ ॥

विभक्त न झालेल्या अनेक बंधुप्रभृतींनीं अथवा त्यांतील एकेकानें कुटुंबपोषणार्थ जें ऋण काढलें असेल तें कुटुंबाच्या नायकानें ( मुख्य कुटुंबीनें ) द्यावें. पण तो मेल्यास किंवा कोठें प्रवासास गेल्यास त्याच्या सर्व वारसांनीं तें फेडावें ४५.

आतां कोणीं द्यावें याचें प्रत्युदाहरण ( उलट उदाहरण ) सांगतात—

न योषित्पतिपुत्राभ्यां न पुत्रेण कृतं पिता ।
दद्यादृते कुटुंबार्थान्न पतिः स्त्रीकृतं तथा ॥ ४६ ॥

कुटुंबपोषणावांचून दुसऱ्या कोणत्याही कारणानें पतीनें केलेलें ऋण भार्येनें, पुत्रानें केलेलें ऋण मातेनें, पुत्रानें केलेलें ऋण पित्यानें व भार्येनें केलेलें ऋण पतीनें देऊं नये. पण कुटुंबपोषणार्थ यांतील कोणींही काढलेलें धन कुटुंबीनें व त्याच्या अभावीं त्याच्या अंशहरानीं ( वारसांनीं ) तें फेडावें ४६.

पुत्र व पौत्र यांनीं ऋण फेडावें असें पुढें ( श्लोक ५० उत्तरार्ध ) सांगतील, त्याचा पुरस्तात् ( पूर्वीचा ) अपवाद सांगतात—

सुराकामद्यूतकृतं दण्डशुल्कावशिष्टकम् ।
वृथादानं तथैवेह पुत्रो दद्यान्न पैतृकम् ॥ ४७ ॥

मद्यप्राशनाकरितां केलेलें, स्त्रीव्यसनामुळें केलेलें, द्यूतांत ( जुगारींत ) पराभव पावल्यामुळें झालेलें, दंड व शुल्क ( विकत घेतलेल्या वस्तूची किंमत ) यांचा कांहीं भाग देऊन कांहीं बाकी राहिलेलें व वृथा दान ( धूर्त, नट, भाट, मल्ल इत्यादिकांस देऊं केलेलें ) इतक्या प्रकारचें पित्यानें केलेलें ऋण पुत्रानें कलालादिकांस देऊं नये. दंड व शुल्क यांचा अवशिष्ट भाग देऊं नये असें जरी ह्मटलें आहे तरी त्यावरून सर्व दंड व सर्व किंमत राहिली असल्यास ती पुत्रानें अवश्य द्यावी, असें समजूं नये. कारण व्यावहारिक नसलेला दंडशेष व शुल्कशेष पुत्रानें देऊं नये असें औशनसानें व गौतमानेंही सांगितलें आहे ४७.

पतीनें स्त्रीकृत ऋण फेडूं नये, असें म्हटलें आहे. त्याचा अपवाद सांगतात—

गोपशौण्डिकशैलूषरजकव्याधयोषिताम् ।
ऋणं दद्यात्पतिस्तासां यस्माद्वृत्तिस्तदाश्रया ॥ ४८ ॥

गोपाल ( गवळी ), कलाल, नट, परीट व व्याध यांच्या स्त्रियांनीं जें ऋण केलें असेल तें त्यांच्या पतींनीं द्यावें. कारण त्यांची वृत्ति ( उपजीविका ) त्यांच्या अधीन असते. अर्थात् दुसऱ्याही ज्यांची ज्यांची वृत्ति स्त्रियांच्या आधीन असते त्यांनाही स्त्रियांनीं केलेलें ऋण फेडलें पाहिजे, असें ' यस्माद्वृत्तिस्तदाश्रया ' या हेतुवचनावरून ठरतें ४८.

पतिकृत कर्ज भार्येनें फेडूं नये, याचा अपवाद—

प्रतिपन्नं स्त्रिया देयं पत्या वा सह यत्कृतम् ।
स्वयं कृतं वा यदृणं नान्यत्स्त्री दातुमर्हति ॥ ४९ ॥

मरावयास टेकलेल्या अथवा प्रवासास निघालेल्या पतीनें जिला कुटुंबव्यवस्था करावयास सांगितलें आहे अशा भार्येनें ' मी देईन ' ह्मणून मान्य केलेलें पतिकृत ऋण द्यावें. तसेंच

भार्येनें पतीसहवर्तमानच जें ऋण केलें असेल तेंही भर्त्यांच्या अभावीं पुत्ररहित अशा तिनें ( भार्येनें ) द्यावें. स्वतः केलेलें कर्जही तिनें फेडावें, 'पण हें येथें सांगण्याचें कारणच काय ? येथें ( वर ) सांगितलेलें हें तिन्हीं प्रकारचें कर्ज तिनें द्यावें किंवा देऊं नये, अशाविषयीं मुळीं संदेहच उत्पन्न होत नाहीं,' असें कोणी विचारील तर सांगतों-भार्या, पुत्र व दास हे तिन्ही अधन आहेत. त्यांना जें मिळतें तें त्यांच्या धन्याचें होतें, असें वचन असल्यामुळें स्त्री धनरहित आहे, असें होतें. यास्तव प्रस्तुत प्रसंगीं तिनें कर्ज द्यावें कीं देऊं नये, अशी शंका उपस्थित होऊं नये म्हणून हें सांगितलें आहे. शिवाय ( आतांच सांगितलेल्या ) या वचनावरून स्त्रिया निर्धन आहेत, असें होत नसून तें वचन स्त्रिया, पुत्र व दास नेहमीं अस्वतंत्र आहेत, एवढेंच सांगत आहे. विभागप्रकरणामध्यें आह्मी हें आणखी अधिक स्पष्ट करूं. तर मग- 'नान्यत्स्त्री दातुमर्हति' असें या श्लोकांत म्हणण्याचें कारण नाहीं. कारण प्रतिपन्न, भार्येसह केलेलें व स्वतः केलेलें असें तीन प्रकारचें कर्ज तिनें द्यावें, असें विधान केल्यानेंच बाकीच्या कर्जाचा निषेध सिद्ध होत आहे-असें कोणी म्हणेल तर तेंही सांगतों-पतीच्या सांगण्यावरून मी देईन, असें म्हणून तिनें ज्याचा अंगीकार केला असेल व पतीसह तिनें जें केलें असेल या दोन प्रकारच्या कर्जाचा अपवाद 'नान्यत्स्त्री दातुमर्हति' या चवथ्या चरणांत सांगितला आहे. या तीन प्रकारच्या कर्जावांचून दुसरें म्हणजे ४७ व्या श्लोकांत सांगितलेलें सुराकामादिनिमित्त कर्ज प्रतिपन्न अथवा भार्येसह केलेलें असलें तरी तिनें देऊं नये, असें त्यावरून ठरतें ४९.

आतां पुनः कोणतें ऋण कोणीं केव्हां द्यावें तें सांगतात—

**पितरि प्रोषिते प्रेते व्यसनाभिप्लुतेऽपि वा ।**
**पुत्रपौत्रैर्ऋणं देयं निन्हवे साक्षिभावितम् ॥ ५० ॥**

जर पिता द्यावयाचें ऋण न देतां मेला, प्रवासास गेला अथवा असाध्य रोगानें पराभूत झाला तर त्यानें केलेलें ऋण धनकोनें मागतांच पुत्रानें अथवा पौत्रानें वडिलार्जित धन नसलें तरी द्यावें. कारण त्याचा पुत्र किंवा पौत्र होणें एवढेंच निमित्त कर्ज फेडावयास पुरेसें आहे. त्यांचा क्रमही हा असाच. म्हणजे पित्याच्या अभावीं पुत्र व पुत्राच्याही अभावीं पौत्र. पण पुत्र व पौत्र यांनीं कर्ज नाकारल्यास धनकोनें साक्षी, लेख्य इत्यादिकांच्या योगानें त्याची शाबिती करावी, व ती केली असतां, पुत्र व पौत्र यांनीं तें अवश्य द्यावें. या श्लोकांत पिता दूरदेशीं प्रवासास गेला असतां एवढेंच म्हटलें आहे; पण नारदानें त्याविषयीं असा कालनियम सांगितला आहे-पिता, पितृव्य किंवा ज्येष्ठ भ्राता प्रवासास गेल्यास पुत्रानें वीसवर्षांपूर्वीं त्यांचें कर्ज फेडूं नये. यांतील कोणी मेला असला तरी पुत्रानें स्वतःला व्यवहारकाल येईतों तें देऊं नये. पण व्यवहारकाल येतांच तें ( कर्ज ) द्यावें. त्याला व्यवहारकाल केव्हां येतो तेंही नारदानेंच सांगितलें आहे-आठ वर्षांपर्यंत शिशु गर्भस्थासारखाच असतो. त्यानंतर तो सोळावर्षांपर्यंत बाल अथवा पौगंड या संज्ञेस पात्र होतो. व सोळावर्षांनंतर तो

व्यवहारज्ञ व पित्याच्या मागें स्वतंत्र होतो. खरें म्हटलें असतां पित्याच्या मरणानंतर बालकही जरी स्वतंत्र होत असला तरी तो ऋणाचा अधिकारी होत नाहीं. स्वातंत्र्य ज्येष्ठत्वामुळेंच प्राप्त होत असतें व ज्येष्ठत्व गुण आणि वय यांच्या योगानें येतें. असो; ज्यांना व्यवहारज्ञत्व आलेलें नाहीं त्यांना आसेध ( राजाज्ञेनें अटक ) व आव्हानही करूं नये. यास्तव, ' उत्पन्न झालेल्या पुत्रानें स्वार्थत्याग करूनही पित्याला ऋणमुक्त करावें ' असें जें म्हटलें आहे, त्यांतील ' जातेन ' ( म्हणजे उत्पन्न झालेल्या ) या शब्दाचें व्याख्यान–व्यवहारज्ञ—अवस्थेस प्राप्त झालेल्या—असें करावें. पित्याचें श्राद्ध करण्याचा अधिकार बालकालाही आहे. 'पुत्रपौत्रः' असें बहुवचन योजलेलें असल्यामुळें एकाद्याला अनेक पुत्र असून ते जर विभक्त झालेलें असले तर त्या सर्वांनीं अपापल्या अंशानुसार कर्ज फेडावें; पण अनेक पुत्रही विभक्त झालेले नसल्यास अथवा विभक्त असूनही सर्व मिळून एकत्र व्यवहार चालवून मुख्य व गौण ( म्हणजे एकाला मुख्य करून बाकीचे अमुख्य ) होऊन रहात असल्यास त्यांतील मुख्यानें पित्याचें कर्ज वारावें. या श्लोकांत ' पुत्रपौत्रांनीं पितृ–ऋण द्यावें ' असें सामान्यतः जरी म्हटलें आहे तरी पुत्रानें पित्याप्रमाणेंच सव्याज कर्ज द्यावें व पौत्रानें तें मूल मात्र द्यावें; व्याज देऊं नये, असा त्यांत फरक समजावा. कारण बृहस्पतीनें तसें स्पष्ट सांगितलें आहे ५०.

स्वतः ऋणकर्ता, त्याचा पुत्र व त्याचाही पुत्र असे ऋण फेडणारे तिघेजण सांगितले व त्यांचा क्रमही सांगितला. आतां इतर वारसांचा क्रम सांगतात—

रिक्थग्राह ऋणं दाप्यो योषिद्ग्राहस्तथैव च ।
पुत्रोऽनन्याश्रितद्रव्यः पुत्रहीनस्य रिक्थिनः ॥ ५१ ॥

एकाचें जें द्रव्य क्रयादिकांवाचून दुसऱ्याचेंसें होतें त्याला रिक्थ म्हणतात. विभागाच्या द्वारा अशा रिक्थाचें जो ग्रहण करितो तो रिक्थग्राह होय. अर्थात् जो ज्याचें धन रिक्थरूपानें ग्रहण करतो त्याच्याकडून त्या धन्यानें केलेलें कर्ज राजानें देववावें. त्याचप्रमाणें जो ज्याच्या भार्येचें ग्रहण करतो त्या स्त्रीग्राहकाकडून तिच्या पतीचें कर्ज देववावें. स्त्री हें जरी पतीचें धन असलें तरी तें विभाग न करितां येण्यासारखें ( अविभाज्य ) आहे. यास्तव रिक्थ या शब्दास पात्र नसलेल्या स्त्रीचा येथें पृथक् निर्देश केला आहे. ज्याचें मातृ–पितृसंबंधी द्रव्य दुसऱ्या कोणाचाही आश्रय करून राहिलेलें नाहीं अशा पुत्रानें पुत्रहीन रिक्थीचें ऋण द्यावें. या श्लोकांतील पाठक्रमानेंच त्यांच्या देण्याचा क्रम समजावा. म्हणजे तिघेही असतां त्यांतील रिक्थग्राहानें कर्ज प्रथम फेडावें. त्याच्या अभावीं स्त्रीग्राहानें व त्यांच्याही अभावीं पुत्रानें.

पण यावर कोणी म्हणेल कीं रिक्थग्राह, स्त्रीग्राह व पुत्र यांचा समवाय(एकत्र प्राप्ति)च संभवत नाहीं. कारण पुत्र असतांना भ्राता, पिता इत्यादिकांतील दुसरा कोणी रिक्थग्राह होऊं शकत नाहीं. त्याचप्रमाणें साध्वीनां दुसरा भर्ताच उक्त नसल्यामुळें स्त्रीग्राह संभवत नाहीं. तसेंच पुत्रानें त्याचें कर्ज फेडावें, हें म्हणणेंही युक्त नव्हे, कारण वरच्याच श्लोकांत पुत्रपौत्रांनीं कर्ज द्यावें असें सांगितलें आहे. पुत्राला अनन्याश्रित द्रव्य असें जें विशेषण दिलें आहे तेंही अयोग्य आहे. कारण पुत्र असतांना

पित्याचें द्रव्य दुसऱ्याचा आश्रय करूं शकतच नाहीं. जरी तें दुसऱ्याचा आश्रय करूं शकले तरी रिक्थग्राही या सांगण्यानेंच त्याचा निर्णय झाला आहे. तसेंच ' पुत्रहीन रिक्थीचें ' असें म्हणणेंही योग्य नव्हे. कारण पुत्र असला तरी ' रिक्थग्राहीकडून ऋण देववावें ' असें जर या श्लोकाच्या पहिल्या चरणावरूनच ठरत आहे तर पुत्र नसल्यास रिक्थग्राहीनें तें द्यावें,हें निराळें सांगावयास नकोच.

या सर्व आक्षेपांचें समाधान असें-पुत्र असला तरी दुसरा रिक्थग्राह संभवतो. कारण पुत्र नपुंसक, आंधळा किंवा बधिर असल्यास त्याला पितृधन मिळत नाहीं. दुसऱ्या योग्य रिक्थग्राहीनें, त्याचें (अशा अयोग्य पुत्राचें) पोषण करावें, असें याच स्मृतींत पुढें सांगतील, तसेंच ' अन्यायानें वर्तन करणाऱ्या सवर्णस्त्रीपासून झालेल्या पुत्रालाही पितृधन मिळत नाहीं ' असें गौतमानें सांगितलें आहे. तस्मात् पुत्र नपुंसकादि असल्यास अथवा सवर्णापुत्र दुराचरणी असल्यास पितृव्य, त्याचे पुत्र इत्यादि दुसरेच रिक्थग्राही होतात-

शास्त्राशीं विरोध येत असल्यामुळें स्त्रीग्राह जरी संभवत नाहीं, तरी ज्यानें शास्त्रनिषेधाचें उल्लंघन केलें आहे तो ग्रहण केलेल्या स्त्रीच्या पूर्वपतीनें केलेलें ऋण फेडणारा होतो, म्हणजे तोच त्याचा अधिकारी आहे. चारप्रकारच्या स्वैरिणी स्त्रियांतील शेवटच्या स्वैरिणीचें व तीनप्रकारच्या पुनर्भू–पैकीं पहिल्या पुनर्भूचें ग्रहण करणारा स्त्रीग्राही होय. या सातप्रकारच्या स्त्रियांचें वर्णन नारदानें असें केलें आहे–दुसऱ्या परपूर्वा स्त्रिया सात प्रकाच्या आहेत.पुनर्भू तीन प्रकारच्या व स्वैरिणी चारप्रकारच्या, जी अक्षतयोनि कन्याच पाणिग्रहणानें दूषित झालेली असते ती पुनःसंस्कारकर्मानें पहिल्याप्रकारची पुनर्भू होते. जिनें व्यभिचार केला आहे, अशा स्त्रीचें प्रदान तिचे वडील देशधर्माकडे पाहून दुसऱ्या पतीस करितात, ती दुसऱ्याप्रकारची पुनर्भू होय. देवरादिक नसतांना जी स्त्री तिच्या बांधवांकडून दुसऱ्या सवर्ण व सपिंड पुरुषाला दिली जाते ती तिसरी पुनर्भू होय. प्रसूत झालेली किंवा जिला अपत्य झालेलेंच नाहीं अशी जी स्त्री पति जिवंत असतांनांच कामासक्त होऊन दुसऱ्याचा आश्रय करते ती पहिली स्वैरिणी होय. प्रथम विवाहित पतीला सोडून जी कांहीं दिवस दुसऱ्या पुरुषाचा आश्रय करून पुनः पतीच्या येथें येते ती दुसरी स्वैरिणी होय. भर्ता मेला असतां प्राप्त झालेल्या दिरादिकांस सोडून जी कामानें दुसऱ्यापाशीं जाते ती तिसरी होय. परदेशांतून आणलेली, धन देऊन विकत घेतलेली, क्षुधा व तृष्णा यांनीं व्याकुल झालेली, व मी तुझी आहें असें म्हणून जवळ आलेली स्त्री चवथी स्वैरिणी होय. यांतील चवथी स्वैरिणी व पहिली पुनर्भू यांचें ग्रहण करणारानें त्यांच्या पतीचें ऋण फेडावें. ' जी एकादी धनाढ्य स्त्री अपत्यांसह दुसऱ्या पुरुषाचा आश्रय करील, तिच्या पतीचें कर्ज त्या पुरुषानें फेडावें, ' अथवा तिला तसेंच ( धनासह ) सोडावें. त्याचप्रमाणें ' मेलेल्या, निर्धन व पुत्ररहित पुरुषाच्या स्त्रीशीं जो समागम करतो त्यानें तिच्या विवाहित पतीचें कर्ज फेडावें.कारण ती स्त्रीच त्याचें धन होय, ' असेंही आणखी त्यानें ( नारदानें ) च सांगितलें आहे.

या श्लोकांत पुत्र या शब्दाचा जो पुनः निर्देश केला आहे तो क्रम दाखविण्यासाठीं आहे. ' अनन्याश्रित द्रव्य ' असें विशेषण देऊन पुत्र पुष्कळ असून वडिलोपार्जित धन

नसल्याच अंशग्रहण करण्यास योग्य असलेल्या पुत्रालाच कर्ज फेडण्याचा अधिकार आहे. अन्ध, मूक इत्यादि अयोग्य पुत्राला नाहीं, असें सुचविलें आहे. ' पुत्रहीन रिक्थी ' हें वचनहीं— ज्याला पुत्र व पौत्र नाहींत त्याचें धन जर प्रपौत्रादि ( पणतू इत्यादि ) दुसऱ्यांस मिळालें तर त्यांनीं त्याचें ऋण फेडावें. पण तें मिळालें नसल्यास फेडूं नये.—असें सांगण्यासाठीं योजिलें आहे. पुत्र व पौत्र यांना मात्र रिक्थ प्राप्त झालेलें नसलें तरी कर्ज दिलें पाहिजे.

किंवा स्त्रीग्राह नसल्यास पुत्रानें द्यावें असें तिसऱ्या चरणांत सांगितलें व आतां पुत्राच्या अभावीं स्त्रीग्राहानें द्यावें असें 'पुत्रहीनस्य रिक्थिनः' या चवथ्या चरणानें सांगत आहेत. कारण येथें रिक्थी शब्दानें त्याची स्त्रीच उक्त आहे. पण हें व्याख्यान परस्परविरुद्ध आहे व: त्यामुळें दोन्ही असल्यास कोणालाच कांहीं द्यावयास नको; असें होतें, असें कोणी म्हणेल पण तें बरोबर नाहीं. कारण शेवटच्या स्वैरिणीचें ग्रहण करणाऱ्या, पहिल्या पुनर्भूचें ग्रहण करणाऱ्या व धनाढ्य स्त्रीचें हरण करणाऱ्या पुरुषाचा अभाव असल्यास पुत्रानें कर्ज फेडावें व पुत्रही नसल्यास निर्धन व निरपत्य स्त्रीचें ग्रहण करणाऱ्या पुरुषानें तें वारावें. नारदानेंही तसेंच सांगितलें आहे.

'पुत्रहीनस्य रिक्थिनः' याची ही दुसरी व्याख्या.—धनहारी, स्त्रीग्राही व पुत्र यांनीं कोणाचें ऋण वारावें ? अशी आकांक्षा झाली असतां उत्तमर्णा (धनको)चें कर्ज वारावें. पण तो नसल्यास त्याच्या पुत्राला तें द्यावें. पुत्र नसल्यास पौत्रादि व त्यांतील कोणी नसल्यास म्हणजे पुत्रहीन असलेल्या धनकोचें कर्ज त्याच्या रिक्थीला ( वारसाला, धन घेण्यास योग्य असलेल्या अवंश-जालाही ) तें द्यावें; पण कोणीच खरा वारस नसल्यास त्याचें ऋण ब्राह्मणांस वाटून द्यावें ५१.

आतां कांहीं विशेष पुरुषांना ऋण घेण्याचा निषेध करून त्याबरोबर दुसऱ्याही एक-दोन गोष्टींचा निषेध करितात—

> भ्रातृणामथ दम्पत्योः पितुः पुत्रस्य चैव हि ।
> प्रातिभाव्यमृणं साक्ष्यमविभक्ते न तु स्मृतम् ॥ ५२ ॥

भ्राते, पतिपत्नी, व पिता–पुत्र यांचें द्रव्य अविभक्त असल्यास द्रव्यविभागापूर्वी प्रातिभाव्य ( जामीनकीचें ), ऋण व साक्ष्य ( साक्षित्व ) मन्वादिकांनीं सांगितलेलें नाहीं. तर उलट त्यांनीं त्यांचा निषेध केला आहे. कारण विभागापूर्वी सर्वांचें साधारण द्रव्य असतें आणि प्रातिभाव्य ( कोणाला जामीन राहणें ) व साक्षित्व ( साक्षी राहणें ) या दोन्ही पक्षीं तर द्रव्याचा व्यय होत असतो आणि कर्ज तर अवश्य द्यावें लागतें. पण येथें परस्परांच्या अनुमतीवाचून होणाऱ्या प्रातिभाव्याचा व साक्ष्याचा हा निषेध केला आहे. वास्तव परस्परांच्या अनुमोदनानें अविभक्तांचें प्रातिभाव्य व साक्ष्य संभवतें. विभाग झाल्यावर तर परस्परांच्या अनुमोदनावाचूनही तें होतें.

' जायापत्योर्न विभागो विद्यते ' या आपस्तंबाच्या वचनाप्रमाणें पति व पत्नी यांचा

विभागच होत नाहीं. यास्तव त्यांच्या प्रातिभाव्यादिकांचा निषेध संभवत नाहीं, असें कोणी ह्मणेल तर तें खरें आहे. श्रौतस्मार्त–अग्नीनें साध्य होणारीं कर्में व त्यांचीं फळें यांचा विभाग होत नाहीं. पण दुसऱ्या सर्व कर्मांमध्यें व द्रव्यामध्यें हा नियम चालत नाहीं. कारण पति-पत्नींचा विभाग असत नाहीं, असें सांगून, तो कां? असा प्रश्न उपस्थित झाला असतां त्याचें कारण असें सांगितलें आहे—'पतिपत्नींनीं अग्नीचें आधान करावें' या श्रुतिवचनानें पाणिग्रहण केल्यापासून कर्मामध्यें त्यांचें सहत्व सांगितलें आहे. यास्तव आधानासिद्ध अग्नीच्या योगानें साध्य होणाऱ्या कर्मामध्यें त्यांचा सहाधिकार आहे. त्याचप्रमाणें 'कर्म स्मार्तं विवाहाग्नौ' म्हणजे स्मार्त कर्म विवाहाग्नीवर करावें, असें स्मृतिवचन असल्यामुळें विवाहसिद्ध अग्नीनें साध्य होणाऱ्या कर्मामध्येंही त्यांचा सहाधिकारच आहे. पण या दोन प्रकारच्या अग्नीची अपेक्षा न करितांच होणाऱ्या पूर्त कर्मांमध्यें पति–पत्नींचा पृथक्‌च अधिकार आहे. त्याचप्रमाणें स्वर्गादि पुण्यफलामध्यें त्यांचें सहत्व श्रुतीनें सांगितलें आहे. यास्तव ज्या पुण्यकर्मांत सह अधिकार असेल त्यांच्या फलामध्येंही त्यांचें सहत्व जाणावें. पण भर्त्याच्या अनुज्ञेनें केलेल्या पूर्तादिकर्मांच्या फलांत स्त्रियांना भर्तृसहत्व नाहीं.

द्रव्याच्या स्वामित्वामध्येंही सहाधिकार सांगितला आहे; पण त्यावरून तिचा विभागच नाहीं, असें होत नाहीं. कारण भार्येला द्रव्याचें स्वामित्व आहे, असें सांगून त्याचें उपपादनही असें केलें आहे.–भर्ता कोठें दूर गेलेला असल्यास अथवा घरीं नसल्यास नैमित्तिक अवश्य कर्तव्य, दान, अतिथिभोजन, भिक्षाप्रदान, इत्यादि पत्नीनें करावीं. तीं केल्यास 'तें स्तेय (चोरी) होतें' असें मनुप्रभृति मान्य स्मृतिकार ह्मणत नाहींत. यास्तव भार्येलाही द्रव्याचें स्वामित्व आहे. कारण तें जर नसतें तर पतीच्या मागें वरील कामांत केलेल्या व्ययाला त्यांनीं 'चोरी' असें म्हटलें असतें; यास्तव भर्त्याच्या इच्छेनें भार्येचाही विभाग होतो. याविषयीं याच स्मृतींत पुढें सांगतील ५२.

आतां प्रातिभाव्याचें निरूपण करण्यासाठीं सांगतात—

दर्शने प्रत्यये दाने प्रातिभाव्यं विधीयते ।
आद्यौ तु वितथे दाप्याවितरस्य सुता अपि ॥ ५३ ॥

प्रातिभाव्य ह्मणजे विश्वासाकरितां दुसऱ्या पुरुषाशीं कांहीं समय (नियम) करणें. तो निरानिराळ्या विषयांमुळें तीन प्रकारचा आहे. १ दर्शनाविषयीं. जसें–या अमक्याला जेव्हां तुम्हाला पाहावयाचें असेल तेव्हां मी दाखवीन. २ प्रत्ययाविषयीं. (म्हणजे ओळख देणारा) जसें–माझ्या विश्वासावर तूं याला धन दे. हा तुला ठकविणार नाहीं. कारण हा अमक्याचा पुत्र आहे. याची मोठी सुपीक जमीन आहे. अथवा हा अमुक गांवाचा नायक आहे. ३ दानाविषयीं. जसें–जर यानें तुझें धनादि न दिलें तर मी देईन. असें तीन प्रकारचें प्रातिभाव्य (जामिनकी) सांगितलेलें आहे. त्यांतील पहिल्या दोन प्रकारच्या (म्ह० दर्शन व

प्रत्यय ) प्रतिभूंनीं प्रसंगीं प्रत्यर्थी न दाखविल्यास राजानें त्याचें ऋण, अथवा दंड त्यांच्या ( प्रतिभूं ) कडून देववावा व दानप्रतिभूच्या पुत्राकडूनही धनकोचें धन देववावें. या श्लोकांतील ' वितथ ' याचा अर्थ–लबाडीनें अथवा धन नसल्यामुळें ऋणको लपून राहिल्यास, न्यायासनापुढें न आल्यास ( प्रतिभू मिथ्या होतो. त्याच्यावरील विश्वास उडतो. तसें झाल्यास धनकोचें कर्ज प्रतिभूकडून देववावें. ) असा करावा. इतराच्या म्हणजे तिसऱ्या दानप्रतिभूच्या पुत्राकडूनही धन देववावें, असें म्हटलें आहे. त्यावरून पहिल्या दोन प्रकारच्या प्रतिभूंच्या पुत्रांकडून अथवा तिसऱ्याच्याही पौत्रांदिकांकडून तें देववूं नये, असें होतें ५३.

हेंच अधिक स्पष्ट करण्याकरितां सांगतात—

दर्शनप्रतिभूर्यत्र मृतः प्रात्ययिकोऽपि वा ।
न तत्पुत्रा ऋणं दद्युर्दद्युर्दानाय यः स्थितः ॥ ५४ ॥

जेव्हां दर्शनप्रतिभू अथवा प्रात्ययिक प्रतिभू परलोकास गेला असेल तेव्हां पुत्रांनीं प्रातिभाव्या ( जामिनकी ) मुळें प्राप्त झालेलें वित्त देऊं नये. पण दानाविषयीं जो प्रतिभू राहिला असेल त्याच्या पुत्रांनीं तें देणें द्यावें. पौत्रांनीं देऊं नये. पुत्रांनींही मूल ( मुद्दल ) मात्र द्यावें. व्याज देऊं नये.

' ऋणं पैतामहं पौत्राः० ' इत्यादि व्यासांचें वचन आहे, व त्याचा भावार्थ असा आहे—प्रातिभाव्यासंबंधी ऋणास सोडून बाकीचें पितामहाचें ऋण नातवानें द्यावें. पण व्याज देऊं नये. जितकें घेतलें असेल तितकेंच (म्ह. मुद्दल मात्र) द्यावें. प्रातिभाव्यामुळें प्राप्त झालेलें पित्याचें ऋणही पुत्रानें मुद्दल मात्र द्यावें. पण त्यांच्या पुत्रांनीं म्हणजे पौत्र व प्रपौत्र यांनीं क्रमानें प्रातिभाव्यप्राप्त अथवा अप्रातिभाव्य ऋण, वडिलार्जित धन मिळालेलें नसल्यास देऊं नये.

' खादिको वित्तहीनः स्यात् ' इत्यादि आणखी एक वचन आहे. त्याचें व्याख्यान असें–खादक म्हणजे ऋणको व लग्नक म्हणजे प्रतिभूलग्नक जर वित्तवान् असून मेला तर त्याच्या पुत्रानें प्रातिभाव्यसंबंधीं नुस्तें कर्ज मात्र द्यावें. व्याज देऊं नये. पण जेव्हां दर्शन किंवा प्रत्यय प्रतिभू पुरेसें बंधक ( आधि, गहाण वस्तु ) ठेवून घेऊनच प्रतिभू झालेला असतो तेव्हां तो मेला किंवा प्रवासास गेला असतां त्याच्या पुत्रांनींही त्याच बंधकांतून प्रातिभाव्यप्राप्त ऋण अवश्य फेडावें असें कात्यायनानें सांगितलें आहे ५४.

जेथें अनेक प्रतिभू संभवतात तेथें कसें द्यावें, तें सांगतात—

बहवः स्युर्यदि स्वांशैर्दद्युः प्रतिभुवो धनम् ।
एकच्छायाश्रितेष्वेषु धनिकस्य यथारुचि ॥ ५५ ॥

जर एका धनप्रयोगांत दोन किंवा अनेक प्रतिभू असले तर त्यांनीं ऋण वाटून घेऊन

आपापल्या अंशाप्रमाणें द्यावें. पण एका अधमर्णाच्या सादृश्याचा आश्रय केलेल्या ( म्ह. एकच्छायाश्रित ) अनेक प्रतिभूंपैकीं ज्याच्यापाशीं धनिक स्वरुचीप्रमाणें आपलें धन परत मागेल त्यानें तें सर्व द्यावें. अशा प्रसंगीं त्याला आपला भाग देऊन मोकळें होतां येत नाहीं. ( अधमर्ण जसा सर्व कर्ज वारावयास स्थित असतो त्याप्रमाणें अनेक जामिनांतील प्रत्येकजण जेव्हां सर्व कर्ज द्यावयास जामीन झालेला असतो तेव्हां त्याला एकच्छायाश्रित म्हणतात. ) पण अशा एकच्छायाश्रित प्रतिभूंतील जर कोणी देशान्तरास गेला व त्याचा पुत्र घरीं असला तर धनिकाच्या इच्छेप्रमाणें त्याच्याकडून सर्व धन घ्यावें. त्याचप्रमाणें त्यांतील कोणी मेल्यास त्याच्या पुत्राकडून त्याच्या पित्याचा अंश मूळमात्र देववावा, असें कात्यायनानें सांगितलें आहे ५५.

प्रातिभाव्यांतील ऋणदानविधि सांगून प्रतिभूनें दिलेल्या धनाची उलट फेड कशी करावी तें सांगतात—

**प्रतिभूर्दापितो यत्तु प्रकाशं धनिनो धनम् ।**
**द्विगुणं प्रतिदातव्यमृणिकैस्तस्य तद्भवेत् ॥ ५६ ॥**

प्रतिभू किंवा त्याचा पुत्र यांतील कोणी, धनिकानें पीडलें असतां, सर्व लोकांसमक्ष, राजानें देण्याविषयीं आज्ञा केल्यामुळें ( द्विगुण धनलोभानें नव्हे ) जें धन धनकोला परत देतो, तें त्या प्रतिभूचें धन ऋणकोंनीं कालाची अपेक्षा न करितां तत्क्षणीं दुप्पट द्यावें. हें विधान सोन्याविषयीं आहे. येथें केवल दुप्पट देण्याविषयीं सांगितलें आहे. यास्तव कालक्रमाची अपेक्षा न करितां या वचनसामर्थ्यानेंच दुप्पट धन द्यावें ५६.

पण या नियमाप्रमाणें प्रतिभूनें दिलेल्या सर्व धनाची दुप्पट होण्याचा प्रसंग आला असतां त्याचा अपवाद सांगतात—

**सन्ततिः स्त्रीपशुष्वेव धान्यं त्रिगुणमेव च ।**
**वस्त्रं चतुर्गुणं प्रोक्तं रसश्चाष्टगुणस्तथा ॥ ५७ ॥**

सोन्याच्या दुपटीप्रमाणेंच कालाची अपेक्षा न करितां स्त्री, पशु इत्यादि पूर्वोक्त वृद्धीनें देववावें. पशुस्त्रियांची संतति हीच वृद्धि आहे. धान्याची वृद्धि त्रिगुण असते. वस्त्राची वृद्धि चौपट व रसाची आठपट सांगितली आहे. सारांश, ज्या द्रव्याची जितकी पराकाष्ठेची वृद्धि सांगितली आहे, तें प्रतिभूनें दिलेलें द्रव्य, खादक ( ऋणको )नें विशेष कालाची अपेक्षा न करितां, त्या तितक्या वृद्धीसह तत्काळ द्यावें. जेव्हां दर्शनप्रतिभू कबूल केलेल्या वेळीं अधमर्णास हजर करण्यास असमर्थ होईल तेव्हां त्याला हुडकण्यासाठीं प्रतिभूला तीन पंधरवड्याची सवड द्यावी. तितक्या अवकाशांत जर तो त्याला आणून हजर करण्यास ( दाखविण्यास ) समर्थ झाला तर प्रतिभूला सोडावें, नाहीं तर प्रस्तुत धन त्याच्याकडून देववावें. कारण कात्यायनानें तसें सांगितलें आहे. स्वामी, शत्रु, स्वामीनं अधिकार दिलेला, निरुद्ध,

दांडित, निंद्य, वारस, मित्र, नैष्ठिक ब्रह्मचारी, राजाचा नोकर, संन्यासी, धनकोला धन व राजाला दंड देण्यास असमर्थ असलेला, ज्याचा पिता जिवंत आहे, त्याचप्रमाणें जो स्वेच्छेनें वागणारा आहे, आणि ज्याची ओळख नाहीं, अशांना जामीन देऊं किंवा मान्य करूं नये ५७.

## इति प्रतिभूविधिः

आतां आधिविधि सांगतात. धन कर्जाऊ द्यावयाचें असतां दोन विश्वासहेतु आहेत. एक जामीन व दुसरा आधि. त्यांतील प्रतिभूचें ( जामिनाचें ) वर्णन येथवर केलें. आतां आधीचें निरूपण करितों. आधि म्हणजे घेतलेल्या धनाविषयीं धनकोला विश्वास यावा म्हणून ऋणकोनें त्याच्यापाशीं ठेवलेली आपली वस्तु.त्या आधीचे कृतकाल व अकृतकाल असे दोन प्रकार आहेत. त्यांतील प्रत्येकाचे पुनः गोप्य व भोग्य असे दोन प्रकार आहेत. कारण नारदाचें वचन त्याविषयीं प्रमाण आहे. एकादि वस्तु ठेवतानांच अमुकवेळीं ( दिवाळीस वगैरे ) ही वस्तु मी सोडवून नेईन, न सोडविल्यास ती तुझी, असा नियम करून ठेवलेला जो आधि तो कृतकालआधि होय. अशा रीतीनें कालाचा नियम केला असतां तो ठरलेल्या वेळीं सोडवून नेणें भाग आहे. जेव्हां कर्ज फेडीन तेव्हां परत नेईन, असें म्हणून ठेवलेला जो आधि तो अकृतकाल होय. या दोन्हींतील ज्याचें नुस्तें रक्षण करावयाचें असतें तो गोप्य व ज्याचा भोगही घेतां येतो तो भोग्य आधि होय. आतां या चार प्रकारच्या आधींतील विशेष सांगतात---

**आधिः प्रणश्येद्द्विगुणे धने यदि न मोक्ष्यते ।**
**काले कालकृतो नश्येत्फलभोग्यो न नश्यति ॥ ५८ ॥**

व्याजीं दिलेलें धन ठरलेल्या व्याजाच्या दरानेंच, बराच काळ लोटल्यामुळें दुप्पट झालें असतां अधमर्ण कर्ज फेडून आधि सोडविण्यास समर्थ न झाल्यास तो आधि नष्ट होतो. म्हणजे ती अधमर्णाची वस्तु उत्तमर्णाची होते. कालकृत आधि ठरलेल्या वेळीं न सोडविल्यास नष्ट होतो; पण ज्या गहाण वस्तूचें फल भोगतां येतें अशा क्षेत्र, उद्यान इत्यादि फलभोग्य आधीचा नाश कधींही होत नाहीं. सारांश, ज्याला सोडवून नेण्याचा काल ठरला आहे असा कृतकाल आधि, ( गोप्य व भोग्य असला तरी ) कालाचा अतिक्रम होतांच ( म्ह. मुदत टळतांच ) नाश पावतो. अकृतकाल भोग्य आधि कधींही नाश पावत नाहीं. पण अकृतकाल गोप्य आधि मूलधन व्याजानें दुप्पट होईतों न सोडविल्यास नष्ट होतो.

असो. धनाची दामदुप्पट होणें व ठरलेल्या वेळीं न सोडविणें या दोन कारणांनीं आधीचा विनाश झाला असतां चवदा दिवस वाट पहावी, व तेवढ्या अवधींत ऋणकोनें धन आणून दिल्यास त्याला त्याचें बंधक परत द्यावें, असें बृहस्पतीनें सांगितलें आहे.

आतां यावर कोणी कदाचित् म्हणेल कीं, आधीचा नाश होणें योग्य नव्हे. कारण,

त्यावरील अधमर्णाच्या स्वत्वाच्या निवृत्तीचें दान, विक्रय इत्यादि-कांहीं निमित्त नसतें. त्याचप्रमाणें अधमर्णाच्या स्वत्वप्राप्तीचेंही प्रतिग्रह,क्रय इत्यादि कांहीं निमित्त नसतें.शिवाय हें मनूच्या ( अ. ८ श्लो. १४३ ) वचनाविरुद्ध आहे. त्यानें चिरकाल राहणें, या एवढ्याच अपराधामुळें आधीचा निसर्ग ( अन्यत्र ठेवणें ) किंवा विक्रय होऊं शकत नाहीं, असें म्हणून धनीच्या स्वत्वाचा अभाव स्पष्ट सुचविला आहे.

परंतु या शंकेचें समाधान असें—आधि ठेवणें हें सोपाधिक स्वत्वनिवृत्ति—निमित्तच असून तो घेणें हेंच सोपाधिक स्वत्वप्राप्तीचें निमित्त आहे. यास्तव धन दुप्पट झालें अथवा ठरलेला काल निघून गेला असतां द्रव्य देण्याची अत्यंत निवृत्ति होते. ( म्हणजे ऋणकोला कर्ज फेडावें लागत नाहीं. ) त्यामुळें या वचनबलानेंच अधमर्णाची आधीवरील मालकी अत्यंत निवृत्त ( पार नाहींशी ) होऊन उत्तमर्णाचें आत्यंतिक स्वत्व प्राप्त होतें. मनुवचनाशींही विरोध येत नाहीं. कारण मनूनें वरील श्लोकांत भोग्य आधि चिरकाल राहिला तरी धनकोनें त्याला दुसऱ्यापाशीं गहाण ठेऊं किंवा विकूं नये, असें म्हटलें आहे. त्यामुळें फलभोग्य आधीवर धनकोचें स्वत्व कधींच येत नाहीं. येथेंही ' फलभोग्यो न नश्यति ' असें सांगितलेंच आहे. गोप्य आधीविषयीं मनूनें पुढच्याच ( म्ह. अ. ८ श्लो. १४४ ) श्लोकांत ' गोप्य आधीचा बलात्कारानें उपभोग घेऊं नये ' असें सांगितलें आहे. ' गोप्य आधीचा उपभोग घेतल्यास धन्याला व्याज मिळत नाहीं ' असें ( पुढच्याच श्लोकांत ) येथेंही सांगतील व धन द्विगुण झालें असतां आधि नष्ट होतो असें गोप्य आधीविषयी येथें म्हटलें आहे. अर्थात् या श्लोकाच्या प्रतिपादनावर कांहीं दोष येत नाहीं ५८.

**गोप्याधिभोगे नो वृद्धिः सोपकारेऽथ हापिते ।**
**नष्टो देयो विनष्टश्च दैवराजकृतादृते ॥ ५९ ॥**

तांब्याचा हांडा, कढई इत्यादि गोप्य आधि वापरल्यास मूल धनाची वृद्धि होत नाहीं. ( म्हणजे व्याज वाढत नाहीं. ) फार काय पण समयाचें ( ठरावाचें ) उल्लंघन करून थोडासा भोग घेतला तरी मोठी वृद्धिहि सोडणें भाग आहे. त्याचप्रमाणें उपकार करणाऱ्या ( उपयोगीं पडणाऱ्या ) बैल, तांब्याची घागर इत्यादि भोग्य व सव्याज आधीचा अतिभोग घेऊन त्याला व्यवहारास अयोग्य ( निरुपयोगीं ) करून सोडल्यासही वृद्धि मिळत नाहीं. जो आधि नष्ट ( म्हणजे छिद्रें पडणें, तिराळणें इत्यादि विकारास प्राप्त ) झाला असेल त्याला पूर्वीसारखा करून द्यावें. त्यांतल्या त्यांत गोप्य आधि नष्ट झाल्यास पूर्वींसारखा दुसरा करून द्यावा व त्याचा उपभोगही घेतल्यास व्याज घेऊं नये, असें ठरतें. पण तो अगदीं नाश पावला असल्यास तोही मूल्यादि देऊन परत द्यावा. म्हणजे व्याजासह मूल धन धनकोस मिळतें. पण त्यानें तो न दिल्यास मूल धनाचा नाश होतो. पण धनकोच्या आधीचा नाश आग लागणें, पाणी चढून घरें वाहणें, देश उध्वस्त होणें इत्यादि दैवनिमित्तांमुळें झाल्यास किंवा धनी पुरुषाचा कांहीं अपराध नसतांना राजानें उन्मत्तपणें

त्याचा नाश केल्यास ऋणकोला धनकोचें मूलधन व्याजासह देणें भाग आहे किंवा त्यानें धनकोपाशीं दुसरा आधि ठेवावा ५९.

**आधेः स्वीकरणात्सिद्धी रक्ष्यमाणोऽप्यसारताम् ।**
**यातश्चेदन्य आधेयो धनभाग्वा धनी भवेत् ॥ ६० ॥**

योग्य किंवा भोग्य आधीची सिद्धि त्याचा स्वीकार ( उपभोग ) केल्यानें होते. नुस्ते साक्षी किंवा लेख्य यांवरून होत नाहीं. किंवा नुस्त्या उद्देशानेंही होत नाहीं. कारण नारदानेंही ' स्वीकारान्त क्रिया बलवती असते. स्वीकाररहित तशी नसते ' असें म्हटलें आहे. धनीनें त्या आधीचें मोठ्या यत्नानें रक्षण करावें. पण तो यत्नानें रक्षण करीत असतांनाही जर कालवशात् आधि असार झाला ( म्हणजे त्यांत कांहीं विकार न होतां तो निरुपयोगी झाला, सव्याज मूल धनाच्या किंमतीचा राहिला नाहीं ) तर ऋणकोनें दुसरा योग्य आधि द्यावा किंवा सव्याज मूल धन द्यावें ६०.

मूलधन द्विगुण झालें असतां आधि नाश पावतो, असें जें वर ( ५८ व्या श्लोकांत,) सांगितलें आहे त्याचा अपवाद सांगतात—

**चरित्रबन्धककृतं सवृद्धया दापयेद्धनम् ।**
**सत्यङ्कारकृतं द्रव्यं द्विगुणं प्रतिदापयेत् ॥ ६१ ॥**

धनवानाचें चरित्र फार शुद्ध असल्यामुळें त्याच्यापाशीं बहुमूल्य द्रव्यही गहाण ठेवून अधमर्णानें थोडेंसेंच धन कर्जाऊ घेतल्यास किंवा अधमर्ण फार शुद्ध व पापभीरु असल्यामुळें अल्पमूल्याचा आधि घेऊन उत्तमर्णानें पुष्कळ कर्ज दिल्यास तें धन राजानें व्याजासह धनकोस परत देववावें. म्हणजे अशा प्रकारचें बंधक मूलधन व्याज चढून दुप्पट झालें तरी नष्ट होत नाहीं. तर धन्याला दुप्पट द्रव्यच देववावें. तसेंच सत्यंकारकृत द्रव्यही द्विगुण देववावें. ( म्हणजे बंधक अर्पण करतांनाच हें द्रव्य दुप्पट झालें तरी मी तेंच देईन. पण या आधीचा नाश होणार नाहीं.—असें धनको व ऋणको यांचें आपसांत ठरलें असल्यास राजानें ऋणकोकडून धनकोस दुप्पट धनच देववावें. )

आतां याचाच दुसरा अर्थ—चरित्र म्हणजे गंगास्नान, अग्निहोत्र इत्यादिकांमुळें उत्पन्न झालेलें अपूर्व. तेंच आधि करून जें द्रव्य आपल्या अधीन केलें जातें, कर्जाऊ घेतलें जातें तेंही दुप्पट झालें तरी देववावें. आधीचा म्हणजे चरित्रांचा नाश करूं नये. आतां आधीच्या वर्णनावरून सत्काराची आठवण झाल्यामुळें त्याविषयीं सांगतात—क्रय-विक्रयादि व्यवस्थेचा निर्वाह होण्यासाठीं दुसऱ्यापाशीं जें आंगठी वगैरे ( सत्कार ) दिली जाते, त्या व्यवस्थेचें अतिक्रमण केलें असतां तें करणारानें दुप्पट धन द्यावें. पण त्यांतूनही आंगठी वगैरे देणारानेंच जर ठरावाचें उल्लंघन केलें तर त्यानें दुसऱ्याला तेंच द्यावें व सत्कार घेणारानें जर ठराव

मोडला तर त्यानें आंगठी वगैरे जें घेतलें असेल तेंच त्याच्या किंमतीसह द्यावें. अथवा राजानें त्याच्याकडून देववावें ६१.

**उपस्थितस्य मोक्तव्य आधिस्तेनोऽन्यथा भवेत् ।**
**प्रयोजके सति धनं कुलेऽन्यस्याधिमाप्नुयात् ॥ ६२ ॥**

धन देऊन आधि सोडविण्यास आलेल्या ऋणकोचा आधि धन्यानें तत्काल सोडावा. व्याजाच्या लोभानें ठेवून घेऊं नये. कारण तो न सोडल्यास धनी चोराप्रमाणें दंडास पात्र होतो. पण कर्ज देणारा घरीं नसल्यास त्याच्या आप्ताच्या हातीं सव्याज धन देऊन अधमर्णानें आपलें बंधक घ्यावें ६२.

आतां असें समजा कीं, धन देणारा घरीं नाहीं ( जवळ नाहीं ), धन ग्रहण करतील असे त्याचे आप्तही नाहींत अथवा धनप्रयोक्ता ( धनको ) जवळ नसून ऋणकोला आधि विकून कर्ज फेडावें अशी इच्छा झाली आहे, तर काय करावें तें सांगतात—

**तत्कालकृतमूल्यो वा तत्र तिष्ठदवृद्धिकः ।**

त्यावेळीं जें त्या आधीचें मूल्य असेल तें ठरवून त्याच धन्याच्या येथें तो ( आधि ) व्याजावाचून ठेवावा म्हणजे त्या दिवसापासून धनी आपलें धन घेऊन आधीला सोडीपर्यंत अथवा त्याचें मूल्य ऋणीला देईपर्यंत कर्जावर व्याज चढत नाहीं.

आतां मुद्दल दामदुप्पट झालें तरी तें दुप्पट धनच घ्यावें; पण आधीचा नाश होऊं नये, असा ऋण घेतांनाच करार झालेला असून धन दुप्पट झालें असतां अधमर्ण घरीं नाहीं तेव्हां अशावेळीं धन्यानें काय करावें, तें सांगतात—

**विना धारणिकाद्वापि विक्रीणीत ससाक्षिकम् ॥ ६३ ॥**

अधमर्ण जरी समीप नसला तरी साक्षी व त्याचे आप्त यांच्या समक्ष त्या ( अधमर्णा ) नें ठेवलेलें बंधक विकून आपलें धन घ्यावें. पण ऋण घेतांना वर सांगितल्याप्रमाणें करार केलेला नसल्यास ' आधिः प्रणश्येद्द्विगुणे ' या नियमानुसार मूळ धन दुप्पट होतांच आधीचा नाश होतो. ( अर्थात् हा येथील पक्ष ऋणसमयीं पूर्वोक्त करार केल्यासच लागू आहे ) ६३.

आतां भोग्य आधीविषयीं कांहीं विशेष सांगतात—

**यदा तु द्विगुणीभूतमृणमाधौ तदा खलु ।**
**मोच्य आधिस्तदुत्पन्ने प्रविष्टे द्विगुणे धने ॥ ६४ ॥**

व्याजीं लावलेलें धन आपणच केलेल्या वृद्धीनें दुप्पट झालें. तेव्हां ऋणीनें आधि ठेविला. नंतर त्या ( आधी ) पासून उत्पन्न झालेलें धन मूळ धनाच्या दुप्पट धन्याला मिळालें तेव्हां आतां त्यानें तो आधी सोडावा, किंवा आधि अगोदरच दिलेला असून द्रव्य द्विगुण झालें असतां तूं आधीचा त्याग करावास, असा करार झालेला असल्यामुळें अथवा दुसऱ्या

कांहीं कारणानें आधीचा भोग झाला नाहीं. पण ऋण जेव्हां दुप्पट झालें तेव्हां आधी भोगाकरितां धनीपुरुषाच्या अधीन झाला. नंतर त्याच्या भोगापासून उत्पन्न झालेलें द्रव्य–मूल व त्याचें तितकेंच व्याज—इतकें ( म्हणजे त्याच्या दामदुपटी इतकें ) झालें असतां धनीनें तो आधि सोडावा. दुपटीपेक्षां अधिक धनाचा उपभोग घेतल्यास तेंही परत द्यावें. सारांश या वचनाचा कसाही जरी अर्थ केला तरी वृद्धीसह मूल्याची फेड करण्यासाठीं ज्या आधीचा उपभोग घेतला जातो त्याविषयीं हें वचन आहे. अशा प्रकारच्या आधीला लोक क्षयाधि म्हणतात. पण ज्यावेळीं व्याजाच्या ऐवजींच आधीचा भोग घ्यावा, अशीं भाषा झाली असेल त्यावेळीं दुपटीचें जरी उल्लंघन झालें तरी ऋणको धन देईतों धनको त्याचा उपभोग घेत रहाणारच. हीच गोष्ट बृहस्पतीच्या एका वचनावरून स्पष्ट होते. त्याचा सारांश असा– ज्याचें फल भोग्य आहे असें बंधक दोन प्रकारचें असतें. एक व्याजासह मूल्याचें अपाकरण करणारें व दुसरें केवळ व्याजाचें अपाकरण करणारें. त्यांतील पहिल्याप्रकारचें बंधक त्याचा काल पूर्ण होतांच ऋणकोला परत मिळतें. ( म्हणजे त्याच्या फलद्वारा धनकोला सव्याज मूलधन मिळालें कीं त्याला त्याची गहाण वस्तु परत मिळते. ) पण दुसऱ्याप्रकारचा आधि सामक म्ह. सममूल्य दिल्यानेंच ऋणकोला प्राप्त होतो. पण तें बंधक वृद्धीहूनही जर अधिक फल देणारें असलें तर धनी धनाला पात्र होत नाहीं. मूलधन न देतांच ऋणीला त्याचें बंधक परत मिळतें. बरें तेंच, तें बंधक व्याज भरेल इतकेंही नसलें तर सामक देऊनही ऋणीला बंधक मिळत नाहीं. तर व्याजाची जी बाकी उरली असेल ती सर्व दिल्यावरच त्याला तें परत मिळेल. पण उत्तमर्ण व अधमर्ण या दोघांची परस्पर अनुमति नसल्यास हा वरील नियम सांगितला आहे. पण तीच परस्परांची अनुमति असल्यास धनी उत्कृष्ट बंधकाचाही मुद्दल परत मिळेतों उपभोग घेणारच. आणि बंधक जरी निकृष्ट असलें तरी ऋणीला मुद्दल परत करितांच तें प्राप्त होतेंच ६४.

इति ऋणादानप्रकरणम् ३.

---

# अथ उपनिधिप्रकरणम् ४.



उपनिधीविषयीं सांगतात—

**वासनस्थमनाख्याय हस्तेऽन्यस्य यदर्प्यते ।**
**द्रव्यं तदौपनिधिकं प्रतिदेयं तथैव तत् ॥ ६५ ॥**

ठेवीचें द्रव्य ज्यांत घालतात त्या करंडी, पेटी, घागर इत्यादिकांस वासन म्हणतात. त्यांत ठेवलेल्या द्रव्याचें स्वरूप, संख्या इत्यादि न सांगतां वासनाचें तोंड बंद करून व

त्यावर मोहोर करून संरक्षणार्थ विश्वासानें दुसऱ्याच्या हातीं सोपविणें त्याला उपनिधि व त्यांतील द्रव्याला औपनिधिक द्रव्य असें म्हणतात. ज्याच्यापाशीं तें ठेवलें असेल त्यानें तें जसें मोहोर इत्यादिकांनीं युक्त करून ठेवलें असेल तसेंच ठेवणाराला परत करावें ६५.

आतां प्रतिदेयं म्हणजे परत द्यावें असें जें वर म्हटलें आहे, त्याचा अपवाद सांगतात—

**न दाप्योऽपहृतं तंतु राजदैविकतस्करैः ।**

पण त्या उपनिधीस राजानें, दैववशात् झालेल्या उदकादि उत्पातांनीं किंवा चोरांनीं हरण करून नेल्यास, राजानें ज्याच्यापाशीं तो ठेवलेला होता त्याच्याकडून धन्याला देववूं नये. पण वरील निमित्तांमुळें केवळ उपनिधीचेंच तेवढें धन जातां त्याबरोबर तें ठेवून घेणारांचेंही जर धन गेलें असेल तरच त्याला तें परत द्यावयास नको; म्हणजे त्यांत उपनिधि ठेवून घेणाराचें कांहीं कपट असतां कामा नये. कारण नारदानें तसें सांगितलें आहे.

आतां याचा अपवाद सांगतात—

**भ्रेषश्चेन्मार्गिते दत्ते दाप्यो दण्डं च तत्समम् ॥ ६६ ॥**

पण त्याच्या स्वामीनें तें औपनिधिक द्रव्य परत मागितलें असतां जर ठेवून घेणारानें परत दिलें नाहीं व त्यानंतर वरील ( राजादि ) कारणांनीं तें नष्ट झालें तर त्याची किंमत ठरवून राजानें त्याच्या स्वामीला तें ठेवून घेणाराकडून देववावें व त्याला तितकाच दंड करावा ६६.

आतां त्याचा भोग घेणारास किती दंड करावा तें सांगतात—

**आजीवन् स्वेच्छया दण्ड्यो दाप्यस्तं चापि सोदयम् ।**

स्वामीच्या अनुज्ञेवाचूनच जो उपनिहित धनाचा उपभोग घेतो किंवा त्याला व्याजीं लावून व्यवहार चालवितो त्याला उपभोगानुसार अथवा लाभानुसार दंड करावा आणि तो उपनिधि त्याच्या उदयासह (म्हणजे त्याचा उपभोग घेतल्यास व्याजासह व व्यवहार केल्यास त्यांत झालेल्या लाभासह ) त्याच्या स्वामीस परत देववावा. निक्षेप, व्याजाची बाकी, क्रय व विक्रय याचें धन मालकास मागतांच न दिल्यास त्यावर शेंकडा पांच टक्के व्याज मागितल्या दिवसापासून सुरू होतें, असें कात्यायनानें सांगितलेलें असल्यामुळें शेंकडा पांच हेंच येथील व्याजाचें प्रमाण समजावें. पण हें सुद्धां प्रमाण उपनिधि इत्यादि ठेवून घेणारानें तो खाल्ला असतां समजावें. त्याच्या उपेक्षेनें अथवा अज्ञानानें उपनिधि इत्यादिकांचा नाश झाल्यास त्याविषयीं त्यानेंच असें सांगितलें आहे. प्रक्षेपादिक ठेवून घेणारानें त्यांस खाल्यास त्याच्याकडून लाभासह तें धन्यास परत देववावें, त्याची उपेक्षा केल्यास तें असेल तितकें देववावें व अज्ञानानें नष्ट झाल्यास चतुर्थांश कमी करून द्यावें. आतां या उपनिधीचेच धर्म याचितादि ( म्ह. उसनें, मागून घेणें इत्यादि )कांमध्यें योजितात—

याचितान्वाहितन्यासनिक्षेपादिष्वयं विधिः ॥ ६७ ॥

विवाहादि उत्सवप्रसंगीं वस्त्र, अलंकार इत्यादि मागून नेणें, याला याचित म्हणतात. एकाच्या हातीं ठेवलेलें द्रव्य त्यानेंही पुनः ' हें याच्या अमक्या अमक्या धन्याला दे ' असें म्हणून दुसऱ्याला दिलें असतां त्याला अन्वाहित असें म्हणतात. एकादी वस्तु गृहस्वामीला दाखवून त्याच्या परोक्ष त्याच्या घरांतील कोणा तरी माणसाच्या हातीं ' हीं गृहस्वामीला दे ' असें म्हणून देणें, यास न्यास म्हणतात व समक्ष देणें यास निक्षेप म्हणतात. श्लोकांतील निक्षेप शब्दापुढील आदिशब्दानें दागिना करण्याकरितां सोनारादिकांच्या हातीं दिलेलें सुवर्णादिक व एकमेकांस गरज असल्यामुळें ' तूं या माझ्या वस्तूचें रक्षण कर व मी या तुझ्या वस्तूचें रक्षण करतों ' असें म्हणून परस्परांनीं परस्परांस आपापली वस्तु देणें हा प्रतिन्यास, यांचें ग्रहण करावें. सारांश, याचित, अन्वाहित, न्यास, निक्षेप, शिल्पिन्यास व प्रतिन्यास यांमध्येंहि हाच ( वरील उपनिधींच्या प्रतिदानादिकांचा ) विधि जाणावा ६७.

इति उपनिधिप्रकरणम् ४.

---

# अथ साक्षिप्रकरणम् ५.



लिखित, भुक्ति व साक्षि असें तीन प्रकारचें प्रमाण सांगितलें. त्यांतील भुक्तीचें निरूपण झालें. आतां साक्षीच्या स्वरूपाचें निरूपण करितात. साक्षी एकादी गोष्ट साक्षात् पाहिल्यानें अथवा ऐकल्यानें होतो. साक्षी कृत व अकृत असा दोन प्रकारचा आहे. साक्षित्वानें निरूपण केलेला कृत व न निरूपण केलेला अकृत साक्षी होय. त्यांतील पहिल्याचे पांच व दुसऱ्याचे सहा मिळून अकरा प्रकार आहेत, असें नारदानें सांगून लिखित, स्मारित, यदृच्छाभिज्ञ, गूढ व उत्तर साक्षी अशीं पांच प्रकारच्या कृत साक्षीचीं नावेंही लागलीच सांगितलीं आहेत. तसेंच या लिखितादिकांचें स्वरूप कात्यायनानें असें सांगितलें आहे. धनीनें स्वतः आणलेल्या, ज्याचें नांव लेखांत घातलें जातें त्याला लिखित कृत साक्षी म्हणतात. आपल्या कार्यसिद्धीकरितां ज्याला पुनः पुनः ' तूं याचा साक्षी आहेस हो ' असें म्हणून आठवण दिली जाते, तो स्मारित साक्षी होय. यदृच्छेनें आलेल्या ज्या एकाद्याला एकाद्या गोष्टीविषयीं साक्षी ठेवलें जातें, त्याला यदृच्छाभिज्ञ कृत साक्षी म्हणतात. स्मारित व यदृच्छाप्राप्त या दोघांनाही पत्रांत लिहिलें जात नाहीं. तथापि त्यांतील एक ( पहिला ) मुद्दाम साक्षी ठेवण्याकरितां आणलेला असतो व दुसरा प्रसंगोपात्त आलेला असतो. अर्थीनें आपल्या अर्थाची सिद्धि व्हावी म्हणून ज्याला लपवून ठेवून प्रत्यर्थीचें भाषण ऐकविलें आहे तो गूढ साक्षी

होय. इतर साक्षींचीही साक्ष ऐकून अथवा त्यांच्या साक्षी ऐकवून नंतर त्यांतील हें न्याय्य किंवा हें अन्याय्य आहे, असें जो सांगतो तो उत्तर साक्षी होय. ( म्हणजे जो साक्षी इतर साक्षी साक्ष देत असतांना ती सर्व ऐकून त्यांतील अमुक खरें आहे व अमुक खोटें आहे, असें सांगतो तो अथवा जो मोठा प्रतिष्ठित किंवा रोगादिकांनीं आतुर असल्यामुळें न्यायासनापुढें येण्यासारखा नाहीं; यास्तव न्यायसभेंत झालेल्या साक्षी त्याच्या घरीं जाऊन त्यास सांगितल्या जातात व त्या ऐकून यांतील 'हें खरें आहे, हें खोटें आहे' असें जो सांगतो तो उत्तर साक्षी होय. ) सहा प्रकारच्या अकृत साक्षींचाही भेद नारदानें असा सांगितला आहे—गाव, प्राड्विवाक ( न्यायाधीश ), राजा, व्यवहार करणारांनीं आपल्या कार्याचा ज्यास अधिकार दिला आहे, अर्थीनें पाठविलेला व कुलविवादामध्ये कुलांतील लोक असे ते सहा प्रकारचे अकृत साक्षी होत. येथें प्राड्विवाक, असें जरी म्हटलें आहे तरी त्याबरोबर लेखक, सभ्य इत्यादिकांचेंही ग्रहण करावें. कारण तसें दुसऱ्या स्मृतिवचनांत सांगितलें आहे असो; आतां तेही साक्षी कशाप्रकारचे व किती असतात, तें सांगतात—

**तपस्विनो दानशीलाः कुलीनाः सत्यवादिनः ।**
**धर्मप्रधाना ऋजवः पुत्रवन्तो धनान्विताः ॥ ६८ ॥**
**त्र्यवराः साक्षिणो ज्ञेयाः श्रौतस्मार्तक्रियापराः ।**
**यथाजाति यथावर्णं सर्वे सर्वेषु वा स्मृताः ॥ ६९ ॥**

तपःशील, दानामध्यें रत, महाकुलांत झालेले, सत्यभाषणशील, धर्माला प्रधान समजणारे ( अर्थ व काम यांना मुख्य समजणारे नव्हेत ), अकुटिल ( सरळस्वभाव ), पुत्रसंपन्न, पुष्कळ सुवर्णादियुक्त व श्रौत-स्मार्तक्रियापरायण ( नित्य-नैमित्तिक अनुष्ठान करण्यांत रत ) अशा प्रकारचे कमींत कमीं तीन पुरुष साक्षी असतात. तीनपेक्षां अधीक हवे तितके साक्षी होऊं शकतात. पण न्यून असूं नयेत. मूर्धावसिक्तादि ( पहिल्या अध्यायांत सांगितलेल्या ) अनुलोमज व प्रतिलोमज जातींचें अतिक्रमण न करितां व ब्राह्मणादि वर्णांचेंही उल्लंघन न करितां साक्षी करावेत. म्हणजे ब्राह्मणांचे वर सांगितलेल्या लक्षणांनीं व संख्येनें युक्त असे ब्राह्मण साक्षीच असावेत; क्षत्रियादिकांचेही क्षत्रियादिकच असावेत; स्त्रियांचेहीं उक्तलक्षण स्त्रीसाक्षीच असावेत. कारण 'स्त्रीणां साक्ष्यं स्त्रियः कुर्युः' असें मनूचें वचन आहे. पण सवर्ण व सजाति साक्षींचा असंभव झाल्यास ब्राह्मणादि सर्व जसा संभव असेल त्याप्रमाणें सर्वांचे साक्षी होऊं शकतात. पण उक्तलक्षणयुक्त साक्षींचा असंभव असल्यास, ज्यांचा प्रतिषेध केलेला नाहीं अशा दुसऱ्यांच्याही साक्षित्वाचें प्रतिपादन करण्यासाठीं असाक्षींचें वर्णन करणें अवश्य आहे. त्याचे पांच प्रकार नारदानें सांगितले आहेत, ते असे—

१ कांहीं शास्त्राचें निषेधक वचन असल्यामुळें साक्षी होऊं शकत नाहींत. जसें-श्रोत्रिय, तापस ( वानप्रस्थ), वृद्ध व संन्याशी इत्यादि. हे शास्त्रवचनावरूनच असाक्षी आहेत.

त्यांच्या असाक्षित्वाविषयीं दुसरा कांहीं विशेष हेतु नाहीं. संन्याशी इत्यादि येथील आदि-शब्दानें शंखाच्या वचनाप्रमाणें पित्याशीं विवाद करणारे पुत्र, गुरुकुलवासी व पाखंडी यांचें ग्रहण करावें. २ कांहीं पुरुष दोषांमुळें असाक्षी होतात. जसें–चोर, साहसिक, कोपवान्, जुगारी, फसवे लोक इत्यादि. त्यांच्यामध्यें सत्याचा अभाव हाच मोठा दोष असतो. ३ भेदा-मुळें कांहीं असाक्षी होतात. जसें–लेखांत लिहिलेल्या अथवा वाद्यानें सांगितलेल्या साक्षींतील एकानेंही जरी विपरीत भाषण केलें तरी त्यांच्यामध्यें भेद पडत असल्यामुळें ते सर्वच असाक्षी होतात. ४ वादी, प्रतिवादी इत्यादिकांतील कोणीही ज्याचा साक्षी म्हणून निर्देश केलेला नाहीं, असा एकादा स्वतःच पुढें येऊन जर साक्ष देऊं लागला तर तो स्वयमुक्ति होय. त्याला शास्त्रांत सूची असें म्हटलेलें असून तो साक्ष देण्यास योग्य नाहीं. ५ मृतान्तर हा पांचव्या प्रकारचा असाक्षी आहे. ज्या अर्थीनें किंवा प्रत्यर्थीनें 'तुम्ही याविषयीं साक्षी आहां' असें म्हणून साक्षींना जें ऐकवावयाचें असतें तें ऐकविणाराच नसल्यामुळें ऐकविलें गेलेलें नसल्यास कोण कशाविषयीं साक्ष देणार? अर्थात् मेलेल्या पुरुषाचा दुसरा कोणी आप्त साक्षी होत नाहीं. पण मरावयास टेंकलेल्या किंवा सुस्थ असलेल्याच पित्यानें पुत्राला किंवा बंधु प्रभृति दुसऱ्या कोणाला या अमुक गोष्टी विषयीं हे अमुक साक्षी आहेत, असें सांगून ठेविलेल असल्यास मृतान्तरही साक्षी होऊं शकतो. कारण नारदानें तसें सांगितलें आहे. ६८,६९.

आतां त्याच असाक्षींचा निर्देश स्वतः योगाश्वर करितात—

स्त्रीबालवृद्धकितवमत्तोन्मत्ताभिशस्तकाः ।
रङ्गावतारिपाखण्डिकूटकृद्विकलेन्द्रियाः ॥ ७० ॥
पतिताप्तार्थसंबन्धिसहायरिपुतस्कराः ।
साहसी दृष्टदोषश्च निर्धूताद्यास्त्वसाक्षिणः ॥ ७१ ॥

स्त्री, व्यवहारदशेस प्राप्त न झालेला बाल, ऐंशी वर्षांवरील वृद्ध ( येथें वरील वचनानें निषिद्ध केलेल्या श्रोत्रियादि दुसऱ्यांचेंही ग्रहण करावें ), जुगारी, मद्यादि पानानें मत्त झालेला, वेडा, ब्रह्महत्यादि पातकांचा ज्याच्यावर आरोप आला आहे, चारण ( नट ), निर्ग्रंथादि पाखंडी, खोटे लेख वगैरे करणारा, ज्याचीं श्रोत्र, नेत्रादि इंद्रियें विकल झालीं आहेत, ब्रह्महत्या करणारा, सुहृत्, वादविषयक धनाशीं संबंध ठेवणारा, एककार्यवान् ( म्ह. ज्याचा साक्षी व्हावयाचें त्याचें जें कार्य तेंच ज्याचें कार्य आहे तो ), शत्रु, चोर, बलात्कारादि साहस करणारा, ज्याच्या खोटेपणाचा अनुभव आलेला आहे, आप्तांनीं ज्याचा त्याग केला आहे व दुसरेही वर सांगितलेले सर्व साक्षी होऊं शकत नाहींत ७०,७१.

कमींत कमी तीन साक्षी असावेत, ह्मणून जें वर सांगितलें आहे, त्याचा अपवाद सांगतात—

उभयानुमतः साक्षी भवेदेकोऽपि धर्मवित् ।

ज्ञानपूर्वक नित्य व नैमित्तिक धर्माचें अनुष्ठान करणारास धर्मवेत्ता म्हणतात. तो वादी व प्रतिवादी या दोघांनाही जर अभिमत असला तर एकटाही ( अर्थात् दोघे सुद्धां ) साक्षी होऊं शकतात. तीन साक्षीही श्रौतस्मार्तधर्मपरायण असावेत असें वर ( ६९ व्या श्लोकांत ) म्हटलेलें असल्यामुळें धर्मज्ञत्व त्यांच्या ठिकाणींही असतेंच. पण ते तिघे, वादी व प्रतिवादी यांचें अनुमोदन नसलें तरी साक्षी होऊं शकतात आणि एक किंवा दोघे धर्मज्ञ वादिप्रतिवादींचें अनुमोदन नसल्यास साक्षी होऊं शकत नाहींत. हा या दोन वचनांत विशेष आहे.

आतां ' तपस्विनो दानशीलाः ' इत्यादि ६८ व्या श्लोकाचा अपवाद सांगतात—

## सर्वः साक्षी संग्रहणे चौर्यपारुष्यसाहसे ॥ ७२ ॥

संग्रहण, चौर्य, पारुष्य व साहस यांमध्यें वर वचननिषिद्ध म्हणून सांगितलेले व तपःप्रभृति गुणरहित असलेले साक्षी होतात. पण वचननिषिद्धांवाचून दोषामुळें व भेदामुळें साक्षी होण्यास अयोग्य असलेले आणि स्वयमुक्ति पुरुष या संग्रहणादिकांमध्येंही साक्षी होऊं शकत नाहींत. कारण सत्यवादित्व हा गुण असल्या प्रसंगींही साक्षींमध्यें असावा लागतो. ' मनुष्य मारणें, चौर्य, परस्त्रीचा अपमान करणें, व ( दंडपारुष्य आणि वाक्पारुष्य असें द्विविध ) पारुष्य, असें चार प्रकारचें साहस आहे, ' असें स्मृतिवचन असल्यामुळें स्त्रीसंग्रहण, चौर्य, पारुष्य, यांना जरी साहसत्व आहेच, तथापि लोकांसमक्ष केवल आपल्या बलाच्या आश्रयानें केलेल्या त्यांना साहस व गुप्तरीतीनें केलेल्या त्या ( संग्रहणादिकां ) ना संग्रहणादि म्हणतात. म्हणून त्यांचें येथें पृथक् ग्रहण केलें आहे ७२.

आतां साक्षी लोकांना कसें ऐकवावें तें सांगतात.

## साक्षिणः श्रावयेद्वादिप्रतिवादिसमीपगान् ।

अर्थी व प्रत्यर्थी यांच्या समक्ष एकत्र जमलेल्या साक्षींना पुढें सांगितल्याप्रमाणें ऐकवावें. प्रत्येक साक्षीला निरनिराळें न ऐकवितां सर्वांना एकत्र जमवूनच ऐकवावें, असें गौतमानें सांगितलें आहे. कात्यायनानेंही त्याविषयीं असा विशेष सांगितला आहे—सभेमध्यें अर्थी व प्रत्यर्थी यांच्या समीप सर्व साक्षींना एकत्र जमवून प्राड्विवाकानें त्यांचें सांत्वन करीत अशा रीतीनें प्रश्न करावे. देव व ब्राह्मण यांच्या समक्ष स्वतः शुचि असलेल्या न्यायाधीशानें स्नानादि करून शुद्ध झालेल्या व उत्तरेकडे किंवा पूर्वेकडे तोंडें करून उभे राहिलेल्या द्विजांस संबोधून व पुष्कळ शपथा घालून साक्ष विचारावी. ज्यांचा आचार माहीत आहे अशा विद्वान् साक्षींना पृथक् पृथक् प्रश्न करावे. मनूनेंही ब्राह्मणादिकांविषयीं असा नियम दाखविला आहे.—ब्राह्मणांस सत्याची शपथ, क्षत्रियांना वाहनें व आयुधें यांची शपथ, वैश्यांस गायी, बीजें व सोनें यांची शपथ व शूद्रांस सर्व पातकांची शपथ घालावी. ( म्हणजे ब्राह्मणास तूं जर असत्य भाषण केलेंस तर तुझें सत्य नष्ट होईल; क्षत्रियास तुझी वाहनें व आयुधें निष्फळ

होतील; वैश्यास तुझे पशु, धान्य, व सोनें व्यर्थ होईल; व शूद्रास खोटें बोलल्यास तुला सर्व पातकें लागतील, अशा शपथा घालाव्या ) या नियमाचा अपवादही त्यानेंच असा सांगितला आहे. गोरक्षक, वाणिज्य करणारे, कारागीर, गायक, चाकरी करणारे व व्याजबट्टा करणारे इतक्या ब्राह्मणांदिकांस शूद्रांप्रमाणें वागवावें. ( ह्मणजे वरील ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांना शूद्रांप्रमाणें सर्व पातक लागेल, अशी शपथ घालावी. )

प्रतिवादीनें साक्षी लोकांना कांहीं दूषण दिलें असतां न्यायाधीशानें बाल्यादि प्रत्यक्ष योग्य दूषणांचा स्वतःच निर्णय करावा. पण त्यानें दिलेलें दूषण प्रत्यक्ष दिसण्यासारखें नसल्यास त्याचेंच वचन व लोक यांवरून त्याचा निर्णय करावा. त्याकरितां निराळ्या साक्षींना बोलावूं नये. कारण तसें करूं लागल्यास एका साक्षीकरितां दुसरा साक्षी, दुसऱ्याकरितां तिसरा इत्यादि अनवस्था होईल. साक्षींमध्यें अमुक एक दोष आहेत,' असें सांगून प्रतिवादी त्यांची सिद्धि करण्यास असमर्थ झाल्यास तो दोषानुसार दंडास पात्र होतो. पण तो उक्त दोष सिद्ध करण्यास समर्थ झाल्यास ते दोषयुक्त लोक साक्षी होत नाहींत. ज्यांचीं नावें सांगितलीं होतीं ते सर्वच साक्षी दूषणांनीं दूषित झालेले आहेत असें ठरल्यावर अर्थी जर दुसरी क्रिया करण्याविषयीं निरपेक्ष झाला तर तो पराभूत होतो; पण त्याला दुसरी क्रिया करण्याची आकांक्षा असल्यास तो ती करूं शकतो.

आतां त्यांना कोणत्याप्रकारें ऐकवावें, तें सांगतात--

ये पातककृतां लोका महापातकिनां तथा ॥ ७३ ॥
अग्निदानां च ये लोका ये च स्त्रीबालघातिनाम् ।
स तान्सर्वानवाप्नोति यः साक्ष्यमनृतं वदेत् ॥ ७४ ॥
सुकृतं यत्त्वया किञ्चिज्जन्मान्तरशतैः कृतम् ।
तत्सर्वं तस्य जानीही यं पराजयसे वृथा ॥ ७५ ॥

पातकें, महापातकें व उपपातकें करणारे, आगी लावणारे, स्त्रिया व बालक यांचा घात करणारे यांना जे लोक प्राप्त होतात ते सर्व खोटी साक्ष देणाराला मिळतात. त्याचप्रमाणें त्यानें दुसऱ्या शेकडों जन्मांत केलेलें सर्व पुण्य याच्या असत्यभाषणामुळें पराभूत होणाऱ्या पुरुषाला प्राप्त होतें, असें साक्षीं देणारांस ऐकवावें. पण सर्व पाप लागण्याविषयींचें हें वचन शूद्र व गोरक्षादि द्विज यांच्याकरितां आहे. कारण, केवल एकदा खोटी साक्ष दिल्यानें अनेक जन्मार्जित पुण्य एकाचें दुसऱ्यास लागणें अथवा महापातकादि फलाची प्राप्ति होणें युक्त नव्हे. शिवाय अशाप्रकारची शपथ केवल साक्षीला भिवविण्याकरितां घालतात, असें नारदानें सांगितलें आहे ७३, ७४, ७५.

पण असें ऐकविलेले साक्षी जर कांहीं केल्या बोलेनासे झाले तर काय करावें तें सांगतात—

अब्रुवन्हि नरः साक्ष्यमृणं सदशबन्धकम् ।
राज्ञा सर्वं प्रदाप्यः स्यात् षट्चत्वारिंशकेऽहनि ॥ ७६ ॥

जो साक्ष देण्याचें मान्य करून हें ऐकविलें असतां साक्ष देत नाहीं, कांहींच सांगत नाहीं, त्याच्याकडून राजानें धनकोला सव्याज ऋण देववावें. व धनकोनें त्याच्या दशमांशासह तें घ्यावें. तो दहावा अंश राजाचा होतो. पण हें सेहेचाळीसाव्या दिवशीं करावें. त्याच्यापूर्वी त्याच्याकडून ऋण देववूं नये. पण तें सुद्धां व्याधिप्रभृति उपद्रवांनीं रहित असलेल्या पुरुषांविषयींच आहे, असें समजावें. कारण, व्याधि, राजा,—दैव इत्यादिकांपासून प्राप्त होणारीं संकटें इत्यादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषानें पूर्वी मान्य करूनही साक्ष न दिल्यास त्याच्याकडून तीन पक्षानंतर ( म्हणजे सेहेचाळिसाव्या दिवशींही ) सव्याज व सदशांश ऋण देववितां येत नाहीं ७६.

आतां जो जाणत असूनही दुरात्मतेमुळें साक्ष देण्याचेंच कबूल करीत नाहीं, त्याविषयीं सांगतात—

न ददाति हि यः साक्ष्यं जानन्नपि नराधमः ।
स कूटसाक्षिणां पापैस्तुल्यो दण्डेन चैव हि ॥ ७७ ॥

पण जो अधम पुरुष वादविषयक अर्थ विशेषेंकरून जाणत असूनही साक्ष देण्याचें मान्य करीत नाहीं तो पापाच्या योगानें व दंडानें कूटसाक्षीसारखा होतो. कूट साक्ष देणारांना किती दंड करावयाचा तें पुढें सांगतील. त्याप्रमाणें कूटसाक्षींना दंड करून पुनरपि व्यवहार सुरू करावा. अथवा एकदां वादाचा निर्णय झालेला असला तरी त्यांत कूट (खोट्या) साक्षी दिल्या गेल्या आहेत, असें कळतांच तो व्यवहार पुनः चालवावा. कारण मनूनें ( अ. ८ श्लो. ११७ ) तसें स्पष्ट सांगितलें आहे ७७.

पण साक्षी देणारांमध्यें विप्रतिपत्ति ( परस्पर विरुद्ध कथन ) झाली असतां निर्णय कसा करावा, तें सांगतात—

द्वैधे बहूनां वचनं समेषु गुणिनां तथा ।
गुणिद्वैधे तु वचनं ग्राह्यं ये गुणवत्तमाः ॥ ७८ ॥

साक्षी लोकांच्या सांगण्यांत द्वैध झालें असतां ( ह्मणजे ते परस्पर विरुद्ध साक्ष देऊं लागले असतां ) त्यांतील अधिक साक्षींचें वचन प्रमाण मानावें. पण विरुद्ध सांगणाऱ्या लोकांची संख्या समान असल्यास ( ह्मणजे चौघे साक्षी असून त्यांतील दोघे एक सांगतात व दुसरे दोघे निराळेंच सांगतात असें झाल्यास ) त्यांत जे गुणवान् असतील त्यांचें वचन प्रमाण समजावें. पण गुणी लोकांच्या सांगण्यांतच जर विप्रतिपत्ति होईल तर त्यांतल्या त्यांत जे अधिक गुणवान् (श्रुताध्ययनसंपन्न, त्यांतील विधींचें अनुष्ठान करणारे व धन-पुत्रादिसंपन्न) असतील त्यांचें

वचन ग्राह्य समजावें. पण ज्या वादांत गुणवान् साक्षी फार थोडे ( दोघे-तिघेच ) व इतर पुष्कळ असून त्यांच्या सांगण्यांत विप्रतिपत्ति होते, त्यांतही गुणवान् साक्षींचेंच वचन ग्राह्य होय.वादी व प्रतिवादी या दोघांनाही मान्य असलेला धर्मज्ञ एक साक्षीही ग्राह्य होतो.कारण गुणाचें आधिक्य मुख्य आहे. भेदांमुळें असाक्षी होतात म्हणून जें वर ( ६८ व ६९ श्लोकांच्या मिताक्षरासारांत ) सांगितलें आहे तें सर्व साक्षी सारख्या योग्यतेचे असून त्यांतील कोणामध्येंच कांहीं विशेष नसल्यास ग्राह्य समजावें ७८.

साक्षींनीं कसें सांगितलें असतां जय व कसें सांगितलें असतां पराजय होतो, तें सांगतात—

यस्योचुः स्तक्षिणः सत्यां प्रतिज्ञां स जयी भवेत् ॥
अन्यथावादिनो यस्य ध्रुवस्तस्य पराजयः ॥ ७९ ॥

ज्या वादीची द्रव्य-जाति-संख्या इत्यादिकांनीं विशिष्ट असलेली प्रतिज्ञा सत्य आहे, आह्मी जाणतों, आम्हांला माहीत आहे, हें खरें आहे असें साक्षी सांगतात तो ( वादी ) विजयी होतो. व ज्याची प्रतिज्ञा खोटी आहे, असें ते सांगतात त्याचा निश्चयानें पराभव होतो. पण ज्या व्यवहारांत विस्मरणादिकांमुळें साक्षी प्रतिज्ञात अर्थाचा भाव किंवा अभाव सांगूं शकत नाहींत त्याचा निर्णय निराळ्या प्रमाणानें करावा. राजानें साक्षीदारांना पुनः पुनः प्रश्न करूं नये. त्यांनीं स्वाभाविकपणें जें सांगितलें असेल त्याचेंच मात्र ग्रहण करावें ७९.

साक्षी ज्याच्या विरुद्ध सांगतात त्याचा निश्चयानें पराजय होतो, या नियमाचा अपवाद सांगतात—

उक्तेऽपि साक्षिभिः साक्ष्ये यद्यन्ये गुणवत्तमाः
द्विगुणा वान्यथा ब्रूयुः कूटाः स्युः पूर्वसाक्षिणः ॥८०॥

पूर्वोक्त लक्षणांनीं संपन्न असलेल्या साक्षींनीं प्रतिज्ञात अर्थाच्या विपरीत ( विरुद्ध ) आपला अभिप्राय सांगितला असतां जर त्यांच्याहून अधिक गुणवान् अथवा द्विगुण लोक त्यांच्याविरुद्ध ( म्हणजे प्रतिज्ञातार्थाच्या अनुकूल ) सांगूं ( साक्ष देऊं ) लागले तर पूर्वींचे ( पहिले ) साक्षीदार कूट म्हणजे मिथ्यावादी होतात.

पण यावर कोणी म्हणेल कीं, असें होणें योग्य नव्हे. कारण अर्थी, प्रत्यर्थी, सभ्य व सभापति यांनीं ज्यांचें परीक्षण केलें आहे अशा प्रमाणभूत साक्षीदारांनीं साक्ष दिल्यावर त्याकरितां आणखीं प्रमाण शोधूं लागल्यास अनवस्था दोषाचा प्रसंग येईल. नारदानेंही— ज्याप्रमाणें धान्य पिकल्यावर वृष्टीचे गुण निष्फळ होतात त्याप्रमाणें ज्या व्यवहारांचा निर्णय होऊन गेला आहे त्याविषयीं दुसरें प्रमाण निष्फळ होतें, असें सांगितलें आहे. तर त्याचें उत्तर सांगतों—जेव्हां अर्थीला प्रतिज्ञात अर्थाविषयीं निश्चय असून, त्याच्या विरुद्ध सांगणाऱ्या साक्षींचें

म्हणणें अप्रमाण वाटतें तेव्हां त्यांचे दोष पूर्वी प्रकट केलेले नसले तरी, निश्चित अर्थाचा विसंवाद झाल्याकारणानें तो त्यांच्याविषयीं दोषबुद्धि ठेवतो. यांच्यामध्यें कांहीं तरी कपट आहे, अशी कल्पना करतो. अशाप्रसंगी दुसऱ्या प्रमाणाचें निवारण करितां येत नाहीं. कारण ज्याचें कारण दुष्ट ( दोषयुक्त ) आहे किंवा ज्याच्या मिथ्यात्वाचा प्रत्यय आलेला आहे तो योग्य नव्हे, असें वचन आहे. अर्थात् नेत्रादि इंद्रियांतील दोषांचा निश्चय झालेला नसला तरी त्याच्या योगानें होणाऱ्या विषय दर्शनांत अंतर पडलेलें पाहून किंवा विपरीत दर्शनामुळें जशी त्यांतील दोषाची कल्पना होते त्याचप्रमाणें येथें समजावें. शिवाय साक्षींची परीक्षा करण्याविषयीं सांगून पुनः त्यांच्या वाक्यांची परीक्षा करण्याविषयीं सांगितलें आहे. त्यावरूनही हीच गोष्ट सिद्ध होते. साक्षिलक्षण क्रियाशुद्ध आहे, असें ठरलें म्हणजे मग त्यांच्या वाक्याचें परीक्षण करावें. सत्य अर्थाचें प्रतिपादन केल्यानें वाक्याचें शोधन होतें, 'सत्येन शुद्धयते वाक्यं' असें स्मृतिवचन आहे. यास्तव शुद्ध क्रिया व शुद्ध वाक्य, यांवरून जो शुद्ध आहे, असें ज्ञात होईल तोच शुद्ध होय, अशी ' न्यायवेत्यांची मर्यादा आहे, ' असें कात्यायनानेंही सांगितलें आहे. अर्थीनें आपण होऊन साक्षीदारांना जरी प्रमाण मानलें असलें तरी त्याचें अतिक्रमण करून दुसरी क्रिया प्रमाण करितां येते. कारण कात्यायनानें ' सभ्यांनीं ज्याचा निश्चय केल्यावर दुसऱ्या क्रियेचा अंगिकार करितां येत नाहीं, ' असें सांगितलें आहे. अर्थात् ज्याचा निश्चय होण्यापूर्वी दुसऱ्या क्रियेचा परिग्रह करितां येतो. नारदानेंही व्यवहाराचा निर्णय झाल्यावर प्रमाण अफल होतें, असें म्हटलें आहे. निर्णय होण्यापूर्वी नव्हे. तस्मात् साक्षीदारांनीं साक्ष दिली असली तरी तिच्या योगानें ज्याच्या चित्ताचें समाधान झालेलें नाहीं अशा अर्थीनें दुसऱ्या क्रियेचा अंगीकार करावा. आतां ज्यांनीं साक्ष दिली आहे त्यांच्याहून अधिक गुणवान् अथवा दुप्पट साक्षी असून त्यांचा निर्देशही पूर्वी केलेला आहे; पण ते जवळ नाहींत; असें झाल्यास त्या क्रियेंत त्यानांच प्रमाण करावें. साक्षी स्वाभाविकपणेंच जें सांगतील त्याचाच स्वीकार करावा, हा नियम सर्व व्यवहारास एकसारखाच लागू आहे. पूर्वी निर्देश केलेले साक्षी जरी नसले तरी अधिक गुणवान साक्षी मिळण्यासारखे असल्यास त्यांचेंच ग्रहण करावें; पण दिव्याचें ग्रहण करूं नये. कारण साक्षींचा संभव असल्यास दिव्य क्रियेचा अंगीकार करूं नये, असें स्मृतिवचन आहे. परंतु त्यांचाही असंभव झाल्यास दिव्य प्रमाण समजावें. त्यापुढेंही असंतुष्ट होणाऱ्या अर्थीनें निराळें प्रमाण हुडकीत बसूं नये. तर दिव्य करवून तो व्यवहार संपवावा.

आतां ज्या व्यवहारांत साक्षीदाराचें वचन प्रत्यर्थीच्या निश्चित प्रत्ययाच्या विरुद्ध असल्यामुळें त्याला अप्रमाण वाटतें व त्या कारणानें तो साक्षीदारांवर दोषारोप करून आपला असंतोष व्यक्त करतो त्या व्यवहारांत दुसऱ्या क्रियेला अवकाशच नसल्यामुळें न्यायाधीशानें मनुवचनाप्रमाणें ( अ. ८ श्लो. १०८ ) साक्षीदारांना सांगून त्यांच्या परीक्षणार्थ सात दिवसांची अवधि द्यावी. तितक्यांत साक्षीदारांना रोग, आग, ज्ञातिमरण, इत्यादि उत्पातांमुळें

आकस्मिक दुःख झाल्यास ते दोषयुक्त आहेत, असें ठरवून वादांतील ऋण वगैरे देववावें व वादाच्या महत्वाप्रमाणें दंडही करावा.

कोणी या श्लोकाचा अर्थ असा करतात—अर्थीनें दिलेले साक्षीदार त्याच्या अनुकूल सांगूं लागले असतां प्रत्यर्थी जर त्यांहून अधिक गुणवान् अथवा दुप्पट साक्षी द्यावयास तयार झाला व त्यांनीं पूर्वीच्या साक्षीदारांच्या विरुद्ध सांगितलें तर पूर्ववाद्याचे साक्षी कूट करतात. पण तो ( अर्थ ) बरोबर नाहीं. कारण प्रत्यर्थीची क्रियाच संभवत नाहीं. कारण आपल्या साध्य अर्थाचा जो निर्देश करतो तो अर्थी; व त्याच्या विरुद्ध त्याचा अभाव जो सांगतो तो प्रत्यर्थी; पण अभावाची सिद्धि भावाच्या सिद्धीची जशी अपेक्षा करते तशी भाव अभावाची अपेक्षा मुळींच करीत नाहीं. यास्तव भावालाच साध्यत्व असणें युक्त आहे. तस्मात् अभाववादी प्रत्यर्थीची क्रिया संभवत नसून भाववादी अर्थीचीच क्रिया संभवते. शिवाय उत्तराच्या अनुसार क्रिया सर्वत्र नियत केलेली आहे.प्राङ्न्यायकारण सांगितलें असतां प्रत्यर्थीनें क्रियानिर्देश करावा. मिथ्या उक्तीमध्यें पूर्ववाद्यानें क्रियानिर्देश करावा व ऋणादि मान्य केल्यास कोणाचीच क्रिया होत नाहीं. कोणत्याही एकाच व्यवहारांत दोघांच्या क्रिया संभवत नाहींत. यास्तव प्रतिवाद्यांचे अधिक गुणवान् अथवा दुप्पट साक्षी पूर्वसाक्षींच्या विपरीत सांगतील, हें म्हणणें युक्त नव्हे.

कोणी याचें असें व्याख्यान करितात—ज्या वादांत दोघेही भावप्रतिज्ञावादी असून त्यांतील प्रत्येक हें माझें दायादप्राप्त आहे असें सांगत असेल व त्याच्या सांगण्यावरून पूर्वापरकालाचा निश्चय होत नसेल; पण दोघांचेही साक्षी असतील तर त्यांतील कोणाच्या साक्षिदारांच्या साक्षी घ्याव्या अशी आकांक्षा झाली असतां जो पूर्वी निवेदन करील त्याचे साक्षी घ्यावे, असें साक्षात् ठरतें. पण त्याचाच हा आतां अपवाद सांगतात. पूर्ववादी व उत्तरवादी यांचे सारखेच ( सम गुण व सम संख्या यांनीं युक्त असे ) साक्षी असल्यास पूर्ववाद्याच्याच साक्षीदारांना साक्ष विचारावी. पण जेव्हां उत्तरवाद्याचे साक्षी अधिक गुणवान् व दुप्पट असतात तेव्हां प्रतिवाद्यांच्या साक्षीदारांची साक्ष घ्यावी. असें केल्यानें अभावाला साध्यता येत नाहीं. कारण असल्या वादांत दोघेही भाववादी असतात व प्रस्तुत उदाहरण पूर्वोक्त चार प्रकारच्या उत्तरांहून विलक्षण आहे. यास्तव यामध्यें क्रियेची व्यवस्थाही करावी लागत नाहीं. म्हणजे दुसऱ्याच्या मतीं ज्याप्रमाणें एका व्यवहारांत एकाच अर्थीच्या दोन क्रिया संभवतात त्याप्रमाणें वादी व प्रतिवादी यांच्या दोन क्रिया होण्यांतही कांहीं विरोध नाहीं.

पण हें व्याख्यान योगीश्वराला मान्य होण्यासारखें नाहीं. कारण ' उक्तेऽपि साक्षिभिः ' येथील अपि शब्द व हें प्रकरण यांवरून या अर्थाचा बोध होत नाहीं ८०.

कूटसाक्षी सांगितले. आतां त्यांना दंड किती करावा तें सांगतात—

पृथक्पृथग्दण्डनीयाः कूटकृत्साक्षिणस्तथा ।
विवादाद्द्विगुणं दण्डं विवास्यो ब्राह्मणः स्मृतः ॥ ८१ ॥

धन देणें इत्यादि उपायांनीं जो खोटे साक्षी करतो त्याला कूटकृत् म्हणतात व तसल्या साक्षीदारांना कूटसाक्षी म्हणतात. त्यांतील प्रत्येकाला वादांत पराजय पावणाराला जो दंड सांगितलेला असेल त्याच्या दुप्पट दंड करावा. पण कूटब्राह्मणाला दंड न करितां राष्ट्रांतून घालवून द्यावें. हा दुप्पट दंड लोभादि विशेष कारणांचें ज्ञान न झाल्यास व असलें कूट वारंवार करीत नसल्यासच उक्त आहे. पण या कूटकारानें लोभ, मोह, भय, मैत्री, काम, क्रोध, अज्ञान, मूर्खता इत्यादि विशेष कारणांमुळें हें कूट केलें आहे व असलीं कूटें करण्याची त्याला संवयच आहे, असें कळल्यास मनूनें ( अ. ८ श्लोक १२०, १२१ ) सांगितल्याप्रमाणें त्यास क्रमानें सहस्र, साहस दंड, मध्यम दंड, चतुर्गुण, दशगुण व त्रिगुण दंड, दोनशें, व शंभर ताम्रपण दंड करावा. पण त्या कूट करणाराला त्याची संवयच लागलेली असल्यास पूर्वोक्त दंड करून शिवाय क्षत्रियादिकांस कूटाच्या अनुसार हस्तच्छेदन, जिह्वाच्छेदन, ओंठ कापणें इत्यादि वधदंडही करावा व ब्राह्मणास दंड करून शिवाय राष्ट्रांतून घालवून द्यावें. अथवा त्याचीं सर्व वस्त्रें काढून घेऊन त्याला नग्न करवावें किंवा त्याचें घर पाडावें. ब्राह्मणालाही लोभादि विशेष कारणांचें ज्ञान न झाल्यास व त्याला तसलें कूट करण्याची संवय नसल्यास जागजागीं सांगितलेला नुस्ता दंड मात्र करावा व कूटाची त्याला संवय लागून गेलेली असल्यास द्रव्यदंड व विवासन हे दोन्ही दंड करावे. त्यांतून जाति, द्रव्य इत्यादि कूटांच्या अनुरोधानें विवासनाचा-राष्ट्रांतून घालविणें, नग्न करणें, घर पाडणें, इत्यादि निरनिराळा अर्थ करावा. ब्राह्मणानें क्षुल्लक गोष्टीकरितां कूटसाक्ष दिली असतां त्यालाही क्षत्रियादिकांप्रमाणें द्रव्यदंडच करावा; पण त्यानें एकाद्या मोठ्या गोष्टीविषयीं कूटसाक्ष दिल्यास त्याला देशांतून घालवावें. ब्राह्मणाला अर्थदंड नाहींच, असें समजूं नये. कारण तो नाहीं असें म्हटल्यास त्याच्या वधदंडाचा निषेध केलेला असल्यामुळें त्याच्या हातून थोडासाही अपराध घडल्यास नग्नीकरण, गृहभंग, राष्ट्रांतून घालविणें इत्यादि अधिक दंडाची प्राप्ति होईल. अथवा मुळींच दंड करतां येणार नाहीं; पण प्रायश्चित्त न करणाऱ्या चारी वर्णांच्या लोकांना धनासह धर्मास सोडून नसलेला शारीरदंड करावा, असें स्मृतिवचन आहे. मनूनेंही ' सुरक्षित ब्राह्मणींशीं बलात्कारानें गमन करणाऱ्या विप्रास सहस्र पण दंड करावा ' असें सांगितलें आहे. शंखानेंही-तीन वर्णांच्या लोकांना धनापहार, वध व बंधन करविणें आणि ब्राह्मणांना विवासन व चिह्न करणें हे दंड करावे असें जें सांगितलें आहे, त्यांतही धनापहार याचा अर्थ सर्वस्वहरण असा करावा. कारण वधदंडाबरोबर त्याचा पाठ आहे. शारीरदंडाची व्याप्ति अवरोधा ( अटक करण्या ) पासून ठार मारण्यापर्यंत व अर्थदंडाची एका कवडीपासून सर्वस्वहरणापर्यंत आहे. यास्तव अपराध करून त्याचें प्रायश्चित्त न केल्यास ब्राह्मणालाही धनदंड होतो, त्याला शारीर वधदंड मात्र होत नाहीं. कारण ब्राह्मणाला वधदंड करणें, यासारखा महान् अधर्म दुसरा कोणताही नाहीं, असें मनूनें सांगितलें आहे. यास्तव राजानें त्याला वधदंड करण्याचें मनांतही आणूं नये ८१.

**यः साक्ष्यं श्रावितोऽन्येभ्यो निह्नुते तत्तमोवृतः ।**
**स दाप्योऽष्टगुणं दण्डं ब्राह्मणं तु विवासयेत् ॥ ८२ ॥**

जो साक्षीदार होण्याचें कबूल करून दुसऱ्या साक्षीदारांसहवर्तमान साक्ष द्यावयास सांगितलें असतां रागादिकांच्या योगानें चित्त आक्रान्त झाल्यामुळें मी या वादांत साक्षी होत नाहीं, असें म्हणून साक्षीदारांतून निघून जाऊं लागतो त्याला विवादपराजय झाला असतां जो दंड सांगितला असेल त्याच्या आठपट दंड करावा. पण तो ( मागून नाकबूल होणारा ) ब्राह्मण असल्यास व आठपट दंड देण्यास समर्थ नसल्यास त्याला विवासित करावें. ( विवासनाचे नग्न करणें, गृहभंग व देशांतून घालविणें, हे तीन प्रकार वर सांगितलेच आहेत. अपराधाच्या महत्त्वानुसार त्याचा उपयोग करावा. ) ब्राह्मणेतरांना आठपट दंड देण्याचें सामर्थ्य नसल्यास त्यांना त्यांच्या जातीस उचित असें काम करावयास लावावें. अथवा खोडा घालावा. किंवा कारागारांत टाकावें. जर सर्वच साक्षीदार साक्ष द्यावयास नाकबूल झाले तर ते सर्वजण सारखे दोषी होतात. ते जेव्हां साक्ष देऊन पुनः तिच्या विरुद्ध बोलतात तेव्हां त्याच्या कारणानुसार त्यांस दंड करावा. एकानें दिलेल्या साक्षीदारांस दुसऱ्या कोणी एकान्तांत भेटून ( त्यांच्यांमध्यें ) भेद पाडूं नये ८२.

साक्षीदारांनीं साक्ष न देणें अथवा खोटें सांगणें, याचा सर्वत्र निषेध केला आहे. पण त्याचा आतां अपवाद सांगतात—

**वर्णिनां हि वधो यत्र तत्र साक्ष्यनृतं वदेत् ।**

ज्या वादांत सत्य भाषण केल्यानें शूद्र, वैश्य, क्षत्रिय व विप्र यांचा वध होण्याचा संभव असतो त्यांत साक्षीदारानें असत्य भाषण करावें, सत्य भाषण करूं नये. या सत्य वचनाच्या निषेधानें पूर्वी निषेध केलेल्या असत्य भाषणाला अथवा कांहींच न सांगण्याला अभ्यनुज्ञा दिली आहे. ज्या संशयिक अभियोगांत अथवा असल्याच दुसऱ्या एखाद्या अभियोगांत सत्य सांगितल्यास चारी वर्णांतील एखाद्या पुरुषाचा वध होत असून खोटें सांगितल्यास कोणाचाही वध होणार नसेल तर अशा प्रसंगीं खोटेंही बोलावें, अशी योगीश्वर अनुज्ञा देत आहेत. पण ज्या वादांत सत्य भाषण केल्यास अर्थी व प्रत्यर्थी यांतील एकाचा वध होत असून असत्य भाषण केल्यास दुसऱ्याचा वध होत असेल तर राजानें अनुमोदन दिल्यास कांहीं बोलूं नये. पण राजा कांहीं केल्यास सोडीतच नसेल तर इतर साक्षीदारांहून निराळेंच कांहीं तरी सांगून भेदामुळें आपल्याला असाक्षी करून घ्यावें, पण त्याचाही असंभव झाल्यास असत्यच सांगावें. कारण असत्य बोलल्यामुळें असत्य भाषणाचा दोष लागतो हें खरें; पण वर्णी पुरुषाच्या वधाचा दोष टळतो. आणि सत्यभाषण केल्यानें केवळ वर्णिवध दोष लागतो. यास्तव असत्य भाषण करून यथाशास्त्र प्रायश्चित्त करावें. पण त्यावर कोणी म्हणेल कीं, तर मग शास्त्राचीच अभ्यनुज्ञा असल्यामुळें असत्य भाषण करण्यांत व मुकाट्यानें बसण्यांत कांहीं दोष नाहीं ! यास्तव योगीश्वर म्हणतात—

**तत्पावनाय निर्वाप्यश्चरुः सारस्वतो द्विजैः ॥ ८३ ॥**

खोटें बोलणें अथवा मुळींच न बोलणें, या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या प्रत्यवायाच्या परिहारार्थ प्रत्येकानें निरनिराळा सारस्वत चरु करावा. ज्याची देवता सरस्वती असते त्याला सारस्वत चरु म्हणतात. स्थालींतून बाहेर न येतां आंतल्या आंत स्थंडिलस्थ अग्नीवर शिजलेल्या भाताला चरु म्हणतात. असो; या श्लोकाचा गूढार्थ असा—साक्षीदाराच्या अनृतवचनाचा व अवचनाचा जो निषेध केला आहे त्याचांच ही अनुज्ञा आहे. साक्षीदारानीं खोटें बोलूं नये अथवा साक्ष दिल्यावाचून राहूं नये, असें जें वर सामान्यतः सांगितलें आहे, त्याचें उल्लंघन करुन जर कोणी असत्य सांगितलें अथवा साक्ष देण्याचें नाकबूल केलें तर त्याला उद्देशून येथें हें प्रायश्चित्तही सांगितलें आहे. तथापि तेवढ्यावरुन-कांहीं विशेषप्रसंगीं साक्षीदारांच्या असत्य भाषणाला व अवचनाला जरी अनुज्ञा दिलेली असली तरी साधारण अनृतभाषण किंवा मुळींच न भाषण करणें, यांच्या निषेधाचें अतिक्रमण केल्यामुळें लागणारा दोष कांहीं केल्या नाहींसा होतच नाहीं. यास्तव हें अनुज्ञावचन व्यर्थ आहे, असें कोणी समजूं नये. कारण असत्य वचन व अवचन यांच्या निषेधाचें अतिक्रमण करुन साक्षीदारांनीं असत्य सांगितल्यास पुष्कळ दोष लागतो. व साधारण अनृतभाषण व अभाषण केल्यास थोडा दोष लागतो. यास्तव येथील अनुज्ञावचन व्यर्थ नाहीं. तर तें उपयोगाचेंच आहे. यद्यपि पुष्कळ प्रत्यवायाच्या निवृत्तीनें आनुषंगिक अल्प प्रत्यवायाची निवृत्ति आपोआप होत असते; तथापि येथें अनुज्ञावचन असल्यामुळें व प्रायश्चित्ताचें विधानही केलेलें असल्यामुळें मोठ्या प्रत्यवायाची निवृत्ति झाली तरी थोडासाही आनुषंगिक प्रत्यवाय निवृत्त होत नाहीं, असें सूचित होतें. वाटसरुंना कोणी व्याधादिकांनीं प्रश्न केला असतां व त्यांना गाय, वर्णालोक इत्यादिकांच्या वधाची शंका आली असतां त्यांनीं त्या हिंसकांस खुशाल असत्य सांगावें, त्याविषयीं हेंच अनुज्ञावचन प्रमाण आहे. असल्या असत्यवचनाचा प्रतिषेध केलेला नसल्यामुळें पान्थादिकांना प्रायश्चित्तही करावें लागत नाहीं. या वचनावरुनच-दुसऱ्या निमित्तानें अथवा दुसऱ्या वेळीं सत्यवार्ता जरी कळली तरी साक्षीदारांना व इतरांनाही असल्या असत्य भाषणाकरितां राजाला दंड करितां येत नाहीं-असें सूचित होतें ८३.

इति साक्षिप्रकरणम् ५.

---

# अथ लेख्यप्रकरणम् ६.



भुक्ति व साक्षी यांचें निरूपण केलें. आतां लेख्याचें निरूपण करतात—शासन व जानपद असें लेख्य दोन प्रकारचें आहे. त्यांतील शासनाचें निरूपण पूर्वी ( आचाराध्याय

श्लोक ३१८-२० ) केलें आहे. आतां जानपद लेख्याचें निरूपण करतों. तेंही स्वहस्तकृत व अन्यकृत असें दोन प्रकारचें आहे. त्यांतील पहिलें साक्षिरहित असलें तरी चालतें; पण दुसरें ( अन्यकृत ) लेख्य ससाक्षिकच असावें लागतें. या दोघांचेंही देशाचारानुसार प्रामाण्य असतें. असो; आतां त्यांतील अन्यकृत लेख्य सांगतात--

यः कश्चिदर्थो निष्णातः स्वरुच्या तु परस्परम् ।
लेख्यं तु साक्षिमत्कार्यं तस्मिन्धनिकपूर्वकम् ॥ ८४ ॥

धनिक व अधमर्ण यांचा जो एकादा (सुवर्णादि) अर्थ एकमेकांच्या स्वरुचीनें इतक्या कालानें,इतका,प्रतिमासिक,एवढ्या वृद्धीनें द्यावा अथवा घ्यावा असें ठरवून व्यवस्थित झालेला असतो त्याच्याच विषयीं पुढें कांहीं विरोध उपस्थित झाल्यास त्यांतील सत्यार्थाचा निर्णय व्हावा, यास्तव वर सांगितलेल्या लक्षणांनीं युक्त असलेल्या साक्षीदारांसह धनिकाचें नांव लिहून लेख्य करावें. अथवा नुस्ते उक्तलक्षण साक्षीदार करावे ८४.

समामासतदर्धाहर्नामजातिस्वगोत्रकैः ।
सब्रह्मचारिकात्मीयपितृनामादिचिह्नितम् ॥ ८५ ॥

संवत्सर, मास, पक्ष, तिथि, धनिक व अधमर्ण यांचीं नावें, ब्राह्मणादि जाति, वसिष्ठादि गोत्र यांनीं तें लेख्य चिह्नित असावें. त्याचप्रमाणें बह्वृचादि शाखाप्रयुक्त बह्वृच, कठ इत्यादि गौण नाम व धनिक आणि अधमर्ण यांच्या पित्याचें नांव यांणीं तें लेख्य चिह्नित असावें. श्लोकांतील आदिशब्दानें द्रव्याची जाति, संख्या, वार इत्यादि दुसऱ्याहि आवश्यक गोष्टींचा संग्रह करावा ८५.

समाप्तेऽर्थे ऋणी नाम स्वहस्तेन निवेशयेत् ।
मतं मेऽमुकपुत्रस्य यदत्रोपरि लेखितम् ॥ ८६ ॥

धनिक व अधमर्ण यांच्या स्वरुचीनें जो अर्थ व्यवस्थित झालेला असतो तो लिहून झाला असतां ऋणी ( अधमर्णा )नें आपल्या हातानें आपलें नांव व या लेख्यांत वर जें लिहिलें आहे तें मज अमक्याच्या पुत्राला मान्य आहे, असें त्या पत्रांत लिहावें ८६.

साक्षिणश्च स्वहस्तेन पितृनामकपूर्वकम् ।
अत्राहममुकः साक्षी लिखेयुरिति ते समाः ॥ ८७ ॥

त्याचप्रमाणें त्या लेख्यांत जे साक्षी लिहिलेले असतील त्यांतीलही प्रत्येकानें आपल्या पितृनामलेखनपूर्वक हा मी अमुक या अमुक व्यवहारामध्यें साक्षी आहें, असें आपल्या हातानें निरनिराळें लिहावें. साक्षी, संख्या व गुण यांनीं सम करावें. ( म्हणजे तीन, पांच इत्यादि विषम अथवा कांहीं गुणी व कांहीं अवगुणी असूं नयेत ) अधमर्ण किंवा साक्षी लिपि जाण-

णारे नसल्यास ( म्ह. त्यांस लिहावयास येत नसल्यास ) अधमर्णानें दुसऱ्याकडून व साक्षीदारानें दुसऱ्या लिपिज्ञ साक्षीदाराकडून सर्व साक्षीदारांसमक्ष आपापलें मत लिहवावें ८७.

उभयाभ्यर्थितेनैतन्मया ह्यमुकसूनुना ।
लिखितं ह्यमुकेनेति लेखकोऽन्ते ततो लिखेत् ॥ ८८ ॥

त्यानंतर तें लेख्य लिहिणारानें 'धनिक व अधमर्ण या उभयतांनींही प्रार्थना केल्यामुळें मीं विष्णुमित्राच्या देवदत्तसंज्ञक पुत्रानें हें लेख्य लिहिलें आहे' असें शेवटीं लिहावें ८८.

आतां पहिल्या प्रकारचें स्वकृत लेख्य सांगतात—

विना तु साक्षिभिर्लेख्यं स्वहस्तलिखितं तु यत् ।
तत्प्रमाणं स्मृतं लेख्यं बलोपधिकृतादृते ॥ ८९ ॥

अधमर्णानें जें लेख्य स्वहस्तानें लिहिलेलें असेल तें साक्षीदारावाचूनही प्रमाण होय. कारण मन्वादिकांनीं त्याला प्रमाण म्हटलें आहे. पण तें लेख्य बलात्कारानें किंवा छळ, लोभ, क्रोध, भय, मद इत्यादि उपधीनें लिहविलेलें नसावें. नारदानें—याशिवाय आणखी स्त्री, बाल, मत्त, उन्मत्त, अभियुक्त इत्यादिकांकडून लिहविलेलेंही लेख्य अप्रमाण म्हणून सांगितलें आहे. असो; आपल्या हातानें किंवा दुसऱ्याच्या हातानें लिहविलेलें हें लेख्य, देशाचारानुसार सबंधक किंवा अबंधक व्यवहारांतही, अर्थक्रमाचा लोप न करितां व लिपींतील अक्षरांचा लोप न करितां लिहिलेलें असलें म्हणजे झालें. त्यांतील शब्द चांगलेच असावे, त्यांत कवित्वगुण असावा इत्यादि दुसऱ्या कशाचीही त्यास अपेक्षा नाहीं. धनको व ऋणको यांच्या मातृभाषेमध्यें अर्थात् त्यांच्या देशभाषेनेंही तें लिहिलें तरी चालेल. कारण नारदानें 'देशाचारविरुद्धं यत्०' इत्यादि वचनांत तसें स्पष्टपणें सांगितलें आहे ८९.

लेख्याच्या प्रसंगानें लेख्यारूढही ऋण तीनच पुरुषांनीं द्यावें असें सांगतात—

ऋणं लेख्यकृतं देयं पुरुषैस्त्रिभिरेव तु ।

ज्याप्रमाणें साक्ष्यादि ठेवून घेतलेलें ऋण तिघांनींच द्यावें म्हणून सांगितलेलें आहे त्याप्रमाणें लेख्यकृत ऋणही स्वतः ऋण घेणारा, त्याचे पुत्र व त्याचेही पुत्र अशा तीन पुरुषांनींच द्यावें. प्रपौत्रादि चवथ्या पुरुषानें किंवा त्याच्या पुढील पुरुषांनीं तें देऊं नये. 'पुत्रपौत्रैर्ऋणं देयं०' या वचनानें सामान्यतः कोणतेंही ऋण तीन पुरुषांनीं द्यावें, असा जरी नियम केला आहे तरी त्याच उत्सर्गाच्या—पत्रारूढ ऋणाविषयीं दुसऱ्या स्मृतींत सांगितलेल्या अपवादाची प्राप्तशंका घालविण्याकरितां हें वचन आरंभिलें आहे. कारण कात्यायन व हारीत यांनीं क्रमानें 'एवं कालमतिक्रान्तं पितॄणां दाप्यते ऋणं' व 'लेख्यं यस्य भवेद्धस्ते लाभं तस्य विनिर्दिशेत्' या दोन सामान्य वचनांत लेख्यारूढ ऋण चवथ्या पुरुषापासूनही धनकोला प्राप्त होतें, असें

' पितृणां ' या बहुवचनान्त पदानें व ' लाभं तस्य विनिर्दिशेत् ' या पदांनीं सुचविलें आहे. यास्तव तशाप्रकारें उद्भवणाऱ्या शंकेचें निरसन करण्याकरितां हें वचन प्रवृत्त झालें आहे. वरील कात्यायनाच्या व हारीताच्या वचनांचीही योजना योगीश्वरांच्या या वचनाच्या अनुरोधानें करावी.

आतां याचाही अपवाद सांगतात--

आधिस्तु भुज्यते तावद्यावत्तन्न प्रदीयते ॥ ९० ॥

सबन्धक ( गहाणासह ) पत्रारूढ ऋणाविषयींही तिघांनींच तें द्यावें, असा नियम असल्यामुळें चवथ्या पुरुषाला ऋण फेडण्याचा जसा अधिकार नाहीं त्याचप्रमाणें बंधक परत घेण्याचाही अधिकार नाहीं, अशी प्राप्ति झाली असतां योगीश्वर म्हणतात--चवथ्या किंवा पांचव्या पुरुषानें ऋण जोंवर दिलेलें नसतें तोंवर धनको आधीचा उपभोग घेणारच. अर्थात असें म्हणणाऱ्या मुनीनें-सबंधक ऋण फेडण्याचा चवथ्या, पांचव्या इत्यादि पुरुषांनाही अधिकार आहे, असें सुचविलें. फलभोग्य आधि नष्ट होत नाहीं. असें जरी वर ( ५८ व्या श्लोकांत ) म्हटलें आहे तरी तें तीन पुरुषांविषयीं आहे आणि हें अपवादवचन चवथ्या पुरुषांविषयीं आहे. यास्तव हें जेथें उपस्थित होत नसेल तेथेंच त्याचा उपयोग होणार हें उघड आहे ९०.

असो, आतां हा प्रासंगिक विषय संपवून प्रकृत विषयाचें अनुसरण करतात--

देशान्तरस्थे दुर्लेख्ये नष्टोन्मृष्टे हृते तथा ।
भिन्ने दग्धेऽथवा छिन्ने लेख्यमन्यत्तु कारयेत् ॥ ९१ ॥

पत्र व्यवहारास असमर्थ झालें असतां दुसरें पत्र करावें, असें येथें विधान करतात. पत्र फार दूरच्या ( म्हणजे ज्याच्यामध्यें दुसरे देश, नद्या, पर्वत इत्यादि आहेत अशा ) देशांत असणें, त्यांतील अक्षरें संदिग्ध किंवा वाचतां न येण्यासारखीं असणें, कालवशात् लेख्य नष्ट होणें, शाई दुर्बल असल्यामुळें अक्षरें उडून किंवा पुसून जाणें, चोरादिकांनीं त्याचा अपहार करणें, कोणी त्याला फाडून सोडणें, अग्नींत पडून जळणें किंवा त्याचे दोन तुकडे होणें इत्यादि कारणांनीं लेख्य व्यवहारास असमर्थ झालें असतां दुसरें लेख्य करावें. पण वादी व प्रतिवादी यांचें परस्पर अनुमोदन असल्यासच हें होणार. त्यांच्यामध्यें विमत ( विप्रतिपत्ति ) झाल्यास अर्थातच व्यवहाराची प्राप्ति होते. अशा प्रसंगीं तें पत्र दुसऱ्या देशामध्यें असल्यास तें आणावयास मार्गांतील अंतर व पर्वतादि प्रदेश यांचा विचार करून योग्य काल द्यावा. तें ( पत्र ) फार कठिण जागीं असल्यास अथवा नष्ट झाल्यास साक्षींच्या योगानेंच व्यवहाराचा निर्णय करावा. नारदानेंही ' लेख्ये देशांतरन्यस्ते० ' इत्यादि वचनांत हेंच सांगितलें आहे. पत्र दुसऱ्या देशीं विद्यमान असल्यास तें आणावयास योग्य अवधि द्यावा व तें मुळीं नाहींसेंच झालें असल्यास त्याला पाहिलेल्या साक्षीदारांच्या साक्षीवरून व्यवहाराचा निर्णय करावा; पण त्याला पाहि-

लेले साक्षीदारही नसल्यास दिव्याच्या योगानें निर्णय करावा. कारण ' लेख्य व साक्षी यांच्या अभावीं व्यवहारांत दैवी क्रियेचा आश्रय करावा ' असें स्मृतिवचन आहे. जानपद व्यवस्थापत्राविषयीं हें विवेचन झालें. राजकीय व्यवस्थापत्रही अशाच प्रकारचें असतें. त्यांत एवढा मात्र विशेष असतो–तें राजपत्र राजाच्या स्वहस्ताक्षरानें युक्त, त्याच्या मुद्रेनें चिह्नित, व सर्व अर्थांमध्यें साक्षीसह असावें लागतें. वृद्धवसिष्ठानें दुसरेंही राजकीय जयपत्र असें सांगितलें आहे– ज्याच्यामध्यें जसा असेल तसाच, साध्यार्थ लिहिलेला आहे, जें उत्तर क्रियेसह आहे व जें निश्चयासह आहे तेंच जयपत्र होय. ( म्ह. त्यांत साध्यार्थ प्रतिवादीचें उत्तर व निर्णय यांचा निर्देश असावा. ) त्याच्यावर प्राड्विवाकादिकांचें हस्तचिह्न व राजमुद्रा असावी व अर्थ सिद्ध झाला म्हणजे तें विजयी होणाऱ्या पुरुषास द्यावें. सभासदांनींही त्यावर आपलें हस्ताक्षर ( सही ) करावें. कारण मनूनें " सभेंतील स्मृतिशास्त्रज्ञ सभासदांनीं लेख्यामध्यें स्वहस्त द्यावा. " असें सांगितलें आहे. पण कोणताही व्यवहार सभासदांच्या परस्पर अनुमतीवाचून निःशल्य ( निर्णीत ) होत नाहीं. कारण " नारदानें सभेंतील सर्व सभासदांनीं ज्याला ' हा योग्य न्याय आहे. ' असें म्हटलें असेल तोच निःशल्य व्यवहार होय. त्यावांचून बाकीचा सर्व सशल्य आहे, " असें म्हटलें आहे. पण हें चतुष्पादव्यवहारालाच लागू आहे. कारण ' अन्यवादी ( भलतेंच उत्तर देणारा ) ' क्रियेचा द्वेष करणारा, सभेंत येऊन उभा न राहणारा निरुत्तर होणारा व बोलाविलें असतां पळून जाणारा, असे हे पांच प्रकारचे लोक हीन होत. या वचनांत सांगितल्याप्रमाणें ज्या व्यवहारांत हीनता प्राप्त झाली असेल त्यांत जयपत्र देऊं नये तर हीन पत्र द्यावें. तें कालांतरीं हीन पुरुषाला दंड देण्याच्या उपयोगीं पडतें. पण जयपत्र प्राड्न्यायविधींची सिद्धि करण्याच्या उपयोगी असतें. हाच हीनपत्र व जयपत्र यांत विशेष आहे ९१.

आतां लेख्याविषयीं संदेह आला असतां निर्णय कोणत्या निमित्तांनीं करितां येतो, तें सांगतात—

संदिग्धलेख्यशुद्धिः स्यात्स्वहस्तलिखितादिभिः ।
युक्तिप्राप्तिक्रियाचिह्नसंबन्धागमहेतुभिः ॥ ९२ ॥

हें लेख्य शुद्ध आहे कीं अशुद्ध ? असा संदेह आला असतां स्वहस्तलिखितादिकांच्या योगानें त्याची शुद्धि होते. ( म्हणजे स्वहस्तानें लिहिलेला जो दुसरा लेख त्याच्या योगानें त्या संदेहाची निवृत्ति होते. कारण पहिल्या लेखाचीं व या ताज्या लेखाचीं अक्षरें जर एकसारखीं असलीं तर लेख्याची शुद्धि होते. ) ' लिखितादि ' येथील आदिशब्दानें साक्षीदार, लेखक इत्यादिकांनीं हातानें लिहिलेलें अक्षर घ्यावें. कारण त्यांचें या दुसऱ्या लेख्यांतील अक्षर पहिल्या अक्षरांशीं जुळत असल्यास, लेख्यशुद्धि होते. त्याचप्रमाणें युक्तीनें प्राप्ति, क्रिया ( त्याच्या साक्षीदारांचा उपन्यास ), श्रीकारादि असाधारण चिह्न, अर्थी व प्रत्यर्थी यांचा पूर्वीही परस्पर विश्वासानें दानग्रहणादि संबंध व इतकें द्रव्य याच्यापाशीं असणें संभवतें, कारण त्याच्या प्राप्तीचा उपाय याच्यापाशीं आहे, अशा प्रकारचा आगम यांच्या योगानें ( या

हेतूंनीं ) संदिग्ध लेख्याची शुद्धि होते. ( वर युक्ति व प्राप्ति असे दोन पारिभाषिक शब्द आले आहेत. यास्तव त्यांचा अर्थ सांगतो--या देशीं, या कालीं, या पुरुषाचें हें द्रव्य संभवतें ही युक्ति व त्या युक्तींनें प्राप्ति म्हणजे देश-काल-पुरुषांचा द्रव्याशीं संबंध. ) असो; पण लेख्याविषयीं संदेह येऊन त्याचा निर्णय वरील युक्तिप्राप्ति इत्यादि हेतूंनींही न झाल्यास तो साक्षीच्या योगानें करावा. कारण कात्यायनानें तसें सांगितलें आहे. परंतु त्याचें तें वचन साक्षींचा संभव असला तरच प्रवृत्त होतें, आणि त्यांचा असंभव झाल्यास हारीताच्या वचनाप्रमाणें दिव्यानें निर्णय करावा ९२.

असो; याप्रमाणें पत्राचें शोधन होऊन ऋणकोला ऋण देणें प्राप्त झालें. पण तो सर्व ऋण देण्यास असमर्थ आहे. तर अशा प्रसंगीं काय करावें—असा प्रश्न उपस्थित झाला असतां सांगतात—

लेख्यस्य पृष्ठेऽभिलिखेद्दत्वा दत्वर्णिको धनम् ।
धनी वोपगतं दद्यात्स्वहस्तपरिचिह्नितम् ॥ ९३ ॥

जेव्हां ऋणी सर्व ऋण देण्यास असमर्थ असेल तेव्हां त्यानें शक्त्यनुसार थोडें थोडें ऋण देऊन पूर्वी केलेल्या लेख्याच्या मागच्या बाजूस मीं आज इतकें ऋण दिलें, असें लिहावें व उत्तमर्णानेंही धन परत मिळालें असेल तेवढ्याचाच उल्लेख करून त्याच लेखाच्या मागच्या बाजूस ' मला इतकें धन आज परत मिळालें ' असें लिहावें. दोघांनींही स्वहस्तलिखित अक्षरांचें चिह्न करावें. किंवा उत्तमर्णानें ऋणकोला स्वहस्ताक्षरानें चिह्नित केलेलें प्रवेशपत्र ( पावती ) द्यावें ९३.

सर्व ऋण देऊन झाल्यावर लेख्याचें काय करावें, तें सांगतात—

दत्वर्णं पाटयेल्लेख्यं शुद्ध्यै वान्यत्तु कारयेत् ।

क्रमानें किंवा एकदांच सर्व ऋण देऊन झालें म्हणजे पूर्वी केलेलें लेख्य फाडावें. पण तें हातीं न येण्यासारख्या दुर्गप्रदेशीं असल्यास अथवा नष्ट झाल्यास अधमर्णानें उत्तमर्णाकडून आपल्या शुद्धीकरितां ( म्हणजे आपलें अधमर्णत्व निवृत्त व्हावें म्हणून ) दुसरें लेख्य करून घ्यावें. ( पूर्वोक्त क्रमानें उत्तमर्णानें अधमर्णास विशुद्धिपत्र द्यावें, असा याचा इत्यर्थ. )

ससाक्षिक ऋण सर्व द्यावयाचें असतां काय करावें तें सांगतात—

साक्षिमच्च भवेद्यद्वा तद्दातव्यं ससाक्षिकम् ॥ ९४ ॥

जें ससाक्षिक ऋण असेल तें त्या पूर्वसाक्षीदारांच्या समक्षच परत द्यावें ९४.

इति लेख्यप्रकरणम् ६.

---

# अथ दिव्यप्रकरणम् ७.



लिखित, साक्षी व भुक्ति एतद्रूप त्रिविध मानुष प्रमाण सांगितलें. आतां अवसरप्राप्त दिव्य प्रमाण सांगावयास आरंभ करावयाचा असतां अगोदर पहिल्या पांच श्लोकांनीं दिव्यमातृका सांगतात. त्यांतल्या त्यांत प्रथम दिव्यांचा नामनिर्देश करितात—

**तुलाग्न्यापो विषं कोशो दिव्यानीह विशुद्धये ।**

तुला, अग्नि, जल, विष, व कोश हीं पांच दिव्यें या धर्मशास्त्रांत शुद्धीकरितां ( संदिग्ध अर्थांतील संदेह निवृत्त होण्याकरितां ) द्यावीं. पितामहस्मरणावरून तांदुळ व तापलेले उडीद हींही दुसरीं दिव्यें आहेत, असें ठरतें. तेव्हां तुह्मी पांचच दिव्यें कशीं म्हणतां असें कोणी विचारील म्हणून सांगतात—

**महाभियोगेष्वेतानि शीर्षकस्थेऽभियोक्तरि ॥ ९५ ॥**

हीं पांच दिव्यें महा अभियोगामध्येंच द्यावीं, क्षुद्र अभियोगांत देऊं नयेत, असा नियम येथें केला आहे. दिव्यें काय तीं इतकींच आहेत, याहून अधिक नाहींत, असें सांगितलेलें नाहीं. महत्वाची अवधि पुढें ( श्लोक ९९. ) सांगतील. 'कोशमल्पेऽपि दापयेत्' असें स्मृतिवचन आहे, व त्यावरून अल्प अभियोगांतही कोशाचें दिव्य होतें, हें खरें. पण कोशाचा तुलादिकांबरोबर जो पाठ केला आहे, तो कोश मोठ्या ( महत्वयुक्त ) अभियोगामध्येंच द्यावा; असा नियम करण्यासाठीं नव्हे तर सावष्टंभ अभियोगांतही त्याची प्राप्ति व्हावी ह्मणून ( त्याचा पाठ ) केला आहे. नाहीं तर त्याचा उपयोग नुसत्या शंकाभियोगांतच झाला असता. कारण 'अवष्टंभाभियुक्तानां०' इत्यादि वचनांत 'ज्यांच्यावर अवष्टंभाचा अभियोग झाला आहे त्यांना तुलादि दिव्यें करावयास सांगावें आणि शंकाभियोगांत तांदूळ व कोश हीं दिव्यें करवावीं' असें सांगितलें आहे, आतां 'शीर्षकस्थेऽभियोक्तरि' या चवथ्या चरणांत, या श्लोकांतील पांचही दिव्यांची सर्व अभियोगांत एकसारखीच प्राप्ति झाली असतां, अपवाद सांगतात—हीं तुलादि दिव्यें अभियोक्ता शीर्षकस्थ असतांना अभियुक्ताला करावीं लागतात. ( अभियोक्ता म्हणजे आरोप करणारा वादी व अभियुक्त म्हणजे ज्याच्यावर आरोप केला आहे तो आरोपी, प्रतिवादी. ) शीर्षक म्हणजे शिर. व्यवहाराचा जयपराजय लक्षण चवथा पाद. त्यावरून दंड लक्षित होतो. तसल्या दंडांत जो राहतो तो शीर्षकस्थ ( म्हणजे अभियोक्ता त्यामुळें होणाऱ्या दंडाला पात्र होण्यास तयार असला तर आरोपी दिव्य करतो ) ९५.

या अध्यायाच्या सातव्या श्लोकांत 'ततोऽर्थी लेखयेत्०' इत्यादि अर्धानें भावप्रतिज्ञावाद्याचीच क्रियाव्यवस्था दाखविली आहे. आतां तिचा अपवाद सांगतात—

**रुच्या वान्यतरः कुर्यादितरो वर्तयेच्छिरः ।**

अभियोक्ता व अभियुक्त यांच्या परस्पर संगतीनें त्यांतील कोणी तरी एकानें दिव्य करावें व दुसऱ्यानें शिर म्हणजे शारीर किंवा द्रव्यदंड अंगीकार करावा. या सांगण्याचा गूढार्थ असा—मानुषप्रमाणाप्रमाणें दिव्यप्रमाण केवल भावगोचरच असूं शकत नाहीं. तर तें भाव व अभाव यांना एकसारखेंच विषय करतें. यास्तव मिथ्योत्तर, प्रत्यवस्कंदन व प्राङ्न्याय यांमध्यें अर्थी व प्रत्यर्थी यांतील कोणातरी एकाच्या इच्छेनें दिव्य होतें. असो, अल्पाभियोगांत, महाभियोगांत, शंकाभियोगांत आणि सावष्टंभयोगांतही सामान्यतः कोश होतो, असें सांगितलें. तसेंच तुलेपासून विषापर्यंत जीं दिव्यें तीं तर महाभियोग व सावष्टंभाभियोग यांमध्येंच होतात, असाही नियम दाखविला. आतां त्यांतील 'अवष्टंभाभियोगामध्येंच' असें जें म्हटलें आहे त्याचाच तेवढा अपवाद सांगतात—

**विनाऽपि शीर्षकात्कुर्यान्नृपद्रोहेऽथ पातके ॥ ९६ ॥**

राजद्रोहाची शंका किंवा ब्रह्महत्यादि-पातकांची अभिशंका, यांमध्यें शिरःस्थायी वाचूनही तुलादि दिव्यें करावीं. महाचौर्याच्या अभिशंकेंतही तीं करणें उचित होय. कारण त्याविषयीं स्मृतिवचन आहे. अल्पचौर्याच्या शंकेमध्यें तंदुलांचे दिव्य करावें. महाचौर्याविषयीं शंका आल्यास तप्त माष द्यावे. बाकीच्या शपथा वगैरे अल्प द्रव्याविषयीं आहेत. 'प्रायः सर्व अभियोगांमध्यें सत्य, वाहनें, शस्त्रें, गाई, बीज, सोनें, पुत्र, स्त्रिया व सुहृद यांचीं मस्तकें यांस स्पर्श करावा व शपथ घ्यावी, असें मनूनें सांगितलें आहे.' असें नारदाचें म्हणणें आहे. मानुषप्रमाणानें ज्याचा निर्णय होण्यासारखा नाहीं त्याचा निर्णय करणारें जें तें दिव्य होय, अशी लोकप्रसिद्धि असल्यामुळें शपथांनाही दिव्यत्व जरी आहे तरी त्या ( शपथा ) कालान्तरीं निर्णयाचें निमित्त होतात. यास्तव, तात्काल निर्णयनिमित्त होण्यास समर्थ असलेल्या तुला—प्रभृति दिव्यांहून त्यांचा पृथक् निर्देश केला आहे. कोश हें दिव्यही शपथच असल्यामुळें इतर शपथांप्रमाणें तेंही तत्काल निर्णयनिमित्त होत नाहीं. तथापि महाभियोग व अवष्टंभाभियोग यांमध्यें त्याचा उपयोग होत असल्यामुळें तुलादिकां ( तत्काल निर्णयनिमित्तें होणाऱ्या दिव्यां ) शीं त्याचें साम्य आहे व त्यामुळें त्यांच्याबरोबर याची गणना केली आहे. तंदुल व तप्तमाष हीं दिव्यें तत्काल निर्णयाचीं निमित्तें होतात खरीं; पण तीं अति अल्प अपराधाच्या शंकाप्रसंगीं करावयाचीं असल्यामुळें तुलाप्रभृति दिव्यांत गणलीं नाहींत. हीं सर्व दिव्यें व शपथा यांची—जेथें ज्याचा जसा संभव असेल त्याप्रमाणें ऋणादि विवादामध्येंही योजना करावी. 'स्थावरेषु विवादेषु दिव्यानि परिवर्जयेत्' असें जें पितामहाचें वचन आहे त्याचेंही, लिखित-सामंत इत्यादि इतर प्रमाणें असल्यास दिव्यें वर्ज करावीं, असें व्याख्यान करावें. कोणत्याही वादांत लिखितादि प्रमाणें असल्यास दिव्यांना अवकाशच नसतो हें खरें; पण ऋणादि विवादामध्यें अर्थीनें उक्तलक्षण साक्षी वगैरे दिले असले तरी प्रत्यर्थी जर 'मी खोटा ठरलों तर इतका दंड देईन' असें कबूल करून दिव्य करीत असेल तर तें त्याला करूं द्यावें. कारण कदाचित् साक्षीदारांच्या पक्षपातादि दोषांमुळें जर अन्याय होत असला तर तो असल्या निर्दोष दिव्यामुळें टळण्याचा संभव असतो. कारण दिव्य स्वभावतःच निर्दोष

असल्यामुळें सदा वस्तुतत्त्वालाच विषय करतें आणि धर्माचें तेंच ( वस्तुतत्त्वच, सत्यार्थच लक्षण आहे. ' स्थावर विवादांमध्यें प्रत्यर्थीनें दंड देण्याचें मान्य करून जरी दिव्याचें अवलंबन केलें तरीही सामन्तादि दृष्ट प्रमाण असल्यास दिव्याचें ग्रहण करूं नये, ' या विकल्पाचें निराकरण करण्यास्तव ' स्थावरेषु विवादेषु० ' इत्यादि पितामहवचन प्रवृत्त झालें आहे. तें दिव्याचें सर्वथा निराकरण करण्यास प्रवृत्त झालेलें नाहीं. कारण तसें म्हटल्यास स्थावर वादांत लिखित-सामन्तादिकांचा अभाव असल्यास निर्णयच न होण्याचा प्रसंग येईल ९६.

**सचैलं स्नातमाहूय सूर्योदय उपोषितम् ।**
**कारयेत्सर्वदिव्यानि नृपब्राह्मणसन्निधौ ॥ ९७ ॥**

पूर्व दिवशीं ज्यानें उपवास केला आहे व सूर्योदय होतांच ज्यानें सचैल स्नान केलें आहे अशा दिव्य करणाराला बोलावून राजाच्या, सभ्यांच्या व ब्राह्मणांच्या सन्निध प्राड्विवाकानें त्याच्याकडून सर्व दिव्यें करवावीं. तीन दिवस किंवा एक दिवस उपोषण केलेल्या, ओलेत्या पुरुषाकडून दिव्य करवावें, असें जें पितामहानें सांगितलें आहे त्याची बलवत्, अबलवत्, महाकार्य, अल्पकार्य इत्यादि विषयानुसार व्यवस्था करावी. उपवासाचा नियम दिव्य करविणाऱ्या न्यायाधीशालाही लागू आहे. कारण ' यज्ञामध्यें जसा अध्वर्यु त्याप्रमाणें राजाच्या आज्ञेनें प्राड्विवाकानें दिव्यामध्यें सर्व कार्यें करावीं. ' असें पितामहाचें वचन आहे. या श्लोकांत सूर्योदये असें जरी सामान्यतः सांगितलें आहे तरीं रविवारीं दिव्यें करावीं. कारण तसा शिष्टाचार आहे. त्यांतूनही धर्मतत्वाची इच्छा करणाऱ्या पुरुषानें पूर्वाह्णीं अग्निपरीक्षा, तुला व कोशसिद्धि, मध्याह्नीं जल व रात्रीच्या सुशीतल चवथ्या प्रहरीं विष द्यावें. असा पितामहानें विशेष सांगितला आहे. तंदुल, तप्त माष इत्यादि ज्यांविषयीं विशेष काल सांगितलेला नसेल तीं दिव्यें पूर्वाह्णसमयींच करावीं. कारण नारदाचें तसें सामान्यवचन आहे. दिवसाचे तीन भाग केले असतां त्यांतील पाहिला पूर्वाह्ण, दुसरा मध्याह्न व तिसरा अपराह्ण समजावा. तसाच विधि-निषेधमुखानें दुसराही कालविशेष सांगितलेला आहे. विधिमुख विशेष असा-अग्नीचें दिव्य शिशिर, हेमन्त व वसंत या तीन ऋतूंत करावें. शरत् व ग्रीष्म यांत जल दिव्य करावें. हेमन्त व शिशिर यामध्यें विषदिव्य करावें आणि चैत्र, मार्गशीर्ष व वैशाख हे साधारण मास दिव्याचे अविरोधी आहेत. कोश सर्वदा द्यावा. तुला कोणत्याही कालीं देतां येते. कोशाबरोबर सर्व शपथांचेंही ग्रहण करावें. तंदुलांविषयीं कांहींच विशेष सांगितलेला नसल्यामुळें त्यांचें दिव्य सर्वकाळीं होतें. निषेधमुख काल विशेष असा-शीतकालीं जलसिद्धि करवूं नये. ग्रीष्म समयीं अग्निशोधन करणें युक्त नव्हे. वर्षासमयीं ( पावसाळ्यांत ) विष देऊं नये; वारा मोठ्यानें वहात असल्यास तुला दिव्य करावयास सांगूं नये, अपराह्ण, संध्याकाळ व मध्याह्न यासमयीं दिव्य करूं नये. असो; या सर्व निषेधांचें प्रयोजन पुढें सांगूं ९७.

आतां अधिकारिव्यवस्था सांगतात—

तुला स्त्रीबालवृद्धान्धपङ्गुब्राह्मणरोगिणाम् ।
अग्निर्जलं वा शूद्रस्य यवाः सप्त विषस्य वा ॥ ९८ ॥

जाति, वयोवस्था इत्यादि विशेषांकडे न पाहतां सामान्यतः कोणतीही स्त्री, जातीकडे लक्ष न देतां सोळा वर्षांच्या आंतील कोणताही बालक, ऐंशीं वर्षांनंतरचा वृद्ध, अंध, पांगळा, जातीचा ब्राह्मण व रोगी, यांच्या शोधनार्थ तुलादिव्याचाच उपयोग करावा. अग्नि, फाल व तप्त माष हीं दिव्यें क्षत्रियांस सांगितलेलीं आहेत. वैश्याला केवळ जलच व सातच विषाचे यव शूद्राच्या शोधनार्थ सांगितलेले आहेत. पण येथें ब्राह्मणाकरितां तुलेचें विधान केलेलें असल्यामुळें व शूद्राला सात विषय सांगितलेले असल्यामुळें बाकी राहिलेलीं अग्नि व जल हीं दोन दिव्यें बाकी राहिलेल्या क्षत्रिय व वैश्य यांच्याकरितां असणेंच युक्त होय. पितामहानेंही असेंच स्पष्ट केलें आहे. ' सव्रतानां भृशार्तानां० ' इत्यादि वचनांत धर्माची जर अपेक्षा असेल तर व्रतयुक्त पुरुष, अतिशय आर्त पुरुष, व्याधित, तपस्वी व स्त्रिया यांना दिव्य देऊं नये, असें म्हणून स्त्रियादिकांना दिव्यांचा जो अभाव सांगितला आहे तो ' तद्रुच्या वान्यतरः कुर्यात् ' म्हणजे दिव्य करणाराच्या रुचीप्रमाणें यांतील एकादा प्रकार करावा, या विकल्पाची निवृत्ति करण्यासाठीं आहे. याचा तात्पर्यार्थ असा—अवष्टंभाभियोगांत स्त्री ( व बालादि ) अभियोग करणारीं असल्यास अभियोज्यांनींच ( आरोपींनींच ) दिव्य करावें. स्त्री, बाल इत्यादि अभियोज्य असले तरीही त्यांच्यावर आरोप करणारांनाच दिव्य करणें भाग आहे. परस्परांवर अभियोग केलेला असल्यास विकल्प समजावा. ( म्हणजे पाहिजे तर त्यांतील अभियोक्त्यांनीं दिव्य करावें किंवा अभियोज्यांनीं करावें. ) पण अशा प्रसंगीं स्त्री, बाल इत्यादिकांना तुला–दिव्यच करावयास लावावें. त्याचप्रमाणें महापातकादिकांच्या शंकेचा अभियोग असतांही स्त्रियादिकांना तुलाच द्यावी. पण हें वचन सर्व दिव्यांस साधारण अशा मार्गशीर्ष, चैत्र व वैशाख या महिन्यांत स्त्रीप्रभृतींस सर्व दिव्यांची प्राप्ति झाली असतांही तुलेचाच नियम करीत असल्यामुळें अर्थवत् ( उपयोगाचें ) आहे. परंतु स्त्रियादिकांना सर्वकाळींच तुलाच उक्त आहे, ( त्यावाचून त्यांना दुसरें दिव्यच नाहीं, ) असें त्यावरून होत नाहीं. कारण ' स्त्रीणां च न विषं प्रोक्तं० ' इत्यादि वचनांत विष व जल यांस सोडून तुला कोश, अग्नि, इत्यादिकांच्या योगानें त्यांच्या शुद्धीचें विधान केलें आहे. बालकादिकांविषयींही अशीच योजना करावी. ब्राह्मणादिकांना उद्देशूनही सर्वकाळीं तुलादिकांचा नियम केलेला नाहीं. कारण ' सर्व वर्णांच्या लोकांना उद्देशून कोशशुद्धीचें विधान केलें आहे. ' व ' हीं सर्व दिव्यें सर्वांना उद्देशून सांगितलीं आहेत. पण ब्राह्मणांना विषावाचून इतर सांगावीं. ' असें पितामहाचें वचन आहे. यास्तव साधारणसमयीं अनेक दिव्यांची प्राप्ति असतां तुलादिकांचाच नियम करण्याकरितां हें वचन आहे. इतर समयीं सर्वांनाच त्या त्या कालास योग्य असें दिव्य सांगावें. जसें–वर्षाकाळीं सर्वांनाच अग्नि, हेमन्त व शिशिर या ऋतूंत क्षत्रियादि तीन वर्णांच्या लोकांना अग्नि किंवा विष, ब्राह्मणाला नुस्ता अग्निच, विष कधींही नव्हे; ग्रीष्म व शरत् यांमध्यें जलच दिव्य करवावें. दुसरें करवूं नये. विशेष व्याधींना उद्देशूनही अग्न्यादि

दिव्यांचा निषेध केला आहे. तो असा--कुष्ठरोगानें पीडलेल्या कडून अग्नि दिव्य करवूं नये. श्वास व कास यांनीं ग्रस्त झालेल्यांना जलदिव्य वर्ज आहे. पित्त व श्लेष्मा यांनीं युक्त असलेल्या पुरुषांना विष सदा वर्ज समजावें. अर्थात् अशा रोगग्रस्तांकडून अग्न्यादिकांच्या वेळींही तुलादि सामान्य दिव्यच करवावें. त्याचप्रमाणें 'जल, अग्नि व विष बलाढ्य पुरुषांनाच द्यावें' असें वचन असल्यामुळें दुर्बलांनाही ऋतु-काल इत्यादिकांचा अतिक्रम न करितां जाति, वय, अवस्था इत्यादि-संबंधीं दिव्यें द्यावीं ९८.

महाभियोगांस ज्याची अपेक्षा आहे त्या महत्त्वाचें आतां वर्णन करितात—

**नासहस्राद्धरेत्फालं न विषं न तुलां तथा ।**

सहस्र पणांपेक्षां कमी मूल्याचा वाद असल्यास त्यांत फाल, विष, किंवा तुला करवूं नये. त्यांच्यामध्यें असलेल्या जलाचाही निषेध समजावा. कारण 'तुलादीनि विषान्तानि गुरुष्वर्थेषु दापयेत्' म्हणजे तुलेपासून विषापर्यंत दिव्यें मोठ्या अर्थामध्यें करवावीं, असें वचन आहे; पण त्यांत कोशाचें ग्रहण करूं नये. कारण 'कोशमल्पेऽपि दापयेत्' म्हणजे कोश अल्प अर्थांतही करवावा, असें स्मृतिवचन आहे. सारांश फाल, विष, तुला व जल हीं चार दिव्यें सहस्रपणाच्या पुढेंच होतात. पूर्वीं होत नाहींत. पितामहानें 'सहस्रपणांच्या वादांत तुला, अर्ध सहस्रपणांच्या वादांत लोखंड, अडीचशें पणांच्या वादांत जल व सव्वाशें पणांच्या वादांत विष द्यावें.' असें सांगितलें आहे हें खरें; पण त्याची व्यवस्था अशी करावी-ज्या द्रव्याचा अपहार केला असतां पतित होण्याचा प्रसंग येतो, त्याविषयीं पितामहाचें वचन आहे. व इतर द्रव्याविषयीं योगीश्वरांचें हें वचन आहे. हीं दोन्हीं वचनें चोरी व साहस यांविषयीं आहेत. अपह्नवाविषयीं कात्यायनानें असा विशेष दाखविला आहे. ज्या वादांत दिलेल्या द्रव्यादि पदार्थांचा अपह्नव ( दिलाच नाहीं अशी नाकबूली ) केला जात असेल त्यांत त्या पदार्थांच्या प्रमाणाची कल्पना करावी, व हेम ( सुवर्ण ) प्रमाण निश्चित करून दिव्याची योजना करावी. सुवर्ण प्रमाणाची संख्या ठरवून शंभर सुवर्णांचा अपह्नव केला असेल तर तो करणाराला विष, ऐशीं सुवर्णांचा अपलाप करणाराला अग्नि, साठ सुवर्णप्रमाण पदार्थांचा अपलाप करणाराला जल, चाळीस सुवर्णांचा अपलाप करणाराला तुला, विसांचा अपह्नव करणाराला कोशपान, पांच किंवा त्याच्या अर्ध्या सुवर्णप्रमाण पदार्थांचा अपह्नव करणाराला तांदुळ व त्याच्याही अर्धप्रमाण वस्तूचा अपलाप करणाराला पुत्रादिकांच्या मस्तकास स्पर्श करणें हें दिव्य सांगावें. त्याहून न्यून प्रमाण पदार्थांचा अपलाप करणाराकडून लौकिक क्रिया करवाव्या. अशा रीतीनें विचार करणारा राजा धर्म व अर्थ यांपासून हीन होत नाहीं. वरील सुवर्ण शब्द षोडशमाषप्रमाण घ्यावा. ( याच स्मृतीच्या प्रथमाध्यायाच्या ३६३ व्या श्लोकांत हें प्रमाण सांगितलें आहे ) पण या श्लोकार्धांत 'नासहस्रात्०' येथें जो सहस्र शब्द आहे तो ताम्रसहस्रपणांचा वाचक आहे, असें जाणावें. अहो, पण राजद्रोह व पातक यांमध्येंही दिव्यें सांगितलीं आहेत. तेव्हां 'नासहस्राद्धरेत्फालं' असें कसें म्हणतां ? म्हणून कोणी विचारील, असें जाणून योगीश्वर म्हणतात—

नृपार्थेष्वभिशापे च वहेयुः शुचयः सदा ॥ ९९ ॥

राजद्रोह व महापातक यासंबंधीं अभियोगांत सदा द्रव्याच्या संख्येची अपेक्षा न करतांच उपवासादिकांच्या योगानें शुचि होऊन दिव्यें करावीं. त्याविषयीं नारदानें विशेष देशही सांगितला आहे. कोणतीही सभा, राजसभा किंवा राजमंदिर यांच्या द्वारांत किंवा देवालयाच्या चौकांत धट ( तुला ) निश्चल रोवावा व त्याची चंदन, पुष्पें, धूप इत्यादिकांनीं पूजा करावी. त्याविषयीं कात्यायनानें अशी व्यवस्था सांगितली आहे—अभिशस्त ( ज्याला कांहीं अपराधाचा नुस्ता कलंक लागला आहे ) व महापातकी अशा पुरुषांना इन्द्रस्थानीं ( म्हणजे जेथें इंद्राची पूजा वगैरे होते तेथें ), राजद्रोह करावयास प्रवृत्त झालेल्या लोकांना राजद्वारामध्यें, प्रतिलोमसंकरानें उत्पन्न झालेल्यांना चव्हाठ्यावर व इतरांना सभेमध्यें दिव्य करावयास लावावें. अस्पृश्य, अधम, दास, पापी, म्लेच्छ व प्रतिलोमप्रसूत यांच्या दिव्याचा आचार स्वतः राजानें करवूं नये, तर त्यांविषयीं संशय आला असतां त्यांना त्यांच्या कुलांत व ज्ञातींत प्रसिद्ध असलेलीं दिव्यें करावयास लावावीं ९९. इति दिव्यमातृका.

याप्रमाणें सर्व दिव्योपयोगिनी दिव्य मातृका सांगून आतां धटादि दिव्याचा प्रयोग सांगतात—

तुलाधारणविद्वद्भिरभियुक्तस्तुलाश्रितः ।
प्रतिमानसमीभूतो रेखां कृत्वावतारितः ॥ १०० ॥
त्वं तुले सत्यधामासि पुरा देवैर्विनिर्मिता ।
तत्सत्यं वद कल्याणि संशयान्मां विमोचय ॥ १०१ ॥
यद्यस्मि पापकृन्मातस्ततो मां त्वमधो नय ।
शुद्धश्चेद्गमयोर्ध्वं मां तुलामित्यभिमन्त्रयेत् ॥ १०२ ॥

तुलाधारण म्हणजे तोलणें, त्यास जाणणाऱ्या सुवर्णकारादिकांनीं ( सोनारप्रभृतींनीं ) धटाच्या एका पारड्यांत दिव्य करणाऱ्या अभियुक्ताला किंवा अभियोक्त्याला घालून व दुसऱ्या पारड्यांत त्याच्या भारंभार माती, दगड वगैरे घालून तोललें असतां व ज्या पारड्यांत त्याला बसविलें असेल त्यांत खुणेसाठीं खडूनें रेषा ओढून खालीं उतरलें असतां त्यानें 'त्वं तुले०' इत्यादि मंत्रानें धटाची प्रार्थना करावी. 'हे तुले, तूं सत्याचें स्थान आहेस. सृष्टीच्या आरंभीं हिरण्यगर्भादि देवांनीं तुला निर्माण केलें आहे. यास्तव या संदिग्ध अर्थाचें खरें स्वरूप दाखीव व हे कल्याणि, या संशयापासून मला सोडीव. हे माते, जर मी पाप करणारा व असत्यवक्ता असेन तर मला खालीं ने व जर शुद्ध व सत्यवक्ता असेन तर वर ने' हा मंत्र दिव्य करणाराकरितां आहे. प्राड्विवाकाचा तुलाभिमंत्रण मंत्र दुसऱ्या स्मृतींत सांगितला आहे. जय व पराजय यांचें लक्षण तर मंत्रलिंगावरूनच कळत आहे. ( खालीं नेणें हें पराजयाचें लक्षण व वर नेणें हें जयाचें लक्षण आहे. ) यास्तव तें येथें पृथक् सांगितलेलें नाहीं. धट

निर्माण करणें हें तर आरोहणादि अर्थावरूनच सिद्ध आहे. तथापि पितामह व नारद यांनी तें असें स्पष्ट केलें आहे–यूपाप्रमाणें यज्ञिय वृक्ष मंत्रोच्चारपूर्वक तोडून व लोकपालांस प्रणाम करून विद्वानांनीं तुला करावी. तोडतांना वानस्पत्य व सोमदेवताक मंत्रांचा जप करावा. तुला चौकोनी सरळ व दृढ करावी. खालीं, वर व मध्यें अशा तीन स्थानीं, तीन कडीं प्रयोजनानुसार घालावीं. तुलेची दांडी चार हात असावी. तिच्या एवढेच पाय करावे. त्यांच्या मध्यें दोन हात किंवा दीड हात अंतर असावें. अर्थात् त्यांच्यावर ठोकावयाचें काष्ठ तेवढ्या प्रमाणाचें असावें. दोन्ही पायांच्या खालील दोन हात लांकूड भूमींत गाडावें. वरचें लांकूडही चार हात प्रमाणाचें असल्यामुळें दोन्ही पायांमध्यें दीड किंवा दोन हात अंतर ठेवून तें ठोकल्यावर पायांच्या मध्यें दोन्हीकडे दोन तोरणें बांधावीं. तीं घटाहून नेहमीं दहा अंगुलें उंच असावीत. तोरणांच्या खालीं दोन मृन्मय व अधोमुख अवलंब करावे. त्यांना सूत्रानें घट्ट बांधावें व ते घटाच्या मस्तकास स्पर्श करतील अशी व्यवस्था करावी. याप्रमाणें तुलेची बाहेरील चौकट तयार झाली म्हणजे पूर्वाभिमुख निश्चल घट ( तागडी ) पवित्र प्रदेशीं करावा. त्यांच्या दोन्ही बाजूस दोन शिंकीं बांधावीं. दोन्ही शिंक्यांमध्यें ( तळीं ) प्राङ्मुख दर्भ हांतरावे. पश्चिमेकडील शिंक्यांत दिव्य करणारास बसवावें व दुसऱ्या पूर्वेकडील शिंक्यांत शुभ मृत्तिका घालावी. इटा, दगड किंवा धूळ यांतील कशानें तरी तें भरून काढावें. नंतर वाणी, सोनार, कासार इत्यादि तुला–प्रमाणांत विशारद असलेले परीक्षक नेमावे. त्यांनीं दांडी अगदीं बरोबर करावी. ती बरोबर आहे कीं नाही, हें पाहण्याची थोडी युक्ति आहे. सूज्ञांनीं तिच्यावर कोठेंही एकच जलाचा बिंदु सोडावा व तो जर इकडे तिकडे न वाहतां दांडीवर जेथल्या तेथें स्थिर राहिला तर घट अगदीं सम आहे, असें समजावें.

असो; प्रथम दिव्य करणाऱ्या पुरुषाला तोलून व त्याला खालीं उतरून नंतर घटाला पताका, ध्वज इत्यादिकांनीं भूषित करावें. त्यानंतर मंत्रज्ञानें यथाशास्त्र मंगल वाद्यांच्या घोषानें व गंधपुष्पांच्या योगानें देवांचें आवाहन करावें. नंतर प्राड्विवाकानें हात जोडून व पूर्वेकडे तोंड करून असें म्हणावें. ' हे भगवन् धर्मा, ये ये. लोकपाल व वस्वादि मरुद्गण यांसह या दिव्यामध्यें प्रवेश कर. ' याप्रमाणें धर्माचें आवाहन करून नंतर त्याच्या अंगदेवतांचा न्यास करावा. इंद्राला त्याच्या पूर्वेस, यमाला दक्षिणेस, वरुणाला पश्चिमेस, व कुबेराला उत्तरेस स्थापावें. अग्नि, निर्ऋति इत्यादि लोकपालांस कोनांतून स्थित करावें. त्यांतील इंद्र पिवळा, यम काळा, वरुण स्फटिकासारखा, कुबेर व अग्नि सुवर्णासारखे, निर्ऋति काळा, वायु धूम्रवर्ण व ईशान रक्तवर्ण असावा. क्रमानें या सर्वांचें ध्यान करावें. इंद्राच्या दक्षिणभागीं वसूंची आराधना करावी. धर, ध्रुव, सोम, आप, अनिल, अनल, प्रत्यूष व प्रभात हे आठ वसु सांगितले आहेत. इंद्र व ईशान यांच्यामध्यें आदित्यगणाची स्थापना करावी. धाता, अर्यमा, मित्र, वरुण, अंशु, भग, इंद्र, विवस्वान्, पूषा, पर्जन्य, त्वष्टा व विष्णु असें बारा आदित्य आहेत. अग्नीच्या पश्चिमप्रदेशीं रुद्राचें स्थान सांगितलें आहे. वीरभद्र, शंभु, गिरिश, अजैकपाद, अहिर्बुध्न्य, पिनाकी, भुवनाधीश, कपाली, विशांपति व भगवान् रुद्र असे अकरा रुद्र

आहेत. यम व निर्ऋति यांच्यामध्यें मातृस्थान सांगितलें आहे. ब्राह्मी, माहेश्वरी, कौमारी, वैष्णवी, वाराही, माहेंद्री व गणांसह चामुंडा या सात मातृदेवता आहेत. निर्ऋतीच्या उत्तरभागीं गणेशाचें स्थान आहे. वरुणाच्या उत्तरभागीं मरुतांचें स्थान आहे. गगन, स्पर्शन, वायु अनिल, मारुत, प्राण, प्राणेश व जीव हे आठ मरुत आहेत. घटाच्या उत्तरभागीं सुज्ञानें दुर्गेचें आवाहन करावें. या सर्व देवतांची स्थापना करून त्यांच्या त्यांच्या नांवांनीं त्यांचें पूजन करावें. 'धर्माला क्रमानें अर्घ्यादि-भूषान्त उपचार समर्पण करून गंधादि-नैवेद्यान्त परिचर्या कल्पावी' असें विधान असल्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें तुलेला पताका, ध्वज इत्यादिकांनीं अलंकृत करून तिच्या ठायीं 'एहि एहि०' इत्यादि मंत्रानें धर्माचें आवाहन करावें. 'धर्माय अर्घ्यं कल्पयामि नमः' अशा प्रयोगानें अर्घ्य, पाद्य, आचमनीय, मधुपर्क, आचमनीय, स्नान, वस्त्र, यज्ञोपवीत, आचमनीय, मुकुट व कटक अर्घ्यादि- भूषणान्त उपचार देऊन इंद्रापासून दुर्गेपर्यंत वर ज्या देवता सांगितल्या आहेत त्यांस उद्देशून–प्रथम प्रणव, नंतर त्या त्या देवतेचें चतुर्थ्यन्त नांव, व शेवटीं 'नमः' असें पद योजून त्या त्या नाममंत्रांनीं अर्घ्यापासून भूषान्त पदार्थ समर्पण करावे. नंतर धर्माला गंध, पुष्प, धूप, नैवेद्य देऊन इंद्रादिकांना गंधादिक पूर्वीप्रमाणें द्यावें. नारदानें–लाल गंध, लाल पुष्पें, दहीं, अपूप, अक्षता इत्यादिकांच्या योगानें प्रथम घटाचें व नंतर बाकीच्या देवतांचें पूजन करावें– असें सांगितलेलें असल्यामुळें घटाच्या पूजनांत लाल गंधपुष्पांचा उपयोग करून बाकीच्या देवतांच्या पूजनांत यथासंभव श्वेत, रक्त, पीत इत्यादिकांचा उपयोग करावा. हें सर्व पूजाविधान प्राड्विवाकानें करावें. कारण त्याविषयीं असें सांगितलेलें आहे.— त्यानंतर वेदवेदाङ्गपारग, ब्राह्मण, शास्त्रज्ञान व शील यांनीं संपन्न, शांतचित्त, मत्सररहित, सत्यप्रतिज्ञ, पवित्र, दक्ष, सर्व प्राण्यांच्या हितामध्यें रत, उपोषित, शुद्ध वस्त्रें नेसलेला व ज्यानें दंतधावन केलें आहे, अशा प्राड्विवाकानें सर्व देवतांची पूजा यथाशास्त्र स्वतः करावी. त्याचप्रमाणें चार ऋत्विजांनीं चार दिशांमध्यें लौकिकाग्नींत घृतादि होमसाधनांनीं होम करावा. प्रणवासह गायत्रीचा मंत्र उच्चारून व शेवटीं स्वाहाशब्दाचा उपयोग करून त्या मंत्रानें प्रत्येक देवतेच्या उद्देशानें समिधा, घृत व चरु यांच्या प्रत्येकीं अष्टोत्तरशत आहुती द्याव्या.

याप्रमाणें हवनान्त देवपूजा करून व त्यानंतर आरोपित अर्थ 'आदित्यचन्द्रावनिलोऽनलश्च०' इत्यादि मंत्रासह कागदावर लिहून तें पत्र दिव्य करणाराच्या मस्तकावर ठेवावें. मंत्राचा अर्थ असा—सूर्य, चंद्र, अग्नि, वायु, अंतरिक्ष, भूमि, जल, हृदय, यम, दिवस, रात्र, दोन संध्यासमय, व धर्म प्रत्येक नराचें कृत्य जाणतात. असो; धर्माच्या आवाहनापासून पत्र मस्तकावर बांधणें, येथपर्यंतचा हा सर्व विधि ( सर्व अनुष्ठानकांड ) सर्व दिव्यांना साधारण आहे. त्यानंतर प्राड्विवाकानें 'त्वं घट ब्रह्मणा सृष्टः०' इत्यादि मंत्रांनीं घटाची प्रार्थना करावी. या मंत्राचा अर्थ असा–हे घटा, ब्रह्मदेवानें दुरात्म्यांच्या परीक्षणार्थ तुला निर्माण केलें आहे. तुझ्या नांवामध्यें धकार असल्यामुळें तूं धर्ममूर्ति आहेस व टकार असल्यामुळें तुझें धारण करितांच तूं कुटिल पुरुषाला दाखवितोस. म्हणून तुला 'घट' असें म्हणतात. सर्व

प्राण्यांचीं पापें व सुकृतें तूं जाणतोस. मानवांना जीं पापें कळत नाहींत तीं तूंच जाणतोस. व्यवहारांत निंद्य होणारा हा मानव शुद्ध होण्याची इच्छा करीत आहे. यास्तव यावर येते असलेल्या या कलंकापासून तूं याचें त्राण करण्यास समर्थ आहेस. 'शोध्यस्तु त्वं तुले०' इत्यादि पूर्वोक्त मंत्रानें तुलेची प्रार्थना करावी. त्यानंतर प्राड्विवाकानें ज्याच्या मस्तकावर पूर्वोक्त पत्र आहे अशा शोध्य पुरुषाला योग्यस्थानीं बसवून घटावर आरोपित करावें व पांच विनाडींपर्यंत त्याला तसेंच राहूं द्यावें. ज्योतिःशास्त्रांत अभिज्ञ असलेल्या पुरुषाकडून या कालप्रमाणाचें परीक्षण करवावें. दहा दीर्घ अक्षरें उच्चारण्यास जो काल लागतो त्याला प्राण म्हणतात व सहा प्राण म्हणजे विनाडी. अशा पांच विनाडी होत तों ( म्हणजे एक-बारांश घटिका ) त्याला घटावर स्थिर राहूं द्यावें. या असल्या काळीं शुद्धि व अशुद्धि यांचें परीक्षण करण्याकरितां राजानें अतिशय शुद्ध पुरुषांचीच योजना करावी. कारण ते शोध्य पुरुषाची शुद्धि व अशुद्धि सांगत असतात. ज्ञानी, पवित्र, अलुब्ध व सत्य भाषण करणारे ब्राह्मण अशा कामांत अतिशय श्रेष्ठ साक्षी होत. शुद्धि व अशुद्धि यांच्या निर्णयाचें कारणही असें सांगितलें आहे.–आरोपित शोध्य पुरुष पुनः तोलतांना जर पहिल्यापेक्षां वाढला ( वर उंच ) तर शुद्ध आहे व तो जर सारखाच किंवा खालीं गेला तर शुद्ध नव्हे, असें जाणावें. 'जो सम भरतो तो अल्पदोषवान् व जो खालीं बसतो, तो पुष्कळ दोषवान्' असें पितामहाचें वचन आहे. आरोपित अर्थाचें अल्पत्व किंवा बहुत्व दिव्यावरून कळणें जरी शक्य नसलें तरी कोणतेंही पाप एकदां व अबुद्धिपुरःसर केल्यानेंच त्याला अल्पत्व व वारंवार आणि बुद्धिपूर्वक तेंच पाप केल्यानें त्याला महत्त्व येतें. अशा अल्पत्वाच्या किंवा महत्त्वाच्या अनुरोधानें प्रायश्चित्त, दंड इत्यादिकांचें प्रमाणही अल्प व मोठें ठरवावें. पण शोध्य पुरुषाला घटावर आरोपित करतांच, कांहीं दृष्ट कारण दिसत नसतांनाही, शिंक्याचा तळ तुटणें, तें अडकवावयाचा कोहिंडा मोडणें इत्यादि कांहीं घडल्यास शोध्याची अशुद्धिच जाणावी. पण अशा गोष्टींचें कांहीं दृष्ट कारण प्रत्यक्ष दिसत असल्यास शोध्याला पुनः घटावर चढवावें. त्यानंतर ऋत्विक्, पुरोहित, आचार्य इत्यादिकांस दक्षिणा वगैरे देऊन संतुष्ट करावें. अशाप्रकारें करविणारा राजा मनोरम भोगांस भोगून मोठ्या कीर्तीस प्राप्त होतो व मोक्षालाही समर्थ होतो. वर सांगितलेल्या प्रकारचा शास्त्रीय घट एकदां निर्माण करून तो तसाच ठेवण्याची ज्याची इच्छा असेल त्यानें कावळे, घारी इत्यादि पक्ष्यांनीं व पशूंनीं त्याला अशुद्ध करूं नये म्हणून त्याकरितां एक उंच गृहच करावें. त्याला दृढ द्वारें, खिडक्या इत्यादि असावींत. त्यांतच सर्व लोकपालादिकांची स्थापना करावी. त्याची त्रिकाळ गंध-पुष्पादिकांनीं पूजा करावी. तेथें रक्षक ठेवावे. यव, व्रीहि इत्यादि बीजें, पाणी, मृत्तिका इत्यादि पदार्थ सांठवावे. सारांश त्या घटशालेला शून्य ठेवूं नये. १००, १०१, १०२. इति घटविधिः

आतां क्रमप्राप्त अग्निदिव्य सांगतात—

करौ विमृदितव्रीहेर्लक्षयित्वा ततो न्यसेत् ।
सप्ताश्वत्थस्य पत्राणि तावत्सूत्राणि वेष्टयेत् ॥ १०३ ॥

दिव्यमातृकेमध्यें सांगितलेले साधारण धर्म व वर सांगितल्याप्रमाणें धर्माच्या आवाहनापासून मस्तकावर पत्र ठेवणें, येथपर्यंत सर्व विधि, यांचें अनुष्ठान झालें असतां अग्निदिव्यांतलि हें विशेष आचरण करावें--ज्यानें आपल्या दोन्हीं तळहातांनीं व्रीहि चोळले आहेत अशा शोध्य पुरुषाचे हात पाहून व त्यावर तिळ, गोंदलेलें, व्रण व घट्टे वगैरे असल्यास ते सर्व मेंदीच्या रसानें चिह्नित करून त्यानंतर त्याला ओंझळ करावयास सांगावी व त्यांत अश्वत्थाचीं सात पानें ठेवावीं. व हातावरून सुतांचे सात फेरे घेऊन तीं बांधावीं. तीं सुतेंही शुभ्र व सातच असावींत. नंतर त्या सात अश्वत्थपर्णांवर सात शमीचीं पानें, सात दूर्वा, फुलें व दह्यांत भिजलेल्या अक्षता घालाव्या. एका स्मृतिवचनांत हातावर सात रुईचीं पानें ठेवण्याविषयींही सांगितलें आहे. पण अश्वत्थपर्णांच्या अभावीं तें विधान समजावें. कारण पितामहानें 'पिप्पलाज्जायते वह्निः' इत्यादि वचनानें अश्वत्थाची प्रशंसा केली आहे १०३.

आतां कर्त्यानें अग्नीचें अभिमंत्रण कसें करावें तें सांगतात--

त्वमग्ने सर्वभूतानामन्तश्चरसि पावक ।
साक्षिवत्पुण्यपापेभ्यो ब्रूहि सत्यं कवे मम ॥ १०४ ॥

हे अग्ने, तूं जरायुज, अंडज, स्वेदज व उद्भिज्ज या चारी प्रकारच्या ( म्हणजे सर्व ) भूतांच्या शरीरांत उपयुक्त अन्न-पानादिकांच्या पाचकत्वानें रहातोस. हे शुद्धीच्या हेतो व क्रान्तदर्शिन्, साक्षीदाराप्रमाणें तूं पुण्य व पाप यांस पाहून सत्य सांग. ( खरें काय आहे तें दाखीव. ) तीन तापांनीं तापवून लाल केलेला लोखंडाचा गोळा चिमट्यानें धरून पुढें आणला असतां पश्चिममंडलांत पूर्वेकडे तोंड करून उभ्या असलेल्या कर्त्यानें 'त्वमग्ने सर्वभूतानां' इत्यादि मंत्रानें अग्नीचें अभिमंत्रण करावें. कारण नारदानें ( अग्निवर्णमयःपिण्डं० ' इत्यादि वचनांत असें सांगितलें आहे.—लोहाच्या शुद्धीकरितां चांगला तापविलेला लोहपिंड ( लोखंडाचा गोळा ) उदकांत टाकून पुनः अग्नींत घालून लाल करावा. नंतर पुनः एकदां तसेंच करून तिसऱ्या वेळीं लाल झालेल्या त्याला सांडसानें धरून शोध्याच्या पुढें आणावें. नंतर लागलेंच त्यानें 'त्वमग्ने०' इत्यादि मंत्र म्हणावा. त्यापूर्वींच तिकडे प्राड्विवाकानें मंडलभूभागाच्या दक्षिणप्रदेशीं लौकिक अग्नीचें आधान करून 'अग्नये पावकाय स्वाहा' या मंत्रानें घृतानें अष्टोत्तरशत आहुती द्याव्या. होमानंतर त्याच अग्नींत लोखंडाचा गोळा घालून तो तापत असतांना धर्माच्या आवाहनापासून हवनापर्यंत पूर्वोक्त सर्व विधि करावा. तिसऱ्या वेळीं तो गोळा तापत असतांना त्यांतील अग्नीचें 'त्वमग्ने वेदाश्चत्वारः०' इत्यादि मंत्रानीं अभिमंत्रण करावें. त्यांचा अर्थ असा—हे अग्ने, तूं चार वेद आहेस. यज्ञामध्यें तुझें हवन केलें जातें. तूं सर्व देवांचें मुख आहेस. ब्रह्मवाद्यांचें मुख आहेस. तूं सर्व भूतांच्या जठरामध्यें स्थित आहेस. त्यामुळें प्रत्येकाचें शुभाशुभ कर्म तूं जाणतोस. तूं

पापाचें शोधन करतोस, म्हणून तुला पावक म्हणतात. पापी पुरुषांचे ठायीं तूं आपणास प्रकट कर. हे पावका, अर्चिष्मान् ज्वालायुक्त हो. अथवा जे शुद्धभावानें युक्त असतील त्यांच्या ठिकाणीं तूं शीत हो. हे अग्ने, तूं सर्व भूतांच्या आंत साक्षीदाराप्रमाणें संचार करीत असतोस. हे देवा, मानवांना जें समजत नाहीं, तें तूं जाणतोस. व्यवहारांत ज्याच्यावर कांहीं आरोप आला आहे असा हा मानुष आपल्या शुद्धीची इच्छा करीत आहे. यास्तव याला या संशयापासून तूं धर्माप्रमाणें तारण्यास योग्य आहेस १०४.

तस्येत्युक्तवतो लोहं पञ्चाशत्पलिकं समम् ।
अग्निवर्णं न्यसेत्पिण्डं हस्तयोरुभयोरपि ॥ १०५ ॥

वर सांगितलेल्या ' त्वमग्ने० ' इत्यादि मंत्रांनीं दिव्यकर्ता अभिमंत्रण करूं लागला असतां पन्नास पलप्रमाण लोखंडाचा सर्व बाजूंनीं सम, वर्तुळ, गुळगुळीत, आठ अंगुलें विस्तीर्ण, व कंगोऱ्यावाचून, असा गोळा तापवून अग्नीसारखाच लाल करावा आणि अश्वत्थाचीं पानें, दहीं, दूर्वा इत्यादि पूर्वोक्त वस्तूंनीं आच्छादित केलेल्या शोध्याच्या दोन्ही हातांवर प्राड्विवाकानें तो ठेवावा १०५.

नंतर काय करावें, तें सांगतात—

स तमादाय सप्तैव मण्डलानि शनैर्व्रजेत् ।

त्या शोध्य पुरुषानें तापलेला लोहपिंड ओंजळींत घेऊन सात मंडलांतूनच ( प्रत्येक मंडलांतच प्रत्येक पाऊल ठेवून ) सावकाश गमन करावें. पितामहानें ' मंडलाचें अतिक्रमण करूं नये व एकाच मंडलांत दोन पावलें टाकूं नयेत.' असें सांगितलें आहे. सातच मंडलांतून हळु हळू जावें, असें या अर्धांत सांगितलें आहे. पण त्यांतील प्रत्येक मंडल कोणत्या प्रमाणाचें असावें व दोन मंडलांमध्यें अंतर किती असावें, तें उत्तरार्धांत सांगतात--

षोडशाङ्गुलकं ज्ञेयं मण्डलं तावदन्तरम् ॥ १०६ ॥

प्रत्येक मंडल सोळा अंगुलप्रमाण असावें आणि दोन मंडलांमध्यें अंतरही तितकेंच असावें. सात मंडलें चालून जावें, असें ज्याअर्थीं म्हटलें आहे त्याअर्थीं उभें राहण्यासाठीं केलेल्या मंडलासह एकंदर आठ मंडलें षोडशांगुलप्रमाण करावीं लागतात. नारदानें ' द्वात्रिंशदङ्गुलं प्राहुः० ' इत्यादि वचनांत अंगुलांच्या गणनेसह हेंच सांगितलें आहे. त्याचा सारांश असा–ज्यांत शोध्यानें प्रथम उभें रहावयाचें तें पहिलें अवस्थान मंडल सोळा अंगुलें विस्तीर्ण असतें. त्याच्या पुढें मधील सोळा अंगुलें अंतरावर दुसरें तितक्याच प्रमाणाचें मंडल असतें. अर्थात् अंतरासह प्रत्येकीं बत्तीस अंगुलप्रमाण, अशीं सात मंडलें अवस्थान मंडलांच्या पुढें असतात. त्यामुळें या आठी मंडलांमध्यें मिळून दोनशें शाळीस अंगुलें भूमि येते. नारदाच्या या मताप्रमाणें करावयाचें झाल्यास पहिलें मंडल सोळा अंगुलें लांब करून त्यापुढें अंतराळ प्रदेशासह प्रत्येकीं बत्तीस अंगुलें प्रमाणाचीं सात मंडलें करावीं, त्यांतील एकेका

मंडलांत आलेल्या भूमीचे दोन भाग करावे. नंतर त्यांतील दुसऱ्या सोळा अंगुळप्रमाण भूमींत शोध्याच्या पावलाच्या प्रमाणाचें मंडल काढावें अशीं सात मंडलें करावीं. कारण ' मंडलाचें प्रमाण शोध्याच्या पायां-एवढें असावें, ' असें त्यानेंच ( नारदानेंच ) सांगितलें आहे. पितामहानें तर अगोदर आठ मंडलें व त्यांच्यापुढें नववें, अशीं एकंदर नऊ मंडलें करावीं. त्यांतील पहिलें आग्नेय, दुसरें वारुण, तिसरें वायव्य, चवथें यमदेवताक, पांचवें इंद्र दैवत्य, सहावें कौबेर, सातवें सोमदैवत्य, आठवें सावित्र व नववें सर्वदैवत्य असतें, असें दिव्यज्ञ जाणतात. एका मंडलापासून दुसऱ्या मंडलाचें अंतर बत्तीस अंगुलें असावें. त्यामुळें आठ मंडलांचें मिळून प्रमाण दोनशेंसाठ अंगुळें होतें. दिव्यकर्त्याच्या पायाच्या प्रमाणाचें प्रतिमंडलांत उपमंडल करावें व त्यांतील प्रत्येकांत शास्त्रानें सांगितलेले दर्भ हांतरावे. वर सांगितलेल्या नऊ मंडलांतील शेवटचें सर्वदैवत्य मंडल अपरिमित असतें. त्याचें प्रमाण अंगुलांनीं मोजावयाचें नसतें. कारण आठव्या मंडलाच्या पुढील सर्व भूमि हेंच नववें मंडल होय. बाकीच्या आठ मंडलांतील पहिल्या अवस्थान मंडलास सोडून पुढच्या सात मंडलांतून गमन करावयाचें असतें. त्यामुळें ' पहिल्या मंडलांत उभा राहतो व नवव्या मंडलांत अग्नीचा त्याग करितो, ' या वचनाशीं विरोध येत नाहीं. अंगुलाचें प्रमाण—उभे एकमेकांस लागून मांडलेले आठ यव किंवा आडवे एकापुढें एक मांडलेले तीन यव—हें आहे. बारा अंगुलांची वीत, दोन वितींचा हात, चार हात म्हणजे दंड, दोन हजार दंड म्हणजे कोस, चार कोस म्हणजे योजन इत्यादि इतर प्रमाणही प्रसिद्ध आहे १०६.

सात मंडलें चालून गेल्यावर काय करावें, तें सांगतात--

**मुक्त्वाग्निं मृदितव्रीहिरदग्धः शुद्धिमाप्नुयात् ।**

आठव्या मंडलांत चालून जाऊन उभें राहून नवव्या मंडलांत अग्नीमध्यें तापवून लाल केलेल्या गोळ्याला टाकावें व दोन्ही हातांनीं पुनः व्रीही चोळावेत. इतकें करूनही हात जळला नसेल तर तो मनुष्य शुद्धीस प्राप्त होतो व हात जळला असल्यास तो अशुद्ध होय, हें उघड आहे. जो भीतीनें सरळ पाय न टाकतां अथवा हात कांपू लागल्यामुळें दुसऱ्या कोठें भाजतो तो अशुद्ध नव्हे. त्याच्याकडून पुनः दिव्य करवावें. तसेंच--

**अन्तरा पतिते पिण्डे संदेहे वा पुनर्हरेत् ॥ १०७ ॥**

दिव्यकर्ता लोखंडाचा गोळा घेऊन जात असतांना मध्येंच ( म्हणजे आठव्या मंडला-पर्यंत पोचण्यापूर्वींच ) जर तो गोळा पडला किंवा तो दग्ध झाला किंवा न झाला, याविषयीं संशय आला तर पुनः अग्नीचें हरण करावें; हें अर्थातच प्राप्त झालें. त्या पुनरभिहरणाचा अनुष्ठान क्रम असा—पहिल्या दिवशीं भूतशुद्धि करून, दुसऱ्या दिवशीं यथाशास्त्र मंडलें निर्माण करावीं. मंत्रांनीं मंडलाधिदेवतांचें पूजन करून अग्नीचें उपसमाधान व शांतिहोम करावा. नंतर आदल्या दिवशीं उपोषण करून दुसऱ्या दिवशीं सूर्योदयींच स्नान करून ओल्या वस्त्रानेंच पश्चिम मंडलांत उभ्या असलेल्या दिव्यकर्त्यानें व्रीहींचें मर्दन, हा हस्तसंस्कार केला असतां प्राड्विवाकानें त्याच्या मस्तकावर मंत्रोच्चारपूर्वक प्रतिज्ञापत्र बांधावें, व तिसऱ्यावेळीं लोहपिंड

तापत असतांना अग्नीचें अभिमंत्रण करून व चिमट्यानें त्याला उचलून दिव्यकर्त्यापुढें आणावें. नंतर कर्त्यानें अभिमंत्रण केलें असतां तो पिंड त्याच्या हातावर ठेवावा. त्यानंतर त्यानें सात मंडलें चालून जाऊन लोहपिंडाला नवव्या मंडलांत टाकावें. हें करीत असतांना त्याचा हात न भाजल्यास तो शुद्ध होतो १०७. इति अग्निविधिः

आतां उदकविधि सांगतात--

सत्येन माभिरक्ष त्वं वरुणेत्यभिशाप्य कम् ।
नाभिदघ्नोदकस्थस्य गृहीत्वोरू जलं विशेत् ।। १०८ ।।

"हे वरुणा, तूं सत्यानें माझें रक्षण कर." इत्यादि अर्थाच्या मंत्रानें उदकाचें अभिमंत्रण करून नाभिप्रमाण जलांत स्थित असलेल्या पुरुषाच्या मांड्या धरून शोध्य पुरुषानें जलांत प्रवेश करावा. (जलांत बुडावें.) पण हा प्रवेश वरुणाची पूजा झाल्यावर करावा. कारण नारदानें—सुवासिक गंध-पुष्पांनीं व मधु, क्षीर, घृत इत्यादिकांनीं प्रथम शांत मनानें वरुणाची पूजा करावी,—असें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें धर्माच्या आवाहनापासून मस्तकावर प्रतिज्ञापत्र ठेवणें—येथपर्यंत सर्वसाधारण धर्माचें अनुष्ठान झालें असतां नंतर जलप्रवेश करावा. 'तोय त्वं प्राणिनां प्राणः ०' इत्यादि जलाच्या प्रार्थनेचे मंत्र आहेत. त्यांचें तात्पर्य असें—हे जला, तूं प्राण्यांचा प्राण आहेस. तुला सृष्टीचें आद्यतत्त्व निर्मिलें आहे. सर्व द्रव्यें व देहवान् प्राणी यांच्या शुद्धीचें तूं कारण आहेस. यास्तव शुभाशुभ परीक्षणांत तूं आपला प्रभाव दाखीव. अशा अर्थाच्या मंत्रांनीं प्राड्विवाकानें उदकाचें अभिमंत्रण केलें असतां शोध्यानें 'सत्येन माभिरक्ष त्वं वरुण' या मंत्रानें वरुणाची प्रार्थना करावी. नारदानें—ज्यांचा वेग फार जोराचा नाहीं अशा नदींमध्यें, सागरांत, कालव्यांत, डोहांत, अकृत्रिम सरोवरांत, कृत्रिम तडागांत किंवा सामान्य सरोवरांत जलदिव्य करावें.—असें म्हणून त्याचीं स्थानें सांगितलीं आहेत. पितामहानेंही—स्थिरजलांत बुडी मारावी. ज्यांत सुसरी, गवत, शेवाळें, जळवा, मत्स्य इत्यादि नाहींत व पाणी पुष्कळ आहे, अशा जलाशयांत व अकृत्रिम सरोवरांत दिव्य करावें. नदी, सरोवर इत्यादिकांतून पाणी आणून व तें तांब्याच्या किंवा पितळेच्या मोठ्या कढईत सांठवून त्यांत दिव्य करूं नये. वेगयुक्त नदींमध्यें प्रवेश करूं नये. लाटा व चिखल यांनीं रहित असलेल्या जलाशयांतच दिव्य करावें. नाभिप्रमाण जलांत स्थित असलेल्या पुरुषानें यज्ञियवृक्षाच्या काष्ठानें केलेल्या धर्मस्थूणेचा (धर्मस्तंभाचा) आश्रय करून प्राङ्मुख उभें राहावें १०८.

त्यानंतर—

समकालमिषुं मुक्तमानियान्यो जवी नरः ।
गते तस्मिन्निमग्नाङ्गं पश्येच्चेच्छुद्धिमाप्नुयात् ।। १०९ ।।

शोध्य पुरुष ज्यावेळीं पाण्यांत बुडी मारतो त्याचवेळीं दुसरा एक वेगवान् पुरुष (पूर्वीं जेथें बाण मारला होता तेथें) धांवत गेला असतां तेथें पूर्वींच स्थित असलेल्या दुसऱ्या एका

वेगवान् नरानें पूर्वी सोडलेल्या बाणास घेऊन परत यावें व जलाजवळ येतांच त्यानें बुडलेल्या पुरुषाचें शरीर जर जलांत ( बुडलेलेंच ) पाहिलें तर तो शुद्ध होय. याचा सारांश असा- अगोदर एका तोरणाखालून तीन बाण सोडले जातात. नंतर एक वेगवान् पुरुष त्यांतील मध्य बाण जेथें पडला असेल तेथें जाऊन व त्याला हातांत घेऊन उभा राहतो. दुसरा एक वेगवान् पुरुष जेथून बाण सोडले जातात त्या तोरणाखालीं उभा राहतो. याप्रमाणें ते दोघेही तयार होऊन उभे राहिले असतां एक पुरुष तीन टाळ्या वाजवितो. त्यांतील तिसऱ्या टाळी-बरोबर शोध्य पुरुष पाण्यांत उभ्या असलेल्या पुरुषाच्या मांड्यांना धरून बुडी मारतो. त्याच-वेळीं तोरणाच्या खालीं उभा असलेला पुरुष वेगानें मधला बाण जेथें पडला होता तेथें जातो. तो शरपातस्थानीं पोंचतांच तेथें बाण घेऊन उभा असलेला पुरुष तेथून वेगानें निघून तोर-णाच्या मुळाशीं येतो. पण त्यानें तेथें आल्यावर शोध्याला जलांत बुडलेलें जर न पाहिलें तर तो ( शोध्य ) अशुद्ध होतो. ' मन्तुश्चापिच कर्तुश्च० ' इत्यादि वचनांनीं पितामहानें हेंच स्पष्ट केलें आहे. ( अर्थात् पहिला वेगवान् पुरुष बाण घेऊन परत येई तों शोध्याचें सर्व शरीर पाण्यांत बुडलेलें असलें पाहिजे तरच तो शुद्ध; नाहीं तर अशुद्ध.) वेगवान् पुरुषांचा निश्चय नारदानें असा केला आहे—पन्नास जण धांवत असतांना त्यांत जो सर्वांच्या पुढें जातो तो जवी किंवा वेगवान् होय. अशा दोघां पुरुषांना बाण आणण्याच्या कामांत नियुक्त करावें. जलाशयामध्यें दिव्य करणारा पुरुष जेथें बुडणार असेल त्याच्या जवळच समप्रदेशीं त्या शोध्याच्या कानाला लागेल इतकें उंच तोरण करावें. तीन बाण व वेळूचें धनुष्य यांचीं प्रथम मंगल द्रव्यें व श्वेत पुष्पें यांनीं पूजा करावी. धनुष्याचें प्रमाण व लक्ष्यस्थान याचेंही वर्णन नारदानें असें केलें आहे. चार हात व अकरा अंगुलें लांब असलेलें धनुष्य क्रूर, चार हात व दहा अंगुलप्रमाण धनुष्य मध्यम व चार हात नऊ अंगुलें धनुष्य मंद होय. या दिव्यामध्यें फेंकावयाचे बाण वेळूचेच पण ज्याच्यापुढें लोखंडी पातीं बसविलेलीं नाहींत, असे असावेत. ते फेंकण्याच्या कामांत उपवास केलेल्या सदृढ क्षत्रियाची अथवा क्षत्रियवृत्ति करणाऱ्या ब्राह्म-णाची योजना करावी. त्यानें सोडलेल्या तीन बाणांतील मध्यम ( मध्यस्थानीं पडलेला ) बाण आणावा व तोही प्रथम जेथें पडला असेल तेथून आणावा. एकदां एकेजागीं पडून पुढें वेगानें सरकत गेलेला असल्यास तेथून आणूं नये. वारा वेगानें वहात असतांना किंवा जेथील मार्ग सम नाहीं अशा जागीं बाण सोडूं नये. उंच-सखल भूप्रदेश, वृक्षांनीं व्यापलेलें स्थान, तृण, गुल्म, लता, वेली, चिखल, पाषाण इत्यादि-कांनीं युक्त असलेलें स्थान, या ठिकाणीं बाण फेंकूं नयेत, असें पितामहानेंही सांगितलें आहे. बाण परत आणणारानें शोध्याला निमग्नांग ( म्ह० ज्याचीं सर्व अंगें पाण्यांत बुडलेलीं आहेत) जर पाहिलें तरच तो शुद्ध होतो. अनिमग्नांग पाहिल्यास अशुद्ध होतो. तो जेथें बुडला असेल तेथून दुसऱ्या जागीं गेल्यास अथवा कानादि एकादें अंगही दिसल्यास अशुद्ध ठरतो. नुस्तें डोकें दिसलें तर चालेल-पण कान, नाक इत्यादि दुसरें कांहीं दिसतां कामा नये. असो; या सर्व अनुष्ठानाचा क्रम असा-वर सांगितलेल्या प्रकारच्या जलाशयासमीप पूर्वोक्त प्रकारें

तोरण करून वर सांगितलेल्या प्रकारच्या प्रदेशीं लक्ष्य ठेवून तोरणापाशीं सशर-धनुष्याची पूजा करावी. जलाशयांत वरुणाचें आवाहन करावें. त्याचें पूजन करावें. त्याच्या तीरावर धर्मादि देवांचें हवनान्त अनुष्ठान करून शोध्यपुरुषाच्या मस्तकावर प्रतिज्ञापत्र बांधावें व प्राड्विवाकानें पूर्वोक्त मंत्रानें. जलाचें अभिमंत्रण करावें. नंतर शोध्यपुरुष ' सत्येन माभिरक्ष० इत्यादि मंत्रानें जलाची प्रार्थना करून, धर्मस्थूण धारण करून नाभिमात्र जलांत उभ्या असलेल्या बळकट पुरुषापाशीं जातो. नंतर तीन बाण सोडले असतां त्यांतील मध्यम बाणाच्या पातस्थानीं मध्यम शर घेऊन एक वेगवान् पुरुष उभा राहून दुसरा तोरणाच्या खालीं उभा राहिला असतां प्राड्विवाकानें तीन टाळ्या वाजवाव्या. त्यांतील तिसऱ्या टाळीबरोबर शोध्यानें जलांत बुडावें व तोरणाजवळच्या दुसऱ्या वेगवान् पुरुषानें मध्यशरपातस्थानीं जाण्याकरितां धांवत निघावें. तो तेथें पोंचतांच तेथील बाण घेऊन स्थित असलेल्या पुरुषानें तोरणापाशीं पळत यावें १०९. इति उदकविधिः

आतां विषविधि सांगतात—

त्वं विष ब्रह्मणः पुत्रः सत्यधर्मे व्यवस्थितः ।
त्रायस्वास्मादभिशापात्सत्येन भव मेऽमृतम् ॥ ११० ॥
एवमुक्त्वा विषं शार्ङ्गं भक्षयेद्धिमशैलजम् ।
यस्य वेगैर्विना जीर्येच्छुद्धिं तस्य विनिर्दिशेत् ॥१११॥

' त्वं विष० ' इत्यादि मंत्रानें विषाचें अभिमंत्रण करून कर्त्यानें हिमालय पर्वतावरील शृंगजन्य विष प्राशन करावें. ज्याच्या पोटांत तें खाल्लेलें विष वेगावांचून जिरतें तो शुद्ध होय, असें समजावें. वरील मंत्राचा अर्थ असा-हे विषा, तूं ब्रह्मदेवाचा पुत्र आहेस. तूं सत्यधर्मामध्यें व्यवस्थित ( निश्चित ) आहेस. माझ्यावर आलेल्या या कलंकापासून तूं माझें रक्षण कर. सत्याच्या योगानें तूं मला अमृतासारखें हो. असो; एका धातूपासून दुसऱ्या धातूस प्राप्त होणें, हा विषवेग होय. त्वक्, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र असे सात धातु आहेत. त्यामुळें सातच विषवेग होतात. त्यांचीं लक्षणें विषतन्त्रांत निराळींच सांगितलीं आहेत. विषजन्य आद्यवेग रोमांच उत्पन्न करतो. त्यानंतर अंगाला घाम येतो व तोंडाला कोरड पडते. कांहीं वेळानें त्याची अंगकांति बदलते, व अंगाला कंप सुटतो. पांचवा वेग त्याला मूर्च्छित करतो; स्वर बदलतो; व उचकी लागते. सहावा श्वास व मोह देतो आणि सातवा वेग विषभक्षकाला मारतो. या दिव्यांत महादेवाची पूजा करावी. न्यायाधिशानें उपवास करावा. महादेवाचें पूजन करून त्याच्यापुढें विष ठेवावें. नंतर हवनापर्यंत धर्माची पूजा करून शोध्याच्या मस्तकावर प्रतिज्ञापत्र ठेवावें आणि ' त्वं विष० ' इत्यादि मंत्रांनीं विषाचें अभिमंत्रण करावें. त्यांचा अर्थ असा—हे विषा, ब्रह्मदेवानें तुला दुरात्म्यांच्या परीक्षेकरितां निर्मिलें आहे. यास्तव तूं पाप्यांना आपला प्रभाव दाखीव व शुद्धांना अमृता-

प्रमाणें सुखावह हो. हे मृत्युरूप विषा, तुला ब्रह्मदेवानें निर्मिलें आहे. यास्तव या पुरुषाचें पापापासून रक्षण कर. याच्या सत्यानें तूं अमृत हो.

असो; अशा अर्थाच्या मंत्रांनीं विषाचें अभिमंत्रण करून ब्राह्मणांच्या सान्निध दक्षिणेकडे तोंड करून बसलेल्या शोध्याला तें द्यावें. वत्सनाभ, हिमज इत्यादि विष दिव्यामध्यें द्यावें. चारित, जीर्ण, कृत्रिम, भूमिजन्य, कालकूट इत्यादि विषें यत्नानें वर्ज करावीं. विष तोलून थंडीच्या दिवसांत द्यावें. अपराह्ण, मध्याह्न, संध्या इत्यादि समयीं धर्मज्ञानें विष देऊं नये. थंडीवाचून इतर समयीं उक्तप्रमाणाहून कमी विष द्यावें. त्याविषयीं वर्षाऋतूंत चार यव, ग्रीष्मांत पांच यव, हेमान्तांत सात यव व शरत्समयीं त्याहूनही न्यून ( सहा यव ) प्रमाण विष द्यावें, असें सांगितलें आहे. हेमन्त व शिशिर यांचें ऐक्य समजून शिशिरसमयींही सात यव व वसंत सर्व दिव्यांस साधारण असल्यामुळें त्यांतही तितकेंच विष द्यावें. तें तीसपट तुपांत घालून द्यावें. शोध्यानें कांहीं कपट करूं नये, म्हणून राजानें दिव्यापूर्वी तीन किंवा पांच दिवस त्याच्या मागें रक्षक ठेवावे. त्याच्या शरीरावर विषनाशक औषधींचा लेप, मंत्र, मणि इत्यादि कांहीं असल्यास त्यांची सूक्ष्म दृष्टीनें परीक्षा करावी. त्याचप्रमाणें विषाचेंही रक्षण करावें. विषप्राशन केल्यावरही पांचशें टाळ्या वाजवीपर्यंत काळ जाऊं द्यावा. तितक्यांत त्याच्यावर विषाचा वाईट परिणाम होत आहे, असें दिसल्यास त्यानंतर विष उतरण्याकरितां त्याला औषध द्यावें. पितामहानें दिवसभर अवधि सांगितला आहे. ' पूर्वाह्णीं विष खाल्ल्यावर सायंकाळपर्यंत जर तो पुरुष मूर्च्छा, उलटी इत्यादि विकारांवाचून राहिला तर शुद्ध आहे, असें समजावें, असें त्याचें वचन आहे. असो; सारांश प्राड्विवाकानें उपवास करून, महादेवाचें पूजन करावें त्याच्यापुढें विष स्थापून धर्मादिकांचें पूजन करून शोध्य पुरुषाच्या मस्तकावर प्रतिज्ञापत्र बांधून, विषाचें अभिमंत्रण करून दक्षिणाभिमुख असलेल्या शोध्याला तें द्यावें. व दिव्यकर्त्यानेंही विषाचें अभिमंत्रण करून तें प्यावें हा या दिव्याचा क्रम आहे. ११०. १११. इति विषविधानम्.

आतां कोशविधान सांगतात—

**देवानुग्रान्समभ्यर्च्य तत्स्नानोदकमाहरेत् ।**
**संश्राव्य पाययेत्तस्माज्जलं तु प्रसृतित्रयम् ॥ ११२ ॥**

दुर्गा, आदित्य, इत्यादि उग्र देवांचे गंध-पुष्पादिकांनीं पूजन करून व त्यांना चांगला अभिषेक करून त्यांचें स्नानादिक आणावें. प्राड्विवाकानें 'तोय त्वं प्राणिनां प्राणः०' इत्यादि मंत्रानें त्याचें अभिमंत्रण करून तें शोध्यास द्यावें. त्यानें दुसऱ्या पात्रांत घेऊन 'सत्येन माभिरक्ष त्वं० ' या मंत्रानें त्याला अभिमंत्रित करावें व नंतर न्यायाधीशानें त्यांतून तीन पसे जल त्याच्याकडून पिववावें. पण धर्माच्या आवाहनापासून सर्व देवतापूजा, होम, प्रतिज्ञापत्र मस्तकावर बांधणें इत्यादि साधारण धर्म यथाशास्त्र केल्यावर हें तीर्थपान करावें.; या दिव्यांतील स्नाप्य देव, कार्य व अधिकारी यांचा नियम पितामहादिकांनीं सांगितला आहे, तो असा—जो ज्याचा भक्त असेल त्या देवाचें स्नानजल त्याच्याकडून पिववावें. तो सर्व देवांचे

ठायीं समभाव ठेवीत असल्यास त्याला आदित्याचें तीर्थ पाजावें. शस्त्रावर उपजीविका करणाऱ्या चोरांस दुर्गेचें तीर्थ द्यावें. आदित्याचें जल ब्राह्मणांस पाजवूं नये. दुर्गेच्या शूलास स्नान घालावें. आदित्याच्या मंडलास ( रुप्याचें मंडल करून त्यास ) अभिषेक करावा. इतर देवांच्याही आयुधांस स्नान घालावें. हा देवतानियम झाला. आतां कार्यनियम सांगतों–एखाद्याचा विश्वास यावा म्हणून, एखाद्याविषयीं कांहीं शंका आल्या असतां त्यांच्या निवृत्त्यर्थ व दोघां वैऱ्यांचें सख्य कर्तव्य असतां परस्परांच्या चित्तशुद्धीकरितां कोशपान नेहमीं द्यावें. ज्यानें उपोषण केलें आहे अशा पुरुषाला स्नान करावयास सांगून तो ओलेता असतांनाच पूर्वाह्नसमयीं त्याच्याकडून कोशपान करण्याचें विधान केलें आहे. पण तो पानकर्ता आस्तिक व मद्य-स्त्री-द्यूत इत्यादि व्यसनांनीं रहित असला तरच त्याला हें दिव्य करावयास सांगावें. कारण महा अपराध करणारा ( महापातकी ), वर्णाश्रमधर्मरहित, पाखंडी कृतघ्न, नपुंसक व कुत्सित ( प्रतिलोमज ) नास्तिक, व्रात्य व कोळी यांच्याकडून हें दिव्य करवूं नये.–हा अधिकारीनियम होय. गोमयाचें मंडल करून व त्यांत शोध्य पुरुषाला आदित्याभिमुख स्थापून कोशपान करवावें. कारण तसें नारदवचन आहे ११२.

तुलादिकांपासून विषापर्यन्त जी दिव्यें सांगितलीं आहेत, त्यांत दिव्यकर्ता शुद्ध आहे कीं अशुद्ध, याचा निर्णय तेव्हांच होतो, पण कोशाचा प्रकार तसा नाहीं, यास्तव योगीश्वर म्हणतात—

अर्वाक् चतुर्दशादह्नो यस्य नो राजदैविकम् ।
व्यसनं जायते घोरं स शुद्धः स्यान्न संशयः ॥ ११३ ॥

तें कोशपानरूप दिव्य केल्यापासून चवदा दिवसांच्या आंत ज्याला राजाच्या निमित्तानें अथवा दैवी आपत्तीनें घोर व फार मोठें दुःख होत नाहीं तो शुद्ध होय, असें जाणावें. कारण कोणत्याही देहवानाला अल्पदुःख होणें अगदीं अपरिहार्य आहे. पण तेंच ( महादुःख ) चवदा दिवसानंतर झाल्यास कांहीं दोष नाहीं. चवदा दिवस ही अवधि महाभियोगांविषयीं सांगितलेली आहे. अल्प अपराधामध्येंही कोश द्यावा, असें विधान असल्यामुळें अल्प अल्पराधविषयींची अवधीही पितामहानें निराळीच सांगितली आहे. तीन, सात, बारा किंवा चवदा रात्री अशा चार अवधि उक्त असून महायोगांत सांगितलेल्या द्रव्याहून ( म्हणजे सहस्रपणाहून ) न्यून द्रव्याविषयीं दिव्य केलेलें असल्यास त्या द्रव्याच्या प्रमाणाच्या अनुरोधानें तीन रात्री, सात रात्री व बारा रात्री हे तीन पक्ष योजावे ११३. इति कोशविधिः.

तुलेपासून कोशापर्यंत पांच महादिव्यें, ९५ त्या श्लोकांत ज्या क्रमानें त्यांचा नामनिर्देश केला होता त्याच क्रमानें, योगीश्वरानें वर्णिलीं. दुसऱ्या स्मृतीमध्यें अल्प अभियोगाविषयीं दुसरीं दिव्यें सांगितलीं आहेत, असें पितामहानें म्हटलें आहे—तंदुलांचें विधान मी सांगतों. चोरांना तंदुल द्यावे, दुसऱ्या कोणाला देऊं नये. साळींचे शुभ्र तांदूळ करावे. ते

मातीच्या भांड्यांत घालून शुचिकर्त्यानें आदल्या दिवशीं सूर्याच्या पुढें ठेवावे. त्यांत तीर्थोदक घालावें. उपोषण करावें. रात्रीं त्याच्या शेजारींच वास करावा. दुसऱ्या दिवशीं स्नान करावें. पूर्वेकडे तोंड करून उभें रहावें. मस्तकावर प्रतिज्ञापत्र बांधून घ्यावें. व मृन्मय पात्रांतील तांदूळ खाऊन पिंपळाच्या पानावर किंवा त्याच्या अभावीं भूर्जपत्रावर थुंकावें. ज्याच्या तोंडातून थुंकीबरोबर रक्त पडेल, हनुवटी व तालु फुटेल अथवा शरीर कापूं लागेल तो अशुद्ध आहे, असें समजावें. सर्व दिव्यामध्यें साधारण असलेलीं धर्मावाहनादि कर्में या दिव्यांतही करावीं. इति तंदुलविधिः.

तप्तमाषविधीही पितामहानें असा सांगितला आहे.-सोन्याचें, रुप्याचें, तांब्याचें, किंवा मातीचें सोळा अंगुळें विस्तीर्ण व चार अंगुळें खोल मंडळ ( वर्तुल ) पात्र करावें. त्यांत वीस पलप्रमाण घृत किंवा तेल घालावें. त्याला चांगलें तापवावें व तें तापून कडकडूं लागलें म्हणजे त्यांत सोन्याचा उडीद ( किंवा एक मासाभर सोन्याचा तुकडा ) टाकावा. नंतर दिव्य करणारानें आंगठा व त्याच्या जवळचीं एक किंवा दोन बोटें यांनीं त्या तप्तमाषाला वर उचलावें. त्याला उचलीत असतांना जो हात झाडीत नाहीं किंवा ज्याच्या हातावर फोड येत नाहींत, तर ज्याच्या हाताचीं बोटें निर्विकार असतात तो धर्मतः शुद्ध होतो. ‘ उद्धरेत् ’ असें पितामहाचें मूळ वचन असल्यामुळें पात्रांतून त्या माषाला नुसतें वर उचलावें. बाहेर फेकून देऊं नये.

याचाच दुसरा प्रकार--सोन्याच्या, रुप्याच्या, तांब्याच्या, लोखंडाच्या किंवा मातीच्या पात्रांत गाईचें घृत घालून पवित्र पुरुषानें तें अग्नीवर तापवावें. नंतर त्यांत सोन्याची, रुप्याची, तांब्याची किंवा लोखंडाची चांगली शुद्ध केलेली व पाण्यानें एकदां धुतलेली मुद्रिका त्यांत फेकावी. त्यापूर्वी पात्रांत तापून सळसळत असलेल्या तुपांत ओलें पान सोडून तें ‘ चुर्रर ’ असा आवाज करितें कीं नाहीं तें पहावें. नंतर ‘ परं पवित्रं ’ या मंत्रानें एकदा त्याचें अभिमंत्रण करावें मंत्राचा अर्थ असा--हे घृता, तूं यज्ञकर्मामध्यें परम पवित्र व अमृत आहेस. यास्तव हे पवित्र करणाऱ्या घृता, तूं पाप्याला जाळ. पवित्र पुरुषाला बर्फासारखें शीत हो. असो; त्यानंतर उपोषण करून, स्नान करून, ओलेत्यानें आलेल्या शोध्यास ती घृतांतील मुद्रिका आंगठ्याजवळच्या बोटानें घ्यावयास सांगावें. नंतर परीक्षकांनीं त्याचें आंगठ्याजवळचें बोट पहावें. त्यावर फोड आलेले नसल्यास दिव्य करणारा शुद्ध आहे व ते असल्यास तो अशुद्ध आहे असें जाणावें. या दिव्यामध्येंही धर्मावाहनादि–पत्रारोपपर्यंत सर्व विधान करावें. प्राड्विवाकानें घृताचें अनुमंत्रण करावें व शोध्यानें अग्नीचें अभिमंत्रण करावें. इति तप्तमाषविधिः

धर्माधर्माख्य दिव्य विधि पितामहानें सांगितला आहे. तो साहसाभियोगांत, अर्थाभियोगांत व पातकाभियोगांत होतो. रुप्याचा धर्म करावा व शिशाचा किंवा लोखंडाचा अधर्म करावा. अथवा भूर्जपत्रावर किंवा वस्त्रावर शुभ्र व कृष्णवर्ण धर्म व अधर्म लिहावे. त्यांच्यावर पंचगव्यानें प्रोक्षण करावें. गंधपुष्पांनीं पूजन करावें. धर्माला शुभ्र पुष्पें व अधर्माला काळीं

पुष्पें समर्पण करावीं. असो; अशा प्रकारच्या त्यांना तयार करून गोमयाच्या किंवा मातीच्या गोळ्यावर ठेवावें. नंतर एका कोऱ्या व शुद्ध मातीच्या भांड्यांत त्या दोघांनाही गुप्तपणें घालावें. तो घट सारविलेल्या जाग्यावर देव-ब्राह्मणासमीप आणून ठेवावा. त्यानंतर वर सांगितल्याप्रमाणें देवांचें आवाहन करावें. धर्मावाहनादि पत्रनिवेशान्त कर्म करावें. त्यानंतर ज्याच्यावर साहस, द्रव्य किंवा पातक यांतील एकाद्या दोषाचा आरोप झाला असेल त्यानें 'यदि पापविमुक्तो॰' इत्यादि मंत्रानें अभिमंत्रण करावें. त्याचा अर्थ असा-मी जर पापरहित असेन तर माझ्या हातांत धर्म येवो व अशुद्ध असेन तर अधर्म मजपाशीं येवो. असो; त्यानंतर अभियुक्तानें त्यांतील एकाला वर काढावें. धर्म त्याच्या हातांत आल्यास तो शुद्ध, नाहींतर अशुद्ध, असा निर्णय करावा. इति धर्माधर्मविधिः.

अल्प द्रव्य, मोठें द्रव्य इत्यादिकांविषयीं व विशेषप्रकारच्या जातीविषयीं मन्वादिकांनीं दुसऱ्या शपथा सांगितल्या आहेत. एका निष्काविषयीं सत्य, दोन निष्कांत पादस्पर्शन, तीन निष्कप्रमाण वादांत पुष्प व त्यापुढें कोशपान हीं दिव्यें करवावीं. ब्राह्मणास सत्याची शपथ घालावी, क्षत्रियास वाहनें व आयुधें यांची शपथ घ्यावयास सांगावें. गुरें, व्रीहियवादि बीजें व सोनें यांची शपथ वैश्यास व सर्व पातकांची शपथ शूद्रास घ्यावयास सांगावी. शपथ करूनही ज्याच्यावर लवकरच कांहीं राजकृत किंवा दैवकृत संकट प्राप्त होत नाहीं तो शुद्ध आहे, असें जाणावें. त्याची अवधि कार्याचें लाघव अथवा गौरव असेल त्या मानानें एका दिवसापासून पांच दिवसापर्यंत ठरवावी. अशा प्रकारच्या दिव्यांच्या योगानें जय किंवा पराजय यांचा निश्चय झाला असतां कात्यायनानें कोणता विशेष दंड करावा, तेंही सांगितलें आहे. जो शुद्ध ठरेल त्याला आरोप करणाराकडून पन्नास पण देववावे. व अशुद्ध ठरेल त्यास दंड करावा. विषामध्यें अशुद्ध ठरणारास सहस्र पण, जलदिव्यामध्यें सहाशें, अग्नीमध्यें पांचशें, तुलेमध्यें चारशें, कोशामध्यें तीनशें, तांदुळाच्या दिव्यांत अशुद्ध ठरल्यास दोनशें व तप्तमाषदिव्यांत एकशें पण दंड करावा. 'निह्नवे भावितो दद्यात्' इत्यादि (श्लोक ११) पूर्वोक्त दंडाशीं हा दिव्यामुळें प्राप्त होणारा दंड समुच्चित करावा म्हणजे तो दंड झालेला असला तरी त्याशिवाय हा दुसरा दंड करावा.

इति दिव्यप्रकरणम् ७.

---

# अथ दायविभागप्रकरणम् ८.



योगीश्वरानें मानुष व दैव असें दोन प्रकारचें प्रमाण वर्णिलें. आतां दायविभागाचें वर्णन करितात. स्वामीचा (धनवानाचा) संबंध याच एका निमित्तानें जें धन दुसऱ्याचें 'स्व' होतें त्याला दाय म्हणतात. तो दोन प्रकारचा आहे. एक अप्रतिबंध व दुसरा सप्रतिबंध.

पित्याचें व पितामहाचें धन पुत्रत्व व पौत्रत्व याचे निमित्तानें पुत्रांचें अथवा पौत्रांचें होतें. हा अप्रतिबंध दाय होय. धनवानाला पुत्र नसल्यास अथवा स्वामी नसल्यास त्याचें स्वं ( धन ) चुलता, भ्राते, इत्यादिकांस प्राप्त होत असतें. यास्तव पुत्र किंवा स्वामी असणें, हा प्रतिबंध होय. त्याच्या अभावीं पितृव्यत्वानें अथवा भ्रातृत्वानें पितृव्याचें अथवा भ्रात्याचें तें स्व होतें. यास्तव तो सप्रतिबंध दाय त्याच्या पुत्रादिकांविषयींही अशीच कल्पना करावी. अनेक प्रकारच्या द्रव्याचा समुदाय असून त्यावर अनेकांचें स्वामित्व असल्यास त्यांना एकत्र करून प्रत्येकाला धन विभागून देणें यास विभाग म्हणतात. पितृसंबंधीं धनाचा जो विभाग करितात. त्याला दायभाग म्हणतात, असें नारदानें म्हटलें आहे. कोणत्यावेळीं, कोणाचे, कसे व कोणीं विभाग करावे, हें येथें निरूपण करावयाचें आहे; पण त्यांतील कोणत्यावेळीं कोणी व कसे हे पुढील त्या त्या श्लोकाच्या व्याख्यानसमयीं सांगूं. येथें ' कोणाचा विभाग ' या एका गोष्टीचाच विचार करतों. विभागामुळें स्वत्व येतें कीं, स्वत्व असल्यामुळें विभाग होतो ? असा प्रश्न येतो. यास्तव प्रथम स्वत्वाचेंच निरूपण करूं या. स्वत्व केवल शास्त्रानेंच ज्ञात होण्यासारखें आहे कीं तें दुसऱ्या प्रमाणानें ज्ञात होतें ? गौतमाच्या ' स्वामिरिक्थक्रय: ' इत्यादि वचनावरून तें केवळ शास्त्रगम्यच आहे. त्याचा अर्थ असा-रिक्थ ( अप्रतिबंध दाय ), क्रय ( विकत घेणें ), संविभाग ( सप्रतिबंध दाय ), परिग्रह ( ज्याचा कोणी धनी नाहीं, अशा जल, तृण, काष्ठ, इत्यादिकांचा स्वीकार ), अधिगम ( निधि मिळणें ) हीं स्वामित्वाची साधारण निमित्तें असून ब्राह्मणाला परिग्रहानें मिळालेलें धन अधिक, क्षत्रियाला जिंकून मिळालेले अधिक, वैश्याला शेती, गोरक्षा इत्यादिकांमुळें मिळालेलें अधिक, व शूद्राला सेवेनें मिळालेले धन अधिक आहे. अर्थात् स्वत्व जर शास्त्रावाचून इतर प्रमाणांनीं गम्य असतें तर हें वचन व्यर्थ होतें. त्याचप्रमाणें मनूनेंही स्तेनातिदेशप्रकरणांत ' योऽदत्तादायिनो हस्तात् ' ( अ० ८ श्लो० ३४० ) या श्लोकांत ' जो ब्राह्मण कोणी न देतांच दुसऱ्याच्या वस्तूचें ग्रहण करणारापासून याजन व अध्यापन यांच्या योगानें धन घेतो तो ( ब्राह्मणही ) चोरासारखा होय ' असें म्हटलें आहे. स्वत्व जर लौकिक असतें तर न देतां घेणारापासून याजनादिद्वारा द्रव्य संपादन करणारास दंडाचें विधान करणें अनुचित झालें असतें. शिवाय स्वत्व जर लौकिक असतें तर माझें स्व यानें हरण केलें, असें कोणी म्हटलें नसतें. कारण अपहार केल्यावर लौकिकदृष्ट्या अपहार करणारापाशींच तें ( धन ) असल्यामुळें त्याचेंच त्यावर स्वत्व असतें. शिवाय ज्याच्यापाशीं जें धन असतें त्याचेंच त्याच्यावर स्वत्व असतें, हें म्हणणें जर उचित असतें तर एकाद्याच्या हातांत सोनें किंवा चांदी पाहिल्यावर सोन्या-चांदीच्या स्वरूपाप्रमाणेंच हें याचें आहे कीं दुसऱ्या कोणाचें असा संशय येणें उचित झालें नसतें. यास्तव स्वत्व केवल शास्त्रगम्यच आहे.

याप्रमाणें पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां आम्ही त्याचा उत्तरपक्ष सांगतों-स्वत्व लौकिकच आहे. कारण तें लौकिक अर्थक्रियेचें साधन असतें. स्वत्वावांचून क्रयादि अर्थक्रिया होत नाहीं. शिवाय शास्त्राप्रमाणें व्यवहार न करणाऱ्या प्रत्यन्तदेशवासी म्लेच्छप्राय लोकांचाही स्वत्वव्यवहार दिसतो. कारण तेही क्रय-विक्रयादि करितात. नियत उपायानें प्राप्त होणारें

स्वत्व लोकसिद्धच आहे. असें न्यायवेत्तेही मानतात. कारण पूर्वमीमांसेच्या लिप्सा सूत्रावरील व्याख्यानांत गुरुनें लोकसिद्ध स्वत्वसाधनाचेंच समर्थन केलें आहे–नियमानें संपादन केलेल्या धनानेंच क्रतूची सिद्धि होते, असा पूर्वपक्ष प्राप्त झाला असतां द्रव्यार्जनाच्या नियमाचें अतिक्रमण करून संपादन केलेल्या धनानेंच क्रतुसिद्धि होते. कारण, नियमाचें अतिक्रमण केल्यास पुरुष दोषी होतो. पण त्याचें अर्जित द्रव्यावरील स्वत्व नाहींसें होत नाहीं. चोरी करून मिळविलेल्या धनावर मुळीं लोकसिद्ध स्वत्वच प्राप्त होत नाहीं. तेव्हां चोरीच्या धनानें क्रतु तरी कसा होणार? असा उत्तरपक्ष तेथेंच सांगितला आहे. यास्तव, प्रतिग्रहानें उपायानें प्राप्त होणारें स्वत्व लौकिक आहे. वर सांगितलेले रिक्थादि पांच उपाय सर्वसाधरण असून ब्राह्मणादिकांना प्रतिग्रहादि असाधारण उपाय आहेत. त्याचप्रमाणें अनुलोमज व प्रतिलोमज यांना लोकप्रसिद्ध स्वत्व हेतूंतील सूतांना अश्वसारथ्य इत्यादि जें जें सांगितलें आहे तें तें सर्व येथें समजावें. त्यांतील एकाद्या उपायाच्या योगानें कोणीही कोणत्याही वस्तूचा स्वामी होतो.

स्वत्व जर लौकिक असतें तर ‘ यानें माझ्या धनाचा अपहार केला ’ इत्यादि कोणीं म्हटलें नसतें, असे जें वर पूर्वपक्षांत म्हटलें आहे, तें व्यर्थ होय. कारण, स्वत्वला कारण होणाऱ्या क्रियादिकांविषयीं संशय आल्याकारणानेंच त्यांच्या स्वत्वाविषयीं संदेह येत असतो. त्यामुळें अपहारकर्त्याचें स्वत्व सिद्ध होत नाहीं. स्वत्व केवळ शास्त्रगम्य आहे असें मानलें तर असत्प्रतिग्रह, निंद्य वाणिज्य इत्यादि उपायांनीं ब्राह्मणानें धन मिळविल्यास त्यावर त्याचें स्वत्वच येत नाहीं. व तें धन टाकून जप, तप इत्यादि अनुष्ठान केल्यास त्याला त्याचा दोष लागत नाहीं. त्यावर त्याचें स्वत्व न. त्यामुळें त्याच्या पुत्रांनाही त्याची वाटणी करितां येणार नाहीं. पण तें लौकिक आहे असें मानलें म्हणजे मग असत्प्रतिग्रहानें मिळविलेल्याही धनावर त्याचें स्वत्व असल्यामुळें त्याच्या पुत्रादिकांना त्याचा विभाग करितां येतो. अर्जन करणाराला मात्र स्वशुद्ध्यर्थ प्रायश्चित्त करावें लागतें. पुत्रादिकांचा दायसंबंध असला तरी दोषसंबंध नाहीं. कारण, मनूनें ( अ. १० श्लोक १५ ) दाय, लाभ, क्रय, जय, प्रयोग ( व्याजीं लावणें ), कर्मयोग व सत्प्रतिग्रह हे सात धर्म्य वित्तागम सांगितले आहेत.

आतां असा संदेह येतो कीं, विभागामुळें स्वत्व येतें अथवा स्वत्व असल्यामुळें विभाग होतो. याविषयीं पूर्वपक्ष असा येतो–विभागामुळें स्वत्व येणेंच युक्त आहे. कारण नुसत्या जन्मानेंच जर स्वत्व येतें तर उत्पन्न झालेल्या पुत्राचेंही पैतृक धन ‘ साधारण स्व ’ असल्यामुळें त्याच्या पित्याला द्रव्यसाध्य आधानादिकांमध्यें अधिकारच नाहीं, असें झालें असतें. त्याचप्रमाणें विभागापूर्वी पित्याच्या प्रसादानें प्राप्त झालेल्या धनाचा विभाग होत नाहीं, असें जें सांगितलें आहे, तें उपपन्न झालें नसतें. ‘ शौर्यधन, भार्याधन, विद्याधन व पैतृक प्रसाद यांचा विभाग होत नाहीं. ’ तसेंच ‘ भर्त्यानें स्त्रीला संतुष्ट होऊन जे दिलें असेल त्याचा तिनें त्याच्या मरणानंतर स्वेच्छेनें उपभोग घ्यावा अथवा कोणालाही द्यावें. केवळ स्थावर धन मात्र तिला कोणाला देतां येत नाहीं. ’ अशींच आणखीं दुसरींही अनेक प्रमाणें आहेत. त्यांवरून जन्मानें स्वत्व येत नाहीं, तर स्वामीचा नाश होणें अथवा विभाग यांच्या योगानें स्वत्व येतें, असें ठरतें.

या पूर्वपक्षाचें समाधान असें-स्वत्व लोकप्रसिद्धच आहे, हें वर सांगितलें. व्यवहारांत पुत्रादिकांच्या जन्मानेंच पैतृक धनावर स्वत्व येतें, हें प्रसिद्ध आहे. यास्तव त्याचा निषेध करतां येत नाहीं. वर ज्या वचनांचा संक्षेपतः निर्देश केला आहे तीं सर्व वचनें जन्मानें स्वत्व मानणें, यापक्षींच चांगलीं लागतात. विभाग हा शब्द ज्या धनाचे स्वामी अनेक असतात, त्यालाच लागतो, हें लोकप्रसिद्ध आहे. 'मणि, मोत्यें, प्रवाल इत्यादिकांचा प्रभु पिता आहे. पण कोणत्याही स्थावराचा पिता किंवा पितामह प्रभु नाहीं.' हें वचन जन्मानें स्वत्व सुचवितें. 'पितामहानें स्वकष्टानें जरी धन मिळविलें असलें तरी पुत्र व पौत्र असल्यास त्याला त्याचा यथेष्ट विनियोग करितां येत नाहीं' हें वचन पुत्र व पौत्र यांचें जन्मानें स्वत्व सुचवीत आहे. पित्याला स्थावराचें प्रीतिदान करावयाचें असल्यास पुत्राच्या संमतीनेंच करणें उचित आहे. त्याला स्थावरातिरिक्त मणि-मुक्तादि पदार्थांचें मात्र भार्यादिकांना प्रीतिदान करितां येतें. जन्मानें स्वत्व येतें, असें म्हटल्यास पित्याला पुत्रोत्पत्तीनंतर द्रव्यसाध्यकर्मांचा अधिकारच नाहीं, असें होईल, ही शंका व्यर्थ आहे. कारण शास्त्राच्या विधानबलानेंच त्याला त्यांचा अधिकार प्राप्त होतो. तस्मात् पितृसंबंधी व पितामह संबंधी द्रव्यावर पुत्र व पौत्र यांचें जन्मानेंच स्वत्व सिद्ध होतें. तथापि पित्याला अवश्यक धर्मकर्मांत वचनांनीं सांगितलेल्या-प्रसाद, दान, कुटुंबपोषण, आपत्तींतून सुटणें, इत्यादि कार्यांत-स्थावरातिरिक्त द्रव्याचा विनियोग करण्याचें स्वातंत्र्य आहे. पण स्वतः मिळविलेल्या अथवा वडिलार्जित स्थावराचा मात्र पुत्रादिकांच्या संमतीनेंच त्याला विनियोग करितां येतो. स्वतः मिळविलेल्या स्थावराप्रमाणें द्विपद प्राण्यांचाही दान, विक्रय वगैरे पुत्रांच्या संमतीवाचून होत नाहीं. उत्पन्न झालेल्या, पुढें होणाऱ्या व गर्भांत असलेल्या पुत्रांचाही त्यांत विभाग असतो. यास्तव एकट्या पित्याला त्याचें दान—विक्रय इत्यादि करण्याचा अधिकार पोंचत नाहीं. पण या सामान्य नियमाला एक अपवाद आहे. पुत्र, पौत्र अथवा भ्राते व्यवहार-अवस्थेस प्राप्त झालेले नसल्यामुळें अनुज्ञा देण्यास असमर्थ असल्यास व सर्व कुटुंबास व्यापणारी एकादी आपत्ति आल्यास त्याचें पोषण करण्यास्तव किंवा अवश्य कर्तव्य पितृश्राद्धादिकांकरितां एकटा मुख्य स्वामीही स्थावराचें दान-विक्रय इत्यादि करूं शकतो. 'अविभक्ता विभक्ता वा०' इत्यादि वचनांत सपिंड विभक्त झालेले असोत, कीं अविभक्त असोत ते स्थावराचे सारखेच स्वामी आहेत. यास्तव त्यांतील एकच (मुख्य किंवा अमुख्य) त्याचें दानादि करण्यास समर्थ नसतो, असें सांगितलें आहे. सपिंड अविभक्त असल्यास द्रव्य मध्यस्थ असतें. त्यामुळें त्यांतील कोणा एकाला त्याचें मुळीं स्वामित्वच नसतें. यास्तव, सर्वांच्या अनुज्ञेची अवश्यकता असते. पण विभाग झाल्यावर द्रव्याला मध्यस्थत्व रहात नाहीं. तथापि पुढें विभक्त— अविभक्त इत्यादि संशयांचा निरास होऊन व्यवहार सुकर व्हावा, म्हणून सर्वांच्या अनुज्ञेची अवश्यकता असते; विभक्त—अवस्थेंत प्रत्येकाला स्वामित्व नसतें, म्हणून नव्हे. यास्तव विभक्तांच्या अनुमतीवाचूनही व्यवहार सिद्ध होतोच. आतां स्वग्राम, ज्ञाति, सामन्त व दायाद यांचें अनुमोदन आणि सुवर्ण आणि जल देणें या सहा उपायांनीं भूमि एकाच्या हातांतून दुसऱ्याच्या हातांत जाते, असें म्हटलें आहे; पण तें सुद्धां विशेषतः स्थावराचा प्रतिग्रह उघड उघड सर्वांसमक्ष करावा, असें दुसऱ्या

वचनांत सांगितलेलें असल्यामुळें ग्रामाचीं अनुमति घ्यावी एवढेंच सुचवीत आहे. ग्रामाच्या अनुमतीवाचून व्यवहारच सिद्ध होत नाहीं, असें नाहीं, पुढें सामेविषयीं वाद निघूं नये, म्हणून सामंताची ( म्हणजे आपल्या भूमीस ज्याची भूमि लागली आहे त्याची ) अनुमति घ्यावयास सांगितली आहे. ज्ञाति व दायाद यांच्या अनुमतीचें प्रयोजन विभक्तांच्या अनुमतीच्या प्रयोजनाप्रमाणेंच समजावें. स्थावराच्या विक्रयाचा निषेध करून 'सर्वांच्या अनुमोदनानें त्याला पाहिजे तर गहाण ठेवावें,' व 'भूमीचा जो प्रतिग्रह किंवा दान करतो ते दोघेही पुण्यकर्मवान् होत' असें स्मृतिवचन असल्यामुळें स्थावराचा विक्रय जरी कर्तव्य असला तरी हिरण्यासह जल देऊन तो दानरूपानेंच करावा. असो; सारांश, याप्रमाणें पित्याच्या किंवा पितामहाच्या धनावर जन्मानेंच स्वत्व येत असलें तरी त्याविषयींचा विशेष 'भूर्या पितामहोपात्ता' या ( १२१ ) श्लोकांत सांगूं.

आतां अगोदर कोणत्या वेळीं, कोणी व कसा विभाग करावा; तें दाखवितात—

**विभागं चेत्पिता कुर्यादिच्छया विभजेत्सुतान् ।**
**ज्येष्ठं वा श्रेष्ठभागेन सर्वे वा स्युः समांशिनः ॥ ११४ ॥**

जेव्हां पिता विभाग करण्याची इच्छा करीत असेल तेव्हां त्यानें पुत्रांना आपल्या इच्छेप्रमाणें विभाग देऊन आपल्यापासून दूर करावें. पण इच्छा निरंकुश असल्यामुळें त्याविषयीं नियम सांगतात— ज्येष्ठाला श्रेष्ठ, मध्यमाला मध्यम व कनिष्ठाला कनिष्ठ भाग द्यावा. श्रेष्ठादि विभाग मनूनें ( अ. ९ श्लोक ११२ ) सांगितला आहे. अथवा ज्येष्ठादि सर्वांनाच समानांश द्यावे. वरील विषम विभागही स्वतः संपादन केलेल्या धनाचाच देतां येतो. पितामहापासून क्रमानें प्राप्त झालेल्या धनावर सर्वांचें एकसारखेंच स्वामित्व असतें, असें पुढें सांगावयाचें असल्यामुळें त्याचा विषम विभाग होऊं शकत नाहीं. असो; पित्याला इच्छा होणें, हा एक काल झाला. दुसरा काल नारदानें सांगितला आहे. पिता जिवंत असला तरी द्रव्याविषयीं निःस्पृह झाला आहे; त्याची संभोगेच्छा निवृत्त झाली आहे, मातेचा विटाळ गेला आहे, अशा अवस्थेंत पित्याची इच्छा नसली तरी पुत्रांच्या इच्छेनेंच विभाग होऊं शकतो. अशावेळीं पुत्रांनीं धन सारखें वाटून घ्यावें. तिसरा काल हा—मातेचें रज निवृत्त झालेलें नाहीं, व पित्याची इच्छाही नाहीं; पण तो अधर्माचरण करणारा आहे अथवा दीर्घरोगग्रस्त आहे तर अशावेळीं पुत्रांच्या इच्छेनें विभाग होतो ११४.

पित्याच्या इच्छेनें दोन प्रकारचा विभाग दाखविला. एक सम व दुसरा विषम. त्यांतील समविभागाविषयीं कांहीं विशेष सांगतात—

**यदि कुर्यात्समानंशान् पत्न्यः कार्याः समांशिकाः ।**
**न दत्तं स्त्रीधनं यासां भर्त्रा वा श्वशुरेण वा ॥ ११५ ॥**

जेव्हां पिता स्वेच्छेनें सर्व पुत्रांस समविभागवान् करतो तेव्हां त्यानें भार्यांनाही पुत्रांसारखाच ( पुत्राइतकाच ) भाग द्यावा. स्त्रीधन दिलें असल्यास 'अर्धांश द्यावा' असें पुढें

सांगतील, पण तो जेव्हां श्रेष्ठ भागादिकांच्या योगानें ज्येष्ठादिकांस विभक्त करतो तेव्हां भार्यांना श्रेष्ठादि भाग मिळत नाहींत. तर श्रेष्ठादि भागांचें ( वीस, दहा, पांच ) इत्यादि धन काढून घेतल्यावर बाकींचें जें धन राहील त्यांतून सम भाग मिळतो. व आपापला काढून ठेवलेला विभागही मिळतो. घरांतील परीभांड व अलंकार हा भार्येचा उद्धृत ( काढून ठेवलेला ) अंश आहे ११५.

ज्येष्ठास श्रेष्ठ भाग अथवा सर्व समांश या दोन्ही पक्षांचा अपवाद सांगतात---

## शक्तस्यानीहमानस्य किञ्चिद्दत्वा पृथक् क्रिया ।

स्वतःच द्रव्यार्जन करण्यास समर्थ असलेल्या व पितृधनाची इच्छा न करणाऱ्या पुत्राला कांहीं एकादी असार वस्तुही देऊन पित्यानें स्वतःपासून विभक्त करावें. पुढें त्याच्या पुत्रादिकांना दाय घेण्याची इच्छा होऊं नये, म्हणून हें करणें इष्ट आहे.

श्रेष्ठ, मध्य, कनिष्ठ, इत्यादि न्यूनाधिक विभाग जो वर दाखविला आहे तो शास्त्रीय रीतीनेंच झाला पाहिजे. त्यावांचून केलेला विषम विभाग निषिद्धच आहे, असें आतां सांगतात--

## न्यूनाधिकविभक्तानां धर्म्यः पितृकृतः स्मृतः ॥ ११६ ॥

न्यूनाधिक विभागानें विभक्त केलेल्या पुत्रांचा तो न्यूनाधिक विभाग जर धर्म्य ( शास्त्रोक्त ) असेल तरच तो पित्यानें केलेला विभाग व्यवस्थित होतो. ( तो पुनः बदलत नाहीं. ) असें मन्वादिकांनीं सांगितलें आहे. पण तो शास्त्रोक्त नसल्यास पित्यानें केलेला असला तरी निवृत्त होतो. कारण नारदानें—व्याधित, कुपित, विषयासक्तचित्त व शास्त्रविरुद्ध आचरण करणारा पिता विभाग करण्यास योग्य ( समर्थ ) नसतो असें म्हटलें आहे. ११६.

आतां विभागाचा निराळा काळ, निराळा कर्ता व प्रकाराचा नियम सांगतात—

## विभजेरन्सुताः पित्रोरूर्ध्वं रिक्थमृणं समम् ।

माता व पिता यांच्या मरणानंतर ( हा काल दाखविला. ) पुत्र ( हा कर्ता ) रिक्थ व ऋण यांचा समविभाग करूं शकतात. ( सम हा विभागाचा प्रकार होय. ) यावर शंका अशी येते–मनूनें ( अ. ९ श्लो. ११२ ) पित्याचें सर्व धन ज्येष्ठ पुत्रानेंच घ्यावें व बाकीच्या पुत्रांनीं त्याला पित्याप्रमाणें समजून त्याच्यावर उपजीविका करावी. त्याचप्रमाणें ज्येष्ठाला सर्व द्रव्याचा विसावा भाग व सर्व उत्तम वस्तु, मध्यमाला चाळीसावा भाग व मध्यम प्रतीच्या वस्तु आणि कनिष्ठाला ऐंशीवा भाग व हीन प्रतीच्या वस्तु अशी विभागकल्पना मातापितरांच्या पश्चात् विभक्त होणाऱ्या पुत्रांना उद्देशून सांगितली आहे. पण असा उद्धार काढलेला नसल्यास ज्येष्ठाचे दोन भाग, त्याच्या पाठच्या भावाचा दीड भाग व त्याच्या मागून होणाऱ्या सर्वांना एकेक भाग द्यावा, असा उद्धारावाचूनही विषम विभाग सांगितला आहे. तस्मात् पित्याच्या जीवितसमयीं अथवा त्याच्या पश्चातही विषम विभाग

उक्त आहे. मग तुम्हीच त्यांनीं मातापितरांच्या मागें समविभागच करावा, असा नियम कां करितां ?

या शंकेचें समाधान असें—हा विषम विभाग शास्त्रदृष्ट आहे, हें खरें. पण तो लोकांच्या द्वेषास पात्र झालेला असल्यामुळें त्याचें कोणी अनुष्ठान करूं नये. "स्वर्ग देणारें नव्हे, असें एकादें धर्म्य आचरणही लोकांच्या द्वेषास पात्र होत असल्यास करूं नये," असा नियम आहे. 'अतिथि होऊन आलेल्या श्रोत्रियाला मोठा पाडा किंवा बकरा मारून खावयास द्यावा' असें स्मार्त किंवा 'मैत्रावरुणीं गां वशामनुबन्ध्यामालभेत' असें गवालंभाचें श्रौत विधान असलें तरी तें लोकद्विष्ट असल्यामुळें त्याचें कोणी अनुष्ठान करीत नाहीं. या विषयीं 'यथा नियोगधर्मो नो नानुबन्ध्यावधोऽपि वा । तथोद्धारविभागोऽपि नैव संप्रति वर्तते ॥' म्हणजे ज्याप्रमाणें नियोगधर्म, व गोवध सांप्रतकाळीं रूढ नाहीं त्याप्रमाणें उद्धारविभागही हल्लीं प्रचारांत नाहीं. आपस्तंबानेंही 'जिवंत पित्यानें पुत्रास दाय सारखें वाटून द्यावें.' असें सांगून व उद्धारविभागाचा–एकाचें मत म्हणून–निर्देश करून शास्त्रनिषिद्ध असलेल्या त्याचें निराकरणही केलें आहे. स्वतः मनूनेंही तो शास्त्रप्रतिषेध स्वतः सांगितला आहे. तस्मात् विषम विभाग शास्त्रदृष्ट जरी असला तरी तो लोक व 'पुत्रेभ्यो दायं विभजेत्' अशी सामान्य श्रुति यांच्या विरुद्ध असल्यामुळें त्याचें अनुष्ठान करूं नये. तर समविभागच करावा असा येथें नियम केला जात आहे.

माता व पिता यांचें धन पुत्रांनीं वाटून घ्यावें, असें सांगितलें. पण आतां मातृधनाविषयीं अपवाद सांगतात—

## मातुर्दुहितरः शेषमृणात्ताभ्य ऋतेऽन्वयः ॥ ११७ ॥

मातेचें धन कन्यांनीं वाटून घ्यावें. मातेनें जें ऋण केलें असेल तें फेडून बाकी राहिलेलें धन त्यांनीं वाटून घ्यावें. जितकें ऋण तितकेंच किंवा त्याहून न्यून मातृधन असल्यास पुत्रांनीं त्याचा विभाग करावा. (अर्थात् वरील (पूर्वार्धांतील) वचन अशा अवस्थेंत सार्थ होतें). याचा सारांश असा––मातेनें केलेलें ऋण पुत्रांनींच फेडावें; कन्यांनीं नव्हे. ऋण देऊन अवशिष्ट राहिलेलें धन मात्र कन्यांनीं घ्यावें. हें योग्यही आहे. कारण 'पुरुषाचें शुक्र अधिक झाल्यास पुरुष व स्त्रीचें शुक्र अधिक झाल्यास स्त्रीसंतान होतें' असें वचन असल्यामुळें स्त्रीचे अवयव कन्यांमध्यें अधिक असतात. यास्तव स्त्रीधन कन्येला प्राप्त होणेंच उचित आहे. पित्याचे अवयव पुत्रामध्यें अधिक असल्यामुळें पितृधन पुत्रास प्राप्त होतें. त्याविषयीं गौतमानें असा विशेष दाखविला आहे––प्रत्ता (विवाहविधीनें दिलेल्या) व अप्रत्ता अशा दोन्ही प्रकारच्या कन्या असल्यास त्यांच्या आईचें धन विवाह न झालेल्या कन्यांना प्राप्त होतें. पण सर्वच विवाहित असल्यास त्यांत ज्या निर्धन असतील त्यांना तें मिळतें. पण कन्या मुळींच नसल्यास ऋण देऊन राहिलेलें मातृधन कोणीं घ्यावें ? असा प्रश्न आला असतां 'ताभ्य ऋतेऽन्वयः' या चवथ्या चरणानें त्याचें उत्तर सांगतात–त्या

कन्या नसल्यास तिच्या पुत्रादि अन्य संततीनें तें घ्यावें. पण हें या श्लोकाच्या पूर्वार्धानेंच सिद्ध असतांना केवल स्पष्ट करण्यासाठीं येथें पुनः सांगितलें आहे. ११७.

आतां विभाग करण्यास अयोग्य काय काय आहे, तें सांगतात—

पितृद्रव्याविरोधेन यदन्यत्स्वयमर्जितम् ।
मैत्रमौद्वाहिकं चैव दायादानां न तद्भवेत् ॥ ११८ ॥

क्रमादभ्यागतं द्रव्यं हृतमप्युद्धरेत्तु यः ।
दायादेभ्यो न तद्द्याद्विद्यया लब्धमेव च ॥ ११९ ॥

आई—बापांच्या द्रव्याचा व्यय न करितां जें स्वतः संपादन केलेलें धन असेल, मित्रापासून जें मिळालें असेल व विवाहामुळें जें प्राप्त झालें असेल तें दायादांचें (भ्रात्यांचें) होत नाहीं. तसेंच पितृक्रमानें प्राप्त झालेलें एकादें द्रव्य दुसऱ्यांनीं हरण केलें; पण असामर्थ्यामुळें पित्रादिकांनीं तें परत मिळविलें नाहीं. पुढें पुत्रांतील एकाद्यानें इतरांच्या अनुज्ञेनें तें त्या अपहारकापासून परत मिळविलें, तर त्यानें तेंही भ्रात्यांस देऊं नये. ज्यानें त्याचा उद्धार केला असेल त्यानेंच तें घ्यावें. पण तेंच क्षेत्र असल्यास उद्धार करणाराला त्याचा चवथा भाग मिळतो. बाकीचें सर्वांनीं सारखें वाटून घ्यावें. कारण शंखानें तसें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें विद्येनें ( वेदाध्ययन, अध्यापन, व्याख्यान इत्यादि उपायांनीं ) संपादन केलेलें धनही दायादास देऊं नये. तें अर्जन करणारानेंच घ्यावें. या सर्व पक्षांमध्यें पितृद्रव्याचा व्यय न करितां, हें विशेषण लावावें. अर्थात् पितृद्रव्याचा व्यय करून प्रत्युपकाररूपानें मिळविलेलें मैत्रधन, आसुरादि विवाहांत मिळालेलें धन, पितृधन खर्चून दुसऱ्यापासून सोडविलेलें धन अथवा पितृधन खर्चून संपादन केलेल्या विद्येच्या योगानें मिळालेलें धन सर्व भ्राते व पिता यांनीं वाटून घ्यावें. फार काय पण पितृधन खर्चून प्रतिग्रहानें मिळविलेलें धनही विभागास पात्र आहे. नारदानें तर 'विद्या शिकत असलेल्या भ्रात्याचें कुटुंब जो पोसतो त्याला पूर्वीं प्रतिज्ञा केलेली नसली तरी त्या विद्येपासून प्राप्त होणाऱ्या धनाचा विभाग मिळतो.' असेंही सांगितलें आहे. ज्या विद्याधनाचा विभाग करतां येत नाहीं त्याचें लक्षण कात्यायनानें असें सांगितलें आहे. 'दुसऱ्याचें अन्न खाऊन दुसऱ्या पासून जो विद्या संपादन करतो त्यानें त्या विद्येच्या योगानें मिळविलेलें धन अविभाज्य आहे. तस्मात् 'पितृद्रव्याविरोधेन' हें विशेषण सर्व पक्षांस न लावितां तें भिन्नवाक्य आहे, असें समजल्यास प्रतिग्रहानें संपादन केलेलें धन अविभाज्य आहे, असें होईल. पण तें आचाराच्या विरुद्ध आहे. हीच गोष्ट मनूनेंही ( अ. ९ श्लो. २०८ ) अशी स्पष्ट केली आहे—पितृद्रव्याचा व्यय न करितां स्वतःच्या श्रमानें म्हणजे सेवा, युद्ध इत्यादिकांच्या योगानें मिळविलेलें धन व विद्येनें मिळविलेलें धन दायादांस देऊं नये.

यावर कोणी अशी शंका घेतात— पितृद्रव्याचा व्यय न करितां मैत्र्यादिकांमुळें मिळविलेलें धन अविभाज्य आहे, असें सांगण्याची मुळीं आवश्यकताच नाहीं. कारण त्याचा विभाग प्राप्तच नाहीं. ज्यानें जें मिळविलें असेल तें त्याचेंच, दुसऱ्याचें नव्हे, हें अगदीं प्रसिद्ध आहे, आणि ज्याची प्राप्ति असते त्याचाच निषेध करितां येतो. अप्राप्ताचा निषेध होत नाहीं.

पण याप्रसंगीं कोणी अशी प्राप्ति दाखवितात— ' यत्किंचित्पितरि प्रेते० ' या वचनानुसार ज्येष्ठ, मध्यम किंवा कनिष्ठ पुत्र, पिता मृत झाला असतां अथवा जिवंत असतांना मैत्रादि निमित्तानें जें धन मिळवितो त्याचा विभाग सर्वांस मिळतो, असें ठरतें. यास्तव या प्राप्तीचा निषेध करण्यासाठीं हें वरील वचन प्रवृत्त झालें आहे.

परंतु ही प्राप्ति ठीक नव्हे. कारण, येथें प्राप्त विभागाचा प्रतिषेध केलेला नाहीं. तर सिद्ध वस्तूचाच तो अनुवाद आहे. या प्रकरणामध्यें प्रायः सर्व वचनें लोकसिद्ध गोष्टींचाच अनुवाद करणारीं आहेत. अथवा ' सर्वे तत्र समांशिनः ' या वचनानें प्राप्त झालेल्या विभागाचा हा अपवाद आहे असें समजून प्रतिपक्षानें संतुष्ट व्हावें. तस्मात् ' यत्किंचित्पितरि० ' या वचनानें मैत्रादि धनाच्या विभागाची प्राप्ति होते, असें म्हणणें हा शुद्ध व्यामोह आहे. मनूनें ( अ. ९ श्लो. २१९ ) आणखीही ' वस्त्र, पत्र, अलंकार, कृतान्न, उदक, स्त्रिया, योगक्षेम व प्रचार यांचा विभाग होत नाहीं, असें सांगितलें आहे. धारण केलेलीं वस्त्रें अविभाज्य आहेत म्हणजे जें वस्त्र ज्यानें धारण केलें असेल तें त्याचेंच होय. पित्यानें धारण केलेलीं वस्त्रें पित्याच्या पश्चात् विभक्त होणाऱ्या पुत्रांनीं त्याच्या श्राद्धाचेवेळीं पितृस्थानीं भोजन करणाऱ्या ब्राह्मणास द्यावीं. कारण बृहस्पतीनें ' पित्याचीं वस्त्रें, अलंकार, शय्या, वाहनें इत्यादि श्राद्धभोक्त्या ब्राह्मणास गंध—पुष्पांनीं पूजन करून समर्पण करावीं. ' असें म्हटलें आहे. नूतन वस्त्राचा विभाग करावा. मनुवचनांतील ' पत्र ' या शब्दाचा वाहन असा अर्थ करावा. अर्थात् घोडा, पालखी इत्यादिकांतील ज्यामध्यें जो आरूढ झाला असेल त्यानेंच तें घ्यावें. एकाचेच अनेक अश्वादि असल्यास जे लोक त्यांना विकून उपजीविका करीत असतील त्यांनीं त्यांचा विभागच करावा. विषम विभाग करावयाचा असेल तर ते सर्व ज्येष्ठाला प्राप्त होतात. मनूच्या (अ. ९ श्लो. ११९) 'अजाविके सैकशफं०' या वचनाच्या अनुरोधानें बकऱ्या व मेंढया यांचा समूह व एका खुरानें युक्त असलेले घोडे, गर्दभ वगैरे ज्येष्ठालाच प्राप्त होतात. अंगावर घातलेला अलंकारही अविभाज्य आहे.पण जो अलंकार धारण केलेला नसेल तो विभागास पात्र होतो.भात,लाडू इत्यादि तयार केलेल्या अन्नाचा विभाग करूं नये. तर त्यांचा यथासंभव उपभोग घ्यावा. उदक शब्दानें उदकाधार कूपादि घ्यावें. त्यांचा मूल्यादिकांच्या द्वारा विषम विभाग करूं नये. तर सर्वांनीं एकदम अथवा पर्यायानें त्यांचा उपभोग घ्यावा. स्त्रिया म्हणजे दासी; त्यांचाही मूल्यादिद्वारा विषम विभाग करूं नये. तर पर्यायानें काम करवावें. पित्यानें अंतःपुरांत ठेवलेल्या स्वैरिणी स्त्रियाही पुत्रांस अविभाज्य आहेत. कारण पित्याशीं संयुक्त झालेल्या स्त्रियांचा

विभाग होत नाहीं, असें गौतमानें सांगितलें आहे. योग-म्हणजे जें अलब्ध आहे, त्याच्या लाभाचें कारण श्रौतस्मार्ताग्निसाध्य इष्ट कर्म व क्षेम म्हणजे जें लब्ध झालें असेल त्याच्या परिरक्षणास कारण होणारें बहिर्वेदी दान--तडाग—उपवनादि निर्माणरूप पूर्त कर्म. अर्थात् योगक्षेम म्हणजे इष्टापूर्त कर्म पितृद्रव्याचा व्यय करून संपादन केलेलें असलें तरी अविभाज्य आहे. लौगाक्षीनें 'क्षेम म्हणजे पूर्त व योग म्हणजे इष्ट,' असें सांगितलें आहे. योगक्षेम शब्दानें योगक्षेम करविणाऱ्या राजा-मंत्री-पुरोहित इत्यादिकांचें ग्रहण करावें, असें कित्येक म्हणतात. छत्र, चामर, शस्त्र, उपानत् (जोडा, वाहाणा) इत्यादिकांचें ग्रहण करावें, असें कोणी म्हणतात. प्रचार म्हणजे घर, उपवन इत्यादिकांत जाण्याचा मार्ग. तोही अविभाज्य आहे. उशनसानें क्षेत्रही (शेतही) अविभाज्य आहे, असें सांगितलें आहे; पण तें ब्राह्मणापासून उत्पन्न झालेल्या क्षत्रियापुत्रादिकांविषयीं आहे. कारण 'न प्रतिग्रहभूर्देया०' म्हणजे प्रतिग्रहानें संपादन केलेली भूमि क्षत्रियास्त्रीपासून झालेल्या पुत्राला देऊं नये. ती पित्यानें जरी दिली असली तरी तो मेल्यावर ब्राह्मणीपुत्रानें परत घ्यावी, असें स्मृतिवचन आहे. पित्याच्या प्रसादानें प्राप्त झालेलें धनही अविभाज्य आहे. नियमाचें उल्लंघन करून मिळविलेलें धन अविभाज्य नाहीं. तर तें विभागास योग्यच आहे. पित्याचें द्रव्य खर्च करून जें संपादिलेलें असेल त्याचा विभाग करावा, असें वर सांगितलें आहे; पण अशा द्रव्याचें संपादन करणाराला दोन भाग द्यावे. कारण वसिष्ठानें 'येन चैषां स्वयमुपार्जितं स्यात्०' इत्यादि वचनांत तसें स्पष्ट सांगितलें आहे. ११८, ११९.

आतां यांचा अपवाद सांगतात.--

### सामान्यार्थसमुत्थाने विभागस्तु समः स्मृतः ।

कोणी तरी एका भावानें अविभक्त भ्रात्यांच्या सामान्य (समायिक) द्रव्यास शेती, व्यापार इत्यादि उपायांच्या योगानें वाढविलें असतां वाटणीच्यावेळीं सर्वांस सारखाच भाग द्यावा. ज्यानें समायिक द्रव्य वाढविलें असेल त्यास वर सांगितल्याप्रमाणें दोन भाग देऊं नयेत.

असो; येथवर पित्याच्या द्रव्याची वाटणी पुत्रांनीं कशी करावी तें सांगितलें. आतां पितामहाच्या द्रव्याची वाटणी नातवांनीं कशी करावी तें सांगतात--

### अनेकपितृकाणां तु पितृतो भागकल्पना ॥ १२० ॥

या प्रकरणाच्या आरंभीं पितामहाच्या द्रव्यावर पुत्रांप्रमाणें नातवांचें जन्मतःच स्वत्व (मालकी) येतें असें जरी सांगितलें आहे, तरी त्याची वाटणी करितांना पित्याच्या द्वाराच आजोबाच्या द्रव्याचे विभाग केले पाहिजेत. हेंच अधिक स्पष्ट करितों. पित्याचें द्रव्य वाटून घेऊन विभक्त झालेले तीन भ्राते पुत्र झाल्यावर मरण पावले; पण त्यांतील एकास दोन पुत्र होते; दुसऱ्यास तीन व तिसऱ्यास चार. पित्याच्या द्वारा नातवांचा पितामहाच्या द्रव्यावर हक्क पोचतो, असें जर न मानलें व नातू याच दृष्टीनें त्याचा साक्षात् हक्क पोचतो

असें समजलें तर पितामहाच्या सर्व द्रव्याचे सारखे नऊ भाग करावे लागणार. कारण नातू नऊ आहेत. पण तसें करितां येत नाहीं. कारण नातू जन्माच्या योगानेंच जरी पितामहाच्या धनाचा वारस होत असला तरी तो पित्याच्या द्वारा वारस होतो, असा नियम आहे. यास्तव वरील उदाहरणांत पितामहाच्या धनाचे तीन समान भाग करून पहिल्या दोघां नातवांस एक, दुसऱ्या तिघांस दुसरा व तिसऱ्या चौघांस तिसरा भाग द्यावा. त्याचप्रमाणें कांहीं पुत्र जिवंत असतां व कांहीं पुत्र होऊन मरण पावले असतां हाच न्याय समजावा. म्हणजे जे जिवंत असतील त्यांस त्यांचा भाग द्यावा व मेलेल्या पुत्रांच्या पुत्रांस म्हणजे नातवांस त्यांच्या बापाचा भाग द्यावा १२०.

आतां—पित्यानें आपल्या भ्रात्यांपासून वाटणी घेतली आहे किंवा त्याला भ्राताच नसल्यामुळें त्याच्या पित्याचें सर्व धन त्यास मिळालें आहे, अशा प्रसंगीं त्याच्या पुत्राचें म्हणजे नातवाचें पितामहाच्या द्रव्यावर स्वत्व आहे की नाहीं ? अशी शंका येते. कारण आजोबाच्या धनावर पित्याच्या मरणानंतर नातवाचा हक्क पोचतो, असें वर म्हटलें आहे. किंवा पित्यानें स्वकष्टानें मिळविलेल्या धनाप्रमाणें त्याच्या इच्छेनेंच नातवास आजोबाचेंही धन मिळतें. पित्याच्या इच्छेविरुद्ध मिळत नाहीं, अशी शंका आली असतां त्याचें उत्तर देतात—

**भूर्या पितामहोपात्ता निबन्धो द्रव्यमेव च ॥**
**तत्र स्यात्सदृशं स्वाम्यं पितुः पुत्रस्य चैव हि ॥ १२१ ॥**

पितामहानें मिळविलेली शालीचें शेत, आगर, इत्यादि—भूमि, एका पानांच्या भाऱ्यांतील इतकी पानें तुझीं; एका सुपारीच्या भारांतील इतक्या सुपाऱ्या तुझ्या इत्यादि प्रकारचा ठराविक निबंध व सुवर्ण, रुपें इत्यादि द्रव्य या पितामहाच्या वस्तूंवर पिता व पुत्र या दोघांचेंही स्वामित्व लोकप्रसिद्ध आहे. यास्तव त्याचा सारखा विभाग करावा. अर्थात् पित्याच्या इच्छेप्रमाणें किंवा पित्याचे दोन अंश व पुत्राचा एक असा विषम विभाग होऊं शकत नाहीं. तस्मात् पितामहाच्या धनावर पितापुत्रांचें सारखेंच स्वामित्व असतांना पिता मेल्यावर पित्याच्या द्वारा भाग करावे. असें जें दर सांगितलें आहे ती वाचनिक व्यवस्था आहे. वाचनिक म्हणजे केवल वचनावरून सिद्ध होणारी. वर ११४ व्या श्लोकाच्या पूर्वार्धांत—पित्यानेंच विभाग केल्यास त्यानें आपल्या इच्छेप्रमाणें करावें, असें जें म्हटलें आहे तें त्यानें आपल्या कष्टानें मिळविलेल्या धनाविषयीं होय. वडिलार्जित धनाविषयीं नव्हे. तसेंच पुत्रापासून विभक्त होणाऱ्या पित्यानें दोन भाग घ्यावे, असें जें म्हटलें आहे तेंही त्यानें स्वकष्टानें मिळविलेल्या धनाविषयीं होय. "पुत्र वृद्ध जरी झाला तरी तो आईबाप जिवंत असत तों परतंत्र आहे" असें जें म्हटलें आहे तें व "मातापिता जिवंत असत तों पुत्र असमर्थ आहेत" असें म्हटलें आहे तेंही त्यांनीं संपादन केलेल्या द्रव्याविषयीं होय. तस्मात् माता रजस्वला होत असून पिताही सकाम असल्यास आणखी पुत्र होण्याचा संभव

असतो. पण असें असलें तरी व पित्याची इच्छा नसली तरी पुत्राच्या इच्छेनें पितामहाच्या द्रव्याचा विभाग होतो. त्याचप्रमाणें आपल्या भ्रात्यांपासून वाटणी देऊन वेगळा सरलेला पिता जर पितामहाचें म्हणजे त्याच्या बापाचें धन कोणास देत असेल किंवा विकून टाकीत असेल तर नातवास म्हणजे त्याच्या पुत्रास निषेध ( हरकत ) करितां येतो. पित्यानें मिळविलेल्या धनाचा मात्र निषेध त्यास करितां येत नाहीं. कारण तें पित्याच्याच अधीन असतें. यास्तव पुत्रानें त्यास अनुमोदन द्यावें. या सर्व विवेचनाचें सार असें—पिता व पितामह यांच्या धनावर पुत्राचें जरी जन्मतःच स्वामित्व येत असलें तरी पित्याचें धन पित्याच्या अधीन असतें व तोच त्याचा संपादक असल्यामुळें मुख्य अधिकारी असतो. यास्तव त्या धनाचा तो विनियोग करूं लागला असतां पुत्रानें त्यास अनुमोदन दिलें पाहिजे; पण पितामहाच्या धनावर पुत्र व पौत्र यांचें सारखेंच स्वामित्व असल्यामुळें पिता त्याचा विनियोग करूं लागल्यास पुत्रास निषेध करण्याचा अधिकार पोंचतो. मनुस्मृतींत "पितामहानें संपादन केलेलें धन कोणी न्यायानें किंवा अन्यायानें हरण केल्यास व पितामहानें न सोडविल्यास पित्यानें तें सोडवून घ्यावें व इच्छा नसल्यास स्वसंपादित धनाप्रमाणें त्यानें त्याची वाटणी पुत्रांस देऊं नये." असें म्हटलें आहे. त्यावरूनही आम्ही वर म्हटलें आहे, तेंच अर्थात् सिद्ध होतें १२१.

वाटण्या झाल्यावर उत्पन्न होणाऱ्या पुत्राचा विभाग कसा करावा, तें आतां सांगतात—

## विभक्तेषु सुतो जातः सवर्णायां विभागभाक् ।

पुत्र विभक्त झाले असतां त्यानंतर सवर्ण भार्येच्या ठायीं पुत्र झाल्यास तो आईबापांच्या भागाचा अधिकारी होतो. म्हणजे आईबापांच्या मागें त्यास त्यांचा अंश मिळतो. पण अविवाहित किंवा दरिद्री कन्या असल्यास त्याच्या आईचा भाग त्यास मिळत नाहीं. कारण ११७ व्या श्लोकांत मातेच्या द्रव्यावर कन्यांचा अधिकार आहे, असें सांगितलेलें आहे. वाटण्या झाल्यावर असमान जातीच्या स्त्रीचे ठायीं झालेल्या पुत्रास पित्याच्या भागापैकीं त्याचा योग्य अंश मात्र त्यास मिळतो. पण त्याच्या आईचा सर्व भाग त्याचाच होतो. आईबापापासून वाटणी घेऊन विभक्त झालेल्या पुत्रांचें त्यांच्या आईबापांच्या वाटयास आलेल्या किंवा पुढें मिळविलेल्या धनावर स्वामित्व नाहीं. त्याचप्रमाणें वाटण्या झाल्यावर उत्पन्न होणाऱ्या पुत्राचें वेगळे सरलेल्या भावांच्या द्रव्यावर स्वामित्व नाहीं. कारण विभक्त झाल्यावर झालेल्या पुत्रानें आईबापांचे भाग घ्यावे हें जसें येथें सांगितलें आहे त्याचप्रमाणें—विभक्त झालेल्या पित्यानें पुढें जें धन मिळविलें असेल तें सर्व त्या मागून होणाऱ्या सवर्ण पुत्राचेंच होय. विभक्त झालेल्या पुत्रांचा त्यावर कांहीं हक्क नाहीं. असेंही अन्य स्मृतींत सांगितलें आहे. एकदां वाटण्या करून पुनः पित्याशीं जे मिळून राहूं लागले असतील त्या भावांपासून वाटणीनंतर झालेल्या पुत्रानें पित्याच्या मरणानंतर सारखा भाग घ्यावा. मनुस्मृतींतही असेंच सांगितलें आहे.

पित्याच्या मरणानंतर लागलीच—एक दोन महिन्यांत-पुत्र वेगळे झाले व त्यानंतर त्यांस आणखी एक भाऊ झाला. म्हणजे त्यांची गर्भवती माता प्रसूत होऊन तिला पुत्रच झाला तर त्याला कोणता विभाग द्यावा ? असा प्रश्न उद्भवला असतां त्याचें उत्तर सांगतात—

## दृश्याद्वा तद्विभागः स्यादायव्ययविशोधितात् ॥ १२२ ॥

पिता मरण पावला असतां लागलीच भावांनीं वाटणी केली, त्यावेळीं माता गरोदर आहे, अशाविषयीं कांहीं चिन्ह दिसत नव्हतें; पण पुढें एक दोन महिन्यांतच तिच्या उदरांत पितृजन्य गर्भ आहे, असें समजून पुढें योग्य समयीं तो पुत्र जन्मला असतां त्याला कोठून विभाग द्यावा, तें सांगतात—आय व व्यय यांनीं शुद्ध केलेल्या भ्रात्यांच्या विभागांतून द्रव्य काढून त्यास त्यांच्याबरोबर वाटा द्यावा. प्रतिदिवशीं, प्रतिमासीं किंवा प्रतिवर्षी जें मिळतें किंवा उत्पन्न होतें त्यास आय म्हणतात. व पित्यानें केलेल्या ऋणांतून मुक्त होण्या करितां दिलेल्या द्रव्यासच येथें व्यय असें म्हणावें. कारण व्यय या शब्दाचा सामान्य अर्थ खर्च असा आहे. पण भ्रात्यांनीं आपल्या संसारकार्याकरितां केलेल्या खर्चाचें ग्रहण येथें करितां नाहीं. अशा आयव्ययांनीं शोधित द्रव्यांतून त्याचा वाटा काढावा. या सर्वांचा सारांश असा—आपापल्या भागामध्यें नूतन उत्पन्न मिळवून व पितृ—ऋण फेडण्याकरितां दिलेलें द्रव्य काढून घेऊन बाकी राहिलेल्या आपापल्या भागांतून थोडें थोडें द्रव्य काढून त्या नव्या भावास आपल्या भागाएवढा भाग करून द्यावा. विभागसमयीं ज्याला पुत्र नाहीं अशा भ्रात्याच्या भार्येस वर सांगितल्याप्रमाणें पुढें पुत्र झाल्यास त्याचाही वाटा याच नियमानें काढून द्यावा. परंतु माता किंवा भावजय वाटण्या करितांना गरोदर आहे, असें चिन्हांवरून स्पष्ट समजत असल्यास ती प्रसूत होईतों वाट पाहून नंतर विभाग करावा. वसिष्ठांनीं असेंच सांगितलें आहे १२२.

भ्राते विभक्त झाल्यानंतर आईबापांस जो पुत्र होईल त्यानें बहीण नसल्यास त्या दोघांचेंही धन घ्यावें, असें १२२ व्या श्लोकाच्या पूर्वार्धांत सांगितलें आहे. पण इतर पुत्रांपासून बिभक्त झालेली आई किंवा बाप विभक्त झालेल्या पुत्रांस (किंवा पुत्रास) प्रेमामुळें जर कांहीं अलंकारादि देऊं लागली किंवा लागला तर वाटण्या झाल्यानंतर जन्मास आलेल्या पुत्रानें त्यांस प्रतिबंध करूं नये. किंवा त्यांनीं दिलेलें भ्रात्यापासून परत घेऊं नये असें आतां सांगतात—

## पितृभ्यां यस्य यद्दत्तं तत्तस्यैव धनं भवेत् ।

पुत्रापासून विभक्त झालेल्या आईबापांनीं पूर्वी विभक्त झालेल्या पुत्राला अलंकारादि जें कांहीं दिलें असेल त्यावर त्याचेंच स्वामित्व असतें. मागून होणाऱ्या विभक्तज पुत्राचें नसतें. याच न्यायानें विभागाच्या पूर्वींही ज्यास जें दिलें असेल तें त्याचेंच होय. त्याचप्रमाणे वाटण्या केल्यानंतर आईबापांस आणखी पुत्र न झाल्यास त्यांच्या मरणानंतर त्यांच्या अंशांचा विभक्त पुत्र विभाग करूं लागले असतां त्यांतील ज्यास जें त्यांनीं मरतांना किंवा पूर्वी दिलें असेल तें त्याचेंच होय. त्याच्यावर इतर भ्रात्यांचा कांहीं अधिकार (हक्क) नाहीं असें समजावें.

११५ व्या श्लोकांत–पित्यानें जिवंत असतानांच पुत्रांच्या वाटण्या करून दिल्यास आपल्या पत्नींनाही पुत्रांच्या बरोबर भाग द्यावा–असें सांगितलें आहे. आतां त्याच्या पश्चात् जरी वाटण्या केल्या तरी मातेस पुत्राइतका अंश मिळाला पाहिजे असें सांगतात—

पितुरूर्ध्वं विभजतां माताप्यंशं समं हरेत् ॥ १२३ ॥

पित्याच्या मरणानंतर पुत्र विभाग करूं लागले असतां मातेनेंही समान अंश घ्यावा; पण तिला स्त्रीधन दिलेलें नसलें तरच समान अंश मिळतो व–तें दिलेलें असल्यास ती अर्ध्या भागास पात्र होते असें पुढें सांगतील १२३.

पित्याच्या मरणानंतर ज्यांचा उपनयन संस्कार झालेला नाहीं असे भ्राते असल्यास त्यांच्या संस्काराचा कोणास अधिकार आहे तें सांगतात—

असंस्कृतास्तु संस्कार्या भ्रातृभिः पूर्वसंस्कृतैः ।

पित्याच्या नंतर वाटण्या करणाऱ्या व पूर्वींच ज्यांचा उपनयन संस्कार झाला आहे, अशा भ्रात्यांनीं ज्यांचा उपनयन संस्कार झालेला नसेल अशा भ्रात्यांचे समायिक द्रव्यानें संस्कार करावेत.

आतां भगिनींचा संस्कार ( विवाह ) झालेला नसल्यास त्याविषयीं कांहीं विशेष सांगतात—

भगिन्यश्च निजादंशाद्दत्वांशं तु तुरीयकम् ॥ १२४ ॥

ज्यांचा संस्कार झालेला नसेल त्या भगिनींचा विवाहसंस्कार भ्रात्यांनीं आपल्या अंशांतील चवथा अंश देऊन करावा. यावरून बहिणींही पित्यानंतर कांहीं भागास पात्र होतात असें वाटतें. पण प्रत्येक भावाच्या भागांतून चवथा भाग काढून जितके भाऊ असतील तितके चतुर्थांश त्यांना द्यावे असा याचा अर्थ समजूं नये. तर ज्या जातीची ती कन्या असेल तिच्या जातीच्या पुत्राला जो भाग मिळावयाचा असेल त्याचा चवथा भाग तिला द्यावा. ह्याचें तात्पर्य असें—ब्राह्मणजातीच्या स्त्रीचे ठायीं झालेली कन्या ब्राह्मणीपुत्राच्या चतुर्थांशास पात्र होते. कोणा एकास ब्राह्मण जातीची एकच स्त्री होती. तिच्या ठायीं एक पुत्र व एक कन्या झाली. पढें त्यांची आई व बापही वारला. त्यांच्या पश्चात् त्या भावंडांची वाटणी करितांना सर्व द्रव्याचे दोन सारखे भाग करावे व त्यांतील एका भागाचा चवथा अंश कन्येस द्यावा व बाकीचें सर्व द्रव्य मुलास द्यावें. पण त्या ब्राह्मणास दोन पुत्र व एक कन्या असल्यास सर्व द्रव्याचे तीन भाग करून त्यांतील दोन भाग दोघां पुत्रांस देऊन तिसऱ्या भागाचा चतुर्थांश कन्येस द्यावा व बाकीचे तीन अंश दोघां पुत्रांस सारखे वाटून द्यावे. आतां त्यास एक पुत्र व दोन कन्या असल्यास कशी वाटणी करावी तें सांगतों—पित्याच्या सर्व धनाचे तीन भाग करावे. त्यांतील एक भाग पुत्रास द्यावा. दुसऱ्या भागाचा चवथा अंश एका कन्येस व तिसऱ्या भागाचा चवथा अंश दुसऱ्या कन्येस देऊन बाकीचे तीन तीन अंश पुत्रानें घ्यावे. तात्पर्य, समान जातीचे भाऊ व बहिणी समविषम

असल्यास भागांची योजना याप्रमाणें करावी. परंतु एका गृहस्थास एक ब्राह्मणी व दुसरी क्षत्रियाणी भार्या असून ब्राह्मणीच्या ठायीं पुत्र व क्षत्रियाणीच्याठायीं कन्या झाली. पुढें तीं तिघेंही मरण पावलीं तेव्हां या असमान जातींच्या भावंडांची वाटणी कशी होते, तें सांगतों. पित्याच्या सर्व द्रव्याचे सात भाग करावे. कारण, ब्राह्मणपुत्राचे त्यांतील चार भाग असून क्षत्रियपुत्राचे तीन आहेत, हा नियम पुढच्या श्लोकांत सांगितला आहे. नंतर क्षत्रिय पुत्राच्या वाटणीचे जे तीन भाग त्यांतील चतुर्थांश क्षत्रिय कन्येस देऊन बाकीचे तीन अंश ब्राह्मणीपुत्रानें घ्यावे. आतां–दोन ब्राह्मणीपुत्र व एक क्षत्रियाकन्या असल्यास सर्व धनाचे–चार दुणी आठ व तीन–अकरा भाग करावेत. त्यांतील क्षत्रियापुत्राच्या तीन भागांचा चतुर्थांश क्षत्रियाकन्येस देऊन बाकीचे तीन अंश त्या दोघां ब्राह्मणीपुत्रांनीं सारखे वाटून घ्यावे. विषम जातीच्या भावंडांची वाटणी करितांना सम किंवा विषम संख्या असेल त्याप्रमाणें याच रीतीनें भाग करावे. असो; या श्लोकांत " चवथा अंश देऊन" असें जें म्हटलें आहे त्याचें तात्पर्य-बरोबर चवथा अंशच द्यावा, असें नाहीं, तर—केवळ संस्काराच्या उपयोगीं असेल तेवढें द्रव्य देऊन–असा त्याचा भावार्थ कोणी समजात; पण तें बरोबर नाहीं. कारण मनुस्मृतींत–ब्राह्मणादि भ्रात्यांनीं आपल्या जातीच्या भगिनींस आपल्या जातीस विहित असलेल्या भागांतून चवथा चवथा भाग द्यावा, असें सांगितलें आहे. तसेंच आपल्या भागांतून चवथा भाग काढून द्यावा, असें सांगितलेलें नाहीं. तर स्वजातिविहित एका भागांतून निरनिराळा चवथा अंश काढून एकेका भगिनीस द्यावा असें म्हटलें आहे व अशारीतीनें भाग न देणारे भ्राते पतित होतात, असेंही मनुमहाराजांनीं सांगितलेलें असल्यामुळें ते भाग अवश्य दिले पाहिजेत, असें ठरतें. व निरनिराळे भाग करून त्यांतून चवथा अंश प्रत्येक भगिनीस द्यावा अशी व्यवस्था केलेली असल्यामुळें– एक भ्राता पांच सहा भगिनींस आपल्या भागाचा चतुर्थांश देऊं लागल्यास स्वतः निर्धन किंवा कर्जबाजारी होईल, अशी जी कित्येकांची शंका आहे, ती आपोआप नाहींशी होते. सारांश, पित्याच्या पश्चात् कुमारी कन्या अंशांस पात्र होते. पण तिचा विवाह पूर्वी झालेला असल्यास पित्यानें जें कांहीं दिलें असेल तेवढेंच तिचें. वाटणीच्या वेळीं अधिक कांहीं मिळत नाहीं १२४.

याप्रमाणें गेल्या अकरा श्लोकांत समान जातीच्या भ्रात्यांच्या आपसांत व पित्यासह कशा वाटण्या कराव्या तें सांगितलें. आतां भिन्न भिन्न जातींच्या भ्रात्यांचे विभाग कसे करावे तें सांगतात—

चतुस्त्रिद्व्येकभागाः स्युर्वर्णशो ब्राह्मणात्मजाः ॥
क्षत्रजास्त्रिद्व्येकभागा विड्जास्तु द्व्येकभागिनः ॥ १२५ ॥

पाहिल्या अध्यायाच्या ५६ व ५७ व्या श्लोकांत ब्राह्मणाच्या चार जातींच्या चार भार्या, क्षत्रियाच्या तीन, वैश्याच्या दोन व शूद्राची केवल शूद्र जातीची एकच भार्या सांगितली आहे. त्यांच्या ठायीं ब्राह्मणांपासून उत्पन्न झालेले पुत्र मातेच्या ब्राह्मणादि वर्णक्रमानें

चार, तीन, दोन व एका भागास पात्र होतात. म्हणजे ब्राह्मणानें ब्राह्मणीच्या ठायीं उत्पन्न केलेला प्रत्येक पुत्र चार भागांचा अधिकारी होतो. त्यानेंच क्षत्रियास्त्रीच्या ठायीं उत्पन्न केलेला प्रत्येक पुत्र तीन भागांचा, वैश्येचा प्रत्येक पुत्र दोन भागांचा व शूद्रास्त्रीचा प्रत्येक पुत्र एक-एक भागाचा धनी असतो. त्याचप्रमाणें क्षत्रियानें क्षत्रियादि तीन वर्णांच्या स्त्रियांच्या ठायीं उत्पन्न केलेल्या पुत्रांस क्रमानें तीन, दोन व एक भाग प्राप्त होतो. वैश्यानें वैश्य व शूद्र स्त्रीच्या ठायीं उत्पन्न केलेल्या पुत्रांस दोन व एक भाग मिळतो. शूद्राची एकाच जातीची भार्या असते. यास्तव त्याला भिन्न जातीचे पुत्र असणें शक्यच नाहीं. करितां त्याच्या पुत्राचे भाग वर सांगितल्याप्रमाणें सारखेच करावे. पण ब्राह्मणास प्रतिग्रह घेतल्यामुळें जी भूमि प्राप्त झाली असेल ती ब्राह्मणेतर पुत्रांस कधींही देऊं नये. फार काय, पण पित्यानें जरी ती क्षत्रियादि स्त्रियांच्या पुत्रांस दिली असली तरी त्याच्या पश्चात् ब्राह्मणीपुत्रानें ती परत घ्यावी. अर्थात् प्रतिग्रहामुळें प्राप्त झालेल्या भूमीस सोडून बाकीच्या धनाचे तीन, दोन व एक भाग वर्ण-क्रमानें विजातीय भ्रात्यांस द्यावे असें ठरलें. विकत घेतलेल्या भूमीवर क्षत्रिय पुत्र व वैश्यापुत्र यांचाही हक्क असतो. शूद्रापुत्राचा मात्र कोणत्याही भूमीवर हक्क नाहीं असें स्पष्ट वचन आहे. " ब्राह्मणादि द्विजांपासून झालेल्या शूद्रपुत्रास पितृधनाचा अधिकार नाहीं. त्यास पित्यानें जेवढें दिलें असेल तेवढेंच मिळतें. " अशा अर्थाचें जें मनुवचन आहे त्याचा या व इतर वचनाशीं विरोध न यावा म्हणून जिवंतपणीं पित्यानें शूद्रापुत्रास कांहीं दिलें असल्यास त्यास पित्याच्या पश्चात् कांहीं देऊं नये; पण प्रसन्न होऊन कांहीं दिलें नसल्यास येथें सांगि-तल्याप्रमाणें एक भाग द्यावा. अशी व्यवस्था करावी १२५.

आतां सर्व विभागांचा कांहीं शेष सांगतात—

अन्योन्यापहृतं द्रव्यं विभक्ते यत्तु दृश्यते ॥
तत्पुनस्ते समैरंशैर्विभजेरन्निति स्थितिः ॥ १२६ ॥

पितृधनांतील कांहीं अंश भ्रात्यांनीं एकमेकांच्या न कळत एकीकडे काढून ठेविलेला असल्यास व विभागसमयीं कोणालाही ती गोष्ट कळलेली नसल्यास विभाग झाल्यावरही जें पितृधन आढळेल त्याचे सर्व भावांनीं सारखे भाग करून घ्यावे, अशी शास्त्राची मर्यादा आहे. अशा छपवून ठेविलेल्या द्रव्याचा ११४ व्या श्लोकांत सांगितल्याप्रमाणें ज्येष्ठास विसावा भाग उद्धार द्यावा, इत्यादि नियमानें उद्धार विभाग करूं नये, असें " समैः अंशैः " या शब्दांनीं सुचविलें आहे, व " विभजेरन् " असें म्हटलें आहे. म्हणजे बहुवचनी प्रयोग केला आहे. त्यावरून ज्या एका भ्रात्यास तें लपवून ठेविलेलें द्रव्य आढळलें असेल त्यानच त्याचा भाग घेऊन आपला तळीराम गार करूं नये, तर सर्व भ्रात्यांस त्याचा वाटा द्यावा; असें होतें. याप्रमाणें हें वचन सार्थ होत असल्यामुळें समायिक द्रव्याचा अपहार करणारास कांहीं दोष नाहीं, असें सांगण्यास तें समर्थ होत नाहीं. कोणी म्हणेल कीं, समुदाय ( समायिक ) द्रव्याचा अपहार केल्यास ज्येष्ठ भ्रात्यासच दोष लागतो. कनिष्ठास लागत नाहीं, असें मनूनीं म्हटलें

आहे. त्याचप्रमाणें–जो ज्येष्ठ भ्राता लोभामुळें कनिष्ठास पितृद्रव्यांतील कांहीं देणार नाहीं त्यास पितृधनांतील भाग देऊं नये. राजानें त्याचें नियमन करावें, अशा अर्थाचेंही वचन आहे. तेव्हां पितृधनाचा अपहार करणारा ज्येष्ठ भ्राताच दोषी होतो. कनिष्ठ भ्राते दोषी होत नाहींत. पण या म्हणण्यांत कांहीं राम नाहीं. कारण, त्या वाक्यांवरून असा अर्थ निघतो. ज्याला बरेंच स्वातंत्र्य असणें संभवनीय आहे अशा पितृतुल्य ज्येष्ठ भ्रात्यालाही दोष लागतो. असें सांगणाऱ्या मनूनीं ज्येष्ठ भ्रात्याच्या आधीन असणाऱ्या पुत्रस्थानीय कनिष्ठ भ्रात्यास तर अवश्य दोष लागतोच असें सुचविलें आहे. गौतमांनीं–जो भागास पात्र असलेल्या कोणालाही त्याचा भाग देत नाहीं, त्याचा तो भागरहित असलेला पुरुष नाश करितो, व त्याचा जरी त्यानें नाश न केला तरी त्याच्या पुत्राचा किंवा पौत्राचा नाश करितो, असें ज्येष्ठादि विशेष पुरुषाचा उल्लेख न करितां म्हटलें आहे. नाश करितो, म्हणजे दोषी करितो, असें समजावें. यावरून सामान्यतः कोणाहि द्रव्यापहारकास दोष लागतो, असेंच ठरतें. पण जोंपर्यंत वाटण्या झाल्या नाहींत तोंपर्यंत तें समायिक द्रव्य आपलेंच आहे असें समजून कोणी त्यांतील कांहीं भाग लांबविल्यास त्याला दोष लागूं नये, असें जें म्हणणें आहे तें व्यर्थ होय. कारण तें आपलें आहे असें समजून जरी त्यानें तें घेतलें असलें तरी त्याच्यावर दुसऱ्याचेंही स्वामित्व असतेंच, व त्यामुळें वर्ज करण्यास योग्य असलेल्या परधनाचा त्यानें अपहार केला, असें होतें. मुगाचा चरु खराब झाल्यास मुगासारख्याच असलेल्या उडिदांचें–हे मृग आहेत असें समजून—ग्रहण केल्यास—उडीद यज्ञोपयोगी नाहींत–हा निषेध तेथें लागूं होत नाहीं, असें पूर्वपक्षानें म्हटलें असतां–मुगांच्या अवयवांचें ग्रहण करूं लागलें असतां अवश्य उडिदांच्या अवयवांचेंही ग्रहण झालेंच पाहिजे. यास्तव तेथें वरील निषेध लागूं होतो. असें सिद्धान्त्यांनीं सांगितलें आहे. तस्मात् वरील वचन व हा न्याय यांच्या योगानें समायिक द्रव्याचा अपहार केल्यास दोष लागतो, हें सिद्ध झालें १२६.

व्यामुष्यायणाचा विशेष विभाग दाखविण्याकरतां त्याचें स्वरूप सांगतात—

**अपुत्रेण परक्षेत्रे नियोगोत्पादितः सुतः ।**
**उभयोरप्यसौ रिक्थी पिण्डदाता च धर्मतः ॥ १२७ ॥**

आचाराध्यायाच्या ६८ व ६९ श्लोकांत नियोग विधि सांगितला आहे. त्या विधीनें पुत्ररहित दिरानें किंवा दुसऱ्या कोणी परक्षेत्रांत म्हणजे परस्त्रीच्या ठायीं वडिलांच्या आज्ञेनें उत्पन्न केलेला पुत्र बीजी ( उत्पादक ) पिता व क्षेत्री ( मातेचा विवाहित पति ) पिता या दोघांच्या द्रव्याचा धर्मतः अधिकारी व पिंडदाता होतो. असा या श्लोकांचा अर्थ आहे. पुत्ररहित पुरुषाच्या क्षेत्रामध्यें पुत्र उत्पन्न करण्याविषयीं ज्यास गुरूंनीं आज्ञा दिली आहे, असा देवरादि ( दीर किंवा दुसरा कोणी ) स्वतः पुत्ररहित असल्यास त्यास परक्षेत्रांतही जो पुत्र होतो तो व्यामुष्यायण होय. अशा पुत्रास दोन्ही पित्यांचें धन घेण्याचा व त्यास पिंडदान करण्याचा अधिकार आहे. पण नियुक्त पुरुष पुत्रवान् असून केवळ क्षेत्रीच्या पुत्रा-

करितां नियोगांत प्रवृत्त झाला असल्यास त्याच्यापासून होणारा पुत्र क्षेत्रीचाच आहे; बीजांचा नव्हे. अर्थात् बीजदात्या पित्याचा तो नियमानें ऋक्थी व पिंडद होत नाहीं. याविषयीं मनुस्मृतींत—यामध्यें उत्पन्न झालेलें अपत्य आम्हां दोघांचेंही होईल, असा निश्चय करून जें क्षेत्र क्षेत्राचा स्वामी बीज पेरण्याकरितां बीजास देतो त्यांत उत्पन्न झालेल्या अपत्याचे बीजी व क्षेत्री असे दोघेही स्वामी होतात. असें महर्षींनीं ठरविलें आहे. पण असा निश्चय न करितां बीजी परक्षेत्रांत जें अपत्य उत्पन्न करितो तें क्षेत्रीचेंच अपत्य होतें. कारण, बीजापेक्षां योनि अधिक मानलेली आहे. गाय, बकरी इत्यादिकांचे ठायीं होणारें अपत्य ज्याची ती गाय, बकरी इत्यादि असेल त्याचें होतें. ज्याचा बैल, बकरा इत्यादि असेल त्याचें कधींही होत नाहीं. असें व्यवहारांतही आपण पहातों. हा नियोग वाग्दत्ता स्त्रीविषयींच आहे असें समजावें. कारण, मनुस्मृतींतच ( अ. ९ श्लोक ५९, ६० ) या नियोगाचा उपन्यास करून पुढें लागलाच ( श्लो. ६४-६८. ) त्याचा निषेध केलेला आहे. आतां याचें विधानही केलें आहे व निषेधही केला आहे. यास्तव त्याचा विकल्प समजावा. म्हणजे ज्यास वाटेल त्यानें नियोग करावा व वाटेल त्यानें करूं नये, असेंहि म्हणतां येत नाहीं. कारण, नियोग करावयास सांगणाराची निंदा केलेली आहे. स्त्रियांच्या धर्मांत व्यभिचारास फार मोठा दोष मानलेला आहे. व इंद्रियनिग्रहाची मोठी प्रशंसा केली आहे. मनुस्मृतीच्या पांचव्या अध्यायाच्या १५७ श्लोकांत शुभ पुष्पें, फळें व मूळें यांच्यावर निर्वाह करूनही खुशाल देह क्षीण करून घ्यावा; पण ( पति मेल्यावर ) पुरुषांचें नांवही घेऊं नये. असें म्हणून निर्वाहार्थ परपुरुषाचा आश्रय करूं नये. असें सांगून त्याच्याच पुढच्या चार श्लोकांत क्षमा, नियम, पतिव्रता स्त्रियांच्या उत्कृष्ट धर्माची इच्छा व मधु, मांस व मैथुन यांची इच्छा न करणें हें ब्रह्मचर्य यांनीं युक्त होऊन पुत्ररहित स्त्रीनें मरेपर्यंत दिवस काढावे, पण परपुरुषांचें सेवन करूं नये. कारण बाल्यावस्थेपासूनच ब्रह्मचर्य पालन करणारे सनकादि सहस्रावधि ब्राह्मण कुलवृद्ध्यर्थ पुत्रांस उत्पन्न केल्यावाचून स्वर्गास गेले आहेत. त्याचप्रमाणें पति मेल्यावर ब्रह्मचर्यानें राहणारी साध्वी स्त्री पुत्ररहित असली तरी स्वर्गास जाते. जी स्त्री अपत्यलोभानें आपल्या स्वामीचें अतिक्रमण करिते तिची या लोकीं निंदा होते व अशा त्या व्यभिचारानें झालेल्या पुत्राच्या योगानें तिला स्वर्गही मिळत नाहीं. असें म्हणून पुत्राकरितांही परपुरुषसमागम करणें प्रशस्त नाहीं; असें सांगितलें आहे. तस्मात् वर म्हटल्याप्रमाणें नियोगाचा विकल्पही घेतां येत नाहीं. अर्थात् विवाहित स्त्रीचा नियोग निषिद्ध आहे. आतां तो धर्म्य कधीं होऊं शकतो ते सांगतों. मनु. अ. ९ श्लो. ६९, ७०. यांत—ज्या कन्येचा पति वाग्दानानंतर विवाह करण्यापूर्वींच मरण पावेल तिला या विधीनें मोठ्या किंवा धाकट्या सख्ख्या दिरानें प्राप्त करून घ्यावें. शुभ्र वस्त्रें नेसलेल्या व पवित्र व्रतयुक्त अशा तिच्याशीं यथाशास्त्र विवाह करून गर्भधारणा होईतों प्रत्येक ऋतुसमयीं एकवेळ गमन करावें असें म्हटलें आहे. हा विवाह केवळ वचनानेंच प्राप्त आहे. तो नियोगाचें अंग आहे. त्याच्या योगानें ती स्त्री त्या दिराची भार्या होऊं शकत नाहीं. यास्तव तिच्याठायीं उत्पन्न झालेलें अपत्य क्षेत्रस्वामीचेंच आहे. दिराचें नव्हे; पण पूर्वीं जर तशी भाषा झाली असली तर तें दोघांचेंही होतें १२७.

समानजातीय व असमानजातीय पुत्रांचे विभाग कसे करावे तें सांगितलें. आतां मुख्य व गौण पुत्रांच्या दायग्रहणाची व्यवस्था कशी करावी तें सांगण्याकरितां त्या पुत्रांचें स्वरूप अगोदर सांगतात——

औरसो धर्मपत्नीजस्तत्समः पुत्रिकासुतः ।
क्षेत्रजः क्षेत्रजातस्तु सगोत्रेणेतरेण वा ॥ १२८ ॥
गृहे प्रच्छन्न उत्पन्नो गूढजस्तु सुतः स्मृतः ।
कानीनः कन्यकाजातो मातामहसुतो मतः ॥ १२९ ॥
अक्षतायां क्षतायां वा जातः पौनर्भवः सुतः ।
दद्यान्माता पिता वायं स पुत्रो दत्तको भवेत् ॥ १३० ॥
क्रीतश्च ताभ्यां विक्रीतः कृत्रिमः स्यात्स्वयंकृतः ।
दत्तात्मा तु स्वयं दत्तो गर्भे विन्नः सहोढजः ॥१३१॥

स्वतःच्या वीर्यापासून धर्मपत्नीच्या ठायीं झालेल्या पुत्रास औरस पुत्र म्हणतात. आपल्या वर्णाची व धर्मविवाहानें जिचें पाणिग्रहण केलें आहे तिला धर्मपत्नी म्हणावें. औरस पुत्रच मुख्य पुत्र आहे. पुत्रिका केलेल्या कन्येचा पुत्र औरसतुल्य आहे " जिला भ्राता नाहीं अशी ही अलंकृत केलेली कन्या मी तुला देत आहें. हिच्याठायीं जो पुत्र होईल, तो माझा पुत्र होईल." असा कन्यादानसमयीं संकल्प करून दिलेल्या कन्येस पुत्रिका म्हणतात. अथवा पुत्रिका हाच पुत्र, कन्येमध्यें पित्याचा अंश थोडा व मातेचा अधिक असल्यामुळें तिला औरस पुत्रतुल्य म्हटलें आहे. सगोत्र पुरुषापासून किंवा भिन्न गोत्राच्या पुरुषापासून स्वक्षेत्रामध्यें (म्हणजे स्वपत्नीच्या ठायीं) नियोगविधीनें झालेला जो क्षेत्रजपुत्र तो औरसाहून निकृष्ट होय. उत्पादक पित्याच्या औरसाहून परक्षेत्रोत्पन्न क्षेत्रज निकृष्ट आहे १२८. पतीच्या गृहांत गुप्तरीतीनें उत्पन्न झालेल्या पुत्रास गूढज म्हणतात. हीन किंवा उत्कृष्ट जातीच्या पुरुषापासून हा खचित झालेला नाहीं; असा निश्चय असून कोणत्या सजातीय पुरुषापासून याची उत्पत्ति झालेली आहे याविषयीं निर्णय होत नसेल तेव्हांच त्या पुत्रास गूढज ही संज्ञा देतां येते. कन्येच्या ठायीं सवर्ण पुरुषापासून झालेला पुत्र कानीन होय. तो मातामहाचा पुत्र होतो. त्या कन्येचा विवाह न झाल्यास व ती आपल्या पित्याच्या गृहींच राहिल्यास तो कानीन मातामहाचा म्हणजे तिच्या पित्याचा पुत्र होतो. पण पुढें तिचा विवाह झाल्यास तो त्या विवाह करणाऱ्या पुरुषाचा कानीन पुत्र होतो. अ. १ श्लो. ६७. यांत सांगितलेल्या क्षत किंवा अक्षत योनी पुनर्भू स्त्रीच्या ठायीं सजातीय पुरुषापासून झालेला पुत्र पौनर्भव होय. पति कोठें प्रवासास गेला असतां त्याच्या आज्ञेनें किंवा तो मरण पावला असतां माता, किंवा पिता अथवा दोघेंही जो पुत्र समानजातीय पुरुषास देतात तो त्याचा दत्तक पुत्र होय. आपत्का-

लींच पुत्र द्यावा. आपत्ति नसल्यास आईबापांनीं आपला पुत्र कोणास देऊं नये, असा मनुस्मृतींत निषेध केला आहे. त्याचप्रमाणें एकच पुत्र असल्यास त्यास देणारानें देऊं नये व घेणारानें घेऊं नये. त्याचप्रमाणें पुष्कळ पुत्र असले तरी वडील पुत्र दत्तक देऊं नये. कारण तो मुख्य पुत्र असतो. लोभानें व्याकुळ झालेले कांहीं महाराष्ट्रीय ब्राह्मणही हे नियम पाळीत नाहींत, असें आढळतें. पण ही मोठी दुर्दैवाची गोष्ट आहे. ज्यास पुत्र घ्यावयाचा असेल त्यानें त्याच्या ज्ञातीच्या सर्व लोकांस बोलावून, राजास कळवून गृहामध्यें भूः इत्यादि व्याहृतींनीं होम करून सर्वांच्या समक्ष त्याचें ग्रहण करावें. दूरदेशीं परकीय भाषा बोलणाऱ्या लोकांसमक्ष दत्तकविधान करूं नये. क्रीत, स्वयंदत्त व कृत्रिम या पुत्रांचा स्वीकार करितानाहीं याच विधीची योजना करावी. कारण त्यांसही हाच न्याय लागू आहे १३०. आईबापांनीं आपत्कालीं विकलेला पुत्र विकत घेणाराचा क्रीत पुत्र होय. वर सांगितल्याप्रमाणें आपत्तीवांचून भिन्न जातींच्या पुरुषास, एकच पुत्र असल्यास व ज्येष्ठ पुत्रास विकतां येत नाहीं. आतां मनूनीं (अ. ९ श्लो. १७४) "आईबापांपासून अपत्यार्थ जो कोणी सदृश किंवा असदृश पुत्र विकत घेतो त्याचा तो क्रीत पुत्र होतो." असें जें म्हटलें आहे त्यांतील सदृश किंवा असदृश या शब्दांचा तो घेणाराच्या गुणांनीं सदृश असो किंवा नसो म्हणजे त्या पुत्राचे गुण घेणाऱ्या पुरुषाच्या गुणासारखेच असोत किंवा नसोत; असा अर्थ करावा. जातीनें सदृश असो किंवा नसो असा अर्थ समजूं नये. कारण येथें सजातीयांतील हा पुत्रग्रहणविधि सांगितला, असा पुढें उपसंहार केला आहे. पुत्राची इच्छा करणाऱ्या पुरुषानें माता व पिता यांनीं रहित असलेल्या अनाथ पुत्रास धन, क्षेत्र इत्यादिकांचा लोभ दाखवून आपला पुत्र करणें, हा कृत्रिम पुत्राचा प्रकार होय. म्हणजे अशा पुत्रास कृत्रिम पुत्र म्हणावें.— ज्यास आईबाप नाहींत किंवा आईबापांनीं ज्याचा त्याग केला आहे, असा पुत्र मी तुमचा पुत्र होतों, असें म्हणून स्वतः आपलें समर्पण करितो तो कृत्रिम पुत्र होय, असें अन्य स्मृतींत स्पष्ट लक्षण केलें आहे. गर्भिणी स्त्रीशीं विवाह केला असतां तिच्या गर्भांत असलेला पुत्र विवाह करणाऱ्या पुरुषाचा सहोढज पुत्र होतो १३१.

**उत्सृष्टो गृह्यते यस्तु सोपविद्धो भवेत्सुतः ।**

आई व बाप यांनीं टाकलेल्या पुत्रास जो तत्सजातीय घेतो त्याचा तो अपविद्ध पुत्र होय. याप्रमाणें मुख्य व अमुख्य पुत्र सांगून आतां दायग्रहणांत त्यांचा क्रम कसा आहे, तें सांगतात—

**पिण्डदोऽंशहरश्चैषां पूर्वाभावे परः परः ॥ १३२ ॥**

या वर सांगितलेल्या औरसादि बारा पुत्रांतील पूर्व पूर्व पुत्राच्या अभावीं पुढचा पुढचा पुत्र श्राद्ध करणारा व धन घेणारा आहे, असें जाणावें. या न्यायानें औरस व पुत्रिकापुत्र असे दोन पुत्र असल्यास त्यांतील औरसच पितृधनाचा खरा स्वामी आहे, यांत संशय नाहीं. पण या विषयीं मनूनीं—पुत्रिका केल्यावर मग त्या कन्येच्या पित्यास पुत्र झाला तर त्या दोघां पुत्रांचा

सम विभाग करावा.-असा अपवाद सांगितला आहे. त्याचप्रमाणें पूर्व पूर्व पुत्र असला तरी पुढच्या पुढच्या पुत्रास चवथा भाग दिला पाहिजे असें वशिष्ठांनीं-दत्तकपुत्र घेतल्यावर जर औरसपुत्र झाला तर दत्तक चतुर्थांशाचा भागी होतो-या वचनानें सुचविलें आहे. येथील दत्तक शब्दानें क्रीत, कृत्रिम इत्यादि पुत्रांचेंही ग्रहण करावें. कारण तेही पुत्र म्हणून मानिलेले आहेत व कात्यायनानें तसें स्पष्ट सांगितलें आहे. 'औरसपुत्र झाल्यावर इतर सर्व प्रकारचे सवर्णपुत्र चतुर्थांशाचे भागी होतात व असवर्णपुत्र अन्नवस्त्राचेच भागीदार होतात.' दत्तक, क्षेत्रज, इत्यादिक सवर्णपुत्र व कानीन, गूढोत्पन्न सहोढज, व पौनर्भव हे असवर्ण पुत्र होत. विष्णुवचनांतही औरसपुत्र असल्यास या चौघांस धनभाग देऊं नये, याच उद्देशानें "अप्रशस्त" असें विशेषण दिलें आहे. पण पूर्व पुत्र नसल्यास पुढचा पुत्र पिंडद व धनभागी होतो, असें येथें सांगितलें असल्यामुळें औरसादि पुत्र नसल्यास कानीनादि पुत्रही सर्व पितृधन घेऊं शकतात. "पित्याच्या धनाचा एक औरसपुत्रच स्वामी आहे; इतरांस, दया करून, अन्नवस्त्र मात्र द्यावें" असें जें मनुवचन आहे, त्याचा अभिप्राय दत्तकादिपुत्र औरसपुत्राच्या प्रतिकूल व निर्गुण असल्यास त्याच्यावर दया करून अन्नादि द्यावें असा समजावा. अर्थात् निर्गुण व त्यामुळेच प्रतिकूल असलेल्या दत्तकादि पुत्राचा जरी पितृधनावर अधिकार पोंचत नसला तरी सगुण दत्तकादिकांचा चतुर्थांशावर अधिकार आहे. क्षेत्रज पुत्र औरसाच्या प्रतिकूल असून निर्गुणही असल्यास त्यास पितृधनाचा षष्ठांश द्यावा. व तो केवळ प्रतिकूल किंवा केवळ निर्गुण असल्यास म्हणजे ते दोन्ही दोष त्याच्या ठायीं नसल्यास सर्व पितृधनाचा पांचवा भाग द्यावा, असा क्षेत्रजांविषयीं मनुस्मृतींत ( अ. ९ श्लो. १६४ ) विशेष सांगितला आहे. आतां औरस, क्षेत्रज, दत्तक, कृत्रिम, गूढोत्पन्न व अपविद्ध हे सहा दायाद बांधव असून कानीन, सहोढज, क्रीत, पौनर्भव, स्वयंदत्त व शौद्र हे सहा अदायाद बांधव आहेत-असें जें मनुस्मृतींत सांगितलें तेंही—आपल्या पित्याच्या सापिंडांतील अथवा समानोदकांतील कोणी दुसरा जवळचा धनभागी नसल्यास दायाद बांधवांनीं त्याचें द्रव्य घ्यावें व अदायाद बांधवांनीं तें घेऊं नये. पण समान गोत्रत्व व सपिंडत्व हे दोन्ही धर्म अर्थात् बांधवत्व त्या दोन्ही षट्कांतील पुत्रांचे ठायीं सारखेच असल्यामुळें त्या दोन्ही वर्गांतील पुत्रांस उदकदानादि क्रिया करण्याचा एकसारिखाच अधिकार आहे—हें सुचविण्याकरितां आहे, असें त्याचें व्याख्यान करावें—दत्तकपुत्र जनक पित्याच्या और्ध्वदैहिक कर्मांचा अधिकारी नसतो. कारण गोत्र व द्रव्य यांचा जो अधिकारी तोच श्राद्धादिकांचा अधिकारी, असा नियम आहे.-या वचनांत दत्तकपुत्राचें जें ग्रहण केलें आहे तें पुत्रांचे जे प्रतिनिधि आहेत त्यांचें प्रदर्शन करण्याकरितां आहे. पण पूर्व पूर्व पुत्रांच्या अभावीं पित्याच्या धनाचा भागी होणें, हें सर्वांस सारखेंच लागूं आहे. कारण पित्याच्या धनाचा भागी भ्राता होत नाहीं व त्याचा पिताही होत नाहीं तर केवळ पुत्रच होतो, असें मनूंनीं स्पष्ट सांगितलें आहे. व औरस पुत्राविषयीं निराळेंच वचन असल्यामुळें येथील पुत्र शब्दानें मुख्य पुत्राहून इतर सर्व पुत्रप्रतिनिधींचें ग्रहण करणें उचित होय. दायादशब्द धनभागी पुत्रासच लावितात असें नाहीं; तर दुसऱ्याही

भ्राता, पितृव्य इत्यादि धनभाग्यांस दायाद म्हणतात. वशिष्ठादिस्मृतींत दोन्ही वर्गांतील पुत्रांचा क्रम येथल्याप्रमाणेंच दिसत नाहीं. त्यांत कोणाचें नांव पुढें आहे तर कोणाचें मागें आहे. पण गुणवान् व अगुणवान् पुत्रांच्या दृष्टीनें त्याची व्यवस्था लावावी. गौतमस्मृतींत पुत्रिकापुत्र दहावा सांगितला आहे. वास्तव तो भिन्न जातीच्या पुत्रिकेचा पुत्र असें समजावें. तस्मात् वर सांगितलेल्या बारा पुत्रांतील पहिला पहिला पुत्र नसल्यास त्याच्या पुढचा पुढचा पुत्र पित्याच्या धनाचा स्वामी होतो, हें ठरलें. सख्ख्या भावांतील एका भावास पुत्र झाला असतां ते सर्व त्या पुत्राच्या योगानें पुत्रवान होतात. असें मनूचें म्हणणें आहे. पण भ्रात्याच्या पुत्रास आपला पुत्र करणें शक्य असल्यास दुसऱ्या कोणास दत्तक घेऊं नये, असें सुचविण्याकरितां तें आहे. एका भ्रात्याचा पुत्र दुसऱ्या भ्रात्याचा पुत्रच आहे,असें ठरविण्याकरितां तें नाहीं. कारण तसें ठरविण्याकरितांच हें मनुवचन प्रवृत्त झालें आहे. असें जर म्हटलें तर येथें १३५ व्या श्लोकांत भ्रात्यानंतर भ्रात्याचा पुत्र धनाचा अधिकारी होतो, असें जें म्हटलें आहे त्याच्याशीं विरोध येतो. कारण तो त्याचा पुत्रच असल्यामुळें पत्नीच्याही पूर्वी त्याचेंच स्वामित्व पितृव्यधनावर येणें अवश्य आहे. यास्तव वर सांगितल्याप्रमाणेंच त्या वचनाची व्यवस्था लावावी १३२.

आतां येथवर सांगितलेल्या व्यवस्थेचा उपसंहार करण्याच्या मिषानें त्याविषयींच एक नियम सांगतात—

## सजातीयेष्वयं प्रोक्तस्तनयेषु मया विधिः ।

पूर्व पूर्व पुत्राच्या अभावीं उत्तर उत्तर पुत्र पितृधनाचा स्वामी होतो, हा वर सांगितलेला विधि समानजातीच्या पुत्राविषयींच आहे, भिन्न जातीच्या पुत्राविषयीं नाहीं.वर सांगितलेल्या बारा प्रकारच्या पुत्रांपैकीं कानीन, गूढोत्पन्न, सहोढज, व पौनर्भव या चार पुत्रांचें जनकाच्या द्वारा सवर्णत्व समजावें. स्वरूपतः समजूं नये. कारण आचाराध्यायाच्या ९० व्या श्लोकांत सांगितलेलें वर्णाचें किंवा त्याच्याच पुढच्या श्लोकांत सांगितलेल्या जातीचें लक्षण यांच्या ठायीं नसतें, हें वर बारा पुत्रांचे भेद सांगतांनाच व्यक्त झालें आहे. त्याचप्रमाणें अनुलोम उत्पन्न झालेल्या मूर्द्धावसिक्तादि पुत्रांचा औरसपुत्रांमध्येंच अंतर्भाव होत असल्यामुळें तेही नसल्यास क्षेत्रजादि गौण पुत्रांस धनग्रहण करण्याचा अधिकार पोंचतो; पण मागें ( आ. अ. ९१ व ९२ श्लोकांत ) सांगितलेल्या अनुलोमपुत्रांतील एकादाही असल्यास पितृधनावर क्षेत्रजादिकांचा अधिकार पोंचत नाहीं. येथें एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे ती ही कीं, शूद्रास्त्रीचा पुत्र औरस जरी असला तरी त्याला, अन्य वारस नसला तरी सुद्धां, पित्याचें सर्व धन मिळत नाहीं. कारण " पिता ब्राह्मणादि द्विजस्त्रियांच्या ठायीं झालेल्या पुत्रानें युक्त असो कीं तो द्विजाति पुत्ररहित असो; तो मेला असतां त्याच्या क्षेत्रजादिपुत्रानें अथवा दुसऱ्या कोणी असपिंडानें शूद्रापुत्रास पित्याच्या धनाच्या दहाव्या अंशाहून अधिक देऊं नये " असें मनुस्मृतींत ( अ. ९ श्लो. १५४ ) म्हटलें आहे. पण या

वचनावरूनच-पित्यास सवर्ण पुत्र नसल्यास असवर्ण अनुलोम द्विजपुत्रही त्याचें सर्व धन घेऊं शकतो, असें ठरतें.

आतां शूद्राच्या धनविभागाविषयीं विशेष सांगतात—

**जातोऽपि दास्यां शूद्रेण कामतोऽशहरो भवेत् ॥ १३३ ॥**
**मृते पितरि कुर्युस्तं भ्रातरस्त्वर्धभागिकम् ।**
**अभ्रातृको हरेत्सर्वं दुहितॄणां सुतादृते ॥ १३४ ॥**

शूद्रानें दासीचे ठायीं उत्पन्न केलेला पुत्र पित्याच्या इच्छेनें अंशभागी होतो. म्हणजे त्याचा पिता त्यास जें स्वेच्छेनें देईल तें त्याचें होतें. पण पित्यानें त्यांस कांहींच दिलें नस-ल्यास त्याच्या मागें त्याच्या विवाहित स्त्रीपासून झालेल्या पुत्रांनीं त्या दासीपुत्रास आपल्या भागाचा अर्धा भाग द्यावा; पण त्या शूद्रास विवाहित शूद्रीपासून झालेला पुत्र कन्या किंवा कन्येचा पुत्रही नसल्यास त्याचें सर्व धन त्या दासीपुत्रानें घ्यावें. अर्थात् कन्या व कन्या-पुत्र असल्यासही तो अर्ध्या अंशाचाच धनी होतो. येथें केवळ शूद्राचेंच ग्रहण केलेलें अस-ल्यामुळें ब्राह्मणादि द्विजानीं दासीच्या ठायीं उत्पन्न केलेल्या पुत्रास पित्याच्या इच्छेनेंही अंश मिळत नाहीं. पित्याच्या मागें त्यास सवर्ण व असवर्ण द्विजपुत्रांचा अर्ध भागही प्राप्त होत नाहीं. मग सर्व धनाची वार्ता तर दूरच राहिली. पण तो जर अनुकूल असला तर त्यास अन्नवस्त्र मिळतें १३३, १३४.

मुख्य व गौण पुत्र पितृधन घेतात, असें वर निरूपण केलें आहे; पण ते नसल्यास इतर सर्व दायादांचा क्रम सांगतात—

**पत्नी दुहितरश्चैव पितरौ भ्रातरस्तथा ।**
**तत्सुता गोत्रजा बन्धुः शिष्यः सब्रह्मचारिणः ॥ १३५ ॥**
**एषामभावे पूर्वस्य धनभागुत्तरोत्तरः ।**
**स्वर्यातस्य ह्यपुत्रस्य सर्ववर्णेष्वयं विधिः ॥ १३६ ॥**

वर सांगितलेल्या १२ प्रकारच्या पु तील एकही पुत्र ज्याला नसतोतो अपुत्र. असला अपुत्र स्वर्गास गेला असतां त्याचें धन घेणारा या पत्न्यादिकांतील पूर्व पूर्व नसल्यास उत्तर उत्तर समजावा. सर्व—मूर्धावसिक्तादि अनुलोमज, प्रतिलोमज, व ब्राह्मणादि वर्ण यांमध्यें हा दायग्रहण क्रम जाणावा. त्यांतील पहिली पत्नी धनभाक्. पत्नी म्हणजे विवाहानें संस्कृत झालेली. कारण पाणिनीनें 'पत्युर्नो यज्ञसंयोगे' म्हणजे यज्ञसंयोगांत पतिशब्दाला नो व ई प्रत्यय लागून पत्नी असा स्त्रीप्रत्ययान्त शब्द सिद्ध होतो, असें विधान केलें आहे. पत्नी असें येथें एकवचनच जरीं योजलें आहे तरी तें जातीच्या अभिप्रायानें आहे असें जाणावें. अर्थात् एकाद्याला अनेक सजातीय व विजातीय भार्या असल्यास त्या आपापल्या अंशाप्रमाणें विभाग करून धन घेतात. वृद्ध मनूनेंही 'अपुत्रा शयनं भर्तुः पालयन्ती व्रते स्थिता । पत्न्येव

दद्यात्तत्पिण्डं कृत्स्नमंशं लभेत च ' या वचनांत जिला पुत्र नाहीं अशा भर्त्याच्या शय्येचें पालन करीत व्रतस्थ असलेल्या पत्नीनेंच त्याला पिंड देऊन सर्व धन घ्यावें, असें म्हणून पत्नीचा समग्रधनसंबंध सांगितला आहे. वृद्धविष्णुही ' अपुत्राचें धन पत्नीस प्राप्त होतें. तिच्या अभावीं तें दुहितृ (कन्या) गामी, कन्येच्या अभावीं पितृगामी व पित्याच्या अभावीं मातृगामी होतें ' असें म्हटलें आहे. कात्यायनानेंही ' अव्यभिचारिणी पत्नी पतीचें धन घेते. तिच्या अभावीं अविवाहित कन्या. त्याचप्रमाणें अपुत्राचें धन घेणारी पहिली श्रेष्ठ कुलांतील पत्नी, तिच्या मागून कन्या, नंतर क्रमानें पिता, माता, भ्राता, व त्याचे पुत्र ' असें म्हटलें आहे. बृहस्पतीनेंही पिता, भ्राता इत्यादि सपिंडजन विद्यमान असतांनाही मेलेल्या अपुत्राची पत्नी त्याचें धन घेते, असें म्हटलें आहे.

यांच्या विरुद्धसा अर्थ सांगणारीं वचनेंही आहेत. ' अनेक भ्रात्यांतील एकादा संतानरहित भ्राता जर मेला किंवा संन्यस्त झाला तर स्त्रीधनावाचून त्याचें बाकीचें धन त्याचे इतर भ्राते वाटून घेतात. त्यांनीं त्याच्या शुद्ध भार्यांचें पोषण मात्र मरेपर्यंत करावें. पण त्या शुद्ध नसल्यास त्यांची वृत्ति बंद करावी ' असें म्हणून नारदानें पत्नी विद्यमान असतांनाही भ्रात्यांनीं धन घ्यावें, व पत्नीचें नुसतें पोषण करावें, असें सांगितलें आहे. मनूनें तर ' अपुत्राचें धन पित्यानें अथवा भ्रात्यानें घ्यावें ' असें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें त्यानें ( अ० ९ श्लोक २१७ ) माता व पितामही यांच्याशीं अपुत्राच्या धनाचा संबंध दाखविला आहे. शंखानेंही भ्राते, पिता—माता व ज्येष्ठ पत्नी यांच्याकडे क्रमानें धनसंबंध सांगितला आहे. कात्यायनानेंही ' विभक्त झालेला पुरुष मेल्यास व त्याला पुत्र नसल्यास त्याचें धन पित्यानें घ्यावें. तोही नसल्यास क्रमानें भ्राता, माता, पितामही यांनीं तें घ्यावें ' असें म्हटलें आहे. पण या सर्व विरुद्ध अर्थाच्या वाक्यांची व्यवस्था योगीश्वरानें दाखविली आहे. पत्नीनें धन घ्यावें, अशा अर्थाचीं सर्व वचनें विभक्त झालेल्या भ्रात्याच्या स्त्रीविषयीं आहेत; पण ती स्त्री जर नियोगाची इच्छा करणारी असली तरच ( म्हणजे जिला नियोगाची अपेक्षा आहे अशा पत्नीलाच. ) धन घेण्याचा अधिकार पोंचतो. स्वतंत्र भार्येला नाहीं. कारण ' अपुत्राचें धन पित्यानें हरण करावें ' असें वचन आहे, पण त्याविषयीं कांहीं व्यवस्थाकारण सांगतां येण्यासारखें नाहीं. ' पिण्डगोत्रर्षिसंबंधा० ' असें गौतमाचें वचनही आहे. त्याचा अर्थ असा—पिंड, गोत्र व ऋषि यांच्याशीं संबंध असलेल्या लोकांनीं अपुत्राचें धन घ्यावें अथवा बीज प्राप्त करण्याची इच्छा करणाऱ्या स्त्रीनें तें घ्यावें. मनूनें ' धनं यो बिभृयात्० ' इत्यादि वचनांत विभक्त झालेलाही भ्राता मरण पावला असतां त्याच्या पत्नीचा त्याच्या धनाशीं अपत्याच्या द्वारांच संबंध पोंचतो. त्यावाचून नाहीं. तो विभक्त झालेला नसला तरी कनिष्ठ भ्रात्यानें ज्येष्ठ भ्रात्याच्या भार्येच्याठायीं जर पुत्र उत्पन्न केला तरच ती समविभागास पात्र होते, असें म्हटलें आहे. वासिष्ठानेंही ' रिक्थलोभान्नास्ति नियोगः ' असें म्हणून पत्नीचा धनसंबंध नियोगाच्या द्वारांच होतो, असें सुचविलें आहे. नियोगाच्या अभावीं नारदाच्या वचनानुसार तिचें नुस्तें पोषण करावें. योगीश्वरही पुढें १४२

व्या श्लोकांत असेंच सांगणार आहेत. शिवाय द्विजांचे धन यज्ञार्थ असल्यामुळें व स्त्रियांना यज्ञामध्यें स्वातंत्र्यानें अधिकार नसल्यामुळें त्यांनीं धन ग्रहण करणें अयुक्त आहे. कारण 'द्रव्य' यज्ञाकरितां उत्पन्न केलें आहे. यास्तव यज्ञाचे जे अधिकारी नाहीत ते रिक्थभाक्ही नव्हेत तर अन्नवस्त्राचे मात्र धनी आहेत. तसेंच, वित्त यज्ञाकरितां उत्पन्न केलेलें आहे. यास्तव तें त्यांतच लावावें. धार्मिक स्थानीं त्याचा विनियोग करावा. स्त्री, मूर्ख व विधर्मी यांमध्यें त्याचा विनियोग करूं नये.

पण पूर्व पक्षाचें हें वरील सर्व म्हणणें अयुक्त आहे. कारण 'पत्नी दुहितरः०' इत्यादि वरील वचनांत नियोगाची प्रतीति होत नाहीं. शिवाय हें नियोगाचें प्रकरणही नाहीं. तसेंच पूर्वपक्षाला पत्नींच्या धनग्रहणाचें निमित्त नियोग आहे कीं त्यापासून झालेलें अपत्य आहे. हेंही येथें सांगणें भाग आहे. नियोग निमित्त आहे, असें म्हटल्यास त्याच्या योगानें जिला अपत्य झालें नाहीं तिचाही धनाशीं संबंध आहे असें होणार, व उत्पन्न झालेल्याही पुत्राचा धनाशीं संबंध पोंचणार नाहीं. बरें, अपत्यच धनसंबंधाचें निमित्त आहे, असें म्हटल्यास ' पत्नी दुहितरः० ' हें वचन आरंभण्याचें कांहीं कारणच उरणार नाहीं. तसेंच स्त्रियांचा पतिद्वारा अथवा पुत्रद्वाराच धनसंबंध असतो. दुसऱ्या कोणत्याही रीतीनें असूं शकत नाहीं. असें जें एक मत आहे, तेंही अयोग्य होय. कारण मनूनें ' अध्यग्न्यध्यावहानिकं०' (अ०९श्लो०१९४) इत्यादि वचनांत-विवाहसमयीं अग्निसमीप पित्यानें दिलेलें, पित्याच्या घरून सासरीं जातांना मिळालेलें, प्रेमास कारण होणाऱ्या कर्मामुळें पतीपासून मिळालेलें व त्याचप्रमाणें भ्राता, पिता व माता यांनीं दुसऱ्या वेळीं दिलेलें असें सहा प्रकारचें स्त्रीधन आहे, असें जें सांगितलें आहे त्याच्याशीं विरोध येतो. शिवाय बाराही प्रकारच्या पुत्रांच्या अभावीं पत्नी, दुहिता इत्यादि येथें आरंभ केला आहे . पण त्यांतही नियोग करणाऱ्या स्त्रीचाच धन संबंध आहे असें म्हटल्यास क्षेत्रजाचाच धनसंबंध आहे असें म्हटल्यासारखें होणार. पण तो तर पूर्वींच सांगितला आहे यास्तव, पुत्रांचें प्रकरण नसलेल्या ठिकाणीं 'पत्नी दुहितरः०' हें वचन आरंभावयाचेंच कारण नाहीं वरील गौतमाच्या वचनानुसार नियोग केलेल्या पत्नीचाच धनाशीं संबंध पोचतो. हें म्हणणेंही अयोग्य आहे. कारण,—' पिण्डगोत्रर्षिसंबंधा रिक्थं भजेरन् स्त्री वानपत्यस्य बीजं लिप्सेत '— असें गौतम वचन आहे. पण ' स्त्रीनें जर बीज मिळविण्याची इच्छा केली तरच ती अपत्यरहित पतीचें धन घेण्यास समर्थ होते—असा त्याचा अर्थ प्रतीत होत नाहीं. तर ज्याला अपत्य नाहीं त्याचें धन पिंड, गोत्र व ऋषि यांनीं संबद्ध असलेल्यांनीं घ्यावें, किंवा स्त्रीनें घ्यावें. तिनें पाहिजे तर जितेंद्रिय होऊन रहावें किंवा बीज संपादन करावें असा अर्थ प्रतीत होत असून पक्षान्तरबोधक ' वा ' शब्दावरून तर तिनें संयतेंद्रिय होणें, या दुसऱ्या धर्माचा उपदेशच प्रतीत होत आहे. शिवाय जितेंद्रिय साध्वीलाच धन मिळणें युक्त आहे. स्मृति व लोक यांमध्यें निंद्य मानलेल्या नियोगांत प्रवृत्त होणाऱ्या पत्नीला तें मिळणें योग्य नव्हे. ' अपुत्रा शयनं भर्तुः० ' या वचनाप्रमाणें पतीच्या शय्येचें पालन करीत राहणाऱ्या साध्वीलाच पिंड देण्याचा व सर्व

धनांश घेण्याचा अधिकार असणें युक्त आहे. मनूनें ' नान्यस्मिन्विधवा नारी० ' इत्यादि वचनांत द्विजांनीं स्त्रीला नियोगांत नियुक्त करूं नये, व केल्यास ते सनातन धर्माचा नाश करितात, ' असें स्पष्ट म्हटलें आहे, ' रिक्थलोभान्नास्ति नियोगः० ' असें जे वसिष्ठवचन वर सांगितलें आहे, त्याचें व्याख्यान—विभक्त न झालेला अथवा एकदां विभक्त होऊन पुनः संसृष्ट झालेला पति मरण पावला असतां भार्येचा धनाशीं संबंध पोंचत नाहीं. यास्तव आपल्या अपत्याचा तरी त्याच्याशीं संबंध पोंचावा, अशा दुराशेनें नियोग करूं नये-असें करावें. ' भ्रात्यांनीं आमरणान्त त्यांचें पोषण करावें ' असें जें वचन आहे तेंही, वरपासून संसृष्टांचें प्रकरण चाललेलें असल्यामुळें अपत्यरहित स्त्रियांचें नुस्तें पोषण करावें, एवढेंच प्रतिपादन करीत आहे. द्विजांचें धन यज्ञार्थ आहे. स्त्रियांना यज्ञाचा अधिकार नाहीं, म्हणून तें त्यांनीं घेऊं नये, हें म्हणणें अयोग्य आहे. कारण द्विजांचें सर्वच धन यज्ञार्थ मानल्यावर दान-होमादि इतर धर्मकृत्यें तरी कशीं होणार ? आतां येथील यज्ञशब्द धर्म या अर्थी घ्यावा म्हणून म्हणाल तर त्यामुळें दान-होम इत्यादिकांची जरी सिद्धि होत असली तरी धनानें साध्य होणाऱ्या-अर्थ व काम-यांची असिद्धि होणार आणि ती होणें हें ' धर्म, अर्थ व काम यांचें याथशक्ति अनुष्ठान करावें, त्याग करूं नये. पूर्वाह्न, मध्याह्न व सायाह्न हे तीन काल धर्म, अर्थ व काम यांच्या योगानें अफल करूं नयेत आणि या त्रिवर्गाचें सेवन न करितां त्यांचें नियमन करतां येणें शक्य नाहीं. ' या याज्ञवल्क्य, गौतम व मनु याच्या वचनांशीं विरुद्ध आहे. दुसरें असें कीं, धन यज्ञाकरितांच आहे, असें मानल्यास ' हिरण्यं धार्यं ' असें म्हणून सामान्यतः सर्व प्रकारच्या सोन्याचा भूषणादिकांकडे उपयोग करावा, असें जें सांगितलें आहे तें जुळत नाहीं. शिवाय यज्ञ हा शब्द सर्वधर्मसाधारण आहे, असें म्हटल्यास स्त्रियांनाही पूर्त धर्माचा अधिकार असल्यामुळें त्यांनीं धन घेणें योग्यच होईल. ' न स्त्री स्वातन्त्र्यमर्हति ' असें वचन असल्यामुळें त्यांना स्वातंत्र्य जरी नसलें तरी धनाचा भाग घेण्यांत कोणता दोष आहे ? तर मग ' यज्ञार्थं द्रव्यमुत्पन्नं ' इत्यादि वचनाचा अर्थ काय ? म्हणून विचाराल तर सांगतों. ' यज्ञाकरितां म्हणून जें धन संपादन केलेलें असेल तें पुत्रादिकांनींही यज्ञांतच खर्चावें ' असा त्याचा अर्थ करावा. कारण ' यज्ञाकरितां मिळविलेल्या धनाचा त्यांत जो विनियोग करीत नाहीं तो भास अथवा काक होतो ' असें त्याचविषयीं सांगितलेलें असून तें धन मिळविणाऱ्यांच्या पुत्रादिकांनाही लागू आहे. कात्यायनानें—ज्याला दायाद नाहींत तें धन राजाकडे जातें; पण धनवानाच्या स्त्रियांच्या व भृत्यांच्या अन्नवस्त्राच्या उपयोगीं असलेलें व त्यांच्या श्राद्धादि और्ध्वदैहिक कृत्यांकडे खर्च करावयाचें जें धन असेल त्याला सोडून बाकीचें राजाकडे जातें. पण एकाद्या श्रोत्रियाचें धन असल्यास, त्याच्या स्त्रिया, भृत्य व और्ध्वदेहिक यांच्या उपयोगाचें असेल तेवढें सोडून बाकीचें दुसऱ्या श्रोत्रियालाच द्यावें, असें म्हटलें आहे. पण तेंही अवरुद्ध स्त्रियांविषयीं आहे. कारण वरील मूळ वचनांत योषित् ( म्हणजे स्त्री ) असें म्हटलें आहे. ' पत्नी ' असें म्हटलेलें नाहीं. नारदानेंही ' धर्मपरायण राजानें त्याच्या स्त्रियांना जीवन द्यावें ' असें जें म्हटलें आहे तेंही

अवरुद्ध स्त्रीविषयींच आहे. पण येथें ( म्हणजे या १३५ व्या श्लोकांत ) पत्नी असा शब्द योजलेला असल्यामुळें विवाहित व सदाचरणानें युक्त असलेली पत्नी धनभाक् होते, हें अगदीं निर्विवाद ठरतें. तस्मात् विभक्त होऊन पुनः संसृष्ट न झालेल्या पुत्रहीन पुरुषाचें धन त्याच्या मरणोत्तर त्याची पत्नी प्रथम घेते, हा अर्थ सिद्ध झाला. कारण त्यांना विभाग देण्याविषयीं सांगितलें आहे व संसृष्टीविषयीं पुढें सांगणार आहेत.

फार काय पण औरसपुत्र जरी असले तरी धनी जिवंत असतांना विभाग करितांना, किंवा तो मेल्यावर विभाग करावयाचे झाल्यासही पत्नीला पुत्रांबरोबर विभाग द्यावयास सांगितलें आहे. तस्मात् मेलेल्या पुत्ररहित पुरुषाच्या भार्येला अन्नवस्त्रापेक्षां अधिक धन मिळत नाहीं, असें म्हणणें हा शुद्ध मोह आहे. ' पत्न्यः कार्याः समांशिकाः ' ' मातापंशं समं हरेत् ' इत्यादि वचनांतील अंशशब्दानें जीवनोपयोगीं धन मात्र घ्यावें, असें कोणी म्हटल्यास तें बरोबर नव्हे. कारण तसा अर्थविपर्यास करूं लागल्यास अंश व सम हे दोन्ही शब्द व्यर्थ होणार !

' मेलेल्या पुत्ररहित पुरुषाचें धन पित्यानें किंवा भ्रात्यानें घ्यावें, असें मनु व 'मेलेल्या पुत्ररहिताचें धन भ्रातृगामी होतें. भ्राता नसल्यास पितृगामी ' असें शंख सांगत आहे. यास्तव त्यांनीं धन घेऊन ' त्याच्या पत्नीचें जीवनक्षय होईतों पालन करावें, ' असें म्हटलेलें असल्यामुळें तिला निर्वाहापुरतें धन मिळतें, ही गोष्ट सिद्ध झाली. पण मृत अपुत्राचें धन पुष्कळ असल्यास त्यांतील निर्वाहापुरतें धन पत्नी घेते व बाकीचें भ्राते घेतात. परंतु पत्नीच्या पोषणापुरतेंच अथवा त्याहूनही न्यून धन असल्यास त्यांतील पत्नीनें काय घ्यावें व भ्रात्यानें काय घ्यावें ? अशी अडचण आली असतां पूर्वीं ज्याचा निर्देश केलेला असतो तो पक्ष बलवान् होय, हें सुचविण्यासाठीं ' पत्नी दुहितरः० ' इत्यादि वचन आरंभिलें आहे, असें कोणी म्हणेल; पण आचार्य याज्ञवल्क्यांना तें मान्य होण्यासारखें नाहीं. कारण मनुस्मरणांत पिता किंवा भ्राता, असा विकल्प सांगितलेला असल्यामुळें तें वचन क्रम दाखविणारें आहे, असें मुळींच होत नाहीं; तर तें नुस्तें धनग्रहणाचा अधिकार सांगत आहे. यास्तव पत्नी, दुहिता इत्यादि पूर्व अधिकारी नसल्यास पिता, भ्राता इत्यादि धनग्राहक होतात, असें त्याचें निर्विवाद व्याख्यान करितां येतें. शंखाचें जें वचन आहे तें संसृष्टि भ्रात्याविषयीं ( ह्म० एकदां विभक्त होऊन पुनः एकत्र होणाऱ्यांविषयीं ) आहे. हीं वचनें अल्पधनाविषयीं किंवा बहुधनाविषयीं आहेत, असें या वचनावरून तरी निदान ठरत नाहीं. ' तरुण विधवा स्त्री कर्कश जर होईल तर तिला आयुष्य घालविण्यासाठीं जीवनमात्र द्यावें. ' असें जें हारीताचें वचन आहे, तें जिच्या व्यभिचारशीलाची शंका येत असेल तिला सर्व धन देऊं नये, असे सांगण्यास प्रवृत्त झालें आहे. याच वचनावरून जिच्या व्यभिचाराविषयीं कोणाला शंकाही येणें शक्य नसेल तिनें सर्व धन घ्यावें, असें होतें. शंखानेंही ' ज्येष्ठा वा पत्नी ' या वचनांत गुणांनीं ज्येष्ठ म्हणजे जिच्या व्यभिचाराची शंकाही संभवत नाहीं, अशा भार्येनें सर्व धन घेऊन दुसऱ्या कर्कशेला मातेप्रमाणें पाळावें, असें सांगितलें आहे. तस्मात् विभक्त होऊन

पुनः संसृष्ट न होतां स्वर्गास गेलेल्या अपुत्राचें सर्व धन विवाहित व शुद्ध पत्नीनें घ्यावें, हें सिद्ध झालें.

पत्नीच्या अभावीं कन्या. कन्या हें बहुवचन समानजातीच्या व असमानजातीच्या कन्यांना सम व विषम अंश प्राप्त व्हावा, म्हणून योजलें आहे. कात्यायनानें–अव्यभिचारिणी पत्नी भर्त्याचें धन हरण करणारी आहे. तिच्या अभावीं विवाह न झालेली कन्या–असें सांगितलें आहे. बृहस्पतीनें–भर्त्याची धनहरी पत्नी आहे. तिच्या अभावीं कन्या. कारण तीही पुत्राप्रमाणेंच मानवाच्या प्रत्येक अंगापासून उत्पन्न झालेली असते. तेव्हां ती असतांना पित्याचें धन दुसरा कोण घेणार ?—असें म्हटलें आहे. पण त्यांतल्यात्यांत विवाहित व अविवाहित अशा दोन्ही प्रकारच्या कन्या असतील तर अविवाहित कन्येनेंच पितृधन घ्यावें. कारण वर तसें विशेषतः म्हटलें आहे. त्याचप्रमाणें प्रतिष्ठित (श्रीमान्) व अप्रतिष्ठित (दरिद्री) यांचा समवाय असतां त्यांत ज्या कन्या अप्रतिष्ठित असतील त्यांनीं पितृधन घ्यावें पण सर्व कन्या विवाहित व प्रतिष्ठित असल्यास त्यांनींच तें घ्यावें. कारण मातृधनाविषयीं वर जें गौतमवचन सांगितलें आहे तेंच पितृधनालाही लागू करावें. ‘ स्त्रीधन न दिलेल्या ( अविवाहित ) अथवा निर्धन कन्यांचें आहे. ’ हें गौतमवचन पुत्रिकेविषयीं आहे, म्हणून म्हणाल तर ते बरोबर नाहीं. कारण ‘ तत्समः पुत्रिकासुतः ’ असें म्हणून पुत्रिका व तिचा पुत्र हीं दोघेंहीं औरसपुत्रासारखींच आहेत, असें सांगितलें आहे. मूळ ( १३५ ) श्लोकांत दुहितरश्चैव असें म्हटलें आहे. तेथील च शब्दानें दुहिता ( कन्या ) नसल्यास कन्यापुत्र अंशभाक् होतो. विष्णु व मनु या दोघांनींही पुत्रपौत्रसंतान नसल्यास दौहित्रच (कन्यासुत) पौत्र ( पुत्राचे पुत्र ) आहेत असें मानलेलें आहे.

असो; कन्या व कन्यापुत्र यांच्या अभावीं माता व तिच्या अभावीं पिता धनभाक् होतो. पितरौ या शब्दानें माता व पिता या दोघांचीही प्रतीति होते. शिवाय पिता दुसऱ्या पुत्रांमध्येंही साधारण आहे; पण माता तशी नाहीं. यास्तव विशेष सामीप्यामुळें मातेलाच प्रथम धनांश प्राप्त होणें योग्य आहे. सामीप्य केवळ सपिंडामध्येंच नियमन करतें व समानोदकामध्यें करीत नाहीं, असें नाहीं तर तें सपिंड व समानोदक यांना एकसारखेंच लागू आहे. यास्तव, त्यांतील दोघांनाही धनग्रहण करण्याची एकसारखीच प्राप्ति झाली असतां प्रत्यासत्ति ( समीपता ) च तिचें नियमन करणारी आहे. हें, ‘ अनन्तरः सपिण्डाद्यस्तस्य तस्य धनं भवेत् ’ या वचनावरूनच कळत आहे. यास्तव, माता व पिता यांतील अधिक सामीप्यामुळें माताच* प्रथम धनहरी होणें युक्त आहे. तिच्या अभावीं पिता धनभाक्. पित्याच्या अभावीं भ्राते धनाचे वारस. कारण, मनूनें पित्याच्या अभावीं भ्रात्याचें धनग्राहकत्व सांगितलें आहे. धारेश्वरानें–अपत्यरहित पुत्राचें धन मातेनें घ्यावें. माताही मेलेली असल्यास पित्याच्या मातेने तें घ्यावें. असें मनुवचन असल्यामुळें पिता जरी जिवंत असला

---

* हें म्हणणें व्यवहारमयूखास मान्य नाहीं. त्याच्या मतीं दौहित्राच्या अभावीं पिता, पित्याच्या अभावीं माता. याविषयीं कात्यायन, विष्णु यांचीं मतें अनुकूल आहेत.

तरी मृत अपुत्राची माता नसल्यास त्याचें दाय त्याच्या पितामहीनें घ्यावें, पित्यानें घेऊं नये. कारण त्यानें घेतलेलें धन विजातीय पुत्रांकडेही जातें. पण पितामहीनें घेतलेलें सजातीयामध्यें राहूं शकतें. यास्तव तिनेंच तें घ्यावें असें म्हटलें आहे. पण ' चतुस्त्रिद्व्येकभागाः स्युः ' ( अ. ९ श्लो. १८९ ) या मनुवचनानें विजातीय पुत्रांनाही धनग्रहण उक्त असल्यामुळें आचार्य त्या म्हणण्यासही आपलें अनुमोदन देत नाहींत. ' ब्राह्मणाचें द्रव्य राजाला नेहमीं अहार्य आहे. ' असें जें मनुस्मरण आहे तें केवळ राजाकरितां आहे. पुत्रास उद्देशून नाहीं. भ्रात्यामध्येंही सोदर ( सख्ख्या ) भ्रात्यांनीं प्रथम घ्यावें. कारण सावत्र भाऊ मातेच्या द्वारां ततिके दूर असतात. व सपिंडांतील जो समीप असेल तो अंशहर होतो, असें स्मृतिवचन आहे. सोदर भ्राते नसल्यास भिन्नोदर भ्राते धनभाक् होतात. भ्रातेही नसल्यास त्यांचे पुत्र पितृक्रमानें धनभाक् होतात. भ्राते व भ्रात्याचे पुत्र असे दोघेही असल्यास भ्रात्याच्या पुत्रांना धनग्रहणाचा अधिकार पोंचत नाहीं. कारण भ्रात्यांच्या अभावीं भ्रातृपुत्रांचा अधिकार आहे, असें सांगितलें आहे. आतां—एकादा पुत्ररहित भ्राता स्वर्गास गेला. त्यामुळें त्याच्या धनाशीं त्याच्या सर्व भ्रात्यांचा एकसारखाच संबंध आला; पण वाटणी होण्यापूर्वीच त्यांतील आणखी एक भ्राता मेला. तेव्हां त्याच्या पुत्रांना पितृक्रमानें धनग्रहणाचा अधिकार प्राप्त झाला असतां व त्या भ्रात्यांनाही विभाग करून धनग्रहण करण्याचा प्रसंग आला असतां ' पितृतो भागकल्पना ' असें जें सांगितलें आहे, तें युक्तच आहे.

भ्रात्यांचाही अभाव असल्यास गोत्रज धनभाक् होतात. गोत्रज म्हणजे पितामही ( बापाची आई ), सपिंड ( सात पुरुषापर्यंतचे लोक ) व समानोदक. त्यांतील पितामही प्रथम धनभाक् होते. मातेनंतर पित्याच्या मातेचा अधिकार मनूनें सांगितला आहे; पण पित्यापासून भ्रातृपुत्रापर्यंत क्रम बांधलेला असल्यामुळें त्याच्यामध्यें पितामहीचा प्रवेश करतां येत नाहीं. यास्तव, ' माते नंतर पितामही, ' हें वचन नुस्ता पितामहीचा धनग्रहणाधिकार सांगत आहे, असें जाणावें. त्यामुळें भ्रातृपुत्रांच्या अभावीं पितामहीनें धन घ्यावें, यांत काहीं विरोध नाहीं. पितामहीच्या अभावीं समान गोत्रज सपिंड पितामहादिक धनभाक् आहेत. कारण भिन्न गोत्रोत्पन्न सपिंडांचें ( म्हणजे सात पुरुषांपर्यंत कन्यांच्या संततीचें ) ग्रहण ' बंधु ' या शब्दानें निराळें केलें आहे. अर्थात् पितृसंतान नसल्यास पितामही, पितामह, त्याचे पुत्र ( पितृव्य ) व त्याचे पुत्र क्रमानें धनभाक् होतात. पण पितामहाचें संतान नसल्यास प्रपितामही, प्रपितामह, त्याचे पुत्र, त्यांचे पुत्र इत्यादि प्रकारें सातव्या पुरुषापर्यंत समानगोत्र सपिंडांचें धनग्रहण करावें. पण त्यांतील कोणी नसल्यास समानोदकाचा धनसंबंध. सपिंडाच्या पुढचे सात पुरुष समानोदक होत. किंवा जन्म—नाम इत्यादिकांचें ज्ञान असेपर्यंत समानोदकाची अवधि जाणावी. कारण बृहन्मनूनें सपिण्डता सातव्या पुरुषापासून निवृत्त होते व समानोदकता चवदाव्या पुरुषापासून निवृत्त होते, अथवा जन्म व नाम यांचें स्मरण असे तों समानोदकता चालते, यापुढें गोत्र हें नांव अवशिष्ट राहतें.

गोत्रजांच्या अभावीं बंधु धनभाक् होतात. ते बंधु तीन प्रकारचे आहेत. आत्मबंधु, पितृबंधु व मातृबंधु; आपल्या आतेचे पुत्र, मावशीचे पुत्र आणि आपल्या मामांचे पुत्र हे

तीन आत्मबंधु; पित्याच्या आतेचे, मावशीचे व मामाचे पुत्र हे तीन पितृबांधव; आणि मातेच्या आतेचे, मातेच्या मामाचे व मावशीचे पुत्र हे तीन मातृबांधव होत. त्यांतल्यात्यांत आत्मबंधु अंतरंग असल्यामुळें प्रथम धनभाक् होतात. त्यांच्या अभावीं पितृबांधव व त्यांच्याही अभावीं मातृबांधव, हा त्यांचा क्रम समजावा. बंधूंच्या अभावीं आचार्य, आचार्याच्या अभावीं शिष्य; कारण पुत्राच्या अभावीं जो समीप सपिण्ड असेल तो, त्याच्या अभावीं आचार्य व आचार्याच्या अभावीं शिष्य धनभाक् होतो, असे आपस्तंबानेंही सांगितलें आहे. शिष्याच्या अभावीं सब्रह्मचारी ( सहाध्यायी ) धनग्रहणाचा अधिकारी होतो. ज्याच्या सह एकाच आचार्यापासून उपनयन, अध्ययन व त्याच्या अर्थाची प्राप्ति करून घेतलेली असते तो सब्रह्मचारी होय. त्याच्याही अभावीं ब्राह्मणाचें द्रव्य कोणीही श्रोत्रियानें घ्यावें. ‘ श्रोत्रिय अनपत्य ब्राह्मणाच्या रिक्थास पात्र होतात ’ असें गौतमवचन आहे. श्रोत्रियाच्या अभावीं सामान्यतः कोणताही ब्राह्मण पुत्ररहित ब्राह्मणाच्या धनाचा अधिकारी होतो. ब्राह्मणाचें धन राजानें घेऊं नये. नारदानेंही असेंच सांगितलें आहे. क्षत्रियादिकांचें धन मात्र दायाद नसल्यास राजगामी होतें १३५, १३६.

पुत्र व पौत्र दाय ग्रहण करितात. त्यांच्या अभावीं पत्न्यादिक, असे सांगितलें. आतां त्याचाच अपवाद सांगतात—

**वानप्रस्थयतिब्रह्मचारिणां रिक्थभागिनः ।**
**क्रमेणाचार्यसच्छिष्यधर्मभ्रात्रेकतीर्थिनः ॥ १३७ ॥**

वानप्रस्थ, यति व ब्रह्मचारी यांचे उलट क्रमानें आचार्य, सच्छिष्य, धर्मभ्राता व एकतीर्थी धनाचे भागीदार होतात. येथें ब्रह्मचारी शब्दानें नैष्ठिक ब्रह्मचारीच घ्यावा. कारण उपकुर्वाण ब्रह्मचाऱ्याचें धन माता, पिता इत्यादि घेत असतात. यास्तव नैष्ठिकाचें आचार्यानें घ्यावें. यतीचें धन सच्छिष्य घेतो. अध्यात्मशास्त्रश्रवण, धारण, तदर्थानुष्ठान इत्यादिकांमध्यें जो समर्थ असतो तोच सच्छिष्य होय. जो शिष्य दुर्वृत्त असतो त्याला आचार्यादिकांचाही भाग मिळत नाहीं. वानप्रस्थाचें धन धर्मभ्राता व एकतीर्थी घेतो. धर्मभ्राता म्हणजे मानलेला भ्राता व एकतीर्थीच म्हणजे एका आश्रमांत असणारा. या आचार्यादिकांचा अभाव असतां पुत्रादिक असले तरी एकतीर्थीच त्यांचें रिक्थ घेतो. पण यावर कोणी म्हणेल कीं, ‘गृहस्थेतर आश्रमांत असलेले सर्व आश्रमी अंशशून्य आहेत,’ असें वसिष्ठांचें स्मरण असल्यामुळें दुसऱ्या आश्रमांत गेलेल्यांचा रिक्थसंबंधच नसतो. मग त्याचा विभाग कोठचा ? नैष्ठिकापाशीं स्वार्जित धन असणेंच संभवत नाहीं. कारण त्याच्या प्रतिग्रहादि धनार्जनाच्या साधनांचा निषेध केलेला आहे. ‘ अनिचयो भिक्षुः ’ असें गौतमाचें वचन असल्यामुळें भिक्षुपाशींही स्वार्जित धन असणें संभवत नाहीं.

या शंकेचें समाधान सांगतों— दिवस, मास, सहा महिने किंवा वर्ष, इतक्या अवधीपर्यंत पुरेल एवढा संचय वानप्रस्थानें करावा व संचित केलेलें धन आश्वयुजीच्या दिवशीं सर्व खर्च करावें. असें वचन असल्यामुळें वानप्रस्थापाशीं तर धनसंबंध संभवतो. यतीचाही वस्त्र,

पुस्तक इत्यादिकांशीं संबंध आहे. कारण, 'त्यानें कौपीन, आच्छादन इत्यादिकांकरितां वस्त्राचें ग्रहण करावें. योगसंभार व पादुका यांचें ग्रहण करावें,' असें वचन आहे. नैष्ठिकाचाही शरीरयात्रार्थ वस्त्रादिसंबंध आहेच. यास्तव या श्लोकांतील विभागकथन युक्तच आहे १३७.

आतां स्वर्गास गेलेल्या पुत्ररहिताचे पत्नीप्रभृति वारस आहेत, या विधानाचा अपवाद सांगतात--

संसृष्टिनस्तु संसृष्टी सोदरस्य तु सोदरः ।
दद्यादपहरेच्चांशं जातस्य च मृतस्य च ॥ १३८ ॥

एकदां विभाग केलेलें धन पुनः एकत्र मिळविणें याला संसृष्ट धन म्हणतात. तें ज्याच्यापाशीं असतें तो संसृष्टी, संसृष्टित्वही पाहिजे त्याच्याशीं होऊं शकत नाहीं. तर पिता, भ्राता व पितृव्य यांच्याशींच होतें. कारण बृहस्पतीनें जो विभक्त झालेला पुरुष पिता, भ्राता अथवा पितृव्य यांच्या प्रेमामुळें पुनः त्याच्याशीं एकत्र राहतो तो संसृष्टी होय, असें सांगितलें आहे. असो, अशा प्रकारचा संसृष्टी मेला असतां व विभागसमयीं त्याची भार्या गर्भवती आहे, हें न समजल्यामुळें त्याचा विभाग काढल्यावाचूनच वाटणी केल्यावर त्याची भार्या गर्भवती आहे, असें कळून तिला योग्यसमयीं पुत्र झाल्यास त्याला इतर भ्रात्यांनीं त्याचा विभाग द्यावा. पुत्र नसल्यास मात्र त्यांनींच घ्यावा. पत्नीला देऊं नये.

आतां याच श्लोकाच्या वाक्यांच्या तीन पदांमध्यें ' संसृष्टिनस्तु संसृष्टी या पहिल्या पदाचा अपवाद सांगतात— सोदर संसृष्टी मेल्यास त्याचा अंश सोदर संसृष्टीनें संसृष्ट झाल्यावर उत्पन्न झालेल्या त्याच्या पुत्रास द्यावा. पण तो नसल्यास स्वतः हरण करावा. त्याचप्रमाणें सोदर व असोदर यांचा संसर्ग झाला असतां सोदर संसृष्टीचें धन सोदरच घेतो. भिन्नोदर भ्राता संसृष्ट जरी असला तरी तो घेत नाहीं १३८.

संसृष्टी पुत्ररहितच मेला; पण तो ज्याच्याशीं संसृष्ट झालेला होता तो सोदर भ्राता नसून असोदर होता. पण त्यांच्याशीं संसृष्ट न झालेला असा त्याचा सोदर भ्राताही आहे, तर त्याचें धन कोणी घ्यावें ? असा प्रश्न उपस्थित झाला असतां दोघांनीं वाटून घेण्याचें कारण सांगतात--

अन्योदर्यस्तु संसृष्टी नान्योदर्यो धनं हरेत् ।
असंसृष्टचपि वा दद्यात्संसृष्टो नान्यमातृजः ॥ १३९ ॥

सापत्न भ्राता संसृष्टीचें धन हरण करो. पण तो असंसृष्टी असल्यास त्यानें त्याचें धन हरण करूं नये. यावरून भिन्न भ्रात्याला धनग्रहणाचा अधिकार प्राप्त होण्यास संसृष्टित्व हेंच एक कारण आहे. पण तो सोदर भ्राता असंसृष्टी जरी असला तरी त्याचा समानोदर संसर्ग असल्यामुळें त्यानें दुसऱ्याशीं संसृष्ट झालेल्या भ्रात्याचें धन ग्रहण करावें. या वाक्यानें असंसृष्ट सोदराला धनग्रहण करण्याचें कारण सोदरत्व हेंच आहे, असें सांगितलें. संसृष्टी अन्य माते-

पासून झालेला असल्यास त्यानेंही संसृष्टीचें धन घेऊं नये. यावरून ' असंसृष्ट सोदर व संसृष्ट भिन्नोदर यांनीं त्याचें धन वाटून घ्यावें ' असें म्हटल्यासारखेंच होतें. कारण दोघांमध्येंही धनग्रहणाचें एकेक कारण आहे. मनूनेंही ' येषां ज्येष्ठःकनिष्ठो वा ' (अ ९. श्लो. २१०-११, १२, ) इत्यादि श्लोकांत हेंच स्पष्ट केलें आहे. त्यांचा सारांश असा- एकत्र झालेल्या भ्रात्यांतील जो ज्येष्ठ, मध्यम किंवा कनिष्ठ भ्राता अंश देण्याच्या वेळीं दुसरा आश्रम घेतल्यामुळें, ब्रह्महत्यादिकांमुळें अथवा मरण पावल्यामुळें स्वांशापासून भ्रंश पावतो, त्याचा अंश लुप्त होत नाहीं. यास्तव तो भाग निराळा काढावा. इतर संसृष्टीनें घेऊं नये. पण अशा रीतीनें काढलेल्या त्याचा विनियोग कसा करावा, असें कोणी विचारील म्हणून ' सोदर्या विभजेयुस्तं ' असें त्यानेंच सांगितलें आहे. म्हणजे त्या निराळ्या काढलेल्या भागाला संसृष्ट नसलेल्याही सोदर भ्रात्यांनीं वाटून घ्यावें. ते देशांतरीं जरीं गेलेले असले तरीं त्यांनीं एकत्र जमून धनाचा सम विभाग करून घ्यावा. ( न्यूनाधिक भाग करूं नये. ) पण जे भ्राते भिन्नोदर व संसृष्ट असतील त्यांनीं व सोदर भगिनींनीं त्याचा सम विभाग करून घ्यावा १३९.

आतां पुत्र-पत्न्यादि संसृष्टांचें जें दायग्रहण सांगितलेलें आहे त्याचा अपवाद सांगतात—

**क्लीबोऽथ पतितस्तज्जः पङ्गुरुन्मत्तको जडः ।**
**अन्धोऽचिकित्स्यरोगाद्या भर्तव्याः स्युर्निरंशकाः ॥ १४० ॥**

नपुंसक, ब्रह्महत्यादि महा पातकामुळें पतित, पतितापासून झालेला, पंगु, वातादि त्रिदोषांचा संनिपात-ग्रहावेश ( भूतादि संचार ) इत्यादिरूप उन्मादांनीं व्याकुळ झालेला, जड ( ज्याचें चित्त विकल आहे, जो आपल्या हिताहिताचा निश्चय करण्यास समर्थ नाहीं ) अंध ( नेत्ररहित ), ज्याची चिकित्साच करितां येत नाहीं अशा राजयक्ष्मा इत्यादि असाध्य रोगानें युक्त असलेला व आद्यशब्दानें-दुसऱ्या आश्रमांत गेलेला, पित्याचा द्वेष करणारा, उपपातकी, बधिर, मूक, निरिंद्रिय ( व्याधीमुळें ज्याचें इंद्रिय गेलें आहे ) इत्यादिकांचें ग्रहण करावें. कारण नारद व मनु यांनीं त्यांचा उल्लेख केलेला आहे. असो; हे सर्व अनंश आहेत. म्हणजे ते रिक्थास पात्र होत नाहींत. त्यांना केवळ अन्नवस्त्र देऊन त्यांचें यावज्जीव पोषण मात्र करणें उचित आहे. कारण तेंही न केल्यास पतितत्व दोष लागतो. मनूनें ' सर्वेषामपि तु न्याय्यं० ' ( अ ९ श्लोक २०२ ) या वचनांत तसें सांगितलें आहे. पण विभागाच्या पूर्वींच जर यांना दोष प्राप्त झाला तर ते अंशरहित होतात, असें म्हणणें उचित आहे. विभक्त झाल्यावर वरील दोषांतील कांहीं दोष प्राप्त झाल्यास ते अनंश होत नाहींत. विभागानंतरही औषधादिकांच्या योगानें दोष घालविल्यास भाग प्राप्त होतोच. कारण ' विभक्त झाल्यावर सवर्ण भार्येच्याठायीं पुत्ररहित मृत भ्रात्याला पुत्र झाल्यास तो विभागभाक् होतो, ' या वचनांतील न्यायच प्रस्तुतप्रसंगीं लावतां येतो या श्लोकांत सर्व शब्द जरी पुंलिंगी योजलेले आहेत तरी त्याला फारसें महत्व न देतां पत्नी, कन्या, माता इत्यादि स्त्रियाही उक्त दोषांनीं दूषित असल्यास त्यांनाही अंश मिळत नाहीं, असें जाणावें १४०.

पण वरील क्लीबादिकांप्रमाणेंच त्यांच्या पुत्रांनाही अनांशित्व प्राप्त झालें असतां सांगतात—

**औरसाः क्षेत्रजास्त्वेषां निर्दोषा भागहारिणः ।**

या नपुंसकादिकांचे औरस अथवा क्षेत्रज पुत्र जर निर्दोष ( म्ह० वरील दोषांतील कोणत्याही दोषानें दूषित झालेले नसले तर ) अंशग्राही होतात. त्यांतलि क्लीबाचा क्षेत्रज पुत्रच संभवतो, इतरांचे औरसही संभवतात. येथें औरस व क्षेत्रज पुत्रांचा निर्देश करून इतर पुत्रांचें निरसन केलें आहे. आतां क्लीबादिकांच्या कन्या विषयीं विशेष सांगतात--

**सुताश्चैषां प्रभर्तव्या यावद्वै भर्तृसात्कृताः ॥ १४१ ॥**

क्लीबादिकांच्या कन्या विवाहानें संस्कृत होत तों ( व पतीच्या स्वाधीन होत तों ) भरणीय ( पोषण करण्यास योग्य ) आहेत. सुताश्च येथील च शब्दानें त्यांचा विवाहसंस्कार करणेंही योग्य आहे, असें सुचविलें आहे १४१.

आतां क्लीबादिकांच्या पत्नीविषयीं विशेष सांगतात--

**अपुत्रा योषितश्चैषां भर्तव्याः साधुवृत्तयः ।**
**निर्वास्या व्यभिचारिण्यः प्रतिकूलास्तथैव च ॥ १४२ ॥**

या क्लीबादिकांच्या अपुत्र स्त्रियांचें त्या सदाचरणसंपन्न असल्यास भरण करावें. पण त्या व्यभिचारिणी असल्यास त्यांना ( घरांतून ) घालवून द्यावें. त्याचप्रमाणें त्या प्रतिकूल असल्या तर त्यांना बाहेर घालवावें; पण त्या अव्यभिचारिणी असल्यास त्यांचें भरण करणें उचित होय. केवल प्रातिकूल्यामुळें भरणही करावयाचें नाहीं, असें करूं नये १४२.

११७ व्या श्लोकांत माता व पिता यांच्या ( म्ह० स्त्री-पुरुषांच्या ) धनाचा विभाग संक्षेपतः सांगून पुरुषांच्या धनाच्या विभागाचें वर्णन येथवर सविस्तर केलें.आतां स्त्रीधनाच्या विभागाचें वर्णन करण्याची इच्छा करणारे योगीश्वर स्त्रीधनाचें स्वरूप सांगतात--

**पितृ-मातृ-पति-भ्रातृ-दत्तमध्यग्न्युपागतम् ।**
**आधिवेदनिकाद्यं च स्त्रीधनं परिकीर्तितम् ॥ १४३ ॥**

पिता, माता, पति व भ्राता यांनीं दिलेलें, विवाहसमयीं अग्नीच्या समीप मातुलादिकांनीं दिलेलें, १४८ व्या श्लोकांत सांगावयाचें आहे तें—अधिवेदनानिमित्त प्राप्त झालेलें व आद्यशब्दानें रिक्थ, क्रय, संविभाग, परिग्रह व अधिगम यांच्या योगानें प्राप्त, यांचें ग्रहण करावें. सारांश, इतक्या प्रकारच्या धनास मन्वादिकांनीं स्त्रीधन म्हटलें आहे. येथील स्त्रीधन हा शब्द यौगिक आहे. पारिभाषिक नव्हे. कारण योगाचा संभव असतांना परिभाषेचा अंगीकार करणें योग्य नव्हे. मनूनें ( अ० ९ श्लो० १९४ मध्यें ) सहा प्रकारचें स्त्रीधन सांगितलें आहे. पण ते न्यून संख्येच्या निराकरणार्थ आहे. अधिक संख्येच्या निवा-

स्वार्थ नाहीं. कात्यायनानें मनूनें सांगितलेल्या अध्यग्निप्रभृति स्त्रीधनाचें स्वरूप असें सांगितलें आहे--विवाहसमयीं स्त्रियांना अग्निसान्निध जें दिलें जातें त्याला अध्यग्निकृत म्हणतात. पित्याच्या घरांतून सासरीं नेत असतांना स्त्रियांना जें धन मिळतें तें अध्यावहनिक स्त्रीधन होय. सासू किंवा श्वशुर यांनीं प्रेमानें अथवा पादवंदनसमयीं दिलेलें जें धन तें प्रीतिदत्त होय. विवाहित कन्येला पतीपासून अथवा पित्याच्या येथेंही भ्राता, आई-बाप इत्यादिकांपासून जें मिळालेलें असतें तें सौदयिक आहे १४३.

वन्धुदत्तं तथा शुल्कमन्वाधेयकमेव च ।

कन्येच्या मातृबंधूंनीं अथवा पितृबंधूंनीं जें परत दिलेलें शुल्क (कीं जें घेऊन कन्या दिली जाते) त्याला अन्वाधेयक म्हणतात. कारण तें विवाहानंतर कन्येला दिलेलें असतें. कात्यायनानें 'विवाहानंतर स्त्रीला पतीच्या अथवा पित्याच्या कुलांतून जें मिळालेलें असतें. त्याला स्त्रीधन म्हणतात.' असें म्हटलें आहे. याप्रमाणें स्त्रीधनाचें स्वरूप सांगून आतां त्याचा विभाग सांगतात--

अतीतायामप्रजसि बान्धवास्तदवाप्नुयुः ॥ १४४ ॥

कन्या, कन्येची कन्या, पुत्र, पौत्र इत्यादि अपत्यांनीं रहित अशी एखादी स्त्री मरण पावली असतां पति इत्यादि तिच्या पुढें सांगितल्या जाणाऱ्या बांधवांनीं तिचें धन घ्यावें १४४.

सामान्यतः बांधव धनग्रहणाचे अधिकारी आहेत, हें सांगितलें. आतां भिन्न भिन्न विवाहानें विवाहित झालेल्या स्त्रियांचे भिन्न भिन्न अधिकारी सांगतात--

अप्रजस्त्रीधनं भर्तुर्ब्राह्मादिषु चतुर्ष्वपि ।
दुहितॄणां प्रसूता चेच्छेषेषु पितृगामि तत् ॥ १४५ ॥

ब्राह्म, दैव, आर्ष व प्राजापत्य या चार प्रकारच्या विवाहांतील कोणत्या तरी एकानें भार्यात्वास प्राप्त झालेल्या व अपत्यावाचूनच मरण पावलेल्या स्त्रीचें धन प्रथम भर्त्याचें होतें. त्याच्या अभावीं त्याच्याच अधिक जवळच्या सपिंडाचें होतें, आणि बाकीच्या (म्ह०आसुर, गांधर्व, राक्षस व पैशाच) चार विवाहांत भार्या झालेल्या अपत्यरहित स्त्रीचें धन प्रथम मातेला व नंतर पित्याला प्राप्त होतें. तीं दोन्ही नसल्यास त्यांच्या जवळच्या सपिंडास तें मिळतें. पण या सर्व विवाहांमध्यें तिला अपत्य झालेलें असल्यास तिचें धन कन्येच्या कन्येला मिळतें. येथील 'दुहितॄणां' या शब्दाचा अर्थ 'नातीचें' असाच करणें उचित आहे. कारण प्रत्यक्ष कन्येला तें मिळतें हें तर 'मातुर्दुहितरः शेषं' या वचनानेंच वर सांगितलेलें आहे. यास्तव माता मेली असतां मातेचें धन प्रथम कन्या घेतात. त्यांतील कांहीं विवाहित व कांहीं अविवाहित असल्यास अविवाहित कन्या घेतात. त्यांच्या अभावीं विवाहित पण, त्यांतही निर्धन कन्या अगोदर धन ग्रहण करण्यास पात्र आहेत. निर्धन कन्याच नसल्यास सधनांनीं तें घ्यावें. पण हें सर्व शुल्का वाचून बोलणें आहे. कारण 'भगिनीशुल्कं सोदर्या-

णामूर्ध्वं मातुः ' असें गौतम वचन असल्यामुळें तें सोदर भ्रात्यांचेंच होतें. असो. पण वर सांगितलेल्या प्रकारच्या सर्व कन्यांचा अभाव असल्यास कन्यांच्या कन्या तें घेतात. कारण त्याविषयीं हेंच वचन प्रमाण आहे. पण त्या ( नातीं ) भिन्न भिन्न मतांच्या मुली असल्यास व सगळ्याच सारख्या नसल्यास मातेच्या द्वारां त्यांचे विभाग करावे. कारण, गौतमानें तसें सांगितलें आहे. ( अर्थात्-एका स्त्रीला तीन कन्या होत्या. त्यांना क्रमानें दोन, तीन व पांच अशा विषम कन्या झाल्या; पण पुढें त्यांच्या आया मरून धनवती आजीही मेली. तेव्हां तिचें धन वाटण्याचा प्रसंग आला असतां प्रथम सर्व धनाचे तीन भाग करून नंतर त्यांतील प्रत्येकाचे क्रमानें दोन, तीन व पांच विभाग करून त्या कन्यांना द्यावे. ) पण कांहीं कन्याही असून शिवाय कांहीं कन्यांच्या कन्याही असल्यास कन्यांच्या कन्यांना कांहीं थोडेंसें द्यावें. कारण मनूनें तसें सांगितलें आहे.

कन्यांच्या कन्याही नसल्यास कन्यांचे पुत्र धनग्राहक होतात. कारण नारदानें ' दुहितॄणां तदन्वयः ' असें म्हणून तत् या शब्दानें जवळच्या दुहितृ पदाचा परामर्श केला आहे. असो; दौहित्रांच्या अभावीं पुत्र धनग्रहण करितात. कारण ' ताभ्य ऋतेऽन्वयः ' असें म्हटलें आहे. मनूनेंही ' जनन्यां संस्थितायां तु० ' या वचनानें दुहिता व पुत्र यांचा मातृधनाशीं संबंध दाखविला आहे. मातृकरिक्थ सर्व सहोदरांनीं व सर्व भगिनींनीं सारखें वाटून घ्यावें, असा त्याचा सारांश निघतो. सोदर व सम या शब्दांनीं असमानोदर व विषम यांची निवृत्ति केली आहे. पण जिला अपत्य नाहीं अशा हीन जातीच्या स्त्रीचें धन भिन्नोदरात झालेलीही उत्तम जातीच्या सपत्नीची कन्या घेते. तिच्या अभावीं तिचें अपत्य तें धन घेऊं शकतें. कारण मनूनें ' स्त्रियास्तुयद्भवेत्० ' ( अ. ९ श्लोक १९८ ) या वचनांत पित्यानें दिलेलें स्त्रीधन ब्राह्मणीकन्येनें अथवा तिच्या पुत्रानें हरण करावें, असें म्हणून उत्तम जातीच्या सवतीच्या संततीनें तें घ्यावें, असें सुचविलें आहे. यास्तव अपत्यरहित वैश्या स्त्रीचें धन क्षत्रिया कन्या घेऊं शकते. पुत्राच्या अभावीं पौत्र पितामहींचें धन हरण करितात. ' पुत्रपौत्रैर्ऋणं देयं ' असें म्हणून पौत्रांनाही पितामहींचें ऋण फेडण्याचा अधिकार आहे, असें सांगितलें आहे. आणि पौत्रांचाही अभाव असल्यास पूर्वोक्त भर्ता-इत्यादि बांधव स्त्रीधन घेतात १४५.

स्त्रीधनाच्या प्रसंगानें वाग्दत्ता कन्येविषयीं कांहीं सांगतात—

**दत्वा कन्यां हरन्दण्ड्यो व्ययं दद्याच्च सोदयम् ।**

कन्येला वाणीनें देऊन पुनः परत घेणारा द्रव्यादि व्ययाच्या अनुरोधानें राजाच्या दंडास पात्र होतो. पण परत घेण्याचें विशेष कारण नसतांना तिला परत घेतल्यास, हें समजावें. कारण विशेष कारण असल्यास व उत्तम वर आल्यास वाचादत्त कन्येलाही परत घेण्याची अनुज्ञा शास्त्रानें दिली आहे, पण वाग्दानाच्या निमित्तानें वरानें आपल्या संबंधीजनांच्या अथवा कन्येच्या संबंधीच्या उपचारार्थ जें धन खर्च केलें असेल तें सर्व वृद्धिसह

( सव्याज ) कन्यादात्यानें वरास द्यावें. पण वाग्दत्ता कन्या संस्कार होण्यापूर्वीच मेल्यास काय करावें ? अशा प्रश्न आला असतां सांगतात—

मृतायां दत्तमादद्यात्परिशोध्योभयव्ययम् ॥ १४६ ॥

जर वाग्दत्त कन्या मेली तर पूर्वी वरानें आंगठी किंवा शुल्क इत्यादि जें कांहीं दिलें असेल तें त्यानें आपला व कन्यादात्याचा झालेला खर्च वाद करून बाकी राहिलेलें धन घ्यावें. कन्येला मातामहादिकांनीं जें दिलें असेल अथवा त्यांना कुलक्रमानें प्राप्त झालें असेल तें शिरोभूषणादि तिच्या पश्चात् तिच्या सोदर भ्रात्यांनीं वाटून घ्यावें.त्यांच्या अभावीं तें मातेचें व तिच्याही अभावीं पित्याचें. कारण बौधायनाचें तसें बचन आहे १४६.

जिची सर्व प्रजा मेली आहे, अशा स्त्रीचें धन भर्तृगामी आहे, हें वर सांगितलें. आतां क्वचित्प्रसंगीं जिवंत असलेल्या प्रजायुक्त स्त्रीचें धन घेण्याचाही अधिकार भर्त्याला आहे, असें सांगतात—

दुर्भिक्षे धर्मकार्ये च व्याधौ संप्रतिरोधके ।
गृहीतं स्त्रीधनं भर्ता न स्त्रियै दातुमर्हति ॥ १४७ ॥

दुर्भिक्ष ( दुष्काळ ) झालें असतां कुटुंबपोषणार्थ, अवश्य कर्तव्य धर्मकार्यांत, व्याधि उत्पन्न झाली असतां व कैद करून नेणें, निग्रह ( दंड ) करणें. या प्रसंगीं ज्याच्यापाशीं दुसरें धन नाहीं, अशा भर्त्यानें स्त्रीचें धन घेतल्यास तें त्यानें परत देण्याची अवश्यकता नाहीं. त्यानें तें निराळ्या प्रकारानें तिला पाहिजे तर द्यावें. जिवंत स्त्रीचें धन भर्त्यावाचून दुसऱ्या कोणत्याही दायादानें घेऊं नये. कारण तें हरण करणाऱ्या बांधवांना राजानें दंड करावा, असें मनूनें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें ' पति जिवंत असतांना स्त्रीनें धारण केलेला अलंकार वाटणीच्या वेळीं दायादांनीं वाटून घेऊं नये. घेतल्यास ते पतित होतात. ' असेंही सांगितलें आहे १४७.

आधिवेदनिक स्त्रीधन कोणतें तें सांगतात—

अधिविन्नस्त्रियै दद्यादाधिवेदनिकं समम् ।
न दत्तं स्त्रीधनं यस्यै दत्ते त्वर्द्धं प्रकीर्तितम् ॥ १४८ ॥

जी एक पत्नी असतांना दुसरी केली जाते ती अधिविन्ना. अशा अधिविन्न ( पहिल्या विवाहित ) भार्येला अधिवेदननिमित्तक सम धन द्यावें. सम म्हणजे अधिवेदनाला जितकें खर्च केलें असेल तितकें. पण तिला श्वशुरानें अथवा स्वतः पतीनें स्त्रीधन दिलें नसल्यास तितकें द्यावें, आणि पूर्वीच कांहीं स्त्रीधन दिलेलें असल्यास अधिवेदनास जितका खर्च लागला असेल त्याच्या अर्धे द्यावें. पण येथील अर्ध शब्द बरोबर निमें या अर्थी नाहीं. वास्तव पूर्वी दिलेलें स्त्रीधन व अधिवेदनास झालेला व्यय यांत जेवढें अंतर असेल तेवढें द्यावें १४८.

यावप्रमाणें विभाग सांगून आतां त्याविषयीं संदेह आल्यास कोणत्या हेतूंनीं निर्णय करावा, तें सांगतात—

विभागनिन्हवे ज्ञातिबन्धुसाक्ष्यभिलेखितैः ।
विभागभावना ज्ञेया गृहक्षेत्रैश्च यौतकैः ॥ १४९ ॥

विभागाचा निह्नव ( अपलाप ) केल्यास ( म्हणजे हा विभाग मला मिळालाच नाहीं किंवा असा विभाग झालाच नव्हता, ) असें कोणी म्हणू लागल्यास पितृबंधु, मातृबंधु, मातुलादिक, पूर्वी सांगितलेल्या प्रकारचे साक्षी व विभागपत्र यांच्या योगानें विभागाची भावना (निर्णय) करावी. त्याचप्रमाणें पृथक् केलेल्या गृहक्षेत्रादिकांच्या योगानें निर्णय करावा. कारण पृथक् कृषि, पृथक् कार्यप्रवर्तन, पृथक् पंचमहायज्ञादि धर्मानुष्ठान, हीं सर्व विभागाचीं लिंगें आहेत असें नारदानें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें, 'अविभक्त भ्रात्यांचा धर्म एकत्र चालतो व विभाग झाल्यावर तो पृथक् होतो, ' असेंही म्हटलें आहे. साक्षित्व, प्रातिभाव्य, दान, ग्रहण इत्यादि सर्व विभक्त भ्रातेच स्वतंत्रपणें करितात. अविभक्त करीत नाहींत, असें म्हणून त्यानेंच साक्षित्वादि दुसरींही विभागचिन्हें सांगितलीं आहेत १४९.

इतिदायविभागप्रकरणम् ८.

---

# अथ सीमाविवादप्रकरणम् ९.



आतां प्रथम सीमाविवादनिर्णय सांगतात—

सीम्नो विवादे क्षेत्रस्य सामन्ताः स्थविरादयः ।
गोपाः सीमाकृषाणा ये सर्वे च वनगोचराः ॥ १५० ॥
नयेयुरेते सीमानं स्थलाङ्गारतुषद्रुमैः ।
सेतुवल्मीकनिम्नास्थिचैत्याद्यैरुपलक्षिताम् ॥ १५१ ॥

दोन गावांच्या सीमेसंबंधीं विवाद लागला असतां अथवा एकाच ग्रामांतील क्षेत्रमर्यादा इत्यादिकांविषयीं विवाद लागला असतां सामन्तादिकांनीं स्थल-अंगार इत्यादि पूर्वी केलेल्या सीमालक्षणांनीं चिन्हित असलेल्या सीमेचा निर्णय करावा. सीमा म्हणजे क्षेत्रादिकांची मर्यादा. ती चारप्रकारची आहे. जनपदसीमा, ग्रामसीमा, क्षेत्रसीमा व गृहसीमा. तिचीं यथासंभव पांच लक्षणें होतात. त्याविषयीं नारदानें असें सांगितलें आहे— ध्वजिनी, मात्स्यिनी, नैधानी, भयवर्जिता व राजशासननीता, अशी पांचप्रकारची सीमा सांगितलेली आहे. ध्वजिनी म्हणजे वृक्षादिकांनीं लक्षित; वृक्षादिक प्रकाशक असल्यामुळें त्यांना ध्वजतुल्यता आहे. मात्स्यिनी

म्हणजे जलवाली. मत्स्य शब्दावरून त्याच्या आधारभूत जलाची लक्षणा करावी. निधानी म्हणजे ज्या सीमेवर तुष, ( कोंडा ) अंगार ( कोळसे ) इत्यादि पुरेल आहेत ते. पुरलेले असल्यामुळें निधानासारखे होत. भयवर्जित म्हणजे अर्थी व प्रत्यर्थी यांच्या परस्पर संमतीनें निर्मिलेली सीमा. राजशासननीता म्हणजे ज्ञात होणारें कांहीं चिन्ह नसल्यामुळें राजाच्या इच्छेनें निर्मिलेली सीमा. असो; अशा प्रकारच्या सीमेविषयीं सहाप्रकारचा विवाद संभवतो. कात्यायनानें त्याविषयीं असें म्हटलें आहे. भूमीच्या वादाचे हेतु तिच्या अंशाचें न्यूनाधिक्य, अस्तित्व, नास्तित्व, अभोगभुक्ति व सीमा असे सहा आहेत. या भूभागांत माझी पांच निवर्तनांहून ( निवर्तन हें क्षेत्रमापनाचें एक प्रमाण आहे. ) अधिक भूमी आहे, असें कोणी म्हटलें असतां दुसऱ्यानें नाहीं,तुझी यांत पांच निवर्तनच भूमि आहे,अधिक नाहीं असें म्हणणें व त्यामुळें वाद सुरू होणें हा आधिक्याविषयीं वाद झाला. एकानें माझी पांच निवर्तन भूमि आहे, असें म्हटलें असतां दुसऱ्यानें नाहीं त्याहून कमी आहे, असें म्हणणें, हा न्यूनाविषयीं विवाद होय. एकानें माझा यांत पांच निवर्तन भाग आहे असें म्हटलें असतां दुसऱ्यानें यांत त्याचा मुळींच भाग नाहीं, असें उलट म्हटल्यास अस्तिविवाद व नास्तिविवाद सुरू होतो. माझी ही भूमि असून पूर्वी भोग न घेत असलेल्या हिचा हा आतां भोग घेत आहे, असें एकानें म्हटलें असतां दुसऱ्यानें असें नाहीं, मी फार दिवसांपासून निरंतर भोग घेत आहें. हा अभोगभुक्तीचा वाद होय. आणि ही सीमा कीं ही ? असा जो वाद होतो, तो सीमाविवाद होय. असा सहाप्रकारचाच सीमाविवाद संभवतो.पण त्या सहाही प्रकारच्या भूविवादांत श्रुति व अर्थ यांच्या योगानें सीमेचाही निर्णय करितां येत असल्यामुळें सीमानिर्णयप्रकरणांत त्यांचा अंतर्भाव होतो. जे समन्तात् असणारे ते सामंत ( चारी दिशांमध्यें लागूनच असलेले ग्रामादिक ) ते प्रत्येक सीमेंत व्यवस्थित असतात. कात्यायनानें सभोंवारचा ग्राम ग्रामाचा सामंत, क्षेत्र क्षेत्राचें सामंत व गृह गृहाचें सामन्त असतें असें सांगितलें आहे. येथील ग्रामादि शब्दावरून त्यांतील पुरुष लक्षित होतात. जसें-गांव पळून गेला असें म्हटल्यास त्यांतील पुरुष लक्षित होतात. सामन्त ग्रहण हें तेथील संसक्तादिकांचें उपलक्षक आहे. तसेंच स्थविरादि म्हणजे वृद्ध इत्यादि. आदिशब्दानें मौल व उद्धृत यांचें ग्रहण करावें. कोणतेंही कार्य निष्पन्न होत असतांना ज्यांनीं पाहिलें असेल ते वृद्ध गुणांनीं युक्त असलेले, वयानें वृद्ध असले तरी अथवा नसले तरी वृद्ध म्हटले जातात. जे तेथें पूर्वी सामन्त असून मागून देशांतरीं जातात ते मूळ पुरुष असल्यामुळें मौल होत. जे उपश्रवण, संभोग, कार्याख्यान इत्यादिकांनीं चिन्हित होत्साते वादांतील वस्तूचा पुनः उद्धार करितात ते उद्धृत होत. गायींना चारणारे गोप, सीमेपाशीं शेत नांगरणारे, व्याधादि सर्व वनचारी, ( त्याचें वर्णन मनूनें असें केलें आहे-व्याध ( शिकारी ), शाकुनिक ( पक्ष्यास धरणारे ), गोप, कैवर्त ( कोळी), मूलखातक ( मूळें खणून काढणारे ), व्यालग्राह ( सापांस धरणारे ), शेतांतील कणसें गोळा करणारे व असेच दुसरेही वनांत राहून निर्वाह करणारे वनचर होत. ) स्थल म्हणजे उंच भूप्रदेश, अंगार म्हणजे अग्नीचें उच्छिष्ट ( कोळसे, राख ) तुष ( धान्यावरील त्वचा ), वृक्ष, ( वड

पिंपळ इत्यादि ) सेतु ( जलप्रवाहाला अडविणारा बांध ), चैत्य ( पाषाणादिकांचा बांध, ओटा, पार ) आणि आदिशब्दानें वेळू, वाळु, इत्यादिकांचें ग्रहण करावें. हीं सर्व प्रकाश व अप्रकाश अशीं दोन प्रकारचीं आहेत. प्रकाश म्हणजे बाहेर प्रकट दिसणारीं. उदाहरणार्थ, मनूनें ( अध्याय ८ श्लो० २४६-४८ यांत ) सांगितलेले न्यग्रोधादि वृक्ष, तडाग, जलाशय इत्यादि-व अप्रकाश म्हणजे गुप्त लोकांमध्यें सीमांचा विपर्यय नित्य दिसत असल्यामुळें दगड, हाडें, गायीच्या शेपुटांचें गोंडे, तुष, भस्म ( राख ) खापऱ्या, वाळलेलें शेण, विटा, कोळसे, बारीक खडे व वाळु इत्यादि भूमींत घालून ठेवावीं. ज्यांना भूमि कालांतरींही, खाऊं, शकत नाहीं अशा या व दुसऱ्याही वस्तूंना सीमेवर गाडून ठेवावें. आणि पुढें सीमेविषयीं वाद उपस्थित झाला असतां राजानें सामंतादिकांनीं दाखविलेल्या या प्रकट व गुप्त लिंगांवरून सीमेचा निर्णय करावा १५०, १५१.

पण जेव्हां अशीं चिन्हेंच नसतात; अथवा तीं कांहींशीं बुजल्यामुळें संदिग्ध होतात तेव्हां निर्णय कसा करावा तें सांगतात—

सामन्ता वा समग्रामाश्चत्वारोऽष्टौ दशापि वा ।
रक्तस्रग्वसनाः सीमां नयेयुः क्षितिधारिणः ॥ १५२ ॥

वर सांगितलेल्या प्रकारचे सामन्त आणि चार, आठ किंवा दहा अशा सम संख्येनें युक्त असलेले समीपच्या गांवांतील लोक यांनीं लाल पुष्पांच्या माळा व लाल वस्त्रें धारण करून व मस्तकावर पृथ्वीचा एक तुकडा ( मोठें ढेंकुळ ) घेऊन सीमा दाखवावी. 'सामन्ता वा' येथील वाशब्दानें दुसऱ्या स्मृतींत सांगितलेल्या साक्षींचा संनिवेश केला आहे. मनूनेंही तसें सांगितलें आहे. त्यांतल्यात्यांत साक्षींचें निर्णेतृत्व मुख्य आहे. त्यांच्या अभावीं सामन्तांचें व त्यांच्याही अभावीं त्यांच्याशीं संसक्त असलेल्यांचें निर्णेतृत्व जाणावें. सामन्तादिकांच्या अभावीं सामंत, मौल, वृद्ध, उद्धृत इत्यादिकांकडून निर्णय करवावा. सामन्त हें सीमावादाच्या निर्णयाचें प्रथम साधन आहे. ते निर्दोष व गुणान्वित असावेत. मौल त्यांच्या द्विगुण असावेत. वृद्ध व उध्दृत तर त्रिगुण असावेत. असें कात्यायनानें सांगितलें आहे. त्या साक्षीदारांना व सामंतांना आपापल्या शपथा घालून सीमेचा निर्णय करावयास सांगावें. मनूक्त रक्त वस्त्रें, माळा, मस्तकावरील भूम्यंश इत्यादि विशेष विधानांचा निर्देश वर केलाच आहे. दोघांनीं मात्र सीमानिर्णय करूं नये. एकानें केला तरी चालेल. कारण नारदानें 'एकानेंही उपवास करून रक्तवस्त्रादि धारणपूर्वक सीमेचा निर्णय करावा,' असें सांगितलें आहे. 'हें कार्य फार महत्वाचें असल्यामुळें एकानें सीमेचा निर्णय करूं नये' असें म्हणून निषेध केला आहे तो अधर्मज्ञ व वादी-प्रतिवादींना मान्य नसलेल्या एकाविषयीं आहे. कारण त्या दोघांनाही मान्य असलेल्या एका धार्मिकश्रेष्ठालाही सीमानिर्णय सांगतां येतो. स्थलादि चिन्हें नसलीं तरी सुद्धां साक्षिसामन्तादिकांना सीमेचें ज्ञान होण्याचा उपाय नारदानें सांगितला आहे. 'ज्या भूमींतील चिन्हें नद्यांच्या प्रवाहादिकांनीं स्वस्थानापासून च्युत किंवा नष्ट झालीं असतील तिच्या सीमेचा निर्णय त्या प्रदेशाच्या अनुमानानें, गांवापासून यांचें क्षेत्र महत्वदंड-

परिमित पश्चिमभागीं आहे, ' इत्यादि प्रमाणावरून अथवा प्रतिवाद्याच्या समक्ष कांहीं प्रतिबंधापासून दीर्घकाल अव्याहत भोग, यावरून सीमेचा निर्णय करावा. आगम, प्रमाण, भोगकाल, नांव व भूभागाचें लक्षण--इतकीं जो जाणतो तो असल्या विवादांत साक्षी होतो, असेंही बृहस्पतीनें सांगितलें आहे. शपथ वगैरे घेववून राजानें कुलांसमक्ष या साक्षिदारादिकांस प्रश्न करावा. नंतर त्या सर्वांनीं एकमतानें सीमेचा निर्णय सांगावा. त्यांनीं ठरविलेल्या सीमेचें विस्मरण होऊं नये म्हणून एक निर्णयपत्र तयार करावें. त्यांत त्यांनीं सांगितलेलीं सर्व चिन्हें साक्षीदारांचीं नावें ल्याहावीं. पण या साक्षिसामन्तादिकांनीं सीमेवरून चालून तिचा निर्णय व केलेल्या दिवसापासून तीन पक्षांच्या म्हणजे पंचेचाळीस दिवसांच्या आंत त्यांच्यावर कांहीं राजसंबंधीं अथवा दैवी संकट न ओढवल्यास त्यांनीं केलेला निर्णय अबाधित ठरतो. कात्यायनानें तर सीमेवरून चालणें, कोशपान व पायांना स्पर्श यांना क्रमानें पंचेचाळीस दिवस, पंधरा दिवस व सात दिवस असा अवधि सांगितला आहे १५२.

उक्त अवधीच्या आंत साक्षीदारांवर कांहीं पूर्वोक्त संकट आल्यास अथवा प्रतिवादीनें त्यांच्या विरुद्ध दुप्पट व अधिक साक्षीदार आणल्यास पूर्वीचे साक्षीदार मिथ्यावादी ठरत असल्यामुळें त्यांना दंड करण्याविषयीं सांगतात—

अनृते तु पृथग्दण्ड्या राज्ञा मध्यमसाहसम् ।

मिथ्यावादित्वाची सिद्धि झाली असतां राजानें सामन्तांतील प्रत्येकाला मध्यमसाहस ( म्हणजे ५४० पण ) दंड करावा. व इतर मौल-वृद्धादिकांना प्रत्येकीं प्रथम साहस दंड करावा. वृद्धादि येथील आदिशब्दानें गोप, शाकुनिक इत्यादि दुसऱ्या सर्व आरण्यकांचें ग्रहण करावें. आतां शाकुनिकादि नेहमींच पापांत रत असल्याकारणानें त्यांचा चिन्हदर्शनामध्येंच उपयोग होतो. साक्षात् सीमेचा निर्णय करण्यांत होत नाहीं. पण चिन्ह दाखवीत असतां नाहीं जर ते मिथ्या बोलले तर त्यांना दंड करावयास सांगितलें आहे. पण हें वचन—ते अज्ञानानें खोटें बोलत असल्यास त्यांच्या दंडाचें विधान करीत आहे. पण तेंच ते जर भयानें किंवा लोभानें खोटें बोलूं लागले तर त्यांना उत्तम साहस दंड करावा. साक्षीदारांच्या भाषणांत जर भेद पडला तरीही त्यांना उत्तम साहस दंड करण्याविषयीं सांगितलें आहे. सारांश, याप्रमाणें अज्ञानादि कारणामुळें असत्य भाषण करणाऱ्या साक्षीदारादिकांस दंड करून सीमाविचार पुनः चालवावा व दुष्ट सामंतादिकांचा त्याग करून सत्सामन्तादिकांच्या संमतीनें सीमेचा निर्णय करावा. पण सामन्तादिक जाणणारे व चिन्हें हीं दोन्हीं जेव्हां नाहींत तेव्हां निर्णय कसा करावा, तें सांगतात—

अभावे ज्ञातृचिह्नानां राजा सीम्नः प्रवर्तिता ॥ १५३ ॥

सामन्तादिक जाणते लोक व वृक्षादि चिन्हें हीं दोन्हीं जेव्हां नसतील तेव्हां राजानेंच सीमा ठरवावी. दोन गांवांच्यामध्यें असलेल्या व विवादास कारण होणाऱ्या भूमीचा समविभाग करून ही याची भूमि व ही याची, असा निश्चय करावा व मध्यभागीं सीमेचीं चिन्हें

करावी. जेव्हां त्या भूमीमध्यें त्या दोघांतील एका गांवाचाच अधिक उपकार दिसतो तेव्हां राजानें त्याच गांवाला ती सर्व भूमि अर्पण करावी १५३.

आतां ही स्मृति न्यायमूलक आहे, हें दाखविण्याकरितां सांगतात—

आरामायतनग्रामनिपानोद्यानवेश्मसु ।
एष एव विधिर्ज्ञेयो वर्षाम्बुप्रवहादिषु ॥ १५४ ॥

पुष्प, फल इत्यादिकांच्या वृद्धीस कारण होणारा भूभाग, पलालादिकांकरितां विभक्त केलेला भूप्रदेश, ग्राम ( नगरादिक ), वापी, कूप इत्यादि पानीयस्थान, क्रीडावन, गृह इत्यादिकांमध्यें हाच सामंतसाक्ष्यादिलक्षणविधि जाणावा. त्याचप्रमाणें पाऊस पडून पाण्याचा प्रवाह वाहूं लागला असतां या दोघांच्या घरांच्यामधून तो जातो, याच्या जात नाहीं इत्यादि विवाद उत्पन्न झाले असतां अथवा प्रासादादिकांविषयीं विवाद लागला असतांही हाच विधि जाणावा १५४.

असो; याप्रमाणें सीमेचा निर्णय सांगून, त्या प्रसंगानेंच मर्यादा तोडणें, इत्यादि अपराधाचे दंड सांगतात—

मर्यादायाः प्रभेदे च सीमातिक्रमणे तथा ।
क्षेत्रस्य हरणे दण्डा अधमोत्तममध्यमाः ॥ १५५ ॥

अनेक क्षेत्रांची सीमा दाखविणारी जी साधारण भूमि तिला मर्यादा म्हणतात. तिचा अधिक भेद केला असतां, सीमेचें उल्लंघन करून क्षेत्र नांगरलें असतां व भय इत्यादि दाखवून दुसऱ्याच्या क्षेत्राचें हरण केलें असतां क्रमानें अधम, उत्तम व मध्यम साहस दंड करावा. क्षेत्रशब्दानें गृह, आराम इत्यादिकही घ्यावें. पण हें क्षेत्र आपलेंच आहे, अशा भ्रांतीनें जेव्हां कोणी एकाद्यानें क्षेत्रादिकांचा अपहार केला असेल तेव्हां दोनशें दंड जाणावा. मनूनेंही भय दाखवून क्षेत्रादिकांचें हरण करणारास पांचशें व अज्ञानानें हरण करणारास दोनशें दम सांगितला आहे. हरण केलेल्या क्षेत्रादिकांचें प्रमाण फारच मोठें असल्यास एकादेवेळीं उत्तम साहस दंड करावयास सांगितलें आहे. वध, सर्वस्वहरण, पुरांतून घालविणें, चिन्ह करणें, तें अंग तोडणें हा उत्तम साहस दंड होय १५५.

स्वामीची प्रार्थना करून अथवा धन देऊन त्याच्या आज्ञेनें जो परक्षेत्रांत सेतु ( बांध, धरण ), कूप इत्यादि करण्याची इच्छा करतो त्याचा क्षेत्रस्वामीनें निषेध करूं नये, असें आतां सांगतात—

न निषेध्योऽल्पबाधस्तु सेतुः कल्याणकारकः ।
परभूमिं हरन्कूपः स्वल्पक्षेत्रो बहूदकः ॥ १५६ ॥

परकीय भूमीचा नाश करणाराही सेतु ( जलाचा बांध ) कोणी घालीत असून त्यापासून थोडी पीडा व पुष्कळ उपकार होत असल्यास क्षेत्रस्वामीनें त्याचा निषेध करूं नये.

त्याचप्रमाणें कूप अल्प क्षेत्रास व्यापीत असल्यामुळें अल्पबाधा करणारा व पुष्कळ उदक देत असल्यामुळें पुष्कळ उपकारक असल्यास त्याचें व त्याचप्रमाणें वापी, पुष्करणी इत्यादिकांचें निवारण करूं नये. पण तोच सर्व क्षेत्राला व्यापीत असल्यामुळें पुष्कळ पीडा करणारा व नद्यादिकांच्या समीप असलेल्या क्षेत्रांत असल्यामुळें अल्प उपकार करणारा असल्यास त्याचा निषेध करावा, हें अर्थातच प्राप्त होतें. सेतु दोन प्रकारचा असतो. एक पाणी जाण्यासाठीं खोदावयाचा व दुसरा तें परतविण्यासाठीं प्रवाहासमोर बांधावयाचा. त्यांतील पहिल्याला खेय व दुसऱ्याला बन्ध्य असें म्हटलें आहे. जेव्हां दुसऱ्यानें निर्मिलेला सेतु फुटून नष्ट झाला असेल तेव्हां त्याच्या आप्तास पुनः त्याला संस्कार ( दुरुस्ती ) करावयाचा असल्यास त्यानें ज्याच्या क्षेत्रांत तो असेल त्याची किंवा त्याच्या वंशांतील दुसऱ्या योग्य स्वामीची किंवा निदान राजाची अनुज्ञा घेऊनच त्याला संस्कार करावा. कारण नारदानें तसें सांगितलें आहे १५६.

क्षेत्रस्वामींविषयीं वरच्या श्लोकांत सांगितलें. आतां सेतूच्या प्रवर्तकाविषयीं सांगतात—

**स्वामिने योऽनिवेद्यैव क्षेत्रे सेतुं प्रवर्तयेत् ।**
**उत्पन्ने स्वामिनो भोगस्तदभावे महीपतेः ॥ १५७ ॥**

क्षेत्रस्वामीची अथवा त्याच्या अभावीं राजाची अनुज्ञा न घेतां जो परक्षेत्रांत सेतु प्रवृत्त करतो तो त्यापासून उत्पन्न होणाऱ्या फलाचा भागीदार होत नाहीं. तर त्यापासून झालेल्या फलाचा भोग क्षेत्राचा स्वामी अथवा राजा करतो. यास्तव प्रार्थना अथवा द्रव्यदान यांच्या योगानें क्षेत्रस्वामी किंवा त्याच्या अभावीं राजा यांचीं अनुज्ञा घेऊनच परक्षेत्रांत सेतु प्रवृत्त करावा, असें याचें तात्पर्य १५७.

क्षेत्रस्वामीनें सेतूचा निषेध करूं नये, असें सांगितलें. आतां त्याचसंबंधीं आणखीं काहीं सांगतात—

**फालाहतमपि क्षेत्रं न कुर्याद्यो न कारयेत् ।**
**स प्रदाप्यः कृष्टफलं क्षेत्रमन्येन कारयेत् ॥ १५८ ॥**

जो क्षेत्रस्वामीपाशीं मी हें क्षेत्र नांगरतों, असें प्रथम कबूल करून मागून सोडतो, दुसऱ्याकडून तें नांगरवीत नाहीं तें क्षेत्र जरी वर वर नांगरलेलें असलें ( म्हणजे चांगलें बीज पेरण्यासारखें केलेलें जरी नसलें ) तरी त्या न नांगरलेल्या क्षेत्रांत जितकें फल होणें शक्य असेल तितकें ( सामन्तादिकांच्या सांगण्यावरून त्याच्या प्रमाणाचा निश्चय करून ) कर्षकाकडून क्षेत्रस्वामीस देववावें. व तें क्षेत्र पूर्वीच्या कर्षकापासून परत घेऊन दुसऱ्यास द्यावें ( त्याच्याकडून तें पेरवावें ) १५८.

इति सीमाविवादप्रकरणम् ९.

---

# अथ स्वामिपालविवादप्रकरणम् १०.



व्यवहाराचीं जीं स्थानें वर ' तेषामाद्यमृणादानं ' इत्यादिप्रकारें सांगितलीं आहेत त्यांच्यामध्यें पूर्वस्थानहेतु व उत्तरस्थानहेतुमत् ( म्हणजे कारण व कार्य ) असा त्यांचा संबंध नाहीं. म्हणून क्रमाचें उल्लंघन करून आतां अगोदर स्वामिपालविवाद सांगतात—

**माषानष्टौ तु महिषी सस्यघातस्य कारिणी ।**
**दण्डनीया तदर्धं तु गौस्तदर्धमजाविकम् ॥ १५९ ॥**

दुसऱ्याच्या शेताची नासाडी करणाऱ्या म्हशीला आठ माष, गाईला चार माष व बकऱ्या आणि मेंढ्या यांस दोन माष दंड करावा. म्हैस, गाय, बकऱ्या इत्यादिकांशीं धनाचा संबंध नसल्यामुळें त्यांच्या धन्यापासून दंड वसूल करावा. माष म्हणजे पणाचा विसावा भाग. हा दंड अज्ञानानें गुरें शेतांत शिरल्यास जाणावा. पण ज्ञानपूर्वक ( मुद्दाम, बुद्धिपुरःसर ) त्यांना दुसऱ्याच्या शेतांत घालून त्याचा नाश केल्यास गायीला अर्धापण, म्हशीला एकपण व बकऱ्यांना प्रत्येकीं पाव पण दंड करावा. गाय, म्हैस व बकऱ्या, मेंढ्या, वासरें यांना नारदानें क्रमानें एक माष, दोन माष व अर्ध माष दंड सांगितला आहे. पण तो नाश केलेलें ( खाल्लेलें ) शेत पुनः उगवण्यासारखें असल्यास समजावा १५९.

फारच मोठा अपराध घडलेला असल्यास दुप्पट दंड करण्याविषयींही कोठें कोठें सांगितलें आहे.

**भक्षयित्वोपविष्टानां यथोक्ताद्द्विगुणो दमः ।**

जर पशु परक्षेत्र खाऊन, त्यांचें निवारण न केल्यामुळें तेथेंच विश्रांति घेत बसले तर पूर्वोक्त दंडाहून दुप्पट दंड जाणावा. वत्सां ( वासरां ) सह त्यांच्याकडून शेत खाववून त्यांतच त्यांना स्वस्थ बसविल्यास चौपट दंड करावा. आतां उत्तरार्धांत निराळ्या प्रकारचें क्षेत्र व भिन्न पशू यांविषयीं सांगतात—

**सममेषां विवीतेऽपि खरोष्ट्रं महिषसमम् ॥ १६० ॥**

विवीत म्हणजे ज्याच्यामध्यें पुष्कळ तृण व काष्ठें आहेत आणि जो राखावयास घेतलेला आहे, असा भूप्रदेश. त्याचा उपघात ( नाश ) केला तरी गुरांना वर सांगितलेलाच दंड करावा. गाढव, व उंट यांना म्हशीच्या इतका दंड उक्त आहे. म्हणजे ज्या क्षेत्रांत म्हशीला जितका दंड केला जातो त्याचा नाश करणाऱ्या प्रत्येक खराला व उष्ट्रालाही तितकाच दंड करावा. कारण म्हशीप्रमाणेंच ते पशूही प्रत्येकीं शेताची नासाडी करूं शकतात व दंड अपराधाच्या अनुरोधानें करावयाचा असतो. यास्तव मूळ श्लोकांत ' खरोष्ट्रम् ' असा जरी

समाहारवाचक नपुंसकलिंगी समास केला आहे तरी त्याचा अर्थ समाहारवाचक करूं नये. कारण तो येथें विवक्षित नाहीं १६०.

दुसऱ्याच्या क्षेत्राचा विनाश करणाऱ्या गुरांच्या स्वामीला दंड सांगितला. आतां क्षेत्राच्या स्वामीला नाश पावलेल्या धान्याचें मूल्यही देववावें, असें सांगतात—

**यावत्सस्यं विनश्येत्तु तावत्स्यात्क्षेत्रिणः फलम् ।**
**गोपस्ताड्यस्तु गोमी तु पूर्वोक्तं दण्डमर्हति ॥ १६१ ॥**

ज्या क्षेत्रांतील जितकें गवत, धान्य, कडबा इत्यादि गुरांनीं खाल्लें असेल त्या क्षेत्राचें फल, तेवढ्या क्षेत्रांत इतकें धान्य होण्याचा संभव आहे, असें सामंतादिकांच्या सांगण्यावरून ठरवून क्षेत्रवानाला गुरांच्या धन्याकडून देववावें. गोपालास ( गुराख्याला ) मारावें; फल द्यावयास लावूं नये. पालकाच्या दोषामुळें धान्यादिकांचा नाश झाल्यास पूर्वोक्त दंडासह गोपालकालाच ताडनाचा दंड करावा. कारण अशा प्रसंगीं गोस्वामीला दंड न करितां पालकालाच तो करण्याविषयीं सांगितलें आहे. गोस्वामीच्या अपराधानें धान्याचा नाश झाल्यास त्याला नुस्ता दंड मात्र करावा. गोपालाप्रमाणें ताडन करूं नये. क्षेत्राचें फल मात्र सर्व अवस्थेंत गोस्वामीलाच देणें भाग आहे. कारण क्षेत्रांतील सस्यादि खाऊन पुष्ट झालेल्या गाई, म्हशी इत्यादिकांनीं अधिक दूध दिल्यास त्याचा उपभोग धन्यालाच मिळत असतो. त्यामुळें क्षेत्राच्या फळाचा भागीदार तोच होतो, गोप नाहीं. गुरांनीं खाऊन उरलेलें गवत वगैरे गायीच्या स्वामीनेंच घ्यावें. कारण मध्यस्थांच्या द्वारां ठरलेलें मूल्य देऊन जणुं काय त्यानें तें विकतच घेतलेलें असतें. नारदानेंही तसें करण्याविषयीं सांगून पलाल ( गवत, कडबा ) गोस्वामीला, व धान्य कार्षकाला ( शेत नांगरणाराला ) द्यावें, असें आणखी अधिक सांगितलें आहे १६१.

आतां विशेष क्षेत्राविषयीं अपवाद सांगतात—

**पथि ग्रामविवीतान्ते क्षेत्रे दोषो न विद्यते ।**
**अकामतः कामचारे चौरवद्दण्डमर्हति ॥ १६२ ॥**

मार्गावर किंवा गांवाच्या समीप असलेल्या क्षेत्रांत व गावाच्या राखलेल्या कुरणाजवळच्या क्षेत्रांत शिरून ( जाणून बुजून शिरवून नव्हे ) गुरांनीं नास केल्यास त्यांत गोपाळ व गोमी ( गुरांचा धनी ) या दोघांचाही कांहीं अपराध नसतो. तो अशावेळीं त्यांना दंड होणें व खाल्लेल्या धान्याचें मूल्य द्यावयास लागणें, हीं दोन्हीं अनुचित असल्यामुळें तीं होऊं नयेत म्हणून येथें त्यांचा कांहीं दोष नाहीं, असें प्रतिपादन केलें आहे. पण तेंच-त्या गुरांना मुद्दाम ( बुद्धिपुरःसर ) असल्या शेतांतही घालून त्याचा नाश केल्यास चोराला जशाप्रकारचा दंड होतो तशाप्रकारच्या दंडास तो पात्र होतो; पण हें वरील दंडाभाव सांगणारें वचनही ज्या शेताला कुंपण वगैरे कांहीं नसतें त्याविषयीं आहे, असें जाणावें. कारण मनूनें ' यत्रापरिवृतं धान्यं० ' ( अ. ८ श्लो. २३८ ) या वचनांत अनाच्छादित

शेताविषयींच दंडाचा अभाव सांगितला आहे. अर्थात् मार्गावर असलेलें, गावासमीपचें व कुरणाजवळचें शेत कुंपणानें आच्छादित केलेलें असल्यास व त्यांत गुरें शिरल्यास अथवा मुद्दाम घातल्यास दोष आहेच व त्यामुळें वर सांगितल्याप्रमाणें दंड होतोच. वृत्ति ( वय, कुंपण ) घालण्याविषयीं अ. ८ श्लोक २३९. यांत त्यानें ( मनूनें ) च सांगितलें आहे १६२.

आतां कांहीं विशेष पशूंना दंडाचा अभाव सांगतात—

**महोक्षोत्सृष्टपशवः सूतिकागन्तुकादयः ।**
**पालो येषां न ते मोच्या दैवराजपरिप्लुताः ॥ १६३ ॥**

महावृष ( पोळ ) वृषोत्सर्गादि विधानानें किंवा देवतोद्देशानें सोडलेले पशु, विऊन दहा दिवस न झालेली गाय वगैरे व आपल्या कळपांतून चुकून आलेलें आगंतुक गुरूं, यांना सोडावें. ( म्हणजे त्यांनीं दुसऱ्याच्या शेतांत शिरून तें जरी खाल्लें तरीं त्यांना दंड करूं नये.) ज्यांना पालकच नाहीं अशा दैवी किंवा राजकृत संकटांनीं पीडलेल्या गुरांनीं शेत खाल्ल्यास त्यांनाही दंड करूं नये. श्लोकांतील ' आगन्तुकादयः ' येथील आदिशब्दानें हत्ती व घोडे यांचें ग्रहण करावें. कारण. उशनसानें ' हत्ती, घोडे, काणा व कुबडा पशु, ज्यांच्या अंगावर डागून चिह्न केलें आहे असे पशु, आगंतुक, व्यालेली, फळणास आलेली गाय, उत्सवांत व श्राद्धकालीं आलेलीं गाय, इत्यादि हे सर्व पशु प्रजापालक असल्यामुळें अदंड्य आहेत, ' असें सांगितलें आहे. वर सोडलेल्या पशूंचा जो निर्देश केलेला आहे तो दृष्टान्ताकरितां आहे, असें जाणावें. कारण वस्तु सोडलेल्या पशूंना मुळीं धनींच नसल्यामुळें ते दंड्यच होत नाहींत. यास्तव जसे सोडलेले पशु अदंड्य तसेच महोक्षादिक अदंड्य होत अशी त्याची योजना करावी १६३.

गोस्वामीविषयीं सांगितलें. आतां गोपाविषयीं सांगतात—

**यथार्पितान्पशून्गोपः सायं प्रत्यर्पयेत्तथा ।**
**प्रमादमृतनष्टांश्च प्रदाप्यः कृतवेतनः ॥ १६४ ॥**

गायींच्या स्वामीनें प्रातःकाळीं गुरें जितकीं व जशीं मोजून दिलीं असतील तितकीं च तशींच सायंकाळीं गोपालानें तीं स्वामीस मोजून परत द्यावीं. ज्याला वेतन ( पगार ) देऊन ठेवलें असेल अशा पशुपालानें कांहीं पशू मेल्यास किंवा सांडल्यास; त्याचें मूल्य स्वामीला द्यावें. नारदानें गोपालाचें वेतन निश्चित केलें आहे. गोपालाला प्रत्येक वर्षी शंभर गायींची एक पाडी व दोनशेंची एक नुक्तीच व्यालेली गाय, ही राखणावळ द्यावी. व प्रत्येक आठव्या दिवशीं दूध द्यावें. प्रमादानें नाश पावलेल्या पशूंचें स्पष्टीकरण मनूनें ' नष्टं जग्धंच कृमिभिः० ' ( अ. ८ श्लो. २३२ ) यांत स्पष्ट केलें आहे. चोरांनीं बलात्कारानें हरण केल्यासही गुराख्याला तें भरून द्यावयास नको. कारण मनूनें ' विक्रम्य तु हृतं चोरैः० ' ( अ. ८ श्लो. २३३ ) या वचनांत तसें सांगितलें आहे. पण दैव किंवा राजसंकटानें नष्ट झालेल्या पशूचे कर्णादि अवयव गोपालानें धन्यास आणून दाखवावे. कारण मनूनें पुढच्याच ( श्लो. २३४ ) श्लोकांत तसें म्हटलें आहे १६४.

पालदोषविनाशे तु पाले दण्डो विधीयते ।
अर्धत्रयोदशपणः स्वामिनो द्रव्यमेव च ॥ १६५ ॥

पालका ( गुराख्या ) च्या दोषानें पशु नष्ट झाल्यास त्यानें साडेतेरा पण दंड द्यावा. व स्वामीला नष्ट पशूचें मध्यस्थानीं ठरविलेलें मूल्य द्यावें. हा श्लोक दंडाचें परिमाण मात्र अधिक सांगत आहे. बाकीचें सर्व पूर्वी होऊन गेलेंच आहे १६५.

आतां गाईचाच विषय चाललेला असल्यामुळें गोप्रचार सांगतात—

ग्रामेच्छया गोप्रचारो भूमी राजवशेन वा ।
द्विजस्तृणैधःपुष्पाणि सर्वतःसर्वदा हरेत् ॥ १६६ ॥

गांवातील लोकांच्या इच्छेनें, भूमीचें अल्पत्व-महत्त्व इत्यादिकांच्या अपेक्षेनें अथवा राजाच्या इच्छेनें गोप्रचार निश्चित करावा. म्हणजे गायींना चरण्याकरितां कांहीं एक भाग न नांगरतां तसाच राखून ठेवावा. तृण-काष्ठ इत्यादिकांच्या अभावीं ब्राह्मणानें गाय, अग्नि व देवता यांच्याकरितां तृण, काष्ठ व पुष्पें पाहिजेत तेथून आणावीं. आपल्या भूमींतून आणल्याप्रमाणें त्याला कोणी प्रतिबंध करीत नाहीं. पण फळें मात्र कुंपण न घातलेल्या वृक्षांचींच त्यांनीं तोडावीं. ज्यांनां कुंपण घातलें आहे अशा वृक्षांचीं फळें विचारल्यावाचून तोडल्यास ब्राह्मणही दोषी होतो. पण हें म्हणणें परिग्रह केलेल्या ( कोणाच्या तरी मालकीच्या ) क्षेत्रादिकांविषयींच आहे. कारण कोणीच ज्याचा परिग्रह केलेला नाहीं अशा वृक्षादिकांचीं फळादि काढण्याचा अधिकार ब्राह्मणाहून इतरांनाही आहे. कारण अपरिग्रहित वस्तूचा नुस्ता परिग्रह केल्यानेंच परिग्रहकर्त्याच्या स्वत्वाची सिद्धि होते. धन्याला न विचारतां तृण, काष्ठ, पुष्प, फळ इत्यादि घेणाराचा हात तोडावा, इत्यादि जें सांगितलें आहे तें द्विजास सोडून इतरांविषयीं. आपत्ति नसलेल्या वेळीं उपयोगार्थ, किंवा गाई, बैल इत्यादिकांस सोडून इतर गुरांविषयीं आहे असें जाणावें १६६.

गायीं, म्हशीं, इत्यादिकांना बसणें, राहणें, इत्यादि सुकर व्हावें म्हणून हें आणखी सांगतात—

धनुःशतं परीणाहो ग्रामे क्षेत्रान्तरं भवेत् ।
द्वे शते खर्वटस्य स्यान्नगरस्य चतुःशतम् ॥ १६७ ॥

कोणताही गांव व त्यांतील लोकांचीं शेतें यांमध्यें सभोंवार धनुःशतपरिमित प्रदेश धान्य न पेरतां तसाच ठेवावा. त्यांत शेत पेरूं नये. ज्या गांवाच्या सभोंवार पुष्कळ कांटेरी असतात त्याच्या सभोंवार दोनशें धनुःप्रमाण भूमि राखून ठेवावी. पुष्कळ लोकांनीं भरलेल्या नगरादिकांतील गुरांकरितां चारशें धनुःप्रमाण अन्तर सभोंवार ठेवावें १६७.

इति स्वामिपालविवादप्रकरणम् १०.

---

# अथास्वामिविक्रयप्रकरणम् ११.



आतां येथून अस्वामिविक्रय नावाचें व्यवहारपद आरंभितात. त्याचें लक्षण नारदानें—भूमींत पुरून ठेवलेलें ( अथवा ठेवीचें ) परधन काढून घेऊन अथवा सांडलेलें धन शोधून काढून अथवा चोरून तें त्याच्या धन्याच्या न कळत विकणें, याला अस्वामिविक्रय म्हणतात असें सांगितलें आहे. यास्तव आतां त्याविषयीं योगीश्वर म्हणतात—

स्वं लभेतान्यविक्रीतं क्रेतुर्दोषोऽप्रकाशिते ।
हीनाद्रहो हीनमूल्ये वेलाहीने च तस्करः ॥ १६८ ॥

आपलें द्रव्य दुसऱ्या कोणी अस्वामीनें विकलेलें जर आढळलें तर स्वामीनें तें घ्यावें. कारण अस्वामीनें विकलेल्या वस्तूवर ती घेणाराचें स्वामित्व येत नाहीं—कारण अस्वामी-पासून विकत घेणें, हा स्वत्वाचा हेतूच नव्हे. असल्या विक्रयाबरोबर दत्त व आहित यांचें ही ग्रहण करावें. म्हणजे अस्वामीनें विकलेल्या वस्तूवर जसें, तसेंच त्यानें दिलेल्या अथवा ठेवलेल्या वस्तूवरही घेणाऱ्याचें स्वामित्व येत नाहीं. म्हणूनच ' अस्वामीनें केलेलें दान आधि हीं स्थिर नसतात. तर तीं बदलूं शकतात ' असें म्हटलें आहे. पण विकत घेणा-रानें विकत घेतलेली वस्तू प्रकट न करितां गुप्त ठेवल्यास तो स्वतः दोषी होतो. कारण ' ज्याच्यापाशीं तसली वस्तु असणें शक्य नाहीं अशा हीन पुरुषापासून, अयोग्य वेळीं ( रात्रीं वगैरे ), एकांतात ( चोरून, छपवून ) योग्य किंमतीपेक्षां पुष्कळ न्यून किंमतीस एकादी वस्तु विकत घेणारा पुरुष तस्कर ठरतो ' असें सांगितलें आहे. अर्थात् तो चोरा-प्रमाणें दंडास पात्र होतो. पण तीच त्यानें बाजारांत सर्वांसमक्ष योग्य मूल्य देऊन घेतल्यास त्यांत त्याला कांहीं दोष लागत नाहीं १६८.

ज्याच्यावर त्या वस्तूच्या स्वामीनें अभियोग केला आहे, अशा विकत घेणारानें पुढें काय करावें, तें सांगतात--

नष्टापहृतमासाद्य हर्तारं ग्राहयेन्नरम् ।
देशकालातिपत्तौ च गृहीत्वा स्वयमर्पयेत् ॥ १६९ ॥

' दुसऱ्याचें सांडलेलें अथवा चोरून आणलेलें धन क्रयादिकांच्या योगानें प्राप्त करून घेऊन ( म्हणजे विकत घेऊन ) त्या चोरून आणून विकणाराला चोरांस धरणारांकडून ( पोलिसांकडून ) धरवावें. त्यानें आपल्या शुद्धीकरितां व राजाच्या दंडास पात्र होऊं नये म्हणून हें करावें. ' पण तो विकणारा ( चोर ) कोणालाहीं माहीत नाहीं अशा स्थानीं गेल्यास किंवा कांहीं दिवसांनीं मेल्यास मूळच्या विकणाराला ( म्ह० ज्याच्यापासून ते घेतलें होतें त्याला ) दाखवितां येणें अशक्य झाल्याकारणानें विकत घेणारानें स्वतःच तें धन

त्याच्या स्वामीला परत द्यावें म्हणजे तेवढयानेंच तो शुद्ध होतो, ' असें श्रीशंकराचार्यानें या श्लोकाचें व्याख्यान केलें आहे; पण तें बरोबर नाहीं. कारण असें व्याख्यान केल्यास ' विक्रेतुर्दर्शनाच्छुद्धिः ' या वचनानेंच तें सिद्ध असल्यामुळें त्यावर पुनरुक्त दोष येतो. यास्तव आम्ही याचें व्याख्यान निराळेंच करितों. तें असें--ज्याचें धन नष्ट झालें आहे त्यास उद्देशून केलेला ' नष्टापहृत॰ ' इत्यादि हा उपदेश आहे. सांडलेलें किंवा अपहार करून नेलेलें आपलें धन विकत घेणाऱ्याच्या हातांत आहे, असें दिसतांच ( म्ह॰ तें ज्याच्यापाशीं आढळेल ) त्याला नगररक्षकाकडून धरवावें. पण स्थानपालादी समीप नसल्यास त्यांना कळण्यापूर्वींच तो पळून जाईल अशी भीति वाटत असल्यास त्याला स्वतः धरून स्थानरक्षकांच्या स्वाधीन करावें १६९.

धन हरण करणाराला धरविलें असतां काय करावें, तें सांगतात--

विक्रेतुर्दर्शनाच्छुद्धिः स्वामी द्रव्यं नृपो दमम् ।
क्रेता मूल्यमवाप्नोति तस्माद्यस्तस्य विक्रयी ॥ १७० ॥

अस्वामीपासून विकत घेणाराला स्थानपालाकडून धरविलें असतां त्यानें जर ' मी हें चोरलें नाहीं, तर या अमक्यापासून तें अमूक किंमतीला विकत घेतलें आहे, ' असें म्हणून त्या विकणाराला दाखविलें तर तेवढयानेंच तो शुद्ध होतो. त्यानंतर त्याच्यावर अभियोग करूं नये. नंतर त्यानें दाखविलेल्या विकणाराशीं नाष्टिकाचा (ज्याचें धन गेलें असेल त्याचा ) विवाद सुरू होतो. कारण बृहस्पतीनें तसें सांगितलें आहे. त्या वादांत अस्वामिविक्र्याचा (यानें दुसऱ्याची वस्तु विकली असा ) जर निश्चय झाला तर त्या सांडलेल्या अथवा चोरीस गेलेल्या धनाचा जो विक्रयी त्याच्यापासून नाष्टिक स्वामीनें आपलें धन घ्यावें. राजानें अपराधानुरूप त्यास दंड करावा व विकत घेणारानें आपलें मूल्य परत घ्यावें. पण तो दुसऱ्या देशीं गेलेला असल्यास त्यांतील अंतराचें परिणाम करून त्याला जाऊन आणावयास योग्य काल द्यावा. परंतु तो कोठें गेला आहे हें न कळल्यामुळें त्याला आणणें अशक्य झाल्यास असली वस्तु विकत घेणारानें ' मीं ती योग्य मूल्य देऊन विकत घेतली आहे ' असें दिव्य, साक्षीदार यांच्या योगानें सिद्ध करावें. असें केल्यानेंच तो शुद्ध होतो. तो अशी आपली शुद्धि करावयास किंवा ज्याच्यापासून ती वस्तु घेतली होती त्या मूळाला दाखवावयास असमर्थ झाल्यास राजदंडास पात्र होतो. मनूनेंही असेंच सांगितलें आहे १७०.

अस्वामीनें विकलेलें धन स्वामीला मिळतें, असें सांगितलें. आतां तें मिळविण्याची इच्छा करणारानें काय करावें तें सांगतात--

आगमेनोपभोगेन नष्टं भाव्यमतोऽन्यथा ।
पञ्चबन्धो दमस्तस्य राज्ञे तेनाविभाविते ॥ १७१ ॥

त्या धनाच्या स्वामीनें रिक्थ, क्रम इत्यादि आगम व उपभोग यांच्या योगानेंही हें द्रव्य माझें आहे; पण तें अशा अशा रीतीनें नष्ट झालें ( सांडलें ) किंवा चोरीला गेलें; हेंही

सिद्ध करावें. पण तो त्याविषयीं योग्य प्रमाण देण्यास असमर्थ झाल्यास नष्ट द्रव्याचा पंचमांश दंड राजानें त्याच्यापासून घ्यावा. याचा क्रम असा—प्रथमतः स्वामीनें हें आपलें धन अशा अशा कारणानें सांडलें, ही गोष्ट सिद्ध करावी. त्यानंतर विकत घेणारानें चोरीच्या आरोपापासून आपण मुक्त व्हावें व दिलेली किंमत परत मिळावी म्हणून ज्याच्यापासून तें विकत घेतलें होतें त्या विकणारास आणावें; पण त्याला आणण्यास तो असमर्थ झाल्यास, आपल्यावरील दोष घालविण्याकरितां दिव्यादिकांच्या योगानें विक्रीची सिद्धि करावी. आणि तें द्रव्य ज्याचें त्यास परत द्यावें १७१.

चोराला लपविणाराविषयीं सांगतात—

हृतं प्रनष्टं यो द्रव्यं परहस्तादवाप्नुयात् ।
अनिवेद्य नृपे दण्ड्यः स तु षण्णवतिं पणान् ॥ १७२ ॥

जो कोणी चोरीस गेलेलें अथवा सांडलेलें धन चोरादिकांच्या हातांत आहे, असें कळतांच दर्पानें ' यानें माझें अमुक द्रव्य चोरून नेलें ' असें राजाला न कळवितांच स्वतः त्याच्यापासून परत घेतो त्याला शाण्णव पण दंड करावा. कारण चोराला छपवून ठेवल्यामुळें तो दोषी होतो १७२.

राजपुरुषांनीं आणलेल्या धनाविषयीं सांगतात—

शौल्किकैः स्थानपालैर्वा नष्टापहृतमाहृतम् ।
अर्वाक्संवत्सरात्स्वामी हरेत परतो नृपः ॥ १७३ ॥

करादि शुल्क वसूल करणाऱ्या अधिकाऱ्यांनीं अथवा स्थानरक्षकांनीं कोणाचें सांडलेलें अथवा चोरीस गेलेलें धन परत मिळवून राजापाशीं आणून द्यावें. नंतर त्या दिवसापासून एका वर्षाच्या आंत नाष्टिक ( स्वामी ) राजापाशीं येऊन तें आपलें आहे, असें सिद्ध करूं शकल्यास तें परत घेतो. पण एक वर्ष उलटतांच राजानें तें घ्यावें. पण अधिकारी पुरुषांनीं असलें सांपडलेलें धन आणून दिलें असतां राजानें सर्व प्रजाजनांमध्यें त्याविषयीं घोष करवून एक वर्षपर्यंत त्याचें रक्षण करावें. मनूनें ' प्रनष्टस्वामिकं द्रव्यं० ' ( अ. ८. श्लो. ३० ) या वचनांत राजानें असलें धन तीन वर्षें आपल्यापाशीं सुरक्षितपणें ठेवावें. तितक्या अवधींत त्याचा स्वामी आल्यास त्याला तें द्यावें. पण त्यानंतर स्वतः घ्यावें, असें म्हणून निराळाच प्रकार सांगितला आहे. पण तो विद्या व आचरण यांनीं संपन्न असलेल्या ब्राह्मणाविषयीं होय. तें स्वामीला परत देतांना राजानें रक्षण केल्याबद्दल पहिल्या वर्षीं त्या धनाचें द्वादशांश मूल्य. दुसऱ्या वर्षीं दशांश मूल्य व तिसऱ्या वर्षीं षष्ठांश मूल्य त्याच्यापासून घ्यावें. याचा विस्तार पूर्वीं ( श्लोक ३३ ) बराच केला आहे १७३.

आतां या भागग्रहणाचा विशेष द्रव्याविषयीं अपवाद सांगतात—

पणानेकशफे दद्याच्चतुरः पञ्च मानुषे ।
महिषोष्ट्रगवां द्वौ द्वौ पादं पादमजाविके ॥ १७४ ॥

एका खुरानें युक्त असलेला अश्वादि पशु सांडून तो राजाधिकाऱ्याला सांपडला असतां त्याच्या स्वामीनें राजाला त्याच्या रक्षणाबद्दल चार पण द्यावे. मनुष्यजातींच्या प्राण्याच्या रक्षणाबद्दल पांच पण द्यावे. प्रत्येक बकरी व मेंढीबद्दल पाव पण द्यावा. व गाय, म्हैस, उंट यांच्या रक्षणाबद्दल प्रत्येकीं दोन पण द्यावे. 'अजाविकं' असा समाहारद्वंद्व जरी केलेला असला तरी 'पादं पादं' असें पुढें द्विरुक्त पद असल्यामुळें प्रत्येक बकरीला व मेंढीला किंवा त्यांच्या नरांना पाव पण मूर्तीच उक्त आहे, असें होतें १७४.

इति अस्वामिविक्रयप्रकरणम् ११.

---

# अथ दत्ताप्रदानिकप्रकरणम् १२.



आतां दानसंज्ञक व्यवहारपदाचें कथन करावयाचें आहे. विहित व अविहित अशा दोन मार्गांचा आश्रय केल्यामुळें दत्तानपाकर्म व दत्ताप्रदानिक अशीं त्याला दोन नांवें प्राप्त झालीं आहेत. नारदानें त्यांचें स्वरूप असें सांगितलें आहे. ज्या वादांत अविहित मार्गाचा आश्रय करून द्रव्य दिलें जातें व तेंच पुनः परत घेण्याची इच्छा केली जाते तें दत्ताप्रदानिक व्यवहारपद होय. पण विहितमार्गाचा आश्रय केल्यामुळें अर्थात् तेंच प्रतिपक्षभूत झालेलें व्यवहारपद दत्तानपाकर्म या नांवास पात्र होतें. दत्ताचें आप्रदान म्हणजे दिलेल्या वस्तूचें पुनः परत घेणें, व दत्ताचें अनपाकर्म म्हणजे दिलेल्या वस्तूचें पुनः परत न घेणें, याअर्थी हे दोन शब्द रूढ झाले आहेत. तेंच दानसंज्ञक द्विविध व्यवहारपद देय, अदेय, दत्त व अदत्त असें चार प्रकारचें आहे. जें अनिषिद्ध दानक्रियेस योग्य असतें तें देय; स्वतःचें नसल्यामुळें अथवा शास्त्रानें निषेध केलेला असल्यामुळें जें देण्यासारखें नसतें तें अदेय. जें प्रकृतिस्थ (सावधान) पुरुषानें दिलेलें असल्यामुळें परत करण्यासारखें नसतें तें दत्त व जें परत घेण्यास योग्य असतें तें अदत्त होय.

आतां त्या चार प्रकारच्या दानांचें संक्षेपतः निरूपण करण्यासाठीं योगीश्वर म्हणतात—

स्वं कुटुंबाविरोधेन देयं दारसुतादृते ।
नान्वये सति सर्वस्वं यच्चान्यस्मै प्रतिश्रुतम् ॥ १७५ ॥

सर्व कुटुंबाशीं विरोध न येईल अशा रीतीनें (म्ह० कुटुंबाचें पोषण करून राहिलेलें) आपलें धन द्यावें. कुटुंबाचें भरण करणें हें अत्यंत अवश्य आहे. कारण 'वृद्धौ च मातापितरौ०' (अ. ८ श्लो. ३५) या वचनांत 'वृद्ध आईबाप, साध्वी भार्या, व लहान पुत्र; यांचें शंभर अकृत्य करूनहि पोषण करावें, असें मनूनें सांगितलें आहे,' येथील कुटुंबाविरोधेन या शब्दानें कुटुंबाच्या पोषणास प्रतिबंध करणारें धन अदेय आहे,

असें सुचविलें व 'स्वं दद्यात्' या वचनानें स्व नसलेलें अन्वाहित ( एकाची वस्तु दुसऱ्यापाशीं ठेवणें ), याचितक ( मागून, उसनें आणलेलें ), आधि ( ठेव ), साधारण ( ज्यांवर अनेकांचें स्वामित्व आहे ), व निक्षेप ( स्वरूप व संख्या न सांगतां बंद करून ठेवलेलें भांडें ), हें पांची प्रकारचें धन अदेय आहे, असें सांगितलें आहे. मिळून सहा प्रकारचें अस्वभूत धन अदेय आहे. नारदानें 'पुत्र व स्त्री, दुसऱ्याला देईन म्हणून म्हटलेलें व संतान असल्यास आपलेंच सर्वस्व' असें आणखी तीन प्रकारचें अदेय सांगितलें आहे. अर्थात् त्याच्या मतीं आठ प्रकारचें अदेय ( देतां न येण्यासारखें ) आहे. पण हें पुढचें तीन प्रकारचें स्व नुस्तें अदेय आहे. पूर्वीच्या पांच प्रकारच्या धनाप्रमाणें त्यावर स्वत्वच नाहीं, असें नव्हे. कारण पुत्र–स्त्री, सर्वस्व व दुसऱ्यास देईन म्हणून कबूल केलेलें यावर स्वामीचें स्वत्व नाहीं, असें कधींच होत नाहीं. अन्वाहितादिकांचें स्वरूप पूर्वी ( श्लोक ६७) वर्णिलें आहे. असो; येथवर 'स्वं कुटुंबाविरोधेन देयं' एवढ्या श्लोकांशाचें व्याख्यान झालें. आतां पुत्र व स्त्री यांना जरी स्वत्व असलें तरी त्यांचें दान होत नाहीं, असें 'दारसुतादृते' या श्लोकांशानें सांगतात—स्त्री व पुत्र यांस सोडून बाकीचें धन द्यावें, स्त्रीपुत्रांना देऊं नये. तसेंच पुत्रपौत्रादि वंश विद्यमान असतांना सर्व धन देऊं नये. कारण 'पुत्रांस उत्पन्न करून, त्यांचा उपनयनादि संस्कार करावा व त्यांची वृत्ति ( जीविकेचा उपाय ) योजून ठेवावी' असें स्मृतिवचन आहे. त्याचप्रमाणें जें सुवर्णादि धन दुसऱ्यास देण्याचें कबूल केलें असेल तें भलत्याच कोणाला देऊं नये १७५.

याप्रमाणें देय व प्रसंगोपात्त अदेयही सांगून प्रतिग्रह करणारानें उघड उघड सर्वांसमक्ष तें घ्यावें, असें सांगतात—

**प्रतिग्रहः प्रकाशः स्यात्स्थावरस्य विशेषतः ।**

प्रतिग्रह करणें यालाच प्रतिग्रह म्हणतात. तो विवादाचें निराकरण करण्यास्तव उघड उघड करावा. विशेषतः स्थावराचें तर सर्वांसमक्षच ग्रहण करावें. कारण सुवर्णादिकांप्रमाणें तें आपल्यापाशीं असल्याचें दाखवितां येणें अशक्य आहे. ( यास्तव त्याचा प्रतिग्रह उघड करावा.) असो; याप्रमाणें प्रासंगिक सांगून आतां प्रकृतविषयाचें अनुसरण करीत म्हणतात—

**देयं प्रतिश्रुतं चैव दत्वा नापहरेत्पुनः ॥ १७६ ॥**

धर्माकरितां जें ज्याला देण्याचें कबूल केलें असेल तें त्याला अवश्य द्यावेंच. पण तो धर्मापासून भ्रष्ट झालेला नसेल तर आणि धर्मच्युत झाला असल्यास कबूल केलेलेंही देऊं नये. कारण गौतमानें तसें सांगितलें आहे. न्याय मार्गानें जें दिलें असेल तें साती प्रकारचें धन पुनः परत घेऊं नये. पण अन्यायानें दिलेलें सोळा प्रकारचें धनही अर्थात् परत घ्यावें. नारदानें सात प्रकारचें दत्त व सोळा प्रकारचें अदत्त सांगून त्याचें वर्णनही असें केलें आहे. १ विकत घेतलेल्या वस्तूचें मूल्य देणें, २ भृत्याला वेतन देणें, ३ संतुष्ट होऊन स्तुतिपाठक; नट इत्यादिकांस पारितोषिक देणें, ४ स्नेहानें कन्या–पुत्र इत्यादिकांस भूषणादि करून देणें, ५ उपकार करणारास प्रत्युपकारार्थ देणें. ६ विवाहाकरितां कन्येच्या आप्तांना

दिलेलें धन, ७ व अनुग्रहाकरितां धर्मरूपानें दिलेलें असें सात प्रकारचें दत्त आहे. तें परत घेतां येत नाहीं. १ भयानें कैद करणाऱ्या राजपुरुषांस दिलेलें, २ क्रोधानें सूड उगवण्यासाठीं दुसऱ्यास दिलेलें, ३ पुत्रवियोगादिकामुळें झालेल्या दुःखाच्या भरांत देऊन टाकलेलें, ४ आपल्या कार्यास होणाऱ्या प्रतिबंधाचें निवारण करण्यासाठीं अधिकाऱ्यांस उत्कोचरूपानें ( लांच ) दिलेलें, ५ थट्टेनें दिलेलें, ६ अदलाबदल करणें, ७ कपट करून दिलेलें ( म्हणजे शंभर देऊन त्याच्याकडून सहस्राविषयीं परिभाषा करून घेणें ), ८ सोळा वर्षांच्या आंतील वयाच्या बालकानें दिलेलें, ९ लोकवाद न जाणणाऱ्या मूढानें दिलेलें, १० पुत्र, दास इत्यादि स्वतंत्र नसलेल्या पुरुषानें दिलेलें, ११ रोगानें व्याकुळ झालेल्या पुरुषानें दिलेलें, १२ मद्यादि मदोत्पादक द्रव्याच्या सेवनानें मत्त झालेल्या व १३ वेड लागलेल्या पुरुषानें दिलेलें, १४ हा माझें काम करील, अशा उलट लाभाच्या इच्छेनें दिलेलें, १५ चतुर्वेदज्ञ नसतां मी तसा आहें, असें सांगणारास दिलेलें, आणि १६ मी यज्ञ करणार आहें, असें सांगून, दुसऱ्यापासून द्रव्य मिळवून तें द्यूतादिकांत खर्च करणारास दिलेलें, असें हें सोळाप्रकारचें दिलेलें धनही अदत्त आहे. कारण तें परत घेतां येतें. रोगार्त पुरुषानें धर्मकार्यावांचून इतर कार्यांत दिलेलें अदत्त होतें. कारण ' स्वस्थ किंवा आर्त पुरुषानें धर्माकरितां देऊं केलेलें धन न देतांच जर परलोकगमन केलें तर त्याच्या पुत्राकडून तें देववावें ' असें कात्यायनाचें वचन आहे. मनूनेंही ' पुढें ओढवणाऱ्या विशेष प्रकारच्या ज्या उपाधीमुळें आधि, विक्रय, दान, प्रतिग्रह इत्यादि व्यवहार केले असतील त्या ( उपाधि ) टळल्या असतां पूर्व व्यवहार बदलावे ' असें संक्षेपतः सांगितलें आहे. जो सोळाही प्रकारचें अदत्त घेतो व अदेय देतो त्या दोघांनाही नारदानें दंड सांगितला आहे १७६.

इति दत्ताप्रदानिकप्रकरणम् १२.

———

# अथ क्रीतानुशयप्रकरणम् १३.



आतां क्रीतानुशयाचें वर्णन करतो. त्याचें स्वरूप नारदानें असें सांगितलें आहे. कोणी एकादा एकादी वस्तु मूल्य देऊन विकत घेतो, पण मागून ती त्याला न आवडल्यामुळें परत देण्याची इच्छा होते. अशा अवस्थेंत उद्भवणाऱ्या वादास क्रीतानुशयविवादपद असें म्हणतात. त्याविषयीं त्यानेंच पुनः असें म्हटलें आहे. ज्या दिवशीं वस्तु विकत घेतली असेल त्याच दिवशीं ती अविकृत ( जशीच्या तशी ) परत करावी. पण तसें न करितां दुसऱ्या दिवशीं ती परत करावयाची झाल्यास मूल्यांतून तिसावा भाग त्यानें कमी घ्यावा. तिसऱ्या दिवसापासून पुढें ती त्याचीच होते. म्हणजे दुसऱ्या दिवसानंतर त्यानें पश्चात्ताप करूं नये. हें विधान बीजास सोडून बाकीच्या सर्व उपभोगादिकांमुळें क्षय पावणाऱ्या

वस्तूंविषयीं आहे, असें जाणावें. बीजादि क्रयामध्यें परत करण्याचा विधि निराळाच सांगितला आहे. तो असा–

दशैकपञ्चसप्ताहमासत्र्यहार्द्धमासिकम् ।
बीजायोवाह्यरत्नस्त्रीदोह्यपुंसां परीक्षणम् ॥ १७७ ॥

व्रीही, गहूं इत्यादि बीज, लोखंडादिक धातु, बैल, घोडा इत्यादि गाड्यास जुंपावयाचे पशु, मोत्यें, प्रवाळ इत्यादि रत्नें, दासी, म्हैस-गाय इत्यादि दूध देणारीं गुरें व दास यांचा क्रमानें दहा दिवस, एक दिवस, पांच दिवस, एक आठवडा, महिना, तीन दिवस व अर्धा महिना, हा परीक्षा काल सांगितला आहे. अर्थात् बीजादिकांचे उक्त कालापर्यंत परीक्षण करावें व त्याच्या आंत तें चांगलें नाहीं असें कळून पश्चात्ताप झाल्यास तें बीजादि पण्य परत देऊन आपलें मूल्य घ्यावें. पण उक्त कालानंतर तो व्यवहार बदलूं शकत नाहीं. मनूनें 'क्रीत्वा विक्रीय वा०' ( अ. ८ श्लोक २२२ ) या वचनांत दहा दिवसांच्या आंत विकत घेतलेली वस्तु परत द्यावयास व घ्यावयास सांगितलें आहे; पण तें वर सांगितलेल्या लोहादि पदार्थांस सोडून इतर उपभोगानें नाश पावणाऱ्या, ( कमी होणाऱ्या ) गृह, क्षेत्र, वाहन, शयन, आसन, इत्यादिकांविषयीं आहे. परंतु हें सर्व परीक्षा न करितां घेतलेल्या वस्तूंविषयीं आहे. चांगली परीक्षा करून, पुनः परत करावयाचें नाहीं, अशा निश्चयानें जें घेतलेलें असेल तें परत करतां येत नाहीं १७७.

आतां सुवर्णादिकांचीही परीक्षा सांगतात—

अग्नौ सुवर्णमक्षीणं रजते द्विपलं शते ।
अष्टौ त्रपुणि सीसे च ताम्रे पञ्च दशायसि ॥ १७८॥

अग्नींत घालून तापविलेलें सोनें कमी होत नाहीं. यास्तव भूषण करण्यासाठीं सोनाराला तें जितकें दिलें असेल तितकेंच परत घ्यावें. पण त्यानें तें कमी ( क्षीण ) करून दिल्यास जितकें क्षीण झालें असेल तितकें राजानें त्याच्याकडून धन्यास देववून शिवाय दंड करावा. शंभर पल रुपें अग्नींत तापविलें असतां त्यांतील दोन पलभार रुपें कमी होतें. जस्त व शिसें प्रत्येकीं शंभर पलांमागें आठ पलभार क्षीण होतें. तांब्यांतील पांच व लोखंडांतील दहा पलभार धातु क्षीण होते. जस्त व तांबें यांच्यापासून कांसें निर्माण केलेलें असल्यामुळें त्यांच्या अनुरोधानें कांशाच्या क्षयाचें अनुमान करावें. पण त्या त्या धातूंचा याहून अधिक क्षय करणाऱ्या शिल्प्यास दंड करावा १७८.

कंबलादि कांहीं वस्त्रांच्या प्रमाणांत वृद्धि किती होते, तेंही सांगतात—

शते दशपला वृद्धिरौर्णे कार्पाससौत्रिके ।
मध्ये पञ्चपला वृद्धिः सूक्ष्मे तु त्रिपला मता ॥ १७९ ॥

लोंकरीच्या स्थूल दोऱ्यानें केलेल्या कंबलादिकांमध्यें शतपलामागें दहा पल वृद्धि होते. कापसाच्या स्थूल तंतूंनीं निर्मिलेल्या वस्त्रादिकांचीही अशीच वृद्धि होते, असें जाणावें. मध्यम तंतूंनीं केलेल्या वस्त्रांची दरशेंकडा पांच पल वृद्धि होते. व सूक्ष्म सूत्रानें विणलेल्या वस्त्रांत शेंकडा तीन पल वृद्धि होते. पण ही सर्व वृद्धि न धुतलेल्या ( कोऱ्या ) वस्त्रांची आहे १७९.

आतां दुसऱ्या द्रव्यांविषयीं विशेष सांगतात—

कार्मिके रोमबद्धे च त्रिंशद्भागः क्षयोमतः ।
न क्षयो न च वृद्धिश्च कौशेये वल्कलेषु च ॥ १८० ॥

सर्व वस्त्र विणून झाल्यावर ज्यांत चक्र, स्वस्तिक, इत्यादि विचित्र रचना स्पष्ट दिसते त्याला कार्मिक ( चित्रकर्मानें निर्मित ) वस्त्र म्हणतात. प्रावारादिकामध्यें ( गालिच्या-सारख्या वस्त्रांत मधून केंस घालून विचित्र रचना करीत असतात, अशा वस्त्रांकरिता जितकें सूत्र दिलें असेल त्याचा तिसावा भाग क्षीण होतो. रेशमाच्या व झाडांच्या त्वचांची सूत्रें काढून केलेल्या वस्त्रांची वृद्धि अथवा ऱ्हास होत नाहीं. यास्तव कोष्टयास सूत जितकें भार दिलें असेल तितकें भार वस्त्र त्याच्यापासून तोलून परत घ्यावें १८०.

पण द्रव्यें अनंत असल्यामुळें प्रत्येकाची वृद्धि व क्षय सांगतां येणें अशक्य आहे. यास्तव सामान्यतः त्यांच्या ज्ञानाचा उपाय सांगतात—

देशं कालं च भोगं च ज्ञात्वा नष्टे बलाबलम् ।
द्रव्याणां कुशला ब्रूयुर्यत्तद्दाप्यमसंशयम् ॥ १८१ ॥

शाण ( वस्त्र विणावयासाठीं दिलेलें शाणाचें सूत, ) क्षौम ( रेशीम ), इत्यादि कमी झालें असतां द्रव्यास त्यांची क्षय-वृद्धि इत्यादि जाणण्यांत निपुण असलेल्या लोकांनीं देश, काल, उपभोग व नष्ट द्रव्याची सारासारता यांचा विचार करून जेवढा ऱ्हास निश्चित केला असेल तेवढा राजानें शिल्पी ( कोष्टया ) कडून धन्याला देववावा १८१.

इति क्रीतानुशयप्रकरणम् १३.

---

# अथ अभ्युपेत्याशुश्रूषाप्रकरणम् १४.



आतां अभ्युपेत्याशुश्रूषा नावाचें दुसरें विवादपद सांगण्यासाठीं आरंभ करितात. जो शुश्रूषा करण्याचें मान्य करून पुढें ती करीत नाहीं त्याला अभ्युपेत्य-अशुश्रूषा असें म्हणतात, असें नारदानें त्या विवादपदाचें स्वरूप सांगितलें आहे. आज्ञेप्रमाणें आचरण करणें, याला शुश्रूषा म्हणतात. शुश्रूषक पांच प्रकारचा असतो. १ शिष्य, २ अन्तेवासी, ३ भृतक, ४ अधि-कर्मकृत व ५ दास. यांतील पहिल्या चौघांना कर्मकर असें म्हणतात. ते शुभकर्म करणारेच असतात. पांचवा दास मात्र घराच्या बाहेरील अपवित्र प्रदेश झाडणें, सडक साफ करणें,

विष्ठामूत्रादि काढून टाकणें ( अर्थात् बालक व रोगी यांची ) इत्यादि अशुद्ध कर्मे करतो. वेदविद्यार्थ्यास शिष्य म्हणतात. शिल्प शिकण्यासाठीं जवळ राहणारास अन्तेवासी म्हणतात. वेतन घेऊन जो काम करतो तो भृतक, व काम करणाऱ्यांवर देखरेख करणारा अधिकर्मकृत होय. त्यांतील भृतक तीन प्रकारचा आहे. आयुध धारण करून त्याच्या योगानें काम करणारा उत्तम, शेतकी करणारा मध्यम, व भार वाहणारा अधम होय. दास पंधरा प्रकारचा असतो. १ आपल्याच घरांत दासीपासून झालेला गृहजात, २ मूल्य देऊन घेतलेला क्रीत, ३ पितृधनसंबंधानें प्राप्त झालेला पित्र्यादिदास, ४ दुर्भिक्षासारख्या भयंकर प्रसंगीं दास करण्याकरितां अन्नादि देऊन वांचविलेला मरणरक्षित, ५ स्वामीनें धन घेऊन गहाण ठेवलेला, ६ ऋण फेडल्यामुळें दास झालेला ( ऋणदास ), ७ युद्धांत जिंकून दास केलेला ( युद्धदास ), ८ या विवादांत मी हरल्यास तुझा दास होईन, असें म्हणून विवादांत प्रवृत्त झालेल्या पुरुषाला जिंकून दास केलेला जितदास, ९मी तुझा दास आहें, असें म्हणून दास्य स्वतः पत्करणारा, १० संन्यासाश्रमापासून च्युत झालेला, ११ मी इतके दिवस तुझा दास झालों आहें, असें कबूल करविलेला, १२ सर्वदा अन्नाकरितां दास्य स्वीकारून राहिलेला, १३ गृहदासीच्या लोभानें तिच्याशीं विवाह करून दास बनलेला. १४ प्रतिग्रहानें प्राप्त झालेला व १५ स्वतःला विकून घेणारा, असे ते पंधरा प्रकार होत. मनूनें ' ध्वजाहृतो भक्त दासो० ' इत्यादि श्लोकांत ( अ. ८ श्लो. ४१५ ) सात प्रकारचेच दास सांगितले आहेत. पण तें वचन त्यांचें दासत्व प्रतिपादन करण्यास प्रवृत्त झालें आहे. दासांची इतकीच संख्या आहे असें सांगण्यासाठीं प्रवृत्त झालेलें नाहीं १८१.

असो, या पांच प्रकारच्या शुश्रूषकांतील शिष्याची वृत्ति पूर्वी आचाराध्यायांतील ब्रह्मचारी प्रकरणांत सांगितली आहे. अधिकर्मकृत व भृतक यांची पुढें वेतनादानप्रकरणीं सांगूं. आतां अगोदर दास व अन्तेवासी यांचा विशेष धर्म सांगण्यासाठीं योगीश्वर म्हणतात—

**बलाद्दासीकृतश्चोरैर्विक्रीतश्चापि मुच्यते ।**
**स्वामिप्राणप्रदो भक्तत्यागात्तन्निष्क्रयादपि ॥ १८२ ॥**

बलात्कारानें धरून दास केलेला, चोरांनीं पळवून आणून विकलेला आणि ' अपि ' असा शब्द असल्यामुळें आहित व दत्त ( ओलीस ठेवलेला व दिलेला ) यांना स्वामीनें सोडून द्यावें. स्वामीनें न सोडल्यास राजानें सोडवावें. त्याचप्रमाणें जो दास चोरव्याघ्रादिकांनीं प्रतिबंध केलेल्या स्वामीला सोडवितो व त्याचे प्राण वाचवितो त्यालाहि सोडवावें. दास्यांतून मुक्त होण्याचें हें कारण सर्व दासांस एकसारखेंच लागू आहे. भक्तदासादिकांच्या दास्यनिवृत्तीचें स्वतंत्र कारणही सांगितलेलें आहे. जसें -अनाकालभृत व भक्तदास, दास्यांमध्यें प्रवृत्त झाल्यापासून जितकें अन्न खाल्लें असेल तितकें सर्व परत दिल्यानें ( भक्तत्यागात् ) दास्यांतून मुक्त होतात. आहितदास व ऋणदास जितकें धन घेऊन स्वामीनें ठेवलें असेल अथवा जितकें धन देऊन धनिकानें ऋणदासाला धनकोपासून सोडविलें असेल तितकें तें सर्व व्याजासह परत दिल्यानें ( तन्निष्क्रयादपि ) ते दोघेही मुक्त होतात. नारदानें याहून कांहीं

निराळेंच सांगितलें आहे. अनाकालभृतदास गाईचें जोडपें देऊन मुक्त होतो. कारण दुर्भिक्षाचे वेळीं जें खाल्लेलें असतें त्याची फेड नुसत्या कामानें होत नाहीं. भक्तदास खाल्लेलें अन्न परत दिल्यानें मुक्त होतो. गहाण ( ओलीस ) ठेवलेला दास त्याच्या स्वामीनें धन देऊन सोडविल्यासच दास्यमुक्त होतो. व ऋणी सव्याजऋण देऊनच मुक्त होतो. त्याचप्रमाणें मी तुझा आहें, असें म्हणून समीप आलेला, युद्धप्राप्त व पणानें जिंकलेला, इतक्या प्रकारचे दास आपल्यासारखेंच काम करणारा पुत्रादि प्रतिनिधि दिल्यानें मुक्त होतात. कृतक व दासीच्या अनुरागानें आलेला हे दास क्रमानें ठरलेला काल संपतांच व दासीशीं संबंध तुटतांच मुक्त होतात. परंतु गृहजात, क्रीत, लब्ध, दायप्राप्त व स्वतःला विकणारा या दासांची सुटका स्वामीचे प्राण वाचविणें, किंवा त्याचा अनुग्रह या साधारण कारणांवाचून होत नाहीं. कारण त्यांच्या सुटकेचें विशेष कारण सांगितलेलें नाहीं. दासाची सुटका या क्रमानें करावी. जो कोणी आपल्या दासाला संतुष्ट चित्तानें दास्यमुक्त करण्याची इच्छा करीत असेल त्याच्या खांद्यावरून भरलेला मातीचा घट घेऊन तो फोडावा. त्याच्या मस्तकावर गंध, अक्षता, पुष्पें व जल घालावें व ' हा अदास आहे ' असें तीनदां म्हणून त्याला पूर्वाभिमुख जाऊं द्यावें १८२.

परंतु प्रव्रज्यावसिताचा मोक्ष होत नाहीं, असें सांगतात—

**प्रव्रज्यावसितो राज्ञो दास आमरणान्तिकम् ।**

प्रव्रज्या म्हणजे संन्यास त्यापासून अवसित व प्रच्युत ( भ्रष्ट ) झालेल्या पुरुषानें प्रायश्चित्ताचा स्वीकार न केल्यास तो राजाचाच दास होतो. मरण हाच त्याच्या दासत्वाच्या मोक्षाचा उपाय आहे. त्यापूर्वी त्याची सुटका होत नाहीं. आतां वर्णाच्या अपेक्षेनें दासत्वाची व्यवस्था सांगतात—

**वर्णानामानुलोम्येन दास्यं न प्रतिलोमतः ॥ १८३ ॥**

ब्राह्मणादि वर्णांचें आनुलोम्यानें दास्य होतें म्हणजे ब्राह्मणाचे क्षत्रियादि, क्षत्रियाचे वैश्य व शूद्र आणि वैश्याचा शूद्रच दास होतो प्रातिलोम्यानें म्हणजे उलट क्रमानें त्यांना दासभाव येत नाहीं. पण स्वधर्म सोडणाऱ्या संन्याशाला मात्र प्रातिलोम्यानेंही दासत्व येतें. नारदानेंही तसें सांगितलें आहे १८३.

आतां अन्तेवासीचे धर्म सांगतात—

**कृतशिल्पोऽपि निवसेत्कृतकालं गुरोर्गृहे ।**
**अन्तेवासी गुरुप्राप्तभोजनस्तत्फलप्रदः ॥ १८४ ॥**

अन्तेवासीनें गुरूच्या येथें ठरलेल्या वेळेपर्यंत ( म्हणजे आयुर्वेदादि शिकण्याकरितां मी अमुक वर्षेपर्यंत तुमच्या येथें राहीन, असें म्हणून अंगीकार केलेल्या काळापर्यंत ) वास करावा. चार वर्षें हा उक्त काल आहे. पण त्यापूर्वीच अपेक्षित शिल्पविद्या प्राप्त झाली तरी गुरुपासून भोजन घेऊन त्या शिल्पाचें फल आचार्यास देत वास करावा. याविषयीं नारदानें

आणखी अधिक विशेष सांगितला आहे. आपलें शिल्प शिकण्याची इच्छा करणाऱ्या मुलानें बांधवांच्या आज्ञेनें कालाचा निश्चय करून आचार्यापाशीं निवास करावा. गुरूनें आपल्या येथें त्याला भोजन घालून शिकवावें. त्यानें त्याच्याकडून दुसरें कांहीं काम करवूं नये. पुत्राप्रमाणें त्याचें रक्षण करावें. पण आचार्य शिकवीत असतां व तो कोणत्याहि दोषानें रहित असतां जो त्याचा त्याग करतो त्या शिष्याला ताडन व बंधन ह्या शिक्षा करून त्याच्यापाशींच रहावयास लावावें. शिक्षण संपल्यावरही ठरलेला काल होईतों अन्तेवासीनें गुरुगृहींच रहावें. तेथें तो जें शिल्पकर्म करील त्याचें फल आचार्यानें घ्यावें. निवासकाल पूर्ण झाला असतां आचार्यास प्रदक्षिणा करून व त्याचें अनुमोदन घेऊन शिक्षित अन्तेवासीनें स्वगृहीं परत यावें १८४.

इति अभ्युपेत्याशुश्रूषाख्याविवादप्रकरणम् १४.

---

# अथ संविद्व्यतिक्रमप्रकरणम् १५.



आतां संविद्व्यतिक्रम सांगतात. त्याचें लक्षण नारदानें व्यतिरेकमुखानें सांगितलें आहे. पाखंडी, नैगम ( पाशुपत ) इत्यादिकांच्या स्थितीला ( मर्यादेला ) समय म्हणतात. अर्थात् पारिभाषिक धर्मानें राहणें, याला समय म्हणावें. त्याचा व्यतिक्रम ( उल्लंघन ) न करणें, ( त्याचें परिपालन करणें ) याला समयानपाकर्म म्हणतात. पण तेंच-त्याचें ( समयाचें-कराराचें ) उल्लंघन करूं लागलें असतां विवादपद होतें. यास्तव आतां त्याचा आरंभ करण्याकरितां सांगतात—

**राजा कृत्वा पुरे स्थानं ब्राह्मणान्न्यस्य तत्र तु ।**
**त्रैविद्यं वृत्तिमद्ब्रूयात्स्वधर्मः पाल्यतामिति ॥ १८५ ॥**

राजानें आपल्या नगरांत ( किल्ल्यांत वगैरे ) स्थान ( शुभ्र गृहादिक ) करून, त्यांत ब्राह्मणांची स्थापना करून आणि त्या ब्राह्मणांच्या समूहाला वेदत्रयसंपन्न आणि भूमि, द्रव्य इत्यादिकानीं संपन्न करून तुम्ही वर्णाश्रमविहित ( श्रुति-स्मृतिप्रोक्त) स्वधर्माचें अनुष्ठान करा, असें सांगावें १८५.

याप्रमाणें राजानें नियुक्त केलेल्या त्यांनीं काय करावें, तें सांगतात—

**निजधर्माविरोधेन यस्तु सामयिको भवेत् ।**
**सोऽपि यत्नेन संरक्ष्यो धर्मो राजकृतश्च यः ॥ १८६ ॥**

श्रौत-स्मार्त-धर्माचा घात न करितां त्या ब्राह्मणांनीं समयानें संपादन केलेला ( प्राप्त ) गोप्रचार ( गाई चरविणें ), उदकरक्षण, देवगृहपालन, इत्यादि प्रकारचा नियमही मोठ्या

यत्नानें राखावा. त्याचप्रमाणें राजानें आपल्या धर्माशीं विरोध न येईल अशा रीतीनें—जितके वाटसरू येतील तितक्यांना भोजन द्यावें. आमच्या शत्रूच्या राष्ट्राकडे घोडे, उंट इत्यादिकांस जाऊं देऊं नये,—इत्यादि प्रकारचा जो धर्म नियत केला असेल त्याचेंही रक्षण करावें १८६.

याप्रमाणें समयधर्माचें परिपालन करावें, असें सांगून त्याचें उल्लंघन इत्यादि केल्यास दंड सांगतात—

**गणद्रव्यं हरेद्यस्तु संविदं लंघयेच्च यः ।**
**सर्वस्वहरणं कृत्वा तं राष्ट्राद्विप्रवासयेत् ॥ १८७ ॥**

जो ग्रामादि जनसमूहाच्या साधारण ( समायिक ) धनाचा अपहार करतो, समूहानें केलेल्या अथवा राजानें केलेल्या संवित्‌चें ( समयाचें, नियमाचें ) जो उल्लंघन करतो त्याच्या सर्वस्वाचा अपहार करून राजानें त्याला आपल्या राष्ट्रांतून घालवून द्यावें. पण हा दंड त्याचा त्याविषयीं फारच आग्रह असल्यास जाणावा. कारण मनूनें असल्या समयातिक्रमाच्या अपराधास ( अ. ८ श्लोक २१९, २० ) राष्ट्रांतून घालविणें, चार सुवर्ण, सहा निष्क, व शतमान अशा चार निरनिराळ्या शिक्षा सांगितल्या आहेत. त्यांचा जाति, शक्ति इत्यादिकांच्या अपेक्षेनें उपयोग करावा १८७.

त्यांनीं आणखीं हें करावें—

**कर्तव्यं वचनं सर्वैः समूहहितवादिनाम् ।**

कोणत्याही समूहाचे जे नायक असतील व समूहाचें हित होईल, तेंच बोलण्याचें ज्यांचें शील आहे त्यांचें वचन इतरांनीं ( समूहांतील प्रत्येकानें ) मानावें ( त्याप्रमाणें वर्तन करावें ). पण त्यांनीं तसें न केल्यास त्याला दंड सांगतात—

**यस्तत्र विपरीतः स्यात्स दाप्यः प्रथमं दमम् ॥ १८८ ॥**

पण त्या समूहामध्यें जो कोणी समूहहितवाद्याच्या वचनांस प्रतिबंध करीत असेल त्याला राजानें प्रथमसाहस दंड करावा १८८.

आणि राजानें त्या गणवानाशीं असें वर्तन करावें—

**समूहकार्य आयातान्कृतकार्यान्विसर्जयेत् ।**
**सदानमानसत्कारैः पूजयित्वा महीपतिः ॥ १८९ ॥**

समूहाचें कार्य करून घेण्याकरितां आपल्यापाशीं आलेल्या गणनायकांचें कार्य तत्काल करून, तें संपतांच दान, मान व सत्कार यांच्या योगानें राजानें त्यांना संतुष्ट करावें व आनंदानें त्यांचें विसर्जन करावें १८९.

समूहाच्या कार्याकरितां दिलेल्या वस्तूचा अपहार करणाराविषयीं सांगतात—

**समूहकार्यप्रहितो यल्लभेत तदर्पयेत् ।**
**एकादशगुणं दाप्यो यद्यस्मै नार्पयेत्स्वयम् ॥ १९० ॥**

महाजनांनीं समूहाच्या कार्याकरितां राजापाशीं पाठविलेल्या पुरुषाला सुवर्ण, वस्त्र इत्यादि जें कांहीं प्राप्त झालें असेल तें त्यानें स्वतः न मागतांच महाजनांस निवेदन करावें. पण तसें न करितां त्यानें त्याचा अपहार करण्याचा प्रयत्न केल्यास त्याला त्याच्या अकरापट दंड करावा १९०.

कार्यांचा विचार करणारे अशा प्रकारचे करावे, असें सांगतात—

**धर्मज्ञाः शुचयोऽलुब्धा भवेयुः कार्यचिन्तकाः ।**
**कर्तव्यं वचनं तेषां समूहहितवादिनाम् ॥ १९१ ॥**

श्रौतस्मार्त धर्मज्ञ, बाह्य व आभ्यन्तर शौचयुक्त व द्रव्याविषयीं अलुब्ध असे कार्यचिन्तक करावे. इतरांनीं समूहाचें हितच सांगणाऱ्या त्यांचें वचन करावें. हें आदरार्थ पुनः सांगितलें आहे १९१.

आतां त्रैविद्यद्विजांकरितां प्रतिपादिलेल्या धर्माचा श्रेण्यादिकांचे ठायीं अतिदेश करितात—

**श्रेणिनैगम पाखण्डिगणानामप्ययं विधिः ।**
**भेदं चषां नृपो रक्षेत्पूर्ववृत्तिं च पालयेत् ॥ १९२ ॥**

एक पण्य व शिल्प यांवर निर्वाह करणाऱ्या लोकांच्या समूहास श्रेणी म्हणतात. वेद आप्तप्रणीत असल्यामुळें त्याचें प्रामाण्य जे मानितात ते नैगम. ( अर्थात् पाशुपतादिक ). जे वेदांचें प्रामाण्यच मान्य करीत नाहींत ते पाखंडी ( नग्न सौगतादिक ). गण म्हणजे समूह. एकाच कर्मावर उपजीविका करणाऱ्या आयुधीयादि चारी प्रकारच्या लोकांचा हाच ( १८६ व्या श्लोकापासून सांगितलेला ) धर्मविधि आहे. त्यांच्या धर्मव्यवस्थेचें रक्षण राजानें करावें व पूर्वी संपादन केलेल्या वृत्तीचेंही पालन करावें १९२.

इति संविद्व्यतिक्रमप्रकरणम् १५.

---

# अथ वेतनादानप्रकरणम् १६.



आतां वेतनाचें अनपाकर्म ( न देणें ) या विवादपदाचा आरंभ करितात. त्याचें स्वरूप नारदानें असें सांगितलें आहे. ज्या विवादपदांमध्यें भृत्यांच्या वेतनाच्या पुढें सांगितलेल्या दानादानविधिक्रमाचा विचार असतो त्याला वेतनाचें अनपाकर्म म्हणतात. आतां त्याचाच निर्णय सांगतात—

**गृहीतवेतनः कर्म त्यजन् द्विगुणमावहेत् ।**
**अगृहीते समं दाप्यो भृत्यै रक्ष्य उपस्करः ॥ १९३ ॥**

ज्यानें वेतन घेतलें आहे अशा भृत्यानें आपलें अंगीकृत कर्म सोडल्यास ( न केल्यास ) राजानें वेतनाच्या दुप्पट धन स्वामीला देववावें; पण तो जेव्हां स्वीकारलेलें कर्म वेतन घेतलेलें नसतांनाच सोडतो तेव्हां त्याच्याकडून स्वामीला जितकें वेतन ठरलें असेल तितकेंच देववावें; दुप्पट देववूं नये. किंवा त्याला मान्य केलेलें वेतन देऊन त्याच्याकडून बलात्कारानें कर्म करवावें. कारण नारदानें तसें सांगितलें आहे. त्याचें वेतन कर्मास आरंभ करण्यापूर्वी, आरंभ केल्यावर मध्येंच अथवा तें संपल्यावर द्यावें. त्या भृत्यांनीं धन्याचें नांगर, जूं, बैल इत्यादि साहित्य यथाशक्ति राखावें. ( त्याचा नाश करूं नये. ) कारण, कर्मसामग्री नष्ट झाल्यावर कृष्यादि ( शेत नांगरणें ) इत्यादि कार्य होणें अशक्य आहे १९३.

आतां वेतनाचा निश्चय न करितां कर्म करविल्यास त्याविषयीं सांगतात—

**दाप्यस्तु दशमं भागं वाणिज्यपशुसस्यतः ।**
**अनिश्चित्य भृतिं यस्तु कारयेत्स महीक्षिता ॥ १९४ ॥**

जो स्वामी ( वैश्य ) गायींचा धनी किंवा शेतकरी वेतनाचा निश्चय न करितांच भृत्याकडून कर्म करवितो त्याला त्या ( व्यापारांत, पशूंच्या पालनांत किंवा शेतांत ) कर्मांपासून जो लाभ झाला असेल त्याचा दहावा भाग राजानें भृत्याला देववावा १९४.

आतां आज्ञेवाचूनच करणाराविषयीं सांगतात—

**देशं कालं च योऽतीयाल्लाभं कुर्याच्च योऽन्यथा ।**
**तत्र स्यात्स्वामिनश्छन्दोऽधिकं देयं कृतेऽधिके ॥ १९५ ॥**

जो भृत्य दर्पादिकांमुळें व्यापार, क्षेत्र इत्यादिकांस उचित असलेल्या देशाचें व कालाचें उल्लंघन करतो अथवा त्या उचित देशीं व कालींच खर्च वगैरे फार करून लाभ कमी करतो त्या भृत्याला वेतन देण्यास स्वामीची इच्छाच समर्थ आहे. म्हणजे त्याला योग्य वाटेल तितकेंच वेतन द्यावें. सर्व वेतन देऊं नये. पण देशकालादिकांचें चांगलें ज्ञान असल्यामुळें जेव्हां तो भृत्य अधिक लाभ करतो तेव्हां स्वामीनें त्याला पूर्वी ठरलेल्या वेतनाहूनही अधिक वेतन द्यावें १९५.

अनेक भृत्यांच्या योगानें साध्य होणाऱ्या कर्मांत भृति देण्याचा प्रकार सांगतात—

**यो यावत्कुरुते कर्म तावत्तस्य तु वेतनम् ।**
**उभयोरप्यसाध्यं चेत्साध्ये कुर्याद्यथाश्रुतम् ॥ १९६ ॥**

ज्याचें वेतन ठरलें आहे, असें एकच कर्म दोघेजण करूं लागले असतां व्याधि, किंवा अशाच दुसऱ्या एकाद्या प्रतिबंधानें व्याकुळ झाल्यामुळें दोघेही ( मूळांत अपिशब्द असल्यामुळें पुष्कळही ) तें करण्यास असमर्थ झाल्यास, त्यांच्या हातून तें शेवटास न गेल्यास, त्यांतील जेवढें कर्म ज्या भृत्यानें केलें असेल तेवढ्यास अनुरूप असें मध्यस्थानें ठरविलेलें वेतनच त्यास द्यावें. दोघांनाही ( अर्थात् पुष्कळांना, सर्वांनाही ) सारखेंच देऊं नये. तसेंच थोडथोडें काम

केल्यास वेतन किती द्यावयाचें तें सांगितलेलें नसल्यामुळें, तें मुळींच द्यावयास नको, असेंही समजूं नये. पण तें कर्म साध्य असून दोघांनीं संपविल्यास जेवढें वेतन कबूल केलें असेल तेवढें त्या दोघांस द्यावें. अर्थात् त्यांतील एकाद्यालाच सर्व वेतन अथवा दोघांनाही कामाप्रमाणें मध्यस्थांनीं ठरविलेलें वेतन देऊं नये १९६.

आयुधीय व भारवाहक यांविषयीं सांगतात—

अराजदैविकं नष्टं भाण्डं दाप्यस्तु वाहकः ।
प्रस्थानविघ्नकृच्चैव प्रदाप्यो द्विगुणां भृतिम् ॥ १९७ ॥

भांड म्हणजे मजुरी देऊन वाहून न्यावयासाठीं स्वाधीन केलेली कोणतीही वस्तु, ( गठडी वगैरे ) तें भांड राजा व दैव यांच्या योगानें प्राप्त झालेल्या कोणत्याही संकटावांचून अर्थात् त्या वाहकाच्या अज्ञानामुळें, प्रमादानें नष्ट झाल्यास, तुटल्यास, फुटल्यास, राजानें तें त्या ( वाहका ) च्याकडून स्वामीस भरून देववावें. जो विवाहादिकांकरितां मंगलयुक्त दिवशीं निघणाऱ्या ( प्रस्थान करणाऱ्या ) पुरुषाच्या प्रस्थानोपयोगीं कर्मांचा पूर्वीं अंगीकार करून ( म्हणजे त्यावेळीं हें असुक कर्म मी करीन असें कबूल करून ) आयत्यावेळीं मी करीत नाहीं, असें म्हणतो व त्याच्या प्रस्थानास विघ्न आणतो त्याला अशा प्रसंगीं दुप्पट वेतन, हाच दंड करावा. ( ठरलेल्या भृतीच्या दुप्पट दंड स्वामीस देववावा ) कारण त्यानें अत्यंत उत्कर्षास कारण होणाऱ्या कर्मास प्रतिबंध ( निरोध ) केलेला असतो १९७.

प्रक्रान्ते सप्तमं भागं चतुर्थं पथि संत्यजन् ।
भृतिमर्धपथे सर्वां प्रदाप्यस्त्याजकोऽपि च ॥ १९८ ॥

प्रस्थानाचा निश्चय झाल्यावर जो स्वीकारलेलें कर्म सोडतो त्याच्याकडून वेतनाचा ( भृतींचा, मोबदल्याचा, मजूरीचा ) सातवा भाग स्वामीस देववावा. वरील वचनांत दुप्पट दंड व या वचनांत सप्तमांश दंड सांगितला आहे. पण त्यामुळें पूर्वोत्तर विरोध येतो, असें समजूं नये. कारण जो अगदीं निघावयाच्या मंगल दिवशीं आयत्यावेळीं ' नाहीं, ' म्हणून स्वीकारलेलें काम सोडतो त्याला दुप्पट दंड आणि दुसरा भृत्य मिळाविणें अथवा मिळणें शक्य आहे व तो मिळविण्यास अवसरही आहे, अशा प्रसंगीं जो स्वीकृत भृतिकर्म सोडतो त्याला सप्तमांश दंड सांगितलेला आहे. पण जो मार्ग चालावयास लागल्यावर मध्येंच काम सोडतो त्याला भृतीचा चतुर्थांश दंड करावा. अर्धा मार्ग चालून गेल्यावर तेथें जो काम सोडतो त्याला सर्व भृति हाच दंड करावा. जो स्वामी कर्म न सोडणाऱ्या भृत्याकडून पूर्वोक्त प्रदेशीं तें सोडवितो त्या ( स्वामी ) च्याकडूनही भृत्यास पूर्वोक्त सप्तम भागादिक दंड देववावा. पण हें सर्व भृत्य व स्वामी अव्याधित असल्यास जाणावें. कारण मनूनें तसें सांगितलें आहे. ( पहा मनुस्मृति अ. ८ श्लोक २१५ ) पण तो भृत्य कांहीं रोग झाला असतां अंतरलेले दिवस

मोजून ते जेव्हां भरून काढतो तेव्हां त्याला वेतन मिळतेंच. (पहा मनु. अ. ८ श्लोक २१६. व्याधि निघून गेल्यावर अथवा स्वस्थ असतांनाही आळसादिकामुळें जो आरंभलेलें कार्य स्वतः किंवा दुसऱ्याकडून संपवीत नाहीं, त्याला वेतन देऊं नये. (पहा मनु. अ. ८. श्लोक २१७.) १९८.

इति वेतनादानप्रकरणम् १६.

---

# अथ द्यूतसमाह्वयप्रकरणम् १७.



आतां द्यूतसमाह्वय नांवाच्या प्रकरणाचा आरंभ करितों. पाश, चर्मपट्टिका, शलाका (दातांच्या लांब व चौकोनीं) व हत्ती, घोडा, रथादि या प्राणरहित क्रीडासाधनांनीं पण लावून क्रीडा करणें, त्याचप्रमाणें कोंबडे, पारवे इत्यादि पक्षी, मल्ल, बकरे, रेडे इत्यादि प्राणी यांच्या योगानें पण लावून क्रीडा करणें, या दोन्ही प्रकारच्या क्रीडांना क्रमानें द्यूत व समाह्वय म्हणतात. हें द्यूतसमाह्वय नांवाचें विवादपद आहे. नारदाच्या या सांगण्याप्रमाणेंच मनूनेंही सांगितलें आहे. (मनु. अ. ९ श्लो. २२३.) त्यांतील द्यूतसभेच्या अधिकाऱ्यांची वृत्ति सांगतात—

ग्लहे शतिकवृद्धेस्तु सभिकः पञ्चकं शतम् ।
गृह्णीयाद्धूर्तकितवादितराद्दशकं शतम् ॥ १९९ ॥

परस्परांच्या संमतीनें कितवांनीं (जुगाऱ्यांनीं) ठरविलेला जो पण त्याला ग्लह म्हणतात. त्याच्या आश्रयानें असलेली शतपरिमित अथवा त्याहून अधिक वृद्धि ज्याला झालेली असते तो शतिकवृद्धि. तसल्या धूर्त कितवापासून सभिकानें आपल्या वृत्त्यर्थ (निर्वाहाकरितां) शंभरामागें पांच पण घ्यावे. (म्हणजे ज्यानें पण जिंकला असेल त्यानें त्या पणाचा विसावा अंश सभिकाला द्यावा.) द्यूत करणारांना कितव म्हणतात. त्यांच्या निवासाकरितां ज्यानें सभा केलेली असते तो सभिक. ज्यानें फांसे वगैरे खेळावयाचीं सर्व उपकरणें सज्ज करून ठेवलेलीं असतात व त्यावर मिळविलेल्या द्रव्यावर जो उपजीविका करतो त्याला सभापती म्हणतात. ज्या कितवाची वृद्धि शंभरापेक्षां कमी असते त्यानें जिंकलेल्या द्रव्याचा दहावा भाग सभिकानें घ्यावा १९९.

याप्रमाणें ज्याची वृत्ति ठरली आहे अशा सभिकानें काय करावें तें सांगतात—

स सम्यक्पालितो दद्याद्राज्ञे भागं यथाकृतम् ।
जितमुद्ग्राहयेज्जेत्रे दद्यात्सत्यं वचः क्षमी ॥ २०० ॥

याप्रमाणें ज्याची वृत्ति ठरली आहे अशा द्यूताधिकाऱ्याचें रक्षण राजानें धूर्त कितवापासून करावें. व या सभिकानेंही मान्य केलेला अंश राजाला द्यावा. त्याचप्रमाणें जिंकलेलें

द्रव्य बंधकग्रहण ( जामीन, वस्तु ठेवणें ) आसेध ( अटक ) इत्यादि उपायांनीं पराजित पुरुषापासून वसूल करावें व त्याच्यापासून काढून घेतलेलें तें सभिकानें जिंकणारास द्यावें. त्याचप्रमाणें क्षमावान् होऊन द्यूत करणारांच्या विश्वासार्थ सत्य वचन द्यावें २००.

पण सभिक जेव्हां द्यूतसंबंधीं धन देवविण्यास समर्थ नसतो तेव्हां राजानें तें देववावें, असें सांगतात—

**प्राप्ते नृपतिना भागे प्रसिद्धे धूर्तमण्डले ।**
**जितं ससभिके स्थाने दापयेदन्यथा नतु ॥ २०१ ॥**

प्रसिद्ध ( अर्थात् गुप्त नव्हे ) तर राजानें नेमलेल्या अध्यक्षानें युक्त अशा ससभिक कितवसमाजांत, सभिकानें राजाचा भाग दिला असतां, राजानें जिंकलेला निर्विवाद पण जिंकणारास देववावा. अन्यथा ( म्हणजे तो समाज गुप्त असल्यास अथवा राजाचा भाग त्याला दिलेला नसल्यास ) त्यानें द्यूतांत जिंकलेला पण देववूं नये २०१.

जय व पराजय यांविषयीं वाद लागला असतां त्याच्या निर्णयाचा उपाय सांगतात—

**द्रष्टारो व्यवहाराणां साक्षिणश्च त एव हि ।**

राजानें द्यूतव्यवहारांचे प्रेक्षक ( सभ्य ) त्या कितवांनाच नेमावें. अर्थात् अशा व्यवहारप्रेक्षकांविषयीं ‘ श्रुताध्ययनसंपन्नाः ’ इत्यादि दुसरा कांहीं नियम नाहीं. द्यूतांत साक्षीही द्यूतकारच करावेत. त्याला ‘ स्त्रीबालवृद्धकितव० ’ इत्यादि निषेध लागू नाहीं. क्वचित् प्रसंगीं द्यूताचा निषेध करण्यासाठीं दंड सांगतांत—

**राज्ञा सचिन्हं निर्वास्याः कूटाक्षोपधिदेविनः ॥ २०२ ॥**

कूट अक्षादिकांनीं व दुसऱ्याच्या मतीला ठकविण्यास कारण होणाऱ्या मणि-मंत्र-औषधादिकांच्या योगानें जें द्यूत करितात त्यांना श्वपदादि ( कुत्र्याच्या पायाचा ठसा इत्यादि ) चिह्नांनीं चिह्नित करून राजानें आपल्या राष्ट्रांतून घालवावें. नारदानें ‘ कूट अक्षांनीं खेळणाऱ्या पाप्यांच्या गळ्यांत फांशांची माळा घालून त्यांना आपल्या राष्ट्रांतून घालवून द्यावें, ’ असें म्हटलें आहे. मनूनें द्यूताचा जो निषेध केला आहे तो ( मनु० अ० ९ श्लोक २२४ ) कूटाक्षांनीं खेळणें, राजाध्यक्ष व सभिक यांनीं रहित असलेल्या जागीं खेळणें, इत्यादिकांविषयीं आहे, असें जाणावें २०२.

**द्यूतमेकमुखं कार्यं तस्करज्ञानकारणात् ।**

तसेंच पूर्वीं सांगितलेलें जें द्यूत तें एकच प्रधान आहे ज्याचें तसें करावें. ( म्हणजे राजाच्या अध्यक्षानें अधिष्ठित, असें करावें ) चोराचें ज्ञान होण्यास्तव हें अवश्य करावें. कारण प्रायः सर्व कितव चोरी करून मिळविलेल्या धनानेंच द्यूत करीत असतात. यास्तव चोरांचें ज्ञान होणें हें प्रयोजन ध्यानांत धरून द्यूत एक मुख्य ( एका अध्यक्षानें युक्त ) करावें. असो; द्यूताचा धर्मच समाह्वयाला लागू आहे, असें आतां सांगतात—

एष एव विधिर्ज्ञेयः प्राणिद्यूते समाह्वये ॥ २०३ ॥

पणाविषयीं वरील साडे तीन श्लोकांत जो द्यूतधर्म सांगितला आहे तोच मल्ल–मेष इत्यादिकांच्या योगानें होणाऱ्या समाह्वयनावाच्या प्राणिद्यूतांत जाणावा २०३.

इति द्यूतसमाह्वयाख्यं प्रकरणम् १७.

---

# अथ वाक्पारुष्यप्रकरणम् १८.



आतां वाक्पारुष्यास आरंभ करितात. त्याचें लक्षण नारदानें असें सांगितलें आहे. मोठ्यानें बोलणें व दोष, या दोन्ही भावांनीं युक्त, असें जें भाषण उद्वेग उत्पन्न करण्यासाठीं उच्चारलें जातें त्यास वाक्पारुष्य म्हणतात. त्यांतील गौड कलहप्रिय आहेत, हा देशाक्रोश; ब्राह्मण अतिशय लोलुप असतात, हा जात्याक्रोश; विश्वामित्राच्या कुलांतील लोक क्रूर आचरण करणारे असतात, हा कुलाक्षेप; व तसेच विद्या, शिल्प इत्यादिकांविषयींचे आक्षेप, हे सर्व निंदावचनानीं युक्त असल्यास तेंच वाक्पारुष्य होय. दंड न्यूनाधिक प्रमाणानें व्हावा म्हणून त्या वाक्पारुष्याचे साक्षेप, अश्लील व तीव्र, असे तीन प्रकार नारदानेंच सांगितले आहेत. असभ्य भाषणासह या मूर्खाला धिक्कार असो; असें म्हणणें हें साक्षेप वाक्पारुष्य, आई–बहिणी-वरून शिव्या देणें हें अश्लील व तूं ब्रह्मघातकी आहेस, मद्यपान करणारा आहेस इत्यादि महापातकाच्या आरोपानें युक्त असें आक्रोशवचन बोलणें, हें तिसरें तीव्र वाक्पारुष्य होय. त्यांतील सजातीयास उद्देशून केलेल्या निष्ठुराक्रोशाविषयीं दंड सांगतात—

सत्यासत्यान्यथास्तोत्रैर्न्यूनाङ्गेन्द्रियरोगिणाम् ।
क्षेपं करोति चेद्दण्ड्यः पणानर्धत्रयोदशान् ॥ २०४ ॥

न्यूनांग म्हणजे हस्तपादादि अंगांनीं विकल, न्यूनेंद्रिय म्हणजे नेत्र—श्रोत्रादि इंद्रिय रहित व दुश्चर्मप्रभृति रोगी, यांची सत्य, असत्य अथवा मिथ्या स्तुति ( निन्दार्थक स्तुति ) यांच्या योगानें जो निर्भर्त्सना करतो त्याला साडे तेरा पण दंड करावा. ज्याला दोन्ही नेत्र नाहींत त्याला हा अंध आहे, असें म्हणणें हें सत्य निर्भर्त्सन, या आंधळ्याचे नेत्र फार चांगले आहेत, असें म्हणणें हें असत्य निर्भर्त्सन आणि कुरूपाला सुस्वरूप म्हणणें, हें अन्यथा स्तोत्र होय. मनूनें ( अ. ८ श्लो. २७४ यांत ) पांगळ्याला ‘ पांगळा ’ असें खरें म्हणून निंदा करणारालाही जो कार्षापणावर ( कमींत कमीं एक कार्षापण ) दंड सांगितला आहे तो अत्यंत दुर्वृत्त वर्णाविषयीं आहे. जेव्हां पुत्रादिक आईबापांना शिव्याशाप देतात तेव्हां त्यांस शंभर दंड करावा, असें त्यानेंच ( अ. ८ श्लो. २७५ ) सांगितलें आहे. पण तेंही सापराध ( अपराधी ) माताप्रभृति गुरु व निरपराध भार्या यांच्याविषयीं समजावें. ( कारण निरपराध

मातापितरांस शिव्याशाप देणाऱ्या पुत्राला याहून फार मोठा दंड सांगितला आहे. ) २०४.

आतां अश्लील आक्षेपाचा दंड सांगतात—

**अभिगन्तास्मि भगिनीं मातरं वा तवेति ह ।**
**शपन्तं दापयेद्राजा पञ्चविंशतिकं दमम् ॥ २०५ ॥**

तुझ्या भगिनीशीं अथवा मातेशीं मी अभिगमन करीन अशा शिव्या देणाऱ्या पुरुषाला राजानें पंचवीस पण दंड करावा २०५.

याप्रमाणें समान गुणवान् व समान वर्णाच्या लोकांचा दंड सांगून आतां विषम गुणवानांना दंड सांगण्याकरितां म्हणतात—

**अर्द्धोऽधमेषु द्विगुणः परस्त्रीषूत्तमेषु च ।**

आक्षेप करणाराच्या अपेक्षेनें ज्याच्यावर आक्षेप करावयाचा तो न्यून वृत्त व न्यून गुण यांनीं युक्त असल्यास आक्षेपकास अर्धा दंड करावा. पूर्ववाक्यांत पंचवीस पणांचा दंड सांगितला असल्यामुळें त्याच्या अपेक्षेनें अर्धा म्हणजे साडेबारा पणात्मक दंड करावा. पण विशेषेंकरून दुसऱ्यांच्या भार्यांविषयीं आक्षेप करणारांस द्विगुण ( म्हणजे पन्नास पण ) दंड जाणावा. त्याचप्रमाणें आक्षेप करणारानें आपल्याहून अधिक विद्वान् व अधिक सदाचरणसंपन्न पुरुषास शिव्या दिल्यास त्यालाही पन्नास पण दंड उक्त आहे. आतां चार वर्ण व मूर्धावसिक्तादि यांनीं परस्पर आक्षेप (शिवीगाळ) केल्यास दंडयोजना सांगतात—

**दण्डप्रणयनं कार्यं वर्णजात्युत्तराधरैः ॥ २०६ ॥**

ब्राह्मणादि वर्ण व मूर्धावसिक्तादि जाति क्रमानें उत्तर व अधर आहेत. यास्तव त्यांनीं परस्परांत आक्षेप केल्यास दंडाचें प्रमाण विशेषप्रकारें ठरवावें. व तें उत्तराधर भावाच्या अपेक्षेनें करावें, असें ' उत्तराधरैः ' या मुद्दाम योजलेल्या पदावरून दिसतें. जसें–ब्राह्मण, ब्राह्मणाहून हीन पण क्षत्रियाहून उत्तम अशा मूर्धावसिक्तास शिव्या देऊन क्षत्रियाक्षेपनिमित्त पन्नास पण दंडाहून किंचित् अधिक म्हणजे पंचाहत्तर पणात्मक दंडास पात्र होतो. क्षत्रियही त्याला शिव्या देऊन ब्राह्मणाक्षेपनिमित्त शत दंडाहून न्यून म्हणजे पंचाहत्तर पणात्मक दंडास योग्य होतो. मूर्धावसिक्तही त्या दोघांना शिव्या शाप देऊन त्याच दंडास पात्र होतो. मूर्धावसिक्त व अंबष्ठ यांनीं परस्परास शिवीगाळ केल्यास त्यांना ब्राह्मण व क्षत्रिय यांनीं परस्पर शिवीगाळ केल्यास जो दंड सांगितला आहे तो करावा. याचप्रमाणें दुसरे वर्ण व जाती याविषयीं जाणावें २०६.

याप्रमाणें सवर्णाविषयीं दंड सांगून वर्णांच्याच लोकांवर अनुलोम व प्रतिलोम जातींनीं आक्षेप केल्यास दंड सांगतात—

**प्रातिलोम्यापवादेषु द्विगुणत्रिगुणा दमाः ।**
**वर्णानामानुलोम्येन तस्मादर्द्धार्धहानितः ॥ २०७ ॥**

अपवाद म्हणजे अधिक्षेप ( तिरस्कार, निन्दा ). प्रातिलोम्यानें म्हणजे उलट क्रमानें अपवाद केल्यास ब्राह्मणास शिव्या देणाऱ्या क्षत्रिय व वैश्य यांना क्रमानें वरील वाक्यांत निर्देश केलेल्या पन्नास पण दंडाच्या अपेक्षेनें दुप्पट व तिप्पट ( म्हणजे शंभर व दीडशें पण ) दंड करावा. शूद्रानें ब्राह्मणास शिव्या दिल्यास ताडन किंवा जिह्वाच्छेदन करावें. मनूनेंही ( अ. ८ श्लो. २६७ ) असेंच सांगितलें आहे. क्षत्रियास शिव्या देणाऱ्या वैश्य व शूद्र यानाही क्रमानें शंभर व दीडशें दंड करावा. कारण ब्राह्मणाच्या अपेक्षेनें क्षत्रिय व वैश्य हे जसे क्रमानें अनंतर व एकांतर त्याचप्रमाणें क्षत्रियाच्या अपेक्षेनें वैश्य अनंतर ( लागलाच मागून असणारा ) व शूद्र एकान्तर ( एक सोडून असणारा ) आहे. त्याचप्रमाणें शूद्रानें वैश्यास शिव्या दिल्यास शंभर पण दंड करावा. पण तेंच आनुलोम्यानें ( सुलट क्रमानें ) अर्थात् ब्राह्मणानें क्षत्रियादि खालच्या तीन वर्णांना शिव्या दिल्यास त्याला ब्राह्मणाक्रोशनिमित्त शतपरिमित क्षत्रिय दंडांतून प्रति वर्णास अर्धा अर्धा भाग कमी करून म्हणजे क्रमानें पन्नास, पंचवीस व साडेबारा पण दंड करावा. त्याचप्रमाणें क्षत्रियानें वैश्य व शूद्र यांना शिव्या दिल्यास त्याला क्रमानें पन्नास व पंचवीस पण दम करावा. वैश्यानें ( आपल्या अनंतर ) शूद्राला शिव्या दिल्यास पन्नास पण हा दंड करावा. कारण मनु व गौतम यांनीं तसें सांगितलें आहे २०७.

आतां निष्ठुर आक्षेपास उद्देशून सांगतात—

**बाहुग्रीवानेत्रसक्थिविनाशे वाचिके दमः ।**
**शत्यस्तदर्द्धिकः पादनासाकर्णकरादिषु ॥ २०८ ॥**

बाहु, मान, नेत्र, मांडी यांतील प्रत्येकाचें नांव घेऊन मी त्यांचा नाश करीन असें म्हटल्यास ( म्ह. मी तुझा हात तोडीन, मान कापीन इत्यादि तोंडानें नुस्तें बोलल्यास ) शतपरिमित दंड जाणावा. पाय, नाक, कान, हात इत्यादिकांविषयीं तसा उल्लेख केल्यास त्याचा अर्धा ( म्ह. पन्नास पण ) दंड करावा २०८.

**अशक्तस्तु वदन्नेवं दण्डनीयः पणान्दश ।**
**तथा शक्तः प्रतिभुवं दाप्यः क्षेमाय तस्य तु ॥ २०९ ॥**

पण ज्वरादिकांच्या योगानें क्षीण शक्ति झालेला जो कोणी तुझें बाहुप्रभृति अंग तोडीन, असें म्हणतो त्याला दहा पण दंड करावा. परंतु जो स्वतः समर्थ असून दुसऱ्या क्षीणशक्तिमानास पूर्वीप्रमाणें शिव्या देतो त्याला पूर्वोक्त शतादि दंड केल्यावर आणखी शिवाय त्या अशक्ताच्या सुरक्षिततेकरितां प्रतिभू ( जामीन ) घ्यावा २०९.

आतां तीव्र आक्रोशाविषयीं दंड सांगतात—

**पतनीयकृते क्षेपे दण्डो मध्यमसाहसः ।**
**उपपातकयुक्ते तु दाप्यः प्रथमसाहसम् ॥ २१० ॥**

पातित्यास ( पतिततेस ) कारण होणाऱ्या ब्रह्महत्यादिक अपवादांनीं ब्राह्मणादि वर्णांच्या लोकांवर आक्षेप केल्यास मध्यम साहस दंड व तूं गोघ्न आहेस, इत्यादि उपपातकांचा आक्षेप केल्यास मध्यम साहस दंड करावा २१०.

त्रैविद्यनृपदेवानां क्षेप उत्तमसाहसः ।
मध्यमो जातिपूगानां प्रथमो ग्रामदेशयोः ॥ २११ ॥

तीन वेदांचें अध्ययन केलेले, राजे व देव यांची निंदा केल्यास उत्तम साहस दंड, व जे ब्राह्मण मूर्द्धावसिक्तादि जातींचे संघ असतात त्यांवर आक्षेप केल्यास मध्यम साहस दंड करावा. त्याचप्रमाणें ग्राम व देश यांतील प्रत्येकावर आक्षेप केल्यास प्रथम साहस दंड समजावा २११.

इति वाक्पारुष्यप्रकरणम् १८.

---

# अथ दंडपारुष्यप्रकरणम् १९.



आतां दंडपारुष्यास प्रारंभ करितों. त्याचें स्वरूप नारदानें असें सांगितलें आहे—स्थावरजंगमात्मक द्रव्याचे ठिकाणीं हात, पाय, आयुध, दगड इत्यादिकांच्या योगानें दुःख उत्पन्न करणें, त्याचप्रमाणें राख, धूळ, चिखल, विष्ठा, इत्यादिकांच्या योगानें उपघात करणें, ( म्हणजे त्यांचा स्पर्श करून मनाला दुःख देणें, ) हें दोन्ही दंडपारुष्य आहे. सारांश, जंगमादि द्रव्याच्या योगानें देहाच्या विरुद्ध, ( त्याला दुःख होईल असें ) आचरण करणें हें दंडपारुष्य आहे. त्याचे तीन प्रकार आहेत. कारण हीन, मध्यम व उत्तम द्रव्यरूप कर्मत्रैविध्यामुळें त्याचे ते भेद होतात. अवगोरण, निःसंगपातन व निशंकप्रहरण ( अथवा क्षतदर्शन ) अशीं त्यांचीं नांवें आहेत. हीं तिन्हीं साहसें आहेत. कारण, तीं साहसामुळें प्रवृत्त होतात. म्हणून त्यांना दंडपारुष्य असें म्हटलें आहे. १ वाक्पारुष्य व दंडपारुष्य या दोन्ही प्रकारच्या पारुष्याची प्रवृत्ति झाली असतां कलह करणाऱ्या दोघांतील जो सहन करतो त्याला केवळ दंड होत नाहीं, इतकेंच नव्हे तर तो पूज्यही होतो. २ त्याचप्रमाणें जो प्रथम कलहांत प्रवृत्त होतो त्याला अधिक दंड होतो. ३ कोणत्याही कलहांत भांडणाऱ्या दोघांचें सारखेंच नुकसान झालें असतां त्यांतील जो कोणी वैर धरून सूड उगविण्याचा विचार करतो तो दंडास पात्र होतो, ४ दोघां कलह करणारांतील कोणाचा अपराध अधिक आहे, हें न कळल्यास दोघांनाही सम दंड होतो व ५ चांडालादिकांनीं आर्यांचा अपराध केला असतां सज्जनच त्यांस दंड देण्यास योग्य आहेत. पण त्यांना दंड करतां येणें अशक्य झाल्यास राजानें त्यांचा घात करवावा. त्यांच्यापासून धन घेऊं नये. असे पांचप्रकारचे विधि त्यानेंच सांगितले आहे. असो; अशाप्रकारच्या दंडपारुष्याच्या निर्णयानंतरच दंड देतां येणें शक्य असल्यामुळें त्याच्या स्वरूपाविषयीं संदेह आला असतां निर्णयाचा हेतु सांगतात—

असाक्षिकहते चिह्नैर्युक्तिभिश्चागमेन च ।
द्रष्टव्यो व्यवहारस्तु कूटचिह्नकृतो भयात् ॥ २१२ ॥

जेव्हां कोणी एकादा राजाकडे येऊन या अमक्यानें मला एकान्तांत मारलें, असें निवेदन करितो तेव्हां चिह्नें ( वर्णादि स्वरूपगत लिंगें, अंगावरील खुणा ), मारण्याचें कारण, मारण्यापासून मारणाराला मिळालेलें फळ इत्यादि गोष्टींचा विचार करणें, ही युक्ति व आगम ( लोकप्रवाद ) आणि कूटचिन्हांदिकांचा संभव असल्यामुळें दिव्यही या चार उपायांच्या योगानें परीक्षण करावें २१२.

याप्रमाणें निश्चय झाला असतां विशेष साधनानें केलेल्या दंडपारुष्यास विशेष दंड सांगतात—

भस्मपङ्करजःस्पर्शे दण्डो दशपणः स्मृतः ।
अमेध्यपार्ष्णिनिष्ठ्यूतस्पर्शने द्विगुणः स्मृतः ॥ २१३ ॥
समेष्वेवं परस्त्रीषु द्विगुणस्तूत्तमेषु च ।
हीनेष्वर्द्धदमो मोहमदादिभिरदण्डनम् ॥ २१४ ॥

जो राख, धूळ इत्यादिक दुसऱ्याच्या अंगास लावितो त्याला दहा पण दंड सांगितलेला आहे. अमेध्य शब्दानें अश्रु, कफ, नख, केंस, कानांतील मळ, डोळ्यांतील पू, उष्टें अन्न इत्यादि घ्यावें. पार्ष्णि म्हणजे खोंट, निष्ठ्यूत म्हणजे तोंडांतून बाहेर काढलेली थुंकी, यांचा दुसऱ्यास स्पर्श केल्यास त्याहून दुप्पट म्हणजे वीस पण दंड करावा. पुरीष ( विष्ठा ) इत्यादि लाविल्यास कात्यायनानें चौपट ( म्ह. चाळीस पण ) दंड सांगितला आहे. विष्ठा, मूत्र इत्यादि अमेध्य पदार्थ शरीराच्या मध्यभागीं लाविल्यास साठ पण व डोक्यावर ठेवल्यास ऐंशी पण दंड सांगितला आहे. वसा, शुक्र, रक्त व मज्जा यांचीही विष्ठादिकांत गणना करावी. पण हा सर्व उक्त दंड सवर्णाच्या माणसाविषयीं जाणावा. सामान्यतः कोणत्याही परभार्येचा अथवा आपल्याहून अधिक विद्या—आचरण यांनीं युक्त असलेल्या पुरुषाचा अशाप्रकारचा अपराध केल्यास वर सांगितलेल्या दंडाहून दुप्पट दंड जाणावा. आपल्यापेक्षां न्यून श्रुत–वृत्तादि संपन्न पुरुषाचा असला अपराध केल्यास वरच्या दंडाहून अर्धा दंड समजावा, पण मोह ( चित्तवैकल्य ), मद ( मदादि पानजन्य ) व ग्रहावेश ( भूतबाधा, खूळ ) इत्यादिकांनीं युक्त असलेल्या पुरुषानें कोणाच्या अंगास वरील पदार्थ लाविल्यासही त्याला दंड करूं नये २१३, २१४.

आतां प्रातिलोम्य अपराधांचा दंड सांगतात—

विप्रपीडाकरं छेद्यमङ्गमब्राह्मणस्य तु ।
उद्गूर्णे प्रथमो दण्डः संस्पर्शे तु तदर्द्धिकः ॥ २१५ ॥

ब्राह्मणांना पीडा करणारे जें अब्राह्मणाचें ( म्ह. क्षत्रियादिकांचें ) हस्तपादादि अंग

तें तोडावें. क्षत्रिय व वैश्य यांना पीडा करणारें शूद्राचें अंगही तोडावें. कोणत्याही द्विजाचा अशा प्रकारचा अपराध करणाऱ्या शूद्राचें अंगच्छेद करण्याचें विधान केलेलें असल्यामुळें क्षत्रियाला अपकार करणाऱ्या वैश्यासही हाच दंड समजावा. मारण्यासाठीं शस्त्रादि उचललें असतां प्रथमसाहस दंड करावा. शूद्रानें शस्त्र उचललें तरी हस्तच्छेद करावा. शस्त्र उचलण्यासाठीं शस्त्राला हात घातला असतां प्रथमसाहसाच्या अर्धा दंड समजावा. क्षत्रिय व वैश्य यांनीं भस्मादिकांचा स्पर्श केला असतां वाक्पारुष्य न्यायानें द्विगुण व त्रिगुण दंड व शूद्राचा हस्तछेदच. ( पहा मनु. अ. ८ श्लोक २७९–२८२. ) २१५.

याप्रमाणें प्रातिलोम्यापराधाविषयीं दंड सांगून पुनः सजातीस उद्देशून सांगतात—

उद्गूर्णे हस्तपादे तु दशविंशतिकौ दमौ ।
परस्परं तु सर्वेषां शस्त्रे मध्यमसाहसः ॥ २१६ ॥

हात किंवा पाय मारण्यासाठीं उचलला असतां क्रमानें दश पण व वीस पण दंड जाणावा. सर्व वर्णांतील परस्परांस मारण्याकरितां शस्त्र उचलणाऱ्या दोघांनाही मध्यम साहस दंड करावा २१६.

पादकेशांशुककरोल्लुञ्चनेषु पणान् दश ।
पीडाकर्षांशुकावेष्टपादाध्यासे शतं दमः ॥ २१७ ॥

पाय, केंस, वस्त्र व हात यांतील एकाद्यास धरून जो झटकन् ओढतो ( उपटतो ) त्याला दहा पण दंड करावा. पीडा करणें, ओढणें, वस्त्रानें घट्ट बांधणें, व पाय देणें यांच्या योगानें जो दुसऱ्याचा अपराध करतो त्याला शत पण दंड करावा. ( अर्थात् अगोदर वस्त्रानें बांधून, घट्ट आवळून, ओढून व पायानें लाथ मारून दुसऱ्यास व्याकुळ करणारास हा दंड सांगितला आहे २१७.

शोणितेन विना दुःखं कुर्वन् काष्ठादिभिर्नरः ।
द्वात्रिंशतं पणान्दण्ड्यो द्विगुणं दर्शनेऽसृजः ॥ २१८ ॥

जो रक्त बाहेर न फुटेल अशारीतीनें काष्ठ, दगड इत्यादिकांच्या योगानें मृदु ताडन करितो त्याला बत्तीस पणांचा दंड द्यावा. पण जेव्हां जोरानें ताडन केल्यामुळें रक्त दिसतें तेव्हां त्याच्या दुप्पट ( म्हणजे चवसष्ट पण ) दंड करावा. मनूनें ' अंगाची त्वचा काढणारास शंभर पण, रक्त काढणारास सहा निष्क व हाड मोडणारास घालवून देणें. हा विशेष दंड सांगितला आहे. ( अ. ८ श्लो. २८४. ) २१८.

करपाददतो भङ्गे छेदने कर्णनासयोः ।
मध्यो दण्डो व्रणोद्भेदे मृतकल्पहते तथा ॥ २१९ ॥

हात, पाय किंवा दांत यांतील कांहीं मोडल्यास अथवा कान व नाक यांतील एकाद्याचा छेद केल्यास, भरत आलेला व्रण फोडल्यास व मेल्याप्रमाणें मूर्च्छित होऊन पडेपर्यंत

मारल्यास मध्यम साहस दंड जाणावा. यास्थळीं अनुबंधादिकांवरून ( कारण, हानि, अनेक अपराध इत्यादिकांवरून ) विषयाचें साम्य जाणावें २१९.

चेष्टाभोजनवाग्रोधे नेत्रादिप्रतिभेदने ।
कन्धराबाहुसक्थ्नां च भङ्गे मध्यमसाहसः ॥ २२० ॥

गमन, भोजन व भाषण यांस निरोध केला असतां, नेत्र व जिव्हा यांस फोडलें असतां, मान, बाहु व मांडी यांना मोडलें असतां मध्यम साहस दंड जाणावा २२०.

एकं घ्नतां बहूनां च यथोक्ताद्द्विगुणो दमः ।

पण जेव्हां अनेकजण मिळून एकाचा अंगभंगादि करितात तेव्हां ज्याच्या अपराधाला जो जो दंड सांगितला आहे त्याच्या दुप्पट दंड प्रत्येकाला करावा. कारण ते फार क्रूर होत. प्रातिलोम्य व आनुलोम्य अपराधामध्यें सवर्णाविषयीं सांगितलेल्या सर्व दंडाची वाक्पारुष्योक्त क्रमानें हानि किंवा वृद्धि ठरवावी.

कलहापहृतं देयं दण्डश्च द्विगुणस्ततः ॥ २२१ ॥

कलह चालला असतां जें ज्यानें हरण केलें असेल तें त्यानें परत करावें. व अपहार केलेल्या द्रव्याच्या दुप्पट दंड अपहार केल्याबद्दल द्यावा. २२१.

दुःखमुत्पादयेद्यस्तु स समुत्थानजं व्ययम् ।
दाप्यो दण्डं च यो यस्मिन् कलहे समुदाहृतः ॥ २२२ ॥

जो ज्याला ताडनादि करून दुःख उत्पन्न करील त्यानें त्याचा तो व्रण भरून काढण्यासाठीं औषधादिकांकरितां व पथ्यादिकांकरितां जो व्यय होईल तो द्यावा. शिवाय ज्या कलहांत जो दंड सांगितला असेल तोही द्यावा. ( नुस्ता औषधपाण्याचा खर्च देऊनच भागत नाहीं ) २२२.

दुसऱ्याच्या शरीराला पीडा दिली असतां दंड सांगून आतां बाह्य धनाचा नाश केल्यास दंड सांगतात—

अभिघाते तथा छेदे भेदे कुड्यावपातने ।
पणान्दाप्यः पंचदश विंशतिं तद्व्ययं तथा ॥ २२३ ॥

मुद्गरादिकांच्या योगानें भिंतीवर प्रहार केले असतां, तिला फोडलें असतां व तिचे दोन विभाग केले असतां, क्रमानें पांच, दहा व वीस पण दंड जाणावा. पण तेंच त्या भिंतीला भूमीवर पाडलें असतां हे तिन्ही दंड ( अर्थात् पसतीस पण ) करावे. आणि स्वामीला पुनः भिंत घालण्यासाठीं धन द्यावें २२३.

दुःखोत्पादि गृहे द्रव्यं क्षिपन्प्राणहरं तथा ।
षोडशाद्यः पणान्दाप्यो द्वितीयो मध्यमं दमम् ॥ २२४ ॥

दुसऱ्याच्या घरांत दुःखोत्पादक (कांटे वगैरे) द्रव्य फेंकणारास सोळा पण दंड करावा. प्राणहरण करणाऱ्या विषारी भुजंगादिकांना फेंकणाऱ्यास मध्यम साहस दंड करावा २२४.

आतां पशूंचा द्रोह करणारास दंड सांगतात—

**दुःखे च शोणितोत्पादे शाखाङ्गच्छेदने तथा ।**
**दण्डः क्षुद्रपशूनां तु द्विपणप्रभृति क्रमात् ।। २२५ ।।**

बकरी, मेंढी, हरिणी इत्यादि क्षुद्र पशूंना ताडन करून दुःख दिलें असतां, त्यांच्या अंगांतून रक्त काढलें असतां आणि त्यांच्या शाखांचा व अंगांचा च्छेद केला असतां क्रमानें द्विप्रभृति दंड करावा. शाखा म्हणजे प्राणसंचाररहित शृंगादि व अंग म्हणजे हात—पाय इत्यादि, असें जाणावें. येथील द्विप्रभृति शब्दानें दोन, चार, सहा व आठ अशी वृद्धि जाणावी. तीन, चार व पांच अशी समजूं नये. कारण, उत्तरोत्तर अपराध अधिक असल्यामुळें, पहिल्या दंडाहून पुढचे तीन दंड तसेच अधिक प्रमाणाचे असावेत, असें वाटतें. यास्तव अश्रुत ( न ऐकलेल्या, न सांगितलेल्या ) तीन, पांच इत्यादि संख्यांचा आश्रय करण्यापेक्षां दोन या श्रुत संख्येचीच आवृत्ति करणें निर्दोष होय २२५.

**लिङ्गस्य च्छेदने मृत्यौ मध्यमो मूल्यमेव च ।**
**महापशूनामेतेषु स्थानेषु द्विगुणो दमः ।। २२६ ।।**

त्या क्षुद्र पशूंच्या लिंगाचा च्छेद केल्यामुळें मरण आल्यास अपराध्याला मध्यम साहस दंड करावा व त्याच्याकडून स्वामीला मूल्य देववावें. गाय, हत्ती, घोडा इत्यादि महा पशूंना पूर्वोक्तस्थानीं ताडन करणें, रक्त काढणें, इत्यादि केल्यास पूर्वोक्त दंडाहून दुप्पट दंड समजावा २२६.

आतां स्थावराचा द्रोह केल्यास दंड सांगतात—

**प्ररोहिशाखिनां शाखास्कन्धसर्वविदारणे ।**
**उपजीव्यद्रुमाणां च विंशतेर्द्विगुणो दमः ।। २२७ ।।**

ज्यांच्या तोडलेल्या शाखा भूमींत पुरल्या असतां त्यांच्या प्रत्येक कांडांतून एकेक कोंब निघतो त्या वडासारख्या वृक्षांना प्ररोहिशाखी म्हणतात. अशा वृक्षांच्या शाखा तोडल्या असतां, ज्याच्यापासून मूळ शाखा निघतात त्याला स्कंध म्हणतात. त्याला तोडलें असतां व समूळ वृक्ष तोडला असतां क्रमानें वीस पण दंडापासून आरंभ करून उत्तरोत्तर द्विगुण दंड करावा. अर्थात् वीस, चाळीस व ऐशीं असे तीन दंड शाखाच्छेदन, स्कंधच्छेदन व समूळ वृक्षच्छेदन या तीन अपराधांमध्यें योजावे. ज्यांच्या शाखांपासून अंकुर उद्भवत नाहींत पण ज्यांच्या फळांवर उपजीविका करतां येते अशा आंबे, फणस, इत्यादि झाडांच्या शाखा, स्कंध व समूळ वृक्ष यांचा छेद केल्यास पूर्वोक्त दंडच करावे. पण ज्यांच्या शाखांपासून अंकुर निघत नाहींत किंवा ज्यांच्यावर उपजीविकाही करितां येत नाहीं अशा झाडांच्या शाखा इत्यादि तोडल्यास दंड किती करावयाचा तें स्वतःच सारासार विचारानें ठरवावें २२७.

आतां विशेष वृक्षांविषयीं सांगतात—

चैत्यस्मशानसीमासु पुण्यस्थाने सुरालये ।
जातद्रुमाणां द्विगुणो दमो वृक्षेऽथ विश्रुते ॥ २२८ ॥

चैत्य, स्मशान, सीमा, पुण्यस्थान, देवालय इत्यादि स्थानीं झालेल्या वृक्षांच्या शाखा-स्कंध इत्यादि तोडल्यास पूर्वोक्त दंडाहून द्विगुण दंड व पिंपळ, पलाश ( पळस ) इत्यादि प्रख्यात वृक्षांच्या शाखादि तोडल्यासही दुप्पट दंड करावा २२८.

आतां गुल्मादिकांविषयीं सांगतात--

गुल्मगुच्छक्षुपलताप्रतानौषधिवीरुधाम् ।
पूर्वस्मृतादर्धदण्डः स्थानेषूक्तेषु कर्तने ॥ २२९ ॥

ज्यांच्या लता फार लांब नसल्या तरी अतिशय दाट असतात अशा मोगरीसारख्या ( झुबकेदार ) झाडांना गुल्म म्हणतात. जे लतेसारखे नसतात व प्रायः वाकडे असतात अशा कोरांटीसारख्या झाडांना गुच्छ म्हणतात. कण्हेरीसारख्या प्रायः सरळ असणाऱ्या झाडांना क्षुप म्हणतात. लांबच लांब पसरणाऱ्या जाई, चमेली इत्यादि वृक्षांना लता म्हणतात. कांडीं व अंकुर यांनीं रहित असून सरळ जाणाऱ्या झाडांना प्रतान म्हणतात. फलाचा पाक होतांच क्षय पावणाऱ्या शाली-प्रभृतींना औषधि म्हणतात. तोडलें असतांही पुनः नानाप्रकारें उगवणाऱ्या गुळवेलीसारख्यांना वीरुध म्हणतात. या सर्वांना पूर्वोक्त स्थानीं छेदनादि केलें असतां पूर्वोक्त दंडाहून अर्धा दंड करावा २२९.

इति दंडपारुष्यप्रकरणम् १९.

---

# अथ साहसप्रकरणम् २०.

---

आतां साहस या नांवाच्या विवादपदाचें व्याख्यान करण्याची इच्छा करणारे योगीश्वर प्रथम त्याचें लक्षण सांगतात—

सामान्यद्रव्यप्रसभहरणात्साहसं स्मृतम् ।

सामान्य ( ह्म. ज्याच्यावर अनेकांचें स्वामित्व आहे अशा ) द्रव्याचा कोणा एकाद्यालाच स्वेच्छेनें विनियोग करतां येत नाहीं, अशा द्रव्याचें किंवा परकीय धनाचें अपहरण करणें यास साहस म्हणतात. कारण तें बलाच्या आश्रयानें हरण केलेलें असतें. याचा तात्पर्यार्थ असा—राजांचा दंड किंवा जनाचा आक्रोश या दोघांचेंही उल्लंघन करून ( त्याची पर्वा न करितां राजपुरुषांवाचून इतर पुरुषांसमक्ष मारणें, परस्त्रीचा अपमान करणें, इत्यादि

कांहीं धाडसाचें पाप केलें जातें त्या सर्वांला साहस म्हणावें. अर्थात् साधारण धन व परधन यांचें हरणही नुस्त्या अंगबलाच्या आश्रयानेंच केलें जात असल्यामुळें तेंही साहसच होय नारदानेंही 'बलाच्या योगानें दर्पित झालेल्या लोकांकडून जें कर्म केलें जातें त्याला साहस म्हणतात, असें सांगितलें आहे. हें साहस, चाय, वाक्पारुष्य. दंड पारुष्य, स्त्रीसंग्रहण इत्यादिकांमध्यें व्यासक्त ( संबद्ध ) असलें तरी बल व दर्प यांचा आश्रय, या उपाधीमुळें त्यांच्याहून पृथक् होतें. यास्तव त्याला उद्देशून अधिक दंड सांगण्याकरितां त्याचें पृथक् वर्णन केलें आहे. त्याला निरनिराळे दंड सांगावयाचे असल्यामुळें त्याचे प्रथम, मध्यम व उत्तम असे तीन भेद सांगितले आहेत. मूळ, फल, उदक व क्षेत्रोपकरण यांचा भंग करणें, आक्षेप ( वाणीनें तिरस्कार ) करणें, नास-धूस करणें, इत्यादिकांच्या योगानें प्रथम साहस होतें. वस्त्र, पशू, अन्न, पान व घरांतील उपकरणें यांचा भंग, आक्षेप व उपमर्द केला असतां तें मध्यम साहस होतें. विष, शस्त्र इत्यादिकांच्या योगानें मारणें, परस्त्रीला धरणें, व असेच दुसरे प्राणोपरोधक अपराध करणें हें उत्तम साहस होय. प्रथम साहसाला दंड कमींतकमी शंभर, मध्यम साहसाला पांचशें व उत्तमाला सहस्र सांगितला आहे. वध, सर्वस्वहरण, नगरांतून धिंड काढून बाहेर घालविणें, अंगावर खुणा करणें, तें तें अंग तोडणें इत्यादि अपराधांच्या अपेक्षेनें दुसरेही दंड उत्तम साहसांत सांगितले आहेत. प्रसंगीं त्यांतील एकेकाचा, दोन दोन दंडांचा अथवा सर्व दंडांचा उपयोग करावा. असो; आतां अगोदर परद्रव्यापहरणरूप साहसांत दंड सांगतात—

तन्मूल्याद्द्विगुणो दण्डो निह्नवे तु चतुर्गुणः ॥ २३० ॥

पूर्वार्धांत सांगितलेल्या प्रकारचें साहस ( अर्थात् सर्व साधारण धनाचा बल व दर्प यांच्या आश्रयानें अपहार करणें हें ) केल्यास त्या अपहारकाला हरण केलेल्या धनाच्या दुप्पट धन दंड द्यावा. जो असलें साहस करून मी केलेंच नाहीं, असें म्हणतो त्याला अपहृत द्रव्याच्या मूल्याच्या चौपट दंड होतो. याच विशेष दंडाच्या विधानावरून-प्रथम साहसादि सामान्य दंडाचें विधान अपहार करणें, या साहसास सोडून इतर साहसास लागू आहे-असें वाटतें २३०.

आतां साहस करावयास लावणाऱ्याविषयीं सांगतात—

यः साहसं कारयति स दाप्यो द्विगुणं दमम् ।
यश्चैवमुक्त्वाहं दाता कारयेत्स चतुर्गुणम् ॥ २३१ ॥

जो 'तूं साहस कर' असें सांगून तें करवितो त्याला, साहस करणाराला जो दंड करावयाचा असेल, त्याच्या दुप्पट दंड करावा. पण जो 'मी तुला धन देईन, तूं हें साहस कर,' असें सांगून साहस करवितो त्याला चौपट दंड करावा. कारण त्याच्याशीं त्याचा संबंध अधिक असतो २३१.

आतां विशेष प्रकारच्या साहसिकांविषयीं सांगतात—

अर्घ्याक्रोशातिक्रमकृद्भ्रातृभार्याप्रहारदः ।
संदिष्टस्याप्रदाता च समुद्रगृहभेदकृत् ॥ २३२ ॥
सामन्तकुलिकादीनामपकारस्य कारकः ।
पञ्चाशत्पणिको दण्ड एषामिति विनिश्चयः ॥ २३३

जो अर्घ्यास योग्य असलेल्या आचार्यादिकांचा आक्षेप व आज्ञेचें उल्लंघन करतो, जो भ्रात्याच्या भार्येला ताडन करतो. जो देईन म्हणून मान्य केलेल्या अर्थाचें प्रदान करीत नाहीं, जो मुद्रित ( मोहोर केलेल्या ) घराला मोहोर फोडून उघडतो, त्याचप्रमाणें आपलें, घर, क्षेत्र इत्यादिकांस ज्याचें घर, क्षेत्र इत्यादि लागलेलें आहे त्यांना ( अर्थात् शेजारचें घर, शेत यांच्या स्वामींना ) आपल्या कुलांत उत्पन्न झालेल्या लोकांना व स्वग्राम, स्वदेश इत्यादिकांतील जनांना जो अपकार करतो त्या सर्वांना पन्नास पण दंड करावा २३२, २३३.

स्वच्छंदं विधवागामी विक्रुष्टे नाभिधावकः ।
अकारणे च विक्रोष्टा चण्डालश्चोत्तमान्स्पृशेत् ॥ २३४ ॥
शूद्रप्रव्रजितानां च दैवे पित्र्ये च भोजकः ।
अयुक्तं शपथं कुर्वन्नयोग्ये योग्यकर्मकृत् ॥ २३५ ॥
वृषशूद्रपशूनां च पुंस्त्वस्य प्रतिघातकृत् ।
साधारणस्यापलापी दासीगर्भविनाशकृत् ॥ २३६ ॥
पितापुत्रस्वसृभ्रातृदम्पत्याचार्यशिष्यकाः ।
एषामपतितान्योन्यत्यागी च शतदण्डभाक् ॥ २३७ ॥

जो नियोगावांचून स्वेच्छेनें विधवेशीं गमन करतो, जो समर्थ असूनही चौरादिकांच्या भयानें आकुळ झालेल्या लोकांनीं मोठ्यानें आक्रोश केला तरी धावून जात नाहीं, जो व्यर्थ आक्रोश करतो, जो चाण्डाल ब्राह्मणादिकांस स्पर्श करतो, जो दिगंबरादिक शूद्र संन्याशांना दैव व पित्र्य कर्मामध्यें भोजन घालतो, जो अयोग्य शपथ घेतो, जो शूद्रादि अयोग्य पुरुष अध्ययनादि योग्य कर्म करतो, जो बैल व बकरे, मेंढे इत्यादि क्षुद्र पशू यांच्या पुरुषत्वाचा विनाश करतो. ( कोठें कोठें ‘ वृक्षक्षुद्रपशूनां च ’ असा पाठ आहे. तेथें वृक्ष म्हणजे हिंगु प्रभृति वृक्ष. त्यांच्यावर औषधादि घालून त्यांच्या फलपुष्पांचा नाश करणारा, असा अर्थ करावा. ) जो साधारण ( समायिक अनेक स्वामिक ) धनाचा अपहार करतो, दासीच्या गर्भास पाडविणारा, पिता-पुत्र, बहिण-भाऊ, पति-पत्नी व आचार्य-शिष्य यांतील जे कोणी पतित न झालेल्या ( अर्थात् अति शुद्ध अशा ) परस्परांस सोडतात

त्यांतील प्रत्येकास शंभर पण दंड करावा. (ते सर्व शतपण दंडास योग्य आहेत) २३४-२३७.

आतां साहसाच्या प्रसंगानें तसलेच अपराध करणाऱ्या परटादिकांना दंड सांगतात—

**वसानस्त्रीन्पणान् दण्ड्यो नेजकस्तु परांशुकम् ।**
**विक्रयावक्रयाधानयाचितेषु पणान्दश ॥ २३८ ॥**

नेजक म्हणजे वस्त्रें धुणारा परीट, तो जर धुवावयास दिलेलीं वस्त्रें स्वतः नेसूं किंवा अंगावर घेऊं लागला तर त्याला तीन पण दंड करावा. जो परीट दुसऱ्याचीं धुवावयास आणलेलीं वस्त्रें विकतो किंवा कांहीं काल भाड्यानें देतो, अथवा गहाण टाकितो किंवा आपल्या सुहृदांस उसनवार देतो त्याला यांतील प्रत्येक अपराधाबद्दल दहा पण दंड करावा. 'तीं धुवावयासाठीं आणलेलीं वस्त्रें त्यानें एकाद्या गुळगुळीत ( शाल्मलीसारख्या वृक्षाच्या ) फळीवर धुवावींत. पाषाणावर धुवूं नयेत, त्याच्या रंगांत बदल होईल, असें करूं नये. अथवा बदलूं नयेत. आपल्या घरांत वापरूं नयेत. तसें केल्यास तो नेजक दंड्य होतो. असें मनूनें ( अ. ८ श्लो. ३९६ ) सांगितलें आहे; पण तो जेव्हां प्रमादानें एकादें वस्त्र घालवितो तेव्हां 'तें एकदांच धुतलेलें असल्यास त्याच्या मूल्याचा आठवा भाग कमी करून तें त्यानें भरून द्यावें. दोनदां धुतलेलें असल्यास त्याची पाऊणपट किंमत द्यावी, तीनदां धुतलेलें असल्यास तिसरा भाग किंमत कमी करून दोन तृतीयांश मूल्य द्यावें आणि चार वेळां धुतलेलें वस्त्र सांडल्यास धोब्यानें त्याचें अर्धे मूल्य धन्याला द्यावें. त्यापुढें प्रत्येक धुण्याला थोडथोडें मूल्य कमी करून द्यावें; पण तें फारच जीर्ण झालेलें असल्यास त्याचें मूल्य स्वेच्छेनें ठरवावें' असें नारदानें सांगितलें आहे २३८.

**पितापुत्रविरोधे तु साक्षिणा त्रिपणो दमः ।**
**अन्तरे च तयोर्यः स्यात्तस्याप्यष्टगुणो दमः ॥ २३९ ॥**

पिता व पुत्र यांच्या कलहांत जो साक्ष देण्यास तयार होतो, त्यांच्या कलहाचें निवारण करीत नाहीं, त्याला तीन पण दंड करावा. त्यांचा कलह पणासह असल्यास त्यांतील पण देण्याविषयीं जो जामीन होतो किंवा त्यांचा कलह जो वाढवितो त्याला पूर्वदंडाच्या आठपट म्हणजे चोवीस पण दंड करावा. पति व पत्नी, भ्राता व बहीण यांच्या मधील कलह वाढविणारासही हाच दंड करावा. २३९.

**तुलाशासनमानानां कूटकृन्नाणकस्य च ।**
**एभिश्च व्यवहर्ता यः स दाप्यो दममुत्तमम् ॥ २४० ॥**

तुला ( तोलण्याचा दंड ) पूर्वी सांगितलेलें शासन, प्रस्थ, द्रोण, खारी, शेर (पायली) इत्यादि मान ( मापें ), राजमुद्रायुक्त पैसा, पै, रुपाया इत्यादि नाणीं यांना कूट ( मिथ्या ) देशप्रसिद्ध प्रमाणाहून न्यून अथवा अधिक प्रमाणाचीं किंवा नाण्यांवर खोटी मुद्रा करून

अथवा आंतून तांबें व वरून सोनें, रुपें इत्यादिकांचें तकट यांच्या योगानें चालू नाण्यासारखीं नाणीं करणारा व तीं कूट आहेत हें जाणूनही त्यांच्या योगानें व्यवहार करणारा या दोघांनाही उत्तम साहस दंड करावा २४.

आतां नाण्याचें परीक्षण करणाराविषयीं सांगतात—

अकूटं कूटकं ब्रूते कूटं यश्चाप्यकूटकम् ।
स नाणकपरीक्षी तु दाप्य उत्तमसाहसम् ॥ २४१ ॥

जो नाण्याचा परीक्षक ज्याच्या पोटांत तांबें, पितळ इत्यादि आहे अशा द्रम्मादि नाण्यास खरें म्हणतो व खऱ्या नाण्याला खोटें समजतो त्यालाही उत्तम साहस दंड करावा २४१.

आतां चिकित्सकाविषयीं सांगतात—

भिषङ्मिथ्याचरन्दण्ड्यस्तिर्यक्षु प्रथमं दमम् ।
मानुषे मध्यमं राजपुरुषेषूत्तमं दमम् ॥ २४२ ॥

जो आयुर्वेदास न जाणणाराच मिथ्या वैद्य जीवनाकरितां मी चिकित्सितज्ञ आहे, असें सांगून पशु, पक्षी, मनुष्य, राजपुरुष इत्यादिकांची चिकित्सा चालवितो त्याला क्रमानें प्रथम, मध्यम व उत्तम साहस दंड करावा. त्यांतल्यात्यांत पश्वादि तिर्यक्प्राण्यांच्या विशेष मूल्यानुसार, विशेष वर्णांच्या अनुसार व राजाच्या सामीप्यानुसार दंडाच्या न्यूनाधिकतेची कल्पना करावी २४२.

अवध्यं यश्च बध्नाति बद्धं यश्च प्रमुञ्चति ।
अप्राप्तव्यवहारं च स दाप्यो दममुत्तमम् ॥ २४३ ॥

बंधनास योग्य नसलेल्या ( म्हणजे अनपराधी ) पुरुषास जो राजाज्ञेवाचून बद्ध करतो अथवा जो बांधून व्यवहाराकरितां आणलेल्या पुरुषास व्यवहार पूर्ण झालेला नसतांच सोडतो त्याला उत्तम साहस दंड द्यावा २४३.

मानेन तुलया वापि योंशमष्टमकं हरेत् ।
दण्डं स दाप्यो द्विशतं वृद्धौ हानौ च कल्पितम् ॥ २४४ ॥

जो वाणी व्रीहि, कापूस इत्यादि पण्याचा ( मालाचा ) आठवा अंश खोट्या मापानें, अथवा दुसऱ्या एकाद्या लबाडीनें हरण करतो त्याला दोनशें पण दंड करावा. अपहृत ( अपहार केलेल्या ) धनाची हानि किंवा वृद्धि झाल्यास ( म्हणजे वाप्यानें वर सांगितलेल्या अष्टमांशाहून कमी किंवा अधिक द्रव्याचा अपहार केल्यास ) त्या मानानें दंडही कमी अथवा अधिक करावा २४४.

भेषजस्नेहलवणगन्धधान्यगुडादिषु ।
पण्येषु प्रक्षिपन् हीनं पणान्दाप्यस्तु षोडश ॥ २४५ ॥

औषधद्रव्य, घृतादि स्नेह, लवण, वाळा इत्यादि सुगंधी द्रव्य, धान्य, गुळ व आदि-शब्दानें हिंग, मिरच्या इत्यादि यामध्यें जो वाणी असार द्रव्य विकण्यासाठीं मिळवतो त्याला सोळा पण दंड करावा २४५.

मृच्चर्ममणिसूत्रायःकाष्ठवल्कलवाससाम् ।
अजातौ जातिकरणे विक्रेयाष्टगुणो दमः ॥ २४६ ॥

हलक्या जातीची ( कमी किंमतीची ) माती, चामडें, रत्न, सूत, लोखंड, काष्ठ, वल्कल, व वस्त्र यांचे ठिकाणीं विकण्यासाठीं निराळा वास, रंग, रस इत्यादिकांचा संचार करून जो विकतो त्याला त्या विकावयाच्या वस्तूच्या मूल्याच्या आठपट दंड करावा. जसें—मल्लिकेचा आमोद मातीला लावून तिला सुगंधामलक औषध म्हणणें, मांजरांच्या चामड्यास उंची रंग देऊन तें व्याघ्राचें आहे म्हणून विकणें, स्फटिक मण्यास रंग देऊन पद्मराग म्हणून दाखविणें, कापसाच्या सुताला तुळतुळीत बनवून तें रेशमाचें सूत आहे म्हणून विकावयास ठेवणें, लोखंडास घासून व मुलामा देउन ही चांदी आहे असें सांगणें, बेलाच्या लाकडाला चंदनाचा वास देऊन तें चंदन आहे म्हणून दुकानांत मांडणें, कंकोळास त्वक्संज्ञक लवंग म्हणणें, कापसाच्या वस्त्रास तुळतुळीत करून ते रेशमाचें आहे असें सांगणें इत्यादि अजातीच्या द्रव्यामध्यें उत्तम जातीच्या द्रव्यांच्या संचाराची उदाहरणें जाणावीं २४६.

समुद्रपरिवर्तं च सारभाण्डं च कृत्रिमम् ।
आदानं विक्रयं वाऽपि नयतो दण्डकल्पना ॥ २४७ ॥
भिन्ने पणे तु पञ्चाशत् पण तु शतमुच्यते ।
द्विपणो द्विशते दण्डो मूल्यवृद्धौ च वृद्धिमान् ॥ २४८ ॥

मुद्रेनें युक्त असलेल्या ( मोहोरबंद ) करण्डकाचें ( पेटी, ट्रंक, थैली इत्यादिकांचें ) परिवर्तन करणें, म्हणजे मोत्यानें भरलेली पेटी, डबा, करंडा इत्यादि दाखवून नंतर हस्तलाघवानें ( हातचलाखीनें ) जो स्फटिकांनीं भरलेला करंडा देतो, अथवा जो कस्तूरिकादि कृत्रिम वस्तु तयार करून विकावयास ठेवतो अथवा गहाण ठेवतो त्याला पुढें सांगितल्याप्रमाणें दंड द्यावा. त्यानें त्या कृत्रिम कस्तूरिकादि वस्तूंचें मूल्य कमी घेतल्यास ( म्हणजे खऱ्या कस्तूरीच्या मूल्याहून कमी भावानें विकल्यास ) त्याला पन्नास पण दंड करावा. योग्य किंमतीस विकल्यास शंभर पण दंड द्यावा. व दुप्पट मूल्य घेतल्यास दोनशें दंड द्यावा. सारांश मूल्य वाढविलें असल्यास दंडही अनुमानानें वाढवावा २४७, २४८.

संभूय कुर्वतामर्घं सबाधं कारुशिल्पिनाम् ।
अर्घस्य ह्रासं वृद्धिं वा जानतो दम उत्तमः ॥ २४९ ॥

राजानें निरूपण केलेल्या मूल्याचा ऱ्हास किंवा वृद्धि यांना जाणणारेही जे वाणी

आपसांत एकमत होऊन रजक, शिल्पकार, चित्रकार इत्यादिकांस बाधा ( पीडा ) करणारें दुसरें मूल्य धनलोभानें करितात त्यांना सहस्रपण दंड करावा २४९.

संभूय वणिजा पण्यमनर्घ्येणोपरुन्धताम् ।
विक्रीणतां वा विहितो दण्ड उत्तमसाहसः ॥ २५० ॥

तसेंच जे वैश्य आपसांत एकमत होऊन दुसऱ्या देशांतून आलेला माल ( पण्य ) कमी मूल्यानें मागूं लागतात व ( अशा रीतीनें ) त्याला प्रतिबंध करितात अथवा आपला माल अधिक मूल्यानें विकतात त्यांनाही मन्वादिकांनीं उत्तमसाहस दंड सांगितला आहे २५०.

तर मग कोणत्या मूल्यानें मालाची देव-घेव करावी ? तें सांगतात—

राजनि स्थाप्यते योऽर्घः प्रत्यहं तेन विक्रयः ।
क्रयो वा निःस्रवस्तस्माद्वणिजा लाभकृत्स्मृतः ॥ २५१ ॥

राजा समीप असतांना त्यानें जी किंमत सांगितली असेल त्या मूल्यानें प्रत्यहीं क्रय किंवा विक्रय करावा. राजानें निरूपण केलेल्या मूल्यांतून जो विशेष राहतो तोच वाण्यांना लाभकारी होत असतो. स्वेच्छेनें ठरविलेला विशेष लाभकारी होत नाहीं. मनूनें ' पञ्चरात्रे पञ्च ० '(अ, ८ श्लो. ४०२ ) या वचनांत 'राजानें प्रत्येक पांचव्या दिवशीं, पंधराव्या दिवशीं अथवा प्रतिमासीं वाण्यांच्या पण्याचें मूल्य निश्चित करावें ' असें सांगितलें आहे २५१.

स्वदेशपण्ये तु शतं वणिग्गृह्णीत पञ्चकम् ।
दशकं पारदेश्ये तु यः सद्यः क्रयविक्रयी ॥ २५२ ॥

आपल्या देशांतच मिळालेलें पण्य घेऊन जो विकतो त्यानें शेंकडा पांच पण लाभ घ्यावा. पण परदेशांतून जें पण्य आणलें असेल त्यावर शेंकडा दहा लाभ मिळवावा. पण हा लाभ ज्या दिवशीं माल खरेदी केला असेल त्याच दिवशीं विकल्यास जाणावा. आणि जो माल कांहीं दिवस राहून नंतर खपतो त्यावर जितका अधिक काल जाईल तितका अधिक लाभ कल्पावा. अर्थात् वाण्याला स्वदेशांतील मूळ धनावर शेंकडा पांच लाभ होईल अशा बेतानेंच मूल्य ठरवावें. २५२.

आतां परदेशांतील पण्याचें मूल्य ठरविण्याचा प्रकार सांगतात—

पण्यस्योपरि संस्थाप्य व्ययं पण्यसमुद्भवम् ।
अर्घोऽनुग्रहकृत्कार्यः क्रेतुर्विक्रेतुरेव च ॥ २५३ ॥

दुसऱ्या देशांतून आलेल्या पण्यावर तेथें जाणें, येणें, भांडवलाचा व्यय करणें, येथवर आणावयास मजूरी देणें, जकातीच्या नाक्यावरून कर भरणें इत्यादिकांच्या योगानें झालेल्या खर्चाची गणना करून व तो खर्च पण्यमूल्यांत मिळवून मूळच्या शंभरपण भांडवलांवर दहापण लाभ व्यापाऱ्यास होईल, असें मूल्य विकत घेणारा व विकणारा या दोघांच्याही अनुग्रहाकरितां राजानें स्थापावें २५३.

इति साहसप्रकरणम् २०.

———

# अथ विक्रीयासंप्रदानप्रकरणम् २१.



याप्रमाणें प्रासंगिक प्रकरण संपवून आतां विक्रीयासंप्रदान प्रकरण आरंभितात. त्याचें स्वरूप नारदानें असें सांगितलें आहे.-मूल्यानें पण्य विकून विकत घेणाराला तें न दिल्यानें जें विवादपद उद्भवतें त्याला विक्रीयासंप्रदान म्हणतात. त्यांतील विक्रेय ( विकावयाचा ) द्रव्याचे चराचर भेदानें दोन प्रकार सांगून पुनः त्यानेंच असे सहा प्रकार सांगितले आहेत.- या जगांत स्थावर व जंगम असें दोन प्रकारचें पण्य आहे. पण त्याचा दानादानाविधि सहा प्रकारचा सांगितला आहे. गणित, तुलित, मेय, क्रियेच्या योगानें, रूपानें व श्रीनें उपलक्षित सुपाऱ्या इत्यादि हें गणित पण्य; सुवर्ण, कस्तुरी, कुंकुम, इत्यादि तुलित; तांदूळ, साळी, इत्यादि मेय; वाहणें, दोहन इत्यादि क्रियांवरून उपलक्षित होणारें अश्व, म्हैस इत्यादि हें क्रियेनें उपलक्षित; वेश्या, नट इत्यादि हें रूपतः उपलक्षित व मरकतमणि, पद्मरागमणि, इत्यादि हें श्रीनें म्हणजे दीप्तीनें उपलक्षित पण्य होय. असो; आतां हें सहाही प्रकारचें पण्य एकवार विकून मागून न देणाऱ्या व्यापाऱ्यास दंड सांगतात—

गृहीतमूल्यं यः पण्यं क्रेतुर्नैव प्रयच्छति ।
सोदयं तस्य दाप्योऽसौ दिग्लाभं वा दिगागते ॥ २५४ ॥

विकणारानें ज्याचें मूल्य घेतलें आहे, त्याला गृहीतमूल्य पण्य म्हणतात. तें जर विकणारा मागत असलेल्या स्वदेशस्थ क्रेत्याला ( विकत घेणाराला ) देत नसेल, किंवा तें पण्य जर विकत घेतांना महाग ( बहुमूल्य ) असून पुढें स्वस्त ( अल्पमूल्य ) झालें असेल तर मूल्य उतरल्यामुळें स्थावर-जंगमात्मक पण्याची जी वृद्धि झाली असेल तिच्यासह तें स्थावर-जंगमात्मक पण्य विकणाराकडून विकत घेणारास देववावें. पण जेव्हां मूल्य उतरल्यामुळें पण्याची वृद्धि होत नाहीं तेव्हां विकत घेतांना जेवढ्या मूल्यास जितकें पण्य ठरलें असेल तितकेंच तें घेऊन त्या देशांत विकणाराला जो लाभ होईल तितक्याच उदयासह अथवा दुप्पट, तिप्पट इत्यादि सांगितलेल्या वृद्धिसह अर्थात् विकत घेणाराच्या इच्छेप्रमाणें तें पण्य राजानें देववावें. परंतु मूल्य वाढल्यामुळें जेव्हां पण्य कमी होतें तेव्हां त्या वस्त्र-गृहादिक पण्याचा आच्छादन-सुखनिवासादिरूप जो उपभोग, त्यांसह विकणाराकडून विकत घेणारास तें पण्य देववावें. त्या अवधींत घराची भिंत पडणें, धान्याचा नाश होणें, आग लागणें, चोरी होणें, इत्यादिकांच्या योगानें जी हानि होते ती विकून पण्य न देणाऱ्या विक्रेत्याचीच होय. पूर्वीचें मूल्य देणाऱ्या क्रेत्याची नव्हे. जेव्हां एखादा क्रेता परदेशांतून पण्य घेण्याकरितां आला असेल तेव्हां तें पण्य घेऊन परदेशांत जाऊन विकणाऱ्या त्याला जो लाभ होणें शक्य असेल तितकें धन मूल्य घेऊन पण्य न देणाऱ्या विक्रेत्याकडून त्याला देववावें. पण हा सर्व

विकलेलें पण्य समर्पण करण्याचा--नियम विक्रेत्यास स्वकृत्याचा पश्चात्ताप न झाल्यास जाणावा. व पश्चात्ताप झालेला असल्यास मनूनें ' क्रीत्वा विक्रीय वा किंचित्० ' (अ० ८ श्लो. २२२) या वचनांत सांगिल्याप्रमाणें करावें २५४.

विक्रीतमपि विक्रेयं पूर्वक्रेतर्यगृह्णति ।
हानिश्चेत्क्रेतृदोषेण क्रेतुरेव हि सा भवेत् ॥ २५५ ॥

पण ज्याला पश्चात्ताप झाला आहे असा क्रेता पण्य घेण्याची इच्छा करीत नाहीं तेव्हां पूर्वी विकलेलेंही पण्य दुसऱ्यास विकावें. परंतु जेव्हां विकणारा देत असलेलें पण्य क्रेता घेत नाहीं व त्यामुळें तें विकणाऱ्यापाशींच राहून राजकृत किंवा दैवकृत संकटामध्यें नाश पावतें तेव्हां ती विकत घेणाराचीच हानि होय; विकणाराची नव्हे. कारण पण्य न घेणें या क्रेत्याच्या दोषामुळेंच तें नष्ट झालेलें असतें २५५.

राजदैवोपघातेन पण्ये दोषमुपागते ।
हानिर्विक्रेतुरेवासौ याचितस्याप्रयच्छतः ॥ २५६ ॥

पण क्रेता मागत असलेलेंही पण्य जेव्हां विक्रेता देत नाहीं व त्याला त्याविषयीं पश्चात्तापही होत नाहीं आणि इतक्यांत राजकृत किंवा दैवकृत दोषानें तें पण्य नष्ट होतें तेव्हां ती विक्रेत्याचीच हानि होय. यास्तव त्यानें तसलेंच दुसरें अदुष्ट (चांगलें) पण्य क्रेत्यास द्यावें २५६.

अन्यहस्ते च विक्रीतं दुष्टं वाऽदुष्टवद्यदि ।
विक्रीणीते दमस्तत्र मूल्यात्तु द्विगुणो भवेत् ॥ २५७ ॥

जो पुनः मनांत कांहीं शंका न आणतां एकाच्या हातांत विकलेलें पण्य दुसऱ्याला विकतो अथवा दोषयुक्त पण्याचा दोष लपवून तें विकतो त्याला त्या पण्याच्या मूल्याच्या दुप्पट दम जाणावा. हा सर्व विधि ज्याचें मूल्य दिलें असेल त्या पण्याविषयींच जाणावा. कारण ज्या पण्याचें मूल्य न देतां नुसता तोंडी विक्रय झालेला असतो त्यांत क्रेता व विक्रेता यांच्यामध्यें नियम करणारा कांहीं विशेष करार झालेला नसल्यास त्यांनीं त्या पण्याचें ग्रहण, अग्रहण, दुसऱ्यास देणें, इत्यादि प्रवृत्ति अथवा निवृत्ति केली तरी कांहीं दोष नाहीं. नारदानेंही असेंच सांगितलें आहे २५७.

असो; येथवर विक्रयानुशय सांगितला. क्रीतानुशयाचें स्वरूप तर पूर्वीच वर्णिलें, आतां त्या दोन्ही अनुशयास साधारण, असा धर्म सांगतात--

क्षयं वृद्धिं च वणिजा पण्यानामविजानता ।
क्रीत्वा नानुशयः कार्यः कुर्वन् षड्भागदण्डभाक् ॥२५८॥

परीक्षा करून विकत घेतलेल्या पण्याची—विकत घेतल्यानंतर क्रयकालाचा परिणाम होऊन त्यामुळें-मूल्यकृत वृद्धि न पाहणाऱ्या क्रेत्यानें पश्चात्ताप करूं नये. त्याचप्रमाणें विक्रेत्यानेंही महामूल्याच्या योगानें पण्याचा क्षय झालेला नाहीं, म्हणून पश्चात्ताप पावूं नये. अर्थात् वृद्धि व क्षय यांचें ज्ञान झालें असतां क्रेता व विक्रेता यांस पश्चात्ताप होतो, असें यावरून ठरतें. नारदानें पश्चात्तापाचा अवधि असा सांगितला आहे. मूल्य देऊन एकादें पण्य घेतल्यावर आपल्याला हें कांहीं चांगलेंसें मिळालें नाहीं, असें विकत घेणारास वाटल्यास त्यानें ज्याच्यापासून तें घेतलें असेल त्याला त्याच दिवशीं त्या पण्याला कांहीं विकार न करितां, जसेंच्या तसेंच परत द्यावें. तो दुसऱ्या दिवशीं पण्य देऊं लागल्यास त्यानें मूल्यांतील तिसावा भाग कमी घ्यावा. तिसऱ्या दिवशीं तें द्यावयाचें झाल्यास क्रेत्यानें त्याच्या दुप्पट मूल्य कमी घ्यावें. त्यानंतर म्हणजे चवथ्या दिवशीं त्याला तें परत करितांच येत नाहीं.

परंतु पण्याचें चांगलें परीक्षण न करतांच देवघेव झालेली असल्यास पण्याच्या वैगुण्यासंबंधीं अनुशयाचा अवधि दहा, एक, पांच, सात इत्यादि दिवस हा सांगितलाच आहे. यास्तव या वचनावरून पण्याच्या वृद्धीचें अथवा क्षयाचें परिज्ञान हेंच पश्चात्तापाचें कारण आहे, असें कळतें. त्याचप्रमाणें पण्याचें परीक्षण करण्याविषयीं सांगितलेलें असल्यामुळें पण्याचे दोष हेंही अनुशयाचें कारण आहे, असें ठरतें. यास्तव पण्याचे दोष, त्याची वृद्धि, व क्षय या तीन कारणांच्या अभावीं अनुशयास सांगितलेल्या कालाच्या आंतही जरी क्रेत्याला अनुशय झाला तरी त्याला पण्याच्या मूल्याचा सहावा भाग दंड करावा. अनुशयाचें कारण असलें तरी अनुशयास सांगितलेला काल निघून गेल्यावर अनुशय करणारास दंड करावा. मनूनें ( अ. ८ श्लो. २२३ ) सांगितलेला दंड करावा २५८.

इति विक्रीयासंप्रदानप्रकरणम् २१.

---

# अथ संभूयसमुत्थानप्रकरणम् २२.



आतां संभूयसमुत्थान या नांवाचें विवादपद सांगतात—

**समवायेन वणिजां लाभार्थं कर्म कुर्वताम् ।**
**लाभालाभौ यथाद्रव्यं यथा वा संविदा कृतौ ॥ २५९ ॥**

आम्ही सर्व मिळून हें कर्म करूं, अशा प्रकारची जी अनेकांची मान्यता तिला समवाय ( संघ ) म्हणतात. त्या समवायानें जे वैश्य, नट, नर्तक, इत्यादि लाभ मिळविण्याची इच्छा करून आपापलें कर्म करितात त्यांना लाभ व अलाभ ( वृद्धि व हानि ) त्यांच्या

द्रव्यानुसार द्यावे. ( म्हणजे मिळून काम करणाऱ्या त्यांच्यांतील ज्यानें जितकें धन ( पण्य घेण्यास भांडवल ) दिलें असेल त्याच्या अनुसार त्याला लाभ अथवा तोटा त्याचा विभाग मिळतो. ) किंवा मुख्य व गौण भावाचा विचार करून याला यांतील दोन भाग, याला एक भाग इत्यादि पूर्वींच जशी भाषा ठरली असेल त्याप्रमाणें हानि व लाभ यांचे विभाग जाणावे २५९.

**प्रतिषिद्धमनादिष्टं प्रमादाद्यच्च नाशितम् ।**
**स तद्दद्याद्विप्लवाच्च रक्षितादृशमांशभाक् ॥ २६० ॥**

याप्रमाणें मिळून व्यवहार करणाऱ्या त्यांच्यापैकीं जो कोणी नियमाविरुद्ध ( ह्या अमुक पण्याचा हा असा व्यवहार करूं नये इत्यादि समवायानें केलेल्या कायद्याच्याविरुद्ध ) आचरण केल्यामुळें अथवा समवायाची आज्ञा नसतांना आपल्याच बुद्धीनें एकादें कार्य केल्यामुळें किंवा प्रमाद व अज्ञान यामुळें ज्या पण्याचा विनाश करतो त्यानें तें ( पण्य ) समवायांतील इतरांस द्यावें. त्यांतील जो कोणी चोर, राजा इत्यादिकांपासून प्राप्त झालेल्या संकटांत समायिक पण्याचें मोठ्या शौर्यानें व शहाणपणानें रक्षण करतो त्यालाही त्या रक्षण केलेल्या पण्याचें दशमांश मूल्य पारितोषिक मिळतें २६०.

**अर्घप्रक्षेपणाद्विंशं भागं शुल्कं नृपो हरेत् ।**
**व्यासिद्धं राजयोग्यं च विक्रीतं राजगामि तत् ॥ २६१ ॥**

इतक्या पण्याचें हें इतकें मूल्य आहे, असा निश्चय करणें याला अर्घ म्हणतात. त्याचा निश्चय राजाच्या निरूपणानें होत असल्यामुळें त्या राजानें त्या अर्घाचा विसावा अंश शुल्क रूपानें घ्यावा. पण राजानें 'याला दुसऱ्या कोठेंही विकूं नये ' असें म्हणून ज्याचा निषेध केला असेल तें राजयोग्य मणि-माणिक्यादि व राजानें ज्याचा निषेध केलेला नाहीं असेंही दुसरें एकादें द्रव्य राजाला न कळवितांच लाभाच्या लोभानें जर एकाद्यानें विकलें तर राजानें तें सर्व पण्य मूल्यदानाचीही अपेक्षा न करितां हरण करावें २६१.

**मिथ्या वदन् परीमाणं शुल्कस्थानादपासरन् ।**
**दाप्यस्त्वष्टगुणं यश्च स व्याजक्रयविक्रयी ॥ २६२ ॥**

जो वाणी राजाला द्यावयाचें शुल्क वाचावें म्हणून पण्याचें परिमाण खोटें सांगतो अथवा शुल्कग्रहणस्थानांतून पसार होतो, अथवा ' हें याचें कीं दुसऱ्याचें ? ' असें म्हणून विवादांत पडलेलें पण्य जो विकतो त्या सर्वांना पण्याच्या मूल्याच्या आठपट दंड करावा २६२.

**तरिकः स्थलजं शुल्कं गृह्णन् दाप्यः पणान् दश ।**
**ब्राह्मणप्रातिवेश्मानामेतदेवानिमन्त्रणे ॥ २६३ ॥**

शुल्क स्थलज व जलज असें दोन प्रकारचें आहे. त्यांतील स्थलज शुल्क २६१ ह्या

श्लोकांत सांगितलें. जलज शुल्क मनुस्मृतींत ' पणं यानं तरे दाप्यं० ' (अ. ८ श्लो. ४०४, ५, ७) इत्यादि वचनांनीं सांगितलें आहे. (त्यांत नौकेंतून वाहून नेल्याजाणाऱ्या निरनिराळ्या वस्तूंचें शुल्क–भाडें सांगितलें आहे.) त्या दोन्ही प्रकारच्या शुल्काविषयीं ' शिल्पवृत्ति, शिशु, दूत, भिक्षेनें मिळविलेलें धन, श्रोत्रिय, संन्याशी, यज्ञ इत्यादिकांवर शुल्क घेऊं नये, ' असा आणखी एक विशेष सांगितला आहे. असो; ज्याच्या योगानें पाण्यांतून तरून जातां येतें त्या साधनाला तरि (नाव इत्यादि) म्हणतात. त्या तरीपासून उत्पन्न होणारें शुल्क वसूल करावयासाठीं नेमलेला जो अधिकारी तो तरिक होय. त्यानें जर स्थलजन्य शुल्क घेतलें तर त्याला दहा पण दंड करावा. आपल्या घरासमोर व बाजूस असलेल्या घराला प्रतिवेश्म म्हणतात. त्यांत असलेल्या ब्राह्मणांना प्रातिवेश्म ब्राह्मण म्हणतात. अशा विद्या व सदाचरण यांनीं संपन्न असलेल्या प्रातिवेश्म ब्राह्मणांना श्राद्धादि प्रसंगीं सामर्थ्य असूनही न बोलावणाऱ्या (निमंत्रण न देणाऱ्या) पुरुषाला हाच दशपणात्मक दंड जाणावा २६३.

देशांतरीं मेलेल्या वाण्याच्या रिक्थाविषयीं सांगतात—

**देशान्तरगते प्रेते द्रव्यं दायादबान्धवाः ।**
**ज्ञातयो वा हरेयुस्तदागतास्तैर्विना नृपः ॥ २६४ ॥**

समूहरूपानें व्यवहार करणारांतील कोणी एक देशांतरीं जाऊन मरण पावला असतां त्याचा अंश दायाद (पुत्रादि अपत्यवर्ग), बंधू (मातृपक्षाचे मातुलादिक) ज्ञाति (अपत्यवर्गाहून इतर सपिंड) अथवा देशांत राहून आलेले त्याचे संभूयव्यवहाराचे भागीदार यांनीं घ्यावा. दायादादिकांतील कोणीच नसल्यास त्याचा अंश राजानें घ्यावा. श्लोकांतील 'ज्ञातयो वा०' येथील वाशब्दानें दायादादिकांचा वैकल्पिक अधिकार दाखविला आहे. त्यांच्या पूर्वापर क्रमाचा निश्चय ' पत्नी दुहितरः० ' इत्यादि १३५ व १३६ या श्लोकांत जो क्रम प्रतिपादिला आहे त्यावरून करावा. शिष्य, सहाध्यायी व ब्राह्मण यांचा निषेध व वैद्याच्या रिक्थग्रहणाची प्राप्ति, हें या वचनाचें प्रयोजन आहे. (अर्थात् या वचनानें–समूहानें व्यवहार करणांरातील कोणी मेल्यास त्याचें धन शिष्यादिकांस प्राप्त होत नाहीं, व तें भागीदार वैद्यासही प्राप्त होतें,असें दायविभागप्रकरणाच्या विरुद्ध प्रतिपादन केले आहे व एवढ्यासाठीं या वचनाची प्रवृत्ति झाली आहे.) पण वैद्यांतीलही जो त्याला पिंड देण्यास व ऋण फेडण्यास समर्थ असेल त्यानेंच त्याचा अंश घ्यावा.समूहातील सर्वच वैद्य पिंडादिदानाचे अधिकारी असल्यास त्यांनीं तें वाटून घ्यावें.पण त्या दायादादिकांतील सर्वांचाच अभाव झाल्यास राजानें दहा वर्षे त्यांच्या आगमनाची वाट पाहून त्यांतील कोणीच पुढें न आल्यास त्याचा अंश स्वतः घ्यावा. नारदानें हें सर्व असेंच स्पष्ट केलें आहे २६४.

**जिह्मं त्यजेयुर्निर्लाभमशक्तोऽन्येन कारयेत् ।**

अनेक भागीदारांनीं मिळून आरंभिलेल्या व्यवहारांत कोणी एकाद्या भागीदारानें वंचना

( लबाडी ) केल्यास त्याचा सर्व लाभ काढून घेऊन त्याला त्या व्यवहारांतून बहिष्कृत करावें. त्याचप्रमाणें त्या अनेक भागीदारांतील जो भांडवल पहाणें, ( हिशेब तपासणें, नेमलेलें काम करणें ) इत्यादि काम करण्यास समर्थ नसेल त्यानें तें आपलें काम दुसऱ्या योग्य पुरुषाकडून करवावें. असो; आतां वर सांगितलेल्या वैश्यधर्मांचा ऋत्विगादिकांच्या ठायीं अतिदेश करतात—

अनेन विधिराख्यात ऋत्विक्कर्षककर्मिणाम् ॥ २६५ ॥

लाभालाभौ यथाद्रव्यं० इत्यादि वर सांगितलेल्या धर्मानें होते, उद्गाते, इत्यादि ऋत्विज शेतकरी, नट, नर्तक, शिल्प कर्मावर उपजीविका करणारे तक्षकादि यांच्याही वर्तनाचा प्रकार सांगितला आहे, असें जाणावें. पण त्यांतील ऋत्विगांच्या धनविभागाचा विशेष प्रकार मनूनें ' सर्वेषामर्धिनो मुख्याः ० ' ( अ. ८ श्लो. २१० ) या वचनानें सांगितला आहे. त्याचा सारांश असा—ज्योतिष्टोमांत शंभर गायी ऋत्विजांच्या दक्षिणाकार्यांत दिलेल्या असतात. पण प्रत्येक यज्ञांत होता, उद्गाता, अध्वर्यु इत्यादि सोळा ऋत्विग असतात. तेव्हां त्या शतगोरूप दक्षिणेंतील कोणाचा किती अंश असतो, अशी शंका आली असतां हें वचन प्रवृत्त झालें आहे. शंभर गायींतील अठ्ठेचाळीस गायी होता, अध्वर्यु, ब्रह्मा व उद्गाता या मुख्य चौघांनीं घ्याव्या. ( मूळ श्लोकांत अर्ध्या म्हणजे पन्नास गायी या चौघांनीं घ्याव्या असें जरी म्हटलें आहे तरी गायींचा विभाग सारखा होण्याकरितां अठ्ठेचाळीस असें समजावें. ) दुसऱ्या चौघांनीं ( म्हणजे मैत्रावरुण, प्रतिप्रस्थातृ, ब्राह्मणाच्छंसि, व प्रस्तोता यांनीं ) त्याच्या अर्ध्या म्हणजे चोवीस गायी घ्याव्या. तिसऱ्या प्रतीच्या ऋत्विजांनीं ( म्हणजे अच्छावाक्, नेष्ट्रा, अग्नीध्र व प्रतिहर्ता, यांनीं ) मुख्य भागाचा तृतीयांश म्हणजे १६ गायी घ्याव्या. व ग्रावस्तुत्, उन्नेतृ पोतृ व सुब्रह्मण्य यांनीं मुख्य भागाचा चतुर्थांश म्हणजे बारा गायी घ्याव्या. पण यावर कोणी असें म्हणेल कीं, ही भागकल्पना योग्य नाहीं. कारण या व्यवहारांत कांहीं करार नाहीं, द्रव्य समवाय नाहीं व एखादें वचनही नाहीं. यास्तव ' समं स्यादश्रुतत्वात ' या न्यायानें सर्वांना सारखा अंश प्राप्त होणें अथवा कर्मानुसार अंशप्राप्ति होणेंच योग्य आहे.

या शंकेचें समाधान असें—ज्योतिष्टोम ही ज्याची प्रकृति आहे त्या द्वादशाह विकृतीमध्यें अर्द्धिनः, तृतीयिनः, पादिनः असा जो सिद्ध शब्दासारखा अनुवाद केला आहे तो त्याच्या प्रकृतिभूत ज्योतिष्टोमामध्यें मैत्रावरुणादि ऋत्विजांना अर्ध–तृतीय–चतुर्थभाक्त्व जर नसतें तर योग्य झाला नसता. यास्तव वैदिक अर्धिप्रभृति संज्ञाच्या बलानें वर सांगितलेला अंशनियम योग्यच आहे २६५.

इति संभूयसमुत्थानप्रकरणम् २२.

———

# अथ स्तेयप्रकरणम् २३.



आतां स्तेयास आरंभ करितात-त्याचें लक्षण मनूनें ' स्यात्साहसं त्वन्वयवत्० ' ( अ. ८ श्लो. ३३२ ) या वचनानें सांगितलें आहे, त्याचा सारांश असा-द्रव्याचे रक्षक, राजाध्यक्ष इत्यादिकांच्या समक्ष व बलाचा आश्रय करून जें परधन हरण केलें जातें त्याला साहस व त्याच्या विपरीत प्रकारानें ( म्हणजे द्रव्यरक्षकादिकांच्या न कळत, फसवून ) जें परधन हरण केलें जातें त्याला स्तेय म्हणतात. जो द्रव्यापहार समक्ष केलेला असतांनाही भयानें मी तो केला नाहीं, असें म्हटलें जातें तेंही स्तेय आहे. नारदानेंही ' विविध उपायांच्या योगानें लोकांना फसवून व निजलेल्या, मद्यादिकानें मत्त झालेल्या अथवा वेड्या लोकांचें जें धन लुबाडलें जातें त्याला स्तेय ( चोरी ) म्हणावें, ' असें सांगितलें आहे. पण तस्कराला धरल्यानंतर दंड होतो व चोराचें ज्ञान झाल्यानंतर त्याला धरतां येतें, असा प्रकार असल्यामुळें अगोदर ज्ञानाचा उपाय सांगतात—

ग्राहकैर्गृह्यते चौरो लोप्त्रेणाथ पदेन वा ।
पूर्वकर्मापराधी च तथा चाशुद्धवासकः ॥ २६६ ॥

जो चोर आहे, असें लोक सांगतात त्याला स्थानपालप्रभृति राजपुरुषांनीं धरावें. त्यानें हरण केलेल्या पात्रादि कांहीं वस्तू त्याच्यापाशीं मिळतांच तो चोर आहे, असा निश्चय करून त्यास धरावें. कारण चोरीस गेलेल्या मालांतील कांहीं माल एकाद्यापाशीं सापडणें, हें चोरीचें चिह्न आहे. किंवा ज्या दिवशीं चोरी झाली असेल त्या दिवसापासून चोराच्या पायांचा ( पावलांचा ) शोध करीत जाऊन चोराला धरावें. पूर्वी चोरी केल्यामुळें जो चोर म्हणून प्रसिद्ध आहे व ज्याचें निवासस्थान अप्रसिद्ध आहे त्या अशुद्ध वासकालाही धरावें २६६.

अन्येऽपि शंकया ग्राह्या जातिनामादिनिह्नवैः ।
द्यूतस्त्रीपानसक्ताश्च शुष्कभिन्नमुखस्वराः ॥ २६७ ॥
परद्रव्यगृहाणां च पृच्छका गूढचारिणः ॥
निराया व्ययवन्तश्च विनष्टद्रव्यविक्रयाः ॥ २६८ ॥

शिवाय वर सांगितलेल्या प्रकारच्या लोकांनांच धरावें असें नाहीं; तर पुढें सांगितलेल्या या लिंगावरून संशय आल्यास दुसऱ्यानांही धरावें. मी शूद्र नव्हे असें म्हणून आपल्या जातीचा निह्नव केल्यानें ( जाति नाकबूल केल्यानें ) त्याचप्रमाणें, ' मी अमुक नव्हे, ' असें म्हणून नांवाचा निह्नव केल्यानें व आदिशब्दानें स्वदेश, गांव, कुल इत्यादिकांचा निह्नव केल्यानें मनुष्य संशयाचें भाजन होतो. यास्तव अशा प्रकारच्या लोकांना धरावें. त्याचप्रमाणें

द्यूत, मद्यपान, वेश्यागमन इत्यादि व्यसनांत अतिशय आसक्त होणारे लोक प्रायः संशय घेतां येण्यासारखे असतात. चोरांना धरणाऱ्या राजपुरुषांनीं ' तूं कोठून आलास, ' असें विचारलें असतां ज्याचें तोंड उतरतें, स्वर बदलतो ( कांपरा शब्द निघूं लागतो ), कपाळावर घाम येतो त्यालाही संशयावरून धरावें. त्याचप्रमाणें जे विनाकारण या अमक्यापाशीं धन किती आहे, याचें घर कोणतें, इत्यादि विचारतात त्यांनाहीं धरावें. जे दुसरा वेष धरून व आपल्याला छपवून फिरतात, जे फारसा आय नसतांना, पुष्कळ व्यय करितात, जे सांडलेल्या ( अर्थात् जुनीं वस्त्रें, फुटकीं भांडीं इत्यादि ) द्रव्याचा, अथवा ज्यांचा स्वामी माहीत नाहीं अशा ( विनवारशी ) वस्तूंचा विक्रय करितात त्या सर्वांना चौरसंभावनेनें धरावें. असो; अशा रीतीनें ज्याच्यापाशीं नानाप्रकारचीं चौर्यलिंगें आहेत अशा पुरुषांस धरून ते चोर आहेत कीं साधु ( भले ) आहेत, त्याचें चांगलें परीक्षण करावें. केवल चोराचें चिह्न दिसलें म्हणून तेवढ्यावरूनच एकादा चोर आहे, असा निश्चय करूं नये. कारण ज्यानें खरोखर चोरी केलेली नाहीं अशा एकाद्यापाशींही लोप्त्रादि ( चोरित वस्तूचा एकदेश ) सापडण्याचा संभव असतो. कारण नारदानें ' दुसऱ्याच्या हातांतून भूमीवर पडलेली व सहज ( बुद्धिपुरःसर नव्हे. ) उचललेली अथवा चोरानें एखाद्याच्या घरांत टाकलेली अशी एकादी वस्तु एकाद्यापाशीं असण्याचा संभव आहे. यास्तव लोप्त्राचें मोठ्या यत्नानें परीक्षण करावें.' त्याचप्रमाणें ' असत्य लोक सत्य असल्यासारखे व सत्य असत्यासारखे भासतात. सारांश, अनेकांच्या ठिकाणीं अनेक भाव दिसतात. यास्तव परीक्षण सांगितलें आहे; ' असें म्हटलें आहे २६७,२६८.

याप्रमाणें चोरीच्या संशयानें धरलेल्या पुरुषानें स्वतःचें संशोधन करावें, असें सांगतात--

गृहीतः शंकया चौर्ये नात्मानं चेद्विशोधयेत् ।
दापयित्वा गतं द्रव्यं चौरदण्डेन दण्डयेत् ॥ २६९ ॥

चोरीच्या शंकेनें ज्याला धरलें आहे, तो आपल्यावरील आळ घालविण्यासाठीं आपल्याला जर शुद्ध न करील तर तो पुढें सांगितलेल्या धनदान, वध इत्यादि दंडास पात्र होईल, अशी वस्तुस्थिति असल्यामुळें त्यानें मानुष अथवा दिव्यप्रमाणानें आपला निर्दोषीपणा सिद्ध करावा. --पण ' मी चोर नाहीं, ' या मिथ्योत्तरांत तें उत्तरच अभावरूप असल्यामुळें प्रमाण कसें संभवणार ?--असें कोणी म्हणेल यास्तव त्याचें समाधान सांगतो--दिव्य भाव व अभाव या दोघांनाही विषय करतें. ( म्हणजे अमुक एक गोष्ट मी केली अथवा केली नाहीं, अशा दोन्हींविषयीं दिव्य होऊं शकतें, ) हें वर ' रुच्या वाऽन्यतरः कुर्यात् ० ' ( अ. २ श्लो. ९३ या ) वचनानें सांगितलें आहे. मानुषप्रमाण जरी साक्षात् शुद्धमिथ्योत्तरामध्यें संभवत नाहीं तरी कारणानें ( संसृष्टभावरूप मिथ्या कारणाच्या साधनाच्या द्वारा ) तें अभावालाही विषय करतेंच. जसें--ज्या वेळीं ही अमुक एक वस्तु नाश पावली अथवा चोरीस गेली तेव्हां मी दुसऱ्या देशीं होतों, असें अभियुक्तानें सिद्ध केलें असतां त्यानें चोरी केली नाहीं, हें अर्थात् सिद्ध होतें, व त्यामुळें आरोपिताची शुद्धि होतेच २६९.

चोराला दंड सांगतात—

**चौरं प्रदाप्यापहृतं घातयेद्विविधैर्वधैः ।**

जो पूर्वोक्त परीक्षेनें अथवा तिच्यावाचूनच चोर आहे, असा निश्चय होतो त्याच्याकडून स्वामीला चोरीस गेलेलें धन ( प्रत्यक्ष तेंच अथवा त्याचें मूल्य ) देववून त्याला विविध देहदंड द्यावे. हें प्रतिपादन उत्तम साहस दंड मिळण्यास योग्य असलेल्या उत्तम द्रव्याविषयीं जाणावें. पुष्पवस्त्रादि क्षुद्र व मध्यम द्रव्याच्या अपहाराविषयीं तें आहे, असें जाणूं नये. कारण ' विद्वानानीं तीन प्रकारच्या साहसांत जो दंड सांगितला आहे तोच उत्तम, मध्यम, व क्षुद्र द्रव्याची चोरी झाली असतां त्याविषयीं क्रमानें समजावा. ' अशा अर्थाच्या नारदाच्या वचनानें वधरूप उत्तम साहसाला उत्तम द्रव्यामध्येंच स्थापित केलें आहे. ' चोरांनीं सर्व धन अन्यायानेंच मिळविलेलें असल्यामुळें त्यांच्या जवळचें सर्वच धन मलात्मक असतें. यास्तव राजानें त्यांना वधदंड द्यावा. धनदंड देऊं नये, 'असें जें वृद्ध मनूचें वचन आहे तेंही महापराधाविषयीं आहे. असो; आतां विशेष प्रकारच्या चोराविषयीं अपवाद सांगतात—

**सचिह्नं ब्राह्मणं कृत्वा स्वराष्ट्राद्विप्रवासयेत् ॥ २७० ॥**

ब्राह्मण चोरानें महा अपराध जरी केला असला तरी त्याला मारवूं नये. तर त्याच्या ललाटावर चिह्न करून आपल्या देशांतून घालवून द्यावें. मनूनें ' गुरुतल्पे भगः कार्यः ०. ' ( अ. ९ श्लो. २३७ ) या वचनांत सांगितल्याप्रमाणें त्याच्या मस्तकावर कुत्र्याच्या पायाचा ठसा उमटवावा. पण हें मस्तकादिकांवरील अंकन ( चिह्न करणें, डाग ) दंडानंतर चोरांनीं प्रायश्चित्त न केल्यास जाणावें. कारण मनूनें ' प्रायश्चित्तं तु कुर्वाणाः० ' ( अ. ९ श्लो. २४० ) या वचनांत तसें सांगितलें आहे २७०.

चोर सांपडलेला नसतानां चोरीस गेलेल्या द्रव्याच्या प्राप्तीचा उपाय सांगतात—

**घातितेऽपहृते दोषो ग्रामभर्तुरनिर्गते ।**
**विवीतभर्तुस्तु पथि चौरोद्धर्तुरवीतके ॥ २७१ ॥**

जर एकाद्या ग्रामामध्यें मनुष्यादि प्राण्याचा वध अथवा धनाचा अपहार ( चोरी ) झाला तर त्यांत त्या ग्रामपतीचाच चोरांची उपेक्षा करणें, हा अपराध असतो. यास्तव त्याचा परिहार करण्यासाठीं त्यानेंच चोराला धरून राजाच्या स्वाधीन करावें. पण तसें करण्यास अथवा आपल्या गांवांतून चोराचीं पावलें बाहेर गेलीं आहेत असेंही दाखविण्यास जर तो असमर्थ झाला तर त्यानें स्वतः चोरीस गेलेलें धन स्वामीला द्यावें. परंतु त्यानें चोरांचीं पावलें आपल्या गावांतून बाहेर गेलीं आहेत, असें दाखविल्यास तीं ज्या गांवांत शिरलीं असतील त्या गांवच्या अधिपतीनें चोराला धरून द्यावें. अथवा चोरीस गेलेलें धन स्वामीला द्यावें. विवीत प्रदेशीं जर चोरी झाली असली तर त्यास विवीत स्वामीचाच दोष असतो. जेव्हां मार्गामध्यें किंवा क्षेत्रामध्यें धनाचा अपहार होतो तेव्हां चोराचा उद्धार करणाऱ्या मार्गपालाचा किंवा दिक्पालाचा तो अपराध आहे २७१.

स्वसीम्नि दद्याद्ग्रामस्तु पदं वा यत्र गच्छति ।
पञ्चग्रामी बहिः क्रोशाद्दशग्राम्यथवा पुनः ॥ २७२ ॥

जेव्हां गांवांच्या बाहेर सीमेवरील क्षेत्रांत चौर्यादिक होतें तेव्हां चोरांचीं पावलें सीमेच्या बाहेर उमटलेलीं न दिसल्यास त्या ग्रामांत राहणाऱ्या लोकांनींच तें भरून द्यावें. पण तीं बाहेर निघून ग्रामादिकांत गेलीं असल्यास त्या ग्रामादिकांतील लोकांवर चोरित धन देण्याचा अथवा चोराला धरून देण्याचा भार असतो. जेव्हां अनेक ग्रामांच्या मध्यभागीं पण त्यांतील प्रत्येक ग्रामाच्या बाहेर एक कोसभरच अंतरावर एखाद्याचा वध किंवा चोरी होते व चोरांचीं पावलें लोकांच्या रहदारीमुळें बुझून जातात तेव्हां त्यांतील पांच किंवा दहा ग्रामांनीं मिळून त्या अत्याचाराचा भार सहन करावा. पांच किंवा दहा हा विकल्प ग्रामांच्या समीपतेप्रमाणें अनेक ग्रामांनीं चोरीस गेलेलें धन परत द्यावें इत्यादि सुचविण्यासाठीं आहे. पण अपहृत द्रव्य दुसऱ्याकडून देवविण्यास राजा जेव्हां समर्थ होत नाहीं तेव्हां त्यानें तें स्वामीला आपल्या कोशांतून द्यावें. कारण गौतमाचें तसें स्पष्ट वचन आहे. चोरलेलें आहे किंवा नाहीं; या विषयीं (म्ह. चोरी झाली किंवा नाहीं याविषयींच) संशय आल्यास मानुषप्रमाण अथवा दिव्य यावरून निर्णय करावा. कारण वृद्ध मनूनें तसें सांगितलें आहे. २७२.

आतां विशेष अपराधास विशेष दंड सांगतात—

वन्दिग्राहांस्तथा वाजिकुञ्जराणां च हारिणः ।
प्रसह्यघातिनश्चैव शूलानारोपयेन्नरान् ॥ २७३ ॥

युद्धांत जिंकून बंदी केलेले (अथवा मनूनें (अ. ९ श्लो. ३८० मध्यें) सांगितल्याप्रमाणें कोष्ठागार (कोठी), आयुधागार, देवतागार इत्यादिकांस फोडणारे) हत्ती घोडे इत्यादिकांचें हरण करणारे व बलात्कारानें वध करणारे यांना शूलावर (सुळावर) चढवावें २७३.

उत्क्षेपकग्रन्थिभेदौ करसन्देशहीनकौ ।
कार्यौ द्वितीयापराधे करपादैकहीनकौ ॥ २७४ ॥

उत्क्षेपक (वस्त्रादिकांचा अपहार करणारा) व ग्रन्थिभेदक (वस्त्रादिकांत बांधलेल्या सुवर्णादिकांस सोडून किंवा कापून हरण करणारा) यांनां क्रमानें हस्तरहित व संदेशसदृश (चिमट्यासारख्या) आंगठा व तर्जनी यांनीं हीन करावें. (अर्थात् पहिल्याचा सर्व हात व दुसऱ्याचीं दोन बोटें कापावीं.) दुसऱ्या अपराधाचेवेळीं त्यांतील प्रत्येकाचा एक हात व एक पाय कापावा. हें सुद्धां उत्तम साहस दंड प्राप्त होण्यास योग्य असलेल्या द्रव्याविषयीं जाणावें. कारण नारदानें ‘ तदङ्गच्छेद इत्युक्तो दण्ड उत्तमसाहसे ’ असें म्हटलें आहे. तिसऱ्या अपराधाच्या वेळीं तर मनूनें ‘ अंगुलीर्ग्रन्थिभेदस्य० ’ (अ. ९ श्लो. २७७) या वचनांत

सांगितल्याप्रमाणें वधच करावा. हा सर्व दंड जाति, द्रव्याचें परिमाण व मूल्य यांच्या अनुसार ठरवावा २७४.

जाति, द्रव्यपरिमाण, परिग्रह, विनियोग, वय, शक्ति, गुण, देश, काल इत्यादि दंडाच्या न्यूनाधिकतेचीं अनेक कारणें आहेत. त्यामुळें तीं प्रत्येक द्रव्याचीं निरानिराळीं सांगतां येणें शक्य नाहीं. यास्तव सामान्यतः दंडकल्पनेचा उपाय सांगतात—

क्षुद्रमध्यमहाद्रव्यहरणे सारतो दमः ।
देशकालवयःशक्ति संचिंत्यं दण्डकर्मणि ॥ २७५ ॥

क्षुद्र, मध्यमप्रतीच्या व उत्तमप्रतीच्या द्रव्यांचें हरण केलें असतां त्या त्या द्रव्याच्या मूल्याच्या अनुसार दंडाची कल्पना करावी. क्षुद्रादि द्रव्याचें स्वरूप त्यानेंच सांगितलें आहे— मातीचीं भांडीं, आसनें, खाटा इत्यादि शयनें, हाडांचे पदार्थ, लाकडी वस्तु, चामडें, तृण इत्यादि, शेंगांचें धान्य, शिजलेलें अन्न हें सर्व क्षुद्र द्रव्य म्हणून सांगितलेलें आहे. रेशमी वस्त्रांस सोडून बाकीचीं वस्त्रें, गायींस सोडून बाकीचे पशु, सोन्यास सोडून बाकीचे धातु आणि व्रीहि-यव इत्यादिकही हें सर्व मध्यमद्रव्य होय. सोनें, रत्नें, रेशमी वस्त्रें, स्त्रिया, पुरुष, गायी, गज, घोडे आणि देव, ब्राह्मण व राजे यांचें धन हें उत्तम द्रव्य समजावें. या तीन प्रकारच्या द्रव्यामध्यें नियमानें प्रथम, मध्यम व उत्तमसाहसरूप दंड करावा, असेंही त्यानेंच सांगितलें आहे. मातींच्या भांडयांतही मोठाले डेरे व बोळकीं, गाई—घोडे—यांस सोडून राहिलेल्या म्हैस, बकरे इत्यादि आणि ब्राह्मणसंबंधीं सुवर्ण—धान्यादि यामध्यें न्यूनाधिकता असतेच. यास्तव न्यूनाधिक विशेष दंडाची आकांक्षा झाली असतां त्या त्या वस्तूच्या मूल्यादिकांच्या अनुसार दंडाची योजना करावी. त्यांतल्या त्यांत दंडाची योजना करीत असतांना त्यास कारण होणाऱ्या देश, काल, वय, शक्ति, जाति, द्रव्यपरिमाण इत्यादिकांचें चांगलें चिंतन करावें. याविषयीं—अष्टापाद्यं स्तेयकिल्बिषं शूद्रस्य, द्विगुणोत्तराणीतरेषां, प्रतिवर्णं विदुषोऽतिक्रमे दण्डभूयस्त्वमिति—असें म्हटलें आहे. याचा मथितार्थ असा—येथील किल्बिषशब्दाचा लाक्षणिक अर्थ दंड असा आहे. विद्वान् शूद्रानें अपहार केलेला असल्यास त्याला ज्या अपहारामध्यें जो दंड सांगितलेला असेल त्याच्या आठपट अधिक दंड द्यावा. इतरांना म्हणजे विद्वान् वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण यांना उत्तरोत्तर दुप्पट दंड द्यावा. म्हणजे विद्वान् वैश्यास सोळापट, क्षत्रियास बत्तीसपट व ब्राह्मणास चवसष्टपट दंड करावा. कारण शूद्रादि विद्वान् असल्यामुळें त्यांना अधिक दंड नियत केला आहे. मनूनेंही ( अ. ८ श्लो. ३३७–३८ ) असेंच सांगितलें आहे. चोरित द्रव्याच्या अधिक परिमाणास अनुसरूनही अधिक दंड सांगितला आहे. कारण मनूनें ( अ. ८ श्लो. ३२० ) यामध्यें तसें सांगितलें आहे. हरण करणारा चोर, हरण केलें जाणारें धन व स्वामी यांच्या गुणांच्या अपेक्षेनें आणि सुभिक्ष–दुर्भिक्ष इत्यादि कालाच्या अपेक्षेनें ताडन, अंगच्छेदन इत्यादि वधरूप दंड योजावे. रत्नादिकांच्या विशेष संख्येच्या अपेक्षेनें त्याचप्रमाणें विशेष द्रव्याच्या अपेक्षेनेंही विशेष दंड सांगितला आहे. मनुस्मृतीच्या

आठव्या अध्यायाचे ३२१-३२३ श्लोक पहा. त्यांचा सारांश असा—सुवर्ण, रजत, उत्तम वस्त्रें व सर्व प्रकारचीं रत्नें यांतील शंभराहून अधिक वस्तूंचा अपहार केल्यास चोराचा वध करावा. पन्नासाहून अधिक नग चोरल्यास हात तोडावा व बाकीच्या ( म्हणजे पन्नास नगांच्या खालच्या ) चोरींत चोरी केलेल्या वस्तूंच्या मूल्याच्या अकरापट दंड करावा. पुरुष, विशेषतः कुलीन स्त्रिया व सर्व प्रकारचीं रत्नें यांचा अपहार करणाराचा वध करावा. अकुलीन पुरुषाचें हरण करणाराला उत्तम साहस दंड सांगितला आहे. स्त्रीचा अपराध केला असतां सर्वस्व दंड करावा व कन्येचें हरण करणारास वध दंड द्यावा. काष्ठें, भांडीं, तृणादिक, मृन्मय पात्रें, पाट्या, बुट्या, सुपें इत्यादि वेळूचीं पात्रें, हाडांचीं, स्नायूंचीं, चामड्यांचीं पात्रादि, भाज्या, ओलीं मुळें, फळें, वाळलेलीं मुळें, गोरस, उसाचा रस, गूळ, काकवी इत्यादि, लवण तेल, शिजलेलें अन्न, मत्स्य, मांस इत्यादि सर्व क्षुद्र द्रव्यांचें मूल्य एका माषाहून कमी असल्यास त्याच्या पांचपट दंड करावा. क्षुद्र द्रव्याविषयींही शंभरपासून पांचशेंपर्यंत जो दंड सांगितलेला आहे तो माषमूल्य अथवा त्याहून अधिक मूल्यवान पदार्थांविषयीं जाणावा. व यथायोग्य रीतीनें त्याची योजना करावी. मनूनें क्षुद्र द्रव्यांस उद्देशून 'मूल्याहून दुप्पट दंड करावा' असें जें सांगितलें आहे तें ज्यांचा कांहीं फारसा उपयोग नाहीं, अशा पणत्या, परळें, वोळकीं इत्यादिकांविषयीं जाणावें. त्याचप्रमाणें मोठ्या अपराधास मोठा दंडही सांगितलेला आहे. जसें—चोर रात्रीं घरांतील माणसांना मारून हात-पाय-इत्यादिकास मोठाल्या जखमा करून चोरी करीत असतात. राजानें त्यांचे हात तोडून शिवाय त्यांना तीक्ष्ण सुळावर चढवावें. तात्पर्य, अशा-रीतीनें कारणें अनंत असल्यामुळें प्रत्येक द्रव्याविषयीं तीं सांगतां येणें शक्य नाहीं. यास्तव जाति-परिमाण इत्यादि कारणांच्या अनुसार दंडाचा गुरु-लघुभाव नियत करावा. मनूनें 'द्विजोऽध्वगः क्षीणवृत्तिः०' (अ. ८ श्लो. ३४१) इत्यादि वचनांत सांगितल्याप्रमाणें पथिकादिकांनीं ( वाटसरूंनीं ) अल्प अपराध केल्यास त्यांना दंड देऊं नये २७५.

चोरावर उपकार करणाऱ्या अचोरालाही दंड सांगतात—

**भक्तावकाशाग्न्युदकमन्त्रोपकरणव्ययान् ।**
**दत्वा चौरस्य वा हन्तुर्जानतो दम उत्तमः ॥ २७६ ॥**

भोजन, रहावयास जागा, शेकण्यासाठीं वगैरे अग्नि, तहान लागली असतां पाणी, चोरीच्या प्रकाराचा उपदेश, चोरीचें साधन, चोरी करावयास देशांतरीं जात असतां वाटखर्ची, इत्यादि चोराला अथवा वध करणाराला, त्याचें दुष्टत्व माहीत असतांनाही जो देतो त्याला उत्तम साहस दंड करावा. 'समर्थ असूनही जे चोरांची उपेक्षा करितात तेही त्यांच्या दोषास पात्र होतात,' असें नारदवचन असल्यामुळें चोरांची उपेक्षा करणारेही दोषी ठरतात २७६.

**शस्त्रावपाते गर्भस्य पातने चोत्तमो दमः ।**
**उत्तमो वाधमो वापि पुरुषस्त्रीप्रमापणे ॥ २७७ ॥**

दुसऱ्याच्या शरीरावर शस्त्र मारलें असतां, दासीगर्भ व ब्राह्मणगर्भ यांवाचून गर्भ पाडला असतां, त्या शस्त्रपात व गर्भपात करणाराला उत्तम साहस दंड करावा. दासीगर्भाचा विनाश करणाराला शंभर दंड सांगितला आहे. ब्राह्मणगर्भाविषयीं 'हत्वा गर्भमविज्ञातं०' या वचनांत पुढें ब्रह्महत्यादोष सांगणार आहेत. पुरुष किंवा स्त्री यांचा वध केला असतां शील, वृत्त इत्यादिकांच्या अपेक्षेनें उत्तम किंवा अधम दंड व्यवस्थित करावा २७७.

विप्रदुष्टां स्त्रियं चैव पुरुषघ्नीमगर्भिणीम् ।
सेतुभेदकरीं चाप्सु शिलां बध्वा प्रवेशयेत् ॥ २७८ ॥

विशेषप्रकारें अतिशय दुष्ट झालेली, भ्रूणहत्या करणारी, आपल्या गर्भाचा पात करणारी, पुरुषास मारणारी व सेतूंना ( धरणें, बांध यांस ) तोडणारी इतक्या प्रकारच्या गर्भरहित स्त्रियांच्या गळ्यांत शिला बांधून त्यांस जलांत बुडवावें, म्हणजे त्या पुनः वर येऊं शकणार नाहींत २७८.

विषाग्निदां पतिगुरुनिजापत्यप्रमापणीम् ।
विकर्णकरनासौष्ठीं कृत्वा गोभिः प्रमापयेत् ॥ २७९ ॥

जी दुसऱ्याला मारण्यासाठीं अन्न–पानादिकांत विष घालते, जी जाळण्यासाठीं ग्रामादिकांस अग्नि लावते, जी आपला पति, गुरु व अपत्यें यांस मारते,ती गर्भिणी नसल्यास तिचे कान, हात, नाक व ओठ कापून व तिला दुष्ट बैल जुंपलेल्या गाडींत बसवून गाडीला अस्ताव्यस्त टाकून मारवावी. स्तेय प्रकरणांत हें जें साहसिकाचें दंडविधान केलें आहे तें प्रासंगिक आहे असें जाणावें २७९.

आतां ज्याचा कर्ता कोण आहे तें ठाऊक नाहीं असा एकादा वध झाल्यास त्या वधकाला ओळखण्याचा ( म्हणजे खुनी पुरुषाचा पत्ता लावण्याचा ) उपाय सांगतात—

अविज्ञातहतस्याशु कलहं सुतबान्धवाः ।
प्रष्टव्या योषितश्चास्य परपुंसि रताः पृथक् ॥ २८० ॥

कोणी मारलें, हें माहीत नसतांनाही ज्याचा घात झाला असेल त्याचे पुत्र, जवळचे आप्त, इत्यादि संबंध्यांस 'याचा कोणाशीं कलह झाला होता,' तें विचारावें. त्याचप्रमाणें मेलेल्या पुरुषाच्या स्त्रिया कीं ज्या परपुरुषाशीं रत आहेत, त्यांनाही विचारावें २८०.

कसें विचारावें तेंही थोडक्यांत सांगतात—

स्त्रीद्रव्यवृत्तिकामो वा केन वायं गतः सह ।
मृत्युदेशसमासन्नं पृच्छेद्वापि जनं शनैः ॥ २८१ ॥

तो स्त्रियांविषयीं अभिलाषवान् होता, कीं द्रव्यावर आसक्त होता, त्याला नुस्तीं वृत्तीची ( उपजीविकेची ) इच्छा होती ? कोणत्या अथवा कोणाशीं संबद्ध असलेल्या स्त्रीवर

याचें प्रेम होतें ? कोणत्या प्रकारच्या धनावर याची प्रीती होती ? तो कोणापासून वृत्तीची अपेक्षा करीत होता ? तो कोणाबरोबर देशांतरीं गेला ? अशा रीतीनें नानाप्रकारें व्यभिचारिणी स्त्रियांस विश्वास देऊन पृथक् पृथक् विचारावें. त्याचप्रमाणें जेथें वध झाला असेल त्याच्या समीपप्रदेशीं राहणाऱ्या गोप; आरण्यक इत्यादिकांसही विश्वास देऊन विचारावें. येणेंप्रमाणें नानाप्रकारचे प्रश्न करून व मारणाराविषयीं निश्चय करून त्याला उचित दंड द्यावा २८१.

क्षेत्रवेश्मवनग्रामविवीतखलदाहकाः ।
राजपत्न्यभिगामी च दग्धव्यास्तु कटाग्निना ॥ २८२ ॥

पिकास आलेलें शेत, घर, अरण्य ( किंवा उपवन ), गांव, गुराकरितां राखून ठेवलेलें कुरण, अथवा धान्य झोडावयाचें खळें, यांस जे जाळतात अथवा राजभार्येशीं जो गमन करतो त्याच्या अंगास चटया बांधून त्यांना जाळावें. मारणदंडाच्या प्रसंगानें येथें क्षेत्रादिकांच्या दाहकांस दंड सांगितला आहे २८२.

इति स्तेयप्रकरणम् २३.

---

# अथ स्त्रीसंग्रहणप्रकरणम् २४.



आतां स्त्रीसंग्रहण विवादपदाचें व्याख्यान करितात. प्रथमसाहसादि दंड देण्याकरितां व्यासानें त्याचें तीन प्रकारचें स्वरूप सांगितलें आहे—एकांतांत देश, काल व भाषा यांचें उल्लंघन करून परस्त्रीकडे वाकड्या दृष्टीनें पाहणें, व तिच्याशीं हसणें हें प्रथम साहस होय. परस्त्रीकडे गंध, पुष्पें, धूप, भूषणें, वस्त्रें इत्यादि पाठविणें, अन्न-पान इत्यादिकांनीं लोभ उत्पन्न करणें, हें मध्यम साहस आहे. एकांतांत एकत्र बसणें, परस्परांचा आश्रय करणें, केंस धरणें इत्यादि पूर्णसंग्रहण आहे. स्त्री व पुरुष यांच्या मिथुनीभावास संग्रहण म्हणतात. संग्रहण ज्ञानानंतर त्याच्या कर्त्याला दंड करावयास सांगितलेलें असल्यामुळें अगोदर त्याच्या ज्ञानाचा उपाय सांगतात—

पुमान्संग्रहणे ग्राह्यः केशाकेशी परस्त्रियाः ।
सद्यो वा कामजैश्चिह्नैः प्रतिपत्तौ द्वयोस्तथा ॥ २८३ ॥

संग्रहणांत प्रवृत्त झालेल्या पुरुषास केशाकेश्यादि लिंगावरून जाणून धरावें. एकमेकांचे केस धरून क्रीडा करणें, याला केशाकेशी म्हणतात. सारांश, परभार्येसह केशाकेशी क्रीडा केल्यानें ताज्या नखांच्या व दातांच्या व्रणांवरून, रागकृत चिन्हांवरून अथवा दोघांच्याही संमतीनें जाणून संग्रहणांमध्यें प्रवृत्त झालेल्यास धरावें. नियोगांमध्यें प्रवृत्त झालेल्या व बंदी केलेल्या स्त्रीचा निरास करण्यासाठीं येथें परस्त्रीचें ग्रहण केलेलें आहे २८३.

नीवीस्तनप्रावरणसक्थिकेशावमर्शनम् ।
अदेशकालसंभाषं सहैकासनमेव च ॥ २८४ ॥

जो परस्त्रीच्या नेसलेल्या वस्त्राच्या गाठीला, कुचप्रावरणाला, जघनाला व केंसाला मोठ्या अभिलाषानें स्पर्श करितो, त्याचप्रमाणें निर्जन प्रदेशीं अथवा अंधकारानें व्यापलेल्या जनयुक्त स्थानीं तिच्याशीं भाषण करतो, परभार्येसह रममाण होण्याच्या इच्छेनें एका मंचकादिकावर बसतो, तोही स्त्रीसंग्रहणांत प्रवृत्त झाला आहे असें जाणून त्याला धरावें. हें सुद्धा ज्याच्या दोषांची आशंका आली असेल त्याच्याविषयीं समजावें. इतरांविषयीं नव्हे. कारण मनूनें ( अ. ८ श्लो. ३५५ ) तसें सांगितलें आहे. परस्त्रीनें स्पर्श केला असतां त्याला जो सहन करतो त्याला धरावें. ( पहा मनु. अ. ८ श्लो. ३५८ ) जो एकादां धीट मोठ्या प्रौढीनें 'मी अमक्या प्रौढ सुंदरीचा एकदां उपभोग घेतला आहे,' असें बरोबरीच्या लोकांस सांगत असेल त्यालाही धरावें २८४.

ज्यांचा निषेध केला आहे, अशीं स्त्रीपुरुषें पुनः आपसांत संभाषणादि करूं लागल्यास दंड सांगतात--

स्त्री निषेधे शतं दद्याद्द्विशतं तु दमं पुमान् ।
प्रतिषेधे तयोर्दण्डो यथा संग्रहणे तथा ॥ २८५ ॥

पति, पिता, इत्यादिकांनीं ज्याच्याशीं संभाषणादि करण्याचा निषेध केला आहे त्याच्याशीं जी संभाषणादि करते त्या स्त्रीला शतपण दंड करावा. असा निषेध केला असूनहीं संभाषणादिकांस प्रवृत्त होणाऱ्या पुरुषाला दोनशें पण दंड द्यावा. निषेध केलेला असूनहीं संभोगांत प्रवृत्त होणाऱ्या दोघांना त्यांच्या वर्णानुसार जो दंड सांगितला असेल तोच जाणावा. पण हें सर्व प्रतिपादन चारणादिकांच्या भार्यांस सोडून इतरांविषयीं आहे असें जाणावें ( पहा मनु. अ. ८ श्लो० ३६२ ) २८५.

आतां संग्रहणाविषयीं दंड सांगतात—

सजातावुत्तमो दण्ड आनुलोम्ये तु मध्यमः ।
प्रातिलोम्ये वधः पुंसो नार्याः कर्णादिकर्तनम् ॥ २८६ ॥

चारी वर्णांतील पुरुषांनीं सजातीय रक्षित परस्त्रीशीं बलात्कारानें गमन केल्यास एक सहस्र ऐंशी पण दंड करावा. जेव्हां कोणी आनुलोम्यानें हीनवर्णाच्या अरक्षित स्त्रीशीं गमन करतो तेव्हां त्याला मध्यम साहस दंड करावा. जेव्हां कोणी एकादा अरक्षित सवर्ण-स्त्रीशीं अथवा आनुलोम्यानें रक्षित स्त्रीशीं समागम करतो तेव्हां त्याच्या दंडाचा विशेष मनुस्मृतींत सांगितला आहे. तो असा-रक्षित ब्राह्मणीशीं बलात्कारानें गमन करणाऱ्या ब्राह्मणाला पांचशें, इच्छा करणाऱ्या तिच्याशीं गमन करणाराला सहस्र, रक्षित क्षत्रिया व वैश्य

यांच्याशीं गमन करणाऱ्या ब्राह्मणालाही सहस्र दंड करावा. शूद्रस्त्रीशीं गमन करणाऱ्या क्षत्रियाला व वैश्याला सहस्र दंड करावा. पण हें गुरु व मित्र यांच्या भार्यांना सोडून इतर स्त्रियांविषयीं जाणावें. कारण नारदानें–माता, मातृष्वसा ( मावशी ), सासू, मामी, आते, चुलती, शिष्याची स्त्री, भगिनी, तिची सखी, सून, कन्या, गुरुपत्नी, सगोत्रा, शरणागता, राणी, संन्याशीण, दायी, साध्वी स्त्री व उत्तमवर्णाची स्त्री यांतील एकादीशीं गमन करणारास गुरुस्त्रीगामी असेंच म्हणतात व त्याला शिश्न कापणें, यावांचून दुसरा योग्य दंडच नाहीं.– असें सांगितलें आहे. प्रातिलोम्यानें उत्कृष्ट वर्णाच्या सुरक्षित स्त्रीशीं गमन केल्यास क्षत्रिया-दिकांचा वध करावा; पण अरक्षित स्त्रीशीं गमन केल्यास त्यांना धनदंड द्यावा. कारण मनूनें ( अ. ८ श्लो. ३७६, ३७७ ) तसें सांगितलें आहे. पण शूद्र अरक्षित उत्कृष्ट वर्णाच्या स्त्रीशीं संगत झाल्यास त्याचें सर्वस्व हरण करावें व लिंग कापावें. पण सुरक्षित उत्कृष्ट स्त्रीशीं गमन करणाऱ्या त्याचें सर्वस्व हरण करून शिवाय वध करावा. ( पहा मनु. अ. ८ श्लो. ३७४ ) हीन वर्णाच्या पुरुषाशीं गमन करणाऱ्या स्त्रांचे कान, नाक इत्यादि कापावे. आनुलोम्यानें अथवा आपल्याच वर्णाच्या पुरुषाशीं तिनें गमन केल्यास तिला दंडच द्यावा. येथें वधादिकांचा जो उपदेश केला आहे तो राजासाठींच आहे. कारण राजालाच पालनाचा अधिकार असतो. नुसत्या द्विजातीला नसतो. कारण ब्राह्मणानें परीक्षा पहाण्यासाठींही शस्त्र उचलूं नये असें सांगितलें आहे. पण राजाला निवेदन करण्यामध्यें विलंब लागून उगीच काल जाईल, अशी आशंका वाटत असल्यास ' शस्त्रं द्विजातिभिर्ग्राह्यं धर्मो यत्रोपरुध्यते ' या मनुवचनास अनुसरून स्वतःच जारादिकांस मारावें. त्याचप्रमाणें मनूनें ( अ० ८ श्लो. ३५१ ) यामध्येंही आततायीस मारण्यासाठीं शस्त्र उचलण्याची अनुज्ञा दिली आहे. त्याच-प्रमाणें क्षत्रिय व वैश्य यांनीं परस्परांच्या स्त्रीशीं गमन केल्यास क्रमानें सहस्र व शतपणात्मक दंड जाणावा. २८६.

परस्त्रीगमनाच्या प्रसंगानें कन्येविषयींही दंड सांगतात––

**अलङ्कृतां हरेत्कन्यामुत्तमं ह्यन्यथाधमम् ।**
**दण्डं दद्यात्सवर्णासु प्रातिलोम्ये वधः स्मृतः ॥ २८७ ॥**

विवाहास सज्ज झालेल्या अलंकृत सवर्ण कन्येस जो हरण करतो त्याला उत्तम साहस दंड करावा. विवाहास सज्ज न झालेल्या सवर्ण कन्येचें हरण करणारास प्रथम साहस दंड द्यावा. उत्कृष्ट वर्णाच्या कन्येचा अपहार करणाऱ्या क्षत्रियादिकांचा वधच करावा. अपहार करणाला दंड सांगितलेला असल्यामुळें अपहारकर्त्यापासून तिला दूर करून दुसऱ्या योग्य पुरुषाच्या स्वाधीन करावें, असें सूचित होतें २८७.

आतां अनुलोम कन्येचा अपहार केल्यास दंड सांगतात––

**सकामास्वनुलोमासु न दोषस्त्वन्यथा दमः ।**

पण जर कोणी एकाद्यानें, त्याची कामना करणाऱ्या हीन वर्णाच्या कन्येचा अपहार

केला तर त्याचा कांहीं फारसा दोष नसल्यामुळें त्याला दंड करूं नये. पण इच्छा न करणाऱ्या हीन वर्णाच्याही कन्येला जर कोणी हरण केलें तर त्याला प्रथमसाहस दंड करावा. आतां कन्येला दूषित केल्यास दंड सांगतात--

दूषणे तु करच्छेद उत्तमायां वधस्तथा ॥ २८८ ॥

अनुलोमकन्येला जर कोणी तिची इच्छा नसतांना बलात्कारानें नखक्षतादिकांच्या योगानें दूषित केलें तर त्याचा हात तोडावा. पण तिच्याच ( म्हणजे इच्छा न करणाऱ्या हीन वर्णाच्या कन्येच्या ) योनीला अंगुली घालून वगैरे जो क्षत करतो व अशारीतीनें तिला दूषित करतो त्याला मनुस्मृतींत ( अ. ८ श्लो. ३६८ ) सांगितल्याप्रमाणें सहाशें पण दंड करून शिवाय त्याचीं बोटें कापावीं. पण ती कन्याच सकामा असून तिला जर त्यानें दूषित केलें तर अंगुलिच्छेद करूं नये. पण त्यानें पुनः असें करूं नये म्हणून त्याला दोनशें दंड करावा. एकाद्या कन्येनेंच दुसऱ्या कन्येला दूषित केल्यास तिला दोनशें व एखाद्या समजदार ( चतुर प्रौढ ) स्त्रीनें तिला दूषित केल्यास त्या स्त्रीचें तत्काळ मुंडन करावें. अंगुलीचें छेदन करावें, व गाढवावर बसवून धिंड काढावी. जेव्हां सकाम अथवा अकाम उत्तम वर्णाच्या कन्येशीं हीन जातीचा क्षत्रियादि पुरुष गमन करतो तेव्हां त्याचा वधच करणें उचित आहे. जेव्हां कोणी सकाम सवर्ण कन्येशीं गमन करतो तेव्हां तिच्या पित्याला त्याची इच्छा असल्यास गायींचें जोडपें, हें शुल्क द्यावें. पण पिता शुल्क घेण्याची इच्छा करीत नसल्यास तेंच राजाला दंडरूपानें द्यावें. पण अकाम सवर्णकन्येशीं गमन करणाराही वधास पात्र होतो, याविषयीं मनुस्मृतीच्या आठव्या अध्यायाचे ३६४ व ३६६ श्लोक पहा २८८.

शतं स्त्रीदूषणे दद्याद्द्वे तु मिथ्याभिशंसने ।
पशून्गच्छञ्शतं दाप्यो हीनां स्त्रीं गां च मध्यमम् ॥ २८९ ॥

येथील स्त्रीशब्दानें कन्येचेंच ग्रहण करावें. कारण प्रकरण कन्येचें चाललें आहे. तिला कोणी तिच्यामध्यें वस्तुतः असलेलेच अपस्मार, राजयक्ष्मा, इत्यादि दीर्घकाल रहाणारे व निंद्य रोग अथवा मैथुनादि दोष यांस प्रकट करून जर दूषित करूं लागला तर त्याला शंभर पण दंड द्यावा. पण तिच्यामध्यें नसलेले दोष जर तो खोटेच तिच्यावर आरोपूं लागला तर त्याला दोनशें पण दंड द्यावा, कोणी मूढ गायींवांचून दुसऱ्या पशूंशीं जर गमन करीत असतांना आढळला तर शंभर पण दंड द्यावा. जो कोणी सकाम अथवा अकाम हीन अन्त्यावसायिनी चांडाळी (स्त्रीशीं) अथवा गायीशीं गमन करतो त्याला मध्यम साहस दंड द्यावा २८९.

आतां साधारण स्त्रीशीं गमन केलें असतां दंड सांगतात—

अवरुद्धासु दासीषु भुजिष्यासु तथैव च ।
गम्यास्वपि पुमान्दाप्यः पञ्चाशत्पणिकं दमम् ॥ २९० ॥

वर सांगितलेल्या प्रकारच्या वर्णस्त्रिया दासीही होऊं शकतात. त्यांना त्यांचा स्वामी कामांत कांहीं विघ्न येऊं नये म्हणून आपल्या घरींच ठेवतो. पण दुसऱ्या पुरुषाशीं त्यांचा संबंध होऊं नये, यासाठीं त्या अंतःपुरांत सुरक्षितपणें ठेवल्या जातात. दुसऱ्या पुरुषांच्या उपभोगापासून ज्यांचा निरोध केला आहे त्यांना अवरुद्ध म्हणतात. जी वेश्यादि स्त्री एकाद्यानें केवल आपल्याच भोगाकरितां ठेवलेली असते, तिला भुजिष्या म्हणतात. असो, अशा दासी अथवा भुजिष्या ( व वेश्या, स्वैरिणीही ) स्त्रियांशीं त्या सर्व पुरुषांस साधारण व गम्य आहेत, असें समजून जो गमन करतो त्याला पन्नास पण दंड करावा. कारण वस्तुतः त्या सर्व पुरुषांस साधारण व गम्य जरी असल्या तरी त्यांचा एकाद्या विशेष पुरुषानें परिग्रह केलेला असल्यामुळें त्या परस्त्रीसारख्याच असतात, हेंच नारदानें ' स्वैरिण्यब्राह्मणी० ' इत्यादि वचनांत स्पष्टपणें सांगितलें आहे. त्याचा सारांश असा—स्वैरिणी, अब्राह्मणी, वेश्या, दासी, निष्कासिनी ( स्वामीनें जिचा वर सांगितल्याप्रमाणें निरोध केलेला नाहीं ), या आनुलोम्यानें गम्य आहेत. प्रातिलोम्यानें नाहींत. पण त्यांतूनही विशेषतः भुजिष्यांशीं गमन केल्यास परस्त्रीगमनाप्रमाणें दोष लागतो. त्या वस्तुतः जरी गम्य असल्या तरी परपरिग्रह व निरुद्ध असल्यामुळें त्यांच्याशीं गमन करूं नये.

शंका—अहो पण स्वैरिणीप्रभृति स्त्रिया साधारण असल्यामुळें त्या गम्य ( गमन करण्यास योग्य ) आहेत असें म्हणणें अयोग्य आहे. व्यवहारांत जाति व शास्त्र यावरून कोणत्याही स्त्रिया साधारण असल्याचें आढळत नाहीं. कारण, स्वैरिणी व दासी तर वर्णस्त्रियाच असतात. ' जी स्त्री पतीला सोडून कामतः परपुरुषाचा आश्रय करते ती स्वैरिणी होय. ' तसेंच ' वर्णांचें आनुलोम्यानें दास्य होतें प्रातिलोम्यानें नाहीं, ' असें मनूनें सांगितलें आहे. वर्णस्त्रियांचा पति जिवंत असतांना अथवा मेल्यावर परपुरुषांना त्यांचा उपभोग घेतां येत नाहीं. कारण मनूनें ( अ. ५ श्लो. १५४ व १५७ यांत ) साध्वी स्त्रीनें दुःशील, कामवृत्त व गुणशून्य अशाही पतीची सतत देवाप्रमाणें परिचर्या करावी. शुभ पुष्पें, फळें व मूळें यांवर निर्वाह करून खुशाल देह झिजवावा; पण पति मेल्यावर परपुरुषाचें नांवही घेऊं नये, असा निषेध सांगितलेला आहे. कन्यावस्था साधारण आहे, असेंही म्हणतां येत नाहीं. कारण पिता, भ्राता इत्यादिकांनीं जिचें रक्षण केलें आहे अशा कन्येच्याच दानाचा उपदेश केलेला आहे. दाता नसला तरी तसल्या सुरक्षित ( शुद्ध ) कन्येलाच स्वयंवराचा उपदेश केला आहे. नुसत्या दासीभावानें स्वधर्म व स्वाधिकार यांपासून कोणी स्त्री भ्रंश पावत नाहीं. कारण पारतंत्र्य हें दास्य आहे. स्वधर्मत्याग हें दास्य नव्हे. वेश्येला साधारण स्त्री म्हणतांच येत नाहीं. कारण वर्ण व अनुलोमजन्य स्त्रिया यांवाचून दुसऱ्या कोणत्याही जातीच्या गम्य स्त्रिया संभवत नाहींत. पण त्यांचा त्यांतच अंतर्भाव होतो, असें म्हटल्यास पूर्वीप्रमाणेंच अगम्यत्व येतें व त्या प्रतिलोमजन्य आहेत असें म्हटल्यास त्या अगदींच अगम्य ठरतात. यास्तव, दुसऱ्या पुरुषाचा उपभोग घेतल्यास निंदित कर्माभ्यासानें तिला पतित होण्याचाच प्रसंग येणार हें उघड आहे. आणि पतिताशीं संसर्ग करणें निषिद्ध आहे. यास्तव वेश्येच्या ठिकाणीं सर्व पुरुषोपभोगयोग्यता असत नाहीं.

**समाधान**—खरें आहे; पण स्वैरिणीप्रभृति स्त्रियांचा उपभोग घेतला असतां पिता, भ्राता इत्यादि रक्षक व राजदंड, यांचें भय असत नाहीं. यास्तव त्यांना गम्य असें म्हटलें आहे. त्यांच्याशीं गमन करणारांस दंड होत नाहीं, हें ' अवरुद्धसु दासीषु० ' इत्यादि या श्लोकावरूनच ठरत आहे. कारण या वचनांत नियत पुरुषानें परिग्रह करणें, या कारणानें दंडाचें विधान केलें आहे. त्यामुळें अर्थातच अशा विशेष उपाधीनें रहित असलेल्या स्वैरिणीप्रभृतीशीं गमन करणारांस दंडाचा अभाव ज्ञात होतो. स्वैरिणी इत्यादि स्त्रियांनाही दंडाचें विधान केलेलें नसल्यामुळें दंड होत नाहीं. ' कन्यां भजन्तीमुत्कृष्टां न किंचदपि दापयेत्० ' असें लिंगही स्पष्ट दिसत असल्यामुळें त्यांना दंडाचा अभाव आहे हें सिद्ध होतें. परंतु स्वधर्मापासून च्युत होणें, या निमित्तामुळें प्रायश्चित्त मात्र गम्य स्त्रिया व गमन करणारे पुरुष या दोघांनाहीं प्राप्त होतें. ' वेश्यांच्या निराळ्या जातीचा असंभव असल्यामुळें त्यांचाही वर्णामध्येंच अंतर्भाव होतो, ' असें-वेश्या वर्ण व अनुलोमजाति यांमध्यें अंतर्भूत होण्यास योग्य आहेत. कारण त्याही मनुष्यजातीचा आश्रय करून असतात; ब्राह्मणादिकांप्रमाणें या अनुमानावरून—ठरविण्याचा जो प्रयत्न केला आहे, तो योग्य नव्हे. कारण त्या अनुमानांतील हेतु कुंडगोलादिकांचें ठायीं व्यभिचार पावतो. यास्तव वेश्या या नांवाची ही एक अनादि जाति आहे. वेश्येच्या ठिकाणीं उत्कृष्ट जातीच्या अथवा समान जातीच्या पुरुषापासून झालेली व पुरुषसंभोगावर उपजीविका करणारी जी स्त्री ती वेश्या होय, असें ब्राह्मण्यादिकांप्रमाणें लोकप्रसिद्धि बलानें जाणावें. ही लोकप्रसिद्धि निर्मूल आहे, असेंही समजूं नये. स्कंदपुराणांत असें वर्णन केलें आहे-पंचचूड या नांवाच्या कांहीं अप्सरा होत्या. त्यांची वेश्या नांवाची संतति असून ती पांचवी जाति आहे. त्यांना नियत पुरुषांशीं विवाह करण्याचें विधान नसल्यामुळें समान अथवा उत्कृष्ट जातीच्या पुरुषाशीं गमन केल्यास कांहीं अदृष्ट दोष लागत नाहीं. व दंडही होत नाहीं; पण त्या अनिरुद्ध स्त्रियांशीं गमन करणाऱ्या पुरुषांनाही दंड जरी होत नसला तरी अदृष्ट दोष असतोच. कारण ' स्वदारानियतः सदा ' असा पुरुषाविषयीं नियम केलेला आहे व पशु आणि वेश्या यांच्याशीं अभिगमन करणारास उद्देशून प्राजापत्य प्रायश्चित्ताचें विधान केलें आहे. तस्मात् या श्लोकांतील दंडाचें विधान अगदीं निर्दोष आहे २९०.

वरील श्लोकानें निरुद्ध दासी, स्वैरिणी इत्यादिरूप भुजिष्येशीं अभिगमन करणारास दंड सांगून भुजिष्या नसलेल्या त्यांच्यांशीं अभिगमन केल्यास दंड नाहीं, असें अर्थात् सुचविलें आतां या श्लोकांत त्याचा अपवाद सांगतात—

**प्रसह्य दास्यभिगमे दण्डो दशपणः स्मृतः ।**
**बहूनां यद्यकामासौ चतुर्विंशतिकः पृथक् ॥ २९१ ॥**

पुरुषसंभोगावर निर्वाह करणाऱ्या दासी, स्वैरिणी इत्यादिकांचे ठायीं शुल्क न देतां बलात्कारानें अभिगमन करणारास दशपण दंड करावा. जर बहुत पुरुषांनीं एकट्याच इच्छा न करणाऱ्या गम्य स्त्रीशीं बलात्कारानें गमन केलें तर त्यांतील प्रत्येकाला चोवीस पण प्रमाण दंड करावा. पण तिच्या इच्छेनें भाटी ( खर्ची ) देऊन मागून इच्छा न करणाऱ्या

तिच्याशीं जर अनेकांनीं बलात्कारानें गमन केलें तर त्यांत त्यांचा कांहीं दोष नाहीं. पण— व्याधियुक्त, श्रांत, व्यग्र व राजकार्यपरायण, अशी एकादी दासी ( वेश्या ) बोलावल्यावरही संमत संभोगाकरितां न आल्यास दोषी होत नाहीं.—असें नारदाचें वचन असल्यामुळें व्याधि इत्यादि दोषांनीं युक्त असलेल्या तिनें भाटी घेऊनही संभोगाची इच्छा न केल्यास कांहीं दोष नाहीं २९१.

**गृहीतवेतना वेश्या नेच्छन्ती द्विगुणं वहेत् ।**
**अगृहीते समं दाप्यः पुमानप्येवमेव च ॥ २९२ ॥**

जेव्हां शुल्क घेऊन स्वस्थ असलेलीही वेश्या अर्थपतीची ( धन देणाराची ) इच्छा करीत नाहीं तेव्हां तिच्याकडून त्याला दुप्पट शुल्क परत देववावें. पण तिनें शुल्क घेतलें नसल्यास व नुस्ती संमति देऊन मागून इच्छा न केल्यास तिच्याकडून जितकें शुल्क ठरलें असेल तितकें त्या पुरुषास देववावें. त्याचप्रमाणें शुल्क देऊन स्वतः त्या वेश्येची इच्छा न करणाऱ्या स्वस्थ पुरुषाची शुल्कहानि होते. ( म्हणजे त्यानें दिलेलें धन बुडतें ) नारदानें असेंच सांगून शिवाय आणखी असा विशेषही सांगितला आहे—जो पुरुष एखाद्या पण्यस्त्रीचा उपभोग घेऊन तिचें शुल्क देत नाहीं, अथवा मारून, दांत, नखें इत्यादिकांचे प्रहार करून व आक्रमण करून तिचा उपभोग घेतो, जो योनिरहित स्थानीं मैथुन करतो किंवा अनेकांकडून भोग घेववितो त्याच्याकडून वेश्येला आठपट शुल्क देववावें व तितकाच दंड करावा. वेश्येसंबंधीं कांहीं कार्य उपस्थित झालें असतां आलेल्या संशयाचा निर्णय वेश्येच्या घरांतील वृद्ध स्त्री अथवा तिच्या येथें राहणारे कामुक यांच्या द्वारा करावा २९२.

**अयोनौ गच्छतो योषां पुरुषं वापि मेहतः ।**
**चतुर्विंशतिको दंडस्तथा प्रव्रजितागमे ॥ २९३ ॥**

जो पुरुष आपल्या स्त्रियांच्या मुखादिकांच्या ठायीं गमन करितो किंवा पुरुषापाशीं गुदस्थानीं गमन करतो अथवा प्रव्राजिता स्त्रीशीं गमन करतो त्याला चोवीस पण दंड करावा. २९३.

**अन्त्याभिगमने त्वङ्क्यः कुबन्धेन प्रवासयेत् ।**
**शूद्रस्तथान्त्य एव स्यादन्त्यस्यार्यागमे वधः ॥ २९४ ॥**

अन्त्या म्हणजे चांडाली. तिच्याशीं गमन करून प्रायश्चित्त करावयास तयार न होणाऱ्या तीन वर्णांच्या द्विजाति पुरुषांना ‘ सहस्रं त्वन्त्यजस्त्रियं ’ या मनुवचनाच्या अनुरोधानें सहस्र पण दंड करून भगाच्या आकाराच्या निंद्य बंधानें चिन्हित करावें ( भगाकार डाग द्यावा. ) व आपल्या राष्ट्रांतून घालवावें. पण जे प्रायश्चित्त करण्यास तयार असतील त्यांना नुस्ता दंडच करावा. शूद्र पुरुषानें चांडालीशीं गमन केल्यास तो स्वतः चांडालच होतो. अंत्यजा ( चांडालादिका ) नें उत्कृष्ट जातीच्या स्त्रीशीं गमन केल्यास त्याचा वधच करावा २९४.

इति स्त्रीसंग्रहणप्रकरणम् २४.

---

# अथ प्रकीर्णकप्रकरणम् २५.



व्यवहारप्रकरणामध्यें स्त्रीपुंसंयोग नांवाचें दुसरें एक विवादपद मनु व नारद यांनीं वर्णिलें आहे. नारद म्हणतो–ज्यांत स्त्रिया व पुरुष यांच्या विवाहादिविधींचें वर्णन केलेलें असतें त्याला स्त्रीपुरुषयोगसंज्ञक विवादपद म्हणतात. मनूनेंही ' अस्वतन्त्राः स्त्रियः कार्या० ' ( अ. ८ श्लो. २ ) या वचनांत' संबंधी पुरुषांनीं अहोरात्र स्त्रियांना अस्वतंत्र करावें. विषयांत आसक्त होणाऱ्या त्यांना आपल्या वश ठेवावें, ' असें म्हटलें आहे. यद्यपि स्त्रीपुरुषांचा राजासमक्ष परस्पर वादि–प्रतिवादीरूपानें होणारा व्यवहार शास्त्रानें निषिद्ध मानलेला आहे तरी प्रत्यक्ष अथवा कानोकानीं ( कर्णपरंपरेनें ) त्यांचा परस्पर अतिचार विदित झाला असतां राजानें दंडादिकांच्या योगानें त्या दांपत्याला स्वधर्ममार्गांत स्थापावें. असें न केल्यास तो दोषभाक् ( दोषास पात्र ) होतो. यास्तव इतरांनीं व्यवहारप्रकरणांतील राजधर्मांमध्यें सर्व स्त्रीपुरुषधर्मांचा उपदेश केला आहे. पण योगीश्वरानें तो सर्व धर्म विवाहप्रकरणांतच सविस्तर सांगून टाकला आहे. म्हणून पुनः येथें वर्णिलेला नाहीं. यास्तव आतां प्रकीर्ण नांवाचें व्यवहारपद आरंभितात. त्याचें लक्षण नारदानें ' प्रकीर्णके पुनर्ज्ञेयाः० ' इत्यादि वचनांत असें सांगितलें आहे–राजाच्या आश्रयानें असलेले सर्व व्यवहार प्रकीर्णकप्रकरणांत जाणावे. राजाच्या आज्ञेचा प्रतिघात ( आज्ञाभंग ), त्याचें कर्म करणें, नगरदान, प्रजेमध्ये भेद उत्पन्न करणें, पाखंडी, नैगम, श्रेणी, गण इत्यादिकांच्या धर्मांचा विपर्यय, पिता–पुत्रविवाद, प्रायश्चित्तव्यतिक्रम, प्रतिग्रहलोप, आश्रमी लोकांचा कोप, वर्णसंकर दोष, त्यांच्या वृत्तींचा नियम व तसेच पूर्वप्रकरणांमध्यें ज्यांचा विचार केलेला नाहीं, असे अवशिष्ट राहिलेले सर्व विषय या प्रकीर्णकप्रकरणांत जाणावे. अर्थात् या प्रकीर्ण प्रकरणांत राजाज्ञेचें उल्लंघन, त्याच्या आज्ञेचें करण इत्यादि विषयक जे विवाद आहेत ते राजसंबंधीं असून त्यांत स्वतः राजानेंच प्रतिवादीप्रमाणे स्मृतिप्रोक्त आचाराच्या विरुद्ध मार्गामध्यें वर्तन करणाऱ्या पुरुषांच्या प्रतिकूल होऊन व्यवहारनिर्णय करावा. अर्थात् नारदाच्या या सांगण्यावरून जो जो व्यवहार राजाश्रय असतो तो तो प्रकीर्ण प्रकरणाचा विषय होतो, असें लक्षित होतें. आतां त्यांतील विशेष अपराधांस उद्देशून विशेषप्रकारचा दंड सांगतात—

**ऊनं वाभ्यधिकं वापि लिखेद्यो राजशासनम् ।**
**पारदारिकचौरं वा मुञ्चतो दण्ड उत्तमः ॥ २९५ ॥**

राजानें दिलेल्या भूमीचें अथवा निबंधाचें मूलपरिमाणाहून न्यूनत्व अथवा अधिकत्व प्रकाशित करणारें राजशासन जो लिहितो, किंवा जो परस्त्रीशीं गमन करणाराला अथवा चोराला धरून राजाच्या स्वाधीन न करितांच सोडून देतो त्या उभयतांनाही उत्तम साहस दंड करावा २९५.

आतां नृपाश्रय—व्यवहारव्यतिरिक्त व्यवहाराविषयीं दंड सांगतात—

अभक्ष्येण द्विजं दूष्य दण्ड उत्तमसाहसम् ।
मध्यमं क्षत्रियं वैश्यं प्रथमं शूद्रमर्द्धिकम् ॥ २९६ ॥

अभक्ष्य ( भक्षण करण्यास अयोग्य ) मूत्र पुरीषादि ( अन्नपानादिकांशीं मिसळून अथवा द्रव्य रूपानें ) ब्राह्मणाकडून जो खाववितो त्याला उत्तम साहस दंड करावा. अशाच रीतीनें क्षत्रियाला जो दूषित करतो त्याला मध्यम साहस दंड द्यावा. वैश्यास दूषित करणारास प्रथम साहस व शूद्रास दूषित करणारास प्रथम साहसाच्या अर्धा दंड करावा. लशुनादि अभक्ष्य खाववून दूषित केल्यास दोषाच्या न्यूनाधिकतेप्रमाणें दंडाचेंहि न्यूनाधिक प्रमाण अनुमानानें ठरवावें २९६.

कूटस्वर्णव्यवहारी विमांसस्य च विक्रयी ।
त्र्यङ्गहीनस्तु कर्तव्यो दाप्यश्चोत्तमसाहसम् ॥ २९७ ॥

रसादिकांचीं पुटें देऊन ( किमयेनें ) व हीन धातूंना उत्कृष्ट रंग आणून त्या कूट सुवर्णानें व्यवहार करण्याचें ज्याचें शील आहे अशा सोनारादिकांस, ( कुत्र्यादिकांच्या ) निंद्य मांसाचा विक्रय करणाऱ्या खाटकांस व खोट्या रुप्यादिकांचा व्यवहार करणारास नाक, कान व हात या तीन अंगांनीं हीन करावें व उत्तमसाहस दंडही करावा. मनूनें असें खोटें सोनें वगैरे करणाऱ्या सोनाराच्या अंगाचे वस्तऱ्यानें तुकडे करावे, असें सांगितलें आहे (अ. ९ श्लो. २९२ ) पण तें देव, ब्राह्मण व राजा यांच्या सोन्यामध्यें कपट करणाराविषयीं आहे, असें जाणावें २९७.

आतां कांहीं विशेष प्रसंगीं दंडाचा अभाव सांगतात—

चतुष्पादकृतो दोषो नापैहीति प्रजल्पतः ।
काष्ठलोष्टेषुपाषाणबाहुयुग्यकृतस्तथा ॥ २९८ ॥

गाय, हत्ती इत्यादि चार पायांच्या पशूंनीं केलेला जो मानुषमारणादिदोष तो त्या पशूच्या स्वामीला लागत नाहीं. पण त्यानें आपला पशु निरर्गल सुटला आहे, असें पाहून ‘ दूर हो, दूर हो ’ असें म्हणून मोठ्यानें आक्रोश केलेला नसेल तर तो दोषी ठरतो; नाहीं तर नाहीं. त्याचप्रमाणें लांकूड, मातीचें ढेंकूळ, बाण, पाषाण इत्यादि फेंकण्यानें, बाहूंच्या योगानें, व रथादि वाहणाऱ्या अश्वादिकांच्या योगानें घडलेला जो पूर्वोक्त दोष, त्याच्या योगानेंही, काष्ठादि फेंकणारा ‘ दूर व्हा ’ असें म्हणून ओरडत असल्यास दूषित होत नाहीं. काष्ठादि फेंकल्यामुळें होणाऱ्या हिंसेचा दोष लागत नाहीं, हें सांगणें दंडाच्या अभावाचें प्रतिपादन करण्यासाठींच आहे. कारण अशा प्रसंगींही अबुद्धिपुरःसर घडलेल्या दोषाच्या निमित्तानें प्रायश्चित्त करावें लागतेंच. काष्ठाबरोबर शक्ति–तोमर इत्यादिकांचेंही ग्रहण करावें २९८.

छिन्ननस्येन यानेन तथा भग्नयुगादिना ।
पश्चाच्चैवापसरता हिंसने स्वाम्यदोषभाक् ॥ २९९ ॥

ज्या ( शकटादिकां )स जोडलेल्या बैलांच्या नाकांतील वेसण तुटली आहे अशा गाड्यांच्या योगानें, ज्याची दांडी, जूं, कणा, चाक इत्यादि तुटलें आहे अशा वाहनानें आणि मागें हटत असलेल्या, तिरकस वळणाऱ्या अथवा सन्मुख येणाऱ्या गाडीच्या योगानें मनुष्यादिकांची हिंसा झाल्यास स्वामी किंवा गाडी हाकणारा दोषी होत नाहीं. कारण ती हिंसा त्यांच्या बुद्धिपुरःसर प्रयत्नानें झालेली नसते. मनूनेंही (अ. ८ श्लो. २९१, ९२) असेंच सांगितलें आहे २९९.

पण उपेक्षा केल्यास स्वामीला दंड सांगतात—

शक्तोऽप्यमोक्षयन्स्वामी दंष्ट्रिणां शृङ्गिणां तथा ।
प्रथमं साहसं दद्याद्विक्रुष्टे द्विगुणं तथा ॥ ३०० ॥

अकुशल वाहकांनीं चालविलेल्या दंष्ट्रायुक्त गजादिकांकडून व गायी बैल इत्यादि शृंगयुक्त पशूंकडून मारल्या जाणाऱ्या जीवास वांचविण्यास समर्थ असलेल्याही स्वामीनें जर त्याची उपेक्षा केली तर त्याला आपल्या वाहनास चालवावयास अकुशल वाहक ठेवल्याबद्दल प्रथम साहस दंड द्यावा. ' अरे मी मेलों, मला हा मारीत आहे ' असें म्हणून तो ओरडला तरी त्याला न सोडविणाऱ्या स्वामीला दुप्पट दंड द्यावा. पण जेव्हां प्रवीण सारथी त्याला हाकीत असेल तेव्हां त्यालाच दंड करावा. स्वामीला करूं नये. ( मनु० अ० ८ श्लो०२९४ पहा. ) मेलेल्या विशेष प्राण्याच्या योग्यतेप्रमाणें दंडाचें न्यूनाधिक्य करावें. कारण मनूनें ' मनुष्यमारणे क्षिप्रं चोरवत्० ' (अ० ८ श्लो. २९६–९८) या वचनांत असें म्हटलें आहे. मनुष्य मेल्यास वाहक चोराप्रमाणें दोषी होतो. गाय, गज, उंट व घोडा, इत्यादि मोठे प्राणी मेले असतां त्याच्या अर्धा दंड, क्षुद्र पशूंची हिंसा झाली असतां दोनशें पण, शुभ मृग व पक्षी मेले असतां पन्नास पण, गर्दभ. बकऱ्या, मेंढ्या इत्यादिकांचा वध झाल्यास पांच माष आणि कुत्रें, डुक्कर इत्यादिक चिरडून मेल्यास एक माष दंड द्यावा ३००.

जारं चौरेत्यभिवदन्दाप्यः पञ्चशतं दमम् ।
उपजीव्य धनं मुञ्चंस्तदेवाष्टगुणीकृतम् ॥ ३०१ ॥

आपल्या वंशास कलंक लागेल या भीतीनें परस्त्रीशीं गमन करणाऱ्या जाराला ' चोरा नीघ येथून ' असें म्हणणारास पांचशें पण दम योजावा. पण जो जारापासून लांच घेऊन त्याला सोडतो त्याला जितकी लांच घेतली असेल तिच्या आठपट दंड करावा ३०१.

राज्ञोऽनिष्टप्रवक्तारं तस्यैवाक्रोशकारिणम् ।
तन्मन्त्रस्य च भेत्तारं छित्वा जिह्वां प्रवासयेत् ॥ ३०२ ॥

राजाला अनिष्ट असलेल्या त्याच्या शत्रूचें स्तोत्रादि ( प्रशंसा ) वारंवार करणाऱ्या, त्याच राजाची निंदा करणाऱ्या व त्याच्या स्वराष्ट्रवर्धक व परराष्ट्रक्षयकारक मंत्राचा भेद करणाऱ्या ( त्याचा संकेत शत्रूच्या कानांत सांगणाऱ्या ) पुरुषाची जिव्हा कापून त्याला स्वराष्ट्रांतून बाहेर घालवावें. त्यानें कोशादिकांचा अपहार केल्यास तर ( मनु० अ० ९ श्लोक २७५ यांत सांगितल्याप्रमाणें ) वधच करावा. मनूनें अशा अपराध्यास विविध दंड करावे, असें सांगितलें आहे. विविध म्हणजे सर्वस्वाचा अपहार, अंगच्छेद व वध. सर्वस्वाचा अपहार करतांनाही त्याचें जें उपजीविकेचें साधन असेल तें चोरीचे साधन मात्र सोडून, हरण करूं नये. कारण नारदानें–आयुधीयांचीं आयुधें, वाहनांवर जीविका चालविणारांचीं वाहनें, वेश्यांचे अलंकार, संगीतज्ञांचीं वाद्यादि उपकरणें, शिल्पज्ञांचीं शिल्पसाधनें इत्यादि सर्वस्व हरण करणाऱ्या राजानेंही हरण करूं नयेत, असें म्हटलें आहे. ब्राह्मणाच्या शरीरदंडाचा निषेध केलेला असल्यामुळें वधस्थानीं त्याचें मस्तकमुंडनादि करावें ३०२.

मृताङ्गलग्नविक्रेतुर्गुरोस्ताडयितुस्तथा ।
राजयानासनारोढुर्दण्ड उत्तमसाहसः ॥ ३०३ ॥

मृतशरीरावरील वस्त्रें, पुष्पें इत्यादिकांस विकणाऱ्या, पिता, आचार्य इत्यादि गुरूंस ताडन करणाऱ्या व राजाच्या अनुमतीवाचून त्याच्या गजाश्वादि वाहनांवर आणि सिंहासनादि आसनांवर आरूढ होणाऱ्या पुरुषास उत्तम साहस दंड करावा ३०३.

द्विनेत्रभेदिनो राजद्विष्टादेशकृतस्तथा ।
विप्रत्वेन च शूद्रस्य जीवतोऽष्टशतो दमः ॥ ३०४ ॥

जो क्रोधादिकांमुळें दुसऱ्याचे दोन्ही डोळे फोडतो, गुरुप्रभृति अत्यंत हितकर्त्यांस सोडून बाकी दुसरा जो कोणी ज्योतिःशास्त्रज्ञ राजाचें अनिष्ट ( एक वर्षानें तुझें राज्य जाईल इत्यादि ) सांगतो, त्याचप्रमाणें जो शूद्र भोजनादिकांकरितां यज्ञोपवीतादि ब्राह्मणचिन्हें दाखवितो त्यांना आठशें पण दंड करावा. पण जो शूद्र श्राद्धभोजनाकरितां ब्राह्मणाचा वेष धारण करतो त्याच्या शरीरावर तापलेल्या सळीनें यज्ञोपवीत काढावें. वृत्तीकरितां ब्राह्मणाची यज्ञोपवीतादि चिन्हें धारण करणाराचा वधच करावा ३०४.

राग—लोभादिकांमुळें विपरीत व्यवहारदर्शन करणारास दंड सांगतात—

दुर्दृष्टांस्तु पुनर्दृष्ट्वा व्यवहारान्नृपेण तु ।
सभ्याः सजयिनो दण्डया विवादाद्द्विगुणं दमम् ॥ ३०५॥

स्मृतिप्रोक्त आचारप्राप्त धर्माचें उल्लंघन करून राग—लोभादिकांच्या योगानें ज्यांचा विचार योग्य रीतीनें झालेला नाहीं, अशी शंका आली असेल ते व्यवहार राजानें स्वतः पुनः पहावे, व त्यांचा निर्णय करणाऱ्या सभ्यांचा दोष आहे, असें निश्चित झाल्यास पूर्व सभ्य व त्यांच्या निर्णयानें विजयी झालेला वादी किंवा प्रतिवादी यांतील प्रत्येकास त्या विवादप-

दांत पराजित होणाराला जितका दम सांगितला असेल त्याच्या दुप्पट दंड करावा. पूर्वीच्या ' रागाल्लोभात्० ' इत्यादि वचनानें असल्या व्यवहारांत विजयी होणारास दंड प्राप्त होत नव्हता. त्याचें विधान या वचनानें केलेलें असल्यामुळें या श्लोकावर पुनरुक्तदोष येत नाहीं. जेव्हां साक्षीदारांच्या दोषामुळें व्यवहारांत दोष उद्भवतो तेव्हां साक्षीदारांनाच दंड करावा. त्यांत विजयी होणाराला अथवा सभ्यांना दंड करूं नये. पण—राजाच्या संमतीनें जेव्हां व्यवहार अयोग्य रीतीनें पाहिला जातो तेव्हां राजासह सर्वच सभ्यांना दंड द्यावा. कारण व्यवहारांतील दोषाचा एक पाद ( चतुर्थांश ) कर्त्याकडे जातो. दुसरा ( चवथा ) भाग साक्षीदारांस प्राप्त होतो. तिसरा पाद सर्व सभासदांच्या कडे येतो व चवथा राजाला लागतो, असें वचन आहे. पण हें वचन राजा, सभासद इत्यादिकांतील प्रत्येकाच्या दोषाचें प्रतिपादन करीत आहे. पापरूप अपूर्वाचा एकेकाला विभाग करून देत नाहीं. कारण कर्त्याच्या कर्मसंबंधीं फलाला उत्पन्न करण्याचा अपूर्वाचा स्वभावच आहे ३०५.

न्यायतः निर्णय केलेल्या व्यवहारास बदलणाऱ्या पुरुषाला दंड सांगतात—

योऽमन्येताजितोऽस्मीति न्यायेनापि पराजितः ।
तमायान्तं पुनर्जित्वा दापयेद्द्विगुणं दमम् ॥३०६॥

न्यायमार्गानें पराभव झालेला असूनही जो उद्धटपणानें मी पराजित झालेलों नाहीं, असें समजत असेल त्या कूटलेख्यादिकांचा उपन्यास करून धर्माधिकरणामध्यें ( न्यायसभेंत ) येणाराला धर्मानेंच पुनः पराजित करून दुप्पट दंड द्यावा. नारदानेंही असेंच सांगितलें आहे. मनूनें ( अ. ९ श्लो. २३३ ) तीरित ( साक्षि—लेख्य इत्यादिकांवरून निर्णीत, पण ज्यांतील दंड अजून वसूल केलेला नाहीं असें ) व अनुशिष्ट ( ज्यांतील दंडही घेतला आहे असें ) व्यवहारकार्य धर्मतःच झालेलें आहे असें जाणावें. सुज्ञानें त्याला पुनः बदलूं नये, असें म्हटलें आहे. पण त्याचा उद्देश-अर्थी व प्रत्यर्थी यांतील कोणा तरी एकाच्या सांगण्यावरून व्यवहारांत अधर्म घडला आहे, अशी शंका असल्यासच दुप्पट दंडाची प्रतिज्ञा करवून तो व्यवहार पुनः चालवावा. व्यवहाराचा निर्णय धर्मतः झाला आहे, असा निश्चय असतांनाही राजानें दुप्पट दंडाच्या लोभानें तो चालवूं नये—असा आहे. व्यवहाराविषयीं शंका आली तरीही तीरित व अनुशिष्ट यांना बदलूं नये, असा त्या वचनाचा उद्देश नाहीं. ' दुसऱ्या राजानेंही जो व्यवहार न्यायास सोडून केला असेल त्याचें चांगलें परीक्षण करून धर्म्य मार्गांत प्रस्थापन करावें' असेंही स्मृतिवचन आहे ३०६.

अन्यायानें घेतलेल्या दंडाच्या धनाची गति सांगतात—

राज्ञाऽन्यायेन यो दण्डो गृहीतो वरुणाय तम् ।
निवेद्य दद्याद्विप्रेभ्यः स्वयं त्रिंशद्गुणीकृतम् ॥ २०७ ॥

राजानें लोभवश होऊन अन्यायानें जो दंड घेतला असेल त्याला तीसपट करून आणि ' वरुणायेदम् ' असा संकल्प सोडून ब्राह्मणाला स्वतः वाटून द्यावा आणि त्याचप्रमाणें

ज्याच्यापासून दंडरूपानें अन्यायानें जेवढें घेतलें असेल तेवढें धन त्यास परत द्यावें. कारण असें न केल्यास अपहाराचा दोष लागतो. शिवाय अन्यायानें घेतलेल्या धनावरील पूर्व स्वामीचें स्वत्व विच्छिन्न होत नाहीं ३०७.

इति प्रकीर्णकप्रकरणम् २५.

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत याज्ञवल्क्यस्मृतीच्या दुसऱ्या व्यवहाराध्यायाचें श्रीविज्ञानेश्वरकृत मिताक्षरेच्या अनुरोधानें लिहिलेलें साररूप विवरण समाप्त झालें.

श्रीकृष्णार्पणमस्तु.

---

# अथ प्रायश्चित्ताध्यायः ३.



## आशौचप्रकरणम् १.



**मिताक्षरासार**—श्रीगणेशाय नमः। श्रीसरस्वत्यै नमः। गृहस्थाश्रम्यांचे नित्य व नैमित्तिक धर्म सांगितले. अभिषेकादिगुणयुक्त विशेष गृहस्थाचेही गुणधर्म चांगल्या रीतीनें प्रदर्शित केले. आतां त्या धर्मांच्या अधिकाराचा संकोच करण्यास कारण होणाऱ्या आशौचाचें प्रतिपादन करून त्याच्या द्वारा त्या धर्मांचा अपवाद सांगतात–आशौचशब्दानें–स्नानादिकांच्या योगानें ज्याचा निरास होतो असा एक काल आणि पिंडोदकदानादि विधि व अध्ययनादिकांचा निषेध यांच्या निमित्तभूत ( यांस निमित्त होणारा ) असा पुरुषामधील कांहींएक अतिशय ( आधिक्य )–यांचेंही कथन केलें जात आहे. केवळ कर्मांचा अनधिकारच नव्हे कारण ‘ अशुद्धा बांधवाः सर्वे ’ इत्यादि वचनांमध्यें अशुद्धत्व सांगितलें आहे. पण व्यवहारांत अशुद्धशब्दाचा प्रयोग सर्वच अनधिकारी पुरुषांचे ठायीं होत नसतो आणि शब्दाच्या अर्थाचें ज्ञान तर वृद्धांचा व्यवहार व व्युत्पत्ति यांवरून होत असतें. शिवाय आशौचींना दानादिकांचा निषेध सांगितला आहे. तेव्हां दानादिकांची अयोग्यता हाही आशौच शब्दाचा अर्थ आहे, अशी कल्पना करूं लागल्यास उदकदानादि विधींही असल्यामुळें ‘ त्याची योग्यता ’ हाही आशौच शब्दाचा अर्थ कल्पावा लागेल आणि त्यामुळें अनेकार्थ कल्पना हा त्यावर दोष येईल. यास्तव अशुद्ध शब्दानें सर्व अनधिकाऱ्यांचें ग्रहण करणें, ह्या पक्षाची उपेक्षा करून वर सांगितल्याप्रमाणें–स्नानादिकानें निरास पावणारा काल व पिंडादि दान व अध्ययननिषेध यांस कारण होणारा पुरुषगत विशेष–एवढाच त्याचा अर्थ समजावा. असो; आतां अगोदर पिंडादि–आशौचींनीं काय करावें तें सांगतात—

ऊनद्विवर्षं निखनेन्न कुर्यादुदकं ततः ।
आश्मशानादनुव्रज्य इतरो ज्ञातिभिर्वृतः ॥ १ ॥
यमसूक्तं तथा गाथा जपद्भिर्लौकिकाग्निना ।
स दग्धव्य उपेतश्चेदाहिताग्न्यावृतार्थवत् ॥ २ ॥

ज्याला दोन वर्षे अजून पुरीं झालेलीं नाहींत अशा बालकाला भूमींत खळगा काढून त्यांत पुरून ठेवावें, जाळूं नये. 'सकृत्प्रसिञ्चन्त्युदकं' इत्यादि वचनांनीं प्रेतोद्देशानें ज्याचें विधान केलें आहे, असें उदकदानादि और्ध्वदेहिक कर्महि त्याचें करूं नये, त्या मृत बालकाला गंध, पुष्प, अनुलेपन इत्यादिकांनीं भूषित करून शुद्ध भूमींत (म्हणजे स्मशानास सोडून इतर अस्थिसमूहानें रहित असलेल्या स्थानीं) गांवाबाहेर पुरावें. मनूनें (अ. ५ श्लो. ६८) असेंच सांगितलें आहे. त्यानें 'अरण्ये काष्ठवत्त्यक्त्वा' असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ असा-ज्याप्रमाणें अरण्यांत काष्ठाला टाकून त्याविषयीं लोक उदासीन होतात त्याप्रमाणें दोन वर्षांच्या आंतील मृत मुलाला ही खोदलेल्या भूमींत टाकून त्याच्याविषयीं श्राद्धादि और्ध्वदेहिक कर्मासंबंधीं उदासीन व्हावें. अर्थात् आचारप्राप्त श्राद्धादिकांचा अभाव या दृष्टान्तानें सुचविला आहे. त्याला घृतानें माखून यमगाथा म्हणणाऱ्या लोकांनीं भूमींत पुरावें. ज्याला दोन वर्षे पूर्ण झालीं आहेत. तो मेला असतां त्याच्या सपिंड व समानोदक ज्ञातींनीं ज्येष्ठपुरःसर स्मशानापर्यंत अनुगमन करावें. अर्थात् याच वचनावरून ज्याला दोन वर्षे पुरीं झालीं नाहींत त्याच्याबरोबर गमन करणें नियत नाहीं, असें सूचित होतें. असो, याप्रमाणें दोन वर्षांच्या पुढील वयाच्या मृताबरोबर स्मशानांत जाऊन 'परेयिवांसं०' इत्यादि ऋग्वेदांतील यमसूक्त व यमगाथा यांचा जप करणाऱ्या त्यांनीं जातारणि नसल्यास लौकिक असंस्कृत अग्नीनें जाळावें आणि जातारणि असल्यास तिचें मंथन करून उत्पन्न केलेल्या अग्नीनें त्याला जाळावें; लौकिकाग्नीनें जाळूं नये. कारण लौकिक अग्नि केवळ अग्निसंपाद्य (पाकादि) कार्याकरितां निर्माण केलेला असतो. पण तोही चांडालाग्नि इत्यादि दूषित अग्नीस सोडून बाकीचा घ्यावा. देवलानें 'चांडालाग्नि अमेध्याग्नि, सूतिकाग्नि, पतिताग्नि व चिताग्निः शिष्टांच्या ग्रहणास उचित नाहींत' असें सांगितलें आहे. लौगाक्षीनें त्यासंबंधीं असा विशेष सांगितला आहे—चौलकर्मानंतर नियमानें अग्न्युदक दान करावें. नामकरणानंतर चूडा झालेली नसली तरी प्रेताचा अभ्युदय व्हावा, अशा इच्छेनें अग्नि व उदकदान हें दोन्ही तूष्णीं करावें (तूष्णीं म्हणजे अमंत्रक, मंत्र न म्हणतां.) पण त्याविषयीं नियमच नाहीं. (अर्थात् विकल्प सिद्ध झाला.) मनूनेंही (अ. ५ श्लो. ७०) ज्याला तीन वर्षे झालेलीं नाहींत त्याची उदकक्रिया बांधवांनीं करूं नये. अथवा ज्याला दांत आले आहेत किंवा ज्याचें नामकरण झालें आहे त्याची उदकक्रिया (व तिच्यावरून उपलक्षित होणारा अग्निसंस्कारही) करावी, असा विशेष दाखविला आहे. कुलधर्माच्या अपेक्षेनें चूडेला उशीर लागला तरी तीन वर्षांनंतर अग्निदान व उदकक्रिया नियमानें करावी, असें ज्ञात होतें आणि लौगाक्षीच्या वचनानें 'तीनवर्षांच्या पूर्वीही चूडा

झालेली असल्यास तीं दोन्हीं नियमानें करावीं, ' असें होतें. ज्या कार्याचें प्रयोजन संभवतें तें करावें व ज्याचें प्रयोजन लुप्त झालेलें असतें तें सोडावें. लौकिकाग्निविधानानें व उपनयन झालेल्या अनाहिताग्नीला गृह्याग्नीनें जाळण्याच्या विधानानें सर्व प्रयोजनाचा अपहार केलेला असल्यामुळें आहवनीयादिकांचीही निवृत्ति होते. वृद्ध याज्ञवल्क्यानें ' आहिताग्नि मृत पुरुषास यथान्याय तीन अग्नींनीं, अनाहिताग्नीस एका गृह्याग्नीनें व बाकीच्या जनांस लौकिकाग्नीनें जाळावें. असें सांगितलें आहे. शूद्राकडून स्मशानांत अग्नि, काष्ठें इत्यादि नेववूं नये. कारण—ज्याचा अग्नि, तृण, काष्ठ, हवि, इत्यादि शूद्र आणतो त्याचें प्रेतत्व सदा राहतें व तो अधर्मानें लिप्त होतो, असें यमाचें स्मरण ( स्मृतिवचन ) आहे. ' स्नान घातलेल्या व गंध-पुष्पांनीं भूषित केलेल्या प्रेताला सुवासिक द्रव्यांनीं जाळावें, ' असें स्मरण असल्यामुळें स्नानानंतर दाह करावा. प्रचेतानेंही प्रेताच्या पुत्रादिकांनीं त्यास स्नान घालावें. नंतर वस्त्रादिकांनीं त्याचें पूजन करावें. त्याला नग्न जाळूं नये. कांहीं देय द्यावें. ( म्हणजे शवाचें एकादें वस्त्र स्मशानवासी पुरुषाकरितां तेथें सोडावें ) प्रेताला नेण्याविषयींही मनूनें विशेष दाखविला आहे—स्वजातीचे जन असतांना विप्राला शूद्राकडून नेववूं नये, शूद्रसंपर्कानें दूषित झालेली आहुति अस्वर्ग्या होते. मृत शूद्रास नगराच्या दक्षिणद्वारानें न्यावें. वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण यांस क्रमानें पश्चिम, उत्तर व पूर्व नगरद्वारानें स्मशानांत न्यावें. हारीतानेंहीं प्रेतास ग्रामाच्या सन्मुख नेऊं नये, असें सांगितलें आहे. प्रवासांत असतांना मेल्यामुळें शरीर जर न मिळालें तर हाडांनीं त्याची प्रतिकृति करून संस्कार अथवा हाडेंही न मिळाल्यास शौनकादि गृह्योक्तमार्गानें प्रतिकृति करून संस्कार करावा. अशा प्रसंगीं आशौच दशाहादिक समजावें. कारण वसिष्ठांनीं आहिताग्नि प्रवासांत असतांना जर मेला तर त्याचा पुनःसंस्कार करून शवाप्रमाणें आशौच धरावें, असें सांगितलें आहे. अनाहिताग्नि प्रवासांत मेल्यास पाण्यांत कालवलेल्या पिठाच्या पुतळ्याचें ' असौ स्वर्गाय लोकाय स्वाहा ' असें म्हणून ( पर्णशर ) दहन करावें. बांधवांनीं तीन रात्र आशौच धरावें असें वचन आहे. या सर्व वचनांचा सारांश असा—नामकरणाच्या पूर्वी मृताला पुरावेंच व उदकदानादि करूं नये. त्यानंतर तीन वर्षांपर्यंत अग्निसंस्कार व उदकदान वैकल्पिक आहे. त्यानंतर उपनयन होईतों तूष्णीं ( अमंत्रक ) अग्न्युदक क्रिया नियत आहे. तीन वर्षांपूर्वीही ज्याची चूडा केली आहे त्याचा अग्निसंस्कार व उदक क्रिया नियत आहे. उपनयनानंतर अग्निसंस्कार करून सर्व और्ध्वदेहिक कर्म करावें, त्यांतल्या त्यांत हा विशेष आहे. ज्याचें नुस्तें उपनयन झालें आहे त्याचा लौकिकाग्नीनें दाह करावा, जो अनाहिताग्नि असेल त्याचा गृह्याग्नीनें दाह करावा, व यथासंभव पात्रयोजन करावें १, २.

संस्कारानंतर काय करावें तें सांगतात—

**सप्तमाद्दशमाद्वापि ज्ञातयोऽभ्युपयन्त्यपः ।**
**अपुनःशोशुचदघमनेन पितृदिङ्मुखाः ॥ ३ ॥**

सात किंवा दहा दिवसांच्या पूर्वीपासून समानोदक, सपिंड व समानगोत्र ज्ञातिजन ' अपुनः शोशुचदघं ' या मंत्रानें दक्षिणाभिमुख होऊन जलाकडे जातात. मूळांत ' अभ्युपयान्ति ' असा शब्द असून त्याचा अर्थ अभ्युपगमन ( सन्मुख-समीप जाणें ) असा आहे.

त्यावरून तत्प्रयोजनभूत उदकदानयुक्त अभ्युपगमन लक्षित होतें. कारण पुढच्या श्लोकांतच मातामह–आचार्य इत्यादिकांचे ठायींही उदकदानाचा अतिदेश केलेला दिसत आहे. असो, हें अभ्युपगमन अयुग्म म्हणजे पहिल्या, तिसऱ्या, पांचव्या व सातव्या दिवशीं करावें. दहा दिवसांच्या पक्षांत नवव्या दिवशींही करावें. स्नानानंतर उदकक्रिया करणें प्रशस्त आहे. शरीर अग्नीमध्यें संयुक्त करून त्याकडे न पाहाणारे जन जलाभ्युपयन करितात ' असें शातातपाचेंही म्हणणें आहे. प्रचेतानें ' प्रेताच्या बांधवांनीं वृद्धांच्या अनुक्रमानें उदकांत उतरून यज्ञोपवीत व उत्तरीय वस्त्र अपसव्य घालून जलाशयासमीप उदकदान करावें. ब्राह्मणाच्या बांधवांनीं ही उदकक्रिया करतांना दक्षिणेकडे मुख करावें. क्षत्रियांच्या व वैश्यांच्या बांधवानीं क्रमानें उदङ्मुख व प्राङ्मुख होऊन जलदान करावें,' असें म्हटलें आहे. दुसऱ्या स्मृतींतून जितके आशौचाचे दिवस तितकीं उदकदानें करावीं, असें म्हटलें आहे. जसें–विष्णुस्मृतींत 'जोंवर आशौच असेल तोंवर प्रेताला उदक व पिंड द्यावा. ' व प्रचेतःस्मृतींत–' प्रेताकरितां प्रत्यहीं पूर्ण उदकाञ्जलि द्यावी. पिंडदान समाप्त होईतों प्रत्यहीं एकेक उदकांजलि वाढवीत जावें. '. अर्थात् पहिल्या दिवशीं एक, दुसऱ्या दिवशीं दोन इत्यादि दहा दिवसापर्यंत जलांजलीची संख्या वाढवावी. या दोन गुरु–लघुकल्पांतील कोणताही एक कल्प स्वीकारून अनुष्ठान केल्यानेंही जरी शास्त्रार्थ सिद्ध होत असला तरी गुरुकल्प अधिक क्लेशावह असल्यामुळें त्याचे ठिकाणीं कोणाचीच प्रवृत्ति होणार नाहीं. यास्तव गुरुतरकल्प स्वीकारल्यास प्रेतावर अधिक उपकार होईल अशी कल्पना करावी. नाहींतर गुरुतरकल्पाचें विधानच व्यर्थ ठरेल. दोन्ही हातांनीं उदकदान करण्याविषयीं वसिष्ठानें सांगितलें आहे ३.

पुढील पांचव्या श्लोकाच्या पूर्वार्धांत सांगितलेल्या गुणांनीं विशिष्ट, अशा उदकदानाचा समानगोत्र व मातामहादि यांच्या ठिकाणीं अतिदेश करितात—

**एवं मातामहाचार्यप्रेतानामुदकक्रिया ।**
**कामोदकं सखिप्रत्तास्वस्त्रीयश्वशुरर्त्विजाम् ॥ ४ ॥**

ज्याप्रमाणें मेलेल्या सपिंड व सगोत्र माणसांना उदक दिलें जातें त्याचप्रमाणें मृत मातामहास व आचार्यास नित्य उदकदान करावें. मित्र, विवाहित कन्या–भगिनी इत्यादि, भगिनीपुत्र, श्वशुर, व याजक, ऋत्विज यांना उद्देशून कामोदक द्यावें. काम म्हणजे इच्छा, तिच्या योगानें जें उदकदान तें कामोदकदान. प्रेताच्या अभ्युदयाची इच्छा असल्यास उदकदान करावें. नसल्यास करूं नये ( न केल्यास प्रत्यवाय नाहीं ) ४.

उदकदानांतील गुणविधि सांगतात—

**सकृत्प्रसिञ्चन्त्युदकं नामगोत्रेण वाग्यताः ।**

तें उदकदान अशारीतीनें करावें. सपिंड व समानोदक यांनीं मौन धारण करून व प्रेताचें नामगोत्र उच्चारून ' अमुकनामा प्रेतोऽमुकगोत्रस्तृप्यतु '. असें म्हणून एकदांच जलसेक करावा. अथवा प्रचेतानें सांगितल्याप्रमाणें तीन वेळ जल द्यावें. प्रत्येक दिवशीं एकेक

अंजलि वाढविण्याविषयीं वर सांगितलेंच आहे. त्यानेंच आणखीं असेंही म्हटलें आहे. त्यानंतर नदीच्या कांठीं जाऊन, शौच यथाविधि करून अगोदर वस्त्र धुवून नंतर सचैल स्नान करावें. त्यानंतर एकाग्र चित्तानें तेथून पाषाण घेऊन त्यावर ब्राह्मणांस उद्देशून दहा, क्षत्रियास बारा, वैश्यास पंधरा व शूद्रास तीस जलांजलि याव्या. नंतर घरांत प्रवेश करावा. पुनः स्नान करून गृहशौच करवावें. सपिंडांतील कित्येकांच्या उदकदानाचा प्रतिषेध सांगतात—

न ब्रह्मचारिणः कुर्युरुदकं पतितास्तथा ॥ ५ ॥

ज्ञातित्व असलें तरी समावर्तन होईपर्यंत ब्रह्मचारी व पतित ( द्विजातिकर्माधिकारापासून च्युत झालेले ) यांनीं उदकादिदान करूं नये. पण ब्रह्मचर्याचा काल संपल्यावर पूर्वी मेलेल्या सपिंडास उद्देशून उदकदान व आशौच करावेंच. कारण मनूनें ' व्रत समाप्त होई तों आदिष्टीनें उदकदान करूं नये. पण तें समाप्त झालें म्हणजे मग उदकदान करून तीन रात्र आशौच धरावें. ' आदिष्टी म्हणजे ' याच्यापाशीं राहून ब्रह्मचर्य व्रत कर, याचें जलपान कर, याचें कर्म कर, दिवसा निजूं नको, ' असा आदेश ज्याला केला आहे तो ब्रह्मचारी. पण हें विधान पित्रादिकांस सोडून बाकीच्या विषयीं आहे. कारण पुढें ' आचार्यपित्रुपाध्यायान्० ' ( श्लोक १५ )-या वचनांत स्वतः योगीश्वरच तसें सांगणार आहेत. याविषयीं आचार्यांचें असें म्हणणें आहे–आदिष्टिशब्दानें ज्यानें प्रायश्चित्तास आरंभ केला आहे तो घ्यावा. त्यालाच हा उदकदानादि निषेध आहे. त्यानें प्रायश्चित्तरूप व्रत समाप्त झाल्यानंतर उदकदान व त्रिरात्र आशौच करावें. त्याचप्रमाणें क्लीबादिकांचें उदकदायित्व निषिद्ध मानलेलें आहे. आदिशब्दानें चोर, व्रात्य, विधर्मी, गर्भ व भर्ता यांच्याशीं द्रोह करणाऱ्या व मद्यपान करणाऱ्या स्त्रिया यांचें ग्रहण करावें. कारण, वृद्ध मनूनें तसें सांगितलें आहे ५.

याप्रमाणें उदकदानाविषयीं विशेषप्रकारच्या कर्त्यांचा निषेध करून आतां ज्यांना उद्देशून तें द्यावयाचें त्यांच्यांतील कांहींजणांचा निषेध करितात—

पाखण्ड्यनाश्रिताः स्तेना भर्तृघ्न्यः कामगादिकाः ।
सुराप्य आत्मत्यागिन्यो नाशौचोदकभाजनाः ॥ ६ ॥

पुरुषाच्या मस्तकाचें कपाल, इत्यादि वेदबाह्यलिंगांस धारण करणें, हेंच पाखंड होय. तें ज्यांच्यामध्यें असतें त्यांस पाखंडी म्हणतात. अधिकार असतांनाही एकाद्या उचित आश्रमाचा आश्रय न करणारे लोक अनाश्रित होत. सुवर्णादि उत्तम द्रव्याचा अपहार करणारे स्तेन, पतिघातिनी स्त्रिया, कुलटा, आदि शब्दानें आपला गर्भ, ब्राह्मण इत्यादिकांचा घात करणाऱ्या, निषिद्ध मद्याचें प्राशन करणाऱ्या, विष, अग्नि, उदक इत्यादिकांच्या योगानें आत्मघात करणाऱ्या, यांतील एकही पुरुष किंवा स्त्री पुढें सांगितलेलें आशौच किंवा और्ध्वदेहिक कर्म यांस पात्र होत नाहीं. अर्थात् या श्लोकांतील पाखंडीप्रभृति पुरुष व प्रतिघ्नीप्रभृति स्त्रिया सपिंडादिकांच्या आशौचादिकांस निमित्त होत नाहींत. यास्तव त्यांतील कोणी मेल्यास सपिंडांनीं उदकदानादि करूं नये, असें सांगण्यासाठीं हें वचन प्रवृत्त झालें आहे. ' सुराप्य ' इत्यादि येथें स्त्रीलिंगी पदें जरी योजलेलीं आहेत तरी स्त्रीलिंग येथें विवक्षित नाहीं. अर्थात्

सुरापानादि करणारा पुरुषही सपिंडादिकांच्या आशौचादिकांचें निमित्त होत नाहीं. कारण मीमांसाकुशल जन ' लिंग, वचन, देश, काल व कर्माचें फल हें पंचक अनुपादेय आहे, ' असें म्हणत असतात. पण हें बुद्धिपूर्व पाप करणाराविषयीं आहे. कारण गौतमानें—महाप्रस्थान, अनशन ( अभक्षण ), पर्वतशिखरावरून घालवून घेणें, शस्त्र, अग्नि, विष, फांस इत्यादिकांच्या योगानें मरणाची इच्छा करणाराचें आशौच ज्ञातीच्या लोकांस लागत नाहीं,—असें सांगितलें आहे. पण त्यांत ' इच्छतां ' असें विशेषण असल्यामुळें प्रमादानें कांहीं दोष घडल्यास त्यांत फारसा प्रत्यवाय नाहीं. शिवाय ' अग्नि, उदक इत्यादिकांच्या योगानें प्रमादानें कोणी मेल्यास त्याचें आशौच व उदकक्रिया करावी, ' असें अंगिरानें सांगितलेंही आहे. विशेषप्रकारच्या मृत्यूलाही उद्देशून आशौचादिकांचा निषेध केलेला आहे. जसें—चांडाल, उदक, सर्प, ब्राह्मण, वीज, दाढांचे प्राणी व पशु यांच्या योगानें पापकर्म्यास मृत्यु येत असतो. अशा प्रेतांना दिलेलें उदक व पिंडदान त्यांना पोंचत नाहीं. तर तें अंतरिक्षांतच नष्ट होतें. पण हें मुद्दां इच्छापूर्वक वरील प्राण्यांकडून आत्मघात करविल्यास जाणावें. अर्थात् ' सर्वत एव आत्मानं गोपायेत् ' या विधीचें उल्लंघन करून जो दर्पानें चांडाल, सर्प इत्यादिकांस मारावयास जातो अथवा सर्पादि दुष्ट दंष्ट्रावान् जीवांस धरावयास जातो व शेवटीं त्याच्या हातून स्वतःच मरतो त्याच्या आशौचादिकांचा हा निषेध आहे; पण तो दशाहकालावच्छिन्न आशौचाचा आहे. कारण, सद्यःशौच पुढें सांगणार आहेत. त्याचप्रमाणें त्यांचें दाहादिकही करूं नये. कारण, ब्राह्मणदंडानें मेलेल्यांचें आशौच, उदक, शोक, दाहादि अंत्यकर्म, प्रेतवाहनसाधन उचलणें, इत्यादि वर्ज करावींत ' असें यमाचें स्मरण आहे. आहिताग्नि जन चांडालादिकांच्या हातून वृथा मरण पावल्यास त्याचा वैतानाग्नि जलांत फेंकावा. आवसथ्य चव्हाठ्यावर टाकावा व पात्रें अग्नींत जाळावीं आणि अशा आत्मघाती व पतितादि पापी आहिताग्नीची अग्निक्रिया निषिद्ध असल्यामुळें त्यांना गंगाजलांत सोडणें हितकर आहे. वास्तव आहिताग्नि व अनाहिताग्नि यांस उद्देशूनच हा सर्वसाधारण दाहादिनिषेधविधि आहे. पण स्नेहादि कारणानें त्याचा अतिक्रम केल्यास प्रायश्चित्त करावें. बुद्धिपूर्वक असलेल्या पतिताचें अग्निसंस्करण, उदकदान, स्नान, स्पर्शन, वहन ( वाहणें ), अश्रुपात इत्यादि केल्यास तप्त कृच्छ्र करावें व यांतील एखादें कृत्य अबुद्धिपूर्वक झालें असल्यास संवर्तानें सांगितलेलें सांतपन कृच्छ्र करावें. जो पूर्वोक्त पाप्यांच्या शवास स्पर्श करतो अथवा त्यांच्याकरितां अश्रु ढाळतो त्यानें एकरात्र उपोषण करावें.पण या वचनानें सांगितलेलें उपोषण व त्याचप्रमाणें सुमन्तूनें सांगितलेलें एकमास भिक्षान्न भोजन हीं दोन्हीं अशक्ताविषयीं आहेत. अशाच रीतीनें दुसऱ्याही स्मृतिवाक्यांची व्यवस्था करावी. पण हा जो दाहादिकांविषयींचा प्रतिषेध आहे तो नित्यकर्मांचें अनुष्ठान करण्यास असमर्थ असलेल्या वृद्ध, वानप्रस्थ इत्यादिकांना सोडून इतरांविषयीं आहे, असें जाणावें. कारण ' ज्यांचें शौच व स्मरण लुप्त झालें आहे व वैद्यानें ज्यांची चिकित्सा करण्याचें नाकारलें आहे, अशा एकाद्यानें भृगुपात, अग्नि, उपवास, जल इत्यादिकांच्या योगानें आत्मघात केल्यास त्याचें त्रिरात्र आशौच, दुसऱ्या दिवशीं अस्थिसंचय व तिसऱ्या दिवशीं उदकक्रिया

करून चवथ्या दिवशीं श्राद्ध करावें. ' असें म्हणून धर्मशास्त्रानेंच वृद्धादिकांस मरणाची अनुज्ञा दिलेली आहे.

असो; पण ज्या ज्या उपायांनीं शास्त्रानें आत्महत्येस अनुमोदन दिलें आहे त्यास मात्र सोडून बाकीच्या मार्गानें आत्महनन केल्यास श्राद्धादि और्ध्वदेहिक कर्मांचा निषेध केलेला असल्यामुळें पुढें काय करावें, अशी अपेक्षा झाली असतां वृद्ध याज्ञवल्क्य व छागलेय यांनीं असें सांगितलें आहे—अशा लोकांकरितां त्यांच्या आप्तांनीं लोकनिंदेच्या भीतीनें नारायण बलि करावा. म्हणजे त्यांची शुद्धि होते. त्यावाचून होत नाहीं, असें यमानें म्हटलें आहे. यास्तव त्यांनाही दक्षिणेसह अन्न द्यावें. ' व्यासानेंही ' नारायणास किंवा शिवास उद्देशून जें दानादि दिलें जातें तेंच त्याला शुद्ध करणारें होतें, यांत कांहीं संशय नाहीं. ' असें म्हटलें आहे. अर्थात् अशारीतीनें नारायणबलि प्रेताला शुद्धि संपादन करून देऊन त्याच्या द्वारा श्राद्धादि-संप्रदानत्वयोग्यता आणून देतो. यास्तव नारायणबलीनंतर सर्व और्ध्वदेहिक कर्मही करावें. एवढ्यासाठीं षट्त्रिंशन्मतामध्येंही और्ध्वदेहिकाची अनुज्ञा दिसते—गाय व ब्राह्मण यांच्या क्षोभानें मेलेले, त्याचप्रमाणें पतित यांचें सर्व और्ध्वदेहिक संवत्सरानंतरच नारायण-बलि करून करावें.

**नारायणबलीचें विधान**—नारायणबलि अशा रीतीनें करावा.—कोणत्याही शुक्र एकादशीच्या दिवशीं विष्णु व वैवस्वत यम यांचें यथाशास्त्र पूजन करून व पिंडप्रवाहणान्त कर्म करून पिंड नदींत टाकावे. पत्नी-प्रभृतींस देऊं नये. नंतर त्याच रात्रीं अयुग्म ( विषम ) ब्राह्मणांस आमंत्रण करून उपोषण करावें. नंतर दुसऱ्या दिवशीं मध्याह्नसमयीं विष्णूचें आराधन करून एकोद्दिष्ट विधीनें ब्राह्मणपादप्रक्षालनापासून तृप्तिप्रश्नापर्यंत करून पिंडपितृयज्ञाग्रतोल्लेखनादि-अवनेजनान्त कर्म तूष्णीं करून, विष्णु, ब्रह्मा, शिव, व सपरिवार यम यांस चार पिंड द्यावे. नंतर नाम-गोत्रसहित प्रेताचें स्मरण करून व विष्णूचें नामसंकीर्तन करून पांचवा पिंड द्यावा. नंतर भोजनोत्तर आचमन केलेल्या ब्राह्मणांस दक्षिणेच्या योगानें संतुष्ट करून त्यांतील एका अतिशय गुणवान् ब्राह्मणास प्रेताच्या भावनेनें स्मरून गाय, भूमि व हिरण्य यांच्या योगानें अतिशय संतुष्ट करून त्यानंतर ज्यांनीं आपल्या हातांत पवित्र धारण केलें आहे अशा ब्राह्मणांकडून प्रेतास तिलादिसहित उदक देववावें आणि कर्त्यानें स्वजनांसह भोजन करावें.

**नागबलिविधि**—सर्पानें दंश केल्यामुळें जो मेला असेल त्यास उद्देशून करावयाच्या नागबलीसंबंधीं हा विशेष आहे. एक वर्षपर्यंत प्रत्येक पंचमीस पुराणोक्त विधीनें नागपूजा करून वर्ष पूर्ण होतांच नारायणबलि करावा व सोन्याचा नाग आणि प्रत्यक्ष गाय द्यावी. त्यानंतर सर्व और्ध्वदेहिक करावें.

**विष्णुपुराणोक्त नारायणबलि**—विष्णुपुराणांत नारायणबलीचें स्वरूप असें सांगितलें आहे. शुक्लपक्षांतील एकादशी तिथि आली असतां विष्णु व वैवस्वत यम यांचें पूजन करावें. दर्भांवर मधुयुक्त, तिलमिश्रित व घृतानें भिजलेले दहा पिंड दक्षिणेकडे तोंड

करून व चित्त नियत करून द्यावे. नंतर मनामध्यें विष्णूची स्थापना करून पिंड नदीच्या जलांत फेंकावे. प्रेताचें नामगोत्र घेऊन पुष्पांनीं पूजन करावें. धूप, दीप, भक्ष्य, भोज्य या उपचारांचें समर्पण करावें. नंतर महाकुलीन, विद्यातपःसमृद्ध व शांत अशा पांच, सात किंवा नऊ ब्राह्मणांस बोलवावें. उपोषण केलेल्या कर्त्यानें दुसऱ्या दिवशीं मध्याह्नसमयीं विष्णूचें पूजन करून पित्याच्या रूपाचें स्मरण करीत त्या आमंत्रित ब्राह्मणांस उत्तराभिमुख बसवावें. नंतर मन विष्णूमध्यें स्थिर करून आळस न करितां आवाहनादि जें सांगितलें आहे, तें सर्व पूर्वीं देवांचें व नंतर पितरांचें या क्रमानें करावें. त्यानंतर ब्राह्मण भोजन करून तृप्त झाले आहेत असें जाणून त्यांना यथाविधि तृप्तिप्रश्न करावा. देवाच्या रूपाचें स्मरण करीत घृतादि हविष्यव्यंजन व तिलादि यांसह केलेले अन्नाचे पांच पिंड द्यावे. प्रथम विष्णूला, नंतर क्रमानें ब्रह्मा, शिव व सानुचर यम यांस चार पिंड देऊन मृताचें नांव व गोत्र मनानें स्मरून व विष्णूचें नांव घेऊन पूर्वीप्रमाणेंच पांचवा पिंड द्यावा. आचमन करून पवित्र झालेल्या ब्राह्मणास दक्षिणा द्यावी. त्यांतील एका अतिशय श्रेष्ठ ब्राह्मणाची सोनें, गाय, वस्त्र व भूमि यांच्या योगानें, मनानें मृताचें स्मरण करीत पूजा करावी. त्यानंतर ब्राह्मणांनीं दर्भयुक्त हस्तांनीं मृताचें गोत्रयुक्त नांव मनांत धरून तिलोदक द्यावें. नंतर कर्त्यानें वाणीचें नियमन करून मित्र, भृत्य यांसह भोजन करावें. याप्रमाणें विष्णूच्या मतामध्यें स्थित होऊन जो आत्मघातकी मृतास उद्देशून हें कर्म करतो तो तत्काळ त्याचा उद्धार करतो, यांत कांहीं संशय नाहीं. सर्पदंशनिमित्त सौवर्ण नागदान प्रतिकृतिरूपानें सुमन्तूनें भविष्यपुराणांत सांगितलें आहे. सुवर्णभारप्रमाण केलेला नाग व गाय व्यासरूपी ब्राह्मणास देऊन पुत्र पितरांच्या ऋणांतून यथाशास्त्र मुक्त होतो ६.

याप्रमाणें अपवादासह उदकदान सांगून पुढें काय करावें तेंही सांगतात—

**कृतोदकान्समुत्तीर्णान्मृदुशाद्वलसंस्थितान् ।**
**स्नातानपवदेयुस्तानितिहासैः पुरातनैः ॥ ७ ॥**

ज्यांनीं उदकदान केलें आहे व स्नान करून जे उदकांतून वर आले आहेत, अशा पुत्रादिकांस मऊ व कोवळें गवत उगवलेल्या भूप्रदेशीं चांगल्या रीतीनें बसवून कुलवृद्धांनीं दुःखितांचा शोक क्षीण होण्यास समर्थ असलेल्या वचनांनीं व पुढें ज्यांचा निर्देश केला आहे अशा प्राचीन इतिहासांनीं बोध करावा ७.

शोकाचें निरसन करण्यास समर्थ अशा इतिहासाचें स्वरूप सांगतात—

**मानुष्ये कदलीस्तंभनिःसारे सारमार्गणम् ।**
**करोति यः स संमूढो जलबुद्बुदसन्निभे ॥ ८ ॥**

येथील मनुष्यशब्दानें जरायुज, अंडज इत्यादि चतुर्विधभूतजात लक्षित होतें. मनुष्याचा भाव, तें मानुष्य–मनुष्यपणा. त्या मानुष्यांत संसरणधर्मित्वामुळें कदलीस्तंभाप्रमाणें अन्तःसाररहित ( निःसार ) व जलावरील बुडबुड्याप्रमाणें क्षणभंगुर अशा संसारांत साराचें

( स्थिराचें ) अन्वेषण-शोधन जो करतो तो संमूढ ( अत्यंत विनष्टचित्त ) होय. यास्तव संसाराचें स्वरूप जाणणाऱ्या तुम्हीं असें करूं नये ८.

पञ्चधा संभृतः कायो यदि पञ्चत्वमागतः ।
कर्मभिः स्वशरीरोत्थैस्तत्र का परिदेवना ॥ ९ ॥

पूर्व जन्मांतील स्वशरीरजनित कर्मबीजांनीं आपलें फळ भोगण्याकरितां, पृथिव्यादि पंचभूतरूप असल्यामुळें, पांचप्रकारचा निर्मिलेला हा देह जर फलोपभोग निवृत्त होतांच ( संपतांच ) पंचत्वास पृथिव्यादिरूपतेस प्राप्त झाला तर त्यांत तुम्हांला दुःख कशाकरितां व्हावें ? तें ( तुमचें परिदेवन ) व्यर्थ असल्यामुळें तुम्हीं करूं नये. कारण वस्तुस्थितीच तशी आहे व वस्तुस्थितीचें अतिक्रमण कोणालाही करितां येणें शक्य नाहीं ९.

गन्त्री वसुमती नाशमुदधिर्दैवतानि च ।
फेनप्रख्यः कथं नाशं मर्त्यलोको न गच्छति ॥ १० ॥

शिवाय मरण हें कांहीं मोठेसें आश्चर्य नव्हे. कारण ही पृथ्वी व तशींच दुसरीं महाभूतेंही नाश पावतात. तसेंच जरा-मरणरहित समुद्रही प्रलयसमयीं नाश पावतात. मग अस्थिर असल्यामुळें फेनासारखा व मरणधर्मवान् असलेला हा भूतसंघ कसा बरें विनाश पावणार नाहीं मरणधर्मवानाचें प्रयाण उचितच आहे. यास्तव शोकसमावेश व्यर्थ आहे १०.

प्रेताचें अनिष्ट करीत असल्यामुळेंही अनुशोचन करूं नये, असें आतां सांगतात—

श्लेष्माश्रु बान्धवैर्मुक्तं प्रेतो भुङ्क्ते यतोऽवशः ।
अतो न रोदितव्यं हि क्रियाः कार्याः स्वशक्तितः ॥ ११ ॥

ज्याअर्थी अनुशोचन करणाऱ्या बांधवांच्या मुखनयनादिकांतून निघालेला श्लेष्मा व अश्रु, त्यांची इच्छा न करणाराही प्रेत खातो त्याअर्थी त्या प्रेता ( मृता ) करितां रडूं नये. तर प्रेताचें हित करण्याची इच्छा करणारानें स्वशक्त्यनुसार श्राद्धादि क्रिया कराव्या ११.

इति संश्रुत्य गच्छेयुर्गृहं बालपुरःसराः ।
विदश्य निम्बपत्राणि नियता द्वारि वेश्मनः ॥ १२ ॥
आचम्याग्न्यादि सलिलं गोमयं गौरसर्षपान् ।
प्रविशेयुः समालभ्य कृत्वाश्मनि पदं शनैः ॥ १३ ॥

याप्रमाणें कुलवृद्धांचीं वचनें चांगल्याप्रकारें ऐकून शोकाचा त्याग करावा व बालकांस पुढें करून गृहास जावें. घरापाशीं जाऊन पोंचल्यावर घराच्या द्वारामध्यें उभें राहून स्थिरचित्तानें दातांनीं लिंबाचीं पानें चावावीं व तीं ओकारी आणून थुंकावीं. नंतर अग्नि, उदक, गोमय, सर्षप, ( आदिग्रहणानें शंखानें सांगितलेले दूर्वांकुर व वृषभ ) यांस स्पर्श करून व साणेवर पाय ठेवून हळू ( स्खलन न पावतां ) घरांत प्रवेश करावा १२, १३.

आतां एक अतिदेश सांगतात—

**प्रवेशनादिकं कर्म प्रेतसंस्पर्शिनामपि ।**
**इच्छतां तत्क्षणाच्छुद्धिः परेषां स्नानसंयमात् ॥ १४ ॥**

निंबपत्रभक्षणापासून गृहप्रवेशापर्यंत जें हें कर्म सांगितलें आहे तें केवळ ज्ञातीच्या लोकांनीं करावें, असें नाहीं; तर धर्मार्थ प्रेताला अलंकृत करणें, खांद्यावरून वाहून नेणें इत्यादि करणाऱ्या इतरांनाही तें उचित आहे. धर्मार्थ प्रेताला वाहणाऱ्या असपिंड लोकांची तत्क्षणीं शुद्धि व्हावी अशी इच्छा असल्यास स्नान व प्राणायाम यांच्या योगानें ती होऊं शकते. कारण पराशरानें त्यांच्याविषयीं असें सांगितलें आहे– अनाथ ब्राह्मणप्रेताला जे द्विजाति वाहतात त्यांना अनुक्रमें पदोपदीं यज्ञाचें फळ मिळतें. त्या शुभ कर्म करणारांना पाप लागत नाहीं. व त्यांचें कांहीं अशुभ होत नाहीं. जलावगाहन केल्यानेंच ( म्ह० नुसत्या स्नानानेंच ) त्यांची शुद्धि होते. स्नेहादि कारणानें प्रेताला उचलल्यास मनूनें ' असपिण्डं द्विजं प्रेतं० ' ( अ० ५ श्लो० १०१, १०२ ) या वचनांत सांगितलेला विशेष समजावा. त्याचा इत्यर्थ असा—जो विप्र स्नेहादि कारणानें असपिंड द्विजप्रेताला वाहून त्याचें अन्न खातो व त्याच्या येथेंच निवास करतो त्याची दशाह आशौचानेंच शुद्धि होते. जो नुस्ता त्याच्या येथें राहतो पण अन्न खात नाहीं त्याची त्रिरात्र आशौचानें शुद्धि होते. जो नुस्तें त्याला उचलून नेतो पण त्याच्या घरीं रहात नाहीं व अन्नही खात नाहीं त्याला एकाह आशौच असतें. पण हा सर्व नियम सजातीयांविषयीं आहे. विजातीयांविषयीं गौतमानें दुसरा असा नियम सांगितला आहे—उत्तम वर्णानें हीन वर्णाच्या अथवा हीन वर्णानें उत्तम वर्णाच्या प्रेताला स्पर्श केल्यास प्रेत ज्या वर्णाचें असेल त्याचें उक्त आशौच स्पर्श करणारानें धरावें. येथील स्पर्शशब्दानें निर्हरणही घ्यावें. निर्हरण म्हणजे श्मशानांत वाहून नेणें. अर्थात् विप्रानें शूद्राचें निर्हरण केल्यास एक मास अशौच धरावें. शूद्रानें विप्रास नेल्यास दहा रात्री. याप्रमाणें शवाच्या वर्णानुसार आशौच धरावें १४.

ब्रह्मचाऱ्याविषयीं सांगतात—

**आचार्यपित्रुपाध्यायान्निर्हृत्यापि व्रती व्रती ।**
**स कटान्नं च नाश्नीयान्न च तैः सह संवसेत् ॥ १५ ॥**

आचार्य, माता, पिता, उपाध्याय यांना वाहून नेलें तरी व्रतवान् ब्रह्मचारी व्रतीच राहतो. त्याचें व्रत नष्ट होत नाहीं. स कटान्नं येथील कटशब्दानें आशौच लक्षित होतें. आशौचवानांचें अन्न ब्रह्मचाऱ्यानें खाऊं नये. त्यानें आशौची जनांसह निवासही करूं नये. पण यावरून आचार्यादिव्यतिरिक्त प्रेतांचें निर्हरण केल्यास ब्रह्मचाऱ्यांच्या व्रताचा लोप होतो, हें अर्थातच सिद्ध झालें. एवढ्यासाठींच वशिष्ठानेंही ' माता व पिता यांस सोडून शवकर्म करणाऱ्या ब्रह्मचाऱ्याच्या व्रताची निवृत्ति होते. ' असें म्हटलें आहे १५.

आतां आशौचवान् जनांविषयीं विशेष नियम सांगतात—

क्रीतलब्धाशना भूमौ स्वपेयुस्ते पृथक् पृथक् ।
पिण्डयज्ञावृता देयं प्रेतायान्नं दिनत्रयम् ॥ १६ ॥

विकत घेतलेलें अथवा अयाचित मिळालेलें भोजन ज्यांचें असतें त्यांना ' क्रीतलब्धाशनाः ' असें म्हणतात. आशौचवानांनीं क्रीतलब्धाशन होऊन रहावें. पण क्रीत किंवा अयाचित लब्ध अन्नच खाण्याचा नियम असल्यामुळें त्यांतील एकही न मिळाल्यास अर्थातच उपोषण प्राप्त झालें. वसिष्ठांनींही त्याविषयीं असें सांगितलें आहे—घरीं जाऊन आशौचींनीं तीन दिवस कांहीं न खातां अथवा विकत घेतलेलें अन्न खाऊन रहावें. भूमीवर चटई घालून बसावें, व पृथक् शयन करावें. खाटेवर शयन करूं नये. मनूनेंही ( अ. ५ श्लो. ७३ ) असा विशेष सांगितला आहे–तीन दिवस त्यांनीं सामुद्रलवणरहित अन्न भक्षण करावें. जलाशयांत सचैल शिरःस्नान करावें. मांसाशन वर्ज करावें व भूमीवर पृथक् शयन करावें. गौतमानेंही असा विशेष सांगितला आहे—शवकर्म करणारे ब्रह्मचारी अधःशय्येवर शयन करितात.

त्याचप्रमाणें पिंडपितृयज्ञाच्या प्राचीनावीतित्वादिप्रक्रियेनें प्रेतास तीन दिवस पिंडरूप अन्न भूमीवर मुकाट्यानें द्यावें. कारण मरीचीनें असें सांगितलें आहे–स्नान केलेल्या आशौचीनें शुद्ध चित्तानें ईशान्य दिशेंत चरु करून दर्भ–मंत्ररहित प्रेतपिंड बाहेर द्यावा. पण येथील मंत्र व दर्भ यांनीं रहित हें म्हणणें ज्याचें उपनयन झालेलें नाहीं त्याविषयीं आहे, असें जाणावें. कारण ' असंस्कृतानां भूमौ पिण्डं दद्यात् संस्कृतानां कुशेषु ' असें प्रचेताचें वचन आहे. त्याचप्रमाणें कर्त्याविषयीं नियम गृह्यपरिशिष्टावरून जाणावा. असगोत्र अथवा सगोत्र स्त्री किंवा पुरुष यांतील ज्या कोणी प्रथम दिवशीं पिंड दिला असेल त्यानेंच दशाह कर्म समाप्त करावें. द्रव्याविषयींचा नियमही शुनःशेपानें सांगितला आहे. शाली, सक्तु किंवा शाका यांनीं पिंडनिर्वपण करावें. पहिल्या दिवशीं जें द्रव्य घेतलें असेल तेंच दहा दिवस घ्यावें. स्नान, पुष्प, धूप, दीप हे उपचार तूष्णीं समर्पण करावें. पिंड पाषाणावर द्यावा. ' भूमीवर किंवा पाषाणावर माल्य, पिंड व पाणी द्यावें, असें शंखाचें स्मरण आहे. उदकदानाप्रमाणें पिंडदानही शंखवचनांत ' दद्युः ' असें बहुवचनी क्रियापद असल्यामुळें अनेकांनीं मिळून द्यावें, असें समजूं नये. तर पिंडदान एका पुत्रानेंच करावें. पुत्राच्या अभावीं जवळच्या सपिंडांतील एकानें व त्याचाही अभाव असल्यास मातृसापिंडांतील कोणी करावें. कारण ' पुत्राभावे सपिण्डा मातृसपिंडाः शिष्याश्च दद्युस्तदभावे ऋत्विगाचार्यौ ' असें गौतमाचें वचन आहे. अनेक पुत्र असल्यास ज्येष्ठानेंच पिंडदान करावें. ' सर्व भ्रात्यांच्या संमतीनें ज्येष्ठानें जें केलें असेल किंवा सर्वांनीं मिळून आपापल्या विभक्त द्रव्यांतील थोडें थोडें धन देऊन जें केलें असेल तें सर्वांनीं केल्यासारखें होतें, ' असें मरीचीचें स्मरण आहे. पिंडांच्या संख्येचा नियमही–ब्राह्मणाचे दहा पिंड, क्षत्रियाचे बारा इत्यादि आशौचाच्या दिवसांच्या संख्येस अनुसरून विष्णूनें सांगितला आहे, तो समजावा. त्यानें ' यावदाशौचं प्रेतस्योदकं पिण्डमेकं च

दद्युः ' असें सांगितलें आहे. तसेंच दुसऱ्या स्मृतींतही—नऊ दिवस नऊ पिंड द्यावे व दहाव्या दिवशीं दहावा पिंड देऊन राहिलेल्या रात्रीं कर्ता शुद्ध होतो, असें म्हटलें आहे. पण येथील ही शुद्धि दुसऱ्या दिवशीं करावयाच्या श्राद्धाकरितां ब्राह्मणास निमंत्रण देण्यापुरती आहे. योगीश्वरानें तीनच पिंड द्यावयास सांगितलें आहे. पण या दोन गुरुलघुकल्पांची व्यवस्था उदकदानप्रसंगीं सांगितल्याप्रमाणें जाणावी. याविषयीं शातातपानें सांगितलेला दुसरा विशेषही ध्यानांत ठेविला पाहिजे. तो म्हणतो—आशौचांचा जरी ऱ्हास झाला तरी पिंड दहाच द्यावे. त्रिरात्र आशौचांस द्यावयाच्या पिंडांविषयीं पारस्कर म्हणतो—पहिल्या दिवशीं शांतचित्तानें तीन पिंड द्यावे. दुसऱ्या दिवशीं चार पिंड देऊन अस्थिसंचयन करावें व तिसऱ्या दिवशी तीन पिंड देऊन वस्त्रप्रक्षालन करावें १६.

## जलमेकाहमाकाशे स्थाप्यं क्षीरं च मृन्मये ।

तसेंच एक दिवस अंतराळीं ( शिंक्यावर वगैरे ) पृथक् पृथक् दोन मातीच्या भांड्यांत दूध व जल स्थापावें.कोणत्या दिवशीं,तें सांगितलेलें नसल्यामुळें पहिल्या दिवशींच तें स्थापावें, ' प्रेतात्र स्नाहि पिब चेदं ' असें म्हणून क्रमानें जल व क्षीर ठेवावें, असें पारस्करानें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें अस्थिसंचयनादिक प्रथम दिवसापासून करावें. कारण संवर्तानें ' पहिल्या, तिसऱ्या, सातव्या किंवा नवव्या दिवशीं अस्थिसंचयन गोत्रजांनीं मिळून करावें, ' असें सांगितलें आहे. क्वचित् दुसऱ्या दिवशीं अस्थिसंचय करण्याविषयीं सांगितलें आहे. विष्णुपुराणांत तर ' चवथ्या दिवशीं अस्थिसंचय करावा व त्यांना गंगेंत टाकावें, ' असें म्हटलें आहे. यास्तव यांतील कोणत्या तरी एका दिवशीं स्वगृह्योक्त विधीनें अस्थिसंचयन करावें. आंगिरानें याविषयीं असें सांगितलें आहे.—अस्थिसंचयनाचे वेळीं देवांचा याग सांगितलेला आहे. जो कर्ता शुद्ध होऊन प्रेतास उद्देशून देवतांचें यजन करीत नाहीं, त्याला देवता शापतात. येथें स्मशानवासी देव घ्यावे. कारण ' तेथें पूर्वी जाळलेले प्राणी हेच स्मशानवासी देव होत ' असें त्यानेंच म्हटलें आहे. यास्तव नुकत्याच मेलेल्या त्या प्रेताला व देवांना उद्देशून धूपदीपांच्या योगानें व पिंडरूप अन्नानें पूजावें. तसेंच ' दहावा दिवस प्राप्त झाला असतां गांवाच्या बाहेर स्नान करावें व तेथेंच वस्त्रें, केंस, नखें व श्मश्रु यांचा त्याग करावा ' असें देवलाचें स्मरण असल्यामुळें दहाव्या दिवशीं वपन करावें. तसेंच दुसऱ्या स्मृतींत म्हटल्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं मोठ्या प्रयत्नानें क्षौर कर्म करावें. अथवा श्राद्धप्रदानाच्या पूर्वी तिसऱ्या, पांचव्या किंवा सातव्या दिवशीं तें करावें. वपन कोणाचें ? अशी आकांक्षा राहूं नये म्हणून आपस्तंबानें ' अनुभाविनां च परिवापनं ' असें म्हटलें आहे. त्याचा अर्थ असा—शवाच्या दुःखाचा जे अनुभव घेतात ते अनुभावी, सपिंड; पण त्यांतील सर्वांनींच वपन करावें कीं अल्पवयस्कांनीं करावें ? असा प्रश्न उपस्थित झाला असतां वरील ' अनुभाविनां ' या पदाचा अर्थ अनु म्हणजे मागून होणारे अर्थात् अल्पवयस्क, त्यांनीं वपन करावें, असें होतें. कित्येक अनुभावी म्हणजे पुत्र असें म्हणतात. कारण ' गंगेच्या तीरीं, भास्कर क्षेत्रामध्यें, मातापिता

व गुरु यांच्या मरणसमयीं, आधानसमयीं, व सोमामध्यें अशा सात प्रसंगीं वपन सांगितलेलें आहे, ' असा नियम दिसतो.

असो; अशुचित्वामुळें सर्व श्रौत–स्मार्त कर्माधिकाराची निवृत्ति होण्याचा प्रसंग आला असतां कांहीं कर्माविषयीं अभ्यनुज्ञा देण्यासाठीं म्हणतात—

## वैतानौपासनाः कार्याः क्रियाश्च श्रुतिचोदनात् ॥ १७ ॥

वितान म्हणजे अग्नीचा विस्तार. त्यांत झालेल्या त्या वैतान; ( त्रेताग्निसाध्य अग्निहोत्र–दर्शपूर्णमासादिक क्रिया ) प्रतिदिवशीं ज्याची उपासना केली जाते त्याला उपासन म्हणतात. अर्थात् गृह्याग्नि. त्यांत झालेल्या ज्या सायंप्रातर्होम क्रिया त्या औपासन क्रिया. वैतानक्रिया व औपासन क्रिया वैदिक असल्यामुळें त्या कराव्या. त्यांना वैदिकत्व कसें म्हणून म्हणाल तर श्रुतिचोदनेमुळें, असें त्याचें उत्तर आहे. कसें तें पहा—'यावज्जीवमग्निहोत्रं जुहुयात्' इत्यादिश्रुतींवरून अग्निहोत्रादिकांची चोदना स्पष्ट आहे. त्याचप्रमाणें 'अहरहः स्वाहा कुर्यात् अन्नाभावे केनचिदा काष्ठात्०' म्हणजे प्रत्यहीं स्वाहाकार करावा. अन्नाच्या अभावीं काष्ठापर्यंत दुसऱ्या कशानेंही तो करावा. अशा श्रुतीनें औपासन होमाचीही चोदना केली आहे. पण या वचनांत श्रौतत्व या विशेषणाचें ग्रहण केलेलें असल्यामुळें दानादि स्मार्त क्रियांचें अननुष्ठान ( वर्जन ) सूचित होतें. म्हणूनच वैयाघ्रपादानें ' राहूच्या सूतकास सोडून बाकीच्या सर्व सूतकांत स्मार्त कर्मांचा परित्याग करावा, ' असें म्हटलें आहे. पण श्रौतकर्मांमध्यें तत्काल स्नान करितांच पुरुष शुद्ध होतो. श्रौतकर्मेंही नित्य व नैमित्तिकच करितां येतात. म्हणूनच पैठीनसीनें 'अग्निहोत्रादि वैतान कर्मास सोडून बाकीचीं सर्व आवश्यक नित्य–नैमित्तिक कर्में निवृत्त होतात. गृह्याग्नींत होणाऱ्या सायंप्रातर्होमाचाही कांहीं आचार्यांनीं निषेध केला आहे. पण तो सर्वसंमत नसल्यामुळें त्याचें विकल्पानें अनुष्ठान होतें, ' असें म्हटलें आहे. वास्तव त्या कर्मांच्या अनुष्ठानापुरतें आशौच निवृत्त होतें. पण शौचाचा अभाव असल्यामुळें काम्य कर्मांचें अनुष्ठान होत नाहीं. मनूनेंही ' प्रत्यूहेन्नाग्निषु क्रिया ' म्हणजे श्रौताग्निहोत्राचा विघात करूं नये, असें म्हटलें आहे. अनग्निसाध्य पंचमहायज्ञादिकांची निवृत्तिच होते. संवर्तानेंही ' मृत्यु व जन्म यांच्या निमित्तानें प्राप्त होणाऱ्या आशौचांत पंचमहायज्ञांचें विधान करूं नये. ' असें म्हटलें आहे. त्यावेळीं होमही शुष्क अन्न किंवा फळ यांनीं करावा. वैश्वदेव अग्निसाध्य जरी असला तरी त्याची निवृत्ति होते. ' विप्रो दशाहमासीत वैश्वदेवविवर्जितः ' ब्राह्मणानें दहा दिवस वैश्वदेवावाचून राहावें, असें संवर्तानेंच सांगितलें आहे. सूतकामध्यें संध्यावंदनादिकर्मांचा त्याग करावयास जरी सांगितलेलें असलें तरी ' सूतकामध्यें सावित्रीमंत्रानें जलांजलि देऊन, प्रदक्षिणा करून सूर्याचें ध्यान व त्यास नमस्कार करावा' असें पैठीनसीनें सांगितलेलें असल्यामुळे अंजलिप्रक्षेपादिक करावें. या सतराव्या श्लोकांत याज्ञवल्क्यांनीं ' वैतानोपासनाः कार्याः ' असें जरी सामान्यतः म्हटलें आहे तरी त्या दुसऱ्याकडून करवाव्या. कारण पैठीनसीनें ' अन्य एतानि कुर्युः ' असें म्हटलें आहे. बृहस्पतीनेंही–सूतके मृतके चैव अशक्तौ श्राद्धभोजने । प्रवासादिनिमित्तेषु हावयेन्न तु हापयेत् असें म्हटलें आहे. ( सूतकाशौच, मृता-

शौच, असामर्थ्य, श्राद्धभोजन व प्रवासादिनिमित्तें या प्रसंगीं अग्निकर्म दुसऱ्याकडून करवावें. पण त्यांचा सर्वथा त्याग करूं नये. ) त्याचप्रमाणें ' सूतके तु समुत्पन्ने स्मार्तं कर्म कथं भवेत् ' इत्यादि जातुकर्ण्याचें स्मरण असल्यामुळें स्मार्तही पिंडपितृयज्ञ, श्रवणाकर्म, आश्वयुजी इत्यादि नित्य होम करावाच. यद्यपि आशौची पुरुषास सांगोपांग कर्म करण्याचा अधिकार नसला तरी स्वद्रव्यत्यागरूप प्रधान कर्म त्यानें स्वतः करावें. कारण तें ( प्रधान ) दुसऱ्याच्या हातून निष्पन्न होण्यासारखें नसतें. म्हणूनच ' श्रौते कर्मणि तत्कालं स्नातः शुद्धिमवाप्नुयात् ' असें म्हटलें आहे. ' दानं प्रतिग्रहो होमः स्वाध्यायश्च निवर्तितः ' असें जें वचन आहे व त्यांत जो होमाचा प्रतिषेध केलेला आहे तो काम्य होम अथवा वैश्वदेव यांच्या अभिप्रायानें आहे, असें जाणावें. यमानें ' उभयत्र दशाहानि कुलस्यान्नं न भुज्यते ' असें म्हटलेलें असल्यामुळें दोन्ही प्रकारच्या आशौचांत सूतकयुक्त कुलाचें अन्न भिन्न कुलोत्पन्नांनीं खाऊं नये. त्याच्याच कुलांतील लोकांनीं खाल्लें तरी कांहीं दोष नाहीं. पण हा निषेध दाता व भोक्ता यांतील कोणा तरी एकाला जनन व मरण याचें ज्ञान झालें ( कळलें ) असतां समजावा. दोघांनाही कळलेलें नसल्यास, खरोखरी सूतक असतांनाही जरी त्यांनीं दान--प्रतिग्रह केला तरी त्यांत दोष नाहीं. कारण षट्त्रिंशन्मतांमध्यें तसें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें विवाहादिकांमध्यें सूतक उत्पन्न होण्याच्या पूर्वी ब्राह्मणांकरितां अन्न पृथक् केलेलें असल्यास तें खावेंच. कारण, बृहस्पतीनें ' पूर्वसंकल्पितार्थेषु न दोषः परिकीर्तितः ' असें म्हटलें आहे. तसाच आणखीही एक विशेष षट्त्रिंशन्मतांत सांगितला आहे. विवाह, उत्सव व यज्ञ यांमध्यें सूतक व मृताशौच आल्यास दुसऱ्यांनीं अन्न द्यावें व तें उत्तम द्विजांनीं भक्षण करावें. ब्राह्मण भोजन करीत असतांना मृतक किंवा सूतक आल्यास दुसऱ्याच्या घरांतील पाण्यानें आचमन करून ते ( विप्र ) शुद्ध होतात. मरीचीच्या सांगण्याप्रमाणें लवण, मधु, मांस, पुष्प, फळें, मुळें, शाक, काष्ठ, तृण, जल, दहीं, घृत, दुग्ध, तिल, औषध, अजिन, मोदकादि पक्व भक्ष्य व तांबूल वगैरे अपक्व यांचें स्वामीच्या अनुज्ञेनें स्वतः घेणें आणि बाजारांतील सर्व प्रकारचीं पण्य द्रव्यें इत्यादिकांचा स्वीकार करावयाचा झाल्यास ज्याच्यापासून तीं सर्व घ्यावयाचीं त्याच्या कुलांत जनन किंवा मरण झालें असलें तरी आशौच नाहीं. येथें पक्व व अपक्व यांविषयीं जी अनुज्ञा दिली आहे ती अन्नसत्रप्रवृत्तविषयक आहे. ' अन्नत्रांत प्रवृत्त झालेल्यांचें आमान्न अनिंद्य आहे. पण त्यांचें पक्वान्न खाल्ल्यास तीन रात्र पयःपान करावें ' असें अंगिरानें सांगितलें आहे. ज्या गृहमेधी पुरुषाला शवाच्या संसर्गानें आशौच प्राप्त होतें तें केवळ त्यालाच असतें. त्याच्या घरांतील भार्यादि व इतर द्रव्यें यांस नसतें. ज्याच्या आशौचाचा दशाहकाल, कळल्यावांचून अतिक्रान्त होतो त्याला तें त्रिरात्र प्राप्त होतें व त्याच्या द्रव्याला तें नसतें. (अर्थात् दहा दिवस होऊन गेल्यावर एकाद्याच्या मरणाची किंवा जननाची वार्ता कळल्यास त्याच्या ज्ञातीच्या जनांनीं तीन दिवस आशौच धरावें ) १७.

याप्रमाणें आशौची पुरुषाचे विधि-निषेधरूप धर्म सांगून आतां आशौचनिमित्त काल-नियम सांगतात—

**त्रिरात्रं दशरात्रं वा शावमाशौचमिष्यते ।**
**ऊनद्विवर्षे उभयोः सूतकं मातुरेव च ॥ १८ ॥**

शवाच्या निमित्तानें प्राप्त होणारें जें आशौच ते शाव आशौच. जननवाची सूतकशब्दानें-तन्निमित्त आशौच सूचित होतें. पण असें म्हणणाऱ्या योगीश्वरांनीं जनन व मरण हीं दोन्हीं आशौचाचींच निमित्तें आहेत, असें म्हटल्यासारखें होतें. पण तीं उत्पन्न होऊन ज्ञात झाल्यावरच निमित्तें होत असतात. कारण ' निर्दशं ज्ञातिमरणं श्रुत्वा पुत्रस्य जन्म च ' इत्यादि लिंगदर्शन व ' त्रिगतं तु विदेशस्थः शृणुयाद्यो ह्यनिर्दशम्। यच्छेषं दशरात्रस्य तावदेवाशुचिर्भवेत् ॥ ' इत्यादि वाक्यांच्या आरंभानेंच प्राप्त होणारें सामर्थ्य, यांवरून तसें ठरतें. कारण आशौच जनन व मरण यांच्या केवळ उत्पत्तीचीच जर अपेक्षा करतें तर दशाहादिक आशौच-कालनियम त्या त्या वेळेपासून सुरूं होत असल्यामुळें अनिर्दश ज्ञातिमरण ऐकलें असतां अर्थातच दशरात्रींतील अवशिष्ट दिवसच आशौच धरावें, असें होतें. मग यच्छेषं दशरात्रस्य हें म्हणण्याचें कारणच नव्हतें. यास्तव ज्ञात झालेलें जनन व मरणच आशौचाचें निमित्त होतें. मनुप्रभृति मान्य स्मृतिकार दोन्ही निमित्तानें प्राप्त होणारें आशौच त्रिरात्र व दशरात्र असें दोन प्रकारचें समजतात. या आशौच प्रकरणांत 'अहर्' हा शब्द जेथें जेथें घेतला असेल तेथें तेथें अहोरात्राचा उपलक्षक घ्यावा. सपिंड व समानोदक यांस उद्देशून आशौचाचे दशरात्र व त्रिरात्र असे दोन पक्ष मानले आहेत. सप्तम पुरुषापर्यंत सपिंडांना सर्वसाधारणपणें दशरात्र व अष्टम पुरुषापासून चतुर्दश पुरुषापर्यंत जे सात समानोदक यांस त्रिरात्र.

आतां ' चतुर्थ पुरुषापर्यंत दशरात्र, पांचव्या पुरुषास सहा अहोरात्र, सहाव्या पुरुषाची चार दिवसांनींच शुद्धि व सातव्याला एकच दिवस आशौच प्राप्त होतें' असें जें एक वचन आहे तें निंद्य असल्यामुळें त्याचा आदर करूं नये. आणि तें निंद्य नाहीं, असें जरी म्हटलें तरी मधुपर्काच्या अंगभूत पश्वालंभनाप्रमाणें लोकविद्विष्ट असल्यामुळें त्याचें आचरण करूं नये. ' अस्वर्ग्यं लोकविद्विष्टं धर्ममप्याचरेन्न तु ' असें पूर्वी आचाराध्यायांत सांगितलेंच आहे. शिवाय जवळच्या सातव्या सपिंडाला एकाह आशौच व दूरच्या आठव्या, नवव्या, दहाव्या इत्यादि समानोदकांना तीन रात्र, हें युक्त नव्हे.

असो; याप्रमाणें सामान्यतः सर्व सपिंडांना आशौच प्राप्त झालें असतां क्वचित् नियम करण्याकरितां सांगतात--ज्याला दोन वर्षे पूर्ण झालीं नाहींत, असा बालक मरण पावला असतां माता व पिता या दोघांना मात्र दशरात्र आशौच; सर्व सपिंडांना नाहीं. त्यांविषयीं दांत येईपर्यंत सद्यःशौच, पुढें ( २३ व्या श्लोकांत ) सांगतील. पैठ्यानेंही—गर्भांत मूल मेल्यास आईला दहा दिवस; उत्पन्न झाल्यावर दोघांनाही; व नामकरण केल्यावर मेल्यास

मातापितरांबरोबर सख्ख्या भावंडांनाही आशौच प्राप्त होतें.–असें म्हटलें आहे. किंवा ' ऊन द्विवर्षे० ' या वचनाचा असा अर्थ करावा. ज्याला पुरीं दोन वर्षे झालीं नाहींत असा बालक मरण पावल्यास आईबापांनाच मात्र अस्पृश्यत्व लक्षण आशौच; इतर सपिंडांना नाहीं. कारण दुसऱ्या स्मृतींत 'ऊनद्विवर्ष अपत्य मरण पावलें असतां अस्पृश्यत्व लक्षण आशौच मातापितरांनाच आहे. इतरांना नुस्तें कर्मानधिकाररूप आशौच असतें,असें म्हटलें आहे.याविषयीं योगीश्वर या श्लोकाच्या ' सूतकं मातुरेव हि ' या चवथ्याचरणानें दृष्टान्त देत आहेत. ज्याप्रमाणें सूतक म्हणजे जननिमित्त अस्पृश्यत्वलक्षण आशौच केवल मातेलाच असतें त्याप्रमाणें ऊनद्विवर्षाचा बालक मेला असतां तें माता व पिता या दोघांना असतें. ऊनद्विवर्षाचें अपत्य मेलें असतां सपिंडांना अस्पृश्यत्व नाहीं, असें म्हणून त्याचा निषेध करणाऱ्या योगीश्वरानें अन्यत्र त्यांना अस्पृश्यत्व आहे, असेंच सुचविलें. चारी वर्णांच्या लोकांना त्यांच्या त्यांच्या आशौच कालाच्या तिसऱ्या भागानंतर स्पर्शन करावयास देवलानें अनुज्ञा दिली आहे. पण तिची योजना अनुपनीताच्या मृताशौचाचे ठिकाणीं अथवा त्रिरात्रादि अतिक्रान्ताशौचामध्यें करावी. उपनीताविषयींही त्यानेंच असें सांगितलें आहे.––दशाहादि आशौचाचा तिसरा भाग होऊन गेला असतां व अस्थिसंचयन केलें असतां तत्वदर्शी वर्णांच्या लोकांच्या अंगस्पर्शास अनुमोदन देतात. ब्राह्मण दहा दिवसांनीं, क्षत्रिय बारा दिवसांनीं व वैश्य पंधरा दिवसांनीं भोज्यान्न होतो. ( ज्याचें अन्न भोजन करितां येथें तो भोज्यान्न ) १८.

आतां जननिमित्त अस्पृश्यत्वलक्षण आशौच सांगतात––

**पित्रोस्तु सूतकं मातुस्तदसृग्दर्शनाद्ध्रुवम् ।**
**तदहर्न प्रदुष्येत पूर्वेषां जन्मकारणात् ॥ १९ ॥**

जननिमित्त अस्पृश्यत्वलक्षण आशौच माता व पिता यांनाच असतें. सर्व सपिंडांना नसतें. पण तें अस्पृश्यत्व मातेच्या ठिकाणींच दशाहपर्यन्त स्थिर राहतें. कारण तिच्या ठिकाणीं असृक् ( शोणित ) दिसत असतें. त्यासाठींच वसिष्ठानें–पुरुषानें स्त्रीशीं स्पर्शादि संसर्ग जर न केला तर त्याला आशौच असत नाहीं.कारण रज हें अशुद्ध आहे व तें पित्याचे ठायीं नसतें. अर्थात् पित्याचें अस्पृश्यत्व ध्रुव नसतें; तर तें संवर्ताच्या सांगण्याप्रमाणें पुत्रजन्म होतांच सचैलस्नान केल्यानें जातें. मातेचें मात्र दहा दिवस जात नाहीं. दहा दिवसांनंतरही ती नुस्ती स्पर्शास योग्य होते. अदृष्टार्थ धर्मकर्मांमध्यें शुद्ध होत नाहीं. कारण पैठीनसीनें पुत्रवती बाळंतिणीकडून वीस दिवसांनीं व कन्यवतीकडून ( म्ह. जिला मुलगी झाली आहे तिच्याकडून ) एका महिन्यानें धर्मकृत्यें करवावीं, असें म्हटलें आहे. अंगिरसानें सूतिकेवांचून इतर सपिंडांच्या स्पर्शाचा निषेध केलेला नाहीं. सूतिकेला स्पर्श केल्यास मात्र स्नानच केलें पाहिजे. ' असें म्हणून सपिंडांच्या अस्पृश्यत्वाचा अभाव स्पष्ट केला आहे. ज्या दिवशीं कुमाराचा जन्म होतो तो दिवस पुत्रजन्मनिमित्त दानादि करण्यास व घेण्यास निषिद्ध मानलेला नाहीं. कारण त्या दिवशीं पूर्व पितरादिकांची पुत्ररूपानें उत्पत्ति झालेली

असते, त्यामुळें तो दिवस दूषित होत नाहीं. वृद्ध याज्ञवल्क्यानेंही त्याविषयीं असें म्हटलें आहे–कुमाराच्या जन्मदिवशीं ब्राह्मणांनीं सोनें, भूमि, गाय, अश्व, अज, वस्त्र, शय्या, आसन इत्यादिकांचा परिग्रह करावा. पण शिजविलेलें अन्न खाऊं नये. मोहानें पक्व अन्न भक्षण केल्यास द्विजानें चांद्रायण करावें. व्यासानेंही याविषयीं ' सूतिकागृहांत जन्मदा नामक देवता असतात. त्यांच्या पूजनाचे वेळीं सूतकवान् पिताही शुचि होतो. प्रथम, षष्ठ व दशम दिवशीं त्यांच्या पूजादि कर्मांत सूतक नाहीं. ' असा विशेष सांगितला आहे. मार्कंडेयानें–विशेषेंकरून सहावी रात्र चांगल्या रीतीनें राखावी. जन्मदा देवतांस बलि द्यावा. सहाव्या दिवशीं पुरुषांनीं हातांत शस्त्रें घेऊन व स्त्रियांनीं नृत्यगीतांच्या योगानें रात्रभर जागरण करावें. सूतकांत दहाव्या दिवशींही असेंच करावें, असें सांगितलें आहे १९.

आशौचामध्यें पुनर्जनन अथवा मरण झाल्यास–प्रत्येक निमित्ताबरोबर नैमित्तिकाचीही आवृत्ति होते–या न्यायानें पुनः दशाहादि आशौच प्राप्त झालें असतां त्याचा अपवाद सांगतात—

## अन्तरा जन्ममरणे शेषाहोभिर्विशुद्ध्यति ।

वर्णाच्या अपेक्षेनें अथवा वयोऽवस्थेच्या अपेक्षेनें ज्याला जेवढा आशौचकाल उक्त असेल त्याच्या मध्येंच त्याच्या इतक्याच दिवसांचें अथवा त्याहून न्यून कालाचें आशौच आल्यास ( आशौचानिमित्तभूत जनन व मरण झाल्याव ) पुरुष पूर्व आशौचाच्या अवशिष्ट दिवसांनींच शुद्ध होतो. मागून उत्पन्न झालेलें जननादिनिमित्त आशौच पृथक् करूं नये. पण जेव्हां अल्पकालाशौचांत दीर्घकालाशौच येतें तेव्हां पूर्व आशौचानें मागून पडलेल्या दीर्घ आशौचाची निवृत्ति होत नाहीं. कारण उशनानें तसें स्पष्ट सांगितलें आहे. यमानेंही ' अहो वृद्धिमदाशौचं पश्चिमेन समापयेत् ' असेंच सांगितलें आहे. या श्लोकांत योगीश्वरानें ' अन्तरा जन्ममरणे ' असें जरी सामान्यतः म्हटलें आहे तरी सूतकांत ( जननाशौचांत ) आलेलें पातक ( मृताशौच ) सूतकाबरोबर जात नाहीं. अंगिरानें–मृताशौचांत जननाशौच आल्यास तें त्याबरोबर जातें; पण जननाशौचांत मृताशौच पडल्यास तें जननाशौचाबरोबर जात नाहीं, असें व षट्त्रिंशन्मतामध्येंही ' शावेन शुद्ध्यते सूतिः न सूतिः शावशोधिनी, ' असें म्हटलें आहे. यास्तव सूतकान्तःपाती शावाशौचाची पूर्वशेषानें शुद्धि होत नाहीं. तर शावान्तःपाती सूतकाची पूर्वशेष शुद्धि होते. त्याचप्रमाणें सजातीय आशौचांचा संपात झाल्यास ( म्ह० सूतकांत दुसरें सूतक अथवा मृताशौचांत मृताशौच आल्यास ) शावाशौचाच्या पूर्वशेषशुद्धीचा अपवाद दुसऱ्या स्मृतींत असा सांगितला आहे.––माता अगोदर मरून तिच्या आशौचांतच जर पिता मरण पावला तर पूर्वशेषानें शुद्धि होत नाहीं. पित्याच्या दशाह आशौचानेंच शुद्धि होते. त्याचप्रमाणें पित्याच्या मरणनिमित्त आशौचामध्येंच माता मेल्यास पूर्वशेषशुद्धि होत नाहीं. तर पूर्व आशौच संपल्यावर एक पक्षिणी अधिक आशौच धरावें. गौतमानें आशौच–संनिपात–कालविशेषकृत अपवाद असा सांगितला आहे––पूर्व आशौच केवल एकरात्रभरच अवशिष्ट राहिलेलें असतांना जर दुसरें आशौच पडलें तर

पूर्व आशौच संपवून त्यानंतर आणखी दोन रात्रींनीं शुद्धि होते. शेवटच्या रात्रीच्या शेवटच्या प्रहरांत दुसरें आशौच आल्यास तीन रात्रींनीं शुद्धि होते; नुसत्या त्या एका प्रहरानें होत नाहीं. शातातपानेंही 'रात्रिशेषे द्व्यहाच्छुद्धिर्यामशेषे शुचिस्त्र्यहात्' असें म्हटलें आहे. सूतकसन्निपात झाला तरी प्रेतक्रिया निवृत्त होत नाहीं, असें त्यानेंच सांगितलें आहे. दशाहाशौचांत जननानंतर मरण झाल्यास मृताच्या बंधूनीं प्रेतास उद्देशून पिंडदान करावें. प्रेतपिंड आरंभल्यावर मग जर मध्येंच जन्म झालें तर आशौचपिंड यथाविधि द्यावे. त्याचप्रमाणें दोन शावाशौचांचा संनिपात झाला तरी प्रेतकार्य करावें. कारण येथेंही तोच न्याय लागू आहे. एक आशौच असतांना पुत्रजन्म झाल्यास तन्निमित्तक जातकर्मादि करावेंच. कारण कर्त्याला तेवढ्यावेळेपुरती शुद्धि असते. असो; याप्रमाणें पूर्णप्रसवकालजननाशौच सांगून आतां अप्राप्तकाल गर्भनिःसरणनिमित्त आशौच सांगतात—

## गर्भस्रावे मासतुल्या निशाः शुद्धेस्तु कारणम् ॥ २० ॥

गर्भस्राव या शब्दांतील स्रुधातूचा मूळ अर्थ द्रवद्रव्याचा परिस्पंद असा जरी आहे तरी येथें द्रव व अद्रव द्रव्याचें अधःपतन या अर्थी तो आहे. कारण गर्भाच्या द्रवत्वाचा संभव पहिल्या महिन्यांतच असतो. असो; गर्भस्राव म्हणजे गर्भाचें अधःपतन झालें असतां गर्भधारण करून जितके मास झाले असतील तितक्या रात्रीं शुद्धीचें कारण होतें. पण हें मासतुल्य दिवस-आशौच वृद्धवसिष्ठाच्या कथनानुसार स्त्रियांनाच असतें; पुरुषांना स्नानमात्र. गौतमानें तीन दिवस सांगितलेलें आशौच दोन महिन्यांच्या आंतील गर्भाचा स्राव झाल्यास समजावें. कारण मरीचीनें ब्राह्मणाला त्रिरात्र, क्षत्रियाला चार, वैश्याला पांच व शूद्राला आठ दिवस आशौच सांगितलें आहे. पण हा मासतुल्य दिवस आशौच धरण्याचा विधि सहा महिने पूर्ण होत तों जाणावा. सातव्या महिन्यापासून पुढें पूर्णाशौच करावें. कारण त्यानंतर ज्याचीं अंगें परिपूर्ण आहेत असा जिवंत गर्भ बाहेर पडत असल्याचें दिसतें व व्यवहारांतही त्याला प्रसव म्हणतात. द्रवभूत गर्भाचा स्राव झाला असतां सपिंडांना सद्यःशौच उक्त आहे. वसिष्ठानें 'ऊनद्विवर्षाचा बालक मेला असतां अथवा गर्भाचें पतन झालें असतां सपिंडांना त्रिरात्र आशौच असतें,' असें जें म्हटलें आहे तें पांचव्या व सहाव्या महिन्यांत कठिण गर्भाचा जेव्हां पात होतो तेव्हां समजावें. कारण 'चवथा महिना संपेपर्यंत स्राव, पांचव्या व सहाव्या महिन्यांत पात व त्यापुढें प्रसूति' अशी स्रावादिशब्दांची व्यवस्था केलेली आहे. मरीचीनें 'स्राव झाला असतां मातेला त्रिरात्र व सपिंडांना मुळींच आशौच नाहीं. पात झाला असतां मातेला मासाइतके दिवस आशौच आणि पिता, व इतर सपिंड यांस तीन दिवस', असें सांगितलें आहे. सातव्या महिन्यापासून पुढें मृत बालकाचा जन्म होवो कीं जननानंतर तें मरो, पण सपिंडांना पूर्ण जननाशौच धरावें लागतें. कारण हारीतानें तसें सांगितलें आहे. 'सूतके चेदोत्थानादाशौचं सूतकवत्' असें पारस्करवचन आहे. सूतिका उठेपर्यंत म्हणजे दहा दिवस आशौच व शिशूच्या मरणनिमित्तानें होणाऱ्या उदकदानादिकांचा अभाव समजावा. बृहन्मनूनेंही 'दहा दिवसांच्या आंतच बालक मेल्यास त्याच्या बांधवांनीं शावा-

शौच करूं नये, सूत्याशौच करावें, ' असें म्हटलें आहे. तसेंच आणखीही ' अन्तर्दशाहोपरतस्य सूतकाद्दोभिरेवाशौचम् ' असें स्मृतिवचन आहे. अशा प्रकारचीं हीं अनेक वचनें अवलोकन केलीं म्हणजे सपिंडांच्या जननिमित्तक आशौचाचा संकोच होत नाहीं, असें निश्चित होतें.

' जाते मृते मृते जाते वा कुलस्य सद्यःशौचम् ' असें जें म्हटलें आहे तें शिशूच्या मरणनिमित्त आशौचाची स्नानानेंच शुद्धि होते, हें प्रतिपादन करण्यासाठीं होय. प्रसवनिमित्त आशौचाच्या शुद्धीचें प्रतिपादन करण्यासाठीं नव्हे. म्हणूनच पारस्करानें सपिंडांना प्रसव निमित्त आशौच विद्यमान असल्यामुळें गर्भाचा नाश झाल्यास दशाह सूतक सांगितलें आहे. आणि शिशु जिवंत उत्पन्न होऊन मेला तर सपिंडादिक सद्यःशुचि होतात, असें प्रेताशौचाविषयीं म्हटलें आहे. ' प्राङ्नामकरणात् सद्यःशौचं ' असें शंखवचन आहे. कात्यायनानें ' दहा दिवस पूर्ण होण्यापूर्वीच जर बालक मरण पावला तर सद्यःशुद्धि होते. त्याची प्रेत किंवा उदकक्रिया होत नाहीं. ' असें जें म्हटलें आहे तेंही विष्णुपुराणांतील वचनाशीं समानार्थक आहे. बृहन्मनु व बृहत्प्रचेता यांचींही अशाच प्रकारचीं वचनें आहेत. त्या सगळ्यांची व्यवस्था अशी करावी- जननानंतर नाळ कापण्यापूर्वी बालक मरण पावल्यास पिता व इतर सपिंड यांना जननिमित्त तीन दिवस आशौच. अग्निहोत्रादिकांकरितां सद्यःशौच. नाळ कापल्यानंतर बालक मरण पावल्यासही सपिंडास जननिमित्त संपूर्णाशौच. जैमिनीनें व शंखानें तसेंच म्हटलें आहे. मनूनेंही ( अ. ५ श्लोक ६६ ) असेंच सांगून शिवाय पुढें ' रजस्युपरते साध्वी स्नानेन स्त्री रजस्वला ' असें म्हटलें आहे. त्याचा सारांश असा—रज निवृत्त झालें ( थांबलें ) असतां रजस्वला स्त्री स्नानानें शुद्ध होते. ( दैवकर्मास योग्य होते. ) पण रज निवृत्त झालें नसलें तरी ती चवथ्या दिवसापासून स्नानानंतर स्पर्शादिकांस योग्य होते. वृद्ध मनूनेंही ' चतुर्थेऽहनि संशुद्धा भवति व्यावहारिकी ' असें म्हटलें आहे. दुसऱ्या स्मृतींतही ' रजस्वला स्त्री चवथ्या दिवशीं स्नानानें भर्त्याच्या सेवेसाठीं शुद्ध होते. आणि दैव व पितृकर्मांमध्यें पांचव्या दिवशीं शुद्ध होते असें म्हटलें आहे. पण येथील पांचवा दिवस हा रजोनिवृत्तीचा काल दाखवीत आहे. एकदां रजोदर्शन झाल्यापासून पुनः सतरा दिवसांच्या आंत रजोदर्शन झाल्यास अशुचित्व नाहींच. अठराव्या दिवशीं झाल्यास एका दिवसानें शुद्धि, एकोणिसाव्या दिवशीं झाल्यास दोन दिवसांनीं शुद्धि व यापुढें तीन दिवसांनीं शुद्धि होते. अत्रीनें ' रजस्वला यदि स्नाता० ' इत्यादि वचनांत असेंच सांगितलें आहे. चवदा दिवसांच्या पूर्वी अशुचित्व नाहीं, असें जें एका स्मृतीनें म्हटलें आहे तें स्नानप्रभृति शौचही करावयास नको, असें सांगण्याकरितां आहे. प्रायः जिला वीस दिवसांनंतरच रजोदर्शन होत असेल तिच्याविषयीं हा वरील नियम आहे. पण ज्या यौवनारूढ तरुणीला अठरा दिवसांपूर्वीच पुष्कळ रजांचें दर्शन होतें, तिला तीन दिवस अशुचित्व असतेंच. रजस्वलेनें त्रिरात्र स्नानादि न करितां रहावें. तिनें अभ्यंग, काजळ, नूतन वस्त्रें इत्यादि लेवूं नयेत. भूमीवर शयन करावें. दिवसा निजूं नये. ग्रहांकडे पाहूं नये. नाभीला स्पर्श करूं नये. अग्नीला स्पर्श करूं नये. दोरी वळूं नये. दांत घासूं नये. फार हसूं नये. मोठ्या

त्यानें त्या दिवसापासून दशाह सूतक धरावें असें पैठीनसीनें म्हटलें आहे. पित्याचें मरण एका वर्षानंतर कळलें तरी पुत्रानें आशौच, उदकदान इत्यादि प्रेतकर्म करावें. त्याची नुस्त्या स्नानानें शुद्धि होत नाहीं. मातेवाचून पित्याची दुसरी भार्या जरी मेली व तिची मरणवार्ता तिच्या सावत्र पुत्राला एक वर्ष होऊन गेल्यावर कळली तरी त्यानें तीन दिवस आशौच धरावें. जो नदी, महापर्वत इत्यादिकांच्यायोगानें व्यवहित ( अंतरित ) देशांतरीं मरतो त्याचें दशाहानंतर व तीन मासांच्या आंतहीं सद्यःशौच. देशान्तराचें लक्षण बृहस्पतीनें सांगितलें आहे—महानदी अथवा महापर्वत यांनीं व्यवहित प्रदेश अथवा जेथें निराळी भाषा बोलतात तो देश, देशांतर या संज्ञेस पात्र होतो. कोणी साठ योजनें दूर असलेल्या देशाला, कोणी चाळीस योजनें व कोणी तीस योजनें दूर असलेल्या देशाला देशांतर म्हणतात. हें अतिक्रांताशौच उपनयन झाल्यावर मेलेल्याविषयीं आहे; वयोवस्थाविशेषाशौचाविषयीं नाहीं. व्याघ्रपादानें म्हटलें आहे. –आदन्तजन्मनः सद्यः इत्यादि वाक्यांनीं ज्यांचें विधान केलें आहे असें त्रिवर्षादिरूप वयाच्या योगानें प्राप्त होणारें आशौच ब्राह्मणादि सर्व वर्णांना सारखेंच लागू आहे, दशाहादि अतिक्रान्त झाल्यावर प्राप्त होणारें जें त्र्यहादि आशौच तेंही सर्वांना सारखेंच. पण उपनयन झाल्यानंतर जो मेला आहे त्याचें ब्राह्मणादि वर्णानुसार दश, द्वादश, पंचदश व त्रिंशत् ( तीस ) दिवस असें विषम आशौच सांगितलें आहे. अर्थात् या असल्या विषमाशौचास कारण होणाऱ्या उपनयनोत्तर मरणाराचेंच अतिक्रान्त आशौच होतें. दुसऱ्या म्हणजे वयोवस्थाशौचाचा अतिक्रम झाला असतां अतिक्रान्त आशौच होत नाहीं २१.

क्षत्रियादिकांतील दशरात्र सपिंडाशौचाचे अपवाद सांगतात—

**क्षत्रस्य द्वादशाहानि विशः पञ्चदशैव तु ।**
**त्रिंशद्दिनानि शूद्रस्य तदर्धं न्यायवर्तिनः ॥ २२ ॥**

क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांच्या सपिंडांचें जनन व मरण झालें असतां क्रमानें बारा, पंधरा व तीस दिवस आशौच होतें. पण जो शूद्र न्यायवर्ती म्हणजे पाकयज्ञ, द्विजशुश्रूषा इत्यादिकांमध्यें रत असतो त्याला पंधरा दिवसच आशौच असतें. दुसऱ्या स्मृतींमध्यें क्षत्रियादिकांचे दशाहादि दुसरे आशौचपक्षही सांगितले आहेत. पराशरानें आपल्या कर्मांमध्यें निरत असलेल्या शुचि क्षत्रियाला दहा दिवस व वैश्याला बारा दिवस आशौच सांगितलें आहे. शातातपानेंही ' अकरा दिवसांनीं क्षत्रिय, बारा दिवसांनीं वैश्य व वीस दिवसांनीं शूद्र सूतक व मृतक यांमध्यें शुद्ध होतो ' असें म्हटलें आहे. वसिष्ठानें पंधरा दिवसांनीं क्षत्रिय व वीस दिवसांनीं वैश्य शुद्ध होतो, असें म्हटलें आहे. आंगिरानें तर-शातातपानें सूतक व मृताशौच या दोन्ही प्रसंगीं सर्व वर्णांची दहा दिवसांनीं शुद्धि होते, असें सांगितलें आहे. पण या अनेक उच्चावच पक्षांचा लोकांत प्रचार आढळत नाहीं. यास्तव, त्यांच्या व्यवस्थाप्रदर्शनाचा फारसा उपयोग नाहीं, असें जाणून ती आम्ही दाखवीत नाहीं. जेव्हां ब्राह्मणादिकांचे क्षत्रियादिक सपिंड असतात तेव्हां हारीतादिकांनीं सांगितलेला आशौचकल्प अनुसरावा. हारीतः–ब्राह्मण

स्वयोनींत झालेल्या जन्ममरणप्रसंगीं दहा दिवसांनीं व क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र यांच्या योनींतील सपिंडाच्या जननमरणप्रसंगीं क्रमानें सहा, तीन व एक दिवसानें शुद्ध होतो. विष्णु, बौधायन इत्यादि दुसऱ्यांनीही असेच दुसरे दुसरे कल्प सांगितले आहेत. त्यांची आपदवस्था व अनापदवस्था यांच्या अनुरोधानें व्यवस्था लावावी. दासी-दास इत्यादिकांची शुद्धि स्वामीच्या शौचानें होते. दासीला कर्मांचा अनधिकार मात्र एक मासपर्यंत असतो. 'प्रतिलोमा धर्महीनाः' असें वचन असल्यामुळें प्रतिलोमांना आशौचाचा अभावच आहे. केवळ मरण व प्रसव झाला असतां त्यांनीं मल घालविण्यासाठीं मूत्रपुरीषोत्सर्गाप्रमाणें शौच करावें २२.

वयोवस्थाविशेषास अनुसरूनही दशाहादि आशौचाचा अपवाद सांगतात—

**आदन्तजन्मनः सद्य आचूडान्नैशिकी स्मृता ।**
**त्रिरात्रमाव्रतादेशाद्दशरात्रमतः परम् ॥ २३ ॥**

दांत येण्यापूर्वीं मेलेल्या बालकाच्या संबंधींची सद्यःशुद्धि होते. चूडा करण्याच्या पूर्वीं मेलेल्या मुलांच्या आप्तांस अहोरात्र आशौच असतें. चूडेनंतर उपनयन होई तों तीन दिवस अशुद्धि. येथें 'आदन्तजन्मनः सद्यः' असें सामान्यतः जरी सांगितलेलें आहे, तथापि अग्निसंस्कार झालेला नसल्यास, असें जाणावें. कारण विष्णुपुराणांत तसें म्हटलें आहे. पण अग्निसंस्कार झालेला असल्यास या श्लोकाच्या उत्तरार्धांत सांगितल्याप्रमाणें एकाह आशौच. यमानें 'अदन्तजात व गर्भच्युत बालकाचें सर्व सपिंडांना अहोरात्र आशौच' सांगितलें आहे. पण नामकरणापूर्वीं सद्यःशौचच नियत आहे. चूडाकर्म पहिल्या किंवा तिसऱ्या वर्षीं करावयास सांगितलें आहे. यास्तव दांत आल्यानंतर पहिल्यावर्षी चूडा होईतों एकाह. पण पहिल्या वर्षीं चूडा न केल्यास दांत आल्यापासून तीन वर्षांपर्यंत एकाह. त्यानंतर उपनयन होईतों तीन दिवस आशौच सपिंडांना असतें. मनूनें 'नृणामकृतचूडानां' (अ. ५ श्लो. ६९) या वचनांत चूडा न केलेल्या बालकाच्या सपिंडांची एक रात्र अशुद्धि व चूडेनंतर तीन रात्र, असें जें सांगितलें आहे त्याचा हाच विषय होय. आतां 'ऊनद्विवर्ष मृत बालकाला काष्ठाप्रमाणें टाकून तीन दिवस आशौच धरावें,' असें मनूनें व वसिष्ठानेंही जें म्हटलें आहे तें वर्षांच्या आंत ज्याची चूडा-झालेली असेल त्याविषयीं आहे. अंगिरानें 'दांत आलेले असले तरी चूडा न केलेला बालक जर मेला तर त्याचें तीन दिवस आशौच धरावें,' असें जें म्हटलें आहे तें कुलधर्माच्या अपेक्षेनें चौल तिसऱ्या वर्षींही न होतां पुढें लांबल्यास जाणावें. अशीं दुसरीही निरनिराळे पक्ष दाखविणारीं वचनें आहेत. पण त्या सर्वांवरून हा अर्थ निष्पन्न होतो—नामकरणापूर्वीं सद्यःशौच. त्यानंतर दांत येण्यापूर्वीं अग्निसंस्कार केल्यास एकाह; तो न केल्यास सद्यःशौच. ज्याला दांत आले आहेत त्याचें पहिल्या वर्षीं चूडाकर्म झालेलें असल्यास तीन दिवस; चौल झालेलें नसल्यास एकाह. तीन वर्षांनंतर चूडा केलेली नसली तरी तीन दिवस आणि उपनयनानंतर ब्राह्मणादि सर्वांना दशरात्रादिकें २३.

आतां स्त्रियांविषयीं वयोवस्थाविशेषानें अपवाद सांगतात—

अहस्त्वदत्तकन्यासु बालेषु च विशोधनम् ॥

ज्यांच्या विवाह झालेला नाहीं त्या कन्यांचें चूडाकर्म झाल्यापासून वाग्दानें होईतों अहोरात्र आशौच. कन्यांचें सापिंड्य तीन पुरुषांपर्यंतच असतें. ज्यांना दांत आलेले नाहींत, असें बालक मृत झाल्यास व अग्निसंस्कार केलेला असल्यास एकाह. कन्येचें चौल केलेलें नसल्यास सद्यःशौच. वाग्दानानंतर विवाहापूर्वी पति व पिता या दोन्हीपक्षीं तीन दिवस आशौच. मनु व मरीचि यांनीं तसें सांगितलें आहे. विवाहित कन्या मेल्यास पितृपक्षीं मुळींच आशौच नाहीं. पण ती पित्याच्या येथें प्रसूत झाल्यास अथवा मरण पावल्यास क्रमानें एकाह व त्रिरात्र आशौच धरावें. हें वयोवस्थाशौच सर्व वर्णांस साधारण आहे. कारण या विधानांत 'क्षत्रियाला बारा दिवस' इत्यादि प्रकारें विशेष वर्णांचें कथन करून विधान केलेलें नसतें. मनु, व्याघ्रपाद इत्यादिकांनींही विशेष वर्णांचें ग्रहण न करितां आशौचविधींचें साधारण्य प्रतिपादन करण्याकरितां 'चतुर्णामपि वर्णानां यथावदनुपूर्वशः इत्यादि म्हटलें आहे. तस्मात् पिंडोदकदानविधि, समानोदक आशौचविधि, संनिपाताशौचविधि, स्रावाशौचविधि, विदेशस्थाशौचविधि, व गुरुप्रभृति—पुरुषांच्या आशौचाचा विधि जसा सर्ववर्णसाधारण तसाच हा वयोवस्थानिमित्त आशौचविधीही सर्ववर्णसाधारणच आहे. यास्तव ' चौलानंतर क्षत्रियाला सहा, वैश्याला नऊ व शूद्राला बारा दिवस आशौच विहित आहे. अर्थात् जेथें विप्रांना तीन रात्र आशौच सांगितलें असेल तेथें क्षत्रियांना सहा, वैश्यांना नऊ व शूद्रांना बारा दिवस आशौच समजावें. ' इत्यादि ऋष्यशृंगादिकांचीं जीं वचनें आहेत, तीं निंद्य आहेत, अशा बुद्धीनें धारेश्वर, विश्वरूप, मेधातिथी इत्यादि आचार्यांनीं त्यांचा आदर केला नाहीं व याच साधारण पक्षाचा अंगीकार केला. पण त्यांचीं जीं अनिंद्य वचनें आहेत त्यांची आर्त, अनार्त क्षत्रिय, इत्यादिपक्षीं योजना करावी.

आतां गुरुप्रभृतींच्या ठिकाणीं वरील विधानाचा अतिदेश करितात—

गुर्वन्तेवास्यनूचानमातुलश्रोत्रियेषु च ॥ २४ ॥

गुरु ( उपाध्याय ), अन्तेवासी ( शिष्य ), अनूचान ( व्याकरणादि अंगांचा प्रवक्ता ), मातुल ( मामा व त्यावरून उपलक्षित होणारे आत्मबंधु, पितृबंधु व मातृबंधु ) व श्रोत्रिय ( एका शाखेचें अध्ययन करणारा, कारण ' एकां शाखामधीते श्रोत्रियः ' असें बौधायनाचें वचन आहे. ) हे मरण पावले असतां अहोरात्र आशौच धरावें. मुख्य गुरु पिता. तो मरण पावला असतां सापिंड्य संबंधानें दशाह आशौचच प्राप्त होतें. जो पिता पुत्रास उत्पन्न करून त्याचे संस्कार करून, वेद शिकवून वेदार्थ ग्रहण करवून त्याची वृत्ति-(निर्वाह साधन) ही करून देतो तो महागुरु होय. यास्तव 'तो मरण पावला असतां बारा दिवस दान व अध्ययन वर्ज करावें. ' असें आश्वलायनानें सांगितलें आहे. आचार्य मरण पावला असतां त्रिरात्र

( मनूच्या म्हणण्याप्रमाणें त्याचा पुत्र व भार्या मरण पावल्यास एकाह ) आशौच धरावें. पण आचार्यादिकांची अन्त्येष्टि केल्यास दहा अहोरात्र आशौच सांगितलें आहे. ( मनु अ. ५ श्लोक ८० व ६५ पहा. ) ज्याचें एकाच आचार्यानें उपनयन केलेलें असतें ते सर्व परस्पर सब्रह्मचारी होत. त्यांचें परस्पर एकाह आशौच. त्याचप्रमाणें समान ग्रामांत राहणारा श्रोत्रिय मरण पावला असतांही एकाह आशौच. शिष्यादिक संनिहित असल्यास त्यांना मनूच्या ( अ. ५ श्लो. ८१ ) म्हणण्याप्रमाणें मातामह, आचार्य व श्रोत्रिय यांचें तीन रात्र आशौच. मातुल व बंधुत्रय यांचें पक्षिणी रात्री, सासू, श्वशुर, भगिनी, मामी, इत्यादिकांचें पक्षिणी, संस्कृत भगिनी व संस्कृत भ्राता, मित्र, जामाता, कन्यापुत्र, भाचा, शालक व त्याचे पुत्र, यांचे आप्त सद्यःस्नानानें शुद्ध होतात. ग्रामाचा नायक, कुलपति, श्रोत्रिय, तपस्वी, शिष्य, इत्यादि मरण पावले असतां त्यांच्याशीं संबद्ध असलेले जन नक्षत्रदर्शनानें शुद्ध होतात. एकाद्या गांवामध्यें जोंवर एकाद्याचें शव असतें तोंवर त्या सर्व गांवाला आशौच असतें व शव गांवांतून बाहेर गेलें म्हणजे गांव शुद्ध होतो. इत्यादि दुसरींही विशेष प्रकारच्या आशौचाचें प्रतिपादन करणारीं स्मृतिवचनें शोधावीं. ग्रंथ वाढेल या भीतीनें आम्हीं त्यांचा येथें संग्रह करीत नाहीं. त्यांत एकाच विषयास उद्देशून गुरुलघु आशौचाचें प्रतिपादन करणारीं व त्यामुळें परस्परविरुद्ध असलेलीं वाक्येंही शोधून त्यांची विषयव्यवस्था करावी २४.

**अनौरसेषु पुत्रेषु भार्यास्वन्यगतासु च ।**
**निवासराजनि प्रेते तदहः शुद्धिकारणम् ॥ २५ ॥**

अनौरस म्हणजे क्षेत्रज-दत्तकादि पुत्र ते उत्पन्न किंवा मृत झाले असतां अहोरात्र आशौच. तशाच स्वभार्या प्रतिलोमास सोडून दुसऱ्या अनुलोम किंवा सवर्ण पुरुषांचा आश्रय करून राहिल्या असतां त्यांचेंही अहोरात्रच आशौच धरावें. सापिंड्य असलें तरी दशरात्र धरूं नये. त्यांनीं प्रतिलोम आश्रय केल्यास आशौचाचा अभावच होतो. कारण ' पाखण्ड्यनाश्रिताः० ' ( श्लो. ६ ) या वचनानें त्याचा प्रतिषेध केला आहे. परंतु येथील भार्या, पुत्र हे शब्द संबंधापेक्ष असल्यामुळें ज्याच्या संबंधानें, ज्याला विषय करून भार्यात्व व पुत्रत्व असेल त्या पुरुषालाच मात्र हें आशौच असतें. सापिंडांना तें नसतें. स्वैरिणी वगैरे ज्याच्या आश्रयानें राहिलेल्या असतात त्यांना त्यांचें त्रिरात्र आशौच. कारण विष्णूनें ' अनौरसेषु पुत्रेषु० ' इत्यादि वचनांत तसें सांगितलें आहे; पण येथील एकरात्र व त्रिरात्र या दोन पक्षांची परदेशांत (दूर प्रदेशीं) असणें व संनिध असणें या दोन कारणांस अनुसरून व्यवस्था लावावी. पण जेव्हां जेव्हां पित्याला तीन रात्र आशौच सांगितलेलें असतें तेव्हां तेव्हां इतर सपिंडांना एकरात्र जाणावें. कारण मरीचीनें ' सूतके मृतके चैव० ' या वचनांत तसें सांगितलें आहे. **निवासराजनि प्रेते**--निवास म्हणजे स्वदेश, त्याचा राजा, ( स्वामी, विषयाधिपति ) तो ज्या दिवशीं मेला असेल तो तेवढा दिवस शुद्धिकारण होतें; ( म्ह. एक दिवस आशौच ) व राजा रात्रीं मेल्यास तेवढी रात्र शुद्धिकारण समजावें, म्हणूनच मनूनें ( अ. ५ श्लो. ८२ )

राजाचें ' सज्योतिः आशौच ' सांगितलें आहे. ( सज्योति म्हणजे दिवसा राजा मेल्यास सूर्य असे तों व रात्रीं मेल्यास नक्षत्रें दिसतात तों आशौच. )२५.

आतां अनुगमनाशौच सांगतात—

**ब्राह्मणेनानुगन्तव्यो न शूद्रो न द्विजः क्वचित् ।**
**अनुगम्याम्भसि स्नात्वा स्पृष्ट्वाग्निं घृतभुक्शुचिः ॥ २६ ॥**

असपिंड ब्राह्मणानें मेलेल्या ब्राह्मणादि अथवा शूद्र यांच्या मागून अनुगमन करूं नये. जर स्नेहादिकांच्या योगानें त्यानें अनुगमन केलें तर तडागादिकांतील जलांत स्नान करून, अग्नीस स्पर्श करून व घृत प्राशन करून तो ( ब्राह्मण ) शुद्ध होतो. पण हें घृतप्राशन भोजनाचें प्रमाण नसल्यामुळें घृतप्राशनानें भोजनप्रतिषेध होऊं शकत नाहीं. हें समान व उत्कृष्ट जातीविषयीं आहे. कारण मनूनें ' अनुगम्येच्छया प्रेतं० ' ( अ. ५ श्लो. १०३ ) या वचनांत तसें सांगितलें आहे. बाकीच्याविषयीं अनुगमनाचें विधान केलेलें असल्यामुळें त्यांत कांहीं दोष नाहीं. पण मेलेल्या निकृष्ट जातीचें अनुगमन केल्यास दुसऱ्या स्मृतींत सांगितल्याप्रमाणें जाणावें.—अज्ञ ब्राह्मणानें मेलेल्या शूद्राचें अनुगमन केल्यास तीन दिवस आशौच धरावें. तीन रात्रीं निघून गेल्या असतां समुद्रास जाऊन मिळणाऱ्या नदीवर जावें. शंभर प्राणायाम करावे व घृतप्राशन करून शुद्ध व्हावें. तेंच त्यानें क्षत्रियाचें अनुगमन केल्यास अहोरात्र आशौच धरून व दुसऱ्या दिवशीं स्नानादि करून शुद्ध व्हावें. कारण वसिष्ठानें—ओल्या मानुषास्थीस स्पर्श केल्यास त्रिरात्र, सुक्या मनुष्यास्थीस स्पर्श केल्यास अहोरात्र व शवाचें अनुगमन केल्यास एकरात्र, असें सांगितलें आहे. ब्राह्मणानें मृतवैश्याचें अनुगमन केल्यास पक्षिणी, त्याचप्रमाणें क्षत्रियानें वैश्याच्या प्रेताबरोबर स्मशानांत अनुगमन केल्यास अहोरात्र व शूद्राचें अनुगमन केल्यास पक्षिणी, वैश्यानें शूद्रानुगमन केल्यास एकाह, असें स्वतर्कानें जाणावें. त्याचप्रमाणें मृताकरितां त्याच्या बांधवाबरोबर रोदन केल्यासही पारस्करानें सांगितल्याप्रमाणें अहोरात्र अशुचि राहून दान व श्राद्धकर्म वर्ज्य करावें. प्रेतालंकरणही करूं नये. कारण शंखानें ' असपिंड प्रेताचें अलंकरण केल्यास कृच्छ्रपाद प्रायश्चित्त, अज्ञानतः केल्यास उपवास व अशक्तपणा असल्यास नुस्तें स्नान तरी करणें अवश्य आहे. ' असें त्याकरितां प्रायश्चित्त सांगितलें आहे २६.

आतां सपिंडाशौचाचा क्वचित् अपवाद सांगतात—

**महीपतीनां नाशौचं हतानां विद्युतां तथा ।**
**गोब्राह्मणार्थे संग्रामे यस्य चेच्छति भूमिपः ॥ २७ ॥**

यद्यपि पृथ्वीशब्दानें सर्व भूगोल हा त्याचा अर्थ व्यक्त होतो, तथापि सर्व पृथ्वीचा एकच स्वामी असणें अनुपपन्न असल्यामुळें आणि या श्लोकांत योगीश्वरानें ' महीपतीनां ' असें बहुवचन योजलेलें असल्यामुळें मही या शब्दावरून पृथ्वीचे एकदेश, अशीं मंडलें लक्षित होतात. त्यांचें पालन करणाऱ्या अभिषिक्त व अभिषिक्त क्षत्रियांनीं आशौच करूं नये. त्याचप्रमाणें विजेच्या योगानें मेलेल्या व गाय—ब्राह्मण, इत्यादिकांचें रक्षण करीत असतांना मेलेल्या

लोकांचे जे सपिंड त्यांनींही आशौच करूं नये. राजा ज्या मंत्रि-पुरोहितादिकांनीं मंत्र, अभिचारादि कर्म यांस प्रतिबंध होत असल्यामुळें आशौच करूं नये, असें इच्छीत असेल त्यांनींही आशौच करूं नये. पण महीपतींना येथें जें सामान्यतः प्रजारक्षणादि कर्तव्य सांगितलें आहे तें ज्या दान-मान-सत्कार-व्यवहारदर्शन इत्यादिकांवाचून होणें शक्य नसेल त्यामध्येंच मात्र त्यांना ( राजांना ) आशौच नाहीं, असें समजावें. पंचमहायज्ञादि इतर कार्यामध्येंही ते शुचि आहेत, तीं त्यांनीं खुशाल करावीं, असें समजूं नये. मनु व गौतम या दोघांनींही तसें सांगितलें आहे. प्रचेतानें सूपकारादि स्वयंपाकी, चित्रकर, धोबी, इत्यादि शिल्पी, वैद्य, दासी, दास, राजे व राजभृत्य हे सर्व सद्यःशौचसंपन्न असतात, असें सांगितलें आहे. कर्मनिमित्तक-शब्दांनीं त्या त्या शिल्पिप्रभृतींच्या कर्मांना मनांत धरून आशौचाचा अभाव सांगितलेला असल्यामुळें तो त्या त्या कर्मापुरताच समजावा. म्हणून विष्णूनें 'राजांच्या राजकर्मांत' व्रती पुरुषांच्या व्रतांत, सत्रवानांच्या सत्रांत, कारागिरांच्या कारागिरींत, आशौच नसतें.' असें म्हणून प्रत्येकाच्या नियत कर्मामध्येंच आशौचाचा अभाव सांगितला आहे. शातातपानेंही ' मोल घेऊन काम करणारे शूद्र, दासी व दास स्नान, शरीरसंस्कार व गृहकर्म यांमध्यें दूषित नसतात.' असें म्हटलें आहे. ही दासादिकांची शुद्धि अपरिहार्यकर्मामध्येंच जाणावी. म्हणूनच आणखी एका स्मृतींत ' गर्भदास सद्यःशुद्ध, भक्तदास तीन दिवसांनीं शुद्ध व वैद्याचें काम दुसऱ्या कोणाला करितां येणें शक्य नसल्यामुळें तो ( वैद्य ) स्पर्श करावयाचा झाल्यास नित्य शुद्ध होय ' असें म्हटलें आहे २७.

ऋत्विजां दीक्षितानां च यज्ञियं कर्म कुर्वताम् ।
सत्रिव्रतिब्रह्मचारिदातृब्रह्मविदां तथा ॥ २८ ॥
दाने विवाहे यज्ञे च संग्रामे देशविप्लवे ।
आपद्यपि हि कष्टायां सद्यःशौचं विधीयते ॥ २९ ॥

( यजमानानें ज्याला वरणी दिली आहे, असा एक विशेष कर्मकर्ता ) ऋत्विज व दीक्षित ( दीक्षेच्या योगानें संस्कारयुक्त झालेला ), हे दोन्ही प्रकारचे लोक यज्ञांतील कर्म करीत असतांना सद्यःशौचसंपन्न होतात, म्हणजे त्यांच्या सद्यःशौचाचें विधान केलें आहे. दीक्षिताचा अधिकार ' वैतानोपासनाः कार्याः ' या वचनानेंच सिद्ध असतांना हें पुनर्वचन स्वयंकर्तृत्व विधानार्थ व सद्यःस्नानाच्या विधानार्थ आहे. त्याचप्रमाणें सत्री, व्रती, ब्रह्मचारी, दाता व ब्रह्मवेत्ता यांच्याही सद्यःशौचाचें विधान केलें जातें. येथील सत्रिशब्दानें अन्नसत्रांत प्रवृत्त झालेले लोक लक्षित होतात. कारण संतत अनुष्ठान हा मुख्य सत्रवानांचा धर्म त्यांच्यामध्यें असतो, व मुख्य सत्रवानांचें ग्रहण दीक्षित या शब्दानेंच होतें. व्रतिशब्दानें कृच्छ्रचांद्रायणामध्यें प्रवृत्त झालेले व स्नातक-व्रतप्रायश्चित्तांत प्रवृत्त झालेले घ्यावे. त्याचप्रमाणें ब्रह्मचर्यादि व्रतयोगी, श्राद्धकर्ता, व भोक्ता यांचें ग्रहण करावें. ब्रह्मचारी या शब्दानें उपकुर्वाणक व नैष्ठिक असे दोन्ही घ्यावे. दातृशब्दानें नेहमीं दाता, पण कधींही प्रतिग्रह न करणारा वैखानस घ्यावा.

ब्रह्मवेत्ता म्हणजे यति. अर्थात् ब्रह्मचारी, वैखानस ( वानप्रस्थ ) व यति या तीन आश्रमवानांची सर्व कर्मांमध्यें शुद्धि असते. कारण त्यांची अमुक कर्मांत शुद्धि व अमुक कर्मांत शुद्धि नाहीं, असा विषयभाग करावयास कांहीं प्रमाण नाहीं. आतां ज्या द्रव्याचा संकल्प पूर्वीच केलेला होता त्याच्या दानाला आशौच नाहीं. 'पूर्वसंकल्पित द्रव्य दिलें तरी दूषित होत नाहीं,' असें क्रतूचें स्मरण आहे. पण दुसऱ्या एका स्मृतींत 'विवाहोत्सव, यज्ञ इत्यादिकांमध्यें मृतक अथवा सूतक आल्यास बाकीचें अन्न दुसऱ्याकडून देववावें व तें देणाऱ्या आणि खाणाऱ्या लोकांना आशौचानें स्पर्श करूं नये,' असें म्हटलें आहे. येथील विवाहशब्दानें पूर्वीच–( आशौच निमित्त उत्पन्न होण्यापूर्वी ) प्रवृत्त झालेलें चौल, उपनयन, इत्यादि संस्कारकर्मांचें ग्रहण करावें. तसेंच यज्ञशब्दावरून पूर्वप्रवृत्त देवप्रतिष्ठा, आरामादि सर्व उत्सव यांचें ग्रहण करावें. संग्राम म्हणजे संग्रामसंबंधी तयारी करतांना अवश्य असलेला प्रास्थानिक शांतिहोमादिक घ्यावा. त्यांत सद्यःशुद्धि असते. कांहीं भयंकर रोग अथवा राजभय यांच्या योगानें देशाचा नाश झाला असतां त्याच्या उपशमाकरितां शांति, इत्यादि कर्म करावयाचें झाल्यास सद्यःशौच समजावें. त्याचप्रमाणें अतिशय कष्टकर आपत्ति आली असतां म्हणजे व्याधि, इत्यादिकांच्या योगानें मरणावस्था प्राप्त झाली असतां पापनाशार्थ दान करावयाचें असल्यास, आणि जवळचें द्रव्य संपून क्षुधेनें व्याकुळ झालेल्या–आई–बाप, साध्वी भार्या इत्यादिकांनीं युक्त असलेल्या मोठ्या कुटुंबाचें पोषण करावयासाठीं परिग्रह कर्तव्य झाल्यास सद्यःशुद्धि सांगितलेली आहे. पण ज्याच्या शुद्धीवाचून क्षुधार्तांचा निरास होणें शक्य नाहीं अशा अश्वस्तनिकां ( म्ह. दुसऱ्या दिवसाचें अन्नही संग्रहीं न ठेवणाऱ्या ) विषयीं ही शुद्धि आहे. ज्यानें एका दिवसापुरतें धान्य संग्रहीं ठेवलेलें असतें त्याला एकाह व ज्याच्यापाशीं तीन दिवस पुरेसें धान्य असतें त्याला तीन दिवस आशौच जाणावें. जो चार दिवसांपुरतें धान्य संग्रहीं ठेवतो तो कुंभीधान्य व ज्याच्यापाशीं कुसूलादिप्रमाण ( दहा दिवसांचा ) अन्नसंग्रह असतो तो कुसूलधान्य होय. त्यांना क्रमानें चार व दहा दिवस आशौच प्राप्त होतें. अर्थात् ज्याला जितके दिवस अन्नार्ति प्राप्त होण्यासारखी नसेल त्यानें तितके दिवस आशौच धरावें. कारण आशौचाचा संकोच आपत्तिरूप उपाधीवर अवलंबून असतो. म्हणूनच मनूनें ( अ. ४ श्लो. ७ ) गृहस्थाचे कुसूल–धान्यादि चार प्रकार सांगून त्याच्यासाठीं दशाह, अस्थिसंचयापर्यंत, तीन दिवस, व एक दिवस असे आशौचाचेही चार कल्प सपिंडांस उद्देशून सांगितले आहेत. अन्य स्मृतींत समानोदकांस उद्देशून सांगितलेले पक्षिणी, एकाह व सद्यःशौच हे संकुचित आशौचकल्पही वृत्तिसंकोचरूप उपाधीस अनुसरून योजावे. अर्थात् ज्या प्रतिग्रहादि जीवनसाधनावाचून आर्तिच प्राप्त होत असेल त्याच्या पुरताच हा आशौचसंकोच जाणावा. त्याचा उपयोग सर्वत्र करूं नये.

आतां 'अग्निवेदयुक्त ब्राह्मण एका दिवसानेंच शुद्ध होतो. केवळ वेदाध्यायी तीन दिवसांनीं आणि अग्नि व वेद या दोन्हींनीं रहित असलेला दहा दिवसांनीं शुद्ध होतो.' इत्यादि विधान आहे.पण'तं दशाहं शावमाशौचं सपिण्डेषु विधीयते'या सामान्यप्राप्त दशाह आशौचा-

त्या बाध करूनच एकाहादिकांचें विधायक होत असतें. कोणतेंहि बाधक अनुपपत्ति या कारणामुळेंच समर्थ होतें, असा सामान्य नियम आहे. यास्तव या बाधक विधानानें कोणत्या व किती बाध्याचा बाध करावा, अशी आकांक्षा आली असतां अपेक्षित विशेषाचें समर्पण करण्यास समर्थ असलेल्या ' अग्निवेदसमन्वितः ' या वाक्याचें दर्शन होतें, आणि त्यामुळें अग्निवेदविषयक अग्निहोत्रकर्मामध्यें व स्वाध्यायामध्येंच तें बाधक विधान व्यवस्थित होतें. दानादि अनुक्त कर्मांमध्यें अवस्थित होत नाहीं. असा सिद्धान्त केल्यानेंच अग्नि व वेद हीं दोन पदें कार्यान्वित होतात. नाहींतर ज्यानें अग्नि-वेदसाध्य कर्म केलें आहे त्याची एका दिवसानें शुद्धि होते, अशीं तीं विशेष पुरुषोपलक्षक झालीं असतीं. पण तें मीमांसेच्या परिभाषेस सोडून आहे. यास्तव योग्य नव्हे. शिवाय वर सांगितल्याप्रमाणें त्या वाक्यांची व्यवस्था केल्यानेंच ' अग्निक्रिया सोडूं नये; वैतान क्रिया व औपासन क्रिया कराव्या; ब्राह्मणाचे स्वाध्यायादि निवृत्त्यर्थ सद्यःशौच ' इत्यादि सांगणाऱ्या मन्वादिकांच्या वचनांचीं एकवाक्यता होते. त्याचप्रमाणें ' दोन्ही प्रकारच्या आशौचांत दहा दिवस कुलाचें अन्न खाल्लें जात नाहीं. ' असें म्हणून दशाहपर्यंत कुलाच्या अन्नाचा प्रतिषेध करणाऱ्या यमादिकांच्या वाक्यांशीं विरोधही येत नाहीं. तस्मात् हें आशौचसंकोचविधान कांहीं विशेषप्रकारच्या कर्मासंबंधींच आहे; सर्व व्यवहाराविषयीं नाहीं.

स्वाध्यायाविषयीं जें सद्यःशौच सांगितलेलें आहे तें ज्यानें अनेक वेद म्हटले आहेत त्याच्या ब्रह्मत्यागकृत संकटप्रसंगींच उपयुक्त आहे, असें जाणावें. पण ज्यानें एकच वेद म्हटला आहे त्याला 'दानं प्रतिग्रहो होमः स्वाध्यायश्च निवर्तते ' हा प्रतिषेधच लागू आहे. असो; याप्रमाणें ब्राह्मणादिकांतील ज्याला जितकें आशौच सांगितलें असेल तें सर्व ( दशाहादि ) निवृत्त झाल्यावर स्नानानेंच शुद्धि होते. नुस्ता एकाह, त्रिदिन, दशाह, इत्यादि काल गेल्यानेंच शुद्धि होत नाहीं. कारण मनूनें ( अ. ५ श्लो. ९९ ) असें म्हटलें आहे. ज्यानें आशौचकालाचा अनुभव घेतला आहे असा विप्र स्नान व हातानें जलस्पर्श करून शुद्ध होतो. अथवा आशौच असेपर्यंत ज्यानें उदकादि क्रिया केल्या आहेत तो विप्र जलस्पर्शानें, क्षत्रिय वाहनास व आयुधास स्पर्श करून, वैश्य चाबकास किंवा लगाम ( अथवा किरण ) यांस हात लावून व शूद्र यष्टीस स्पर्श करून, शुद्ध होतो. अर्थात् ' अथवा ' असें म्हणून आम्ही जो येथें दुसरा अर्थ सांगितला आहे तो आशौचकाल संपल्यावर स्नानाच्या जागीं प्रतिनिधिरूपानें स्पर्शाचें विधान करण्यासाठीं आहे २८,२९.

येथवर कुलव्यापिनी शुद्धि सांगून आतां प्रसंगोपात्त प्रतिपुरुषव्यापिनी शुद्धि सांगतात-

**उदक्याशुचिभिः स्नायात्संस्पृष्टस्तैरुपस्पृशेत् ।**
**अब्लिङ्गानि जपेच्चैव गायत्रीं मनसा सकृत् ॥ ३० ॥**

रजस्वला व शव, चांडाल, पतित, सूतिका आणि मृताशौचवान् हे अशुचि, यांनीं ज्यास स्पर्श केला आहे, त्यानें स्नान करावें रजस्वला व वरील अशुचि जन यांनीं ज्यास स्पर्श केला आहे, त्यांनीं स्पर्श केल्यास त्या दुसऱ्यानें आचमन करावें आणि आचम-

नानंतर 'आपोहिष्ठा०' इत्यादि अब्लिंगक ( जलांचे ज्यांत चिह्न आहे ) अशा तीन ऋचांचा जप करावा. 'अब्लिंगानि' असें येथें जरी बहुवचन आहे तरी तीन या संख्येनें तें चरितार्थ होत असल्यामुळें तीन ऋचांचा जप केला म्हणजे झालें. त्याचप्रमाणें एकदां मनानें गायत्रीचा जप करावा. रजस्वला इत्यादिकांनीं ज्यांना स्पर्श केला आहे त्यांना सोडून दुसऱ्याही स्नानास योग्य असलेल्या सर्व प्रकारच्या स्पर्शामध्येही आचमनाचें विधान करण्यासाठीं श्लोकांत 'तैः' असा बहुवचनी निर्देश केला आहे. स्नानास कोण कोण योग्य आहेत तें अन्य स्मृतीवरून जाणावें. जसें पराशर म्हणतो—दुःस्वप्न मैथुन, वांति, जुलाब, श्मश्रुकर्म, चिति, यूप व श्मशान यांच्या समीप जाणें व स्पर्श करणें या निमित्तानें स्नान करावें. मनूनें ( अ. ५ श्लो. १४४ ) वान्ति किंवा जुलाब झाला असतां स्नान करून तूप प्यावें. असें म्हटलें आहे. जेवल्यावर आचमन करावें, ऋतुसमयीं मैथुनाचरण करणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं स्नान करावें. बृहस्पतीनें 'सोळा रात्री हा ऋतुकाल गेल्यावर मैथुन केल्यास मूत्र पुरीषाप्रमाणें शौच करावें' असें म्हटलें आहे. पण अष्टमी, चतुर्दशी, दिवस, पर्व इत्यादि समयीं मैथुनाचरण केल्यास ऋतुकाल नसला तरी सचैल स्नान करावें व वारुणी ऋचांनी मार्जन करावें. यमानें-अजीर्ण, वान्ति, सूर्याचा उदय व अस्त, दुःस्वप्न व दुर्जनाचा स्पर्श या प्रसंगीं नुसत्या स्नानाचें विधान केलें आहे. च्यवनानें—कुत्रा, चांडाल, प्रेताचा धूर, देवाच्या द्रव्यावर उपजीविका करणारा ग्रामयाजी, सोमविक्रयी, यूपचित्ती, चितेंतील काष्ठ, मद्य, मद्याचें भांडें, ओलें मानुषास्थि, शवाचा ज्याला स्पर्श झाला आहे असें वस्त्रादि, रजस्वला, महापातकी व शव यांस स्पर्श करून सचैल स्नान, अग्निस्पर्श व आठ वेळ गायत्रीचा जप करावा. घृतप्राशन करून पुनः स्नान करावें व तीन वेळ आचमन करावें. पण हें बुद्धिपूर्वक स्पर्श केल्यास जाणावें. अबुद्धिपूर्वक स्पर्श झाल्यास बृहस्पतीच्या म्हणण्याप्रमाणें नुस्तें स्नान करावें. याचप्रमाणें पुढील सर्व पक्षांमध्यें विषयसमीकरण करावें. उदय व अस्तमयसमयीं वीर्यस्कंदन, नेत्रस्पंदन, कानांत कोणी आक्रोश करणें, चित्यारोहण, यूपस्पर्श, देवपूजकस्पर्श, शैव, पाशुपत, लोकायतिक, नास्तिक, निषिद्धकर्में करणारे ब्राह्मण, श्वपाकच्छाया, पतित, इत्यादिकांचा स्पर्श अथवा संसर्ग झाल्यास सचैल स्नान करावें. दीर्घकाल मूत्रपुरीषोत्सर्ग—शौच न केल्यास स्नान करावें. कावळा, घुबड इत्यादिकांचा स्पर्श झाल्यास स्नान करावें. भोजनादि करीत असतांना व अनुष्ठानसमयींच मात्र मांजर, भासपक्षी, गाढव, उंट, सूकर व विष्ठा इत्यादि अमेध्य पदार्थ यांचा स्पर्श झाल्यास सचैल स्नान विहित आहे. मांजराचा स्पर्श अशुद्ध समजावा. कारण तसा शिष्टाचार दिसतो. दुसऱ्यावेळीं 'मांजर, दर्वी व वायु हे पदार्थ सदा शुचि आहेत' या वचनास अनुसरून चालावें ( म्हणजे स्नानादि शौच करूं नये. ) कुत्र्याचा स्पर्श नाभीच्या वरील शरीरभागास झाल्यास स्नान करावें व नाभीच्या खालील अवयवांस व हातांस तो झाल्यास नुस्तें प्रक्षालन व आचमन करावें. जातुकर्ण्यानें 'हातांना सोडून शरीराच्या नाभीवरील दुसऱ्या भागांस पक्ष्याचा स्पर्श झाल्यास स्नान व पाय, मांड्या इत्यादि खालच्या भागांस स्पर्श झाल्यास प्रक्षालन करावें,' असेंही सांगितलें आहे. अमेध्य पदार्थांविषयीं विष्णूनें विशेष दर्श-

विला आहे. नाभीच्या खालील भाग व अग्रहस्त यांस अमेध्याचा (म्ह० शरीरांतील मळ व मद्य यांचा) स्पर्श झाला असतां मृत्तिका व जल यांच्या योगानें तें अंग धुवावें व आचमन करून शुद्ध व्हावें व नाभीवरील भागांस अमेध्याचा स्पर्श झाल्यास तो तो भाग मृत्तिकायुक्त जलानें धुवून स्नान करावें. इंद्रियांना अमेध्याचा स्पर्श झाल्यास उपोषण व स्नान करून पंचगव्यप्राशन करावें. पण हें सर्व शौच दुसऱ्याच्या मलांचा स्पर्श झाल्यास समजावें. कारण देवलाच्या म्हणण्याप्रमाणें आपल्याच मलांचा स्पर्श आपल्याच अंगास झाल्यास नुसत्या प्रक्षालनानें शुद्धि होते. शंखानें—मार्गांतील चिखल, घाण पाणी, थुंकी वगैरे यांचा स्पर्श नाभीवरील भागास झाला असतां स्नानानें शुद्धि होते, असें म्हटलें आहे. यमानेंही या शौचाविषयीं विशेष सांगितला आहे. पण वाऱ्यानें चिखल सुकून गेल्यावर त्यास स्पर्श केल्यास कांहीं दोष नाहीं. कारण मन्वादिकांनीं ‘ चांडाल, कुत्रे, सूकर इत्यादिकांचा ज्यांस स्पर्श झाला आहे, असे राजमार्गांतील चिखल, जल, इत्यादि पदार्थ वायूनें शुद्ध होतात ’ असें म्हटलें आहे. पक्क्या विटांचे ओटे वगैरे वाऱ्यानें शुद्ध होतात. अस्थींविषयीं मनूनें असा विशेष सांगितला आहे—मनुष्याच्या शुष्क अस्थीचा स्पर्श झाल्यास ब्राह्मण आचमन करून किंवा गाईला स्पर्श करून अथवा सूर्यावलोकन करून शुद्ध होतो; पण ते मानुषास्थि ओले असल्यास ब्राह्मण स्नानावाचून शुद्ध होत नाहीं. पण हें विधान द्विजांच्या हाडांविषयीं आहे. शूद्रादि दुसऱ्यांच्या ओल्या अस्थींचा स्पर्श झाल्यास त्रिरात्र आशौच व शुष्कास्थींचा स्पर्श झाल्यास एकाहाशौच वसिष्ठानें सांगितलें आहे. मनुष्येतर प्राण्यांच्या अस्थींचा स्पर्श झाल्यास विष्णूच्या वचनाप्रमाणें—अभक्ष्य प्राण्यास सोडून बाकीच्या पंचनखयुक्त पश्वादिकांचे शव अथवा अस्थि यांचा स्पर्श झाल्यास स्नान करून पूर्वींचें वस्त्र चांगलें धुवून नेसावें.

असो; असेच आणखी दुसरेही स्नानार्ह जन दुसऱ्या स्मृतींवरून जाणावे. येणेंप्रमाणें स्नानार्ह जन अनेक असल्यामुळें त्यांस उद्देशून योजलेलें ‘ तैः ’ असें बहुवचन योग्यच आहे. ‘ उदक्याशुचिभिःस्नायात् ’ हें वचन चांडालादिकांचा काठी, कांडी, काष्ठ इत्यादि अचेतन वस्तूंचें मध्यें व्यवधान असून त्यांच्या द्वारा स्पर्श झाल्यास ( म्हणजे त्यांचा प्रत्यक्ष स्पर्श न होतां अचेतन वस्तूच्या योगानें परंपरेनें स्पर्श झाल्यास ) उपयोगांत आणावें. पण कोणा सचेतन प्राण्याच्या द्वारा चांडालादिकांचा स्पर्श झाल्यास मनूनें (अ. ५ श्लो. ८५)सांगितल्याप्रमाणें स्नानच करणें अवश्य आहे. पण चांडालादिकांस एकानें प्रत्यक्ष स्पर्श केला, तो दुसऱ्यास शिवला व त्या दुसऱ्यानें पुनः तिसऱ्यास हात लाविला; अशा प्रसंगीं तिसऱ्यानें आचमन केलें म्हणजे झालें. पण तें सुद्धां बुद्धिपूर्वक स्पर्श केलेला नसल्यास जाणावें. कारण मुद्दाम स्पर्श केल्यास तिसऱ्यालाही स्नानच अवश्य आहे. गौतमानें याविषयीं ‘ पतित, चांडाल, सूतिका उदक्या, शवास स्पर्श करणारा व त्यास स्पर्श करणारा हे सचैल स्नानानेंच शुद्ध होतात, असें म्हटलें आहे. अशा प्रसंगीं चवथ्याला आचमन. कारण ‘ परंपरेनें विटाळ झालेल्या तिसऱ्या पुरुषाला शिवणारा चवथा हात—पाय धुवून आचमन करून शुद्ध होतो. ’ असें देवलानें सांगितलें आहे. रजस्वला स्त्री इत्यादिकांस श्वपाक, पतित, व्यंग, उन्मत्त, प्रेतवाहक,

नानंतर 'आपोहिष्टा०' इत्यादि अब्लिंगक (जलांचे ज्यांत चिह्न आहे) अशा तीन ऋचांचा जप करावा. 'अब्लिंगानि' असें येथें जरी बहुवचन आहे तरी तीन या संख्येनें तें चरितार्थ होत असल्यामुळें तीन ऋचांचा जप केला म्हणजे झाले. त्याचप्रमाणें एकदां मनानें गायत्रीचा जप करावा. रजस्वला इत्यादिकांनीं ज्यांना स्पर्श केला आहे त्यांना सोडून दुसऱ्याही स्नानास योग्य असलेल्या सर्व प्रकारच्या स्पर्शामध्येही आचमनाचें विधान करण्यासाठीं श्लोकांत 'तैः' असा बहुवचनी निर्देश केला आहे. स्नानास कोण कोण योग्य आहेत तें अन्य स्मृतीवरून जाणावें. जसें पराशर म्हणतो–दुःस्वप्न मैथुन, वांति, जुलाव, श्मश्रुकर्म, चिति, यूप व श्मशान यांच्या समीप जाणें व स्पर्श करणें या निमित्तानें स्नान करावें. मनूनें (अ. ५ श्लो. १४४) वान्ति किंवा जुलाव झाला असतां स्नान करून तूप प्यावें. असें म्हटलें आहे. जेवल्यावर आचमन करावें, ऋतुसमयीं मैथुनाचरण करणाऱ्या स्त्रीपुरुषांनीं स्नान करावें. बृहस्पतीनें 'सोळा रात्री हा ऋतुकाल गेल्यावर मैथुन केल्यास मूत्र पुरीषाप्रमाणें शौच करावें' असें म्हटलें आहे. पण अष्टमी, चतुर्दशी, दिवस, पर्व इत्यादि समयीं मैथुनाचरण केल्यास ऋतुकाल नसला तरी सचैल स्नान करावें व वारुणी ऋचांनी मार्जन करावें. यमानें–अजीर्ण, वान्ति, सूर्याचा उदय व अस्त, दुःस्वप्न व दुर्जनाचा स्पर्श या प्रसंगीं नुसत्या स्नानाचें विधान केलें आहे. च्यवनानें–कुत्रा, चांडाल, प्रेताचा धूर, देवाच्या द्रव्यावर उपजीविका करणारा ग्रामयाजी, सोमविक्रयी, यूपचित्ती, चितेंतील काष्ठ, मद्य, मद्याचें भांडें, ओलें मानुषास्थि, शवाचा ज्याला स्पर्श झाला आहे असें वस्त्रादि, रजस्वला, महापातकी व शव यांस स्पर्श करून सचैल स्नान, अग्निस्पर्श व आठ वेळ गायत्रीचा जप करावा. घृतप्राशन करून पुनः स्नान करावें व तीन वेळ आचमन करावें. पण हें बुद्धिपूर्वक स्पर्श केल्यास जाणावें. अबुद्धिपूर्वक स्पर्श झाल्यास बृहस्पतीच्या म्हणण्याप्रमाणें नुस्तें स्नान करावें. याचप्रमाणें पुढील सर्व पक्षांमध्यें विषयसमीकरण करावें. उदय व अस्तमयसमयीं वीर्यस्कंदन, नेत्रस्पंदन, कानांत कोणी आक्रोश करणें, चित्यारोहण, यूपस्पर्श, देवपूजकस्पर्श, शैव, पाशुपत, लोकायतिक, नास्तिक, निषिद्धकर्मे करणारे ब्राह्मण, श्वपाकच्छाया, पतित, इत्यादिकांचा स्पर्श अथवा संसर्ग झाल्यास सचैल स्नान करावें. दीर्घकाल मूत्रपुरीषोत्सर्ग–शौच न केल्यास स्नान करावें. कावळा, घुबड इत्यादिकांचा स्पर्श झाल्यास स्नान करावें. भोजनादि करीत असतांना व अनुष्ठानसमयींच मात्र मांजर, भासपक्षी, गाढव, उंट, सूकर व विष्ठा इत्यादि अमेध्य पदार्थ यांचा स्पर्श झाल्यास सचैल स्नान विहित आहे. मांजराचा स्पर्श अशुद्ध समजावा. कारण तसा शिष्टाचार दिसतो. दुसऱ्यावेळीं 'मांजर, दर्वी व वायु हे पदार्थ सदा शुचि आहेत' या वचनास अनुसरून चालावें (म्हणजे स्नानादि शौच करूं नये.) कुत्र्याचा स्पर्श नाभीच्या वरील शरीरभागास झाल्यास स्नान करावें व नाभीच्या खालील अवयवांस व हातांस तो झाल्यास नुस्तें प्रक्षालन व आचमन करावें. जातुकर्ण्यानें 'हातांना सोडून शरीराच्या नाभीवरील दुसऱ्या भागांस पक्ष्याचा स्पर्श झाल्यास स्नान व पाय, मांड्या इत्यादि खालच्या भागांस स्पर्श झाल्यास प्रक्षालन करावें,' असेंही सांगितलें आहे. अमेध्य पदार्थांविषयीं विष्णूनें विशेष दर्श-

विला आहे. नाभीच्या खालील भाग व अग्रहस्त यांस अमेध्याचा ( म्ह० शरीरांतील मळ व मद्य यांचा ) स्पर्श झाला असतां मृत्तिका व जल यांच्या योगानें तें अंग धुवावें व आचमन करून शुद्ध व्हावें व नाभीवरील भागांस अमेध्याचा स्पर्श झाल्यास तो तो भाग मृत्तिकायुक्त जलानें धुवून स्नान करावें. इंद्रियांना अमेध्याचा स्पर्श झाल्यास उपोषण व स्नान करून पंचगव्यप्राशन करावें. पण हें सर्व शौच दुसऱ्याच्या मलांचा स्पर्श झाल्यास समजावें. कारण देवलाच्या म्हणण्याप्रमाणें आपल्याच मलांचा स्पर्श आपल्याच अंगास झाल्यास नुसत्या प्रक्षालनानें शुद्धि होते. शंखानें—मार्गांतील चिखल, घाण पाणी, थुंकी वगैरे यांचा स्पर्श नाभीवरील भागास झाला असतां स्नानानें शुद्धि होते, असें म्हटलें आहे. यमानेंही या शौचाविषयीं विशेष सांगितला आहे. पण वाऱ्यानें चिखल सुकून गेल्यावर त्यास स्पर्श केल्यास कांहीं दोष नाहीं. कारण मन्वादिकांनीं ' चांडाल, कुत्रे, सूकर इत्यादिकांचा ज्यांस स्पर्श झाला आहे, असे राजमार्गांतील चिखल, जल, इत्यादि पदार्थ वायूनें शुद्ध होतात ' असें म्हटलें आहे. पक्क्या विटांचे ओटे वगैरे वाऱ्यानें शुद्ध होतात. अस्थींविषयीं मनूनें असा विशेष सांगितला आहे—मनुष्याच्या शुष्क अस्थीचा स्पर्श झाल्यास ब्राह्मण आचमन करून किंवा गाईला स्पर्श करून अथवा सूर्यावलोकन करून शुद्ध होतो; पण ते मानुषास्थि ओले असल्यास ब्राह्मण स्नानावाचून शुद्ध होत नाहीं. पण हें विधान द्विजांच्या हाडांविषयीं आहे. शूद्रादि दुसऱ्यांच्या ओल्या अस्थीचा स्पर्श झाल्यास त्रिरात्र आशौच व शुष्कास्थीचा स्पर्श झाल्यास एकाहाशौच वसिष्ठानें सांगितलें आहे. मनुष्येतर प्राण्यांच्या अस्थींचा स्पर्श झाल्यास विष्णूच्या वचनाप्रमाणें—अभक्ष्य प्राण्यास सोडून बाकीच्या पंचनखयुक्त पश्वादिकांचे शव अथवा अस्थि यांचा स्पर्श झाल्यास स्नान करून पूर्वीचें वस्त्र चांगलें धुवून नेसावें.

असो; असेंच आणखी दुसरेही स्नानार्ह जन दुसऱ्या स्मृतीवरून जाणावे. येणेंप्रमाणें स्नानार्ह जन अनेक असल्यामुळें त्यांस उद्देशून योजलेलें ' तैः ' असें बहुवचन योग्यच आहे. ' उदक्याशुचिभिःस्नायात् ' हें वचन चांडालादिकांचा काठी, काडी, काष्ठ इत्यादि अचेतन वस्तूंचें मध्यें व्यवधान असून त्यांच्या द्वारा स्पर्श झाल्यास ( म्हणजे त्यांचा प्रत्यक्ष स्पर्श न होतां अचेतन वस्तूच्या योगानें परंपरेनें स्पर्श झाल्यास ) उपयोगांत आणावें. पण कोणा सचेतन प्राण्याच्या द्वारा चांडालादिकांचा स्पर्श झाल्यास मनूनें (अ. ५ श्लो. ८५)सांगितल्याप्रमाणें स्नानच करणें अवश्य आहे. पण चांडालादिकांस एकानें प्रत्यक्ष स्पर्श केला, तो दुसऱ्यास शिवला व त्या दुसऱ्यानें पुनः तिसऱ्यास हात लाविला; अशा प्रसंगीं तिसऱ्यानें आचमन केलें म्हणजे झालें. पण तें सुद्धां बुद्धिपूर्वक स्पर्श केलेला नसल्यास जाणावें. कारण मुद्दाम स्पर्श केल्यास तिसऱ्यालाही स्नानच अवश्य आहे. गौतमानें याविषयीं ' पतित, चांडाल, सूतिका उदक्या, शवास स्पर्श करणारा व त्यास स्पर्श करणारा हे सचैल स्नानानेंच शुद्ध होतात, असें म्हटलें आहे. अशा प्रसंगीं चवथ्याला आचमन. कारण ' परंपरेनें विटाळ झालेल्या तिसऱ्या पुरुषाला शिवणारा चवथा हात—पाय धुवून आचमन करून शुद्ध होतो. ' असें देवलानें सांगितलें आहे. रजस्वला स्त्री इत्यादिकांस श्वपाक, पतित, व्यंग, उन्मत्त, प्रेतवाहक,

बाळंतीण, सुवीण, दुसरी त्रिटाळशी, कुत्रें, कोंबडे, डुक्कर, इत्यादि अशुचींचा स्पर्श झाल्यास तीं उपवास, स्नान व कृच्छ्र यांच्या योगानें शुद्ध होतात. या तीन उपायांतील कुत्रें, डुक्कर वगैरे पशूंचा स्पर्श झाल्यास उपवास व स्नान आणि श्वपाकादिकांचा स्पर्श झाल्यास कृच्छ्र व स्नान अशी व्यवस्था करावी ३०.

आतां आणखी शुद्धीचे उपाय सांगतात—

कालोऽग्निः कर्म मृद्वायुर्मनो ज्ञानं तपो जलम् ।
पश्चात्तापो निराहारः सर्वेऽमी शुद्धिहेतवः ॥ ३१ ॥

ज्याप्रमाणें अग्नि, कर्म इत्यादि सर्व आपापल्या विषयामध्यें शुद्धीचे हेतु होतात त्याप्रमाणें दशरात्रादिक कालही शुद्धीचा हेतु आहे. कारण शुद्धीचें हेतुत्व शास्त्रावरूनच कळत असतें. अग्नि शुद्धीचा हेतु आहे, हें ' पुनः पाकान्महीमयम् ' ( आचाराध्याय श्लो. १८७, ) या वचनांत पूर्वीं सांगितलें आहे. कर्मही शुद्धीचें निमित्त आहे. जसें ' अश्वमेधावभृथस्नानात्' असें पुढें सांगणार आहेत. तशीच मृत्तिकाही शुद्धीचें निमित्त आहे, हें मागें शुद्धिप्रकरणांत ( आचाराध्याय श्लो. १८९ ) सांगितलेंच आहे. वायूही शुद्धीचा हेतु आहे व ' मारुतेनैव शुद्ध्यन्ति ' ( आचा. श्लो. १९७ ) या वचनानें तसें सांगितलें आहे. मनही वाणीच्या शुद्धीचें निमित्त आहे. कारण, ' मनसा वा इषिता वाग्वदति ' ( मनानें जिची इच्छा केली आहे, अशी वाणी बोलते. ) इत्यादि श्रुति आहे. आध्यात्मिक ज्ञान बुद्धिशुद्धीचें निदान आहे. त्याविषयीं ' क्षेत्रज्ञस्येश्वरज्ञानात् ' ( श्लो. ३४ ) असें याच प्रकरणांत पुढें सांगतील. कृच्छ्रादि तपही शुद्धीचें निमित्त आहे. ' प्राजापत्यं चरेत्कृच्छ्रं ' इत्यादि पुढें सांगतील. जलही शुद्धीचें कारण आहे. ' वर्ष्मणो जलं ' असें पुढें ( श्लो. ३३, ) म्हणणार आहेत ' ख्यापनेनानुतापेन० ' इत्यादि वचनांत म्हटल्याप्रमाणें पश्चात्तापही विशुद्धीचा जनक आहे. तसाच निराहारही शुद्धीचा उपाय आहे. ' त्रिरात्रोपोषितो जाप्त्वा. ' इत्यादि पुढें सांगतीलच ३१.

अकार्यकारिणां दानं वेगो नद्याश्च शुद्धिकृत् ।
शोध्यस्य मृच्च तोयं च संन्यासो वै द्विजन्मनाम् ॥ ३२ ॥
तपो वेदविदां क्षान्तिर्विदुषां वर्ष्मणो जलम् ।
जपः प्रच्छन्नपापानां मनसः सत्यमुच्यते ॥ ३३ ॥
भूतात्मनस्तपोविद्ये बुद्धेर्ज्ञानं विशोधनम् ।
क्षेत्रज्ञस्येश्वरज्ञानाद्विशुद्धिः परमा मता ॥ ३४ ॥

अकार्यें करणाऱ्या पुरुषांच्या ( निषिद्ध सेवन करणाऱ्यांच्या शुद्धीचें मुख्य कारण दानच आहे, असें पुढें ' पात्रे धनं वा पर्याप्तं दत्वा ' इत्यादि म्हणणार आहेत. ग्रीष्मादि ऋतूमध्यें

जल अल्प झाल्यामुळें जिचे तीर अमेध्य पदार्थांनीं अशुद्ध झाले आहेत अशा नदीच्या तीरास तोडून फोडून नेणारा वर्षाजलाचा प्रवाहच तिला शुद्ध करणारा आहे. शोधनीय द्रव्याचें शोधन करणारें मृत्तिका व जल हेंच आहे व तसें आचाराध्यायाच्या १९१ श्लोकांत सांगितलें आहे. संन्यास हें द्विजांच्या मनोमय दोषांस शुद्ध करणारें साधन आहे. तप म्हणजे वेदाभ्यास तो वेदवेत्त्यांस शुद्ध करीत असतो. कारण कृच्छ्रादि तप सर्वसाधारण आहे. तें केवळ वेदवेत्त्यांकरितांच नाहीं. वेदार्थज्ञांच्या शुद्धीचें निमित्त क्षांति ( उपशम ) हें आहे. शरीराचें शोधक जल आहे. ज्यांचीं पापें गुप्त असतात (ज्यांचे दोष प्रकट झालेले नसतात ) त्यांच्या शुद्धीस अघमर्षणादि सूक्तांचा जप कारण होतो. सत् व असत्संकल्पात्मक मन असत्संकल्पामुळें जेव्हां मलिन होतें तेव्हां साधु ( सत् ) संकल्प हेंच त्याचें शोधक साधन आहे. भूतशब्दानें भौतिक ( भूतविकारभूत ) देहेंद्रियसंबंध घेतला जातो. त्याच्यामध्यें मी स्थूल, कृश, काणा, बधिर आहें इत्यादि अभिमान ठेवून जो राहतो तो भूतात्मा होय. त्याच्या शुद्धीचीं तप व विद्या हीं दोन कारणें आहेत. येथें तपःशब्दानें पूर्व अनेक जन्मीं अथवा या जन्मीं विचारानें केलेला जो जाग्रत्स्वप्न–सुषुप्तिसंज्ञक अवस्थामध्यें आत्म्याचा अन्वय व शरीरादिकांचा व्यतिरेक तो घ्यावा. कारण ' तपसा ब्रह्म विजिज्ञासस्व ' या पंचकोश-व्यतिरेक–प्रतिपादनपर वाक्यामध्यें तपःशब्दाचा त्याच अर्थी उपयोग केला आहे. विद्याशब्दानें उपनिषदांतील अस्थूल, अनणु, अह्रस्व, असंग इत्यादि त्वंपदार्थ-निरूपण–विषयवाक्यजन्यज्ञान घ्यावें. संशय विपर्ययरूप असल्यामुळें मलिन झालेल्या शरीरादि–व्यतिरेकबुद्धीचें प्रमाणरूप ज्ञान विशोधन आहे. तप व विद्या यांच्या योगानें अतिशय शुद्ध झालेल्या त्वंपदार्थभूत सोपाधिक आत्म्याच्या महावाक्यजन्य साक्षात्काररूप ईश्वर ज्ञानानें मुक्तिलक्षण परमात्मशुद्धि होते. असो, या सर्व शुद्धि जशा परमपुरुषार्थास कारण होतात, तशीच वर सांगितलेली कालशुद्धिही परम पुरुषार्थोपयोगिनी आहे,अशा प्रशंसेकरितां भूतात्मादि विशुद्धि येथें सांगितली आहे ३२–३४.

इति आशौचप्रकरणम् १.

---

# अथापद्धर्मप्रकरणम् २.

' कष्टावह आपत्तींत सद्यःशौचाचें विधान केलें आहे, ' म्हणून आपत्तींत मुख्य आशौचकल्पाचें अनुष्ठान करितां येणें शक्य नसल्यामुळें सद्यःशौचादि अनुकल्प सांगून आतां त्याच प्रसंगानें आपत्तींत ' ब्राह्मणाला प्रतिग्रह, याजन व अध्यापन अधिक वृत्तिसाधन आहे.' या वचनानें सांगितलेल्या याजनादि मुख्य वृत्तीचा असंभव झाल्यास दुसरा जीवनोपाय सांगतात—

क्षात्रेण कर्मणा जीवेद्विशां वाप्यापदि द्विजः ।
निस्तीर्य तामथात्मानं पावयित्वा न्यसेत्पथि ॥ ३५ ॥

विप्र कुटुंब मोठें असल्यामुळें आपल्या वृत्तीवर निर्वाह करण्यास असमर्थ झाल्यास त्यानें तसल्या आपत्तींत शस्त्रग्रहण करणें, इत्यादि क्षत्रियाच्या कर्मानें निर्वाह करावा; पण त्यावरही निर्वाह होईनासा झाल्यास वैश्यांच्या वाणिज्यादि कर्मावर निर्वाह करावा. पण त्यांनीं शूद्रवृत्तीचा आश्रय करूं नये. मनूनें ( अ. १० श्लो. ८२ ) तसेंच सांगितलें आहे. त्याचप्रमाणें ' आपत्तींतही हीन वर्णाच्या पुरुषानें ब्राह्मणादि उत्तम वर्णाच्या वृत्तीचा आश्रय करूं नये. तर ब्राह्मणानें क्षत्रियाची वृत्ति, क्षत्रियानें वैश्याची व वैश्यानें शूद्राची अशी प्रत्येकानें आपत्कालीं आपल्या खालच्या वर्णाच्या वृत्तीचा आश्रय करावा. सर्वांत श्रेष्ठ जी ब्राह्मणवृत्ति तिचा आश्रय करूं नये. ' असें वसिष्ठांचें ह्मणणें आहे. शूद्राला उत्कृष्ट ह्मणजे ब्राह्म कर्म व ब्राह्मणाला अपकृष्ट ( शूद्राचें कर्म ) करणें प्रशस्त नव्हे. पण मधल्या दोन वर्णांचें कर्म ( क्षत्रियाचें शस्त्रधारण व वैश्याचें वाणिज्य ) सर्वांस सारखेंच हितकर आहे. आपत्तींत पडलेल्या शूद्रानें वैश्यवृत्तीनें अथवा शिल्पावर निर्वाह करावा. कारण याच ग्रंथांत पूर्वीं तसें सांगितलें आहे. पण मनूनें ( अ. १० श्लोक १०० ) ' ज्या कर्मांच्या योगानें द्विजांची शुश्रूषा केल्यासारखें होतें, तीं कारागिरांची कर्में व विविध शिल्पें यांवर निर्वाह करावा, ' असें सांगितलेलें असल्यामुळें त्याच न्यायानें अनुलोम उत्पन्न झालेल्या लोकांनीही आपत्तींत आपल्या अनन्तर हीन जातीच्या वृत्तीचा आश्रय करावा.

याप्रमाणें आपल्यापेक्षां किंचित् हीन जातीच्या वृत्तीनें आपत्तीचा निस्तार करून व प्रायश्चित्ताच्या योगानें आपल्याला पावन करून घेऊन स्वस्थितींत पुनः स्थिर व्हावें. ( पुनः आपल्या वृत्तीचा आश्रय करावा ) किंवा ' न्यसेत्पथि ' एवढ्याच पदांचा असा अर्थ समजावा. निंद्य वृत्तीनें संपादन केलेलें धन योग्य मार्गांत खर्च करावें. कारण मनूनें ( अ. १० श्लो. १११. ) ' जप, होम, याजन, अध्यापन, यांच्या योगानें केलेलें पाप नाहींसें होतें; आणि प्रतिग्रहनिमित्तक पाप त्यागानें व तपानेंच जातें ' असें ह्मटलें आहे ३५.

आतां वैश्यवृत्तीनें जिवंत राहणाऱ्या ब्राह्मणानें कोणत्या वस्तूंचा विक्रय करूं नये तें सांगतात–

फलोपलक्षौमसोममनुष्यापूपवीरुधः ।
तिलौदनरसक्षारान्दधि क्षीरं घृत जलम् ॥ ३६ ॥
शस्त्रासवमधूच्छिष्टं मधु लाक्षा च बर्हिषः ।
मृच्चर्मपुष्पकुतुपकेशतक्रविषक्षितीः ॥ ३७ ॥
कौशेयनीललवणमांसैकशफसीसकान् ।
शाकार्द्रौषधिपिण्याकपशुगन्धांस्तथैव च ॥ ३८ ॥

बोरें व रिठे, यांस सोडून केळीं इत्यादि फळें ब्राह्मणानें विकूं नयेत. नारदानें ' स्वतः गळून पडलेलीं पानें, फळांतील बोरें व रिठे, दोऱ्या, कापसाचीं वस्त्रें इत्यादि विकार न

पावलेल्या वस्तू यांचा विक्रय ब्राह्मणानें करावा, ' असें म्हणून बोरें व रिंठे विकण्याची अनुज्ञा दिली आहे. माणिक्यादि सर्वप्रकारचे पाषाण, अतसीच्या सूत्राचें ( व मनूनें ( अ० १० श्लो० ८७ ) सांगितलेलें तांतवादि ) वस्त्र, सोमनांवाची लता, कोणत्याही जातीचें मनुष्य, मांडे इत्यादि सर्व प्रकारचें भक्ष्य, वेत, गुळवेल इत्यादि लता, तिळ, सर्व प्रकारचे भोज्य पदार्थ, गुळ, उसाचा रस, साखर इत्यादि रस, सर्व क्षार, दहीं, दूध. तूप, ताक, लोणी, तेल इत्यादि सर्व स्नेह, जल, खड्गादि शस्त्र, सर्वप्रकारचें मद्य, मध, लांख, दर्भ, माती, अजिन, पुष्पें, बकऱ्याच्या केंसाची लुई, चमरीप्रभृति हरणींचे केंस, ताक, विष, व भूमि, रेशमी वस्त्र, नीलीरस, बिड, सैंधव इत्यादि सर्व प्रकारचें लवण, मांस, घोडे, गाढव इत्यादि एकशफवान् प्राणी, शिसें व दुसरेही सर्व खनिज धातु, सर्व प्रकारची शाक—भाजी, आर्द्र ( ओल्या ) औषधि ( फलांचा पाक होतांच नाश पावणाऱ्या शालिप्रभृतींना औषधि म्हणतात. येथें, आर्द्र असें विशेषण दिलेलें असल्यामुळें शुष्क औषधि विकल्यास दोष नाहीं, असें होतें, )पेंड, अरण्यांतील पशु व चंदन, अगुरु इत्यादि गंध, या सर्वांस वैश्यवृत्तीनें निर्वाह करणाऱ्या ब्राह्मणानें कदापि विकूं नये. क्षत्रियादिकांनीं तीं विकल्यास कांहीं दोष नाहीं. म्हणूनच नारदानें—वैश्यवृत्तीनें जीवन करणाऱ्या ब्राह्मणास दूध व दहीं अविक्रेय आहे, असें सांगितलें आहे ३६, ३७, ३८.

आतां वरील निषेधाचाच प्रतिप्रसव सांगतात—

**वैश्यवृत्त्यापि जीवन्नो विक्रीणीत कदाचन ।**
**धर्मार्थं विक्रयं नेयास्तिला धान्येन तत्समाः ॥ ३९ ॥**

अगदीं अवश्यक असलेले पाकयज्ञादि धर्म, त्यांच्या साधनभूत व्रीहिप्रभृती धान्याचा अभाव झाल्यामुळें जर होतनासे झाले तर, त्या धान्याकरितां तिळ विकावे. पण ते जितकें धान्य घ्यावयाचें असेल तितकेच विकावे. अधिक किंवा उणे विकूं नये. मनूनेंही(अ.१० श्लो. ९० )असेंच सांगितलें आहे. पण येथील धर्म हा शब्द अवश्यक औषधादिकांचा उपलक्षक आहे. म्हणूनच नारदानें ' शक्ति नसल्यामुळें ओषधाकरितां व यज्ञाकरितां जर तिळ अवश्य विकावयाचेच झाले तर ते त्यांच्या बरोबर ( अगदीं भारंभार ) धान्य घेऊन विकावे ' असें सांगितलें आहे. पण दुसऱ्या निमित्तानें अथवा अन्य प्रकारानें तिळ विकल्यास मनूनें ' तो विकणारा ब्राह्मण किडा होऊन पितरांसह श्वविष्ठेंत पडतो ' असा प्रत्यवाय सांगितला आहे. पण येथें सांगितलेल्या सजातीय रसादिकांशीं अदलाबदल करतां येते. ( मनु. अ. १० श्लो. ९४ पहा. ) ३९.

पूर्वोक्त निषेधाचें उल्लंघन केल्यास दोष सांगतात—

**लाक्षालवणमांसानि पतनीयानि विक्रये ।**
**पयो दधि च मद्यं च हीनवर्णकराणि तु ॥ ४० ॥**

लाक्षा ( मेंदी ), लवण ( मीठ ) व मांस यांचा विक्रय करूं लागल्यास तीं तत्काल पतित करतात. द्विजातिकर्माची हानि करितात. दूध, दहीं व मद्य यांचा विक्रय केल्यास तीं

हीनवर्णत्व देणारीं आहेत. ( शूद्रतुल्य करणारीं ) आहेत. यावाचून दुसरीं अपण्यें विकल्यास मनूच्या ( अ. १० श्लो. ९२, ९३ ) वचनाप्रमाणें वैश्यतुल्यता प्राप्त होते ४०.

आपद्गतः संप्रगृह्णन् भुञ्जानो वाग्यतस्ततः ।
न लिप्यतैनसा विप्रो ज्वलनार्कसमो हि सः ॥ ४१ ॥

जो निर्धन सर्व कुटुंब उपाशीं मरत असल्यामुळें आपत्तींत पडलेला असतांनाही क्षत्रवृत्तींत अथवा वैश्यवृत्तींत पडत नाहीं तो अतिशय हीन पुरुषांपासून प्रतिग्रह घेऊन त्याचें अन्न खात असला तरी पापानें लिप्त होत नाहीं. कारण त्या आपदवस्थेंत असत्प्रतिग्रहादिकांविषयीं अधिकार दिलेला असल्यामुळें तो अग्नि व सूर्य यांसारखा शुद्ध असतो. अग्नि व सूर्य हीनसंस्कार झाला तरी जसे दूषित होत नाहींत त्याप्रमाणें हा स्वधर्म सोडून परधर्मांत रत न होणारा ब्राह्मण आपत्तींत पडला तरी दूषित होत नाहीं. हेंच येथील दृष्टांत व दार्ष्टान्तिक यांतील साम्य आहे. या श्लोकांत असें सांगणाऱ्या योगीश्वरानें आपत्तींतही परधर्माचा आश्रय करण्यापेक्षां आपल्या कष्टावह धर्मांचें अनुष्ठान करणेंच अधिक श्रेयस्कर आहे, असें सुचविलें. मनूनेंही ( अ. १० श्लो. ९७ ) असेंच सांगितलें आहे ४१.

कृषिः शिल्पं भृतिर्विद्या कुसीदं शकटं गिरिः ।
सेवानूपं नृपो भैक्ष्यमापत्तौ जीवनानि तु ॥ ४२ ॥

येथें ' आपत्तौ जीवनानि ' असें विशेषण योजलेलें असल्यामुळें आपत्ति नसलेल्या अवस्थेंत कृष्यादिकांतील ज्या वृत्तीचा ज्यास उद्देशून निषेध केलेला आहे त्या वृत्तीची त्याला या वचनानें अनुज्ञा देतात. जसें-ब्राह्मण व क्षत्रिय यांना वैश्यवृत्ति व स्वतः केलेली शेती यांची अनुज्ञा दिली आहे. त्याचप्रमाणें शिल्पादिकांचीही अनुज्ञा देतात. स्वयंपाक करणें, इत्यादि शिल्प, सेवा, वेतन घेऊन शिकविणें, इत्यादि विद्या, धन स्वतः व्याजीं लावणें, ( व त्या व्याजावर निर्वाह करणें ),धान्यादि वाहून नेण्याकरितां भाड्याची गाडी ठेवणें व तिच्यापासून उत्पन्न झालेल्या भाड्यावर निर्वाह करणें, दुसऱ्याच्या चित्तानुसार आचरण करणें, जेथें पुष्कळ गवत, वृक्ष व जल आहे, अशा अनूपप्रदेशीं वास करणें, राजापाशीं याचना करणें व स्नातकानेंही भिक्षान्नावर निर्वाह करणें, हीं आपत्तींतील जीवनसाधनें आहेत. मनूनेंही ' विद्या शिल्पं भृतिः० ' ( अ० १० श्लो. ११६ ) या श्लोकांत असेंच सांगितलें आहे ४२.

पण येथें सांगितलेल्या कृष्यादि जीवनोपायाचाही जेव्हां असंभव असतो तेव्हां कसें जीवन करावें तें सांगतात--

बुभुक्षितस्त्र्यहं स्थित्वा धान्यमब्राह्मणाद्धरेत् ।
प्रतिगृह्य तदाख्येयमभियुक्तेन धर्मतः ॥ ४३ ॥

धान्याचा सर्वथा अभाव झाल्यास बुभुक्षित होऊन ( उपाशीं, कांहीं न खातां ) तीन दिवस रहावें. व नंतर अब्राह्मणापासून म्हणजे शूद्रापासून, त्याच्या अभावीं वैश्यापासून व वैश्याच्या-

ही अभावीं कर्महीन क्षत्रियापासूनही एक दिवस पुरेल इतकें धान्य ( न विचारतांच ) घ्यावें. त्याचा अपहार करावा. आणि हरण केल्यावर त्या धान्यादिकांच्या स्वामीनें तूं हें माझें धान्यादि हरण कां केलेंस ? असें विचारल्यास तें धर्मतः निवेदन करावें. ( मी तुझें अमुक धान्य चोरलें आहे, असें खरें—खरें सांगावें. ) मनूनें ' खलात्क्षेत्रात्० ' ( अ० ११ श्लो. १७ ) यांत असेंच म्हटलें आहे ४३.

आपद्धर्मप्रसंगानें आतां हें आणखी एक राजास उद्देशून विधान करितात--

**तस्य वृत्तं कुल शीलं श्रुतमध्ययनं तपः ।**
**ज्ञात्वा राजा कुटुंबं च धर्म्यां वृत्तिं प्रकल्पयेत् ॥ ४४ ॥**

जो क्षुधेनें व्याकुळ होऊन दुःख भोगीत राहतो, त्याचें आचरण, कुल, शील, आत्मगुण, शास्त्रश्रवण, वेदाध्ययन व कृच्छ्रादि तप यांचें चांगलें परीक्षण करून राजानें त्याच्या धर्म्यवृत्तीची योजना करावी. नाहींतर त्याचें राष्ट्र दुःखी होतें. असें मनूनें ' यस्य राज्ञस्तु विषये० ' ( अ. ७ श्लोक १३४ ) या श्लोकांत सांगितलें आहे ४४.

इति आपद्धर्मप्रकरणम् २.

---

# अथ वानप्रस्थधर्मप्रकरणम् ३.



चारप्रकारच्या आश्रमवानांतील ब्रह्मचारी व गृहस्थ यांचे धर्म सांगितले. आतां अवसरप्राप्त वानप्रस्थाश्रमींच्या धर्मांचें प्रतिपादन करण्यासाठीं म्हणतात--

**सुतविन्यस्तपत्नीकस्तया वानुगतो वनम् ।**
**वानप्रस्थो ब्रह्मचारी साग्निः सोपासनो व्रजेत् ॥ ४५ ॥**

वनांत आधिक्यानें व नियमानें जो वास करितो तो वानप्रस्थ ( अर्थात् वनांत जाण्याची इच्छा करणारा ) त्यानें ' तूं अशा अशा रीतीनें हिचें भरण करावेंस ' असें सांगून पत्नीला पुत्राच्या स्वाधीन करावें. पण पतीची परिचर्या करण्याची इच्छा असल्यामुळें ती पतीबरोबर वनांत जाण्याचा अभिलाष करीत असल्यास तिलाही न्यावें. त्याचप्रमाणें त्या ऊर्ध्वरेत्यानें वैतानाग्नि ( त्रेताग्नि ) व गृह्याग्नि यांस बरोबर घेऊन वनांत जावें. ' सुतविन्यस्तपत्नीक ' या वचनानें, ज्यानें गृहस्थधर्म यथाविधि केला आहे असा पुरुषच वनवासाचा अधिकारी आहे असे सुचविलें. आश्रमाच्या समुच्चयपक्षाचा अंगीकार करून हें सांगितलें आहे. नाहींपेक्षां ' अविप्लुतब्रह्मचर्यो यमिच्छेत्तमावसेत् ' या वचनाप्रमाणें गृहस्थधर्म न करितांच ब्रह्मचारी वनवासाचा अधिकारी झालाच असता. असो; येथें सांगितलेला हा वनप्रवेश ज्याचें शरीर जरेनें जर्जर झालें आहे व ज्याला नातु झाला आहे त्याच्यासाठींच आहे.

( मनु. अ. ६ श्लो. २ पहा. ) भार्येला पुत्राच्या स्वाधीन करण्याविषयीं जें सांगितलें आहे तें ज्याची पत्नी जिवंत असेल त्याच्याविषयींच समजावें. कारण आपस्तंबादिकांनीं ज्याची भार्या मरण पावली असेल त्यानें वनवासाचा अंगीकार करावा, असें सांगितलें आहे. यास्तव अग्निहोत्रासह भार्येला जाळून पुनराधान करण्याविषयीं जें सांगितलें आहे तें ज्याचे कामादि चित्तदोष क्षीण झाले नसतील त्याच्याविषयीं आहे, असें जाणावें. ' साग्निः ' व ' सोपासनः ' असें जें म्हटलें आहे तेंही अर्धाधान केलेलें असल्यास ( म्ह. श्रौत व स्मार्त अग्निकार्य पृथक् करीत असल्यास ) दोन्ही अग्नि घेऊन व सर्वाधान केलेलें असल्यास (दोन्ही अग्नींची एककृति करीत असल्यास,) नुस्ता एक श्रौताग्नि घेऊनच असें सुचविण्यासाठीं आहे. पण ज्येष्ठ भ्राता किंवा पिता अनाहिताग्नि असल्यामुळें श्रौताग्नीचें आधान केलेलें नसल्यास त्यानें केवल उपासनाग्नीसह जावें. अग्नीच्या योगानेंच संपादन होणाऱ्या अग्निहोत्रादि कर्मांची सिद्धि होण्यासाठीं हा अग्नि न्यावयाचा असतो. ( याविषयीं मनु. अ. ६ श्लो. ९ पहा. )

**शंका**—अहो पण ज्यानें भार्येला पुत्रापाशीं ठेवलें आहे त्याला वनांत गेल्यावर अग्निहोत्रादिकांचें अनुष्ठान कसें करितां येईल ? कारण ' पत्न्यासह यष्टव्यं ' असा सहाधिकाराचा नियम आहे.

**समाधान**—खरें आहे. पण ज्या अर्थीं पत्नीला पुत्रापाशीं ठेवण्याचा विधि आहे त्या अर्थीं त्याच्या बलानेंच पत्नीवांचूनहीं वनांत अग्निहोत्राचा अधिकार असतो, अशी कल्पना होते. शिवाय ' यस्य व्रत्येऽहनि पत्न्यनालम्भुका स्यात्तामवरुध्य यजेत ' असें वचन असल्यामुळें पत्नी रजस्वला झाल्यास तिचा अवरोध करून होम करावा. असा अवरोधविधि निश्चित होतो व त्याच्या बलानेंच पत्नीची निरपेक्षता सिद्ध होते. किंवा वनांत जावयास निघालेल्याच पतीला भार्या यागाचें अनुमोदन देते. त्यामुळें कांहीं विरोध येत नाहीं. वनांत जावयास निघालेला ब्रह्मचारी किंवा विधुर ( ज्याची भार्या मेली आहे तो ) यांच्या अग्निहोत्राचा जसा लोप होतो तसाच भार्येचा पुत्रापाशीं निक्षेप करून जाणाऱ्या वानप्रस्थाच्या अग्निहोत्राचाही लोप होतो, अशी शंका घेऊं नये. कारण कोणत्याही प्रकारच्या विकल्पावाचून त्याचें विधान केलेलें आहे. ब्रह्मचारी व विधुर यांनाही अग्निसाध्य कर्मांचा अधिकार नाहींच असें म्हणतां येत नाहीं. कारण पांचव्या महिन्यानंतर श्रावणाग्नीचें ज्यांनीं आधान केलें आहे अशा त्यांचा ( ब्रह्मचारी व विधुर यांचा ) अग्निसाध्य कर्मांत अधिकार असतो. कारण वसिष्ठानें ' वानप्रस्थानें जटा वाढवून, चीर ( चिंधी ) व अजिन यांचें परिधान करून नांगरलेल्या शेतावर निवास करूं नये. भूमि नांगरल्यावाचूनच उत्पन्न झालेल्या फळमूळांवर निर्वाह करावा. त्यानें ऊर्ध्वरेता व्हावें. भूमीवर शयन करावें. इतरांस कांहीं यथाशक्ति द्यावें;पण स्वतः परिग्रह करूं नये. पांच महिन्यानंतर वैदिक मार्गानें अग्नीचें आधान करून व झाडाच्या मुळाशीं राहून देव, पितर व मनुष्य ( अतिथि इत्यादि ) यांस हव्यादि द्यावें. असें आचरण करणारा आनन्त्य स्वर्गास प्राप्त होतो, ' असें सांगितलें आहे ४५.

'साग्निःसोपासनो व्रजेत्०' हें विधान अग्निसाध्य श्रौत-स्मार्त-कर्मानुष्ठानार्थ आहे, असें वर सांगितलें. आतां गुणविधि सांगतात—

**अफालकृष्टेनाग्नींश्च पितॄन्देवातिथीनपि ।**
**भृत्यांश्च तर्पयेत् श्मश्रुजटालोमभृदात्मवान् ॥ ४६ ॥**

न नांगरलेल्या क्षेत्रांत उत्पन्न झालेल्या धान्याच्या योगानें अग्नीचें तर्पण करावें. (अग्निसाध्य कर्में करावीं). भिक्षादानही त्याच्याच योगानें करावें. त्याचप्रमाणें पितर, देव, अतिथि व इतर भूतें यांस पूर्वोक्त मार्गानेंच तृप्त करावें. भृत्य (पोषण करण्यास योग्य असलेले जन व आश्रमांत आलेले) यांस तेंच धान्य द्यावें. याप्रमाणें पंचमहायज्ञ करून स्वतः त्याच धान्यादिकांचा अवशेष भक्षण करावा. मनूनें (अ. ६ श्लो. ७) यांत तसेंच सांगितलें आहे. भोजन व याग यांकरितां मुन्यन्नाचा नियम केलेला असल्यामुळें ग्राम्य आहाराचा त्याग अर्थातच सिद्ध होतो. दर्शपूर्णमासादिकांस लागणारे व्रीहि-यवादिकही न नांगरलेल्या क्षेत्रांतीलच घ्यावे. एवढ्यासाठींच मनूनें (अ. ६ श्लो. ११) 'वसन्त किंवा शरत् ऋतूंत झालेल्या, मेध्य व स्वतः आणलेल्या मुनींच्या अन्नानें पुरोडाश व चरु यथाविधि पृथक् समर्पण करावे,' असें म्हटलें आहे. नीवारादि आपोआप उत्पन्न झालेलें मुन्यन्न स्वभावतःच मेध्य (मेधास-यज्ञास योग्य) असलें तरी पुनः 'मेध्य' असें यज्ञार्ह व्रीह्यादिकांची प्राप्ति होण्यासाठीं म्हटलें आहे. त्याचप्रमाणें श्मश्रु (तोंडावरील केस), जटा व खाकेंतील केंस यांस धारण करावें. तसेंच त्यानें आत्मोपासनेमध्यें अभिरत असावें ४६.

आतां पूर्वोक्त द्रव्याच्या संचयाविषयीं नियम सांगतात—

**अह्नो मासस्य षण्णां वा तथा संवत्सरस्य वा ।**
**अर्थस्य संचयं कुर्यात्कृतमाश्वयुजे त्यजेत् ॥ ४७ ॥**

एका दिवसाच्या भोजन-याजनादि दृष्टार्थ व अदृष्टार्थ कर्मास पुरेल इतका धनसंचय करावा. अथवा एका महिन्याच्या, सहा महिन्याच्या व एका वर्षाच्या कर्मास पुरेल इतका संचय करावा. याहून अधिक संचय करूं नये. पण असा नियमित संचय करीत असतांनाही जर कांहीं कारणानें तो वाढला तर नियमापेक्षां अधिक वाढलेला संचय आश्विन महिन्यांत देऊन टाकावा ४७.

**दान्तस्त्रिषवणस्नायी निवृत्तश्च प्रतिग्रहात् ।**
**स्वाध्यायवान्दानशीलः सर्वसत्वहिते रतः ॥ ४८ ॥**

दर्परहित, प्रातर्, मध्याह्न व अपराह्णसमयीं स्नान करणारा, प्रतिग्रह, याजन इत्यादिकांपासून पराङ्मुख झालेला, वेदाभ्यासामध्यें रत झालेला, फल-मूळादिकांचें भिक्षादान करणारा, व सर्व प्राण्यांचें हित करण्यांतच निरत, असें त्यानें व्हावें ४८.

दन्तोलूखलिकः कालपक्वाशी वाश्मकुट्टकः ।
श्रौतं स्मार्तं फलस्नेहैः कर्म कुर्यात्तथा क्रियाः ॥ ४९ ॥

ज्याचे दांत हेंच उखल ( धान्यादिकांवरील तुष-साल काढण्याचें साधन ) आहे, कालानेंच पक्व झालेल्या-नीवार, वेणु, सावे इत्यादि व बोरें, आंबे इत्यादि-फळांचा आहार करणारा, ( अथवा मनूनें सांगितल्याप्रमाणें अग्नीवर शिजलेलेंही खाणारा ) किंवा दगडावर कुटून खाणारा. असें त्यानें व्हावें. त्याचप्रमाणें श्रौत-स्मार्त कर्म व भोजन, अंगास लावणें-अभ्यंजन-इत्यादि क्रिया मेध्य वृक्षाच्या फळापासून काढलेल्या स्नेहद्रव्यांनीं कराव्या. घृतादिकांनीं करूं नयेत ४९.

पुरुषार्थाकरितां सांगितलेल्या दोनवेळ भोजनाची निवृत्ति करण्याच्या उद्देशानें म्हणतात-

चान्द्रायणैर्नयेत्कालं कृच्छ्रैर्वा वर्तयेत्सदा ।
पक्षे गते वाप्यश्नीयान्मासे वाहनि वा गते ॥ ५० ॥

पुढें सांगितलेल्या चांद्रायणादिलक्षण व्रतांनीं काल घालवावा. अथवा कृच्छ्रांच्या योगानें निर्वाह करावा. किंवा पंधरा दिवसांचा पक्ष झाला असतां भोजन करावें. अथवा एक महिना झाल्यावर जेवावें. किंवा दिवस संपल्यावर रात्रीं भोजन करावें. श्लोकांतील अपिशब्दानें मनूनें ( अ. ६ श्लो. १९ )सांगितलेल्या दिवसाचा चतुर्थकाल इत्यादिकांचें ग्रहण करावें. या कालनियमांच्या अनेक पक्षांचा शक्त्यनुसार विकल्प समजावा. ( ह्म. आपल्या शक्तीप्रमाणें यांतील एका पक्षाचा अंगीकार करावा ) ५०.

स्वप्याद्भूमौ शुची रात्रौ दिवा संप्रपदैर्नयेत् ।
स्थानासनविहारैर्वा योगाभ्यासेन वा तथा ॥ ५१ ॥

आहार व विहार यांस लागणाऱ्या वेळेवाचून बाकीच्या वेळीं रात्रीं शुद्ध होऊन निजावें; बसूं किंवा उभें राहूं नये. दिवसा निजणें, हे पुरुषार्थोपयोगी नसल्यामुळें त्याचा निषेध पूर्वीच व सर्वांकरितां झालेला आहे. यास्तव हें वचन दिवास्वापाची निवृत्ति करीत नाहीं. त्याचप्रमाणें उघड्या भूमीवरच शयन करावें. शय्येवर किंवा मंचकावर निजूं नये. सर्व दिवस फिरण्यांत घालवावा.अथवा कांहीं काल फिरण्यांत व कांहीं वेळ आसनावर बसण्यांत घालवावा किंवा योगाभ्यासानें दिवस व्यतीत करावा. मनूनेंही ' विविधाश्चौपनिषदीरात्मसंसिद्धये श्रुतीः ' (अ. ६ श्लो. २९ ) म्ह. आत्मसंसिद्धीकरितां ( ब्रह्मत्वप्राप्तीकरितां ) नानाप्रकारच्या उपनिषदांतील श्रुतींचा अभ्यास करावा, असें सांगितलें आहे. तसेंच ' भूमीवर लोळत किंवा पादाग्रावर उभें राहून दिवस घालवावा, ' असेंही त्यानें म्हटलें आहे ५१.

ग्रीष्मे पञ्चाग्निमध्यस्थो वर्षासु स्थण्डिलेशयः ।
आर्द्रवासास्तु हेमन्ते शक्त्या वापि तपश्चरेत् ॥ ५२ ॥

संवत्सर ग्रीष्म, वर्षा व हेमन्त या तीन ऋतूंचा होतो, असें वचन असल्यामुळें येथील ग्रीष्मशब्दानें चैत्रादि चार महिने घ्यावे. त्या चार महिन्यांत चार दिशेंतील चार व वरून आदित्य, अशा पांच अग्नींच्या मध्यें रहावें. तसेंच वर्षाकालीं म्हणजे श्रावणादि चार महिन्यांत स्थंडिलावर शयन करावें. ( म्ह. वर्षावाच्या धारांचें निवारण करितां न येण्यासारख्या भूतलावर रहावें. ) हेमंतांत म्हणजे मार्गशीर्षादि चार महिन्यांत ओलें वस्त्र नेसून रहावें. पण अशाप्रकारचें तपश्चरण करण्यास जो असमर्थ असेल त्यानें आपल्या शक्त्यनुसार तप करावें. सारांश, जशा रीतीनें शरीराचा शोष होईल तसा यत्न करावा. मनूनेंही(अ.६ श्लो २४) शरीरशोषण करण्याविषयीं सांगितलें आहे ५२.

**यः कण्टकैर्वितुदति चन्दनैर्यश्च लिम्पति ।**
**अक्रुद्धोऽपरितुष्टश्च समस्तस्य च तस्य च ॥ ५३ ॥**

जो कोणी कांटे इत्यादि टोंचून अंगास नानाप्रकारें, पीडा देतो त्याच्यावर न रागावणारा व जो अंगास चंदनादिकांच्या उटण्या लावितो व सुख देतो त्यावर प्रसन्न न होणारा, असें वानप्रस्थानें व्हावें. अर्थात् पीडा देणारा व सुख देणारा या दोघांविषयींही समभाव धरून उदासीन असावें ५३.

अग्निपरिचर्या करण्यास असमर्थ असलेल्या विषयीं सांगतात—

**अग्नीन्वाप्यात्मसात्कृत्वा वृक्षावासो मिताशनः ।**
**वानप्रस्थगृहेष्वेव यात्रार्थं भैक्ष्यमाचरेत् ॥ ५४ ॥**

अग्नीचा आत्म्यामध्यें समारोप करून, वृक्ष हाच ज्याचा आवास ( कुटी ) आहे, असें त्यानें व्हावें. त्यानें आपलें भोजन मित ( अगदीं परिमित ) करावें. फळें, मुळें, इत्यादि भक्षण करावें. ( मनु. अ. ६ श्लो. २५ पहा ) मुनींचें व्रत धारण करून फळें व मूळें यांचा असंभव झाल्यास प्राण धारण होईल इतकें भिक्षान्न वानप्रस्थांच्या घरांतून भिक्षा मागून मिळवावें ५४.

पण त्याचाही असंभव झाल्यास अथवा व्याधि इत्यादि निमित्तानें भिक्षा मागण्याचें सामर्थ्य नाहींसें झाल्यास, काय करावें तें सांगतात—

**ग्रामादाहृत्य वा ग्रासानष्टौ भुञ्जीत वाग्यतः ।**

एखाद्या जवळच्या गांवांतून भैक्ष्य ( भिक्षान्न ) आणून व मौन धरून आठ ग्रास खावे. ग्राम्यभैक्ष्याचें विधान केलेलें असल्यामुळें मुन्यन्नाविषयींचा नियम अर्थातच लुप्त झाला. पण आठ ग्रासांनीं प्राणधारण संभवत नाहीं. असें झाल्यास ‘ अष्टौ ग्रासा मुनेर्भैक्ष्यं वानप्रस्थस्य षोडश ’ हा सोळा ग्रासांचा दुसऱ्या स्मृतींत सांगितलेला कल्प घ्यावा.

आतां सकल अनुष्ठान करण्यास समर्थ असलेल्या विषयीं सांगतात—

**वायुभक्षः प्रागुदीचीं गच्छेद्वा वर्ष्मसंक्षयात् ॥ ५५ ॥**

अथवा वायु हाच ज्याचा भक्ष आहे, अशा वानप्रस्थानें ईशान्य दिशेकडे जावें. शरीर पडेपर्यंत,त्याचा क्षय होईतों, सरळ गतीनें जावें.पण हें महाप्रस्थान करण्यास जो असमर्थ असेल त्यानें भृगुपतनादिक करावें. (भृगु म्हणजे पर्वताचा तुटलेला कडा,त्यावरून पतन-घालवून घेणें, यास भृगुपतन म्हणतात.) कारण, 'वानप्रस्थो वीराध्वानं ज्वलनाम्बुप्रवेशनं भृगुपतनं वानुतिष्ठेत्' असें स्मृतिवचन आहे. ब्रह्मचारि-प्रकरणादिकांत सांगितलेल्या धर्मांतील स्नानाचमनादि जे धर्म याच्या आश्रमधर्माच्या विरोधी नसतील ते यालाही अनुष्ठेय आहेत.याप्रमाणें पूर्वोक्त सर्व धर्मांचें अनुष्ठान करणारा वानप्रस्थ ब्रह्मलोकीं पूज्य होतो. ( मनु अ. ६ श्लो. ३२ पहा. ) येथील ब्रह्मलोक म्हणजे एक विशेष स्थान समजावें. नित्य ब्रह्म समजूं नये. कारण नित्य ब्रह्माबरोबर लोक शब्दाचा प्रयोग होत नाहीं व चतुर्थाश्रमावाचून मुक्तीचा अंगीकार केलेला नाहीं. 'योगाभ्यासेन वा पुनः' असें म्हणून ब्रह्मोपासनेचें विधान केलेलें असल्यामुळें त्याच्या योगानें ब्रह्मभावापत्ति होईल. अशी शंका घेऊं नये. कारण ती उपासना सालोक्यादि प्राप्त्यर्थ आहे, असें म्हटल्यानेंही त्या उपासनाविधीची उपपत्ति लागते. एवढ्यासाठींच 'त्रयो धर्मस्कन्धाः' असा आरंभ करून यज्ञ, अध्ययन व दान हा प्रथम धर्मस्कंध, तप हाच दुसराव आचार्यकुलवासी मरेपर्यंत आचार्यांच्याच येथें राहणारा हा तिसरा असें म्हणून गार्हस्थ्य, वानप्रस्थ व नैष्ठिक यांचें स्वरूप सांगितल्यावर श्रुतीनें 'सर्व एते पुण्यलोका भवन्ति' या वचनानें त्या तिन्ही आश्रमवानांना पुण्यलोकप्राप्ति हें फल सांगितलें व 'ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति' या वचनानें बाकी राहत असलेल्या ब्रह्मनिष्ठ संन्याशाला मुक्तिलक्षण अमृतत्वप्राप्ति सांगितली आहे. आतां 'श्राद्धकृत्सत्यवादी च गृहस्थोऽपि विमुच्यते' या वचनानें श्राद्ध करणारा व सत्यवादी गृहस्थही मुक्त होतो असें म्हणून गृहस्थाच्या मोक्षाचेंही जें प्रतिपादन केलें आहे तें ज्यानें अन्य जन्मीं पारिव्राज्याचा अनुभव घेतलेला आहे, त्या गृहस्थाविषयीं आहे, असें समजावें ५५.

इति वानप्रस्थधर्मप्रकरणम् ३.

---

# अथ यतिधर्मप्रकरणम् ४.



वैखानसांच्या धर्माचें वर्णन करून आतां क्रमप्राप्त पारिव्राजकधर्म सांगतात—

वनाद्गृहाद्वा कृत्वेष्टिं सार्ववेदसदक्षिणाम् ।
प्राजापत्यां तदन्ते तानग्नीनारोप्य चात्मनि ॥ ५६ ॥
अधीतवेदो जपकृत्पुत्रवानन्नदोऽग्निमान् ।
शक्त्या च यज्ञकृन्मोक्षे मनः कुर्यात्तु नान्यथा ॥ ५७ ॥

तीव्रतपाच्या योगानें शरीर शुष्क होऊन विषयपरिपाक होईतों व पुनः मदाचा उद्भव होण्याची शंकाही येणार नाहीं, असें होईतों वनवास करून त्यानंतर मन मोक्षामध्यें लावावें. या श्लोकांत 'वनात्' व 'गृहात्' असें जरी म्हटलें आहे तरी वन व गृह यांवरून आश्रमांची लक्षणा होते व मोक्षशब्दानें मोक्ष हेंच एक ज्याचें फळ आहे तो चतुर्थाश्रम घ्यावा. अथवा 'गार्हस्थ्यानंतर मन मोक्षांत लावावें.' या विधानानें पूर्वोक्त चतुराश्रमांचा समुच्चयपक्ष ( म्हणजे पूर्वी ब्रह्मचारी, नंतर गार्हस्थ्य, त्यानंतर वानप्रस्थ आणि शेवटीं संन्यास अशा प्रकारचा समुच्चयपक्ष ) नित्य नसून पाक्षिक ( वैकल्पिक ) आहे, हें व्यक्त केलें आहे. कारण जाबालश्रुतींत 'ब्रह्मचर्य समाप्त करून गृही व्हावें, गृही होऊन वनी व्हावें, व वनी होऊन संन्यास करावा. किंवा दुसऱ्याही रीतीनें म्हणजे ब्रह्मचर्यांतूनच परिव्रजन ( संन्यास ) करावें. किंवा गृहांतून अथवा वनांतून संन्यास करावा.' असें म्हणून आश्रमांचा विकल्प स्पष्टपणें सांगितला आहे. तसाच गौतमानें 'ऐकाश्रम्यं त्वाचार्याः प्रत्यक्षविधानाद्गार्हस्थ्यस्य' असें म्हणून गार्हस्थ्याच्या पुढच्या आश्रमाचा बाध दाखविला आहे. यास्तव समुच्चय, विकल्प व बाध या तिन्ही पक्षांना श्रुतीचा आधार असल्यामुळें इच्छेप्रमाणें अनुष्ठान करावें. कांहीं पंडितंमन्य 'नैष्ठिकत्वादिकांना स्मार्तत्व असल्यामुळें श्रौत गार्हस्थ्यानें त्यांचा बाध होतो. यास्तव गार्हस्थ्याचा ज्यांना अधिकार नाहीं, अशा अंध-क्लीबादिकांकरितां ते इतर आश्रम आहेत,' असें म्हणतात; पण तें त्यांचें म्हणणें स्वाध्यायाध्ययनाभावामुळें ( म्हणजेच अज्ञानमूलक ) आहे. यास्तव त्याची उपेक्षा करणेंच उचित होय. शिवाय पंगु व अंध विष्णुक्रमण, आज्यावेक्षण इत्यादि करण्यास असमर्थ असल्यामुळें त्यांचा श्रौतकर्मामध्यें जर अधिकार नाहीं तर उदकुंभ भरून आणणें, भिक्षा मागणें इत्यादि कर्मांत अयोग्य असलेल्या त्या ( पंगु, अंध इत्यादिकां )चा नैष्ठिकादि स्मार्त आश्रमकर्मांत तरी अधिकार कसा असणार? व तो जर शक्य नाहीं तर त्यांच्याकरितां म्हणून नैष्ठिकादि आश्रमांचा निर्वाह कसा होणार?

असो; या चतुर्थाश्रमाचा अधिकार केवल ब्राह्मणालाच आहे. मनूनेंही 'आत्मन्यग्नीन्समारोप्य ब्राह्मणः प्रव्रजेद्गृहात्' (अ.६ श्लो.२५)व'एष वोऽभिहितो धर्मो ब्राह्मणस्य चतुर्विधः' ( अ. ६ श्लो. ९७ ) अशा उपक्रमोपसंहारानें ब्राह्मणाच्या अधिकाराचेंच प्रतिपादन केलें आहे. 'ब्राह्मणाः प्रव्रजन्ति' अशी श्रुति असल्यामुळेंही ब्राह्मणांचाच प्राव्राज्यामध्यें अधिकार आहे. केवल द्विजाचा नाहीं. दुसरे कित्येक, प्रकरण व 'वेदमधीत्य चत्वार आश्रमाः' असें सूत्र यांच्या बलावर सर्व द्विजांना चारी आश्रमांचा अधिकार आहे, असें म्हणतात. असो; तो ब्राह्मण वनाश्रमांतून व गृहाश्रमांतून जेव्हां प्रव्रजन करतो तेव्हां सर्व वेदसंबंधी दक्षिणा जिची आहे, त्या प्रजापति देवताक इष्टीचें अनुष्ठान करून शेवटीं त्या वैतान अग्नींचा श्रुत्युक्त विधानानें आत्म्याचे ठायीं समारोप करावा. बौधायनानें 'उदगयन असतां, पौर्णिमेच्या दिवशीं प्रथम पुरश्चरण करून शुद्ध शरीरानें आठ किंवा बारा श्राद्धें करावींत.' असें सांगितलेलें असल्यामुळें आरंभीं पुरश्चरणादिक करावें. तसेंच ज्यानें वेदाचें अध्ययन केलें आहे, जो जपपरायण असतो, ज्याला पुत्र झालेला आहे, ज्यानें दीन, अंध, कृपण इत्यादिकांस धन-

दिलें आहे, ज्यानें यथाशक्ति अन्नदान केलें आहे अशा पुरुषानें ज्येष्ठभ्रात्यानें अग्न्याधान न करणें, इत्यादि प्रतिबंध नसल्यास आधान व नित्य नैमित्तिक यज्ञांचें अनुष्ठान करून मग चतुर्थाश्रमांत प्रवेश करावा, त्यावाचून करूं नये. या वचनानें ज्यानें तीन ऋणांचें निराकरण केलेलें नाहीं त्याचा प्रव्रज्ये ( संन्यासा )मध्यें अधिकार नाहीं, असें दाखविलें आहे. ( म्ह. ज्यानें देव, ऋषि व पितर यांच्या जन्मतःच प्राप्त ऋणांचें यज्ञ, अध्ययन व संतति यांच्या योगानें निराकरण केलेलें नसतें त्याला संन्यासाचा अधिकार नाहीं. ) मनूनेंही ‘ ऋणानि त्रीण्यपाकृत्य मनो मोक्षे निवेशयेत्। अनपाकृत्य मोक्षं तु सेवमानो व्रजत्यधः ’ ( अ. ६ श्लो. ३५ ) असें म्हटलें आहे. पण जेव्हां पुरुष ब्रह्मचर्यापासूनच एकदम संन्यास करितो तेव्हां त्याला प्रजोत्पादनाचा नियम नाहीं. कारण ज्यानें स्त्रीपरिग्रह केलेला नसतो त्याचा पुत्रोत्पादनामध्यें अधिकारच नसतो. शिवाय स्त्रीपरिग्रह, पुत्रोत्पादन इत्यादि हीं कर्में रागप्रयुक्त प्राप्त असतात. ज्याच्या मनांत त्याविषयीं स्नेह नसतो त्याचा त्यांत अधिकार असणें संभवत नाहीं. ऋणत्रयापकरणविधीच स्त्रीपरिग्रहाची प्राप्ति करून देतो, असेंही म्हणणें योग्य नव्हे. कारण विद्या, धनार्जन इत्यादिकांप्रमाणें स्त्रीपरिग्रहाविषयींही आप्तांकडून प्रेरणा होणें संभवनीय असल्यामुळें तो ( विधि ) स्त्रीपरिग्रहाचा आक्षेपक ( प्रापक ) होऊं शकत नाहीं. आतां ‘ जायमानो वै ब्राह्मणस्त्रिभिर्ऋणवा जायते० ’ इत्यादि श्रुतीप्रमाणें पाहिल्यास उत्पन्न होणाऱ्या प्रत्येकाला प्रजोत्पादनादिक आवश्यक आहेत, असें कोणी म्हणेल, पण तें बरोबर नव्हे. कारण कोणीही जन्म होतांच अग्नि व स्त्री यांचा परिग्रह करीत नाहीं. यास्तव वरील श्रुतिवचनाचा अर्थ अधिकारी होणाऱ्या ब्राह्मणादिकानें यज्ञादि करावे, असा करावा. म्हणजे—ज्याचें उपनयन झालें आहे त्याला वेदाध्ययन अवश्य आहे. ज्यानें अग्नि व स्त्री यांचा परिग्रह केला आहे त्याला यज्ञ व प्रजोत्पादन अवश्य आहे, असें निर्दोषपणानें सिद्ध होईल ५६, ५७.

याप्रमाणें संन्यासाच्या अधिकाऱ्याचें निरूपण करून आतां त्याचे धर्म सांगतात—

**सर्वभूतहितः शान्तस्त्रिदण्डी सकमण्डलुः ।**
**एकारामः परिव्रज्य भिक्षार्थी ग्राममाश्रयेत् ॥ ५८ ॥**

प्रिय व अप्रिय करणाऱ्या सर्व भूतांविषयीं उदासीन, ( हिताचरण करणारा नव्हे ) कारण ‘ हिंसा व अनुग्रह यांस न करणारा ’ असें गौतमाचें वचन आहे. शांत ( बाह्य व आंतर इंद्रियांस अक्षुब्ध ठेवणारा ), त्रिदण्डी, तीन वेळूचे दंड हातांत घेणारा, ( कारण, प्राजापत्य इष्टीनंतर तीन वेळूचे मस्तकाबरोबर उंच दंड उजव्या हातांत घ्यावे व डाव्या हातांत उदकयुक्त कमंडलु धरावा, असें स्मृतिवचन आहे. ) किंवा ‘ एकदण्डी त्रिदण्डी वा ’ असें बौधायनाचें स्मरण असल्यामुळें एक दंडच घ्यावा. चतुर्विंशतिमतांतही ‘ पुरुषानें ब्रह्मविद्यापरायण होऊन चतुर्थाश्रमास प्राप्त व्हावें. एकदंडी किंवा त्रिदंडी व सर्वसंगरहित असावें ’ असें म्हणून दंडांचा विकल्प सांगितला आहे. शिखाधारणही वैकल्पिक आहे. कारण ‘ मुण्डः शिखी वा ’ असें गौतमाचें व ‘ मुण्डोऽममोऽक्रोधोऽपरिग्रहः ’ असें वसिष्ठाचें स्मरण आहे. यज्ञोपवीत धारण करण्याविषयींही विकल्प आहे. कारण ‘ सशिखान्केशान्निकृन्त्य विसृज्य

यज्ञोपवीतं ' असें काठक श्रुतिवचन आहे. ' कुटुम्बं पुत्रदारांश्च वेदाङ्गानि च सर्वशः । केशान् यज्ञोपवीतं च त्यक्त्वा गूढश्चरेन्मुनिः ' असें बाष्कलवचन आहे व अशींच आणखीं अन्य वचनेंही आहेत. ( शीत सहन करण्याचें सामर्थ्य नसल्यास कन्थाही घ्यावी. कारण देवलानें ' काषायी मुण्डः० ' इत्यादि वचनांत ' पवित्रपादुकासनकन्थामात्रः ' असें म्हटलें आहे. शौचादिकांकरितां कमंडलु अवश्य जवळ बाळगावा. **एकारामः**-दुसरे संन्यासी व संन्यासिनी स्त्रिया यांनीं रहित, ' स्त्रीणां चैके ' असें म्हणून बौधायनानें स्त्रियांनाही संन्यासाचा अधिकार सांगितला आहे. यक्षानेंही ' वर सांगितल्या प्रकारचा एकच यति हा भिक्षु होय. तेच दोघे झाले कीं त्यांचें जोडपें होतें. तीन भिक्षु म्हणजेच तो ग्राम बनतो आणि त्यापुढें म्हणजे चार-पांच इत्यादि भिक्षूंनीं एकत्र राहणें म्हणजे तें नगरच होय. कारण, एकाहून अधिक यति एकत्र झाले म्हणजे त्यांच्यामध्यें परस्पर राजवार्ता, भिक्षावार्ता, चाहाड्या, मात्सर्य इत्यादि होणें अगदीं अपरिहार्य आहे, ' असें म्हणून यतीच्या एकाकित्वाचें विधान केलें आहे. मूळ श्लोकांत परिव्रज्य असा शब्द आहे. तो परि उपसर्ग व व्रज धातु यांपासून झाला आहे. परिपूर्वक व्रजधातूचा अर्थ त्याग करणें असा आहे. यास्तव अहं-ममाभिमान, त्यामुळें होणारें लौकिक कर्म व वैदिक नित्य-काम्यादि कर्म यांचा त्याग करावा. मनूनेंही ' सुखाभ्युदयिक व निःश्रेयसिक असें प्रवृत्त व निवृत्त द्विविध वैदिक कर्म आहे. इहलोकीं किंवा परलोकीं कांहीं तरी इष्ट फळ मिळावें, म्हणून केलेलें जें कर्म तें प्रवृत्त व ज्ञानपूर्वक निष्काम कर्म हें निवृत्त होय. यास्तव शास्त्रोक्त कर्मांचाही त्याग करून उत्तम ब्राह्मणानें आत्मज्ञान, शम व वेदाभ्यास यांत यत्नवान् होऊन रहावें,' असें ( अ. १२ श्लो. ८८-९२ ) सांगितलें आहे. येथील वेदाभ्यास म्हणजे प्रणवजप घ्यावा. भिक्षा मिळविण्याकरितां गांवात शिरावें; सुखनिवासाकरितां नव्हे. वर्षासमयीं मात्र गांवांत निवास केल्यास कांहीं दोष नाहीं. कारण वार्षिक दोन मासानंतर एकस्थानीं वास करूं नये, असें शंखाचें म्हणणें आहे. पण शरीर अशक्त असल्यास श्रावणापासून चार महिने एकत्र रहावें. पण त्याहून अधिक वास करूं नये. ' वर्षासमयास सोडून बाकीच्या वेळीं गांवांत एक रात्र रहावें, नगरांत पांच रात्री निवास करावा ' असें काण्वस्मरणही आहे ५८.

भिक्षाटन कसें करावें, तें सांगतात—

**अप्रमत्तश्चरेद्भैक्षं सायाह्नेऽनभिलक्षितः ।**
**रहिते भिक्षुकैर्ग्रामे यात्रामात्रमलोलुपः ॥ ५९ ॥**

वाक्, नेत्र इत्यादि इंद्रियांचें चापल सोडून भिक्षाटन करावें. वसिष्ठानें ' पूर्वी ज्यांचा संकल्प करून ठेवलेला नाहीं, अशा सात घरीं भिक्षा मागावी ' असें सांगितलें आहे. पण ती सायाह्नीं म्हणजे दिवसाच्या पांचव्या भागीं मागावी. मनूनें ' विधूमे सन्नमुसले ' इत्यादि वचनांत हेंच सांगितलें आहे. ती एकाच वेळीं मागावी. तिचा उगीच विस्तार करूं नये. कारण लोभानें भिक्षेचा विस्तार करणारा यति विषयांविषयींही लोलुप होईल. त्याचप्रमाणें त्यानें 'अनभिलक्षितः' म्हणजे ज्योतिर्विज्ञानाच्या उपदेशादिकांनीं अचिह्नित असावें. ( मनु

अ. ६ श्लो. ५० पहा. ) 'मांसास सोडून ब्राह्मणकुलांत जें मिळेल तें सायंप्रातर् भक्षण करावें' असें जें वासिष्ठानें सांगितलें आहे तें अशक्ता विषयीं आहे. पण तो भिक्षा मागावयाचा गांव भीक मागण्याचेंच ज्यांचें शील आहे, अशा पाखंडीं प्रभृतीनीं रहित असावा. मनूनेंही ( अ. ६ श्लो. ५१ ) तापस ब्राह्मण, पक्षी, कुत्रीं व अन्य भिक्षुक यांनीं व्यापलेल्या घरांत यतीनें जाऊं नये. जेवढ्यावर प्राणयात्रा होईल तेवढेंच भिक्षान्न संपादन करावें. आठ, सात किंवा पांच घरच्या भिक्षा घेऊन व त्यांचें प्रक्षालन करून मौन धारण करावें व नंतर त्यांचें भक्षण करावें. **अलोलुप**—म्हणजे मिष्टान्न भोजनादिकांमध्यें आसक्त न होतां ५९.

आतां भिक्षाचरणार्थ पात्र सांगतात—

**यतिपात्राणि मृद्वेणुदार्वलाबुमयानि च ।**
**सलिलं शुद्धिरेतेषां गोवालैश्चावघर्षणम् ॥ ६० ॥**

यतींचीं पात्रें, मातीचीं, वेळूचीं, लांकडी, किंवा भोपळ्याचीं केलेलीं असावींत. पाण्यानें धुणें व गायींच्या शेपट्यांच्या गोंड्यानें घासणें हेंच त्यांच्या शुद्धीचें कारण आहे. पण या उपायांनीं होणारी शुद्धि भिक्षाचरणाच्या अंगभूत आहे. अमेध्य वस्तूचा उपलेप झालेला असल्यास त्यांची शुद्धि या उपायांनीं होत नाहीं. त्यांच्या शुद्धीकरितां द्रव्यशुद्धिप्रकरणांत सांगितलेले उपाय योजावेत. मनूनें 'अतैजसानि पात्राणि०' ( अ. ६ श्लो. ५३ ) या वचनांत यज्ञांतील चमसाप्रमाणें पात्रांचें शौच सांगून प्रयोगसंबंधीं शुद्धि सांगितली आहे. दुसरें पात्र नसल्यास भोजनही त्यांतच करावें. कारण देवलानें त्याच किंवा दुसऱ्या पात्रानें तें भिक्षान्न घेऊन एकान्तांत मौन धारण करून भोजन करावें, असें म्हटलें आहे ६०.

अशाप्रकारच्या यतीचा आत्मोपासनांगभूत विशेष नियम सांगतात—

**सन्निरुध्येन्द्रियग्रामं रागद्वेषौ प्रहाय च ।**
**भयं हित्वा च भूतानाममृतीभवति द्विजः ॥ ६१ ॥**

चक्षुरादि इंद्रियसमूहास रूपादि विषयांपासून चांगल्या रीतीनें निरुद्ध करून ( म्ह. इंद्रियांना विषयांपासून परतवून प्रिय करणाराविषयींचा राग ( स्नेह ) व अप्रिय करणारा-विषयींचा द्वेष यांस सोडून ) ईर्ष्या, असूया इत्यादिकांचाही त्याग करून, भूतांस अपकाराच्या योगानें भयभीत न करितां शुद्धचित्त होऊन यति अद्वैतसाक्षात्कारानें अमृती म्हणजे मुक्त होतो ६१.

**कर्तव्याशयशुद्धिस्तु भिक्षुकेण विशेषतः ।**
**ज्ञानोत्पत्तिनिमित्तत्वात्स्वातन्त्र्यकारणाय च ॥ ६२ ॥**

विषयाभिलाष व द्वेष यांच्या योगानें उत्पन्न होणाऱ्या दोषांनीं ज्याचा आशय मलिन झाला आहे त्याच्या अंतःकरणाची शुद्धि ( मलाचा क्षय ) प्राणायामांच्या योगानें करावा. त्यांच्या अभ्यासानें होणारी शुद्धि आत्माद्वैतसाक्षात्काररूप ज्ञानाच्या उत्पत्तीचें निमित्त आहे.

आणि असें झालें असतां विषयासक्ति व तिच्यामुळें उद्भवलेले दोष या प्रतिबंधांचा क्षय होऊन यति आत्मध्यान, धारणा, इत्यादिकांविषयीं स्वतंत्र होतो. यास्तव भिक्षुकानें (यतीनें) ही शुद्धि विशेषेंकरून संपादन करावी. कारण तीं मोक्षाचें मुख्य साधन आहे. शुद्ध अन्तः-करणतेवाचून मोक्ष दुर्लभ असतो. प्राणायामांच्या योगानें अंतर्बहिरिंद्रियांचे मळ जळून जातात, असें मनूनेंही ( अ. ६ श्लो. ७१ ) सांगितलें आहे ६२.

इंद्रियांच्या निरोधाचा एक उपायच, अशा संसाराच्या स्वरूपाचें निरूपण करितात——

**आवेक्ष्या गर्भवासाश्च कर्मजा गतयस्तथा ।**
**आधयो व्याधयः क्लेशा जरा रूपविपर्ययः ।। ६३ ।।**
**भवो जातिसहस्रेषु प्रियाप्रियविपर्ययः**

वैराग्यसिद्धीकरितां मूत्र–पुरीषादिकांच्या समीप असलेल्या नानाप्रकारच्या गर्भाशयांतील निवासांचें चांगलें आलोचन करावें. ( जन्म व मरण यावेळच्या कष्टांचाही विचार करावा. ) त्याचप्रमाणें. निषिद्ध आचरणादि क्रियापासून उत्पन्न झालेल्या महारौरवादि नरकांत पडणें, इत्यादिरूप गति, मानसपीडा, ज्वर–अतिसार इत्यादि शारीर व्याधि, अविद्या–अस्मिता–राग–द्वेष–अभिनिवेश इत्यादि योगशास्त्रोक्त पांच क्लेश, जरा ( वार्द्धक्य, अंगावर सुरकुत्या पडणें, केंस पिकणें इत्यादिरूप ) पाय मोडणें, डोळा फुटणें इत्यादि पूर्वरूपाचा अन्यथाभाव ( बदल ) त्याचप्रमाणें कुत्रा, डुक्कर, गाढव, सर्प इत्यादि अनेक जातींत उत्पत्ति, तशीच इष्ट वस्तूची प्राप्ति न होणें व अनिष्टाची प्राप्ति होणें इत्यादि प्रकारच्या बहु क्लेशावह संसाराच्या स्वरूपाचें पर्यालोचन करून त्याचा परिहार करण्यास्तव आत्मज्ञानोपायभूत इंद्रियजयाविषयीं प्रयत्न करावा.

याप्रमाणें चांगलें निरीक्षण केल्यावर काय करावें तें सांगतात—

**ध्यानयोगेन संपश्येत्सूक्ष्म आत्मात्मानि स्थितः ।। ६४ ।।**

चित्तवृत्तींचा निरोध हा योग व आत्म्याचे ठिकाणींच चित्ताची एकाग्रता हें ध्यान. कारण त्या एकाग्रतेनेंच बाह्यविषयतेची शांति होते. नंतर निदिध्यासन हा ज्याला दुसरा पर्याय शब्द आहे अशा ध्यानयोगानें सूक्ष्मशरीर, प्राण इत्यादिकांनीं रहित असलेला क्षेत्रज्ञ ब्रह्मामध्यें अवस्थित आहे, असें तत् व त्वं या पदांच्या लक्ष्यार्थाचें ऐक्य साक्षात् जाणावें. एवढ्यासाठींच श्रुतीमध्यें ' आत्मा वारे द्रष्टव्यः ' या वाक्यानें साक्षात्काररूप दर्शनाचा अनुवाद करून त्याच्या साधनरूपानें श्रवण, मनन व निदिध्यासन यांचें विधान केलें आहे ६३, ६४.

**नाश्रमः कारणं धर्मे क्रियमाणो भवेद्धि सः ।**
**अतो यदात्मनोऽपथ्यं परेषां न तदाचरेत् ।। ६५ ।।**

वरच्या श्लोकांत सांगितलेल्या आत्मोपासनाख्य धर्माविषयीं दंड, कमंडलु इत्यादि धारण करणें, हा नुस्ता आश्रमच कारण होत नाहीं. कारण तो करूं लागलें असतां होतोच. तो फारसा दुष्कर नाहीं. यास्तव जें आपणास अपथ्य ( उद्वेग करणारें ) वाटत असेल तें ( कठोर भाषणादि ) दुसऱ्यास उद्देशून योजूं नये. या सांगण्यानें आश्रमाचें निराकरण केलें आहे, असा भास होतो. पण तें निराकरण रागद्वेषांचा त्याग करणें, हें प्रधान ( मुख्य ) आहे, असें सांगून त्याची प्रशंसा करण्यासाठीं आहे. यास्तव आश्रमाचें मुख्यतः निराकरण करण्याकरितांच तें प्रवृत्त झालें आहे, असें समजूं नये. रागद्वेषत्याग ज्ञानोत्पत्तीस कारण होणारी अंतःकरणाची शुद्धि संपादन करीत असल्यामुळें अंतरंग साधन आहे व त्यामुळेंच तो प्रधान होय. अर्थात् आश्रमाचा सर्वथा परित्याग करण्याकरितां ' नाश्रमः कारणं धर्मे ' हें वचन प्रवृत्त झालेलें नाहीं. कारण आश्रमही शास्त्रविहितच आहे. एवढ्यासाठींच मनूनें ' दूषितोऽपि चरेद्धर्मं यत्र तत्राश्रमे वसन्। समः सर्वेषु भूतेषु न लिंगं धर्मकारणम् ' असें ( अ. ६. श्लो. ६६ ) म्हटलें आहे ६५.

सत्यमस्तेयमक्रोधो ह्रीः शौचं धीर्धृतिर्दमः ।
संयतेन्द्रियता विद्या धर्मः सर्व उदाहृतः ॥ ६६ ॥

सत्य (यथार्थ प्रियवचन), परद्रव्याचा अपहार न करणें, अपकार करणारावरही कोप न करणें, लज्जा, आहारादिकांची शुद्धि, हिताहितविवेक, इष्टवियोग व अनिष्टप्राप्ति झाली असतां अतिशय चंचल होणाऱ्या चित्ताला पूर्वीप्रमाणें स्थिर करणें,मदाचा त्याग, अनिषिद्ध विषयांचे ठायींही अत्यासक्त न होणें, व आत्मज्ञान यांचें अनुष्ठान केलें असतां सर्व धर्मांचें अनुष्ठान केल्यासारखें होतें. या वचनानें दंड-कमंडलुप्रभृतीचे धारण करणें,या बाह्य लक्षणांहून सत्यादि आत्मगुणांस अंतरंगता आहे, असें सुचविलें आहे ६६.

पण जीव आणि परमात्मा यांचा अभेद असतांना वर ६४ व्या श्लोकांत ' ध्यान-योगानें आत्म्यामध्यें स्थित असलेल्या आत्म्याला पहावें ' असें कसें म्हटलें? म्हणून कोणी विचारील, असें समजून म्हणतात—

निःसरन्ति यथालोहपिण्डात्तप्तात्स्फुलिङ्गकाः ।
सकाशादात्मनस्तद्वदात्मानः प्रभवन्ति हि ॥ ६७ ॥

जीव व परमात्मा यांचा पारमार्थिक ( सत्य ) भेद जरी नाहीं तरी ज्याअर्थी आत्म्या-पासून अविद्योपाधिभेदामुळें जीवात्मे निर्माण होतात त्याअर्थी जीवात्मा व परमात्मा यांचा भेदानें निर्देश करणें युक्तच आहे. ज्याप्रमाणें तापवून लाल केलेल्या लोखंडाच्या गोळ्यापासून किटाळें उडतात व त्यांना किटाळें असें नांवही योजितात त्याप्रमाणें औपाधिक भेदानें पर-मात्म्यापासून उत्पन्न झालेल्या जीवात्म्यांचा पृथक् निर्देश करतां येतो. किंवा या श्लोकाला असें अवतरण देऊन त्याचा असा दुसरा अर्थ करावा—

सुषुप्तिसमयीं व प्रलयकाळीं सर्व क्षेत्रज्ञ ब्रह्मामध्यें लीन होत असल्यामुळें हा आत्मोपासनविधि कोणाला उद्देशून केलेला आहे ? अशी शंका आली असतां सांगतात–प्रलयादि समयीं क्षेत्रज्ञ सूक्ष्मरूपानें जरी लीन होत असले तरी अविद्योपाधिभेदांमुळें ते परमात्म्यापासून उद्भवतात, ( कर्मवशात् पुनः स्थूलावर अभिमान ठेवूं लागतात. ) यास्तव उपासनाविधींशीं विरोध येत नाहीं. तैजसाच्या पृथक्त्वाचें साम्य असल्यामुळें लोहपिंडाचा दृष्टान्त दिला आहे ६७.

**शंका**––ज्या क्षेत्रज्ञांनीं शरीराचें ग्रहण केलेलें नसतें ते शरीराच्या अभावीं परिस्पंदशून्य असल्यामुळें जरायुजादि चतुर्विध देहांचा स्वीकार कसा करूं शकतात ?

**समाधान**—सांगतों, ऐक—

**तत्रात्मा हि स्वयं किञ्चित्कर्म किञ्चित्स्वभावतः ।**
**करोति किञ्चिदभ्यासाद्धर्माधर्मोभयात्मकम् ॥ ६८ ॥**

जरी त्या अवस्थेंत परिस्पंदात्मक क्रियेचा अभाव असतो तरी धर्माधर्मनिश्चयरूप मानस कर्म होतेंच व तें विशिष्टशरीराचें ग्रहण करण्यास कारणही होतेंच. मनूनें वाचिक दोषांमुळें पक्षी, पशु इत्यादि भावांस व मानस दोषांमुळें अंत्यजादि भावांस प्राणी प्राप्त होतात, असें सांगितलें आहे. याप्रमाणें ज्यानें शरीर धारण केलें आहे, असा जीव स्वतःच ( म्हणजे दुग्धपानादि केलें असतां तृप्ति होते, हा अन्वय व न केल्यास होत नाहीं, हा व्यतिरेक यांची अपेक्षा न करितां पूर्वजन्मांतील अनुभवामुळें संस्काररूपानें मनांत स्थित झालेल्या भावनांच्या योगानेंच उद्भूत ज्ञानवान् होऊन ) दुग्धपानादि कांहीं क्रिया करतो, कांहीं स्वभावतःच ( म्हणजे यदृच्छेनें, फलाभिसंधीवाचून ) करतो व कांहीं धर्माधर्म–उभयरूप कर्म पूर्वजन्मांतील अभ्यासामुळें करतो. याविषयीं ' प्रतिजन्मीं दान, तप, अध्ययन इत्यादिकांतील ज्याचा अभ्यास केलेला असतो त्याच अभ्यासाच्या बलानें जीव पुनः तेंच तें करतो ' असें दुसऱ्याही एका स्मृतींत सांगितलें आहे. याप्रमाणें जीवांचें कर्मवैचित्र्य, व त्यामुळें होणारे जरायुजादि देहवैचित्र्य युक्तच आहे ६८.

**शंका**––मग असें जर आहे तर ब्रह्मालाच कसा तरी ( युक्ति–शून्य, मिथ्या ) जीव–हा व्यपदेश ( संज्ञा, नांव ) प्राप्त होत असल्यामुळें व तें ब्रह्म नित्यत्वादिधर्मवान् असल्यामुळें विष्णुमित्र जन्मास आला, देवदत्त मेला इत्यादि व्यवहार कसा होतो ?

**समाधान**–सांगतों–

**निमितमक्षरः कर्ता बोद्धा ब्रह्म गुणी वशी ।**
**अजः शरीरग्रहणात्स जात इति कीर्त्यते ॥ ६९ ॥**

तूं म्हणतोस तें खरें आहे. पण तो आत्मा अक्षय असल्यामुळें अविद्येंत प्रवेश करून सकल जगत्प्रपंचाचा आविर्भाव कर्तव्य असतां त्याचें उपादान व निमित्त कारण होतो.

**शंका**—पण कार्यभूत जगत्प्रपंचांत सुख-दुःख-मोहरूप सत्त्वादि तीन गुणांचा विकार प्रत्यक्ष अनुभवास येत असल्यामुळें त्या गुणांनीं युक्त असलेली प्रकृतिच जगाची कर्त्री असणें युक्त आहे. निर्गुण ब्रह्म जगत्कर्तृ होणें योग्य नव्हे.

**समाधान**--असें म्हणूं नकोस. आत्माच कर्ता आहे. कारण तो जीवांच्या उपभोगास योग्य असलेल्या सुखदुःखांच्या हेतुभूत अदृष्टादिकांस जाणणारा आहे. जड प्रकृतीला अशा विविधविचित्र भावांनीं युक्त असलेल्या अचिंत्य जगाची रचना करितां येणें शक्य नसतें. यास्तव आत्माच कर्ता आहे. तेंच ब्रह्म आहे. ब्रह्म म्हणजे विस्तार करणारा. तो अत्यंत निर्गुण आहे, असें नाहीं. कारण त्याची प्रधान, प्रकृति इत्यादि नांवाची त्रिगुणात्मिका अविद्या शक्ति आहे. यास्तव आत्मा स्वतः जरी निर्गुण असला तरी अविद्याशक्तीच्या द्वारा सत्वादि-गुणवान् आहे, असें म्हटलें जातें. पण तेवढ्यावरून प्रकृतिच प्रपंचाचें कारण आहे, असें म्हणतां येणार नाहीं. कारण आत्मा वशी म्हणजे स्वतंत्र आहे. प्रकृति नांवाचें दुसरें स्वतंत्र तत्व नाहीं. कारण त्याच्या अस्तित्वाविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. ती शक्तिरूप असली तरी कर्तृभूतच आहे, असें म्हणतां येणार नाहीं. कारण कोणतेंही शक्तियुक्त द्रव्यच कारक (क्रिया-निर्वर्तक, क्रिया निष्पन्न करणारें ) होत असतें. नुसती शक्ति कारक होत नाहीं. यास्तव जगाचें तिन्ही प्रकारचें ( समवायी, असमवायी व निमित्त ) कारण आत्माच आहे. तसाच तो अज म्हणजे उत्पत्तिरहित आहे. यास्तव त्याचा साक्षात् जन्म जरी न संभवला तरी केवल शरीरग्रहण केल्यानेंच तो उत्पन्न झाला असें म्हणतात. कारण एका अवस्थेंतून दुसऱ्या अवस्थेंत जाणें हीच उत्पत्ति होय. ' अमुक आतां गृहस्थ झाला ' याप्रमाणेंच ' देवदत्त झाला ' हेंही समजावें ६९.

आतां शरीरग्रहणाचा प्रकार सांगतात—

**सर्गादौ स यथाकाशं वायुं ज्योतिर्जलं महीम् ।**
**सृजत्येकोत्तरगुणांस्तथादत्ते भवन्नपि ।। ७० ।।**

सृष्टीच्या ( जगाला निर्माण करावयाच्या ) वेळीं तो परमात्मा जसा आकाशादिकांस उत्तरोत्तर एकेका गुणानें अधिक अशा रीतीनें उत्पन्न करतो त्याप्रमाणेंच जीवभावास प्राप्त झालेला तो उत्पन्न होतांना आपल्या शरीराच्या आरंभकत्वानेंही त्या त्या भूताचें ग्रहण करतो. आकाश शब्द या एकाच गुणानें विशिष्ट असतें. वायु शब्द व स्पर्श या दोन, तेज शब्द, स्पर्श व रूप या तीन, जल शब्द, स्पर्श, रूप व रस या चार आणि पृथ्वी शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध या पांच गुणांनीं युक्त असतें.

पृथिव्यादि भूतांना शरीरारंभकत्व कसें असतें, तें सांगतात—

**आहुत्याप्यायते सूर्यः सूर्याद्वृष्टिरथौषधिः ।**
**तदन्नं रसरूपेण शुक्रत्वमधिगच्छति ।। ७१ ।।**

यज्ञ करणाऱ्या यजमानानें अग्नींत फेंकलेल्या आहुतीच्या योगानें ( पुरोडाशादिकांच्या ) रसानें सूर्य पूर्ण ( तृप्त ) होतो. सूर्यापासून म्हणजे कालवशात् परिपक्क झालेल्या आज्यादि हवींच्या रसापासून वृष्टि होते, तिच्या योगानें व्रीहिप्रभृति औषधिरूप अन्न होतें, त्या अन्नाचें सेवन केलें असतां रस, रक्त इत्यादि क्रमानें शुक्र व शोणित, हा पुरुष व स्त्री यांच्या शरीरांतील शेवटचा परिणाम होतो ७१.

नंतर—

स्त्रीपुंसयोस्तु संयोगे विशुद्धे शुक्रशोणिते ।
पञ्चधातून्स्वयं षष्ठ आदत्ते युगपत्प्रभुः ।। ७२ ।।

ऋतुसमयीं स्त्री व पुरुष यांचा योग झाला असतां व त्यामुळें परस्परांच्या शुक्र-शोणिताचा संयोग झाला असतां व तें शुक्र-शोणित अतिशय शुद्ध असल्यास ( म्हणजे अन्य स्मृतींत सांगितल्याप्रमाणें रेत वात,पित्त, कफ यांनीं दूषित झालेलें, ग्रंथी, पू, यांनीं क्षीण झालेलें, व मूत्र, पुरीष इत्यादिकांच्या दोषांनीं नष्ट झालेलें, नसल्यास ) त्यांत स्वतः पांच भूतांच्या अपेक्षेनें सहावा चिद्धातु आत्मा प्रभु स्थित होऊन अदृष्ट—कर्मसंबंधानें शरीराचा आरंभ करण्यास समर्थ असलेला तो एकाच वेळीं पृथिव्यादि पंचमहाभूतांचें भोगायतनरूपानें ग्रहण करतो. एवढ्यासाठींच शारीरिक मीमांसेंत ' स्त्री-पुरुषांचा संयोग झाला असतां योनींमध्यें शोणिताशीं मिळालेलें शुक्र तत्काल भूतात्मा व सत्त्वादि त्रिगुण यांसह वायूनें प्रेरणा केली असतां गर्भाशयांत जाऊन राहतें, ' असें आचार्यांनीं म्हटलें आहे ७२.

इन्द्रियाणि मनः प्राणो ज्ञानमायुः सुखं धृतिः ।
धारणा प्रेरणं दुःखमिच्छाहंकार एव च ।। ७३ ।।
प्रयत्न आकृतिर्वर्णः स्वरद्वेषौ भवाभवौ ।
तस्यैतदात्मजं सर्वमनादेरादिमिच्छतः ।। ७४ ।।

पुढें सांगितलेलीं ज्ञान—कर्मेंद्रियें त्या दोन्ही बाह्य इंद्रियांना साधारण असलेलें मन, प्राण, अपान, व्यान, उदान व समान या पांच पृथक्वृत्तींनीं ( व्यवहारांनीं ) भिन्न असलेला शरीरांतील वायु, बोध, आयु ( जीवनकाल ), सुख, चित्तस्थैर्य, धारणा ( प्रज्ञा व मेधा ), प्रेरण ( ज्ञान-कर्मेंद्रियांचें अधिष्ठातृत्व ), दुःख ( उद्वेग ), इच्छा ( स्पृहा ), अहंकार, उद्यम, आकार, गोरेपणा इत्यादि वर्ण, षड्ज, गंधार इत्यादि स्वर, वैर, पुत्रपश्वादि वैभव, व त्याच्या विपरीत अवैभव इत्यादि हें सर्व अनादि नित्य असतांनाही आदींची ( जन्माची, शरीरग्रहणाची ) इच्छा करणाऱ्या आत्म्याचें आत्मजन्य ( पूर्वजन्मांतील कर्मबीजापासून उद्भवणारें ) आहे ७३, ७४.

वर सांगितल्याप्रमाणें संयुक्त झालेल्या शुक्रशोणिताच्या शरीररूप परिणामाचा क्रम सांगतात—

प्रथमे मासि संक्लेदभूतो धातुविमूर्छितः ।
मास्यर्बुदं द्वितीये तु तृतीयेऽङ्गेन्द्रियैर्युतः ।। ७५ ।।

हा सहावा चेतन धातु पृथिवीप्रभृति पांच धातूंमध्यें दूध व जल यांप्रमाणें तादात्म्यास प्राप्त होऊन पहिल्या गर्भ–महिन्यांत द्रवरूपास प्राप्त होऊनच राहतो. म्हणजे तो कठिनरूपतेनें परिणत होत नाहीं. दुसऱ्या महिन्यांत किंचित् कठिण मांसपिंडरूप होतो. याचा अभिप्राय असा–शुक्रसंपर्कामुळें द्रवरूप, ( पातळ ) झालेलें भूतजात कोष्ठांतील वायु व जठराग्नि यांच्या योगानें प्रतिदिवशीं थोडें थोडें शुष्क केलें ( शोषलें ) जातें व त्यामुळें तें ( भूतजात, पांच भूतांचा संघ ) तीस दिवसांनीं कठिनतेस प्राप्त होतें ' दुसऱ्या महिन्यांत शीतोष्ण वायूंच्या योगानें परिपक्व होणारा भूतसंघ घन होतो ' असें सुश्रुतांतही सांगितलें आहे. तिसऱ्या महिन्यांत तो ( गर्भ ) अंगें व इंद्रियें यांनीं युक्त होतो ७५.

आकाशाल्लाघवं सौक्ष्म्यं शब्दं श्रोत्रं बलादिकम् ।
वायोश्च स्पर्शनं चेष्टां व्यूहनं रौक्ष्यमेव च ॥ ७६ ॥
पित्तात्तु दर्शनं पक्तिमौष्ण्यं रूपं प्रकाशिताम् ।
रसात्तु रसनं शैत्यं स्नेहं क्लेदं समार्दवम् ॥ ७७ ॥
भूमेर्गन्धं तथा घ्राणं गौरवं मूर्तिमेव च ।
आत्मा गृह्णात्यजः सर्वं तृतीये स्पन्दते ततः ॥७८॥

अज आत्मा आकाशापासून लंघनक्रियेच्या उपयोगीं असलेलें लघुत्व, सूक्ष्मदर्शनता, शब्द हा विषय, श्रोत्र हें इंद्रिय व दृढत्व व आदिशब्दानें गर्भोपनिषदांत सांगितलेलें सुशिरत्व ( छिद्रत्व ), व निर्मलत्व घेतो. वायूपासून स्पर्शेंद्रिय, चेष्टा ( गमन आगमन इत्यादि ), अंगांचा विविध प्रसार, कर्कशत्व, ( व चशब्दानें स्पर्श) यांचें ग्रहण करतो. तेजापासून दर्शन, चक्षुरिंद्रिय, भुक्त अन्नाचें पचन, अंगाचें उष्ण स्पर्शत्व, गोरें, काळें, इत्यादि रूप, तेजस्वित्व, (व गर्भोपनिषदांत सांगितलेल्याप्रमाणें संताप,असहनता इत्यादि)ग्रहण करतो.तसेंच उदकापासून रसनेंद्रिय, शीतता, अंगांची स्निग्धता, मृदुता व आर्द्रता यांचें ग्रहण करतो. त्याचप्रमाणें भूमीपासून गंध, घ्राणेंद्रिय, गुरुत्व व साकारता हें सर्व तो आत्मा वस्तुतः जन्मरहित असूनही तिसऱ्या महिन्यांत ग्रहण करितो. त्यानंतर चवथ्या महिन्यांत तो चल होतो. म्हणजे गर्भाशयांत फिरूं लागतो ७६, ७७, ७८.

दौर्हृदस्याप्रदानेन गर्भो दोषमवाप्नुयात् ।
वैरूप्यं मरणं वापि तस्मात्कार्यं प्रियं स्त्रियाः ॥ ७९ ॥

गर्भाचें एक हृदय व गर्भिणी स्त्रीचें दुसरें, अशा रीतीनें गर्भिणी द्विहृदया ( दोन हृदयांनीं युक्त ) होते. यास्तव तिला जें इष्ट असतें त्याला दौर्हृद म्हणतात. तें तिला न दिल्यानें गर्भ विद्रुपतेस अथवा मरणरूपतेस प्राप्त होतो. यास्तव या दोषांचा परिहार करण्यास्तव गर्भिणी स्त्रियेचें जें अभिलषित असेल तें अवश्य पुरवावें. सुश्रुतांत असें केल्यानें पुत्र वीर्यवान् व दीर्घायु होतो, असें सांगितलें आहे. गर्भग्रहणापासून पुढें गर्भिणीनें व्यायामादिकही वर्ज

करावा. सुश्रुतांतच ' व्यायाम, मैथुन, अतितृप्ति, दिवसा झोंप, रात्रीं जागरण, शोक, भय, वाहनावर बसणें, मूत्रादिकांचा वेग धरणें, कुक्कुट आसन व रक्त काढणें हीं कर्मे वर्ज्य करावींत, ' असें म्हटलें आहे. श्रमादि चिह्नांवरून गर्भग्रहणाचें अनुमान करावें. कारण सुश्रुतांत–जिनें नुक्ताच गर्भ धारण केला आहे तिला श्रम, ग्लानि, तहान, मांड्या मोडल्यासारखें होणें, शुक्र व शोणित यांचा स्राव न होणें, योनीचें स्फुरण इत्यादि चिह्नें होतात, असें म्हटलें आहे ७९.

स्थैर्यं चतुर्थे त्वङ्गानां पञ्चमे शोणितोद्भवः ।
षष्ठे वलस्य वर्णस्य नखरोम्णां च संभवः ॥ ८० ॥

तिसऱ्या महिन्यांत प्रादुर्भूत झालेल्या अंगसमूहाचें चवथ्या महिन्यांत स्थैर्य होतें. पांचव्या महिन्यांत रक्ताची उत्पत्ति, सहाव्यांत वल, वर्ण, नखें व रोम यांचा उद्भव होतो ८०.

मनश्चैतन्ययुक्तोऽसौ नाडीस्नायुशिरायुतः ।
सप्तमे चाष्टमे चैव त्वङ्मांसस्मृतिमानपि ॥ ८१ ॥

हा पूर्वोक्त गर्भ सातव्या महिन्यांत मनानें व चेतनाशक्तीनें युक्त होतो. वायूला वाहणाऱ्या नाड्या, हाडांस बांधणारे स्नायु, वात, पित्त व कफ यांस वाहणाऱ्या शिरा, यांनीं युक्त होतो. त्याचप्रमाणें आठव्यांत त्वचा, मांस व स्मृति यानीं युक्त होतो ८१.

पुनर्धात्रीं पुनर्गर्भमोजस्तस्य प्रधावति ।
अष्टमे मास्यतो गर्भो जातः प्राणैर्वियुज्यते ॥ ८२ ॥

पण आठ महिन्यांच्या गर्भाचा ओज या नांवाचा एक प्रकारचा गुण धात्री (गर्भवती) व गर्भ यांच्याकडे वारंवार जात–येत असतो. त्यामुळें त्या महिन्यांत गर्भाचें ओज अतिशय चंचल असतें. म्हणूनच आठव्या महिन्यांत झालेला गर्भ मरतो. यावरून ओजाची स्थितिच जीवनाचें निमित्त आहे, असें होतें. ओजाचें स्वरूप दुसऱ्या एका स्मृतींत ' हृदयामध्यें जें शुद्ध, किंचित् उष्ण व पीतवर्णयुक्त द्रव्य असतें तेंच शरीरगत ओज होय. त्याच्या नाशानें जीव मरण पावतो ' असें म्हटलें आहे ८२.

नवमे दशमे वापि प्रवलैः सूतिमारुतैः ।
निःसार्यते वाण इव यन्त्राच्छिद्रेण सज्वरः ॥ ८३ ॥

याप्रमाणें ज्याचीं हात, पाय, नेत्र इत्यादि अंगें व इंद्रियें परिपूर्ण झालीं आहेत असा तो गर्भ नवव्या किंवा दहाव्या महिन्यांतही ( अपि असा शब्द असल्यामुळें त्यापूर्वीही म्हणजे सातव्या किंवा आठव्या महिन्यांतही ) अति आयासादि दोषवान्, प्रवल व प्रसवास कारण होणाऱ्या वायूकडून प्रेरणा केलेला होत्साता स्नायु, अस्थि, चर्म इत्यादिकांनीं निर्मिलेल्या शरीरयंत्राच्या सूक्ष्म छिद्रांतून दुःसह दुःखानें व्याकुळ केलेला, असा धनुष्यरूप

यंत्रानें चांगल्या धनुर्धरानें ज्याला प्रेरणा केली आहे अशा बाणाप्रमाणें मोठ्या वेगानें बाहेर काढला जातो; आणि बाहेर पडल्यानंतर बाह्यवायूनें ज्याला स्पर्श केला आहे, अशा त्याची पूर्व सर्व स्मृति नष्ट होते. कारण निरुक्ताच्या अठराव्या अध्यायांत ' उत्पन्न झालेला तो वायूनें स्पर्श केला असतां पूर्व जन्म–मरण व शुभाशुभ कर्म यांस स्मरत नाहीं ' असें सांगितलें आहे ८३.

आतां शरीराच्या स्वरूपाचें विवरण करतात–

**तस्य षोढा शरीराणि षट् त्वचो धारयन्ति च ।**
**षडङ्गानि तथास्थ्नां च सह षष्ट्या शतत्रयम् ॥ ८४ ॥**

ज्या आत्म्याचीं जीं जरायुजादि शरीरें आहेत त्यांतील प्रत्येक, रक्तादि सहा धातूंच्या परिपाकास कारण होणाऱ्या सहा अग्निस्थानांच्या योगानें सहा प्रकारचें असतें. कारण जठराग्नीनें पाक केला असतां अन्नरस रक्तरूप होतो. रक्ताला रक्तकोशांतील अग्नीनें पक्व केलें असतां तेंच मांसरूप होतें. मांसकोशस्थ अग्नीनें ज्याला परिपक्व केलें आहे, असें मांस अस्थिरूप धारण करतें. स्वकोशगत अग्नीनें पक्व केलेलीं हाडें मेदोरूप होतात. अग्नीच्या परिपाकानें मेदच मज्जारूप बनतो व मज्जास्थ अग्नीकडून परिपक्व होणारा मज्जाधातु पुरुषशरीरांत शुक्र व स्त्रीशरीरांत शोणित होतो. या शेवटच्या धातूचा परिपाक होत नाहीं. म्हणून तोच आत्म्याचा प्रथम कोश आहे. असो; याप्रमाणें सहा कोशांतील अग्नीच्या संयोगानें शरीरें सहा प्रकारचीं होतात. पहिला अन्नरस नांवाचा धातु अनियत असल्यामुळें ( म्हणजे त्याच्या स्वरूपांत रक्तादिकांप्रमाणें एक निश्चित आकार नसल्यामुळें ) त्याच्या योगानें शरीराचा आणखी एक सातवा प्रकार मानलेला नाहीं. तीं शरीरें सहा त्वचांस धारण करितात. ( रक्त, मांस, अस्थि, मेद, मज्जा व शुक्र या नांवाचे सहा धातुच केळीच्या खांबांतील सोपटांप्रमाणें एकांत एक अशारीतीनें स्थित आहेत, व ते त्वचेप्रमाणें आच्छादित करितात. यास्तव ते धातुच त्वचा होत. असो; हें सर्व आयुर्वेदांत प्रसिद्ध आहे. ) तशींच अंगें सहा आहेत. दोन हात, दोन पाय, मस्तक व मधील गात्र आणि पुढील सहा श्लोकांत सांगितल्याप्रमाणें तीनशें साठ हाडें ( इतकें सगळें मिळून शरीर होय ) ८४.

**स्थालैः सह चतुःषष्टिर्दन्ता वै विंशतिर्नखाः ।**
**पाणिपादशलाकाश्च तेषां स्थानचतुष्टयम् ॥ ८५ ॥**

दातांच्या मूल प्रदेशीं असलेलीं स्थाल नांवाचीं बत्तीस व दांत बत्तीस मिळून चवसष्ट हाडें होतात. हात व पाय यांच्या बोटांवरील नखें वीस, हात व पाय यांच्यामधील काड्यांसारखीं लांब व अंगुलींच्या मूलप्रदेशीं असलेलीं हाडें वीस मिळून एकशें चार हाडें. तीं नखें व शलाकास्थि यांचीं दोन हात व दोन पाय अशीं चार स्थानें आहेत ८५.

**षष्ट्यङ्गुलीनां द्वे पार्ष्ण्योर्गुल्फेषु च चतुष्टयम् ।**
**चत्वार्यरत्निकास्थीनि जङ्घयोस्तावदेव तु ॥ ८६ ॥**

वीस अंगुळें, त्यांतील प्रत्येकीं तीन, मिळून साठ हाडें, खोटेचीं दोन हाडें, प्रत्येक पायाचे दोन घोटे यास्तव त्यांचीं चार हाडें, बाहूंतील चार व जंघांतील चार. मिळून चवऱ्याहात्तर ८६.

द्वे द्वे जानुकपोलोरुफलकांससमुद्भवे ।
अक्षतालूषकश्रोणीफलके च विनिर्दिशेत् ॥ ८७ ॥

जंघा व मांड्या यांचा संधि जानु ( ढोंपर ), गाल, मांड्यांच्या वरील पसरट भाग, खांदा, नेत्र व कान यांच्या मधील शंखाचा जो खालचा भाग तीच तालु होय. उषक (काकुद) व श्रोणी ( ढुंगणाजवळचा भाग ) यांतील प्रत्येक जागीं दोन दोन या हिशोबानें चवदा हाडें असतात ८७.

भगास्थ्येकं तथा पृष्ठे चत्वारिंशच्च पञ्च च ।
ग्रीवा पञ्चदशास्थी स्याज्जत्र्वेकैकं तथा हनुः ॥ ८८ ॥

गुह्यस्थानचें एक हाड, मागच्या बाजूस पंचेचाळीस हाडें, मानेंत पंधरा हाडें, वक्षःस्थळ व खांदे यांस जोडणारा जो भाग त्यास जत्रु म्हणतात. ते दोन असल्यामुळें त्यांचीं दोन हाडें व हनुवटींतही एक हाड असतें; मिळून चवसष्ट हाडें झालीं ८८.

तन्मूले द्वे ललाटाक्षिगण्डे नासाघनास्थिका ।
पार्श्वकाः स्थालकैः सार्धमर्बुदैश्च द्विसप्ततिः ॥ ८९ ॥

हनुवटीच्या मूलप्रदेशीं दोन हाडें, ललाट, चक्षु, गाल व नेत्र यांच्या मधील प्रदेश यांतील प्रत्येक स्थानीं दोन हाडें, नासा, खांकेच्या खालील हाडांच्या आधारभूत हाडांस स्थालक म्हणतात. या स्थालक व अर्बुदनांवाच्या विशेष हाडांसह पार्श्वास्थि ( कुशींचीं हाडें ) बाहात्तर होतात. ( तीं व पूर्वींचीं नऊ मिळून एक्यायशीं ) ८९.

द्वौ शङ्खकौ कपालानि चत्वारि शिरसस्तथा ।
उरःसप्तदशास्थीनि पुरुषस्यास्थिसंग्रहः ॥ ९० ॥

भुवया व कान यांच्या मध्यप्रदेशीं जीं दोन विशेष हाडें आहेत त्यांसच शंख म्हणतात. मस्तकसंबंधीं चार कपालें व उराचीं सतरा हाडें मिळून तेवीस. याप्रमाणें सर्व मिळून तीनशें साठ हाडें पुरुषाच्या शरीरांत असतात ९०.

आतां विषयासह ज्ञानेंद्रियें सांगतात—

गन्धरूपरसस्पर्शशब्दाश्च विषयाः स्मृताः ।
नासिका लोचने जिह्वा त्वक् श्रोत्रं चेन्द्रियाणि च ॥९१ ॥

गंध, रूप, रस, स्पर्श व शब्द हे विषय आहेत. म्हणजे पुरुषाच्या बंधाचे हेतु आहेत. कारण 'षिञ् बन्धने' या धातूपासून हा शब्द झाला आहे. या गंधादि बोध्यरूपानें स्थित

असलेल्या विषयावरून त्यांच्या त्यांच्या ग्राहक इंद्रियांचें अनुमान होतें; व तीं क्रमानें घ्राण, चक्षु, जिव्हा, त्वक् व श्रोत्र अशीं पांच आहेत ९१.

कर्मेंद्रियें सांगतात—

हस्तौ पायुरुपस्थं च जिह्वा पादौ च पञ्च वै ।
कर्मेन्द्रियाणि जानीयान्मनश्चैवोभयात्मकम् ॥ ९२ ॥

हात, गुद, उपस्थ ( रतिप्राप्त सुखाचें साधन ), जिव्हा व पाय हीं पांच कर्मेन्द्रियें आहेत. घेणें, विष्ठात्याग, उपभोगसुख, भाषण व विहार इत्यादि कर्मांचीं तीं साधनें आहेत. अंतःकरण दोन्ही प्रकारच्या इंद्रियांना सहायक असल्यामुळें उभयात्मक आहे ९२.

आतां प्राणाचीं स्थानें सांगतात—

नाभिरोजो गुदं शुक्रं शोणितं शङ्खकौ तथा ।
मूर्धांसकण्ठहृदयं प्राणस्यायतनानि च ॥ ९३ ॥

नाभि, ओज, गुद, शुक्र, शोणित, दोन्ही शंख, मस्तक, खांदे, कंठ व हृदय हीं दहा प्राणांचीं स्थानें आहेत. समान नांवाचा वायु सकल अंगांत संचार करणारा असला तरी नाभि इत्यादि विशेष स्थानीं असतो, म्हणून जें म्हटलें आहे तें प्राचुर्य या अभिप्रायानें आहे. म्हणजे पुष्कळ प्रमाणानें नाभींत राहतो म्हणून त्याला ' नाभिसंस्थितः ' असें म्हटलें आहे, असें जाणावें ९३.

प्राणाच्या आयतनांचा विस्तार करण्यासाठीं म्हणतात—

वपा वसावहननं नाभिः क्लोमा यकृत्प्लिहा ।
क्षुद्रान्त्रं वृक्कौ वस्तिः पुरीषाधानमेव च ॥ ९४ ॥
आमाशयोऽथ हृदयं स्थूलान्त्रं गुद एव च ।
उदरं च गुदौ कोष्ठ्यौ विस्तारोऽयमुदाहृतः ॥ ९५ ॥

वपा, वसा (मांसाचा स्नेह, चरबी), अवहनन (फुप्फुस), नाभि, प्लिहा, यकृत्, क्लोमा, हृदयस्थ आंतडें, दोन वृक्क ( हृदयाजवळचे मांसपिंड ), मूत्राशय, विष्ठाशय, आमाशय ( अपक्वान्नस्थान ), हृदयकमल, स्थूल आंतडी, नाभीच्या खालचे दोन कोठे हा प्राणस्थानांचा विस्तार सांगितला आहे. पूर्व श्लोकांत संक्षेप सांगितलेला होता. म्हणूनच पूर्व श्लोकांतील कांहीं स्थानांचा येथें निर्देश केला आहे ९४, ९५.

पुनरपि प्राणायतनांच्या विस्तारार्थ सांगतात—

कनीनिके चाक्षिकूटे शष्कुली कर्णपत्रकौ ।
कर्णौ शङ्खौ भ्रुवौ दन्तवेष्टावोष्ठौ ककुन्दरे ॥ ९६ ॥
वङ्क्षणौ वृषणौ वृक्कौ श्लेष्मसंघातजौ स्तनौ ।
उपजिह्वा स्फिजौ बाहू जङ्घोरुषु च पिण्डिका ॥ ९७ ॥

तालूदरं वस्तिशीर्षं चिबुके गलशुण्डिके ।
अवटश्चैवमेतानि स्थानान्यत्र शरीरके ॥ ९८ ॥

अक्षिवर्णचतुष्कं च पद्धस्तहृदयानि च ।
नव च्छिद्राणि तान्येव प्राणस्यायतनानि तु ॥ ९९ ॥

कनीनिका ( नेत्रांतील तारा ), नेत्र व नासिका यांचा संधि, कानाचें छिद्र व पाळी, दातांचें वेष्टन, ओंठ, जघनाचे सखल भाग, जघन ( ओटि पोट ) व मांड्या यांचा संधि-भाग, हृदयाजवळचे दोन मांसपिंड, वृषण, श्लेष्मसमुदायरूप स्तन, पडजीभ, कुल्ले, बाहु, जंघा व मांड्या यांतील मांसाचे गोळे ( मांसल भाग ), हनुवटी व गाल यांचा संधि, मस्तक, शरीरांतील खांकेसारखा सखल भाग, प्रत्येक नेत्रांतील कनीनिकेच्या दोन्ही बाजूचे दोन शुभ्रवर्ण मिळून चार वर्ण, पाय, हात, हृदय, दोन नेत्रच्छिद्रें, दोन कानांचीं छिद्रें, दोन नाक-पुड्या, तोंड, पायु व उपस्थ अशीं नऊ छिद्रें हीं सर्व या कुत्सित शरीरांतील प्राणांचीं स्थानें आहेत ९६–९९.

शिराः शतानि सप्तैव नव स्नायुशतानि च ।
धमनीनां शते द्वे तु पञ्च पेशीशतानि च ॥ १०० ॥

शिरा, (नाभीशीं संबद्ध असलेल्या चाळीस) वात, पित्त व कफ यांस वाहणाऱ्या, सर्व शरीरास व्यापणाऱ्या व अनेक शाखांनीं युक्त अशा सातशें होतात. त्याचप्रमाणें अंगें व उपांगें यांचीं बंधनें, असे स्नायु नऊशें असतात. धमन्या ( या नाभीपासून निघतात. त्यांची चोवीस संख्या आहे. त्या प्राणादि वायूंस वाहतात. ) अनेक शाखांमुळें त्या दोनशें होतात. मांस-ळाकार मांड्या, जंघा इत्यादि अंग—प्रत्यंगास सांधणाऱ्या पेशींची संख्या पांचशें आहे १००

या शिरादिकांच्या अनेक शाखा असल्यामुळें अनेक भेद होतात, असें सांगतात—

एकोनत्रिंशल्लक्षाणि तथा नवशतानि च ।
षट्पञ्चाशच्च जानीत शिरा धमनिसंज्ञिताः ॥ १०१ ॥

धमन्या नांवाच्या शिरा शाखा व उपशाखा यांच्या योगानें सर्व मिळून एकूणतीस लक्ष नऊशें छपन्न होतात, असें हें सामःश्रवप्रभृति मुनीनों, तुम्ही जाणा १०१.

त्रयो लक्षास्तु विज्ञेयाः श्मश्रुकेशाः शरीरिणाम् ।
सप्तोत्तरं मर्मशतं द्वे च सन्धिशते तथा ॥ १०२ ॥

देहवानांचे श्मश्रु व केंस मिळून तीन लक्ष होतात, मर्में ( म्ह. मरण व क्लेश देणारीं स्थानें ) एकशें सात आहेत. हाडांचे सांधे दोनशें व स्नायु-शिरादि संधि तर अनंत आहेत १०२.

सर्व शरीरांतील छिद्रांची संख्या सांगतात--

रोम्णां कोट्यस्तु पञ्चाशच्चतस्रः कोट्य एव च ।
सप्तषष्टिस्तथा लक्षाः सार्द्धाः स्वेदायनैः सह ॥ १०३ ॥
वायवीयैर्विगण्यन्ते विभक्ताः परमाणवः ।
यद्यप्येकोऽनुवेत्त्येषां भावनां चैव संस्थितिम् ॥ १०४ ॥

वर सांगितलेल्या शिरा-केंसादिकांसह रोमांचे परमाणु (सूक्ष्म-सूक्ष्मतर भाग) घामाचा स्राव ज्यांतून होतो त्या छिद्रांसह चौपन्न कोटी, सदुसष्ट लक्ष व पन्नास हजार आहेत. वायूच्या परमाणूंनीं पृथक् केलेल्या त्यांची अशी गणना शास्त्रदृष्ट्या केलेली आहे. कारण, नुसत्या नेत्रादि इंद्रियांना त्यांची एवढी संख्या दिसत नाहीं. हे मुनींनों, तुमच्यांतील जो कोणीही अतिगहन शिरादिकांची रचना जाणतो तो महाबुद्धिमान् होय. यास्तव मोठ्या यत्नानें ही भावस्थिति जाणावी. १०३, १०४.

आतां शरीरांतील रसादिकांचा परिपाक सांगतात--

रसस्य नव विज्ञेया जलस्याञ्जलयो दश ।
सप्तैव तु पुरीषस्य रक्तस्याष्टौ प्रकीर्तिताः ॥ १०५ ॥
षट् श्लेष्मा पञ्च पित्तं च चत्वारो मूत्रमेव च ।
वसा त्रयो द्वौ तु मेदो मज्जैकोर्ध्वं तु मस्तके ॥ १०६ ॥
श्लेष्मौजसस्तावदेव रेतसस्तावदेव तु ।
इत्येतदस्थिरं वर्ष्म यस्य मोक्षाय कृत्यसौ ॥ १०७ ॥

चांगल्या तऱ्हेनें परिपक्व झालेल्या आहाराचें जें सार त्याला रस म्हणतात. त्याचें प्रमाण नऊ ओंझळी आहे. पार्थिव परमाणूंच्या संयोगास कारण होणाऱ्या जलाच्या दहा ओंझळी, विष्ठेच्या सात, जठराग्नीच्या परिपाकानें ज्याला लाल रंग आला आहे अशा रक्तनांवाच्या अन्नरसाच्या आठ ओंझळी, कफाच्या सहा, पित्तसंज्ञक तेजाच्या पांच, मूत्राच्या चार, वसेच्या तीन, मेदाच्या दोन, मज्जेची एक, मस्तकांत श्लेष्मसाराची अर्धी व सातव्या शुक्रधातूची ही अर्धी ओंझळ, हें प्रमाण आहे. हें प्रमाण ज्याच्या शरीरांतील धातु सम आहेत, त्याच्या धातूंचेंच आहे. कारण विषम धातु झाल्यास प्रमाण बदलणें अगदीं संभवनीय आहे. त्या विषम धातूंच्या प्रमाणाचा कांहीं नियम करवत नाहीं. आयुर्वेदांतही ' शरीरें विलक्षण व अस्थिर असल्यामुळें वातादि दोष, रसादि धातु व विष्ठादि मळ यांचें नियत परिमाण असत नाहीं ' असें म्हटलें आहे. हाडें, स्नायु इत्यादिकांनीं बनविलेलें व म्हणूनच अशुद्धतेचें निदान, असें हें शरीर अस्थिर आहे, अशी ज्याची मति होते तो धन्य व मेधावी पुरुष मोक्षाला योग्य होतो. कारण वैराग्य व नित्यानित्यविवेक हे दोन मोक्षाचे उपाय आहेत. शरीर हाडें, मूत्र, विष्ठा इत्यादिकांनीं भरलेलें असतें, असें समजणें हेंच वैराग्याचें कारण आहे.

म्हणून भगवान् व्यासांनीं 'सर्व अशुचित्वाचें निधान, कृतघ्न, व विनाश पावणारें अशा शरीराकरितांही मूढ पाप करितात. या शरीराच्या आंत जें आहे तेंच जर बाहेर असतें तर या जनांनीं हातांत काठी घेऊन कावळे व कुत्रें यांचें निवारण केलें असतें.' असें म्हटलें आहे. यास्तव असल्या निंद्य शरीराची सर्वथा निवृत्ति व्हावी, म्हणून आत्म्याच्या उपासनेविषयीं यत्न करावा १०५–१०७.

आतां उपासनीय आत्म्याचें स्वरूप सांगतात--

द्वासप्ततिसहस्राणि हृदयादभिनिःसृताः ।
हिताहिता नाम नाड्यस्तासां मध्ये शशिप्रभम् ॥ १०८ ॥
मण्डलं तस्य मध्यस्थ आत्मा दीप इवाचलः ।
स ज्ञेयस्तं विदित्वेह पुनराजायते न तु ॥ १०९ ॥

कळंबाच्या पुष्पांतील केंसराप्रमाणें हृदयप्रदेशांतून बाहेर पडलेल्या व हिताहित करण्यानें, हिताहित संज्ञेस प्राप्त झालेल्या बहात्तर हजार नाड्या असतात. त्यांतील इडा व पिंगळा या नांवाच्या दोन नाड्या डाव्या व उजव्या बाजूस आहेत त्या हृदयांतून निघून नासाविवराशीं संबद्ध होत्सात्या प्राण व अपान यांचें स्थान होतात. तिसरी एक सुषुम्ना या नांवाची नाडी सरळ दंडासारखी त्या दोन नाड्यांच्यामध्यें असून ती ब्रह्मरंध्रांतून निघाली आहे. या तीन नाड्यांच्या मध्यभागीं चंद्रासारखें प्रभावान् मंडल असून त्यांत आत्मा वातरहित प्रदेशांतील दीपाप्रमाणें अचल व प्रकाशयुक्त असतो, त्याला जाणावें. त्याच्या साक्षात्कारानें पुरुष पुनः या संसारांत येत नाहीं, तर अमृतत्वास प्राप्त होतो १०८, १०९.

ज्ञेयं चारण्यकमहं यदादित्यादवाप्तवान् ।
योगशास्त्रं च मत्प्रोक्तं ज्ञेयं योगमभीप्सता ॥ ११० ॥

इतर विषयांचा तिरस्कार करून चित्तवृत्तीला आत्म्यामध्यें स्थिर करणें, हा योग होय. त्याच्या प्राप्त्यर्थ आदित्यापासून बृहदारण्यक या नांवाचें जें साधन मी संपादन केलें आहे तें अवश्य जाणावें. त्याचप्रमाणें मी जें योगशास्त्र सांगितलें आहे तेंही योगाची इच्छा करणारानें जाणावें ११०

आतां या आत्म्याचें ध्यान कसें करावें, तें सांगतात--

अनन्यविषयं कृत्वा मनोबुद्धिस्मृतीन्द्रियम् ।
ध्येय आत्मा स्थितो योऽसौ हृदये दीपवत्प्रभुः ॥ १११ ॥

आत्मव्यतिरिक्त विषयांपासून मन, बुद्धि, स्मृति व इंद्रियें यांचें प्रत्याहरण करून त्यांना केवल आत्म्याकडे लावावें. जो हा प्रभु निवात प्रदेशांतील प्रदीपाप्रमाणें देदीप्य, व अचल हृदयांत राहतो तो ध्येय ( ध्यानास योग्य ) आहे. चित्तवृत्तीला बाह्य विषयांना प्रकाशित

करूं न देतां केवल आत्ममय करणें, लोटक्यांतील दिव्याच्या ज्योतीप्रमाणें बाहेर पसरूं न देणें, हीच त्याची ध्येयता होय. आत्मैकनिष्ठतेलाच आत्मप्रवणता म्हणतात १११.

पण ज्या साधकाची चित्तवृत्ति, आलंबन आकाररहित असल्यामुळें, समाधींत अभिरत होत नाहीं, त्यानें शब्दब्रह्माची उपासना करावी, असें आतां सांगतात—

यथाविधानेन पठन्सामगायमविच्युतम् ।
सावधानस्तदभ्यासात्परं ब्रह्माधिगच्छति ॥ ११२ ॥

स्वाध्याय करीत असतांना अवगत झालेला मार्ग न सोडतां, प्रगीतमंत्र सोडून बाकीचें सामगान अस्खलित म्हणत आत्म्याच्या ठिकाणींच एकाग्र चित्तवृत्ति करणारा व त्याचाच अभ्यास करून त्यांत निष्णात झालेला साधक शब्दाकार शून्याच्या उपासनेनें परब्रह्मास प्राप्त होतो. 'शब्दब्रह्मणि निष्णातः परं ब्रह्माधिगच्छति' असें म्हटलेंही आहे ११२.

ज्याचें चित्त वैदिक गीतीमध्यें रमत नसेल त्यानें लौकिक गीताच्या योगानें आत्मानुसंधान ठेवून त्याची उपासना करावी, असें सांगतात–

अपरान्तकमुल्लोप्यं मद्रकं मकरीं तथा ।
औवेणकं सरोविन्दुमुत्तरं गीतकानि च ॥ ११३ ॥
ऋग्गाथा पाणिका दक्षविहिता ब्रह्मगीतिका ।
गेयमेतत्तदभ्यासकारणान्मोक्षसंज्ञितम् ॥ ११४ ॥

अपरान्तक, उल्लोप्य, मद्रक, मकरी, औवेणक, सरोविंदु, व उत्तर अशीं सात प्रकरणसंज्ञक गीतें आहेत. ११३ व्या श्लोकाच्या शेवटीं 'च' असा जो शब्द आहे त्यावरून आसारित, वर्धमान, इत्यादि महागीतें घ्यावीं. ऋग्गाथा, पाणिका, दक्षविहिता व ब्रह्मगीतिका या चार प्रकारच्या गीति, यांचें गायन करावें. त्याचा अभ्यास केल्यानें तें मोक्षाचें साधन होतें. म्हणून त्याला मोक्ष अशीही संज्ञा योजितात ११३, ११४.

वीणावादनतत्त्वज्ञः श्रुतिजातिविशारदः ।
तालज्ञश्चाप्रयासेन मोक्षमार्गं नियच्छति ॥ ११५ ॥

भरतादि मुनींनीं प्रतिपादिलेल्या वीणावादनाचें तत्व जाणणारा, सप्त स्वरांतील बावीस प्रकारच्या श्रुति व अठरा जाति यांत निपुण असलेला, गीताचें परिमाण कळण्यासाठीं तालाची कल्पना केलेली असते, त्याला चांगलें जाणणारा, कांहीं प्रयासावाचून मुक्तिमार्गास प्राप्त होतो. (षड्ज, मध्यम व धैवत यांच्या प्रत्येकीं चार श्रुति, ऋषभ व धैवत यांच्या प्रत्येकीं तीन आणि गांधार व धैवत यांच्या प्रत्येकीं दोन मिळून बावीस श्रुति आणि षड्जादिक सात शुद्ध व संकरानें झालेल्या अकरा, मिळून अठरा जाति. तालाचा भंग होईल या भयानें चित्तवृत्ति एकाग्र होते व तदनुविद्ध आत्म्याची उपासना केल्यानें मुक्तिमार्ग सुलभ होतो) ११५.

चित्तविक्षेपादि विघ्नांनीं जो आर्त झालेला असतो त्याला दुसरें फळ सांगतात—

गीतज्ञो यदि योगेन नाप्नोति परमं पदम् ।
रुद्रस्यानुचरो भूत्वा तेनैव सह मोदते ॥ ११६ ॥

जर कोणी गीतज्ञ कांहीं प्रतिबंधामुळें योगानें परम पदास प्राप्त झाला नाहीं तर तो रुद्राचा अनुचर ( सचिव ) होऊन त्याच्याशीं क्रीडा करतो ११६.

आतां पूर्वोक्ताचा उपसंहार करितात--

अनादिरात्मा कथितस्तस्यादिस्तु शरीरकम् ।
आत्मनस्तु जगत्सर्वं जगतश्चात्मसंभवः ॥ ११७ ॥

वर सांगितल्याप्रमाणें आत्मा ( क्षेत्रज्ञ ) अनादि आहे. त्याचें शरीरग्रहण करणें हाच आदि ( उद्भव ) सांगितलेला आहे. या प्रकरणाच्या ६९ व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत परमात्म्यापासून पृथिव्यादि सकलभुवनांचा उद्भव, व त्या उद्भवलेल्या पृथिव्यादि भूतसंघातापासून जीवांचा स्थूलशरीररूपानें संभव सांगितला आहे ११७.

आतां याचेंच प्रश्नपूर्वक विवरण करितात--

कथमेतद्विमुह्यामः सदेवासुरमानवम् ।
जगदुद्भूतमात्मा च कथं तस्मिन्वदस्व नः ॥ ११८ ॥

हें सुर-असुर-मनुजादिसहित जग आत्म्यापासून कसें उत्पन्न झालें व त्यांत आत्मा तिर्यक्प्राणी, नर, सर्प इत्यादिकांच्या शरीरास कसा प्राप्त होतो? याविषयीं आम्ही मोहित होतों. यास्तव मोह घालविण्यासाठीं आम्हाला सविस्तर सांग ११८.

मुनींनीं असें विचारलें असतां, योगीश्वर प्रत्युत्तर देतो—

मोहजालमपास्येह पुरुषो दृश्यते हि यः ।
सहस्रकरपन्नेत्रः सूर्यवर्चाः सहस्रकः ॥ ११९ ॥
स आत्मा चैव यज्ञश्च विश्वरूपः प्रजापतिः ।
विराजः सोऽन्नरूपेण यज्ञत्वमुपगच्छति ॥ १२० ॥

या जगांत हें जें स्थूल शरीरादि अनात्म पदार्थांचे ठायीं आत्माभिमानरूप मोहजाल त्याचें निरसन करून त्याहून अगदीं विलक्षण, अनेक हस्त—पाद—नेत्रवान्, सूर्यतुल्य तेजस्वी व अनेक मस्तकयुक्त जो हा पुरुष दिसतो तोच आत्मा, यज्ञ व प्रजापति आहे. कारण तो सर्वात्मक आहे. तो विराटाच्या पुरोडाशादि अन्नरूपानें यज्ञत्वास प्राप्त होतो व यज्ञापासून वृष्ट्यादिकांच्या द्वारा प्रजेची उत्पत्ति होते. ( वर अनेक हस्त—पाद—नेत्र, सहस्र किरण, इत्यादि जें म्हटलें आहे तें त्या त्या हस्त-पादादि शक्तींचा तो पुरुष आधार असल्यामुळें म्हटलें आहे, असें जाणावें. कारण त्याच्या तसल्या स्वरूपाचा साक्षात्कार होणें शक्य नाहीं ) ११९, १२०.

आतां त्याचाच विस्तार करितात—

योदेवदेवतात्यागसंभूतो रस उत्तमः ।
देवान्संतर्प्य स रसो यजमानं फलेन च ॥ १२१ ॥
संयोज्य वायुना सोमं नीयते रश्मिभिस्ततः ।
ऋग्यजुःसामविहितं सौरं धामोपनीयते ॥ १२२ ॥
स्वमण्डलादसौ सूर्यः सृजत्यमृतमुत्तमम् ।
यज्जन्म सर्वभूतानामशनानशनात्मनाम् ॥ १२३ ॥
तस्मादन्नात्पुनर्यज्ञः पुनरन्नं पुनः क्रतुः ।
एवमेतदनाद्यन्तं चक्रं संपरिवर्तते ॥ १२४ ॥

चरु-पुरोडाशादि द्रव्याचा देवतांच्या उद्देशानें त्याग केल्यामुळें जो उत्तम रस उत्पन्न होतो तो देवांस ( म्हणजे तो ज्यानां उद्देशून द्यावयाचा त्यांस ) चांगल्या प्रकारें तृप्त करून व यजमानास इष्ट फल देऊन वायूकडून प्रेरणा केला जाणारा तो चंद्रमंडलास नेला जातो. ( रस म्हणजे आत्म्याचा अदृष्टरूप विलक्षण परिणाम. तो सकल जगाच्या उत्पत्तीचें बीज असल्यामुळें अतिशय उत्तम होय. ) त्या चंद्रमंडलाहून किरणांच्या योगानें भानुमंडलास जातो. ' सैषा त्रय्येव विद्या तपति ' असें श्रुतिवचन असल्यामुळें तो रस ऋग्यजुःसाममयस्वरूपापर्यंत पोंचविला जातो. असो; त्यानंतर सूर्य आपल्या मंडलापासून वृष्टिरूप उत्तम अमृतरस उत्पन्न करतो.तो चराचरांच्या उत्पत्तीचें निमित्त आहे.वृष्टीच्या योगानें झालेल्या औषधिमय व प्रजोत्पत्तीचें निमित्त अशा अन्नापासून पुनः यज्ञ.पूर्वी सांगितल्याप्रमाणें यज्ञापासून पुनः अन्न, अन्नापासून पुनः क्रतु. अशा प्रकारें हें सर्व संसारचक्र प्रवाहरूपानें उत्पत्ति–विनाशावाचूनच सतत चाललें आहे. सारांश, या क्रमानें आत्म्यापासून सकल जगाची उत्पत्ति व त्यांत आत्म्याचा स्वकर्माभिमानानुरूप शरीरपरिग्रह होतो १२१–१२४.

पण आत्म्याचें संसरण जर अनादि व अनंत असेल तर मुक्त होण्याची आशाच करावयास नको, असें कोणी म्हणेल म्हणून सांगतात—

अनादिरात्मा संभूतिर्विद्यते नान्तरात्मनः ।
समवायी तु पुरुषो मोहेच्छाद्वेषकर्मजः ॥ १२५ ॥

आत्मा अनादि असल्यामुळें जरी शरीरास व्यापून राहणाऱ्या त्याची उत्पत्ति संभवत नाहीं तरी पुरुष शरीराशीं समवायी होतो. ( म्हणजे त्या भोगाच्या स्थानांत सुख-दुःखात्मक भोग्यजाताचा उपभोग घेतो. अर्थात अशा प्रकारच्या संबंधानें संबद्ध होतो. ) पण समवाय म्हणजे संबंध,तो स्वाभाविक नव्हे. तर मोह, इच्छा, द्वेष यांच्या योगानें होणाऱ्या कर्मामुळें उद्भवणारा आहे. यास्तव तो ( समवाय, शरीरपुरुषसंबंध )कार्यरूप असल्यामुळें त्याचा विनाश होणें युक्त असून मोक्षाचाही संभव आहे १२५.

आत्म्यापासून जगाचा जन्म होतो, असें सांगितलें. आतां त्याचाच विस्तार करण्याकरितां म्हणतात—

सहस्रात्मा मया यो व आदिदेव उदाहृतः ।
मुखबाहूरुपज्जाः स्युस्तस्य वर्णा यथाक्रमम् ॥ १२६ ॥
पृथिवी पादतस्तस्य शिरसो द्यौरजायत ।
नस्तः प्राणा दिशः श्रोत्रात्स्पर्शाद्वायुर्मुखाच्छिखी ॥ १२७ ॥
मनसश्चन्द्रमा जातश्चक्षुषश्च दिवाकरः ।
जघनादन्तरिक्षं च जगच्च सचराचरम् ॥ १२८ ॥

सकल जीवात्मक व प्रपंचात्मक असल्यामुळें जो हा सहस्रात्मा ( बहुरूप ), तसाच सकल जगाचा हेतु असल्यामुळें आदिदेव म्हणून मी तुम्हांला सांगितला त्याच्या मुख, भुजा, मांड्या व पाय यांपासून क्रमानें ब्राह्मणादि चार वर्ण झाले. त्याचप्रमाणें त्याच्या पायांपासून भूमि, मस्तकापासून देवलोक, घ्राणापासून प्राण, कानापासून दिशा, स्पर्शापासून वायु, मुखापासून अग्नि, मनापासून चंद्र, नेत्रांपासून सूर्य, जघनापासून आकाश व चराचर जग झालें १२७-१२८.

आतां याविषयीं प्रश्न करितात—

यद्येवं स कथं ब्रह्मन्पापयोनिषु जायते ।
ईश्वरः स कथं भावैरनिष्टैः संप्रयुज्यते ॥ १२९ ॥

हे योगीश्वरा, आत्माच जर जीवादिभावांस प्राप्त होतो तर तो पशु—पक्ष्यादि पापयोनींत कसा उत्पन्न होतो ? आतां मोह, राग, द्वेष इत्यादि दोषांनीं दूषित झाल्यामुळें त्याचा त्या योनींत जन्म होतो, म्हणून म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण स्वतंत्र असतांना तो ईश्वर मोह-रागादिभावानीं कसा युक्त होतो ? १२९.

करणैरन्वितस्यापि पूर्वं ज्ञानं कथं च न ।
वेत्ति सर्वगतां कस्मात्सर्वगोऽपि न वेदनाम् ॥ १३० ॥

आत्मा जीव होतो, असें म्हटल्यास हेंहीं एक दूषण येतें. मनःप्रभृति ज्ञानोपायांनी युक्त असलेल्याही त्याचें पूर्वज्ञान ( जन्मान्तरांतील विषयांचें स्मरण ) कां उद्भवत नाहीं. त्याचप्रभाणें तो स्वतः सर्वगत व सर्वज्ञ असतांनाही सर्व प्राण्यांच्या ठिकाणची सुखादि वेदना कां जाणत नाहीं ? तस्मात् आत्मा ईश्वरच जीवादिभावास प्राप्त होतो, हें म्हणणें अयुक्त आहे १३०.

आतां वरील प्रश्नांतील पहिल्याचें उत्तर देतात—

अन्त्यपक्षिस्थावरतां मनोवाक्कायकर्मजैः
दोषैः प्रयाति जीवोऽयं भवयोनिशतेषु च ॥ १३१ ॥

ईश्वर स्वरूपानें जरी सत्यज्ञानानन्दलक्षण असला तरी अविद्यावेशामुळें मोह-रागादि दोषानीं दूषित होऊन नाना हीन योनींत उत्पन्न होण्याचें साधन मानसादि त्रिविध कर्म करतो. त्यामुळें अंत्यजादि, हीनयोनित्वास तो प्राप्त होतो. अन्त्य ह्मणजे चांडालादि. पक्षी—कावळे वगैरे. स्थावर—वृक्षादि. या भावांस क्रमानें मन, वाणी व शरीर यांच्या योगानें केलेल्या कर्मांच्या दोषांनीं तो आत्मा सहस्त्रावधि जन्मांत जीव होतो १३१.

अनन्ताश्च यथाभावाः शरीरेषु शरीरिणाम् ।
रूपाण्यपि तथैवेह सर्वयोनिषु देहिनाम् ॥ १३२ ॥

जसे जीवाच्या शरीरांत सत्त्वादिकांच्या उद्रेकाच्या ( उत्कर्षाच्या ) न्यूनाधिकतेप्रमाणें अनन्त अभिप्राय असतात तशीं त्यांचीं कार्यें ( ह्मणजे कुबडें, गिड्डें इत्यादि रूपेंही ) प्राण्यांच्या सर्व योनींत होतात १३२.

पण कुबडेपणा इत्यादि: रूपें जर कर्मजन्य आहेत तर तीं कर्मानंतरच ( कर्म संपतांच तत्काल ) कां होत नाहींत ? अशी शंका घेऊन सांगतात.—

विपाकः कर्मणां प्रेत्य केषांचिदिह जायते ।
इह वामुत्र वैकेषां भावस्तत्र प्रयोजनम् ॥ १३३ ॥

ज्योतिष्टोमादि कांहीं कर्मांचा विपाक ( फल ) दुसऱ्या देहांत होतो. कांहीं प्रजेपासून कर घेऊन पाऊस पडावा, ह्मणून केलेल्या कारीर्यादि इष्टींचें वृष्टि इत्यादि फळ येथेंच मिळतें. कांहीं चित्रादि कर्मांचें पश्वादि फळ येथें किंवा दुसऱ्या देशांतही, असें अनियतपणें मिळतें. अर्थात् प्रत्येक कर्माचें फळ लागलेंच मिळालें पाहिजे असा कांहीं शास्त्रार्थ नाहीं. येथें कर्मांचा शुभाशुभ फलभाव उत्पन्न करावयाचा झाल्यास त्याचें निमित्त सत्त्वादि भावच आहे. फलाचें तारतम्य सत्त्वादिकांच्या तारतम्यावर अवलंबून असत १३३.

मन, वाणी व शरीर यांच्या योगानें होणाऱ्या कर्मांमुळें अन्त्यादि योनि प्राप्त होतात, असें सांगितलें. आतां त्याचाच प्रपंच करण्याकरितां ह्मणतात—

परद्रव्याण्यभिध्यायंस्तथानिष्टानि चिन्तयन् ।
वितथाभिनिवेशी च जायतेऽन्त्यासु योनिषु ॥ १३४ ॥

मी परधनाचा अपहार कसा करूं शकेन, असें मुख्यतः ध्यान करणारा, त्याचप्रमाणें हिंसात्मक ब्रह्महत्यादि अनिष्ट कर्में मी करीन, असें चिंतन करणारा व मिथ्याभूत वस्तूविषयीं पुनः पुनः संकल्प करणारा, चांडालादि अन्त्ययोनींत उत्पन्न होतो १३४.

पुरुषोऽनृतवादी च पिशुनः परुषस्तथा ।
अनिबद्धप्रलापी च मृगपक्षिषु जायते ॥ १३५ ॥

खोटें भाषण करण्याचेंच ज्याचें शील आहे तो पुरुष, चहाडखोर, दुसऱ्याच्या मनाला उद्वेग उत्पन्न होईल, असें कठोर भाषण करणारा व असंबद्ध प्रलाप करणारा, ( म्हणजे प्रकृताशीं ज्याचा कांहीं संबंधच नाहीं, असें भाषण करणारा ) यांतील प्रत्येक बुद्धिपूर्व तो तो दोष करणें, अबुद्धिपूर्व करणें, वारंवार करणें, इत्यादि न्यूनाधिकतेप्रमाणें हीन, उत्कृष्ट इत्यादि पशु-पक्ष्यांमध्यें उत्पन्न होतात १३५.

अदत्तादाननिरतः परदारोपसेवकः ।
हिंसकश्चाविधानेन स्थावरेष्वभिजायते ॥ १३६ ॥

दुसऱ्याच्या धनाचा अपहार करण्यांत निरत असणारा, परस्त्रीच्या ठायीं आसक्त झालेला व अविहित मार्गानें प्राण्यांचा घात करणारा, दोषांच्या गुरुलघुभावाच्या न्यूनाधिकते-प्रमाणें वृक्ष, लता, प्रतान इत्यादि स्थावरांमध्यें उत्पन्न होतो १३६.

आतां सत्त्वादि गुणांचा परिपाक सांगतात—

आत्मज्ञः शौचवान्दान्तस्तपस्वी विजितेन्द्रियः ।
धर्मकृद्वेदविद्यावित्सात्त्विको देवयोनिताम् ॥ १३७ ॥

जो विद्या, धन, कुल इत्यादिकांचा अभिमान न बाळगणारा, बाह्याभ्यंतर शौचवान्, उपशमवान्, कृच्छ्रादितपोयुक्त, विषयामध्यें आसक्त न होणारा, नित्य व नैमित्तिक-धर्मानुष्ठानामध्यें निरत व वेदार्थज्ञ असतो तो सात्त्विक होय. तो सत्त्वगुणाच्या आधिक्यानु-सार उत्तरोत्तर उत्कृष्ट उत्कृष्ट देवयोनीस प्राप्त होतो १३७.

असत्कार्यरतोऽधीर आरम्भी विषयी च यः ।
स राजसो मनुष्येषु मृतो जन्माधिगच्छति ॥ १३८ ॥

जो वाद्यें वाजविणें, नृत्य इत्यादिकांमध्यें अतिशय रत असतो, तसाच जो अधीर ( व्यग्रचित्त ), सदा कार्यामध्यें आकुल व विषयांमध्यें अतिशय आसक्त असतो, तो रजोगुणी होय. त्या गुणाच्या उत्कर्षाच्या न्यूनाधिकतेप्रमाणें तो हीन व उत्कृष्ट मनुष्यजातींत जन्म घेतो १३८.

निद्रालुः क्रूरकृल्लुब्धो नास्तिको याचकस्तथा ।
प्रमादवान् भिन्नवृत्तो भवेत्तिर्यक्षु तामसः ॥ १३९ ॥

तसाच जो निद्राशील, प्राण्यांस पीडा देणारा, लोभयुक्त, नास्तिक, धर्मादिकांची निंदा करणारा, याचनशील, कार्याकार्यविवेकशून्य, व विरुद्धाचरण करणारा, तो तमोगुणयुक्त होय. तो त्या गुणाच्या तारतम्याप्रमाणें हीन, हीनतर पश्वादियोनींमध्यें उत्पन्न होतो १३९.

आतां या विषयाचा उपसंहार करितात—

रजसा तमसा चैवं समाविष्टो भ्रमन्निह ।
भावैरनिष्टैः संयुक्तः संसारं प्रतिपद्यते ॥ १४० ॥

याप्रमाणें अविद्येनें आविद्ध झालेला हा आत्मा रज व तम यांनीं जणु काय चांगला संसारच केल्याप्रमाणें या संसारांत पर्यटन करीत, नानाप्रकारच्या दुःखांस देणाऱ्या भावांच्या योगानें पराभूत होत्साता पुनः पुनः देहग्रहणरूप संसारास प्राप्त होतो. यास्तव, तो ईश्वर अनिष्ट भावांनीं कसा युक्त होतो, या प्रश्नाला अवकाशच रहात नाहीं १४०.

आतां ' करणैरन्वितस्यापि ' ( श्लो. १३० ) या वचनानें जी शंका घेतली होती तिचें निरसन करतात—

**मलिनो हि यथादर्शो रूपालोकस्य न क्षमः ।**
**तथाविपक्वकरण आत्मज्ञानस्य न क्षमः ।। १४१ ।।**

जरी आत्मा अन्तःकरणादि ज्ञानसाधनांनीं संपन्न असतो तरी पूर्वजन्मीं अनुभविलेल्या विषयांच्या स्मरणास तो समर्थ नसतो. कारण, मळानें आच्छादित झालेला आरसा रूप पाहण्यास जसा योग्य नसतो त्याप्रमाणें ज्याचें अंतःकरण राग-द्वेषादि मलांनीं मलिन झालेलें असतें तो पूर्वीच्या स्मरणास असमर्थ असतो १४१.

**शंका**—पण पूर्व जन्मींचें ज्ञानही आत्म्याकडूनच प्रकाशित झालेलें असल्यामुळें व तें स्वतःसिद्ध असल्यामुळें त्याचें विस्मरण होणें योग्य नव्हे !

**समाधान**—तें कसें होतें तें सांगतों, ऐक—

**कट्वेर्वारौ यथापक्वे मधुरः सन्रसोऽपि न ।**
**प्राप्यते ह्यात्मनि तथा नापक्वकरणे ज्ञता ।। १४२ ।।**

न पिकलेल्या कडु कांकडींत असणाराही मधुर रस जसा उपलब्ध होत नाहीं, त्याचप्रमाणें ज्याच्या अंतःकरणांतील रागादि दोष परिपक्व झालेले नसतात त्याच्यांतील विद्यमान ज्ञाताही (' ज्ञातृत्वही पूर्वजन्मांत अनुभवलेल्या वस्तूंचें स्मरणही ) उद्भवत नाहीं १४२.

आतां १३० व्या श्लोकाच्याच उत्तरार्धांत जो आक्षेप केला होता, त्याचें समाधान सांगतात—

**सर्वाश्रयां निजे देहे देही विन्दति वेदनाम् ।**
**योगी मुक्तश्च सर्वासां योगमाप्नोति वेदनाम् ।। १४३ ।।**

जो देहाभिमानवान् असतो, देहच मी असें जाणतो, तो आध्यात्मिक, आधिभौतिक व आधिदैविक, अशी तीन प्रकारची सुख-दुःखवेदना ( सुख-दुःखसाक्षात्कार ) त्या स्वकर्मोपार्जित देहांतच अनुभवितो. दुसऱ्याच्या शरीरांतील वेदना त्याच्या अनुभवास येत नाहीं. कारण त्याचें तें शरीर ज्या अदृष्टापासून झालेलें असतें तें ( अदृष्ट ) तसेंच विलक्षण असतें. पण जो योगी मुक्त ( अहंकाररहित ) असतो तो सर्व क्षेत्रगत वेदना जाणूं शकतो. कारण त्याचें अंतःकरण रागादिकांच्या परिपाकामुळें शुद्ध झालेलें असतें १४३.

पण-आत्मा जर एकच आहे तर देव, मनुष्य इत्यादिकांच्या देहांत येणारा भेदप्रत्यय उपपन्न होत नाहीं, अशी आशंका घेऊन सांगतात—

आकाशमेकं हि यथा घटादिषु पृथग्भवेत् ।
तथात्मैको ह्यनेकश्च जलाधारेष्विवांशुमान् ॥ १४४ ॥

ज्याप्रमाणें एकच आकाश कूप, कुंभ इत्यादि उपाधि-भेदांमुळें भिन्न झालें असतां नाना असल्याचा अनुभव येतो; किंवा ज्याप्रमाणें एकही सूर्य, निरनिराळ्या जलपात्रांत निरनिराळा व त्यामुळेंच अनेक असल्याचा भास होतो तसा एकच आत्मा अंतःकरणोपाधि भेदामुळें अनेक असल्यासारखा अनुभव येतो. पण हा प्रतीत होणारा आत्म्याचा भेद पारमार्थिक नव्हे हें व्यक्त करण्याकरितां येथें जलांतील प्रतिबिंबाचा दुसरा दृष्टांत घेतला आहे १४४.

'पञ्चधातूनस्वयं षष्ठ आदत्ते०' इत्यादि वर सांगितलेल्या सिद्धान्ताचाच उपसंहार करून सांगतात—

ब्रह्मखानिलतेजांसि जलं भूश्चेति धातवः ।
इमे लोका एष चात्मा तस्माच्च सचराचरम् ॥ १४५ ॥

आत्मा, आकाश, वायु, तेज, जल व भूमि हे पदार्थ शरीरास व्यापून धारण करितात, म्हणूनच त्यांना येथें धातु असें म्हटलें आहे. त्यांतील आकाशादि पांच लोक ( ज्ञानविषय ) व म्हणूनच जड आहेत आणि हा सहावा आत्मा चिद्धातु आहे, या जड-अजड-समुदायापासून स्थावर जंगमात्मक जग निर्माण होतें १४५.

हा आत्मा जग कसें उत्पन्न करतो, तें सांगतात—

मृद्दण्डचक्रसंयोगात्कुम्भकारो यथा घटम् ।
करोति तृणमृत्काष्ठैर्गृहं वा गृहकारकः ॥ १४६ ॥
हेममात्रमुपादाय रूपं वा हेमकारकः ।
निजलीलासमायोगात्कोशं वा कोशकारकः ॥ १४७ ॥
कारणान्येवमादाय तासु तास्विह योनिषु ।
सृजत्यात्मानमात्मा च संभूय करणानि च ॥ १४८ ॥

ज्याप्रमाणें कुंभार माती, चक्र, इत्यादि सर्व साधनें घेऊन घागर, मोघा इत्यादि नानाविध कार्यसमूह करतो, अथवा घर बांधणारा, तृण, माती, काष्ठें, इत्यादि परस्पर सापेक्ष असलेल्या वस्तूंच्या योगानें गृह हें कार्य करतो, अथवा सोनार नुस्तें सोनें किंवा रुपें घेऊन त्याचेंच कडें, कुंडल इत्यादि करतो, किंवा एका प्रकारचा ( कोष्ठी या नांवाचा ) किडा आपल्या लाळेपासूनच तंतु निर्माण करून आपल्याच बंधनास कारण होणारा कोश आरंभितो त्याप्रमाणें आत्माही परस्पर सापेक्ष असलेल्या पृथिव्यादि साधनांचें ग्रहण करून श्रोत्रादि

इंद्रियांचाही स्वीकार करून या संसारांत त्या त्या देव-मानवादि योनींत स्वतः आपला शरीररूपी बंध उत्पन्न करतो १४८.

विषयसंबंधी ज्ञान, इंद्रियें, इत्यादिकांहून भिन्न आत्म्याच्या अस्तित्वाविषयीं काय प्रमाण आहे ? अशी शंका घेऊन सांगतात—

**महाभूतानि सत्यानि यथात्मापि तथैव हि ।**
**कोऽन्यथैकेन नेत्रेण दृष्टमन्येन पश्यति ।। १४९ ।।**

प्रमाणांनीं गम्य असल्यामुळें पृथिव्यादि महाभूतें जशीं सत्य आहेत तसा आत्माही सत्य आहे. कारण ज्ञानेंद्रियांहून अगदीं निराळा असा ज्ञाता जर नित्य नसता तर एका चक्षुरिन्द्रियानें पाहिलेली वस्तु दुसऱ्या स्पर्शेंद्रियानें कोण जाणता ? पाहणारा व स्पर्श करणारा कोणी एकच असल्यावाचून 'ज्याला मीं पाहिलें त्यालाच हा आतां स्पर्श करीत आहे, असा जो प्रत्येकाला अनुभव येत असतो, तो उपपन्न होत नाहीं १४९.

**वाचं वा को विजानाति पुनः संश्रुत्य संश्रुताम् ।**

त्याचप्रमाणें कोणा एकाद्या पुरुषाची वाणी पूर्वीं ऐकून पुनः ती कधीं ऐकल्यास ही अमक्याची वाणी आहे, असें कोण ओळखता ? तस्मात् ज्ञानेंद्रियांहून अतिरिक्त असा दुसरा कोणी ज्ञाता नित्य आहे, हें सिद्ध झालें.

**अतीतार्थ स्मृतिः कस्य को वा स्वप्नस्य कारकः ।। १५० ।।**
**जातिरूपवयोवृत्तविद्यादिभिरहङ्कृतः ।।**
**शब्दादिविषयोद्योगं कर्मणा मनसा गिरा ।। १५१ ।।**

जर आत्मा नित्य नसता तर पूर्वानुभवानें भावित संस्कारांपासून उत्पन्न होणारी स्मृति कोणाला झाली असती ? कारण दुसऱ्यानें पाहिलेली वस्तु तिसऱ्याला कधीं आठवत नाहीं. त्याचप्रमाणें स्वप्नज्ञानाचा कारक ( स्वप्नज्ञान करविणारा ) कोण ? अज्ञानांत लीन झालेलीं इंद्रियें कारक होऊं शकत नाहींत. मीच उत्तम जातिमान्, सुंदर, तरुण, सदाचारवान् व विद्वान् असा अहंकार स्थिर नसलेल्या आत्म्याला कसा होऊं शकेल ? त्याचप्रमाणें शब्दस्पर्शादि विषयोपभोगांचीं सिद्धि व्हावी म्हणून मन, वाणी व शरीर यांच्या योगानें उद्योग कोण करणार ? यास्तव हें सर्व करणारा ज्ञानेंद्रियातिरिक्त आत्मा नित्य आहे, ही गोष्ट सिद्ध झाली १५०, १५१.

विशेष प्रकारच्या उपासनेचें विधान करण्यास्तव संसाराच्या स्वरूपाचें वर्णन करतात.

**स संदिग्धमतिः कर्मफलमस्ति न वेति वा ।**
**विप्लुतः सिद्धमात्मानमसिद्धोऽपि हि मन्यते ।। १५२ ।।**

हा जो पूर्वोक्त आत्मा तो अहंकारानें दूषित होऊन व सर्व कर्मांमध्यें कांहीं फल आहे कीं नाहीं, असें बोलून संदिग्धबुद्धि होतो. त्याचप्रमाणें तो असिद्ध असूनही आपल्याला कृतार्थ समजतो १५२.

मम दाराः सुतामात्या अहमेषामिति स्थितिः ।
हिताहितेषु भावेषु विपरीतमतिः सदा ॥ १५३ ॥

ज्याची मति अहंकारानें दूषित झालेली आहे त्याची-माझी भार्या, माझे पुत्र, माझे हे अमात्य, व मी त्यांचा-अशी अत्यंत ममताकुल स्थिति होते. त्याचप्रमाणें तो सदा हित व अहित करणाऱ्या कार्यांमध्यें विपरीत भावना ठेवतो. ( म्हणजे हितकर कार्याला अहितकर व अहितकराला हितकर समजतो ) १५३.

ज्ञेयज्ञे प्रकृतौ चैव विकारे वा विशेषवान् ।
अनाशकानलापातजलप्रपतनोद्यमी ॥ १५४ ॥
एवंवृत्तोऽविनीतात्मा वितथाभिनिवेशवान् ।
कर्मणा द्वेषमोहाभ्यामिच्छया चैव बध्यते ॥ १५५ ॥

जो ज्ञेयाला जाणतो तो ज्ञेयज्ञ ( विषयांस जाणणारा ) त्यामध्यें, त्याचप्रमाणें. सत्वादि गुणांची साम्यावस्था एतद्रूप आत्म्याची जी प्रकृति तिच्यामध्यें, व अहंकारादि विकारांमध्यें तो आत्मा अविशेषवान् ( म्हणजे विवेकानभिज्ञ, त्यांस पृथक् पृथक् न जाणणारा ) होतो. त्याचप्रमाणें तो उपाशीं राहून मरणें, अग्नींत व जलांत प्रवेश करणें, इत्यादि आत्मघातक कर्मांमध्यें अविवेकामुळेंच प्रवृत्त होतो. येणेंप्रमाणें नानाप्रकारच्या कार्यांत प्रवृत्त झालेला तो अनम्र ( अनियतचित्त, अजितेंद्रिय ) असत्कार्याविषयीं आग्रह धरून, त्याच्या पासून होणाऱ्या सर्व कर्मांच्या, रागद्वेषांच्या व मोहाच्या योगानें बद्ध होतो १५४, १५५.

शरीरग्रहण केल्यानें पुनः त्याला विश्वास कसा येतो, तें सांगतात—

आचार्योपासनं वेदशास्त्रार्थेषु विवेकिता ।
तत्कर्मणामनुष्ठानं सङ्गः सद्भिर्गिरः शुभाः ॥ १५६ ॥
स्त्र्यालोकालम्भविगमः सर्वभूतात्मदर्शनम् ।
त्यागः परिग्रहाणां च जीर्णकाषायधारणम् ॥ १५७ ॥
विषयेन्द्रियसंरोधस्तन्द्रालस्यविवर्जनम् !
शरीरपरिसंख्यानं प्रवृत्तिष्वघदर्शनम् ॥ १५८ ॥
नीरजस्तमसा सत्वशुद्धिर्निःस्पृहता शमः ।
एतैरुपायैः संशुद्धः सत्त्वयोग्यमृती भवेत् ॥ १५९ ॥

विवेकरितां आचार्यांची सेवा, वेदान्ताच्या अर्थांमध्यें व पातञ्जलादि योगशास्त्रामध्यें विवेकित्व, त्या शास्त्रांनीं प्रतिपादन केलेल्या-ध्यान- योगादि व कर्मादि-यांचें अनुष्ठान, सत्पुरुषांचा समागम, प्रिय व हित वचन, स्त्रियांचें दर्शन व प्राप्ति यांचा परित्याग, सर्व

भूतांच्या ठिकाणीं आपल्याप्रमाणेंच सुख-दुःखादि पाहणें,समत्वदर्शन,पुत्र–क्षेत्र–कलत्रादिकांचा त्याग, जीर्ण व काषायवस्त्र परिधान करणें, शब्दादि विषयांच्या ठिकाणीं होणाऱ्या श्रोत्रादि इंद्रियांच्या प्रवृत्तीचा निरोध, तंद्रा ( निद्रेच्या पूर्वीची आळशी स्थिति ) व आलस्य ( उत्साहराहित्य ) यांचा त्याग, शरीरांतील अस्थिरत्व, अशुचित्व, इत्यादि दोषांचें अनुसंधान, जाणें, येणें, इत्यादि सर्वप्रकारच्या प्रवृत्तींत सूक्ष्म प्राण्यांचा वध इत्यादि दोष घडतात, या गोष्टींचा विचार, प्राणायामादिकांच्या योगानें रजस्तमोरहित अशी भावशुद्धि ( चित्तशुद्धि ), विषयांविषयीं अभिलाष न धरणें, बाह्य व आंतर इंद्रियांचा संयम, या उपायांच्या योगानें पुरुष उत्तम शुद्ध, केवल सत्वयुक्त व ब्रह्माच्या उपासनेनें मुक्त ( अमृती ) होतो १५६-१५९.

त्याला अमृतत्वप्राप्ति कशी होते, तें सांगतात—

**तत्त्वस्मृतेरुपस्थानात्सत्त्वयोगात्परिक्षयात् ।**
**कर्मणां सन्निकर्षाच्च सतां योगः प्रवर्तते ॥ १६० ॥**

आत्मसंज्ञक तत्त्वाचें स्मरण अंतःकरणांत निश्चल उपस्थित झाल्यामुळें केवळ सत्त्वगुणाचा योग झाल्यामुळें ( चित्तशुद्धि झाल्यामुळें ), कर्मबीजांचा परिक्षय झाल्यामुळें व सत्पुरुषांचा संबंध झाल्यामुळें आत्मयोग प्रवृत्त होतो १६०.

जो दुष्ट संस्कारामुळें पूर्वजन्मास स्मरत नाहीं, त्याची काय गति होते, तें सांगतात–

**शरीरसंक्षये यस्य मनः सत्त्वस्थमीश्वरम् ।**
**अविप्लुतमतिः सम्यग्जातिसंस्मरतामियात् ॥ १६१ ॥**

पण ज्या योग्याचें मन शरीरक्षयाचे वेळीं सत्वयुक्त ( अगदीं एकाग्र ) होऊन ईश्वराचे ठायीं तल्लीन होतें ( त्याचेंच अनुसंधान करीत राहतें ) तो अमूढमति उपासनाप्रयोगांत प्रवीण नसल्यामुळें आत्म्याला जरी प्राप्त झाला नाहीं तरी विशिष्टसंस्कारपटुत्वामुळें पूर्वजन्मीं अनुभविलेल्या कृमि–कीटादि नाना गर्भवासादिकांतील दुःखाला स्मरतो आणि त्याचें स्मरण झाल्यामुळें संसाराविषयीं उद्विग्न होऊन त्याचा उच्छेद करणाऱ्या मोक्षांत प्रवृत्त होतो १६१.

**यथा हि भरतो वर्णैर्वर्णयत्यात्मनस्तनुम् ।**
**नाना रूपाणि कुर्वाणस्तथात्मा कर्मजास्तनूः ॥ १६२ ॥**

जसा नट राम–रावणादिकांचीं नानारूपें धारण करितांना काळ्या, पांढऱ्या, पिवळ्या इत्यादि वर्णांनीं आपलें स्वरूप रंगवितो तसाच आत्मा त्या त्या कर्मफलांच्या उपभोगाकरितां कर्मनिमित्त नानारूपें ( गिड्डा, उंच, कुबडा, इत्यादि नानाशरीरें ) धारण करतो. ( आत्मा एकाद्या नटाप्रमाणें कर्मानुसार अनेक शरीरभूमिका घेतो ) १६२.

**कालकर्मात्मबीजानां दोषैर्मातुस्तथैव च ।**
**गर्भस्य वैकृतं दृष्टमङ्गहीनादि जन्मतः ॥ १६३ ॥**

केवल कर्मच कुबडेपणा, गिड्डेपणा, इत्यादिकांचें कारण आहे असें नाहीं, तर काल, कर्म, पित्याच्या कारणबीजांतील दोष, मातेमधील दोष इत्यादि हें सर्व त्याचें सहकारी कारण आहे. अर्थात् शरीराच्या विशेष आकारादिकांचें दृष्ट व अदृष्ट असें दोन्ही प्रकारचें कारण संभवत असल्यामुळें गर्भाचा अंगहीनत्वादि विकार जन्मापासूनच दिसतो. ( म्हणजे त्याचा कांहीं निश्चित काल नाहीं ) १६३.

**शंका**--पण प्राकृतिक प्रलय झाला असतां महत्तत्वादि सर्व विकार नष्ट होत असल्यामुळें त्याबरोबर सर्व कर्मांचाही नाश होणें साहजिक आहे. तेव्हां प्रलयसमयीं कर्मांचाच अभाव असतांना पुनः सृष्टीचा समय आला असतां, कर्मांच्या निमित्तानेंच प्राप्त होणाऱ्या शरीराचा परिग्रह कसा होणार? ( म्हणजे कर्मेंच जर नाहींत तर तन्निमित्त शरीर कोठचें ? )

**समाधान**--

**अहङ्कारेण मनसा गत्या कर्मफलेन च ।**
**शरीरेण च नात्मायं मुक्तपूर्वः कथंचन ॥ १६४ ॥**

मन व अहंकार प्रसिद्ध आहेत. गति म्हणजे संसरणास कारण होणारा दोषराशि, धर्म व अधर्मरूप कर्मफल, व लिंगात्मक शरीर यांच्या योगानें आत्मा कधींही मुक्त होत नाहीं. ( ज्ञान होऊन निर्वाण प्राप्त होईतों तो संसार करीत राहतो ) १६४.

**शंका**—पण ज्याचें कर्म नियत आहे त्या जीवांचा क्षयही नियत कालींच होणें योग्य आहे. ( म्हणजे प्रत्येक जीवाचें कर्म भिन्न भिन्न असल्यामुळें त्यांचा नाशही भिन्नकालीं व भिन्न निमित्तानें होणें युक्त आहे. ) पण अनुभव तसा येत नाहीं. कारण संग्रामादिकांमध्ये म्हणजेच अकालीं व एकाच वेळीं अनेक जीवांचा क्षय होतो, असें दिसतें तें कां ?

**समाधान**—

**वर्त्याधारस्नेहयोगाद्यथा दीपस्य संस्थितिः ।**
**विक्रियापि च दृष्टैवमकाले प्राणसंक्षयः ॥ १६५ ॥**

ज्याप्रमाणें तेलानें भिजलेल्या अनेक वाती पेटविल्या असतां त्यांच्या अग्रभागीं असलेल्या अनेक ज्वालांची एकाच वेळीं स्थिति होते व मोठा वारा लागणें या विपत्तीमुळें एकाच वेळीं क्षय होतो, त्याप्रमाणें रथी, सारथी, घोडे, हत्ती, इत्यादि जीवांच्या मरणाचा युद्ध हा हेतु एकाच वेळीं उपस्थित झाला असतां एकाच वेळीं अनेकांचा प्राणक्षय होणें अयुक्त नाहीं. तात्पर्य, प्रत्येकाच्या नियत-विपत्ति-हेतुरूप अदृष्टाला त्याच्या विरुद्ध कार्य करणाऱ्या दुष्ट हेतूच्या सामर्थ्यानें प्रतिबंध केल्यामुळेंच असें घडतें १६५.

मोक्षमार्ग सांगतात--

**अनन्ता रश्मयस्तस्य दीपवद्यः स्थितो हृदि ।**
**सितासिताः कर्बुरूपाः कपिला नीललोहिताः ॥ १६६ ॥**

ऊर्ध्वमेकः स्थितस्तेषां यो भित्त्वा सूर्यमण्डलम् ।
ब्रह्मलोकमतिक्रम्य तेन याति परां गतिम् ॥ १६७ ॥

हृदयामध्यें जो हा जीव प्रदीपाप्रमाणें स्थित आहे त्याच्या सुख–दुःखादिकांस कारण होणाऱ्या अनंत नाड्या आहेत. त्यांची संख्या वर ( श्लो. १०८ ) सांगितली आहे. त्या शुभ्र, कृष्ण, कर्बुर इत्यादि रूपानें स्थित आहेत. त्या अनंत रश्मींतील ( नाड्यांतील ) एक रश्मी ऊर्ध्व ( वर ) गेला आहे. तो सूर्य मंडलाचा भेद करून व हिरण्यगर्भाच्या स्थानाचें अतिक्रमण करून राहतो. त्याच्या द्वारा गेल्यानें जीव पुनरावृत्ति–( पुनर्जन्म ) रहित श्रेष्ठ गतीस प्राप्त होतो १६६, १६७.

आतां स्वर्गमार्ग सांगतात––

यदस्यान्यद्रश्मिशतमूर्ध्वमेव व्यवस्थितम् ।
तेन देवशरीराणि सधामानि प्रपद्यते ॥ १६८ ॥

आत्म्याच्या या मुक्तिमार्गभूत किरणाहून दुसरे जे शंभर ऊर्ध्वाकारच रश्मि व्यवस्थित आहेत त्यांच्या द्वारा गमन करून हा जीव तैजस देवशरीरें व केवल सुखभोगस्थानरूप सुंदर सुवर्ण–रत्नखचित देवनगरें यांस प्राप्त होतो १६८.

आतां तिसरा संसारमार्ग सांगतात—

ये नैकरूपाश्चाधस्ताद्रश्मयश्च मृदुप्रभाः ।
इह कर्मोपभोगाय तैः संसरति सोऽवशः ॥ १६९ ॥

त्याच्या अधोभागीं जे अनेक मृदुप्रभावान् रश्मी आहेत त्यांच्या योगाने जाणारा जीव स्वकर्मपरतंत्र होऊन कर्मांच्या फलांचा उपभोग घेण्यासाठीं यालोकीं संसरण करतो १६९

चैतन्य हा आकाशादि भूतांचाच धर्म आहे. या पक्षाचा परिहार करण्यास्तव. सांगतात—

वेदैः शास्त्रैः सविज्ञानैर्जन्मना मरणेन च ।
आर्त्या गत्या तथागत्या सत्येन ह्यनृतेन च ॥ १७० ॥
श्रेयसा सुखदुःखाभ्यां कर्मभिश्च शुभाशुभैः ।
निमित्तशाकुनज्ञानग्रहसंयोगजैः फलैः ॥ १७१ ॥
तारानक्षत्रसंचारैर्जागरैः स्वप्नजैरपि ।
आकाशपवनज्योतिर्जलभूतिमिरैस्तथा ॥ १७२ ॥
मन्वन्तरैर्युगप्राप्त्या मन्त्रौषधिफलैरपि ।
वित्तात्मानं वेद्यमानं कारणं जगतस्तथा ॥ १७३ ॥

'स एष नेति नेति०' 'अस्थूलमनणु०' इत्यादि उपनिषद्वाक्यें, मीमांसा–न्याय इत्यादि शास्त्रें, माझें हें शरीर आहे, इत्यादि अनुभवावरूनच आत्मा शरीराहून भिन्न आहे, अशा-प्रकारचें विज्ञान, व जन्मान्तरानुष्ठित धर्माधर्मांच्या योगानें नियत झालेलें जन्म–मरण यांव-रून आत्मा शरीराहून पृथक् आहे, असें अनुमान होतें. त्याचप्रमाणें जन्मान्तरीं केलेल्या दुष्कर्मांमुळेंच अवश्य प्राप्त होणाऱ्या आर्तींच्या योगानें आणि ज्ञान-इच्छा-प्रयत्न यांच्या-करितां नियत असलेल्या गमनागमनांच्या योगानें आत्मा भौतिक देहाहून निराळा आहे, असें अनुमान होतें. चैतन्य देहाचा धर्म आहे, हा पक्ष संभवत नाहीं. कारण कारणद्रव्यां-तील गुणांच्या क्रमानेंच कार्यद्रव्यामध्यें शब्दादि वैशेषिक गुणांचा आरंभ होतो ( म्हणजे कोणत्याही कार्याच्या कारणांत असलेले गुणच कार्यामध्यें उद्भवत असतात ) असा अनुभव आहे. पण शरीराच्या कारणभूत पृथिवी या भूताच्या परमाणु इत्यादिकांमध्यें चैतन्यादिकांचा समवाय ( नित्यसंबंध ) संभवत नाहीं, कारण त्याच पृथिवी भूतापासून होणाऱ्या खांब, भिंत इत्यादिकांमध्यें चैतन्य आढळत नाहीं. पृथिवी या भूताच्या परमाणूंत जर चैतन्याचा संबंध असता तर देहाप्रमाणेंच पार्थिव परमाणूंचा समुदाय, अशा भिंतींतही तें अभिव्यक्त झालें असतें. किण्व नांवाच्या निरनिराळ्या द्रव्यांच्या संयोगापासून मदशक्ति जशी उत्पन्न होते त्याप्रमाणें जलादि दुसऱ्या द्रव्यांचा पार्थिव परमाणूंशीं संयोग झाला असतां त्यापासून चैतन्य हा धर्म उद्भवतो, असे म्हटल्यास तेंहि युक्त नव्हे. कारण कोणतीही शक्ति हा साधारण गुण आहे. तो चैतन्यासारखा विशेष गुण होऊं शकत नाहीं. यास्तव चैतन्य हा विशेष गुण भौतिक देहाहून अगदीं विलक्षण अशा कोणाचा तरी समवायी असणेंच युक्त होय. सत्य व अनृत ( मिथ्या ), श्रेय ( हितप्राप्ति ), पारलौकिक सुख-दुःख, शुभ कर्माचें अनुष्ठान, अशुभ कर्मांचा त्याग इत्यादि ज्ञान झालें असतां अवश्य होणाऱ्या या लिंगावरून देहातिरिक्त आत्म्याचे अनुमान होतें. भूकंपादि निमित्तें, पिंगळा बोलणें, इत्यादि पक्षिचेष्टा-रूप शकुनज्ञान, सूर्यादि ग्रहांच्या संयोगापासून होणारीं फळें, इतर तारा, अश्विनीप्रभृति नक्षत्रें, त्यांचे शुभाशुभ फलद्योतक संचार, जागरावस्थेंतील सूर्याला छिद्रयुक्त पाहणें, इत्यादि व स्वप्नांत गाढव, डुक्कर इत्यादि जोडलेल्या रथांवर आरूढ झाल्याचें भान होणें इत्यादिकांच्या योगानें देहातिरिक्त आत्म्याचें अनुमान होतें. जीवांच्या उपभोगार्थ उत्पन्न केलेल्या आका-शादि पदार्थांच्या योगानें, मन्वंतर व युगांतर यांची प्राप्ति देहामध्यें अयुक्त झाल्याकारणानें, मंत्र व औषधि यांच्या फलाच्या योगानें व त्याचप्रमाणें देहाचें ठिकाणीं साक्षात् किंवा परंपरेनेंही उत्पन्न न होणाऱ्या क्षुद्र कर्मादिकांच्या योगानें ज्ञात होणारें जगाचें कारण, हे मुनींनो, तुम्ही जाणा १७०—१७३.

अहङ्कारः स्मृतिर्मेधा द्वेषो बुद्धिः सुखं धृतिः ।
इन्द्रियान्तरसंचार इच्छा धारणजीविते ॥ १७४ ॥
स्वर्गः स्वप्नश्च भावानां प्रेरणं मनसो गतिः ।
निमेषश्चेतना यत्न आदानं पाञ्चभौतिकम् ॥ १७५ ॥

यत एतानि दृश्यन्ते लिङ्गानि परमात्मनः ।
तस्मादस्ति परो देहादात्मा सर्वग ईश्वरः ॥ १७६ ॥

शिवाय अहंकार, पूर्व जन्मांतील अनुभवजन्य संस्कारापासून उद्भवणारी दुग्धपानादिकाविषयीं स्मृति, ऐहिक सुख, धैर्य, एका इंद्रियानें पाहिलेल्या विषयामध्यें दुसऱ्या विषयाचा ( ज्याला मी पाहिलें होतें त्यालाच हा आतां स्पर्श करीत आहे. इत्यादि प्रकारचा ) संचार होणें, शरीराचें धारण, प्राणधारण, स्वर्ग ( दुसऱ्या अनियत देहानें उपभोग घेण्यास योग्य असलेलें विशेष प्रकारचे सुख ), स्वप्न, इंद्रियादिकांचें प्रेरण, चेतनाधिष्ठानव्याप्तीनें मनाची गति, निमेष व पंच भूतांचें उपादान, हीं सर्व लिंगें भूतांच्या ठिकाणीं साक्षात् किंवा परंपरेनें उपपन्न होत नाहींत. यास्तव तीं परमात्म्याचींच द्योतक आहेत. यास्तव देहातिरिक्त, सर्वगामी, ईश्वर, आत्मा आहे, हें सर्वथा सिद्ध झालें १७४-१७६.

आतां क्षेत्रज्ञाचें स्वरूप सांगतात–

बुद्धीन्द्रियाणि सार्थानि मनः कर्मेन्द्रियाणि च ।
अहङ्कारश्च बुद्धिश्च पृथिव्यादीनि चैव हि ॥ १७७ ॥
अव्यक्तमात्मा क्षेत्रज्ञः क्षेत्रस्यास्य निगद्यते ।
ईश्वरः सर्वभूतस्थः सन्नसन्सदसच्च यः ॥ १७८ ॥

शब्दादि विषयांसह ज्ञानेंद्रिय, मन, वागादि कर्मेंद्रियें, अहंकार, निश्चयात्मिका बुद्धि, पृथिव्यादि पंचभूतें व अव्यक्त ( प्रकृति ), हें सर्व मिळून क्षेत्र आहे. आणि याचा जो हा ईश्वर तो सर्वगत म्हणूनच सद्रूप, पण तो दुसऱ्या कोणत्याहि प्रमाणानें ग्रहण करतां येण्यासारखा नसल्यामुळें व त्याची प्रतीतीही घटादि पदार्थांप्रमाणें स्पष्ट नसून अस्पष्ट अनुभवास येत असल्यामुळें असद्रूप आहे. अशा सदसद्रूप असलेल्या या आत्म्याला क्षेत्रज्ञ म्हणतात १७७,१७८.

आतां बुद्ध्यादिकांची उत्पत्ति सांगतात—

बुद्धेरुत्पत्तिरव्यक्तात्ततोऽहङ्कारसंभवः ।
तन्मात्रादीन्यहङ्कारादेकोत्तरगुणानि च १७९ ॥

सत्त्वादि गुणांच्या साम्याला अव्यक्त म्हणतात. त्याच्यापासून सत्त्व-रजस्तमोमय बुद्धीची उत्पत्ति होते. तिच्यापासून वैकारिक, तैजस व भूतादि असा त्रिविध अहंकार उद्भवतो. त्यांतील भूतादि नांवाच्या तिसऱ्या तामस अहंकारापासून तन्मात्रें व आदिशब्दानें गगनादिक भूतें उत्पन्न होतात. त्यांतील उत्तरोत्तर भूतांत पूर्वीच्या भूतांहून एकेक अधिक गुण येतो. (त्याचप्रमाणें वैकारिक व तैजस अहंकारापासून क्रमानें ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें होतात) १७९.

आतां गुणांचें स्वरूप सांगतात––

शब्दः स्पर्शश्च रूपं च रसो गन्धश्च तद्गुणाः ।
यो यस्मान्निःसृतश्चैषां स तस्मिन्नेव लीयते ॥ १८० ॥

त्या आकाशादि पंचभूतांचे एकोत्तरवृद्धीनें शब्दादि पांच गुण जाणावे. या बुद्धिप्रभृति विकारांतील जो विकार ज्या प्रकृति इत्यादिकांपासून झालेला असतो त्यांतच तो प्रलयसमयीं सूक्ष्मरूपानें लीन होतो १७०.

आतां या प्रकरणाच्या अर्थाचा उपसंहार करीत म्हणतात—

यथात्मानं सृजत्यात्मा तथा वः कथितो मया ।
विपाकात्त्रिप्रकाराणां कर्मणामीश्वरोऽपि सन् ॥ १८१ ॥

सत्त्वं रजस्तमश्चैव गुणास्तस्यैव कीर्तिताः ।
रजस्तमोभ्यामाविष्टश्चक्रवद्भ्राम्यते ह्यसौ ॥ १८२ ॥

अनादिरादिमांश्चैव स एव पुरुषःपरः ।
लिङ्गेन्द्रियग्राह्यरूपः सविकार उदाहृतः ॥ १८३ ॥

मानस, वाचिक व शारीर अशा तीन प्रकारच्या कर्मांचा विपाक झाल्यामुळें आत्मा स्वतः ईश्वर असूनही आपणाला कसा उत्पन्न करतो तें तुम्हांला सांगितलें. अविद्येनें युक्त असलेल्या त्याचेच सत्वादि गुण सांगितले. त्याचप्रमाणें रज व तम यांचा ज्याच्यामध्यें संचार झाला आहे असा तोच आत्मा या संसारांत चक्राप्रमाणें परिभ्रमण करीत असतो असेंही सांगितले. तोच अनादि परम पुरुष शरीरग्रहणानें आदिमान्, कुबडा, ठेंगू इत्यादि विकारवान् कसा झाला, स्थूल आकारानें परिणत झालेला तो सूक्ष्म चिह्ने व इंद्रियें यांच्या द्वारा ग्रहण करितां येण्यासारखा कसा आहे, हेंही सांगितलें १८१-१८३.

स्वर्गास जाणाऱ्या कर्मठाचा मार्ग सांगतात—

पितृयानोऽजवीथ्याश्च यदगस्त्यस्य चान्तरम् ।
तेनाग्निहोत्रिणो यान्ति स्वर्गकामा दिवं प्रति ॥ १८४ ॥

अजवीथि म्हणजे अमरमार्ग. त्याचें व अगस्त्याचें ( म्हणजे अजवीथि व अगस्त्य यांमधील ) जें अंतर तो पितृयान मार्ग होय. त्यानें स्वर्गाची कामना करणारे अग्निहोत्री स्वर्गास जातात १८४.

ये च दानपराः सम्यगष्टाभिश्च गुणैर्युताः ।
तेऽपि तेनैव मार्गेण सत्यव्रतपरायणाः ॥१८५॥

जे दानादि स्मार्तधर्मपरायण, दंभरहित, दया-क्षान्ति-अनसूया-शौच-अनायास-मंगल-अकार्पण्य-अस्पृहा या गौतमप्रोक्त आठ आत्मगुणांनीं युक्त व सत्यवचनशील असतात तेही त्याच पितृयान मार्गानें स्वर्गास जाऊन पोंचतात १८५.

**शंका**—पण प्रत्येक नैमित्तिक प्रलयाचे वेळीं सर्व अध्यापकांचाही नाश होत अस-

त्यामुळें त्यानंतर होणाऱ्या जनांना वेदज्ञानाचें साधनच रहात नाहीं. तेव्हां ते अग्निहोत्रादि कर्म कसें करतील व त्यांवाचून ते कर्ममार्गांत आरूढ कसे होतील?

**समाधान**—याचें उत्तर सांगतों ऐक—

तत्राष्टाशीतिसाहस्रा मुनयो गृहमेधिनः ।
पुनरावर्तिनो बीजभूता धर्मप्रवर्तकाः ॥ १८६ ॥

त्या पितृयान मार्गामध्यें अठ्यायशीं सहस्र गृहस्थाश्रमी, सर्गाच्या आरंभीं वेदाचा उपदेश करण्यासाठीं पुनः उत्पन्न होणारे, ( अर्थात् धर्मवृक्षाचा प्रादुर्भाव होण्यास्तव त्याच्या बीजासारखे ) धर्मप्रवर्तक मुनि आहेत. यास्तव वरील शंकित दोष येत नाहीं १८६.

सप्तर्षिनागवीथ्यन्तर्देवलोकं समाश्रिताः ।
तावन्त एव मुनयः सर्वारम्भविवर्जिताः ॥ १८७ ॥
तपसा ब्रह्मचर्येण संगत्यागेन मेधया ।
तत्र गत्वावतिष्ठन्ते यावदाभूतसंप्लवम् ॥ १८८ ॥

सप्तर्षि प्रसिद्धच आहेत. नागवीथी म्हणजे ऐरावतपंथ. या दोघांच्या मध्यें तितकेच ( अठ्यायशी सहस्र ) मुनि सर्वकर्मांचा त्याग करून केवल ज्ञाननिष्ठ झालेले, तप व ब्रह्मचर्य यांनीं युक्त व त्याचप्रमाणें सर्वसंगरहित होत्साते देवलोकाचा आश्रय करून प्राकृत प्रलय होईतों राहतात. तेथें राहिलेले ते सृष्टीच्या आरंभीं आध्यात्मिक धर्माची प्रवृत्ति करतात १८७, १८८.

ते मुनीच कसे, तें सांगतात—

यतो वेदाः पुराणानि विद्योपनिषदस्तथा ।
श्लोकाः सूत्राणि भाष्याणि यच्च किञ्चन वाङ्मयम् ॥ १८९ ॥

कारण त्या दोन्ही प्रकारच्या मुनिसंघापासून चार वेद, पुराणें, अंगें, विद्या, उपनिषदें, हीं सर्व नित्य असलेलींच अध्येतृपरंपरेनें आलीं आहेत. तसेच इतिहासात्मक श्लोक, व्याकरण-मीमांसा इत्यादि सूत्रें, त्यांचींच भाष्यें, आयुर्वेदादि दुसरें सर्व वाङ्मय, हेंही ज्यांच्यापासून प्रवृत्त झालें आहे तशाप्रकारचे ते मुनि धर्मप्रवर्तक आहेत. अर्थात वेदावर अनित्यता दोष येत नाहीं १८९.

बरें, पण पुढें काय म्हणणें आहे, तें सांगतात—

वेदानुवचनं यज्ञो ब्रह्मचर्यं तपो दमः
श्रद्धोपवासः स्वातन्त्र्यमात्मनो ज्ञानहेतवः ॥ १९० ॥

वेद नित्य आहेत, असें एकदा ठरलें म्हणजे मग त्यांचें प्रामाण्यही सिद्ध झालेंच आणि त्या प्रामाण्यबलानेंच वेदानुवचन ( वेदांचें व्याख्यान ), अध्यापनं, यज्ञांचें अनुष्ठान,

ब्रह्मचर्य, तप, दम, श्रद्धा, उपवास व स्वातंत्र्य हीं, सत्त्वशुद्धि करणें, याच्या द्वारा आत्मज्ञानाचीं कारणें होतात, हें युक्तच आहे १९०.

स ह्याश्रमैर्विजिज्ञास्यः समस्तैरेवमेव तु ।
द्रष्टव्यस्त्वथ मन्तव्यः श्रोतव्यश्च द्विजातिभिः ॥ १९१ ॥
य एनमेवं विन्दन्ति ये चारण्यकमाश्रिताः ।
उपासते द्विजाः सत्यं श्रद्धया परया युताः ॥ १९२ ॥

ज्याअर्थी नित्य असल्यामुळें वेद आत्मप्रमाणभूत आहे त्याअर्थी पूर्वोक्तमार्गानें सकल आश्रमवानांनीं नानाप्रकारें त्याला अवश्य जाणावें. आतां तो जाणण्याचा प्रकारच सांगतात— द्विजांनीं त्याला अपरोक्ष करावें ( साक्षात् जाणावें ). श्रोतव्य व मन्तव्य या पदांनी अपरोक्ष ज्ञानाचा उपाय दाखविला आहे. प्रथमतः वेदान्तश्रवणानें त्याचा निर्णय करावा. नंतर युक्तींनीं त्याचाच विचार करावा. म्हणजे मग हा ध्यानानें अपरोक्ष होतो. जे द्विज अतिशय श्रद्धासंपन्न होऊन निर्जन प्रदेशाचा आश्रय करितात व वर सांगितलेल्या मार्गानें या सत्य ( परमार्थभूत ) आत्म्याची उपासना करितात तेच आत्म्यास जाणतात. तेच त्यास प्राप्त होतात १९१, १९२.

त्यांचा देवयान हा प्राप्तिमार्ग सांगतात—

क्रमात्ते संभवन्त्यर्चिरहः शुक्लं तथोत्तरम् ।
अयनं देवलोकं च सवितारं सवैद्युतम् ॥ १९३ ॥
ततस्तान्पुरुषोऽभ्येत्य मानसो ब्रह्मलौकिकान् ।
करोति पुनरावृत्तिस्तेषामिह न विद्यते ॥ १९४ ॥

ज्यांना आत्मज्ञान झालें आहे ते क्रमानें मुक्तिमार्गरूप अग्नि, अहः इत्यादि अभिमानी देवतास्थानांमध्यें विश्रांति घेऊन त्या देवतांनीं ज्याला पुढें धाडलें आहे असे ते ( आत्मज्ञ ) परम पदास प्राप्त होतात. अग्नि, दिवस, शुक्लपक्ष, उत्तरायण, देवलोक, सूर्य, वैद्युत तेज, या स्थानास क्रमानें प्राप्त झालेल्या त्यांना मानस पुरुष ब्रह्मलोकभाक् करतो. त्याची या संसारांत पुनरावृत्ति होत नाहीं. तर प्राकृतप्रलयाचे वेळीं ज्यांनीं आपल्या लिंगशरीराचा त्याग केला आहे असे ते परमात्म्यामध्यें एकरूप होतात १९३, १९४.

आतां पूर्वोक्त पितृयान सांगतात—

यज्ञेन तपसा दानैर्ये हि स्वर्गजितो नराः ।
धूमं निशां कृष्णपक्षं दक्षिणायनमेव च ॥ १९५ ॥
पितृलोकं चन्द्रमसं वायुं वृष्टिं जलं महीम् ॥
क्रमात्ते संभवन्तीह पुनरेव व्रजन्ति च ॥ १९६ ॥

एतद्यो न विजानाति मार्गाद्वितयमात्मवान् ।
दन्दशूकः पतङ्गो वा भवेत्कीटोऽथवा कृमिः ॥ १९७ ॥

पण जे वेदविहित यज्ञ–दान–तपाच्या योगानें स्वर्गफल भोक्ते होतात ते संसारी क्रमानें धूमापासून चंद्रमापर्यंत जे पदार्थ आहेत त्यांच्या अभिमानी देवतांस प्राप्त होतात, आणि पुनः वायु, वृष्टि, जल व भूमि यांस प्राप्त होऊन व व्रीही–यव इत्यादि अन्नरूप होऊन पुरुषाच्या वीर्यास प्राप्त होतात व योनींमध्यें प्रवेश करितात. पण जो प्राणी या दोन मार्गांस जाणत नाहीं व या दोन मार्गांच्या उपायभूत धर्मांचें अनुष्ठान करीत नाहीं तो भुजंग, पतंग, किंवा किडा होतो १९५–१९७.

आतां उपासनेचा प्रकार सांगतात—

ऊरुस्थोत्तानचरणः सव्ये न्यस्योत्तरं करम् ।
उत्तानं किञ्चिदुन्नाम्य मुखं विष्टभ्य चोरसा ॥ १९८ ॥
निमीलिताक्षः सत्त्वस्थो दन्तैर्दन्तानसंस्पृशन् ।
तालुस्थाचलजिह्वश्च संवृतास्यः सुनिश्चलः ॥ १९९ ॥
संनिरुध्येन्द्रियग्रामं नातिनीचोच्छ्रितासनः ।
द्विगुणं त्रिगुणं वापि प्राणायाममुपक्रमेत् ॥ २०० ॥
ततो ध्येयः स्थितो योऽसौ हृदये दीपवत्प्रभुः ।
धारयेत्तत्र चात्मानं धारणां धारयन्बुधः ॥ २०१ ॥

ज्यानें आपले दोन्ही पाय मांड्यांवर उताणे ठेवले आहेत म्हणजेच ज्यानें पद्मासन घातलें आहे, त्याचप्रमाणें उताण्या डाव्या हातावर ज्यानें उताणा उजवा हात ठेविला आहे, त्यानें मुख किंचित् वर उचलून व तें उरावर घट्ट ठेवून नेत्र मिटावे. सत्त्वस्थ म्हणजे काम–क्रोधादि रहित व्हावें. दांत दांतांना लावूं नये. जिह्वा टाळूला अचल टेकून धरावी, तोंड मिटावें, शरीराला अगदीं स्थिर धरावें. सर्व इंद्रियांना विषयांपासून चांगल्या प्रकारें नियमित करावें. आसन फार सखल किंवा फार उंच घेऊं नये. सारांश, जशा रीतीनें चित्त-विक्षेप होणार नाहीं तशाप्रकारें आसनावर स्थिर बसून दुप्पट किंवा तिप्पट प्राणायामांचा अभ्यास करावा. त्यानंतर वायूला ज्यानें आपल्या स्वाधीन करून घेतलें आहे अशा योग्यानें हृदयामध्यें जो हा दीपाप्रमाणें अकंप प्रभु स्थित आहे त्याचें ध्यान करावें. हृदयांत आत्म्याला मनाचा विषय करून धारणा धरावी. गुडघ्याच्या पुढें हात सभोंवार फिरवून एक चुटकी वाजविणें, अशा प्रमाणानें पंचेचाळीस चुटक्या वाजवीपर्यंत टिकणाऱ्या प्राणायामास उत्तम प्राणायाम म्हणतात व तीन उत्तम प्राणायाम करीपर्यंत मनानें एकाच विषयाला स्थिर धारण करणें ही धारणा होय. अशा योगसंज्ञक तीन धारणा धराव्या. सारांश, अशा धारणेनें सुज्ञानें आत्म्याची उपासना करावी १९८—२०१.

धारणात्मक योगाभ्यासाचें प्रयोजन सांगतात—

अन्तर्धानं स्मृतिः कान्तिर्दृष्टिः श्रोत्रज्ञता तथा ।
निजं शरीरमुत्सृज्य परकायप्रवेशनम् ॥ २०२ ॥
अर्थानां छन्दतः सृष्टिर्योगसिद्धेश्च लक्षणम् ।
सिद्धे योगे त्यजन्देहममृतत्वाय कल्पते ॥ २०३ ॥

अणिमेची प्राप्ति झाल्यामुळें दुसऱ्यांनीं न पाहणें हें अन्तर्धान होय. मनु, पराशर इत्यादिकांप्रमाणें अतींद्रिय विषयांचें स्मरण, अतीत ( भूत ) व भविष्यत् विषयांविषयीं सुंदरतादृष्टि, फार दूरदेशीं झाल्यामुळें कर्णपथावर येऊन न आदळणाऱ्या शब्दांनाही ऐकणें, आपलें शरीर सोडून परशरीरांत प्रवेश करणें, साधनाची अपेक्षा न धरतांच स्वतः इच्छेनेंच पदार्थांना निर्माण करणें, हें योगसिद्धीचें चिह्न आहे. पण तिचें एवढेंच कायतें प्रयोजन आहे, असें समजूं नये. तर योग सिद्ध झाल्यावर देहत्याग करणारा पुरुष ब्रह्मप्राप्तीस समर्थ होतो २०३.

यज्ञदानादिकांचा असंभव झाल्यास सत्त्वशुद्धीचा दुसरा उपाय सांगतात—

अथवाप्यभ्यसन्वेदं न्यस्तकर्मा वने वसन् ।
अयाचिताशी मितभुक्परां सिद्धिमवाप्नुयात् ॥ २०४ ॥

किंवा ज्यानें कामना सोडल्या आहेत, व जो निषिद्ध कर्म करीत नाहीं त्यानें कोणत्या तरी एका वेदाचा अभ्यास करावा. एकांतीं वास करावा. अयाचित मितभोजन करावें आणि या उपायांनीं ज्यानें सत्त्वशुद्धि संपादन केलेली आहे तो मुक्तिरूप परम सिद्धीस प्राप्त होतो २०४.

न्यायागतधनस्तत्त्वज्ञाननिष्ठोऽतिथिप्रियः ।
श्राद्धकृत्सत्यवादी च गृहस्थोऽपि हि मुच्यते ॥ २०५ ॥

तसेंच, सत्प्रतिग्रहादि न्यायानें ज्यानें धन संपादन केलें आहे, जो अतिथींच्या पूजनांत तत्पर आहे, व जो नित्य व नैमित्तिक श्राद्धानुष्ठानामध्यें अत्यंत आसक्त आहे तो गृहस्थही ज्याअर्थीं मुक्तीला पात्र होतो त्याअर्थीं ऐहिक संन्यासाचा स्वीकार करणें, हेंच एक मुक्तीचें साधन नाहीं २०५.

इति अध्यात्म अथवा यतिधर्मप्रकरणम् ४.

———

# अथ प्रायश्चित्तप्रकरणम् ५.



या ग्रंथाच्या पहिल्याच श्लोकांत ' वर्णाश्रमेतराणां नो ब्रूहि धर्मानशेषतः ' असें म्हणून प्रतिपादन करण्यासाठीं ज्यांची प्रतिज्ञा केली होती त्या षड्विध धर्मांतील पांच प्रकारचा धर्म सांगून आतां राहिलेलें प्रायश्चित्त नांवाचें नैमित्तिक धर्मजात प्रतिपादन करण्यास आरंभ करण्याची इच्छा करणारे योगीश्वर प्रथमतः तें श्रोत्यांना रुचावें व अधिकारी पुरुषाचीं विशेषणेंही व्यक्त करावींत, म्हणून अर्थवादरूप कर्मविपाक सांगतात—

**महापातकजान्घोरान् नरकान्प्राप्य दारुणान् ।**
**कर्मक्षयात्प्रजायन्ते महापातकिनस्त्विह ॥ २०६ ॥**

ब्रह्महत्यादि पांच महापातकें आहेत. त्यांची गणना पुढें ( श्लोक २२७ ) करतील. तीं करणारे त्यांमुळें उद्भवलेल्या तामिस्रादि घोर ( अतितीव्र वेदना देणाऱ्या ) व दारुण ( केवल दुःखांचें निधान, अशा ) नरकांस प्राप्त होऊन कर्म फलोपभोगानें क्षणि झालें असतां बाकी राहिलेल्या कर्मामुळें पुनः या संसारांत, ज्यांमध्यें दुःख पुष्कळ आहे, अशा कुत्रा, कोल्हा इत्यादि तिर्यग्योनींत पुनः पुनः उत्पन्न होतात. दुसऱ्या उपपातक्यांचेंही ग्रहण करण्यासाठीं येथें महापातक्यांचा निर्देश केला आहे. अर्थात् उपपातकीही स्वकर्मानुसार दुःखफळ भोगून तिर्यग्योनींत उत्पन्न होतात. हें स्वतः योगीश्वरच पुढें सांगणार आहेत २०६.

महापातक्यांची संसारप्राप्ति सांगून तिचाही विशेष सांगण्याकरितां म्हणतात—

**मृगाश्वसूकरोष्ट्राणां ब्रह्महा योनिमृच्छति ।**
**खरपुल्कसवेनानां सुरापो नात्र संशयः ॥ २०७ ॥**
**कृमिकीटपतंगत्वं स्वर्णहारी समाप्नुयात् ।**
**तृणगुल्मलतात्वं च क्रमशो गुरुतल्पगः ॥ २०८ ॥**

हरिणादिक मृग, कुत्रें, डुकर व उंट, यांच्या योनीस ब्रह्महा स्वकर्मशेषानें प्राप्त होतो. गाढव, पुल्कस ( प्रतिलोम निषादानें शूद्रीच्या ठायीं निर्माण केलेला ) व वैदेहापासून अंबष्ठेच्या ठिकाणीं झालेला वेन यांच्या योनीस मद्यपान करणारा प्राप्त होतो. कृमी ( सजातीय स्त्री—पुरुषांच्या संभोगाची अपेक्षा न करितां मांस,विष्ठा, गोमय, इत्यादिकांपासून झालेले) त्यांच्याहून कांहीं स्थूल पण पंख व अस्थि यांनीं रहित असे मुंग्या इत्यादि जीव ( कीट ,) व शलभ यांच्या योनीस ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणारा प्राप्त होतो. तृण, गुल्म, लता, इत्यादि जातींत गुरुस्त्रीशीं गमन करणारा उत्पन्न होतो; पण हें फल सुद्धां कामनेवाचून तो तो ब्रह्महननादि दोष केलेला असल्यास जाणावें. कारण कामनापूर्वक असले दोष केल्यास

याहूनही ज्यांत अधिक दुःख आहे अशा योनींतही ते संसार करितात. कारण मनूनें ( अ. १२ श्लो. ५५–५८ ) तसें स्पष्ट सांगितलें आहे २०७, २०८.

याप्रमाणें तिर्यग्भावांस प्राप्त होऊन व तेथें पुष्कळ भयंकर दुःख सोसून त्यांतून वर आलेले पापी मनुष्यांत अशा लक्षणांनीं युक्त होतात—

ब्रह्महा क्षयरोगी स्यात्सुरापः श्यावदन्तकः ।
हेमहारी तु कुनखी दुश्चर्मा गुरुतल्पगः ॥ २०९ ॥
यो येन संवसत्येषां स तल्लिंगोऽभिजायते ।

याप्रमाणें रौरवादि नरकामध्यें व श्वान–सूकर–इत्यादिकांच्या योनींत दारुण दुःखाचा अनुभव घेऊन नंतर राहिलेल्या पापाच्या बलानें ते पापी जन्मसमयींच क्षयरोगादि लक्षण-युक्त निपजतात व मानुष शरीरांत संसार करितात. त्यांतील ब्राह्मणाची हिंसा करणारा राज-यक्ष्मावान् होतो. निषिद्ध सुरेचें प्राशन करणारा स्वभावतःच काळ्या दातांनीं युक्त होतो. जो पापी ब्राह्मणाचें सोनें चोरतो तो नरकादिक भोगल्यावर मानुष योनींत वाईट नखांनीं युक्त होऊन निपजतो. गुरुस्त्रीशीं गमन करणारा कुष्ठरोगी होतो. आणि ब्रह्मघातकीप्रभृति पाप्यां-बरोबर जो वास करतो तोही त्या लिंगानें युक्त होऊन निपजतो. तसेंच—

अन्नहर्तामयावी स्यान्मूको वागपहारकः ॥ २१० ॥
धान्यमिश्रोऽतिरिक्ताङ्गः पिशुनः पूतिनासिकः ।
तैलहृत्तैलपायी स्यात्पूतिवक्त्रस्तु सूचकः ॥ २११ ॥

अन्नाचा अपहार करणारा अजीर्णरोगग्रस्त होतो. गुरूनें अनुज्ञा दिलेली नसतांना चोरून अध्ययन करणारा व पुस्तकांचा अपहार करणारा मुका ( वागिंद्रियरहित ) होतो. चांगल्या धान्यांत वाईट धान्य मिसळून विकणारा पुरुष सहा बोटें, इत्यादि प्रकारें अधिक अंगांनीं युक्त होतो. दुसऱ्यामध्यें विद्यमान असलेला दोष प्रगट करण्याचें ज्याचें शीलच असतें, त्याला पिशुन म्हणतात. त्याच्या नाकाला दुर्गंधी येते. तेल चोरणारा तैलपायी या नांवाचा एक किडा होतो. सूचक म्हणजे एकाद्यामध्यें नसलेला दोष त्याच्यामध्यें आहे, असें सांगणारा पुरुष. तो पापबलानें तिर्यग्योनीस प्राप्त होऊन नंतर मानुष शरीरांत निर्माण झाला असतां त्याच्या तोंडाला घाण येते. (याविषयीं मनु० अ, १२ श्लो.६८ पहा.)२०९–२११

परस्य योषितं हृत्वा ब्रह्मस्वमपहृत्य च ।
अरण्ये निर्जले देशे भवति ब्रह्मराक्षसः ॥ २१२ ॥

जो परस्त्री व ब्राह्मणाचें धन यांचा अपहार करतो तो अरण्यांतील निर्जल प्रदेशीं ब्रह्मराक्षस होतो २१२.

हीनजातौ प्रजायेत पररत्नापहारकः ।
पत्रशाकं शिखी हृत्वा गन्धाञ्छुच्छुन्दरी शुभान् ॥ २१३ ॥

दुसऱ्याच्या रत्नांचा अपहार करणारा सोनार या नांवाच्या पक्षि-जातींत निर्माण होतो ( मनु० अ. १२ श्लो. ६१ पहा. ) पालेभाजी चोरल्यास मोर होतो व शुभ गंधांचा अपहार केल्यास चिंचुंदरी होतो २१३.

मूषको धान्यहारी स्याद्यानमुष्ट्रः कपिः फलम् ।
जलं प्लवः पयः काको गृहकारी ह्युपस्करम् ॥ २१४ ॥
मधु दंशः पलं गृध्रो गां गोधाग्निं बकस्तथा ।
श्वित्री वस्त्रं श्वा रसं तु चीरी लवणहारकः ॥ २१५ ॥

धान्याची चोरी करणारा उंदिर होतो. वाहन चोरणारा उंट निपजतो. फळें चोरणारा वानर, जल चोरणारा प्लव नांवाचा पक्षी, दूध चोरणारा कावळा, घरांतील मुसळ, झाडणी इत्यादि उपकरणें नेणारा चिमणा, मध चोरणारा डांस, मांस चोरणारा गृध्रनांवाचा पक्षी, गायीचें हरण करणारा घोरपड, अग्नि चोरणारा बगळा, वस्त्र चोरणारा कुष्ठरोगी, उसादिकांचा रस चोरणारा कुत्रा व मीठ चोरणारा टिटवी होतो २१४, २१५.

याप्रमाणें दिग्दर्शनार्थ कांहीं पापांचा कर्मविपाक सांगून प्रत्येक द्रव्याविषयीं तसें सांगतां येणें शक्य नसल्यामुळें एका सामान्य उपाधीनें कर्मविपाक सांगण्यासाठीं म्हणतात--

प्रदर्शनार्थमेतत्तु मयोक्तं स्तेयकर्मणि ।
द्रव्यप्रकारा हि यथा तथैव प्राणिजातयः ॥ २१६ ॥

वर सांगितलेला कर्मविपाक केवळ दिग्दर्शनार्थ आहे. अर्थात् हरण केल्या जाणाऱ्या द्रव्याचे जसे प्रकार असतात, तशाच प्रकारच्या प्राण्यांच्या जातींत स्तेयकर्मानें अपहार करणारे उत्पन्न होतात. जसें-कांसें चोरणारा हंस होतो. अथवा ज्या फलाचें साधन होणारें द्रव्य मनुष्य हरण करतो त्या साधनानें तो रहित होतो. जसें अश्वहरण करणारा पंगु होतो. शंखानें याविषयीं कांहीं विशेष सांगितला आहे--ब्रह्महा कुष्ठी, सुवर्णादि धातूंचे पदार्थ हरण करणारा मंडलकुष्ठयुक्त, देव-ब्राह्मणांस शिव्या देणारा टकल्या, विष व अग्नि देणारा उन्मत्त गुरूस मारणारा अपस्मारी, गायीला मारणारा अंध, धर्मपत्नीचा त्याग करून अन्यत्र प्रवृत्त होणारा शब्दवेधी या नांवाचा एक प्राणी, देव व ब्राह्मण यांचें धन हरण करणारा पांडुरोगी. ठेवीचा अपहार करणारा काणा, स्त्रियांच्या व्यापारावर उपजीविका करणारा षण्ढ, कुमारदशेंतील स्त्रीचा त्याग करणारा दुर्भग, एकटाच सुग्रास अन्न खाणारा वातगुल्मवान्, अभक्ष्यभक्षण करणारा गण्डमाळावान्, ब्राह्मणीशीं गमन करणारा बीजशून्य, क्रूरकर्म करणारा वामन ( ठेंगु ), वस्त्राचा अपहार करणारा पतंग, शय्येची चोरी करणारा नास्तिक, शंख, शिंपा इत्यादिकांचा अपहार करणारा भिकारी, दीपाची चोरी करणारा घुबड, मित्रद्रोह करणारा क्षयी व आईबापांस शिव्या देणारा खंडकार होतो.

गौतमानेंही याविषयीं कांहीं विशेष प्रकार सांगितला आहे.—खोटें बोलणारा तोतरा, स्त्रीत्याग करणारा जलोदरवान्, खोटी साक्ष देणारा श्लीपदरोगग्रस्त (या रोगानें पाय व पोटऱ्या सोलून जातात ), विवाहास विघ्न करणारा ओंठ कापलेला, गुरूवर काठी उगारणारा हात तुटका, मातेला मारणारा अन्ध, स्नुषेशीं गमन करणारा वातवृषणरोगग्रस्त, चन्द्राद्यावर विष्ठा व मूत्र यांचा त्याग करणारा मूत्रकृच्छ्रवान्, कन्येला दूषित करणारा षंढ, ईर्ष्यावान् मशक, पित्याशीं विवाद करणारा अपस्मारी, ठेवीचा अपहार करणारा अपत्यरहित, रत्नांचा अपहार करणारा अत्यंत दरिद्री, विद्येचा विक्रय करणारा हरण, वेदविक्रय करणारा चित्तीं-पुष्कळांकडून यजन करविणारा पाणकोंबडा, यज्ञ करण्यास अयोग्य असलेल्यांकडून यज्ञ करविणारा वराह, निमंत्रणावाचून भोजन करणारा कावळा, एकटाच मिष्टान्न खाणारा वानर, पाहिजे तेथें भोजन करणारा मांजर व गवताच्या वनास ( कुरणास ) आग लावणारा काजव होतो. लहान मुलांचा आचार्य होणाऱ्या मनुष्याच्या तोंडास घाण येते. शिळें अन्न खाणारा कृमि होतो. कोणी न देतांच एकादी वस्तु घेणारा बैल, मत्सरी, भ्रमर, अग्नीचा नाश करणारा मंडलनावाच्या कुष्ठानें युक्त, शूद्रांचा आचार्य होणारा चांडाल, गायीचा अपहार करणारा सर्प, घृत-तैलादि स्नेहांचा अपहार करणारा क्षयरोगी, अन्नाचा अपहार करणारा अजीर्णरोगानें ग्रस्त, ज्ञानाचा अपहार करणारा मुका, चांडाली व पुल्कसी यांच्याशीं गमन करणारा अजगर, संन्याशिणीशीं गमन करणारा मरुपिशाच, शूद्रीशीं गमन करणारा दीर्घकीट, सवर्णस्त्रीशीं गमन करणारा दरिद्र, जल हरण करणारा मत्स्य, दुधाचा अपहार करणारा बलाका, व्याजावर निर्वाह करणारा ब्राह्मण अंगहीन, अविक्रेय वस्तूचा विक्रय करणारा गृध्र, राजभार्येशीं गमन करणारा नपुंसक, राजाला शिव्याशाप देणारा गर्दभ, गायीशीं गमन करणारा बेडूक, अनध्यायाचे दिवशीं अध्ययन करणारा कोल्हा, परद्रव्याचा अपहार करणारा दुसऱ्याचा नोकर व मत्स्यांचा वध करणारा गर्भवासी होतो. सारांश, हे असले पापी ऊर्ध्वगामी होत नाहींत. वरील पापें करणाऱ्या स्त्रियाही पूर्वोक्त त्या त्या जातींत स्त्रिया उत्पन्न होतात. कारण मनूनें ( अ. १२ श्लो. ६९ ) तसें सांगितलें आहे.

पण येथें क्षयवान्, कुष्ठी, श्लीपदी होतो, इत्यादि जें सांगितलें आहे तें प्रायश्चित्त करावयास तयार झालेल्या ब्रह्महा, सुरापी इत्यादिकांस उद्वेग उत्पन्न करण्यासाठीं आहे. क्षयित्वादि लक्षणांनीं युक्त असलेल्यास द्वादशवार्षिकादि व्रत प्राप्त करून देण्यासाठीं अथवा संसर्गाची निवृत्ति करण्यासाठीं नव्हे. कारण प्रायश्चित्त नेहमींच पापक्षयार्थ करावयाचें असतें. पण ज्याचें फल अगोदरच सुरू झालेलें असतें त्या पापजन्य अपूर्वाचा विनाश केल्यास कांहीं प्रयोजन लाघत नाहीं. जसें-बाण धनुष्यापासून एकदा सुटला म्हणजे मग तो लक्ष्याचा वेध करावयास वेध करणारा धानुष्क किंवा त्याचा आकर्ण गुण ओढणें, इत्यादि व्यापार यांची पुनः अपेक्षा करीत नाहीं. तसेंच-त्यानें आरंभलेल्या फलाचा नाश करण्याकरितां अपूर्वनाशाचा शोधही करावा लागत नाहीं. कारण कोणतेंही निमित्त कारण जरी नाहींसें झालें तरी त्यामुळें पूर्वीच सुरू झालेलें कार्य, प्रतिबद्ध होत नाहीं. यास्तव पूर्व

कर्मामुळें जन्मतःच प्राप्त होणाऱ्या स्वाभाविक कुनखित्वादि दोषांचें निवारण कोणालाहि करतां येणें शक्य नाहीं. कारण तसला विकार हें शेवटचें फल आहे. त्यामुळें तें उत्पन्न होतांच स्वकारणभूत अपूर्वाचा नाश होतो. अरणीचें मंथन करून निर्माण केलेल्या अग्नीच्या योगानें अरणीचा जसा दाह होतो तसेंच हें जाणावें. तस्मात् पापाचा विनाश होण्यासाठीं व्रतपरिचर्या नाहीं. ती व्यवहाराकरितांही नाहीं. कारण कुनखी इत्यादि पुरुषाशीं शिष्ट संबंध ठेवीत नाहींत, असें नाहीं. प्राक्तनाचा क्षय झाल्यामुळें पापाचा नाश होऊन व्यवहाराचीही सिद्धि होत असल्याकारणानें व्रतचर्येचा कांहीं उपयोग नाहीं. कुनखी, काळे दांतवाला, यांनीं द्वादशरात्र कृच्छ्र करावें, असें जें वसिष्ठांनीं सांगितलें आहे तें क्षामवती व अशाच दुसऱ्याही इष्टींप्रमाणें केवल नैमित्तिक आहे. पापक्षयार्थ अथवा लोकांनीं त्याच्याशीं चांगला व्यवहार करावा, म्हणून नव्हे, असें जाणावें २१६.

यथाकर्म फलं प्राप्य तिर्यक्त्वं कालपर्ययात् ।
जायन्ते लक्षणभ्रष्टा दरिद्राः पुरुषाधमाः ॥ २१७ ॥

आपल्या कृतकर्मानुसार नरकादि फलास व त्याच्या भोगानंतर तिर्यक्त्वादि योनीस प्राप्त होऊन कालक्रमानें कर्म क्षीण झालें असतां ते जीव या लोकीं दुष्ट लक्षणांनीं युक्त, दरिद्री व अधम पुरुष निपजतात २१७.

जायन्ते विद्ययोपेता धनधान्यसमन्विताः
ततो निष्कल्मषीभूताः कुले महति भोगिनः ॥ २१८ ॥

याप्रमाणें दुर्लक्षण मानुष जन्मानंतर निष्पाप होत्साते ( म्हणजे नरकादिकांच्या उपभोगानें त्याचें पाप क्षीण झालें असतां ) पूर्व जन्मांतील अवशिष्ट पुण्यांशानें ते महाकुलांत भोगसंपन्न व विद्या-धन-धान्यसंपन्न उत्पन्न होतात २१८.

याप्रमाणें प्रायश्चित्त करण्याविषयीं रुचि उत्पन्न व्हावी म्हणून कर्मविपाक सांगून आतां त्यांच्या ठिकाणच्या अधिकाराचें निरूपण करण्यासाठीं म्हणतात—

विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात् ।
अनिग्रहाच्चेन्द्रियाणां नरः पतनमृच्छति ॥ २१९ ॥
तस्मात्तेनेह कर्तव्यं प्रायश्चित्तं विशुद्धये ।
एवमस्यान्तरात्मा च लोकश्चैव प्रसीदति ॥ २२० ॥

शास्त्रानें ज्याचें विधान केलें आहे, असें नित्य ( आवश्यक संध्योपासनाग्निहोत्रादिक ) व नैमित्तिक ( चांडालस्पर्शादिनिमित्तानें शास्त्रविहित स्नानादिक ) यांचें अनुष्ठान न केल्यानें आणि सुरापानादि निषिद्ध कर्माचें सेवन केल्यानें व इंद्रियांचा निग्रह न केल्यानें पुरुष पतनास योग्य होतो. तो प्रत्यवायी होतो. 'कोणत्याही विषयामध्यें कामतः आसक्त होऊं नये' असा निषेध असल्यामुळें निषिद्धसेवनांत विषयासक्तीचेंही ग्रहण होत असतांना

कर्मामुळें जन्मतःच प्राप्त होणाऱ्या स्वाभाविक कुनखित्वादि दोषांचें निवारण कोणालाहि करतां येणें शक्य नाहीं. कारण तसला विकार हें शेवटचें फल आहे. त्यामुळें तें उत्पन्न होतांच स्वकारणभूत अपूर्वाचा नाश होतो. अरणीचें मंथन करून निर्माण केलेल्या अग्नीच्या योगानें अरणीचा जसा दाह होतो तसेंच हें जाणावें. तस्मात् पापाचा विनाश होण्यासाठीं व्रतपरिचर्या नाहीं. ती व्यवहाराकरितांही नाहीं. कारण कुनखी इत्यादि पुरुषाशीं शिष्ट संबंध ठेवीत नाहींत, असें नाहीं. प्राक्तनाचा क्षय झाल्यामुळें पापाचा नाश होऊन व्यवहाराचीही सिद्धि होत असल्याकारणानें व्रतचर्येचा कांहीं उपयोग नाहीं. कुनखी, काळे दांतवाला, यांनीं द्वादशरात्र कृच्छ्र करावें, असें जें वसिष्ठांनीं सांगितलें आहे तें क्षामवती व अशाच दुसऱ्याही इष्टींप्रमाणें केवल नैमित्तिक आहे. पापक्षयार्थ अथवा लोकांनीं त्याच्याशीं चांगला व्यवहार करावा, म्हणून नव्हे, असें जाणावें २१६.

यथाकर्म फलं प्राप्य तिर्यक्त्वं कालपर्ययात् ।
जायन्ते लक्षणभ्रष्टा दरिद्राः पुरुषाधमाः ॥ २१७ ॥

आपल्या कृतकर्मानुसार नरकादि फलास व त्याच्या भोगानंतर तिर्यक्त्वादि योनींस प्राप्त होऊन कालक्रमानें कर्म क्षीण झालें असतां ते जीव या लोकीं दुष्ट लक्षणांनीं युक्त, दरिद्री व अधम पुरुष निपजतात २१७.

जायन्ते विद्ययोपेता धनधान्यसमन्विताः
ततो निष्कल्मषीभूताः कुले महति भोगिनः ॥ २१८ ॥

याप्रमाणें दुर्लक्षण मानुष जन्मानंतर निष्पाप होत्साते ( म्हणजे नरकादिकांच्या उपभोगानें त्याचें पाप क्षीण झालें असतां ) पूर्व जन्मांतील अवशिष्ट पुण्यांशानें ते महाकुलांत भोगसंपन्न व विद्या–धन–धान्यसंपन्न उत्पन्न होतात २१८.

याप्रमाणें प्रायश्चित्त करण्याविषयीं रुचि उत्पन्न व्हावी म्हणून कर्मविपाक सांगून आतां त्यांच्या ठिकाणच्या अधिकाराचें निरूपण करण्यासाठीं म्हणतात—

विहितस्याननुष्ठानान्निन्दितस्य च सेवनात् ।
अनिग्रहाच्चेन्द्रियाणां नरः पतनमृच्छति ॥ २१९ ॥
तस्मात्तेनेह कर्तव्यं प्रायश्चित्तं विशुद्धये ।
एवमस्यान्तरात्मा च लोकश्चैव प्रसीदति ॥ २२० ॥

शास्त्रानें ज्याचें विधान केलें आहे, असें नित्य ( आवश्यक संध्योपासनाग्निहोत्रादिक ) व नैमित्तिक ( चांडालस्पर्शादिनिमित्तानें शास्त्रविहित स्नानादिक ) यांचें अनुष्ठान न केल्यानें आणि सुरापानादि निषिद्ध कर्मांचें सेवन केल्यानें व इंद्रियांचा निग्रह न केल्यानें पुरुष पतनास योग्य होतो. तो प्रत्यवायी होतो. ‘ कोणत्याही विषयामध्यें कामतः आसक्त होऊं नये ’ असा निषेध असल्यामुळें निषिद्धसेवनांत विषयासक्तीचेंहीं ग्रहण होत असतांना

अवीचिमन्धतामिस्रं कुम्भीपाकं तथैव च ।
असिपत्रवनं चैव तापनं चैकविंशकम् ॥ २२४ ॥
महापातकजैर्घोरैरुपपातकजैस्तथा ।
अन्विता यान्त्यचरितप्रायश्चित्ता नराधमाः ॥ २२५ ॥

तामिस्रादि हीं एकवीस नरकांचीं नांवें आहेत. तापन हा शेवटचा एकविसावा नरक आहे. त्यांना तामिस्रादि हीं गाढ अंधकार इत्यादिकांवरून अन्वर्थ नांवें प्राप्त झालीं आहेत. महापातकें व उपपातकें यांच्या योगानें उत्पन्न झालेल्या भयंकर पापांनीं युक्त होऊनही प्रायश्चित्त न करणारे अधम पुरुष त्यांस प्राप्त होतात २२२–२२५.

प्राप्त दुरिताचा नाश करण्यासाठीं प्रायश्चित्त करावयाचें असतें असें वर सांगितलें. आतां त्याचाच विशेष सांगतात—

प्रायश्चित्तैरपैत्येनो यदज्ञानकृतं भवेत् ।
कामतो व्यवहार्यस्तु वचनादिह जायते ॥ २२६ ॥

पुढें सांगितलेल्या प्रायश्चित्तांनीं अज्ञानतः केलेलें पाप जातें. इच्छापूर्वक केलेलें जात नाहीं. पण तसल्या ( कामनापूर्वक केलेल्या ) पापाचेंही प्रायश्चित्त सांगितलेलें असल्यामुळें तो लोकांत व्यवहारास योग्य होतो. अज्ञानकृत व कामकृत असे शब्द येथें जरी असले तरी त्यांतील ज्ञान व काम यांचा एकच अर्थ समजावा. अर्थात् ज्ञानतः—अज्ञानतः; कामतः—अकामतः; बुद्धिपूर्व—अबुद्धिपूर्व इत्यादि शब्दांचा अर्थ एकसारखाच समजावा. कारण निरनिराळ्या स्मृतिकारांनीं त्यांचा तुल्यार्थी उपयोग केला आहे. शिवाय स्वतंत्र प्रवृत्ति व्हावयास विषयाचें ज्ञान व कामना यांची अत्यंत आवश्यकता असते. त्यांतील एक नसल्यास प्रवृत्तीचा असंभव होतो. यास्तव ' कामतः, ' असें म्हटलें असतां ज्ञान व ' ज्ञानतः ' असें म्हटलें असतां काम प्राप्त होतो. कारण कामना व ज्ञान एकमेकांस सोडून रहात नाहींत. आतां कोणा एकाद्याला एकाद्या कर्मांत चोरादिकांनीं बलात्कारानें प्रवृत्त केलें असतां त्या पुरुषास विषयज्ञान असलें तरी कामना नसते. अर्थात् ज्ञान व कामना एकमेकांस सोडून राहतात, म्हणून कोणी म्हणेल तर तें बरोबर नाहीं. कारण तशाप्रसंगीं पुरुषाला विषयज्ञान जरी असलें तरी तें त्याच्या प्रवृत्तीचें निमित्त होत नाहीं. तर त्याची प्रवृत्ति दुसऱ्याच्या बलात्कारानें होत असते. यास्तव तें ( ज्ञान ) असलें तरी नसल्यासारखेंच होय. तसेंच, एकादेवेळीं शुष्क जागीं पडण्याची इच्छा असतांना एकादा पुरुष भ्रांतीनें चिखलांत पडतो. पण अशा जागींही खऱ्या ज्ञानाचा अभाव असल्यामुळें त्याविषयींच्या कामनेचाही अभावच असतो. सारांश, ज्ञान व कामना परस्परांस सोडून रहात नाहींत.

कोणी म्हणेल कीं प्रायश्चित्तांच्या योगानें पापांचा क्षय होतो, हें म्हणणें युक्त नव्हे. कारण, कोणतेंही कर्म आपल्या फलानेंच क्षीण होत असतें. पण तें बरोबर नव्हे. कारण, जशी पापोत्पत्ति शास्त्रगम्य तसाच त्याचा क्षयही शास्त्रगम्य असतो. यास्तव तेथें दुसरें प्रमाण

कांहीं उपयोगीं पडत नाहीं. एवढ्या साठींच गौतमानें पूर्वोत्तर पक्षांच्या शैलीनें असा अर्थ दाखविला आहे.–प्रायश्चित्त करावें कीं न करावें, याविषयीं मीमांसा करितात. करूं नये असें कोणी म्हणतात. कारण कर्म क्षीण होत नाहीं; पण त्यावर दुसरे कित्येक म्हणतात—व्रात्यस्तोम केला असतां पापाचा क्षय होतो. त्यानंतर उपनयनापासून त्यानें ब्रह्मचर्य पाळावें. जो अश्वमेध करतो तो सर्व पाप व भ्रूणहत्या यांचें उल्लंघन करतो व ज्योतिष्टोमादि द्विजाति कर्मास योग्य होतो–असें सांगितलेलें आहे. यास्तव तें करावें हा नुस्ता अर्थवाद आहे असें समजूं नये. विशेष अधिकाऱ्याची आकांक्षा झाली असतां रात्रिसत्रन्यायानें आर्थवादिक फलाचीच कल्पना करणें न्याय्य होय. यास्तव प्रायश्चित्तांनीं पाप जातें, हें म्हणणें युक्तच आहे.

**शंका**—पण बुद्धिपूर्वक केलेल्या कर्मांचें प्रायश्चित्त नसतें, तेंव्हा ते करणाराला व्यवहार्यत्व कसें ? ' अबुद्धिपूर्वक केलेल्या कर्मांचें प्रायश्चित्त करतां येतें ' असें म्हणून वसिष्ठांनीं प्रायश्चित्तांचा अभाव सांगितला आहे. मनूनेंही ( अ. ११ श्लो. ८९ ) ' इयं विशुद्धिरुदिता प्रमाप्याकामतो द्विजम् । कामतो ब्राह्मणवधे निष्कृतिर्न विधीयते ' असें म्हणून वरील अर्थच व्यक्त केला आहे.

**समाधान**—या म्हणण्यांत कांहीं सार नाहीं. कारण ' जो नर कामतः महापाप करतो त्याला भृगुपात किंवा अग्निप्रवेश यावाचून निष्कृति नाहीं' असें व 'अकामतः केलेल्या पापाला जें प्रायश्चित्त सांगितलेलें असतें तेंच कामतः केलेल्या पापास दुप्पट समजावें ' असें वचन असल्यानें मुळें कामकृत दोषांचेंही प्रायश्चित्त असतें, असें ठरतें. आतां वर जें वसिष्ठाचें वचन दिलें आहे त्याचा–अकामकृत अपराधांमध्यें प्रायश्चित्त शुद्धिकर होतें–असा अभिप्राय जाणावा. कामकृत अपराधानां प्रायश्चित्तच नसतें, असा नव्हे. ' इयं विशुद्धि० ' इत्यादि जें मनूचें वचन आहे त्यांतील ' इयं ' म्हणजे ही या सर्वनामावरून प्रकृत द्वादशवार्षिक व्रतचर्येचा परामर्श होतो व त्या व्रतचर्येस अनुलक्षूनच ' कामतः ब्राह्मणवध केल्यास निष्कृति नाहीं ' असें म्हटलें आहे. तें वचन सर्वच पायश्चित्तांचा निषेध करीत नाहीं. कारण मरणान्तिकादि दुसऱ्या प्रायश्चितांचें विधान केलेलें आहे.

**शंका**—पण कामकृत अपराधांनाही जर प्रायश्चित्त आहे तर त्याच्या योगानें पापक्षयही कां होत नाहीं. आणि सामान्यतः पापक्षयही जर होत नाहीं तर तो अपराधी व्यवहारास पात्र कसा होतो ?

**समाधान**—सांगतों–दोन्ही प्रकारच्या प्रायश्चित्तांत कांहीं विशेष जरी नसला तरीं त्यांच्या फलांतील विशेष शास्त्रावरून ज्ञात होतो. अज्ञानतः केलेल्या अपराधाचा प्रायश्चित्तानें सर्वत्र क्षय होतो. पण गौतमानें–ब्रह्महा, सुरापान करणारा, गुरुस्त्रीगमन करणारा, मातृपितृयोनिसंबद्ध, चोर, नास्तिक, निन्दित कर्म वारंवार करणारा, पतिताचा त्याग न करणारा, अपतिताचा त्याग करणारा, स्वतः पतित व पातक करविणारे–असें म्हणून ज्यांचा निर्देश केला आहे त्या महापातकादिकांमध्यें व्यवहार्यत्वाचा निषेध केलेला असल्यामुळें तशा प्रकारचें पतनास कारण होणारें कर्म कामतः केलें असतां त्याचें प्रायश्चित्त केल्यास अपराधी पुरुष

नुस्ता व्यवहार्य होतो. त्याच्या पापाचा क्षय होत नाहीं. आतां पापक्षय न झाल्यास व्यवहार्य होणें युक्त नव्हे म्हणून म्हणाल तर तसें नाहीं. कारण पापाच्या दोन शक्ति आहेत. एक नरकोत्पादिका व दुसरी व्यवहारनिरोधिका. त्यांतील पहिल्या शक्तीचा विनाश झालेला नसला तरी व्यवहारनिरोधक शक्तीचा विनाश अनुपपन्न नाहीं आणि त्यामुळें पाप नष्ट झालेलें नसलें तरी व्यवहार्यत्व येऊं शकतें. मनूनें ( अ. ११ श्लो. ४५ ) ' अकामतः पाप केल्यास सुज्ञानीं प्रायश्चित्त सांगितलें आहे व कांहींजण श्रुतीच्या दृष्टान्तावरून कामतः केलेल्या अपराधांचेंही प्रायश्चित्त सांगतात, ' असें जें म्हटलें आहे तेंही कामतः केलेल्या कर्मालाही प्रायश्चित्त प्राप्त व्हावें म्हणून आहे. पापाचा क्षय होतो, असें प्रतिपादन करण्याकरितां नव्हे. पण तेंच पतित न करणारें पाप कामतः जरी केलें असलें तरी प्रायश्चित्तानें त्याचा क्षय होतोच. कारण मनूनें ( अ. ११ श्लो. ४६ ) तसें सांगितलें आहे. पतित करणारेंही कर्म बुद्धिपूर्वक जरी केलें तरी त्याच्या क्षयार्थ मरणान्तिक प्रायश्चित्त केल्यास त्या पापाचाही क्षय होतो.कारण त्याचें दुसरें कांहीं फल उक्त नसतें. आपस्तंबानेंही ' आमरणान्त प्रायश्चित्तानें पुरुषाला या लोकीं कांहीं लाभ होत नाहीं. पण त्याचें सर्व पाप नष्ट होतें. ' असें सांगितलें आहे २२६.

निषिद्ध आचरणादिक प्रायश्चित्ताचें निमित्त आहे, हें सांगितलें. आतां त्याचाच प्रपंच करण्याकरितां म्हणतात—

ब्रह्महा मद्यपः स्तेनस्तथैव गुरुतल्पगः।
एते महापातकिनो यश्च तैः सह संवसेत् ॥ २२७ ॥

हन् हा धातु प्राणवियोग करणाऱ्या व्यापारांत रूढ आहे. ज्याच्या व्यापारानंतर लागलाच किंवा कांहीं वेळानें दुसऱ्या कोणत्याही कारणावाचून ब्राह्मणाचा प्राणवियोग होतो त्यानें त्या ब्राह्मणाला मारलें, असें होतें व तोच ब्रह्महा होय. निषिद्ध सुरेचें पान करणारास मद्यप म्हणतात. ब्राह्मणाचें सुवर्ण चोरणारा स्तेन, ( कारण ब्राह्मणसुवर्णहरण महापातक आहे, असें आपस्तंबानें म्हटलें आहे. ) गुरुभार्यागमन करणारा गुरुतल्पग होय. येथील तल्प हा शब्द जरी शयनाचा वाचक आहे तरी शयनसाहचर्यानें भार्या लक्षित होते. हे ब्रह्महादि चार महापातकी आहेत. जीं उच्च स्थितीपासून पतित करितात किंवा दुःखांत पाडतात तीं पातकें महा या विशेषणानें ब्रह्महत्यादिकांचें गुरुत्व दाखविलें आहे. त्यांचा ज्यांच्याशीं योग होतो ते महापातकी. जो त्या चार महापातक्यांतील प्रत्येकाशीं सहवास करतो तोही पुढें सांगितलेल्या न्यायानें महापातकी होतो. हिंसाकर्मांत हिंसकाला साह्य करणारास अनुग्राहक म्हणतात. त्याचाही हिंसाफलाशीं संबंध असतो. मनूनेंही तसें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें आपस्तंबानें प्रयोजिता, अनुमन्ता व कर्ता या तिघांचाही फलाशीं संबंध सांगितला आहे. एकाद्या कामांत प्रवृत्त न होणाराला जो प्रवृत्त करतो तो प्रयोजक. त्याचे तीन प्रकार आहेत. आज्ञापयिता, अभ्यर्थयमान, व उपदेष्टा. जो स्वतः उच्च असून नीच भृत्यादिकांस माझ्या या शत्रूला मार, असें म्हणून प्रेरणा करतो, तो आज्ञापयिता होय. जो स्वतः असमर्थ असल्यामुळें प्रार्थना

पूर्वक माझ्या शत्रूला मार, असा दुसऱ्यास आग्रह करतो तो अभ्यर्थ्यमान होय. हे दोघे स्वार्थसिद्धीकरितांच प्रेरणा करितात. पण उपदेष्टा ' तूं आपल्या शत्रूला अशा अशा युक्तीनें मार ' असें मर्मोद्घाटन करून, प्रेरणा करीत असतो. अर्थात् उपदेष्टयाला वधाचें कांहीं फल मिळत नसून त्यानें ज्याला उपदेश केलेला असतो त्यालाच सर्व फळ मिळतें. अर्थात् पहिल्या दोघांप्रमाणें तो स्वार्थसिद्धीकरितां प्रेरक होत नाहीं. असो, या त्रिविध प्रयोजकांमध्यें हा असा अवांतर फलभेद आहे. जो पूर्वीच एकाद्या कामांत प्रवृत्त झालेला असतो त्याला प्रवृत्त करणारा अनुमन्ता होय. तो दोन प्रकारचा आहे. कोणी स्वार्थसिद्धीकरितां अनुमोदन देतो, कोणी परार्थसिद्धीकरितां अनुज्ञा देतो.

**शंका**—पण अनुमोदन हिंसेचें निमित्त कसें होतें ? प्राणवियोग ही क्रिया उत्पन्न करून तें निमित्त होतें असें म्हणतां येत नाहीं. कारण प्राणवियोग साक्षात् कर्त्याच्या व्यापारानेंच होत असतो. वरें प्रयोजकाप्रमाणें साक्षात् कर्त्याची ( प्रत्यक्ष हिंसा करणाराची ) प्रवृत्ति उत्पन्न करून तिच्या द्वारा अनुमोदन हिंसेचें निमित्त होतें म्हणून म्हणावें तर तेंही जुळत नाहीं. कारण अनुमन्ता प्रवृत्त झालेल्या पुरुषाला नुस्तें प्रोत्साहन देत असतो. ' तूं चांगला निश्चय केला आहेस. ' असें म्हणून जो प्रवृत्त झालेला असतो त्यालाच तो ( अनुमन्ता ) अनुमोदन देतो म्हणून म्हणावें तर तेंही बरोबर नव्हे. कारण तशा प्रकारचें हिंसेचें कारण होऊं शकत नाहीं. शिवाय अनुमोदन हें हिंसेचें व्यर्थ निमित्त आहे. ज्याला हिंसा करावयाचीच असते तो ती कोणी अनुमोदन न दिलें तरी करणारच ! तस्मात् अनुमोदन हिंसेचा हेतु ( निमित्त, कारण, ) होऊं शकत नाहीं.

**समाधान**—असेंच कांहीं नियमानें म्हणतां येणार नाहीं. कारण, असें समजा कीं, एक पुरुष राजादिकांच्या परतंत्र असल्यामुळें मनानें स्वतः प्रवृत्त झालेला असला तरी आपल्या प्रवृत्तीला कांहीं विघ्न ( प्रतिबंध ) होईल, या भीतीनें अथवा पुढें दंड होईल, या भीतीनें आपला प्रयत्न शिथिल करितो व राजादिकांच्या अनुमोदनाची अपेक्षा करतो. अशाप्रसंगी अनुमोदन हनन करणाराच्या प्रवृत्तीस पुष्ट करतें. त्यामुळें तें हिंसाफलाचें निमित्त होतें. त्याचप्रमाणें दुसराही निर्भर्त्सना करणें, ताडन करणें, धनाचा अपहार करणें, इत्यादिकांच्या योगानें दुसऱ्यांस कोपयुक्त करतो. व तोही मरणहेतुभूत कोपास उत्पन्न करून त्याच्या द्वारा हिंसेचा हेतु होतो. म्हणूनच विष्णूनें म्हटलें आहे, ' शिव्या देऊन, ताडन करून अथवा धनापहार करून ज्याला एकाद्यानें दुःख दिलें आहे असा तो त्या दुःख देणाऱ्याविषयीं मनांत जळफळत प्राण सोडतो. अशा प्रसंगीं त्या शिव्या वगैरे देणाराला ब्रह्मघातकी म्हणतात. ' त्याचप्रमाणें ' ज्ञाति, पुत्र, स्त्री, सुहृत्, क्षेत्र, इत्यादिकांकरितां ज्याला उद्देशून एकादा ब्राह्मणादि प्राण सोडतो तो ब्रह्मघातकी होय ' असें म्हटलें आहे. अर्थात् एकादा प्राण देईल इतका कोप उत्पन्न करण्यास कारण होणें हें हिंसा करण्यासारखेंच आहे.

आतां कदाचित् कोणी म्हणेल कीं, एकाद्या सात्विक साधूला किंवा दुर्बलाला शिव्या दिल्या, मारलें किंवा लुटलें तरी त्याला क्रोध येत नाहीं, असें दिसतें. त्यामुळें शिव्या देणें

इत्यादि हीं कारणें होऊं शकत नाहींत. पण तें बरोबर नाहीं. कारण प्रत्येक पुरुषाचा निरनिराळा स्वभाव असतो. यास्तव कांहीं लोक जरी असे सहिष्णू असले तरी पुष्कळसे जन थोड्याशाच निमित्तानें कोपाविष्ट होत असतात. त्यामुळें शिव्या देणें इत्यादि हिंसेचें कारण होत नाहीं, असें म्हणणें व्यर्थ आहे. असो; अग्राहक, प्रयोजक इत्यादिकांतील ज्याचें ज्या हिंसादि क्रियेशीं जितकें सामीप्य किंवा दूरत्व किंवा त्या व्यापारांत गुरुलघुभाव असेल त्या मानानें त्याला न्यूनाधिक फल व न्यूनाधिक प्रायश्चित्त मिळतें, असें जाणावें. कारण ' यो भूय आरभते तस्मिन्फलविशेषतः । जो अधिक आरंभ करतो त्याला विशेष फळ मिळतें' असें सांगितलें आहे. त्यांतील अनुग्राहक साक्षात् खड्गप्रहरादिक करीत नाहीं. म्हणून साक्षात् हिंसा करणाऱ्यापेक्षां त्याला त्या कर्माचें फल कमी मिळणार व त्यामुळेंच प्रायश्चित्तही कमी. प्रयोजक हिंसा करणाराला ( म्हणजे स्वतंत्र कर्त्याला ) प्रेरणा करीत असतो. म्हणूनच तो अनुग्राहकापेक्षांही कमी अपराधी, व कमी फलाचा भागी होतो. उपदेष्टा तर नेहमींच दुसऱ्यासाठीं उपदेश करीत असतो. यास्तव त्याला सर्वांत कमी फळ मिळतें.

**शंका**—प्रेरणा केला जाणारा ( प्रयोज्य ) प्रेरणा करणाऱ्या प्रयोजकाच्या हातासारखा असतो, यास्तव त्यांचा हिंसादि क्रियांच्या फलांशीं संबंध असणें युक्त नव्हे. कारण दुसऱ्याच्या सांगण्यावरून क्रिया करणारालाही जर फळ मिळूं लागलें तर एखाद्या धार्मिकानें पूर्तकर्मासाठीं तडाग निर्माण करावयास लाविलेल्या व मूल्य ( मजुरी ) घेऊन खननादि कर्म करणाऱ्या भृत्यांनाही स्वर्गफल मिळूं लागेल.

**समाधान**—खरें आहे. पण ' शास्त्रफलं प्रयोक्तरि ' म्हणजे शास्त्रफल प्रयोक्त्याशींच संबंध ठेवतें, या न्यायानें देवमंदिर, कूप, तडाग इत्यादिकांस निर्माण करणें इत्यादि क्रिया अधिकारी कर्त्यालाच फळ देतात. गवंडी, तडाग खोदणारे इत्यादि त्या त्या पूर्त कर्मांचे अधिकारी नव्हेत. कारण, त्यांना त्या क्रिया करून द्रव्य मिळविण्याची इच्छा असते. स्वर्गाची कामना नसते. पण हिंसेची गोष्ट त्याहून अगदीं निराळी आहे. कारण तिच्या विरोधी अहिंसा सर्वांनाच साधारण असून दुसऱ्यांच्या प्रेरणेनेंही तिचें उल्लंघन करणारा दोषी होतोच. असो, अनुमोदन देणाराला तर प्रयोजकाहूनही अल्प फल मिळतें. कारण अनुमोदन प्रयोजकाच्या प्रेरणेपेक्षां बहिरंग असून शिवाय लघु आहे. आतां क्रोधादिकांस निर्माण करून जो निमित्तकर्ता होतो तो क्रोधादिकांचा मात्र हेतु होतो. साक्षात् हिंसेचा हेतु होत नाहीं. अर्थात् निमित्त होणें व हिंसा यांमध्यें क्रोधाचा पडदा असतो. शिवाय यानें जीव द्यावा अशा उद्देशानेंही शिव्या देणारानें त्या दिलेल्या नसतात. यास्तव अनुमोदन देणाराहूनही निमित्तकारण होणाराला अल्प फल प्राप्त होतें.

**शंका**—अहो, पण व्यवहित ( परंपरेनें संबद्ध ) असलेले पुरुषही जर कारण होऊं लागले तर माता, पिता इत्यादिकही हिंसक पुत्राला उत्पन्न केल्यामुळें हिंसाकर्ते होऊं लागतील. ( अर्थात् हिंसक पुत्राला निर्माण करणारे आईबापही हिंसादोषभाक् होतील. )

**समाधान**—छे, नुस्तें पूर्वी असणें एवढ्यानेंच कांहीं कारण होत नसतें तर जें कारण होणार तें खरोखरींच क्रियेचें निमित्त असावें लागतें. जें स्वरूपातिरिक्त कार्योत्पत्तीला

इत्यादि हीं कारणें होऊं शकत नाहींत. पण तें बरोबर नाहीं. कारण प्रत्येक पुरुषाचा निरनिराळा स्वभाव असतो. यास्तव कांहीं लोक जरी असे सहिष्णू असले तरी पुष्कळसे जन थोड्याशाच निमित्तानें कोपाविष्ट होत असतात. त्यामुळें शिव्या देणें इत्यादि हिंसेचें कारण होत नाहीं, असें म्हणणें व्यर्थ आहे. असो; अग्राहक, प्रयोजक इत्यादिकांतील ज्याचें ज्या हिंसादि क्रियेशीं जितकें सामीप्य किंवा दूरत्व किंवा त्या व्यापारांत गुरुलघुभाव असेल त्या मानानें त्याला न्यूनाधिक फल व न्यूनाधिक प्रायश्चित्त मिळतें, असें जाणवें. कारण ' यो भूय आरभते तस्मिन्फलविशेषतः । जो अधिक आरंभ करतो त्याला विशेष फळ मिळतें' असें सांगितलें आहे. त्यांतील अनुग्राहक साक्षात् खड्गप्रहरादिक करीत नाहीं. म्हणून साक्षात् हिंसा करणाऱ्यापेक्षां त्याला त्या कर्माचें फल कमी मिळणार व त्यामुळेंच प्रायश्चित्तही कमी. प्रयोजक हिंसा करणाराला ( म्हणजे स्वतंत्र कर्त्याला ) प्रेरणा करीत असतो. म्हणूनच तो अनुग्राहकापेक्षांही कमी अपराधी, व कमी फलाचा भागी होतो. उपदेष्टा तर नेहमींच दुसऱ्यासाठीं उपदेश करीत असतो. यास्तव त्याला सर्वांत कमी फळ मिळतें.

**शंका**—प्रेरणा केला जाणारा ( प्रयोज्य ) प्रेरणा करणाऱ्या प्रयोजकाच्या हातासारखा असतो, यास्तव त्यांचा हिंसादि क्रियांच्या फलांशीं संबंध असणें युक्त नव्हे. कारण दुसऱ्याच्या सांगण्यावरून क्रिया करणारालाही जर फळ मिळूं लागलें तर एखाद्या धार्मिकानें पूर्तकर्मासाठीं तडाग निर्माण करावयास लाविलेल्या व मूल्य ( मजुरी ) घेऊन खननादि कर्म करणाऱ्या भृत्यांनाही स्वर्गफल मिळूं लागेल.

**समाधान**—खरें आहे. पण ' शास्त्रफलं प्रयोक्तरि ' म्हणजे शास्त्रफल प्रयोक्त्याशींच संबंध ठेवतें, या न्यायानें देवमंदिर, कूप, तडाग इत्यादिकांस निर्माण करणें इत्यादि क्रिया अधिकारी कर्त्यालाच फळ देतात. गवंडी, तडाग खोदणारे इत्यादि त्या त्या पूर्त कर्मांचे अधिकारी नव्हेत. कारण, त्यांना त्या क्रिया करून द्रव्य मिळविण्याची इच्छा असते. स्वर्गाची कामना नसते. पण हिंसेची गोष्ट त्याहून अगदीं निराळी आहे. कारण तिच्या विरोधी अहिंसा सर्वांनाच साधारण असून दुसऱ्यांच्या प्रेरणेनेंही तिचें उल्लंघन करणारा दोषी होतोच. असो, अनुमोदन देणाराला तर प्रयोजकाहूनही अल्प फल मिळतें. कारण अनुमोदन प्रयोजकाच्या प्रेरणेपेक्षां बहिरंग असून शिवाय लघु आहे. आतां क्रोधादिकांस निर्माण करून जो निमित्तकर्ता होतो तो क्रोधादिकांचा मात्र हेतु होतो. साक्षात् हिंसेचा हेतु होत नाहीं. अर्थात् निमित्त होणें व हिंसा यांमध्यें क्रोधाचा पडदा असतो. शिवाय यानें जीव द्यावा अशा उद्देशानेंही शिव्या देणारानें त्या दिलेल्या नसतात. यास्तव अनुमोदन देणाराहूनही निमित्तकारण होणाराला अल्प फल प्राप्त होतें.

**शंका**—अहो, पण व्यवहित ( परंपरेनें संबद्ध ) असलेले पुरुषही जर कारण होऊं लागले तर माता, पिता इत्यादिकही हिंसक पुत्राला उत्पन्न केल्यामुळें हिंसाकर्ते होऊं लागतील. ( अर्थात् हिंसक पुत्राला निर्माण करणारे आईबापही हिंसादोषभाक् होतील. )

**समाधान**—छे, नुसतें पूर्वी असणें एवढ्यानेंच कांहीं कारण होत नसतें तर जें कारण होणार तें खरोखरींच क्रियेचें निमित्त असावें लागतें. जें स्वरूपातिरिक्त कार्योत्पत्तीला

महापातकासारखें आहे. कारण गौतमानें ' गुरोरनृताभिशंसनम् ' असें म्हणून त्याची महापातकतुल्य पापांत गणना केली आहे. पण हें म्हणणें लोकांस विदित नसलेल्या दोषांचें कथन केल्यास, त्याविषयीं आहे, असें जाणावें. कारण, आपस्तंबांनीं तसें सांगितलें आहे. नास्तिक्याचा अभिमान धरून वेदांची निंदा करणें, सुहृत् म्हणजे मित्र तो अब्राह्मण असला तरी त्याचाही वध करणें, अध्ययन केलेल्याही वेदांचा असत् शास्त्रांच्या अभ्यासांत वेळ घालवून अथवा आळसानें नाश करणें, म्हणजे त्यांना विसरणें, हीं सर्व ( यांतील प्रत्येक पाप ) ब्रह्महत्येसारखीं आहेत. आतां ' स्वाध्यायाग्निसुतत्याग ' असें ( श्लोक २३९ ) म्हणून अध्ययन केलेल्या वेदादिकांच्या त्यागाची उपपातकांत जी गणना केली आहे ती-कुटुंब भरणांत आकुल झाल्यामुळें अथवा असच्छास्त्रश्रवणांत व्यग्र झाल्यामुळें वेदविस्मरण झाल्यास योग्य आहे—अशी कशीतरी समजूत करून घ्यावी २२८.

आतां सुरापानासारखीं पातकें कोणतीं तें सांगतात—

**निषिद्धभक्षणं जैह्म्यमुत्कर्षे च वचोऽनृतम् ।**
**रजस्वलामुखास्वादः सुरापानसमानि तु ॥ २२९ ॥**

निषिद्ध लशुनादिक, त्याचें बुद्धिपूर्वक भक्षण. ( म्हणूनच मनूनें अ० ५ श्लो. १९ छत्राक, गांवडुक्कर, लशुन, गांवातील कोंबडें, कांदा, गाजर इत्यादि बुद्धिपुरःसर खाल्ल्यास पुरुष पतित होतो, असें म्हटलें आहे. पण तींच अबुद्धिपुरःसर खालेलीं असल्यास पुढच्याच विसाव्या श्लोकांत कृच्छ्र, सांतपन, चांद्रायण व निदान एकोपवास करावा असें म्हणून दुसरें प्रायश्चित्त सांगितलें आहे. ) जैह्म्य म्हणजे कौटिल्य. मनांत निराळेंच चिंतन करून, तोंडानें निराळेंच सांगून, हातानें त्याच्या अगदीं विपरीत करणें. ( येथें सामान्यतः जैह्म्य जरी सांगितलें आहे तरी प्रायश्चित्त गुरु ( भारी ) असल्यामुळें त्याचें निमित्तही तसेंच गुरु असलें पाहिजे, असें अनुमान होतें. मीमांसेंत ' यस्योभावग्नी अनुगतौ स्याताम्० ' इत्यादि वाक्यांची मीमांसा करीत असतांना. पुनराधानरूपांत नैमित्तिक विधिवलानें दोन अग्नींची अनुगति हेंच निमित्त जसें कल्पिलें जातें त्याचप्रमाणें येथेंही निमित्तगौरवाची कल्पना करणेंच युक्त आहे. ) आपला उत्कर्ष व्यक्त करण्यासाठीं खोटें बोलणें ( जसें—एकादा चतुर्वेदवेत्ता नसतांना आपला उत्कर्ष व्यक्त करण्यासाठीं मी चतुर्वेदवेत्ता आहे, असें राजकुलादिकांत सांगतो ), व रजस्वलेची कामना नसल्यामुळें तिच्या मुखासवाचें तरी सेवन करणें, हीं सुरापानासारखीं पातकें आहेत २२९.

आतां सुवर्णस्तेयासारखीं पातकें सांगतात—

**अश्वरत्नमनुष्यस्त्रीभूधेनुहरणं तथा ।**
**निक्षेपस्य च सर्वं हि सुवर्णस्तेयसंमितम् ॥ २३० ॥**

ब्राह्मणसंबंधी अश्व, रत्न, मानुष, स्त्री, भूमि, धेनु व सुवर्णावाचून दुसरा निक्षेप ( ठेव ) यांचा अपहार करणें, हें सर्व सुवर्णाच्या चोरीसारखें आहे, असें जाणावें २३०.

सखा म्हणजे मित्र, त्याची भार्या, उत्तमजातीची कन्या, ( अर्थात् अनुलोमकन्या सकाम असल्यास तिच्याशीं गमन करण्यांत दोष नाहीं. ) भगिनी, चाण्डाली, समान गोत्रांतील स्त्री व स्नुषा यांच्याशीं गमन करणें, हें गुरुतल्पगमनासारखें आहे. पण हें म्हणणें रेतःसेकानंतर जाणावें. रेतःसेकापूर्वी निवृत्त झाल्यास गुरुतल्पसमत्व नसून किंचित् न्यूनत्व असतें. त्यामुळें प्रायश्चित्तही कमी प्राप्त होतें. सगोत्रा स्त्रीचें ग्रहण केलेलें असतांनाही पुनः स्नुषेचें जें ग्रहण केलें आहे तें स्नुषागमनाचें प्रायश्चित्त अधिक करावें लागतें, हें सांगण्यासाठीं आहे. वर गुरूंचा अधिक्षेप इत्यादिकाला ब्रह्महत्यादिसमत्व जें सांगितलें आहे, तें गुर्वधिक्षेपादिकांनाही ब्रह्महत्यानिमित्तक प्रायश्चित्ताचा उपदेश करितां यावा म्हणून आहे.

आतां कोणी म्हणेल कीं, वेदनिन्दादि दोष अल्प असल्यामुळें त्यांना उद्देशून ब्रह्महत्यादिकांचें गुरुप्रायश्चित्त सांगणें योग्य नव्हे तर तें म्हणणें बरोबर नाहीं. कारण गुरुप्रायश्चित्ताचा ज्याअर्थी उपदेश केला आहे त्याअर्थीच त्यांतील दोषगुरुत्वाचें अनुमान होतें. पण त्यावर कोणी पुनः असें म्हणेल कीं, हें वचन ब्रह्महत्यादि प्रायश्चित्तांचा अतिदेश करण्यासाठींच प्रवृत्त झालेलें नाहीं तर केवळ दोषगौरवाचें प्रतिपादन करण्याकरितां तें प्रवृत्त झालें आहे. पण तेंही अयोग्य आहे. कारण त्याला तेवढेंच जर प्रतिपादन करावयाचें असतें तर अमुक ब्रह्महत्येसारखें आहे, हें अमुक गुरुतल्पसम आहे, इत्यादि पृथक् निर्देश कशाला केला असता ? ब्रह्महत्येसारखें आहे, असें म्हणून ज्या प्रायश्चित्ताचा उपदेश केलेला असतो त्याचा अभिप्राय त्या त्या दोषाला उक्त असलेल्या प्रायश्चित्ताहून किंचिन्न्यूनच प्रायश्चित्त सांगण्यांत असतो. कारण लौकिकांत सुद्धां राजासारखा मंत्री इत्यादि वाक्यांचा अभिप्राय मंत्री राजापेक्षां किंचित् न्यून ( हीन ), असाच समजतात. शिवाय एक महत् पातक व दुसरें त्याच्यासारखें पातक या दोघांचें सर्वथा साम्य होणें युक्तीला धरूनही नाहीं.

असो; अशी वस्तुस्थिति असल्यामुळें याज्ञवल्क्यांनीं ब्रह्महत्यासम म्हणून सांगितलेल्या वेदत्याग, वेदनिन्दा, सुहृद्वध इत्यादिकांना मनूनें ( अ. ११ श्लो. ५६ ) सुरापानसम म्हणून जें म्हटलें आहे, तें प्रायश्चित्त विकल्पार्थ आहे, असें समजावें. अन्य वचनांतील विरोधाचाही असाच परिहार करावा. वसिष्ठानें ' द्वादशरात्र कृच्छ्र करून सचैलस्नान केल्यावर गुरूच्या प्रसादानें पवित्र होतो. ' असें म्हणून गुरुनिंदेचें अगदीं लघुप्रायश्चित्त जें सांगितलें आहे तें अबुद्धिपुरःसर व एकदांच केल्यास जाणावें २३१.

आतां गुरुतल्पातिदेश सांगतात—

**पितुःस्वसारं मातुश्च मातुलानीं स्नुषामपि ।**
**मातुः सपत्नीं भगिनीमाचार्यतनयां तथा ॥ २३२ ॥**
**आचार्यपत्नीं स्वसुतां गच्छंस्तु गुरुतल्पगः ।**
**लिङ्गं छित्वा वधस्तत्र सकामायाः स्त्रिया अपि ॥ २३३ ॥**

पित्याची बहीण ( आते ), मावशी, मामी, स्नुषा, सावत्र आई, बहीण, आचार्याची कन्या, आचार्याची भार्या, स्वसुता, इत्यादिकांशीं गमन करणाऱ्या पुरुषाचें लिंग तोडून

राजानें दंडार्थ त्याचा वध करवावा. तेंच त्याला उक्त प्रायश्चित्त होय. मातुश्च येथील चशब्दानें राणी, संन्यासीण, चुलती, शिष्याची स्त्री, बहिणीची सखी, आश्रयाला येऊन राहिलेली, दायी, साध्वी स्त्री, उत्तम वर्णाची स्त्री व वेश्येसारख्या सर्व सामान्य स्त्रियांचेंही ग्रहण करावें. हा लिंगच्छेद व वधरूप दंड ब्राह्मणाव्यतिरिक्त पुरुषास उद्देशून सांगितलेला आहे. कारण ' न जातु ब्राह्मणं हन्यात् ' असा निषेध आहे. वधच प्रायश्चित्तरूप आहे. त्याचा विषय गुरुतल्पप्रायश्चित्तप्रकरणांत आम्हीं अधिक स्पष्ट करूं. स्नुषा व भगिनी यांचें वर एकदां ग्रहण केलेलें असतांनाही पुनः येथें ग्रहण करून प्रायश्चित्ताचा विकल्प दाखविला आहे. जेव्हां या स्त्रिया स्वतः सकाम होऊन आपल्या त्या त्या संबंधी पुरुषांस आपल्या वश करून घेतात व त्यांचा उपभोग घेतात तेव्हां त्यांचाही पुरुषांप्रमाणें वधच करावा. कारण तोच त्यांना योग्य दंड व तेंच योग्य प्रायश्चित्त आहे. गुर्वधिक्षेपापासून कन्यागमनापर्यंत सांगितलेलीं हीं तत्काळ पतनाचीं निमित्तें असल्यामुळें पातकें होत. कारण यमानें ' मावशी, आईची मैत्रीण, कन्या, आते, मामी, बहीण व सासू यांच्याशीं गमन केल्यास पुरुष तत्काल पतित होतो ' असें म्हटलें आहे. गौतमानें तर ' मातृ-पितृ-योनिसंबद्ध, चोर, नास्तिक, निंदित कर्माभ्यासी, पतिताचा त्याग न करणारा व अपतिताचा त्याग करणारा, हे सर्व पतित व पातकसंयोजक आहेत ' असें म्हणून दुसऱ्यानांही पातकत्व सांगितलें आहे. परंतु त्यांचा पाठ महापातकांत व उपपातकांतही असल्यामुळें तीं महापातकांहून न्यून व उपपातकाहून गुरु आहेत, असें होतें. कारण ' जीं कर्मे महापातकतुल्य म्हणून सांगितलेलीं असतात तीं पातकें होत. उपपातकें त्यांहून न्यून असतात, ' असें म्हटलें आहे. अंगिरानेंही तसेंच सांगितलें आहे २३२, २३३.

याप्रमाणें महापातकें व तत्सम पातकें, यांची परिगणना करून उपपातकांची गणना करण्याकरितां म्हणतात—

**गोवधो व्रात्यता स्तेयमृणानां चानपाक्रिया ।**
**अनाहिताग्नितापण्यविक्रयः परिवेदनम् ॥ २३४ ॥**

गायीच्या शरीराचें व्यापादन ( नाशन ), व्रात्यता ( योग्य समयीं उपनयन न करणें ), ब्राह्मणसुवर्ण व तत्सम दुसरें धन यांवाचून दुसरें कोणतेंही धन चोरणें, घेतलेल्या ऋणादिकांचें अप्रदान ( परत न देणें ) व तसेंच देवर्षि-पितृसंबंधि ऋणांचें अपाकरण ( फेड ) न करणें, अधिकार असतानांही अनाहिताग्नि राहणें ( अग्न्याधान न करणें ), लवणादि अपण्य ( अविक्रेय ) वस्तूचा विक्रय व परिवेदन ( म्हणजे सोदर ज्येष्ठ भ्राता अनग्नि व अविवाहित असतांना कनिष्ठानें अग्निपरिग्रह व स्त्रीपरिग्रह करणें ) हीं उपपातकें होत. पण येथें या अनाहिताग्नित्वाविषयीं अशी एक शंका येते कीं, मीमांसकांची-ज्योतिष्टोमादि श्रुति स्वांगभूत अग्निनिष्पत्त्यर्थ आधानाचा नियोग करतात-अशी प्रसिद्धि असल्यामुळें ज्याला अग्नीचें प्रयोजन असतें त्याची त्याच्या उपायभूत आधानांत आपोआप प्रवृत्ति होते. ज्याला

व्रीहि-यवादि धान्याची अपेक्षा असते त्याची धनाकडे जशी आपोआप प्रवृत्ति होते तसेंच हें जाणावें. अर्थात् ज्याला अग्नीचें कांहीं प्रयोजन नसतें त्याची त्याच्याकडे प्रवृत्तिही होत नाहीं. तेव्हां अनाहिताग्निता हा दोष कसा ?

या शंकेचें समाधान असें—याच आधानाच्या आवश्यकत्ववचनानें नित्यश्रुतीही अधिकाऱ्यालाच आधान करण्याविषयीं सांगत असतात, असें होतें. स्मृतिकारांचा अभिप्रायही असाच दिसतो. त्यामुळें अनाहिताग्निता हा दोष आहे, असें म्हणण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं २३४.

भृताद्ध्ययनादानं भृतकाध्यापनं तथा ॥
पारदार्यं पारिवित्त्यं वार्धुष्यं लवणक्रिया ॥ २३५ ॥

मूल्य देऊन अध्ययन घेणें, मूल्य ( वेतन ) घेऊन शिकविणें, गुरुभार्या व तत्तुल्य स्त्रिया यांस सोडून इतर परस्त्रीशीं गमन करणें, कनिष्ठ भ्रात्यानें विवाह केला असतां ज्येष्ठानें अविवाहित राहणें, निषिद्ध वृद्धीवर ( व्याजावर ) उपजीविका करणें, लवण उत्पन्न करणें, २३५.

स्त्रीशूद्रविट्क्षत्रवधो निन्दितार्थोपजीवनम् ।
नास्तिक्यं व्रतलोपश्च सुतानां चैव विक्रयः ॥ २३६ ॥

स्त्रीवध, शूद्रवध, अदीक्षित क्षत्रिय व वैश्य यांचा वध, निन्दित अर्थावर निर्वाह करणें, नास्तिक्य ( परलोकादि नाहींच. असा आग्रह धरणें ), ब्रह्मचर्यानें स्त्रीप्रसंग करणें व अपत्यांचा विक्रय २३६.

धान्यकुप्यपशुस्तेयमयाज्यानां च याजनम् ।
पितृमातृसुतत्यागस्तडागारामविक्रयः ॥ २३७ ॥

व्रीहिप्रभृति धान्य, जस्त, शिसें, इत्यादि असार द्रव्य व गाय--बैल इत्यादि पशु यांचा अपहार, जाति व कर्म या दोन्हींहीं दूषित असलेल्या शूद्रव्रात्यादि अयाज्यांकडून यजन करविणें, अपतित पिता-माता-पुत्र यांचा त्याग ( घरांतून बाहेर घालविणें ), तडाग, आराम, उपवन इत्यादिकांचा विक्रय, ( येथें २३४ व्या श्लोकांतील स्तेय पुनः घेतलें आहे. ) त्यावरून वरील स्तेय सामान्य असून येथील धान्य, असार द्रव्य व पशु यांचेंच विशेष स्तेय असं, त्यामुळें धान्यादिव्यतिरिक्त द्रव्याचें स्तेय केलें असतां अवश्य हेंच प्रायश्चित्त केलें पाहिजे; असें नाहीं. तर सामान्य स्तेयाचें प्रायश्चित्त याहून न्यूनही होऊं शकतें, असें ठरतें. बांधवाच्या त्यागाचें वर ग्रहण केलें असतांना पुनः पितामाता इत्यादिकांच्या त्यागाचें पुनः ग्रहण करून तेंच सुचविलें आहे २३७.

कन्यासंदूषणं चैव परिविन्दकयाजनम् ।
कन्याप्रदानं तस्यैव कौटिल्यं व्रतलोपनम् ॥ २३८ ॥

कन्यांच्या योनींत अंगुली इत्यादि घालून विदारण करणें, ( भोग घेणें नव्हे, कारण कन्याभोग गुरुतल्पसम आहे, असें वर सांगितलें आहे. )२३४ ब्या श्लोकांत सांगितलेलें परिवेदन करणाऱ्या कडून यजन करविणें,त्याला कन्या देणें, गुरुवाचून दुसऱ्याशीं कौटिल्य करणें, ( कारण गुरूशीं केलेलें कौटिल्य सुरापानासारखें आहे, हें वर सांगितलें आहे. ) व व्रतलोप करणें, ( याचें पुनः येथें जें ग्रहण केलें आहे तें शिष्टांनीं ज्याचा प्रतिषेध केलेला नाहीं अशा. मी श्रीहरीचें चरणकमल पाहिल्यावाचून ( त्यापूर्वीं ) तांबूलादिक खाणार नाहीं,-इत्यादि प्रकारच्या व्रतांचाही लोप करूं नये, असें सांगण्यासाठीं आहे. स्नातकव्रतास उद्देशून मनूनें अभोजन हें लघु प्रायश्चित्त सांगितलेलें असल्यामुळें तें येथें घेणें योग्य नव्हे ) २३८.

आत्मनोऽर्थे क्रियारम्भो मद्यपस्त्रीनिषेवणम् ।
स्वाध्यायाग्निसुतत्यागो बान्धवत्याग एव च ॥ २३९ ॥

आपल्या शरीरपोषणाकरितां पाक करणें ( स्वयंपाक करणें, पंचमहायज्ञांकरितां नव्हे, कारण मनूनें अ.३श्लो. ११८ यांत त्याचीच निंदा केली आहे.) मद्यपान केलेल्या स्वभार्येचेंही सेवन करणें ( उपभोग घेणें ), स्वाध्यायत्याग, श्रौतस्मार्त अग्नींचा त्याग, पुत्राचे संस्कारादिक न करणें, वैभव असतांनाही चुलता, मामा इत्यादि बांधवांचें रक्षण न करणें २३९.

इन्धनार्थं द्रुमच्छेदः स्त्रीहिंसौषधजीवनम् ।
हिंस्रयन्त्रविधानं च व्यसनान्यात्मविक्रयः ॥ २४० ॥
शूद्रप्रेष्यं हीनसख्यं हीनयोनिनिषेवणम् ।
तथैवानाश्रमे वासः परान्नपरिपुष्टता ॥ २४१ ॥
असच्छास्त्राधिगमनमाकरेष्वधिकारिता ।
भार्याया विक्रयश्चैषामेकैकमुपपातकम् ॥ २४२ ॥

पाकादि दृष्ट प्रयोजनाच्या सिद्ध्यर्थ ओल्या वृक्षाला तोडणें ( आहवनीयाग्नीच्या रक्षणाकरितांही नव्हे. ) स्त्री, हिंसा व औषध यांच्या योगानें निर्वाह करणें, ( त्यांतील स्त्रीजीवन म्हणजे स्त्रीला मजुरीला लावून तिच्या कष्टानें मिळालेल्या धनावर अथवा स्त्रीधनावर निर्वाह करणें, प्राण्यांना मारून आपलें जीवन मिळविणें, हें हिंसाजीवन व वशीकरण हेंच येथील औषधजीवन समजावें. ) तिळ, ऊंस इत्यादिकांस चिरडणाऱ्या घाण्यांना चालविणें, मृगयादि अठरा व्यसनें ( मनु. अ. ७ श्लो. ४७-५३ पहा. ) द्रव्य घेऊन दुसऱ्याचें दास्य करणें, शूद्राची सेवा करणें, हीनाशीं मैत्री करणें, अविवाहित सवर्णस्त्री, केवल हीनवर्णाची स्त्री व साधारण स्त्री यांचा संभोग, अधिकार असतानांही आश्रमाचा स्वीकार न करणें, परान्नरुचि,चार्वाकादिकांच्या ग्रंथांचें ज्ञान,सुवर्णादिकांच्या खाणींवर राजाज्ञेनें अधिकारिपणा संपादन करणें व भार्येचा विक्रय(आणि चशब्दानें मन्वादिकांनीं सांगितलेला-अभिचार, अबुद्धिपुरःसर लशुनादि भक्षण इत्यादिकांचें ग्रहण करावें).या(२३४व्या श्लोकांत सांगितलेल्या) गोवधापासून

पुढील प्रत्येक उपपातक आहे, असें जाणावें. मनूनें ( अ. ११ श्लोक ६७–७० ) दुसरींही जातिभ्रंशकर, संकरीकरण, अपात्रीकरण व मलिनीकरण या नांवाचीं निमित्तें सांगितलेलीं आहेत. बृहद्विष्णूनें तर समस्त उत्तरोत्तर लघुप्रायश्चित्तनिमित्तें पृथक् पृथक् नांवानीं सांगितलीं आहेत. जसें–ब्रह्महत्या, सुरापान, ब्राह्मणसुवर्ण हरण, गुरुस्त्रीगमन व त्यांच्याशीं संयोग. हीं महापातकें; मातृगमन, कन्यागमन व स्नुषागमन हीं अतिपातकें. यागांत स्थित असलेल्या क्षत्रियाचा व वैश्याचा वध करणें, रजस्वला, गर्भवती, अत्रिगोत्रोत्पन्न स्त्री, अज्ञात गर्भ व शरणागत यांचा घात करणें, हीं ब्रह्महत्येसारखीं; कूटसाक्ष देणें व सुहृद्वध करणें, हीं दोन सुरापानासारखीं कर्में आहेत. ब्राह्मणाच्या भूमीचा अपहार करणें सोन्याच्या चौर्यासारखें आहे. पितृव्य, मातामह, मातुल व राजा यांच्या पत्नींशीं गमन करणें गुरुस्त्रीगमनासारखें आहे. आते, मावशी आणि श्रोत्रिय, ऋत्विज, उपाध्याय व मित्र यांच्या भार्या, बहिणीची सखी, सगोत्रा, उत्तमवर्णाची स्त्री, रजस्वला, शरणागता, संन्याशीण, रक्षणाकरितां ठेवलेली परकीय स्त्री; यांच्याशीं गमन करणें हीं अनुपातकें आहेत. स्वतःच्या उत्कर्षाकरितां राजकुलांत खोटें भाषण करणें, पैशुन्य, गुरूंची निंदा, वेदनिंदा, अधीत वेदादिकांचें विस्मरण, अग्नि, पिता, माता, पुत्र व स्त्री यांचा निष्कारण त्याग, अभोज्यान्न भक्षण करणें, परद्रव्याचा अपहार करणें, परस्त्रीशीं गमन करणें, अयाज्ययाजन, व्रात्यता, वेतन घेऊन अध्यापन करणें, पैसे देऊन शिकणें, सर्व खाणीवर अधिकार चालविणें, घाणे चालविणें, वृक्ष, गुल्म, लता, औषधी यांच्या हिंसेनें जीवन, अभिचारकर्मांत प्रवृत्ति, आपल्या करितांच क्रियांचा आरंभ करणें, अनाहिताग्निता, देव, ऋषि व पितर यांच्या ऋणाची फेड न करणें, असच्छास्त्राभ्यास, नास्तिकता, कुशील व मद्यपान करणाऱ्या स्त्रीचा उपभोग हीं उपपातकें आहेत. ब्राह्मणाला पीडा करणें, अपेय मद्याचा वासही घेणें, कौटिल्य, पशु व पुरुष यांच्याशीं मैथुन करणें, हीं जातिभ्रंशकर पातकें आहेत. ग्राम्य व आरण्य पशूंची हिंसा हें संकरीकरण पाप आहे. निन्दितांपासून धन घेणें, वाणिज्य, व्याजावर जीवन, असत्य भाषण, व शूद्राची सेवा हीं अपात्रीकरण पापें आहेत. पक्षी, जलचर प्राणी व जलांत झालेले मत्स्यादि यांची हिंसा, कृमि व कीट यांचा घात, व मद्य ठेवलेल्या पात्रांतून जलादि प्राशन हीं मलिनीकरण पापें होत व जें येथें सांगितलें नाहीं तें प्रकीर्णक होय.

पण विष्णूनें ज्यांना येथें अनुपातक म्हणून नांव दिलें आहे त्या महापातकसम कर्मांसच कात्यायनानें पातक ही संज्ञा योजिली आहे. त्यानें महापाप, अतिपाप, पातक, प्रासंगिक व उपपातक असे पांचच प्रकार सांगितले आहेत. पण–उपपातकादिकांना पातकत्वच कोठचें ? कारण तीं कांहीं पतनास कारण होणारीं नाहींत व तींही पतननिमित्तें आहेत, असें–म्हटल्यास ‘ मातृ–पितृयोनिसंबंधाङ्ग० ’ इत्यादि परिगणना करणें व्यर्थ आहे. आतां–त्यांना महापातकें व तत्समपातकें यांच्याप्रमाणें सद्यःपातित्य हेतुत्व जरी नसलें तरी अभ्यासाच्या अपेक्षेनें पातित्य आहे–( म्हणजे त्यांचाच वारंवार अभ्यास घडल्यास पातित्य येतें ) म्हणून म्हणावें तर तेंही बरोबर नाहीं. कारण अभ्यासाच्या मर्यादेचें निरूपण केलेलें नाहीं. तेंच पाप दोनदां केल्यानें पतनार्ह होतें कीं, शंभरदां केल्यानें ? अभ्यासाच्या प्रमाणाची

कांहीं आवश्यकता नाहीं, म्हणून म्हणावें तर जो दिवसा दोन वेळ निजतो व जो शंभरवेळ गोवध करतो त्या दोघांनाही सारखेंच पातित्य प्राप्त होईल.-अशी कोणी शंका घेतल्यास तिचें समाधान असें—कोणत्याही निंद्य कर्माचा-तें महापातकाची बरोबरी करील इतका अभ्यास झाला म्हणजे तो पातित्यास कारण होतो. दिवसा निजणें इत्यादि कर्मेंच अशी आहेत कीं, तीं हजार वेळ जरी केलीं तरी महातकासारखीं कधीं होणार नाहींत. यास्तव त्यांना पातित्य प्राप्त होण्याचीही भीति नाहीं. तस्मात् उपपातकादिकांच्या अभ्यासाच्या अपेक्षेनें त्यांना पतनहेतुत्व आहे असें म्हणणें युक्तच होय २४०-२४२.

याप्रमाणें व्यवहाराकरितां संज्ञाभेदासह प्रायश्चित्ताच्या निमित्ताची परिगणना करून नैमित्तिकें दाखविण्याकरितां म्हणतात—

**शिरःकपाली ध्वजवान् भिक्षाशी कर्म वेदयन् ।**
**ब्रह्महा द्वादशाब्दानि मितभुक्शुद्धिमाप्नुयात् ॥ २४३ ॥**

मस्तकाचें कपाळ ज्याच्यापाशीं आहे तो शिरःकपाली. तसाच ध्वजवान्. ज्या ब्राह्मणाला मारलें असेल त्याच्या मस्तकाचें कपाल काठीच्या अग्रावर ठेवणें हा ध्वज होय. ब्रह्महत्या करणारानें असा ध्वज आपल्या हातांत घ्यावा. कारण ' ब्राह्मणानें ब्राह्मणास मारल्यास त्याचेंच शिरःकपाल घेऊन तीर्थाटन करावें, असें शातातपानें सांगितलें आहे. पण त्याच ब्राह्मणाचें कपाल न सांपडल्यास दुसऱ्या ब्राह्मणाचें कपाल घ्यावें. हें दोन्ही प्रकारचें (म्ह. मारलेल्या ब्राह्मणाचें अथवा दुसऱ्या ब्राह्मणाचें) कपाल हातांतच वागवावें. कारण गौतमानें ' खट्वांगकपालपाणिः ' असें म्हटलें आहे. या गौतमवचनांतील खट्वांगशब्दानें वरील दंडारोपित शिरःकपालरूप ध्वजच घ्यावा. हें कपालधारण चिन्हाकरितां म्हणून धारण करावयाचें असतें. भोजनाकरितां ( भिक्षेकरितां ) धारण करावयाचें नसतें. कारण ' मृन्मयकपालपाणिर्भिक्षार्थे ग्रामं प्रविशेत् ' म्हणजे ज्याच्या हातांत मातीचें खापर आहे अशा त्यानें भिक्षेकरितां गांवांत प्रवेश करावा, असें गौतमानें सांगितलें आहे. त्यानें वनवासी व्हावें किंवा ग्रामासमीप वास करावा (पहा मनु. अ. ११ श्लो. ७२ व ७८) संवर्ताच्या म्हणण्याप्रमाणें त्यानें वपन करावें किंवा जटा ठेवाव्या. भिक्षान्नच खावें. आपस्तंबानेंही भिक्षा मातीच्या फुटक्या खापरांत आणावयास सांगितलें आहे. या घरांत चांगलें मिष्टान्न मिळतें, येथें मिळत नाहीं, इत्यादि संकल्प न करितां वसिष्ठाच्या आज्ञेप्रमाणें ओळीनें सात घरीं भिक्षा मागावी. ती सायंकाळीं आणावी. कारण, वसिष्ठानेंच एक कालीं उपाहार करण्याविषयीं सांगितलें आहे. तें भैक्ष्य ब्राह्मणादि चार वर्णांच्या लोकांच्या येथेंच जाऊन मिळवावें. कारण, संवर्तानें तसें सांगितलें आहे. मी ब्रह्महत्या करणारा आहें. असें म्हणून आपलें कर्म सांगत दारांत उभें राहून भिक्षा मागावी. पण हा जो भिक्षाशननियम आहे तो वनांतील कंदमूळफळादिकांच्या योगानें उपजीविका करण्याचें सामर्थ्य नसल्यास जाणावा. त्याचप्रमाणें त्यानें ब्रह्मचर्यादिकांनीं युक्त होऊन रहावें. ब्रह्मचर्याबरोबर ब्रह्मचारिप्रकरणोक्त गंध-माल्य-दिवास्वाप इत्यादि वर्ज्य

करणें, या सर्व अविरुद्ध धर्मांचें अनुष्ठान करावें. त्रिकाळ स्नान करावें. अर्थात् स्नानांगभूत मंत्रादिकांचीही त्याला प्राप्ति होते. 'शुचिना कर्म कर्तव्यम्' या वचनाच्या अनुरोधानें शुचित्व हा धर्म सर्व कर्म साधारण असल्यामुळें व्रतचर्येच्या अंगभूत शौचाची प्राप्ति होण्यास्तव त्या ब्रह्मघातक्यानें स्नानाप्रमाणें संध्योपासनाही करावी. कारण, संध्योपासन शौच प्राप्त करून देऊन त्याच्या द्वारा सर्व कर्मांचें अंग(शेष)होत असतें. म्हणूनच दक्षानें 'संध्याहीनोऽशुचिर्नित्यमनर्हः सर्वकर्मसु। यत्किंचित्कुरुते कर्म न तस्य फलभाग्भवेत्' म्हणजे संध्याहीन असलेला पुरुष नित्य अशुचि व सर्व कर्मांविषयीं अयोग्य होतो. तो जें कांहीं कर्म करतो त्याच्या फलास योग्य होत नाहीं. पण द्विजकर्मांपासून भ्रष्ट होणें, हेंच पतितत्व ( पतन ) होय. असें वचन असल्यामुळें व संध्योपासना हें द्विजकर्म असल्यामुळें पतितांना त्याची प्राप्तिच नाहीं असें समजूं नये. कारण पतितालाच व्रत करण्याविषयीं सांगितलेलें असल्यामुळें त्या व्रताच्या अंगत्वानें संध्योपासनेची प्राप्ति होते. तस्मात् ब्राह्मणादि द्विजांना अध्ययन-इज्या-दान इत्यादि सामान्य कर्में सांगून केवल ब्राह्मणाला उद्देशून अध्यापन, याजन व प्रतिग्रह इत्यादि जीं अधिक कर्में सांगितलेलीं असतात तीं व्रतचर्येचीं अंगें नसल्यामुळें त्यांची हानि होते. सर्वच कर्मांची हानि होत नाहीं. कारण, तेवढ्या त्या अनंगभूत अधिक कर्मांच्या हानीनेंही वचन चरितार्थ होतें. मनु, याज्ञवल्क्य व गौतम यांनीं जिचें प्रतिपादन केलें आहे अशी ही द्वादशवर्षव्रतपरिचर्या एकच आहे. भिन्न भिन्न नव्हे. कारण, त्यांना परस्परांची अपेक्षा आहे व परस्पर विरोधही नाहीं. अपेक्षा कशी आहे ती पहा. येथें 'भिक्षाशी कर्म वेदयन्' असें म्हटलें आहे. पण तें ऐकून भिक्षेला पात्र कोणतें असावें, कोणाच्या व किती घरीं भिक्षा मागावी, अशी आकांक्षा उत्पन्न होते. पण 'लाल खापरानें,' या आपस्तंबाच्या व मन्वादिकांच्या वचनांनीं तिची निवृत्ति होते. येणेंप्रमाणें त्यांना परस्पर सापेक्षत्व असून शिवाय परस्पर विरोधही नाहीं. पण असें असतांनाही कोणी एका व्याख्यानकारानें—मनु-गौतमांनीं जिची इतिकर्तव्यता सांगितलेली आहे अशा या व्रतचर्येला परस्पर वचनांची सापेक्षता असली तरी त्यांचा विकल्प समजावा—असें जें म्हटलें आहे तें विचार न करितां म्हटलें आहे, असें जाणावें.

असो; याप्रमाणें बारा वर्षें व्रतचर्या केल्यानें ब्रह्मघातकी शुद्ध होतो. मनूनें ( अ. ११ श्लो. ८९ ) म्हटल्याप्रमाणें ही अकामकृत ( अबुद्धिपुरःसर ) ब्राह्मणवधाची शुद्धि सांगितली आहे. कारण, बुद्धिपुरःसर ब्राह्मणवध केल्यास त्याच्या निष्कृतीचें विधानच करितां येत नाहीं. आतां येथें असा एक प्रश्न उद्भवतो कीं, दोन-तीन ब्राह्मणांना मारल्यास प्रायश्चित्ताचें तन्त्र ( एकानुष्ठान ) करावें किंवा जितके वध तितक्या आवृत्ति कराव्या ? कोणी म्हणतात कीं, 'ब्रह्महा द्वादशाब्दानि०' या वचनांतील ब्रह्मशब्द एक, दोन किंवा बहु ब्राह्मणांना साधारण असल्यामुळें ( म्हणजे त्या शब्दावरून संख्येचा स्पष्ट बोध होत नसल्यामुळें ) एका ब्राह्मणाचा वध घडला असतां जें प्रायश्चित्त तेंच द्वितीय, तृतीय वधाचेंही प्रायश्चित्त होय. कारण, एक ब्राह्मणवधानिमित्त एक प्रायश्चित्त केलें असतां हें केलें व हें केलें नाहीं, असें म्हणतां येत नाहीं. प्रयोगकारणभूत देश-काल-कर्त्यांचा अभेद असल्यामुळें विशेषाचें ग्रहण

होत नाहीं. त्यामुळें नुसत्या प्रायश्चित्ताच्या अनुष्ठानानेंच पापक्षयरूप कार्यनिष्पत्ति होणें युक्त आहे. तन्त्रानुष्ठित प्रयाजादिकांच्या योगानें आग्नेयादिकांत तन्त्रानेंच अनेकोपकाररूप कार्यांची निष्पत्ति होते,

पण दोन-तीन ब्राह्मणांचा वध केला असतां पाप गुरु होतें व गौतमानें–गुरुपातकाचें गुरु व लघुपातकाचें लघु प्रायश्चित्त असतें, असें सांगितलें आहे. यास्तव, अशा प्रसंगीं द्वादशवर्ष व्रताची आवृत्ति करणेंच युक्त होय. कारण, विलक्षण कार्याची तन्त्रानें निष्पत्ति होणें योग्य नव्हे, असें कोणी म्हणेल तर तें बरोबर नव्हे. कारण, हें वचन आवृत्तीचें विधान करणारें नाहीं. तर सांगितलेल्या गुरु-लघुकल्पांची व्यवस्था सांगणारें आहे. दुसऱ्या ब्राह्मणाला मारलें असतां पाप गुरु होतें, याविषयीं कांहीं प्रमाण नाहीं. मनु व देवल यांनीं प्रथम दोषाहून दुसऱ्या दोषाचें प्रायश्चित्त द्विगुण, तिसऱ्याचें त्रिगुण व चवथ्यावेळीं केलेल्या दोषाची निष्कृतिच होत नाहीं, असें जरी सांगितलें आहे तरी तें प्रतिनिमित्ताबरोबर नैमित्तिकाची आवृत्ति होते, या न्यायानें दोन-तीन ब्राह्मणांचा वध करणें या निमित्तामुळें नैमित्तिकशास्त्रावृत्तीचा अनुवाद करून चतुर्थवधाला प्रायश्चित्तच नाहीं, असें सांगत आहे. दुसऱ्या ब्राह्मणाचा वध झाला असतां दुप्पट प्रायश्चित्त करावें, असें सांगत नाहीं. यास्तव, दोन-तीन ब्राह्मणांची हत्त्या घडली तरी एकदांच द्वादशवार्षिक व्रतानुष्ठान करावें. जसें–गृहदाहादि अनेक निमित्तें झालीं असलीं तरी क्षामवत्यादिकांचें एकदांच अनुष्ठान होतें.

आतां या विस्तृत प्रश्नाचें समाधान सांगतो. वचनांशीं विरोध आला असतां न्याय प्रवृत्त होत नाहीं. दोन–तीन ब्राह्मणांचा वध झाला असतां प्रायश्चित्ताच्या अनुष्ठानाची आवृत्ति करण्याविषयीं सांगणारें ' विधेः प्राथमिकात्० ' इत्यादि वचन आहे. यास्तव न्यायप्राप्त तन्त्रानुष्ठानाचा बाध होतो. शिवाय ' चतुर्थे नास्ति निष्कृतिः ' या वचनानेंही मारल्या जाणाऱ्या ब्राह्मणांच्या संख्येचें आधिक्य झालें असतां त्याबरोबर दोषही वाढतो. परस्पर विलक्षण असलेल्या गुरुलघुदोषांचा तन्त्रानुष्ठानानें क्षय होणें शक्य नाहीं. यास्तव, दोषगुरुत्वामुळें व कार्यवैलक्षण्य असल्याकारणानेंही प्रत्येक निमित्ताबरोबर नैमित्तिकाची आवृत्ति होणेंच योग्य आहे. क्षामवत्त्यादिकांत कार्याची विलक्षणता नसल्यामुळें तन्त्रानुष्ठान होतें तें युक्तच होय. असो; ' चतुर्थे नास्ति निष्कृतिः ' हें वचन महापातकाविषयीं आहे. तें पाप फारच गुरु झाल्यामुळें प्रायश्चित्ताचा अभाव प्रतिपादन करीत आहे. यास्तव शूद्रान्नसेवनादिकांचा पुष्कळ अभ्यास घडला तरी तदनुसार प्रायश्चित्ताची आवृत्ति करावी. प्रायश्चित्ताचा अभाव आहे, असें कधींही म्हणूं नये. एवढयासाठींच मनूनें ' गाडाभर अस्थिरहित प्राण्यांचा वध केल्यास शूद्रहत्येस सांगितलेलें व्रत करावें. ' असें म्हटलें आहे. हें द्वादशवार्षिक व्रत साक्षात् हनन करणारासच उक्त आहे. अनुग्राहक, प्रयोजक इत्यादिकांचा त्यांत जितका दोष असेल त्याच्या अनुसार प्रायश्चित्ताच्या न्यूनाधिकतेची कल्पना करावी. अनुग्राहकाला मुख्य अपराध करणाराहून चतुर्थांश न्यून व प्रयोजकाला अर्धन्यून प्रायश्चित्त उक्त असल्यामुळें ब्राह्मणहिंसकाला द्वादशवार्षिक, त्याच्या अनुग्राहकाला

नववार्षिक व प्रयोजकाला षड्वार्षिक व्रतचर्या हें प्रायश्चित्त सांगावें. अनुमोदन देणारानें साडेचार वर्षे व निमित्त होणारानें तीन वर्षे व्रताचरण करावें. सुमन्तूनें ' तिरस्कृतो यदा विप्रो० ' इत्यादि वचनांत जवळ जवळ असेंच सांगितलें आहे. पण एकाद्याच्या वधास निमित्त होणारा जर अत्यंत गुणवान् असून आत्मघात करणारा अत्यंत निर्गुण असेल तर त्या निमित्तानें एकवर्षच ब्रह्महत्याव्रत करावें. याच दिशेनें अनुग्राहक प्रयोजकादिकांच्या अनुग्राहकास व प्रयोजकास योग्य प्रायश्चित्त सांगावें. प्रायश्चित्ताच्या न्यूनाधिकतेची ही अशी कल्पना करण्यास आपस्तंबांचें ' प्रयोजितानुमन्ता० ' इत्यादिवचन मूल आहे. प्रोत्साहन देणारा इत्यादि दुसऱ्या पुरुषांनाही त्यांच्या अपराधानुसार दंड व प्रायश्चित्त यांची कल्पना करावी. कारण पैठीनसीनें—हन्ता, अनुमोदन देणारा, उपदेश करणारा, ज्याची हिंसा करावयाची त्याचें ज्ञान ( तो कोठें आहे वगैरे ) करून देणारा, प्रोत्साहन देणारा, साह्य करणारा, पत्ता न सांगणारा, आश्रय होणारा, शस्त्र देणारा, हिंसकाला भोजन देणारा, निवारण करण्याचें सामर्थ्य असून हिंसकाची उपेक्षा करणारा, व दोष सांगणारा या सर्वांना दोषानुसार प्रायश्चित्त सांगावें. ऐशीं वर्षांवरील वृद्ध व सोळावर्षांच्या आंतील बालक यांनीं तो वध साक्षात् पाहिला जरी असला तरी त्यांना त्या करितांही अर्धें प्रायश्चित्त करावयास लावावें. स्त्रिया व रोगीही अर्ध्या प्रायश्चित्तास योग्य आहेत. पांचव्या वर्षापासून बाराव्या वर्षापर्यंत मुलाला चतुर्थांश प्रायश्चित्त उक्त आहे. व तें त्याच्या माता, भ्राता, इत्यादि संबंधीं जनांतील कोणी तरी करावें. पांच वर्षांच्या आंतील बालकाला प्रायश्चित्त नाहीं, असें जें शंखानें म्हटलें आहे तेंही त्याला संपूर्ण प्रायश्चित्त नाहीं, एवढेंच सांगत आहे; मुळींच नाहीं, असें म्हणत नाहीं. ब्राह्मणाला मारूं नये. ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यांनीं सुरा पिऊं नये, इत्यादि विशेष आश्रमाची अपेक्षा न धरतां सांगितलेल्या विधि-निषेधांमध्यें विशेषवयाची आकांक्षा न करितांच सर्वांचा सामान्य अधिकार सांगितलेला असल्यामुळें पांच वर्षांच्या आंतील वयाच्या बालकाचें प्रायश्चित्त पिता, भ्राता इत्यादिकांनीं करावें. कारण, पुत्रास उत्पन्न करून, त्याचे संस्कार करून, विद्या शिकवून, त्याच्या वृत्तीची योजना करीपर्यंत सर्वथा पुत्रहित करण्याचा अधिकार पिता, माता इत्यादिकांसच असतो.

आतां समजा कीं, एका ब्रह्मवधामध्यें एकजण प्रयोजक झाला आहे व दुसरा एक ब्रह्मवध त्यानें आपल्या समक्ष होत असतांना पाहिला आहे, तर अशा प्रसंगीं गुरु-लघु पातकांचा संनिपात ( एकत्र प्राप्ति ) झाला असतां काय करावें ? या शंकेचें समाधान असें-गुरुप्रायश्चित्तांत अंतर्भूत होणाऱ्या लघुप्रायश्चित्ताची प्रसंगात्कार्यसिद्धि होते. ( म्हणजे गुरुप्रायश्चित्ताचें अनुष्ठान केल्यानें लघुप्रायश्चित्ताचाही त्यांत अंतर्भाव होतो, तें पृथक् करावें लागत नाहीं. ) पण याच न्यायानें लघुप्रायश्चित्ताच्या अनुष्ठानानें महाप्रायश्चित्ताची प्रसंगसिद्धि होत नाहीं. कारण, महाकल्प लघुकल्पान्तःपाती होत नाहीं. अर्थात् अंतःपाती अनुष्ठानाचीच गुरु-अनुष्ठानानें प्रसंगसिद्धि होते.

आतां ' यथाविधि सहस्र गायी सत्पात्रीं दान केल्यास ब्रह्महत्येचा व इतर पापांचा दोष निवृत्त होतो ' असें जें मध्यमांगिराचें वचन आहे तें सवनस्थ अति गुणवान् ब्राह्मणा-

विषयीं आहे. सारांश, अशा परस्पर विरुद्ध भासणाऱ्या स्मृतिवचनांची व्यवस्था लावावी. यावज्जीव व्रतचर्या करूनही उक्त प्रायश्चित्त संपत नसल्यास व जवळ पुष्कळ धन असल्यास दानही करावें. सामर्थ्य असल्यास तपही करावें. द्वादशवार्षिक व्रतावाचून बाकीच्या सुमंतु-पराशरादिकांनीं सांगितलेल्या प्रायश्चित्तांची व्यवस्था कशी लावावयाची तें आम्हीं पुढें सांगूं. गुरु व लघु प्रायश्चित्ताचा विकल्प होऊं शकत नाहीं. द्वादशवार्षिक व्रत व सेतुदर्शन हे विषम कल्प आहेत. यास्तव, त्यांचा विकल्प नाहीं. कारण, अशा विषमकल्पांचाही विकल्प ( म्हणजे त्यांतील वाटेल तें करावें असें ) मानल्यास सर्वच सोप्या अनुष्ठानाचा आश्रय करतील व त्यामुळें सर्वच गुरुकल्पांच्या अनुष्ठानाचा असंभव होऊन ते व्यर्थ होतील. यास्तव, प्रथम कोणताही गुरुकल्पच अनुष्ठेय आहे, असें जाणावें. पण त्याचा असंभवच झाल्यास दुसरा अनुकल्प किंवा लघुकल्प घ्यावा. श्रुति, लिंग, वाक्य इत्यादि मीमांसोक्त विनियोजकांचा अभाव असल्यामुळें त्या विषम विकल्पामध्यें एक अंग व दुसरा अंगी असा अंगांगिभावही येत नाहीं. यास्तव, त्यांनीं परस्परांचा नाश करूं नये म्हणून विषयव्यवस्था करावी. ती जाति, शक्ति, गुण, एकदां केलें आहे कीं वारंवार ? बुद्धिपूर्वक किंवा अबुद्धिपूर्वक, त्याचें कारण, इत्यादिकांचा विचार करून प्रायश्चित्ताची कल्पना करावी २४३.

आतां पूर्वोक्त ब्रह्महत्यादि प्रायश्चित्तांच्या नैमित्तिकसमाप्तीची अवधि सांगतात—

**ब्राह्मणस्य परित्राणाद्गवां द्वादशकस्य च ।**
**तथाश्वमेधावभृथस्नानाद्वा शुद्धिमाप्नुयात् ॥ २४४ ॥**

जो एकटा असतांनाही आपले प्राण संकटांत घालून चोर-व्याघ्र इत्यादिकांकडून मारल्या जाणाऱ्या ब्राह्मणाचें परिरक्षण करतो, अथवा बारा गायींचें रक्षण करतो, त्याचप्रमाणें दुसऱ्या कोणाच्या अश्वमेधाच्या शेवटीं होत असलेल्या अवभृत नांवाच्या कर्माच्या अंगभूत स्नानसमयीं स्नान करतो तोही द्वादशवार्षिक व्रत संपूर्ण झालेलें नसल्यासही ब्रह्महत्येपासून मुक्त होतो. ( शुद्ध होतो. ) ब्राह्मण-गाय इत्यादिकांचें प्राणरक्षण करण्यास तो नुस्ता प्रवृत्त जरी झालेला असला व तें न करितांच स्वतः मरण पावला तरी शुद्ध होतो, ( मनु. अ. ११ श्लो. ७९ पहा ). परकीयाच्या अवभृथकर्मांगभूत स्नानसमयीं आपलें पाप प्रकट करून स्नान करावें. कारण, मनूनें ( अ. ११ श्लो. ८२ ) ऋत्विज व राजे एकत्र जमलेले असतांना सर्वांसमक्ष आपलें कर्म ( पाप ) प्रकट करून त्यांच्याबरोबर अवभृथांत स्नान करावें. म्हणजे तो त्या अश्वमेधावभृथ स्नानानें मुक्त होतो. पण ऋत्विज व राजा यांनीं त्यास अनुज्ञा दिल्यासच त्यानें स्नान करावें, त्यावाचून करूं नये कारण, शंखानें तसें सांगितलें आहे. येथें अश्वमेधावभृथांत असें जरी म्हटलें तरी गौतमानें ‘ अश्वमेधावभृथे वान्ययज्ञेऽप्यग्निष्टुदन्तश्च० ’ असें सांगितलेलें असल्यामुळें अग्निष्टुतांतील त्याची समाप्ति करणाऱ्या पंचदशरात्रादि दुसऱ्या क्रतूंचेंही ग्रहण करावें. ज्यानें द्वादशवार्षिक व्रताला आरंभ केला आहे अशा महापातक्यानें ब्राह्मणप्राणरक्षणादि केल्यास त्याच्या व्रताची समाप्ति होते, अशी त्या व्रताच्या समाप्तीची अवधि सांगितली आहे.

ब्राह्मणरक्षणादि व द्वादशवार्षिक व्रत यांचें फल एकच आहे. यास्तव, तीं दोन्ही स्वतंत्र प्रायश्चित्तें मानली पाहिजेत. त्यांतील द्वादशवार्षिक व्रत अंगी व ब्राह्मणरक्षणादिक त्याचें अंग असें म्हणणें युक्त नव्हे. ब्राह्मणरक्षणादिक प्रधान जें द्वादशवार्षिक व्रत त्याच्याशीं विरोध करीत असल्यामुळेंही त्याचें अंग होऊं शकत नाहीं. कारण, अंग प्रधानावर अनुग्रह करणारेंच असावें लागतें. त्याची समाप्ति करणारें असणें युक्त नव्हे. ब्राह्मणरक्षणादि तर द्वादशवर्ष व्रताची समाप्ति करीत असतें, हें स्वातंत्र्य प्रकट करण्यासाठींच मनूनें ( अ. ११ श्लो. ७३ ) शस्त्रधारण करणारांच्या शस्त्राचें लक्ष्य व्हावें, अथवा आपल्या देहाचें अग्नीमध्यें समर्पण करावें, असें म्हणून प्रत्येक वाक्यावरोवर ' वा ' ( अथवा ) या पक्षान्तरबोधक अव्ययाचा उपयोग केला आहे. त्याचप्रमाणें प्रत्येक प्रायश्चित्ताच्या शेवटीं उपसंहारहि केला आहे. अ. ११ श्लोक ८६ यांत तर ' या पूर्वोक्त विधींतील कोणत्या तरी एका विधीचा आश्रय करून ब्राह्मण ब्रह्महत्येचें पाप नाहींसें करून सोडतो, ' असें म्हटलें आहे. यास्तव, अग्निप्रवेशादिकांस स्वातंत्र्य असणेंच युक्त आहे. त्याच न्यायानें येथील ब्राह्मणरक्षणादिकही स्वतंत्र प्रायश्चित्त आहे, द्वादशवर्षव्रताचें अंग नव्हे, असें कोणी म्हणेल तर त्याचें समाधान सांगतो— ' अन्तरा ब्राह्मणं मोचयित्वा० ' या शंखाच्या वचनानेंच याचा परिहार केला आहे. एखादें प्रायश्चित्तादि अनुष्ठान अंग असतांनाच प्रधानद्वारा त्याचा फलसंबंध असणें, यांत कांहीं फारसा विरोध नाहीं. कारण, ब्राह्मणत्राण हीच ज्याची अवधि आहे असें व्रतानुष्ठानच फलाचें साधन आहे, असें विधान केलें आहे. अर्थात् बारा वर्षें ही जशी एक अवधि तशीच ब्राह्मणरक्षण, गोरक्षण, अश्वमेधावभृथस्नान इत्यादिही त्या व्रताच्याच नैमित्तिक अवधि आहेत, असें जाणावें. म्हणजे वरील विरोधशंका रहात नाहीं २४४.

दीर्घतीव्रामयग्रस्तं ब्राह्मणं गामथापि वा ।
दृष्ट्वा पथि निरातङ्कं कृत्वा तु ब्रह्महा शुचिः ॥ २४५ ॥

दीर्घ ( बहुकालव्यापी ) व तीव्र (दुःसह) अशा कुष्ठादि व्याधीनें पीडलेल्या ब्राह्मणास किंवा गाईस मार्गांत पाहून जो ब्रह्महा त्यांना नीरोगी करतो तो स्वतः ब्रह्महत्येपासून मुक्त होतो. पण वरच्या श्लोकांत ब्राह्मणाचें रक्षण सांगितलेलें असतांना तेंच येथें पुनः सांगण्याचें कारण काय ? म्हणून कोणी विचारील तर त्याचें कारण असें—वरील श्लोकांत आपल्या प्राणांचा त्याग करून ब्राह्मणादिकांचें रक्षण करणें, हा उपाय सांगितला आहे व येथें औषधादि उपायानें ब्राह्मणरक्षण सांगितलें आहे २४५.

आनीय विप्रसर्वस्वं हृतं घातित एव वा ।
तन्निमित्तं क्षतः शस्त्रैर्जीवन्नपि विशुद्ध्यति ॥ २४६ ॥

चोरादिकांनीं सर्वस्व हरण केल्यामुळें अतिशय दुःखी झालेल्या ब्राह्मणाचें तें—भूमि, सोनें इत्यादि प्रकारचें सर्व धन जो परत आणून देतो व अशा रीतीनें त्या ब्राह्मणाचें रक्षण करतो तो शुद्ध होतो. तें आणण्यास प्रवृत्त झालेल्या त्या ( ब्रह्महा )ला चोरांनीं मारलें अथवा

त्याच्याशीं युद्ध करीत असतांना तो शस्त्रांच्या प्रहारांनीं क्षत ( जखमी ) झाला व मरता मरतां त्यांतून वांचला तरीही शुद्ध होतो. 'शस्त्रैः' या बहुवचनानें त्याच्या शरीरावर अनेक वार झालेले असावे, असें सुचविलें आहे. मनूनेंही ( अ. ११ श्लो. ८० ) 'चोरांना तीनदां प्रतिबंध करून ( सर्वस्व जरी न आणलें तरी ) अथवा सर्वस्व परत आणून ब्रह्महा शुद्ध होतो', असें म्हटलें आहे. तीनदां प्रतिबंध करूनही द्रव्य परत न मिळाल्यास त्याच्या अंगावर अनेक शस्त्राघात झालेले असणें, अगदीं साहजिक आहे. असो; या दोन श्लोकांत सांगितलेले पांची कल्प द्वादशवार्षिक व्रताचे अवधि असल्यामुळें स्वतंत्र नव्हेत २४६.

आणखी एक प्रायश्चित्त सांगतात—

**लोमभ्यः स्वाहेत्येवं हि लोमप्रभृति वै तनुम् ।**
**मज्जान्तां जुहुयाद्वापि मन्त्रैरेभिर्यथाक्रमम् ॥ २४७ ॥**

'लोमभ्यः स्वाहा०' इत्यादि मंत्राच्या योगानें क्रमानें लोमापासून मज्जेपर्यंत तनूचें हवन करावें. मूळ श्लोकांत इति व एवं अशीं जीं दोन अव्ययें आहेत त्यांवरून क्रमानें करणत्व व प्रकार सुचविला आहे. अर्थात् लोमादि होमद्रव्यांचा चतुर्थीनें निर्देश करून शेवटीं स्वाहाकार योजावा व त्या मंत्रांनीं होम करावा. होमद्रव्यें—लोम, त्वग्, रक्त, मांस, मेद, स्नायु, अस्थि (हाडें) व मज्जा अशीं आठ आहेत.त्यामुळें ते मंत्रही आठ होतात वसिष्ठानेंही 'ब्रह्महानें अग्नीचें उपसमाधान(आधान)करून लोमाचें हवन करावें' असें म्हटलें आहे.'मृत्योर्जुहोमि लोमभिर्मृत्युं वाशय' असें म्हणून पहिली, 'त्वचं मृत्योर्जुहोमि त्वचा मृत्युं वाशय' असें म्हणून दुसरी व अशाच पुढील सहा आहुति द्याव्या. लोमादिक होमाचीं द्रव्यें असल्यामुळें 'लोमभ्यः स्वाहा' असा चतुर्थीचा निर्देश केलेला असला तरी लोमादिकांस देवतात्व नाहीं. कारण, द्रव्याचें ज्ञान करून दिल्यानेंच मंत्र होमाचें साधन आहेत अशी उपपत्ति लागते. परंतु, वसिष्ठाच्या मंत्राचें पर्यालोचन केलें असता मृत्यूचाच हवीशीं संबंध असल्याचें व्यक्त होत असल्यामुळें मृत्यूच देवता आहे, असें अनुमान कारितां येतें. यास्तव, पूर्वोक्त मंत्रानें लोमादि कापून त्यांचा मृत्यूच्या उद्देशानें होम करावा व शेवटीं तनूचा प्रक्षेप करावा. आणि असा प्रकार असल्यामुळें कित्येकांनीं–द्रव्य सांगितलेलें नसल्यामुळें हे होम आज्यहविष्क आहेत ( म्ह. घृत हें त्याचें हविर्द्रव्य आहे ). असें जें म्हटलें आहे तें चांगलें निरूपण न करितांच म्हटलेलें असल्यामुळें उपेक्षणीय आहे. ब्रह्महानें हा होम लौकिकाग्नींत करावा. कारण 'जो आहिताग्नि विप्र महापातकी होऊन प्रायश्चित्तांनीं शुद्ध होत नाहीं त्याच्या अग्नीची काय गति ?' असा प्रश्न करून उशनानें–वैतानाग्नीस जलांत फेंकावें व शालाग्नीस विझवून टाकावें असें सांगितलें आहे. कात्यायनानेंही जवळ जवळ असेंच म्हटलें आहे.

असो; अग्नींत प्रक्षेप करण्याविषयीं सांगितलें आहे. यास्तव, तो तीन वेळ 'पुनः पुनः उठून व मस्तक खालीं करून चांगल्या पेटलेल्या अग्नींत शरीरत्याग करावा' या मनूच्या ( अ. ११ श्लो. ७३ ) वचनाप्रमाणें करावा. गौतमानें 'उपोषणानें शरीर अतिशय क्षीण करून घेऊन अग्नींत प्रवेश करावा' असा विशेष सांगितला आहे. 'अनशनेन कर्शितोऽग्निमा-

रोहेत्' अशीं काठकश्रुतिही आहे. पण हें मरणान्तिक प्रायश्चित्त बुद्धिपुरःसर हत्या केलेली असल्यास जाणावें. व तें स्वतंत्र आहे. ब्राह्मणरक्षणादिकाप्रमाणें द्वादशवर्षव्रतामध्यें अंतर्भूत होणारें नव्हे २४७.

संग्रामे वा हतो लक्ष्यभूतः शुद्धिमवाप्नुयात् ।
मृतकल्पः प्रहारार्तो जीवन्नपि विशुद्धयति ॥ २४८ ॥

संग्रामांत ( जेथें युद्ध चाललें असेल त्या भूमींत ) दोन्हीं सैन्यांतील धनुर्धरांनीं फेंकलेले बाण जेथें येऊन पडत असतील तेथें उभा राहून त्या बाणांचें लक्ष्य झालेला व त्यामुळेंच मेलेला ब्रह्महा मुक्त होतो. मर्मस्थानीं गाढ प्रहार झाल्यामुळेंच तीव्र वेदनेनें मूर्च्छित होऊन पडलेला तो मागून सावध होऊन जिवंत जरी राहिला तरी शुद्ध होतो. पण हें लक्ष्य होणें हा लक्ष्यभाव 'मी महापातकी असून मरणान्त प्रायश्चित्तास योग्य आहें,' असें सांगून धनुर्विद्यावेत्यांच्या संग्रामांत स्वेच्छेनें करावा. राजानें कोणा महापाप्याकडून तो इच्छेविरुद्ध ( बलात्कारानें ) करवूं नये. हें प्रायश्चित्त मरणान्तिक असल्यामुळें, साक्षात् कर्त्या क्षत्रियानें बुद्धिपुरःसर हत्या केलेली असल्यास जाणावें. मनूच्या वचनाप्रमाणें (अ. ११ श्लो. ७४) अश्वमेघ, स्वर्जित, गोसव, अभिजित्, विश्वजित् किंवा त्रिवृत आग्निष्टुत करावा, असें स्पष्ट होत असल्यामुळें अश्वमेधादि दुसऱ्या प्रायश्चित्तांचाही येथें संग्रह करावा. त्यांतील अश्वमेधाचें अनुष्ठान पराशराच्या वचनाप्रमाणें सार्वभौम क्षत्रियालाच उक्त आहे. त्यानें स्वेच्छेनें एकादें मरणान्त प्रायश्चित्तास उचित असलेलें पाप केल्यास त्या प्रसंगी हें अश्वमेधानुष्ठान करावें. यमानें 'महापातककर्तारश्चत्वारो०' इत्यादि वचनांत महाक्रतु अश्वमेधाचा मरणकालाग्नि प्रवेशाच्या तुल्यत्वानें निर्देश केला आहे. ज्यानें प्रथम यज्ञ केला आहे, अशा आहिताग्नि त्रैवर्णिकाला स्वर्जितादि दुसऱ्या सर्वांचें द्वादशवार्षिक व्रतासह विकल्पानें अनुष्ठान करावयास सांगितलें आहे. पण ज्यानें पूर्वीं यज्ञ केलेला नाहीं व त्यामुळें जो आहिताग्नि नव्हता त्यानें महापातकानंतर स्वर्जितादि करण्याकरितां आधान किंवा यज्ञानुष्ठान करूं नये. कारण, महापातकानें पतित झाल्यानंतर त्याचा द्विजातिकर्मांमध्यें अधिकारच नसतो. आतां संध्योपासनेप्रमाणें त्याचाही विरोध नाहीं म्हणून म्हणावें तर तें बरोबर नाहीं. कारण आधानादि पुढील यज्ञांचें अंग होऊं शकत नाहीं. असो; त्या क्रतूंचा दक्षिणेच्या न्यूनाधिक्यानें द्वादशवार्षिक, षड्वार्षिक इत्यादि व्रतांस योग्य असलेल्या –साक्षात् मारणाऱ्या, त्याला साह्य करणाऱ्या, उपदेश देणाऱ्या–इत्यादिकांचे ठायीं यथासंभव योजना करावी २४८.

अरण्ये नियतो जप्त्वा त्रिर्वै वेदस्य संहिताम् ।
शुद्धयेत वा मिताशीत्वा प्रतिस्रोतः सरस्वतीम् ॥ २४९ ॥

ब्रह्महा निर्जनप्रदेशांत नियताहार राहून ( मनु. अ. ११ श्लो. ७७ ) व तीन वेळां मंत्रब्राह्मणात्मक वेदाचा जप करून शुद्ध होतो. मूळ श्लोकांत 'संहितां' असें जरी म्हटलेलें

असलें तरी त्यावरून वेदाचा नुस्ता संहिताभागच घेऊं नये. कारण, हा संहिताशब्द पद-क्रम इत्यादि दुसऱ्या विकृतींचा निरास करण्यासाठीं येथें योजिलेला आहे. किंवा मितभोजन करून प्लाक्षप्रस्रवणापासून आरंभ करून ( म्हणजे पश्चिम सागरापासून ) सरस्वतीनदीच्या मूळ प्रवाहाकडे (प्रत्येक प्रवाहाच्या उलट दिशेस) गमन केल्यानें ब्रह्महा शुद्ध होतो. मनूच्या सांगण्याप्रमाणें ( अ. ११ श्लो. ७७ ) हें ( सरस्वतीप्रतिस्रोतोगमन ) करीत असतांना हविष्यान्नानें ( अवश्य तितकेंच ) भोजन करावें. येथें सांगितलेला वेदजप ब्रह्महा अत्यंत निर्धन पण विद्वान् व अतिशय गुणवान् असून ज्याला मारलें तो निर्गुण असला आणि त्याचा वधही प्रमादानें घडलेला असला तर त्याच्याकरितां आहे, असें समजावें. सरस्वतीगमन तशाच अवस्थेंतील विद्याहीनाकरितां सांगितलेलें आहे. मनूनें ( अ. ११ श्लो. ७५ ) कोणत्या तरी एका वेदाचा जप करून शंभर योजनें जावें, असें जें सांगितलें आहे तें 'अरण्ये नियतो जप्त्वा' या प्रायश्चित्ताचें अनुष्ठान करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाकरितां आहे, असें समजावें २४९.

**पात्रे धनं वा पर्याप्तं दत्वा शुद्धिमवाप्नुयात् ।**
**आदातुश्च विशुद्ध्यर्थमिष्टिर्वैश्वानरी तथा ॥ २५० ॥**

या ग्रंथाच्या पहिल्या आचाराध्यायाच्या २०० व्या श्लोकांत जें पात्राचें लक्षण सांगितलें आहे त्यानें युक्त असलेल्या सत्पात्राचें ठायीं गाय, भूमि, सुवर्ण इत्यादि उपजीविकेस पुरेल इतकें धन देऊन ब्रह्महा शुद्ध होतो. पण त्या पाप्याचें धन जो घेतो त्यानें 'स्वतः आहिताग्नि असल्यास, आपल्या शुद्धीकरितां वैश्वानर दैवत्येष्टि करावी. पण तो अनाहिताग्नि असल्यास त्यानें वैश्वानरदैवत्य चरु करावा. कारण 'य एव आहिताग्नेधर्मः स एव औपासनिकस्य ' असें गृह्यकाराचें वचन आहे. येथील 'वा' या शब्दानें मनूनें सांगितलेल्या ( अ. ११ श्लो. ७६ ) सर्वस्वाचा व उपकरणयुक्त गृहाचा स्वीकार करावा. पण पात्रीं धन देणें हें हनन करणारा धनवान् व निर्गुण असून ज्याला मारलें तोही निर्गुणच असल्यास त्याविषयीं जाणावें. आणि अशाच हननकर्त्यानें निर्गुण ब्राह्मणाचा वध केल्यास व त्याच्या ( हन्त्याच्या ) वंशांत कोणी ( पुत्रादि ) नसल्यास त्याच्याकरितां सर्वस्वदान आणि वंशांत कोणी असल्यास त्यानें सोपस्कर गृहदान द्यावें, अशी व्यवस्था करावी.

पराशरानें—चार विद्यांनीं युक्त असलेल्या पुरुषाच्या हातून ब्रह्मघात झाल्यास यथाविधि समुद्रसेतूस गमन करणें, हें प्रायश्चित्त सांगावें. सेतुबंधाकडे जात असतांना त्यानें मार्गांत चारी वर्णांच्या निषिद्ध कर्म न करणाऱ्या लोकांच्या घरून भिक्षा आणावी. उष्णाच्या निवारणार्थ छत्री व पायांत जोडा घालूं नये. मी दुष्कृत करणारा महापातकी आहें. मी भिक्षेकरितां घराच्या दारांत उभा आहें, असें म्हणत ब्रह्मघातक्यानें गोकुल, गोष्ठ, गांव, नगरें, तपोवनें, तीर्थें, नदीप्रस्रवण इत्यादि स्थानीं आपलें पाप स्वमुखानें सांगावें. नंतर त्यानें पुण्य सागराच्या तीरीं जाऊन महोदधींत स्नान करावें. म्हणजे त्याचें सर्व पाप नष्ट होऊन तो शुद्ध होतो. त्यानंतर पवित्र झालेल्या त्यानें स्वगृहीं परत यावें. ब्राह्मणभोजन घालावें. वस्त्रें द्यावीं. व गृहांत प्रवेश करावा. अथवा चारी विद्यांत निष्णात असलेल्या ब्राह्म-

णाला दक्षिणा द्यावी. त्या चातुर्विद्यावानानें अनुमोदन दिलें असतां तो शुद्ध होतो.-असें जें सांगितलें आहे त्याचा व या श्लोकांतील 'पात्रे धनं वा पर्याप्तं' याचा विषय एकच आहे.

**सुमन्तूनें**—ब्रह्महानें एक वर्षभर कृच्छ्र करावें, भूमीवर शयन करावें. प्रत्यहीं तीन वेळां स्नान करावें. आपलें दुष्कर्म सर्वांना सांगत भिक्षा मागावी. दिव्य नद्यांचीं तीरें, संगम, आश्रम, गोष्ठ, पर्वतावरून वाहणारे जलप्रवाह, व तपोवनें यांतून पर्यटन करीत वसतिस्थानीं वीरासन घालून बसावें आणि अशारीतीनें अनुष्ठान करीत असतांना एक वर्ष पूर्ण झालें म्हणजे त्यानें ब्राह्मणांना सोनें,रत्नें, गायी, धान्य, तिळ, भूमि व घृत द्यावें. असें केल्यानें पातकी पवित्र होतो-असें जें म्हटलें आहे तें-हनन करणारा धनवान् पण मूर्ख असून त्यानें नुस्त्या जातीनें ( विद्येनें किंवा गुणांनीं नव्हे ) ब्राह्मण असलेल्या एकाद्याला मारल्यास-त्याच्याकरितां आहे, असें समजावें.

**वसिष्ठानें**—बारा दिवस जलभक्षण व बारा अहोरात्र उपवास केल्यानें महापातकी शुद्ध होतो—असें जें म्हटलें आहे तें-ज्यानें एकाद्या ब्राह्मणाच्या हिंसेचा मानसिक निश्चय केलेला असून पुढें त्यानें स्वतःच विचारानें ती मारण्याची इच्छा सोडल्यास-त्याविषयीं आहे, असें समजावें.

आतां 'षंढ ब्राह्मणास मारल्यास शूद्राच्या हत्येचें व्रत करावें, अथवा चांद्रायण किंवा दोन पराकें करावीं, ' असें जें षट्त्रिंशन्मतांत वचन आहे तें ज्याचें पुरुषत्व पुनः प्राप्त करून देतां येण्यासारखें नसून ज्याचा बुद्धिपुरःसर वध केला असेल त्याच्याविषयीं आहे. पण त्याचाच अबुद्धिपुरःसर वध घडल्यास बृहस्पतीनें ' अरुणा व सरस्वती यांच्या संगमावर त्रिरात्र उपोषित राहून त्रिकाल स्नान केल्यानें शुद्धि होते, ' असें म्हटलें आहे. अशाच प्रकारचीं दुसरींही विषम स्मृतिवचनें हुडकून काढून त्यांची याच दिशेनें व्यवस्था लावावी. पण जीं वचनें सम असतील त्यांचा विकल्प समजावा. द्वादशवार्षिक व्रतापासून धनदानापर्यंत हीं जीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत तीं ब्राह्मणाकरितांच आहेत. क्षत्रियादिकांना हींच द्विगुण, त्रिगुण कल्पावीं. जशा प्रकारच्या ब्राह्मणाचा वध केला असतां जशा प्रकारच्या ब्राह्मणास जे प्रायश्चित्त प्राप्त होतें तशाच प्रकारच्या ब्राह्मणाचा तशाच प्रकारच्या क्षत्रियानें वध केल्यास प्रायश्चित्त दुप्पट सांगावें. वैश्यास तिप्पट सांगावें. शूद्रास चौपट सांगावें. याच दिशेनें क्षत्रिय-वैश्यादिकांतील हीनानें उत्तमास मारल्यास दोषगौरवानुसार प्रायश्चित्ताचेंही प्रमाण द्विगुण—त्रिगुण इत्यादि कल्पावें. दंडाच्या गौरवावरून दोषाच्या गौरवाचें ज्ञान होतें. चतुर्विंशतिमतामध्यें ' महर्षींनीं ब्राह्मणाला जें प्रायश्चित्त सांगितलें आहे त्याच्या पाऊणपट प्रायश्चित्त क्षत्रियाला, अर्धे वैश्याला व चतुर्थांश शूद्राला सांगावें. ' असें जें म्हटलें आहे तें प्रतिलोम उत्पन्न झालेल्या लोकांनीं केलेल्या चार प्रकारच्या साहसांस सोडून बाकीच्या सर्व पातकांविषयीं आहे, असें समजावें. त्याचप्रमाणें मूर्धावसिक्तादि अनुलोम उत्पन्न झालेल्यांनांही दंडाप्रमाणें न्यून किंवा अधिक प्रायश्चित्त सांगावें. दंडाचें न्यूनाधिक्य कसें करावें, तें व्यवहाराध्यायाच्या २०६ व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत सांगितलें आहे. त्यास अनुसरून

मूर्द्धावसिक्तानें ब्राह्मणाचा वध केल्यास त्याला ब्राह्मणाहून अधिक व क्षत्रियाहून न्यून म्हणजे दीडपट द्वादशवार्षिक व्रत सांगावें. याच दिशेनें प्रतिलोमजांच्या प्रायश्चित्ताचीही कल्पना करावी.

अंगिरसानें आश्रम्यांविषयीं असा विशेष सांगितला आहे–गृहस्थास सांगितलेलीं पापें जर इतर आश्रमवानांनीं केलीं तर त्यांच्या प्रायश्चित्ताचें प्रमाण शौचाप्रमाणें जाणावें. शौच गृहस्थांच्या दुप्पट ब्रह्मचाऱ्यांस, तिप्पट वानप्रस्थांस व चौपट यतीस सांगितलें आहे. यास्तव, प्रायश्चित्तही तसेंच वाढवावें. पण ब्रह्मचारी सोळा वर्षांच्या आंतील वयाचा असल्यास त्याला अर्धे म्हणजे गृहस्थाच्या इतकेंच प्रायश्चित्त उक्त होय. यतींना प्राप्त होणारें चौपट द्वादशवार्षिक व्रतही त्यांनीं करण्यास आरंभावें. मध्येंच मरण आल्यास कसें होईल ? अशी शंका घेऊन प्रायश्चित्ताच्या आरंभास विलंब लावूं नये. कारण, अठ्ठेचाळीस वर्षें व्रताचरण न होतां त्याला मध्येंच जरी देह सोडावा लागला तरी त्याच्या पापाचा क्षय होतोच. कारण, हारीत व व्यास यांनीं तसें सांगितलें आहे २५०.

आतां दुसऱ्या निमित्तांमध्यें ब्रह्महत्येच्या प्रायश्चित्ताचा अतिदेश करितात—

**यागस्थक्षत्रविड्घाती चरेद्ब्रह्महणि व्रतम् ।**
**गर्भहा च यथावर्ण तथात्रेयीनिषूदकः ॥ २५१ ॥**

दीक्षिणीयापासून उदवसानीयापर्यंत सोमयागप्रयोगांत असणारे क्षत्रिय व वैश्य यांस जो मारतो त्यानें ब्रह्महा पुरुषाला जें व्रत सांगितलें आहे तें करावें. मूळांतील सामान्य यागशब्दही सोमयागाचाच निर्देश करीत आहे, असें जाणावें. कारण, वसिष्ठानें ' सवनगतौ राजन्यवैश्यौ ' असें म्हणून सवनत्रयसंपाद्य सोमयागाचाच उल्लेख केला आहे. येथेंही द्वादशवार्षिकादि गुरु-लघु व्रतांची व्यवस्था पूर्वप्रमाणेंच जाति-शक्ति–गुण इत्यादिकांच्या अपेक्षेनें करावी. त्याचप्रमाणें गर्भाचा घात करणारा व आत्रेयी ( विटाळसी किंवा अत्रिगोत्रोत्पन्न ) स्त्रीचा वध करणारा यांनाही वर्णानुसार व्रत सांगावें. पण या श्लोकांत ' चरेत् व्रतम् ' असें म्हटलेलें असल्यामुळें मरणान्तिक प्रायश्चित्ताचा अतिदेश होत नाहीं.यास्तव, कामतः ( बुद्धिपुरःसर ) यागस्थ क्षत्रियादिकांचा वध केल्यास व्रतच दुप्पट करावें. हें व्रत संपूर्णच केलें पाहिजे. विवाहित स्त्रीच्या ठिकाणीं झालेल्या गर्भाला मारल्यास तो गर्भ ज्या वर्णाचा असेल त्या वर्णाच्या पुरुषाच्या वधाला जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तेंच करावें. हें विधान ज्या गर्भाचें ठायीं अद्यापि स्त्री-पुरुषादि व्यंजक चिन्हें उत्पन्न झालेलीं नाहींत त्या गर्भाच्या वधाविषयीं आहे. ब्राह्मगर्भालाही ब्राह्मणत्व असतेंच, त्यामुळें त्या गर्भाला मारल्यास ब्राह्मणवधाचेंच प्रायश्चित्त प्राप्त होईल; हें जरी खरें आहे तरी एकादे वेळीं तो गर्भ स्त्री असण्याचाही संभव आहे. व स्त्रीचा वध हें महापातक नसून उपपातक आहे. यास्तव, गर्भनाश केल्यास तो मुलगा आहे कीं मुलगी याचा निर्णय न झाल्यासही ब्रह्महत्याव्रत करावें आणि असें सांगत असल्यामुळें हें अतिदेशवचन अर्थवान् आहे; निरर्थक नव्हे. पण गर्भ स्त्री आहे कीं

पुरुष याचें विशेष ज्ञान झाल्यास स्त्रीवधाचें उपपातकप्रयुक्त प्रायश्चित्त व पुरुषवधाचें द्वादश-वार्षिक व्रत हें प्रायश्चित्त करावें.

जो आत्रेयीला मारणारा त्यानें तिच्या वर्णानुसार व्रत करावें. आत्रेयी म्हणजे ऋतुमती स्त्री किंवा आत्रिगोत्रजा. या दोन्ही वाक्यांचा भावार्थ असा—ब्राह्मणगर्भाचा किंवा ब्राह्मणी रजस्वलेचा वध केला असतां ब्रह्महत्याव्रत करावें. क्षत्रियगर्भाचा व क्षत्रिय आत्रेयीचा वध केला असतां क्षत्रियवधास सांगितलेलें व्रत करावें. वैश्यादिकांविषयींही असेंच समजावें. श्लोकांत ' गर्भहा च ' येथें ' च ' असें जें अव्यय आहे त्यावरून मनुस्मृतींत ( अ. ११ श्लो. ८८ ) सांगितलेलें अनृतवचनादि घ्यावें. ज्या व्यवहारांत असत्य भाषण केल्यानें प्राण्यांच्या वधाची प्राप्ति होते त्याविषयीं हें अतिगुरु प्रायश्चित्त सांगितलें आहे. त्याचप्रमाणें वधास निमित्त होणारा क्रोधावेश, ब्राह्मणाची ठेव, अग्निहोत्र्याची पतिव्रता भार्या व यज्ञस्थ स्त्री यांचा घात केल्यास ब्रह्महत्याव्रत करावें. अर्थात् वर सांगितलेल्या स्त्रियांवाचून इतर स्त्रियांचा वध घडल्यास तें उपपातक होय. महापातक नव्हे. ' ब्राह्मणो न हन्तव्यः ' असें निषेधवचन आहे. पण त्यावरून लिंगवचनाचा बोध होत नसून ब्राह्मणस्त्री व पुरुष यांना एकसारखेंच प्रायश्चित्त प्राप्त होतें. मग असें असतांना ' आत्रेयीनिषूदकः ' असें अतिदेशवचन हवें कशाला ? असें कोणी विचारील तर सांगतों—ब्राह्मणीला ब्राह्मणत्व जरी असलें तरी आत्रेयी नसलेल्या तिच्या वधाला नुस्ता महापातकप्रायश्चित्ताचाच अतिदेश आहे. पातित्याचा नाहीं. यास्तव, त्याचें पतितत्यागादि कार्य होत नाहीं २५१.

**चरेद्व्रतमहत्त्वापि घातार्थं चेत्समागतः ।**
**द्विगुणं सवनस्थे तु ब्राह्मणे व्रतमादिशेत् ॥ २५२ ॥**

शिवाय एकानें ब्राह्मणादिकांच्या वधाविषयीं निश्चय केला व त्याची हिंसा करण्यासाठीं चांगल्या रीतीनें त्याच्यापाशीं जाऊन शस्त्रादिकांचा प्रहारही केला; पण कांहीं प्रतिबंधामुळें तो ( ब्राह्मणादि ) मेला नाहीं. तरी ( अशा प्रसंगींही ) शस्त्रप्रहार करणारानें ब्रह्महत्येचें प्राय-श्चित्त करावें. पण जीव घेणें व तो न जाणें, या दोन्ही प्रसंगीं एकसारखेंच प्रायश्चित्त सांगणें योग्य नव्हे, असें कोणी म्हणेल तर तें खरें आहे. औपदेशिकांपेक्षां आतिदेशिक पापांचीं द्वादशवार्षिकादि ब्रह्महत्याव्रतें एकपादन्यून म्हणजे पाऊणपट करावीं. याविषयींचा विस्तार पूर्वीं केला आहे. पण सवनसंपाद्य सोमयागाचें अनुष्ठान जो ब्राह्मण करीत असेल त्याला मारणाराला द्वादशवार्षिकादिव्रत दुप्पट सांगावें. त्या गुरुलघुभूत व्रतांना जाति-शक्ति-गुणादि यांच्या अपेक्षेनें सवनस्थत्वाचें साम्य असलें तरी पूर्वींप्रमाणेंच त्यांची व्यवस्था जाणावी. आतां गुरूंचा अधिक्षेप इत्यादि ब्रह्महत्येसारखीं जीं पापें आहेत तीं येथें अतिदेश वाक्यानें सांगित-लेल्या पापाहून न्यून आहेत. यास्तव, त्यांचें प्रायश्चित्त अर्धोन द्वादशवार्षिकव्रतादि सांगितलें आहे. ( अर्धोन म्हणजे अर्धें न्यून अर्थात् षड्वार्षिक व्रत. ) २५२.

इति ब्रह्महत्याप्रायश्चित्तप्रकरणम् १.

आतां क्रमप्राप्त सुरापान प्रायश्चित्तास आरंभ करितात—

**सुराम्बुघृतगोमूत्रपयसामग्निसंनिभम् ।**
**सुरापोऽन्यतमं पीत्वा मरणाच्छुद्धिमृच्छति ॥ २५३ ॥**

सुरा, जल, गायीचें तूप, गोमूत्र व गायीचें दूध, यांतील एकादें स्पर्श करितांच अग्नीच्या स्पर्शाप्रमाणें अंग भाजेल इतकें तापवून ( म्हणजे आधण आणून ) त्यांचें प्राशन केल्यानें मद्यपान करणारा मरण पावतो व त्यानेंच तो शुद्ध होतो. पण हें प्रायश्चित्त ओल्या वस्त्रानें करावें, असें पैठीनसीनें म्हटलें आहे. त्याचप्रमाणें ती लोखंडाच्या किंवा तांब्याच्या पात्रानें प्यावी. पण हें प्रायश्चित्तही बुद्धिपुरःसर एकवारच सुरापान केल्यास सांगितलें आहे. सुरेवाचून इतर मद्याचें प्राशन वारंवार केल्यासही वसिष्ठानें अग्नीसारखी तापविलेली सुरा प्यावी, असें सांगितलें आहे. आतां मनूनें ( अ. ११ श्लो. ९० ) ' सुरां पीत्वा द्विजो मोहादग्निवर्णां सुरां पिबेत् ' असें म्हणून मोहाचें जें ग्रहण केलें आहे तें ' शास्त्रार्थाचें परिज्ञान नसणें ' या अर्थी घेतलें आहे. अर्थात् मोहात् म्हणजे शास्त्रार्थाचें परिज्ञान नसल्यामुळें.

आतां येथें सुराशब्दानें कोणतेंही मद्य घ्यावयाचें कीं गुळापासून, मोहापासून व पिठापासून झालेली तिन्ही प्रकारची दारू घ्यावयाची कीं, नुस्ती पैष्टी ( पिठाची ) घ्यावयाची ? असा प्रश्न येतो. कोणी म्हणतात कीं, सुराशब्द कोणत्याही मद्यामध्यें रूढ आहे. वसिष्ठांनीं ' अभ्यासे तु सुरायाः ' या वचनांत सुरा शब्द पैष्टयादि तीन सुरांस सोडून बाकीचें कोणतेंही सामान्य मद्य याविषयीं योजला आहे. मदोत्पादक शक्ति असणें, या उपाधीमुळें तो शब्द सर्वत्र मुख्य वृत्तीनेंच प्रवृत्त होत असल्यामुळें त्याला गौण म्हणतांही येत नाहीं. पण हें म्हणणें अयुक्त आहे. कारण, ' पानस, द्राक्ष, माधूक ( मोहापासून झालेलें ), खार्जूर, ताल ( ताडी ) ऐक्षव ( उंसाच्या रसापासून होणारें ), मधूत्थ, सैर, आरिष्ट, मैरय व नारिकेल ( माडी ), हीं अकरा मद्यें एकाच जातीचीं आहेत. सुरा हें बारावें मद्य असून तें सर्वांहून अधम मानलेलें आहे ' असें पुलस्त्याचें वचन आहे व त्यांत मद्याचा एक प्रकार, अशा दृष्टीनें सुरेचा निर्देश केला आहे. यास्तव, कोणत्याही मद्याला सुरा म्हणणें हा गौण प्रयोग आहे.

दुसरे कित्येक पैष्ट्यादि त्रिविध मद्यामध्येंच सुराशब्द रूढ आहे, असें म्हणतात व त्याचें उपपादन असें करितात—सुरा हा शब्द जरी अनेक वस्तूचे ठिकाणीं प्रवृत्त होत असला तरी त्याचें अनादित्व कोठें आहे ? असा संदेह आला असतां मनूनें ( अ. ११ श्लो. ९४ ) ' गौडी माध्वी च पैष्टी च विज्ञेया त्रिविधा सुरा ' असें म्हटलेलें असल्यामुळें गुड, मधु व पिष्ट यांच्या विकारामध्यें अनादित्वाचा निश्चय होत असल्यामुळें त्या अर्थींच तो ( सुरा ) शब्द मुख्य आहे. यास्तव, द्विजोत्तमांनीं तिन्ही द्विजांनीं त्यांतील

एकही सुरा पिऊं नये. पण हेंही म्हणणें बरोबर नाहीं. कारण वरील पैठीनसीच्या वचनांत हें मद्य गौडी व माध्वी याहून निराळें आहे असें परिगणनेनेंच सुचविलें आहे. मनूनेंही (अ. ११ श्लो. ९३) 'सुरा हा अन्नाचा मळ व पापी आहे,' असें म्हणून तो अन्नाचा विकार आहे, असें सुचविलें आहे. गूळ व मध यांपासून होणारें मद्य अन्नविकार नसून रसरूप असतें, हें प्रसिद्ध आहे. सौत्रामणिग्रहांत अन्नविकार या अर्थींच सुराशब्द श्रुत आहे. यास्तव, सुरा म्हणजे पैष्टीच. बाकीच्या मद्यांना सुरा म्हणणें गौण आहे. मनूचें 'गौडी माध्वी०' इत्यादि वचन शब्दानुशासनाप्रमाणें शब्दार्थसंबंधाचें प्रतिपादन करण्यासाठीं प्रवृत्त झालेलें नाहीं तर कार्याचें प्रतिपादन करावयास प्रवृत्त झालें आहे. यास्तव, गौडी, व माध्वी या मद्यांना गुरुप्रायश्चित्त सांगण्यासाठीं गौणवृत्तीनें सुरा असें म्हटलें आहे. असो; पैष्टीचा तिन्ही द्विजांना निषेध केला आहे. गौडी इत्यादि इतर मद्यांचा ब्राह्मणांना मात्र निषेध सांगितला असून इतरांना तो नाहीं. कारण, मनुस्मृतींत (अ. ११ श्लो. ९५) 'मद्य, मांस, सुरा व आसव हें यक्षरक्षःपिशाचांचें अन्न असून देवांचा हवि भक्षण करणाऱ्या ब्राह्मणास खाण्यासारखें नाहीं.' असें म्हटलें आहे. वृद्धविष्णूनेंही ब्राह्मणालाच मद्याचा प्रतिषेध सांगितला आहे ब्राह्मणांनीं गौडी व माध्वी प्राशन केल्यास इतर मद्यप्राशनापेक्षां अधिक दोष लागतो, हें सांगण्याकरितां त्यांचा मनूनें (अ. ११ श्लो. ९४) पैष्टीबरोबर पृथक् निषेध केला आहे.

हा सुरानिषेध अनुपनीत पुत्र व अविवाहित कन्या यांनाही लागू आहे. पण 'बालकांना चतुर्थांश प्रायश्चित्त सांगावें, व सर्व पापांविषयीं हा विधि आहे,' असें म्हटलेलें असल्यामुळें बालकांनीं बुद्धिपुरःसर जरी सुरापान केलें तरी त्यांना मरणान्तिक प्रायश्चित्त नाहीं; तर चतुर्थांशच दुप्पट करून म्हणजे षड्वार्षिक व्रतच सांगावें. कारण, 'अकामतः केलेल्या दोषाला जें प्रायश्चित्त सांगितलेलें असतें तेंच कामतःकेलेल्याला दुप्पट करावें लागतें असें अंगिराचें वचन आहे. वृद्ध व आतुर यांच्या विषयींही असेंच जाणावें. मद्य जातिमात्राला उद्देशून निषिद्ध मानलेलें असल्यामुळें ज्याचें उपनयन झालेलें नाहीं, अशा बालकानेंही तें पिऊं नये. पण 'गौतमानें उपनयनाच्या पूर्वी कामचार, कामवाद व कामभक्ष सांगितलेलें असल्यामुळें अनुपनीतानें मद्यपान केल्यास दोष लागतो, म्हणून कसें म्हणतां? शिवाय 'मुलांना पांच वर्षांपर्यंत मद्य-मूत्र-पुरीषादि भक्षण केल्यास कांहीं दोष लागत नाहीं. पण त्यानंतर त्यांनीं तें खाल्लयास त्याचा दोष आईबाप, सुहृत् व गुरु यांस लागतो.' असें कुमाराचें वचन असल्यामुळेंही त्यांना दोष लागत नाहीं, असें वाटतें, असें कोणी म्हणेल तर सांगतों–सुरा व मद्य यांच्या निषेध वाक्यांत जातिमात्रावच्छेदकत्वाचें (म्हणजे सर्व ब्राह्मण जातींचें ग्रहण करणाऱ्या पदाचें) श्रवण होत असल्यामुळें निषेधाची प्रवृत्ति अप्रतिहत आहे. सुरापाननिषेध जात्याश्रय आहे. उपनीत, अनुपनीत इत्यादि व्यक्तीचा आश्रय करून नाहीं. जातूकर्ण्याचें 'बालकांनीं अज्ञानतः मद्यपान केल्यास त्याचें कृच्छ्रत्रय प्रायश्चित्त आई, बाप अथवा भ्राता यांनीं करावें.' असें म्हणून मद्यपानाचें प्रायश्चित्त

निराळें सांगितलें आहे. यास्तव, कामचार, कामभक्ष इत्यादि सांगणारें गौतमवचन सुरादि मद्यांस सोडून शिळें, आंवलेलें, बाजारचें इत्यादिकांविषयीं आहे. म्हणूनच मनूनें उपनयनाच्या पूर्वी केलेल्या दोषांचें प्रायश्चित्त उपनयनच आहे, असें सांगितलें आहे. (अ. २ श्लो. २७ पहा) असो, या सर्व प्रतिपादनाचा सारांश असा—क्षत्रिय व वैश्य या तिघांना जन्मापासूनच पैष्टीचा निषेध. ब्राह्मणाला जन्मापासूनच सर्व मद्यांचा निषेध. क्षत्रिय व वैश्य यांना केव्हांही गौडीप्रभृति मद्याचा निषेध नाहीं. शूद्राला तर सुरा व मद्य यांतील कशाचाच निषेध नाहीं २५३.

आणखी दुसरें प्रायश्चित्त सांगतात—

**वालवासा जटी वापि ब्रह्महत्याव्रतं चरेत् ।**
**पिण्याकं वा कणान्वापि भक्षयेत्त्रिसमा निशि ॥ २५४ ॥**

गाय, बकरा, इत्यादिकांच्या केसांनीं केलेल्या वस्त्रानें आच्छादित झालेल्या पुरुषास 'वालवासा' म्हणतात. वालवस्त्राबरोबर चिंध्या व वल्कलें यांचेंही ग्रहण करावें. असो; वालवासा व जटावान् होऊन ब्रह्महत्याव्रत करावें. जटी असें म्हणून मुंडत्वाचें निराकरण केलें आहे. व वालवासा एवढेंच म्हणून शिरःकपालादिकांचें निवारण केलें आहे. पण हें प्रायश्चित्त जो अज्ञानतः जलबुद्धीनें सुरापान करील त्या द्विजास उद्देशून सांगितलेलें आहे. सुरापान महापातक असल्यामुळें प्रायश्चित्त आतिदेशिक असलें तरी तें संपूर्ण म्हणजे द्वादशवार्षिकच केलें पाहिजे, तृतीयांश करून भागणार नाहीं. अथवा तीन वर्षेपर्यंत रात्रीं एकदां पिण्याक ( तिळांची पेंड ) भक्षण करावें अथवा तांदुळाच्या कण्या खाव्या. अर्थात् पिण्याक व कण्या भोजनाचे जागीं सांगितलेल्या असल्यामुळें दुसरें कांहीं खाऊं नये. पण हें प्रायश्चित्त उदकबुद्धीनें सुरापान करून ती सुरा आहे असें स्वादादिकांवरून कळतांच उलटी करून टाकल्यास जाणावें. प्रत्यहीं पंचगव्य प्राशन करणें हें असल्या सुरापान करणाराच्या शरीरास शुद्ध करणारें आहे, असें व्यासांनीं सांगितलें आहे. 'स्तेयं कृत्वा सुरां पीत्वा०' इत्यादि आपस्तंबाच्या व 'महापातकसंयुक्ता वर्षैः शुध्यान्ति ते त्रिभिः' या अंगिराच्या वचनाचा विषय व येथील 'पिण्याकं वा कणान्वापि०' या अर्धाचा विषय एकच आहे. यमानें बृहस्पतिसव व भूमिप्रदान करून पुनःसंस्कार हीं दोन प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. पण तींही या प्रस्तुत विषयालाच लागू आहेत. येथेंही बालवृद्धादिकांना दीड वर्ष व अनुपनीतांना नऊ महिने व्रत करावयास सांगावें. मनूनें (अ. ११ श्लो. ९२). 'एक वर्षभर रात्रीं एकदां सुरापानाचा दोष जाण्यासाठीं कण किंवा पिण्याक यांचें भक्षण करावें' असें जें सांगितलें आहे तें अबुद्धिपूर्वक सुरेचा तालूलाच स्पर्श झालेला असल्यास जाणावें.

द्रवद्रव्याला कंठाच्या खालीं नेणें हेंच जरी खरें प्राशन आहे तरी तालुप्रभृति मुखांतील भागांना स्पर्श केल्याशिवाय कशाचेंच प्राशन करितां येत नाहीं व तो स्पर्श पानक्रियेच्या पूर्वी नियमानें होणारा आहे. यास्तव, पानक्रियेच्या प्रतिषेधानें त्याचाच येथें प्रतिषेध केला

आहे. तस्मात् तालूला मद्याचा स्पर्श होणें हें मुख्य पान नसल्यामुळें त्याला महापातक असें जरी म्हणतां न आलें तरी त्यांत अल्प दोष हा आहेच व त्याच्या निरासार्थ प्रायश्चित्त अवश्य आहे. कारण, हनन निषिद्ध असल्यामुळें त्याच्या अंगभूत हननविषयक निश्चयादिकाला असें निषिद्धत्व आहे व त्यामुळेंच त्यास उद्देशून प्रायश्चित्तही सांगितलें आहे तसेंच येथेंही जाणावें. बौधायनानें ' तीन महिने अबुद्धिपूर्वक सुरापान केल्यास कृच्छ्राब्दपाद करून पुनः उपनयन करावें ' असें सांगितलें आहे. यमानें ' सुरां पीत्वा...द्विजश्चान्द्रायणं चरेत्० ' असें म्हणून चांद्रायण सांगितलें आहे व बृहस्पतीनें ' गौडीमाध्व्यौ सुरां पैष्टीं पीत्वा विप्रः समाचरेत्। तप्तकृच्छ्रं पराकं च चान्द्रायणमनुक्रमात् ' असें म्हणून तप्तकृच्छ्रादि सांगितलें आहे. पण हीं सर्व अल्प प्रायश्चित्तें असल्यामुळें दुसऱ्या कोणत्याही औषधानें साध्य न होणाऱ्या व्याधीच्या उपशमार्थ सुरापान केल्यास त्याविषयीं आहेत, असें समजावें. सुरेशीं संसर्ग झाला असून ज्यांतील सर्वरस वाळून गेला आहे असें अन्न भक्षण केल्यास पुनरुपनयन करावें. ज्यांतील सुरा सुकून गेली आहे अशा एकाद्या भांड्यांतील पाणी प्याल्यास तें उलटी करून टाकावें, त्यावर घृत प्राशन करावें व अहोरात्र उपवास करावा. पण तेंच प्राशन केलेलें शुष्क सुरापात्रांतील जल शिळें असल्यास तीन अहोरात्र शंखपुष्पी नांवाची औषधी घालून तापविलेलें दूध व घृत प्यावें, असें जें बौधायनानें सांगितलें आहे तें शिळें पाणी असणें, या दोषामुळें अधिक होय. इच्छा नसतांनाही सुरापानाचा अभ्यास घडल्यास मनूनें (अ. ११ श्लो. १४७) पांच अहोरात्र वरील प्रायश्चित्तच करावयास सांगितलें आहे. विष्णूनें तेंच प्रायश्चित्त सात अहोरात्र करावयास सांगितलें आहे. यास्तव, तें बुद्धिपुरःसर सुरापात्रस्थ जल प्याल्यास समजावें. बुद्धिपुरःसर त्याचा अभ्यास केल्यास वृद्धयमानें बारा दिवस दुधांत ब्राह्मी शिजवून तें दूध प्यावयास सांगितलें आहे. ' सोमयाजी ब्राह्मणानें अज्ञानतः मद्यप्याच्या तोंडाच्या मद्याचा वास घेतल्यास जलामध्यें उभें राहून तीन प्राणायाम करावें व घृत प्राशन करावें, असें मनूनें ( अ. ११ श्लो. १४९ ) सांगितलें आहे. पण तोच बुद्धिपुरःसर वास घेतल्यास दुप्पट प्रायश्चित्त करावें. ज्यानें सोमपान केलेलें नाहीं त्याच्या प्रायश्चित्ताची कल्पना करावी. साक्षात् सुरेचा वास घेणें, हें जातिभ्रंशकर कर्म आहे. यास्तव त्याकरितां मनूनें ( अ. ११ श्लो. १२४ ) सांगितलेलें सांतपन किंवा प्राजापत्य करावें. ( तें बुद्धिपुरःसर केलेलें असल्यास सांतपन व अनिच्छेनें घडल्यास प्राजापत्य ) २५४.

याप्रमाणें मुख्य सुरापानाचें प्रायश्चित्त सांगून आतां मद्यपानाचें प्रायश्चित्त सांगतात—

**अज्ञानात्तु सुरां पीत्वा रेतोविण्मूत्रमेव च ।**
**पुनःसंस्कारमर्हन्ति त्रयो वर्णा द्विजातयः ॥ २५५ ॥**

जो ब्राह्मण अज्ञानानें म्हणजे हें पाणी आहे, असें समजून मद्य पितो व जे ब्राह्मणादिक रेत, विष्ठा व मूत्र पितात ते तिन्ही द्विजाति वर्ण तप्तकृच्छ्रपूर्वक पुनरुपनयन या प्रायश्चित्तास योग्य होतात. येथें मद्यपानास उद्देशून जो हा पुनःसंस्कार सांगितला आहे तो

ब्राह्मणांकरितांच होय. कारण, क्षत्रिय व वैश्य यांना त्याची अभ्यनुज्ञा दिली आहे. येथें सांगितलेलें प्रायश्चित्त अतिशय लघु असल्यामुळें येथील सुरा शब्दाचा अर्थ मद्य असाच करणें उचित आहे. अज्ञानतः मुख्य सुरापान केल्यास द्वादशवार्षिक व्रत सांगितलेंच आहे. एवढ्यासाठींच गौतमानें प्रस्तुत प्रकरणीं मद्यशब्दाचा प्रयोग केला आहे. मनूनें प्रस्तुत विषयासंबंधीं ( अ. ११ श्लो. १४६ ) ' अज्ञानानें वारुणीचें पान केल्यास पुरुष पुनःसंस्कारानें शुद्ध होतो, ' असें जें म्हटलें आहे तेंहि पूर्वी तप्तकृच्छ्र करून मग संस्कार केल्यासच शुद्धि होते, असें जाणावें. म्हणजे गौतमवाक्याशीं विरोध येणार नाहीं. पुनःसंस्कार म्हणजे उपनयन. तें आश्वलायनादिकांनीं सांगितलेल्या क्रमानें करावें. बुद्धिपूर्वक मद्यपान केल्यास ' कृच्छ्र, अज्ञानतः सुरापान केल्यास अतिकृच्छ्र घृतप्राशन व पुनःसंस्कार, ' असें प्रायश्चित्त वसिष्ठांनीं सांगितलें आहे. किंवा शंखानें सांगितलेलें चान्द्रायण करावें. मद्य नुसतें मुखांत प्रविष्ट झाल्यास आपस्तंबानें सांगितलेलें षड्रात्र प्रायश्चित्त करावें. ' अभक्ष्य, अपेय व अलेह्य पदार्थ व रेत, मूत्र, पुरीष यांचें भक्षण झाल्यास कमल, उदुंबर, बिल्व, पलाश व कुश यांचें जल सहा अहोरात्र प्याल्यानें पुरुष शुद्ध होतो ' असें तें आपस्तंबीय वचन आहे. पण हें ताडी, माडी इत्यादि मद्यांविषयीं आहे. गौडी व माध्वी यांचें अज्ञानतः प्राशन घडल्यास वसिष्ठानें सांगितलेलें–कृच्छ्रातिकृच्छ्रासह पुनःसंस्कार व घृतप्राशन–हें प्रायश्चित्त करावें. पण त्याचेंच बुद्धिःपुर प्राशन घडल्यास २५४ व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत सांगितलेलें त्रैवार्षिक प्रायश्चित्त करावें. त्याचा बुद्धिपुरःसर अभ्यास केल्यास ' सुरा ( कोणतेंही सामान्य मद्य ) अग्नीसारखी जळजळीत करून प्यावी. म्हणजे मरणानें शुद्धि होते, ' असें म्हणून वसिष्ठानें सांगितलेलें मरणान्त प्रायश्चित्त करावें. मद्याच्या भांड्यांतील जल अज्ञानानें प्याल्यास द्विजानें दर्भांचीं मुळें घालून तापविलेलें दूध तीन दिवस प्यावें. अज्ञानानें तें जल अनेकदां प्याल्यास वसिष्ठानें सांगितल्याप्रमाणें कमल, उदुंबर, बिल्व पळस ( यांचीं पानें ) व कुश घालून तापविलेलें दूध तीन दिवस प्यावें. पण तेंच जल जाणूनबुजून ( बुद्धिपुरःसर ) प्राशन केल्यास पांच अहोरात्र शंखपुष्पीचीं फुलें घालून तापविलेलें दूध प्यावें. ज्ञानतः त्या जलपानाचा अभ्यास केल्यास शंखानें सांगितल्याप्रमाणें गोमूत्र यावक सात दिवस प्यावें. त्याचा फारच अभ्यास झाल्यास बारा दिवस दुधासह ब्राह्मीचें पान करावें. या वरील सर्व प्रायश्चित्तांत ब्राह्मण हा शब्द योजावा. कारण, क्षत्रिय व वैश्य यांना पैष्टीवांचून दुसऱ्या सुरेचा निषेध केलेला नाहीं. हें प्रायश्चित्त जरा गुरु असल्यामुळें गौडी व माध्वी सुरा ठेवलेल्या भांड्यांतील जल प्राशन केल्यासच वरील प्रायश्चित्त करावें. ताडी, माडी इत्यादि दुसऱ्या मद्यांच्या भांड्यांतील उदकपान केल्यास प्रायश्चित्त विचारानें ठरवावें २५५.

आतां द्विजांच्या भार्येविषयीं सांगतात—

**पतिलोकं न सा याति ब्राह्मणी या सुरां पिबेत् ।**
**इहैव सा शुनी गृध्री सूकरी चोपजायते ॥ २५६ ॥**

जी ब्राह्मणाची भार्या सुरा पिते ती मोठी पुण्यवती असली तरी पतीच्या लोकास जात नाहीं; तर याच लोकीं कुत्री, गृध्री, सूकरी होते. कुत्री इत्यादि शब्दांवरून तिर्यग्योनी लक्षित होते. असो, ती सुरापान करणारी ब्राह्मणी क्रमानें त्या हीनयोनीस प्राप्त होते. या श्लोकांत ब्राह्मणी असें जरी म्हटलें आहे तरी ज्या द्विजाच्या जितक्या भार्या असतील त्या सर्वांचें उपलक्षण होतें. म्हणूनच मनूनें ' ज्याची भार्या सुरापान करते त्याचें अर्धे शरीर पतित होतें आणि ज्याचें अर्धें शरीर पडलें आहे त्याची निष्कृतिच होत नाहीं. ' असें सांगितलें आहे. याचा भावार्थ असा–धर्म, अर्थ व काम यांमध्यें सह-अधिकार असल्यामुळें भार्या व पति यांचें एकशरीर असतें. यास्तव, ज्या द्विजाची भार्या सुरा पिते त्याचें भार्यारूप अर्धें शरीर पतित होतें आणि ज्याचें भार्यारूप अर्धें शरीर पडलें आहे त्याला प्रायश्चित्तच उक्त नाहीं. यास्तव, ब्राह्मणीप्रभृति द्विजभार्यांनीं सुरापान करूं नये. त्रैवर्णिकांच्या सुरापानाचा निषेध केलेला असल्यामुळें व त्यांच्या बरोबरच त्यांच्या स्त्रियांनींही सुरापान करूं नये, असें उघड होत असलें तरी येथें पुनः जो ' ब्राह्मणभार्येनें सुरापान करूं नये ' असा निषेध केला आहे तो द्विजांशीं विवाह केलेल्या शूद्रजातीच्या स्त्रीनेंही सुरापान करूं नये, असें सुचविण्याकरितां होय. तस्मात् द्विजांच्या भार्यांनीं सुरापान केल्यास अर्धें प्रायश्चित्त करावें. शूद्राच्या भार्येला शूद्राप्रमाणेंच त्याचा निषेध नाहीं. सुरापानासारखीं जीं निषिद्ध भक्षणादि पापें त्यांच्या निरसनार्थ सुरापानास सांगितलेल्या प्रायश्चित्ताचें अर्धें प्रायश्चित्त करावें, असें वर म्हटलेंच आहे २५६.

इति सुरापानप्रायश्चित्तप्रकरणम् २.

आतां सुवर्णस्तेयाचें प्रायश्चित्त सांगतात—

**ब्राह्मणः स्वर्णहारी तु राज्ञे मुसलमर्पयेत् ।**
**स्वकर्म ख्यापयंस्तेन हतो मुक्तोऽपि वा शुचिः ॥ २५७ ॥**

ब्राह्मणाचें एक सुवर्ण जो चोरतो त्यानें मी सुवर्णाची चोरी केली आहे असें आपल्या तोंडानें प्रकट करीत राजाला मुसळ नेऊन द्यावें. मुसळ समर्पण करणें, हें दृष्टार्थ असल्यामुळें राजानें त्या मुसळानें त्याला मारावें. अर्थात् त्या राजानें मारलें असतां अथवा प्रहार सहन करून जिवंत सुटला असतां तो ( चोर ) शुद्ध होतो. येथील सुवर्णहरणशब्दानें समक्ष बलात्कारानें घेणें अथवा परोक्ष चोरी करणें–या दोघांचाही बोध होतो. तात्पर्य, क्रय ( विकत घेणें ) इत्यादि स्वत्वाच्या निमित्तावाचून दुसऱ्याचें धन घेणें हा अपहारच आहे. येथें ' मुसळ ' जरी सामान्यतः म्हटलेलें आहे तरी तें हननाकरितांच असल्यामुळें हननोपयोगी मनुप्रोक्त ( अ. ८ श्लो. ३१५ ) खदिराची काठी, दोन्हीकडे धार असलेली तरवार, लोखंडी गज इत्यादि दुसरेहि पदार्थ घ्यावे. शंखानें ' सुवर्ण चोरणारानें केंस मोकळे सोडून ओलें वस्त्र नेसून व लोखंडी मुसळ घेऊन राजापाशीं यावें. व मी अमुक पाप केलें आहे; यास्तव मला ह्या मुसळानें मार असें म्हणावें. राजानें त्याला मुसलप्रहार करून सोडलें असतां तो शुद्ध होतो. ' असें अधिक सांगितलें आहे. मुसलानें एकदाच प्रहार करावा.

त्यानें तो मेला तरी शुद्ध होतो व जिवंत राहिला तरी शुद्धच होतो. संवर्ताच्या या म्हणण्या प्रमाणेंच ब्रह्मवधामध्येंही ' प्रहारानें आर्त झालेला मेल्यासारखा होऊन जरी जिवंत राहिला तरी तो शुद्ध होतो ' असें सांगितलें आहे.

पण ' मुक्त ' या शब्दाचा अर्थ ' राजानें ज्याला दयेनें सोडलें आहे ' असा कां करूं नये, असें कोणी विचारील तर त्याचें उत्तर असें–गौतमानें ताडन न करणारा राजा पापी होतो, असें म्हटलें आहे. ' राजाला जरी दोष लागला तरी त्यानें स्नेहादि निमित्तानें निषेधाचा अतिक्रम करून न मारतांच सोडलेला सुवर्णहारी मुक्त कां होत नाहीं ? ' असे कोणी विचारल्यास त्याचेंही उत्तर सांगतों. तसें म्हटल्यास शुद्धि कारणावाचून झाली असें होईल. बरें–राजानें सोडल्यानंतर द्वादशवार्षिकादिव्रतानुष्ठानानेंच शुद्धि होते, असें मानल्यानें ती अकारण झाली, असें म्हणतां येणार नाहीं.–असें कोणी बोलेल तर तेंही फारसें रमणीय नव्हे. कारण ' मुक्तः शुचिः ' असें वचन आहे. त्यावरून मोक्षच शुद्धीचें कारण आहे, असें ठरतें. यास्तव, वरील व्याख्याच श्रेष्ठ होय. अर्थात् मुसलप्रहार झाल्यावरही मरणापासून सुटून जिवंत रहाणारा शुद्ध होय. हें मरणान्तिक प्रायश्चित्त सर्व वर्णांच्या अपहारकांना एकसारखेंच लागू आहे. ब्राह्मणाचें सुवर्ण हरण करणाऱ्या ब्राह्मणाप्रमाणें क्षत्रियादिकही महापातकीच होत व त्यांच्याकरतां निराळें प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं. मनूनें ( अ. ११ श्लो. ९९ ) ' सुवर्णस्तेयकृद्विप्रः० ' असें जरी म्हटलें आहे तरी येथील विप्रशब्द मनुष्यमात्राचा उपलक्षक आहे, असें जाणावें. कारण ' प्रायश्चित्तीयते नरः ' असें म्हणून वरपासून नरांचेंच प्रकरण सुरूं केलेलें आहे व ' ब्रह्महत्या सुरापानं ' इत्यादि निमित्तवाक्यांत ब्राह्मणादि विशेष वर्णांचा उल्लेख केलेला नाहीं. यास्तव, विप्र म्हणजे नरमात्र असेंच जाणावें. ब्राह्मणवधाचा मनूनें ( अ.८ श्लो. ३८० ) निषेध केलेला असल्यामुळें राजानें हें मुसलताडन ब्राह्मणास करूं नये. पण त्यानें निषेधातिक्रम करून मुसलप्रहार केल्यासही तो शुद्ध होतो. पण तो केवल तपाच्या योगानेंही शुद्ध होऊं शकतो. अर्थात् मुसलप्रहार व तप हीं दोन्ही सामान्य विषय आहेत. शिवाय मनूनेंही ' सुवर्णस्तेयकृद्विप्रः ' असें पूर्वी म्हणून पुढें लागलेंच ' गृहीत्वा मुसलं राजा सकृद्धन्यात्तु तं स्वयं ' असें म्हटलें आहे. त्यामुळें ' तं ' या सर्वनामानें वरील विप्राचेंच ग्रहण होतें. अर्थात् सुवर्णस्तेयप्रसंगीं ब्राह्मणालाही मुसलप्रहार करण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. तर मग ' न जातु ब्राह्मणं हन्यात् ' या वचनाची वाट काय ? म्हणून विचाराल तर सांगतों—हें वाक्य प्रायश्चित्तावाचून दुसऱ्या दंडादिरूप ताडनाचा निषेध करीत आहे, असें समजावें.

असो; हें मरणान्तिक प्रायश्चित्त बुद्धिपुरःसर सुवर्णस्तेयाकरितां सांगितलें आहे. येथील सुवर्ण हा शब्द परिमाणवाचक आहे. सोनें या द्रव्याचा वाचक नाहीं. परिमाणाचें कोष्टक आचाराध्यायाच्या ३६२ व ३६३ या श्लोकांत दिलें आहे. त्यावरून सोळा मासे सोनें म्हणजे एक सुवर्ण हें परिमाण ठरतें. यास्तव ब्राह्मणसुवर्णहरण महापातक आहे, इत्यादि वाक्यांतील सुवर्ण म्हणजे सोळा मासेभार सोनें असें समजावें व ब्राह्मणाचें तितकें सोनें चोरणें, हें महापातक असून त्याकरितांच मरणान्तिक प्रायश्चित्ताचें विधान केलें आहे. दोन-तीन मासेभार सोनें चोरणें,

हें क्षत्रियादिकांचें सोनें चोरण्याप्रमाणेंच उपपातक आहे व त्याचें प्रायश्चित्त निराळें सांगितलें आहे. याविषयीं षट्त्रिंशत्-मतांत असें विधान केलें आहे. केंसाच्या अग्राइतकें सोनें चोरल्यास प्राणायाम करावा. डोकींतील लिखे इतकें सोनें चोरल्यास तीन प्राणायाम, राजमाषा इतकें चोरल्यास चार प्राणायाम व आठ सहस्र गायत्री, गौरसर्षप मात्र चोरल्यास दिवसभर गायत्रीजप, यवप्रमाण सोनें चोरल्यास दोन दिवस जप, कृष्णलप्रमाण सोन्याचा अपहार केल्यास सांतपन कृच्छ्र, एक माषप्रमाण सोनें चोरल्यास तीन महिने गोमूत्रांत भिजविलेले यव भक्षण करणें व सुवर्णप्रमाणाहून किंचित् न्यून सोन्याचा अपहार केल्यास एक वर्ष यवभक्षण, हें प्रायश्चित्त करावें. सुवर्णादि अधिक प्रमाण सोन्याचा अपहार केल्यास मरणान्त किंवा ब्रह्मघातक्यास उक्त असलेलें प्रायश्चित्त करावें. जे नराधम बलात्कारानें सुवर्णप्रमाण सोन्याहून कमीही सोनें हरण करितात त्यांना मरणान्त प्रायश्चित्त सांगावें. हें स्तेयप्रायश्चित्त चोरलेलें सर्व धन त्याच्या स्वामीला परत देऊन मग करावें. कारण मन्वादिकांनीं तसें सांगितलें आहे. दंडप्रकरणांतही स्वामीचें धन परत देण्याविषयीं सांगितलें आहे.

राजा स्वतः चोराला मारावयास असमर्थ असल्यास वसिष्ठांच्या वचनाप्रमाणें त्यानें त्याला ताम्रमय शस्त्र द्यावें. त्या शस्त्रानें चोरानें आपल्याला मारून घ्यावें. मरणानें तो पवित्र होतो. वसिष्ठानें ' सुवर्णचोरानें अंगावरील व मस्तकावरील सर्व केंस काढून टाकून सर्व शरीराला घृत लावून शेणीच्या अग्नीनें आपल्याला जाळून व मारून टाकावें, ' असें म्हणून जें दुसरें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें गुरु, श्रोत्रिय, यागस्थ ब्राह्मण इत्यादिकांचें सुवर्ण हरण केल्यास जाणावें. अथवा अपहार करणारा क्षत्रियादि असल्यास त्याविषयीं समजावें. वैश्य-क्षत्रियादि अपहार करणारे असल्यास प्रचेतानें-तो अश्वमेधानें किंवा गोसवानें शुद्ध होतो, असें सांगितलें आहे २५७.

आतां आणखीं दुसरें प्रायश्चित्त सांगतात—

**अनिवेद्य नृपे शुद्ध्येत्सुरापव्रतमाचरन् ।**
**आत्मतुल्यं सुवर्णं वा दद्याद्वा विप्रतुष्टिकृत् ॥ २५८ ॥**

आपलें स्तेय ( चौर्य, चोरी ) राजाला कळवून द्वादशवार्षिक सुरापव्रत केल्यानेंही तो ( चोर ) शुद्ध होतो. शवाचा शिरोध्वज, त्याचेंच कपाल, इत्यादिकांच्या धारणाचें निराकरण करण्याकरितां सुरापशब्दानें द्वादशवार्षिकव्रताचा उल्लेख केला आहे. ब्रह्महव्रत म्हटल्यास ध्वजादिकांची प्राप्ति झाली असती. पण हें प्रायश्चित्त अबुद्धिपुरःसर केलेल्या दोषाकरितां आहे. आतां अबुद्धिपुरःसर अपहारच संभवत नाहीं, असें कोणी म्हणेल; पण येथील अकामतः अपहार कसा संभवतो तें सांगतों—वस्त्राच्या टोंकांस बांधलेलें किंवा अडकलेलें सुवर्णादिक जेव्हां एकादा त्या वस्त्राबरोबर नेतो अथवा रुपें, पितळ, इत्यादि दुसऱ्या द्रव्याच्या बुद्धीनें नेतो; पण लागलेंच तें स्वामीला परत देत नाहीं किंवा त्याच्या हातून सांडतें तेव्हां अकामतः अपहार संभवतो. पण किमयेनें तांब्याला किंवा दुसऱ्या धातूला सुवर्णभाव आणलेला असून

त्याचा कोणी अपहार केल्यास त्याच्यासाठीं हें प्रायश्चित्त नव्हे. कारण, त्यांत मुख्य सुवर्ण-जातीचा समवाय नसतो. केवल मुख्यवस्तूचें सादृश्य असतें, म्हणून तेवढ्यावरूनच कांहीं मुख्याचे धर्म गौणाचे ठिकाणीं येत नाहींत. अशाचप्रकारचें खोटेंच सोनें सोन्याच्या भ्रांतीनें ( हें सोनें आहे, अशा भ्रमानें ) हरण करून नेलें तरी त्याला हें गुरुप्रायश्चित्त नाहीं. कारण, त्यानें असुवर्णाचा अपहार केलेला असतो. 'ब्राह्मणाचा साक्षात् वध न करितां नुस्ता त्याविषयीं संकल्प जरी केला तरी तो दोषी होतो.' या वचनांत सांगितल्याप्रमाणें सुवर्णबुद्धीनें चोरलेल्या असुवर्णाविषयींही तो दोषी होण्यास काय प्रत्यवाय आहे ? म्हणून विचाराल तर सांगतो. त्याची चौर्यप्रवृत्ति खऱ्या सोन्याविषयीं नव्हती. ' मनानें पापाचें चिंतन करून प्रणवपूर्वक व्याहृतीचा जप करावा. तीन प्राणायाम करावे व द्वादशरात्र कृच्छ्र करावें.' इत्यादि जें सांगितलें आहे तें योग्य द्रव्यांमध्यें प्रवृत्ति झाल्यास जाणावें. यास्तव, अशाप्रकारच्या खोट्या द्रव्याचा अज्ञानतः अपहार केल्यास तें प्रायश्चित्ताचें निमित्त होत नाहीं; तर हें रुपें आहे अशा समजुतीनें सोन्याचा अपहार केल्यास मात्र तो स्वर्णापहार होतो.

असो, अशा प्रसंगीं अपहर्ता जर मोठा श्रीमान् असेल तर त्यानें स्वामीला स्वतःच्या भारंभार सोनें द्यावें; पण तितकें धन नसल्यास आणि तपश्चर्या करावयासही तो असमर्थ झाल्यास विप्रतुष्टिकृत् म्हणजे ब्राह्मणाच्या यावज्जीव कुटुंबपोषणास पुरेल व त्यामुळें त्याला संतोष होईल, इतकें धन द्यावें; पण निर्गुणस्वामीचें जर त्यानें द्रव्य हरण केलें असेल तर चोरानें हेंच व्रत पाऊणपट ( म्हणजे नववार्षिक ) करावें. पण असल्याच प्रकारचें धन जर त्यानें उपाशीं मरत असलेल्या कुटुंबाच्या पोषणाकरितां हरण केलें असेल तर अत्रीनें प्रतिपादन केल्याप्रमाणें षड्वार्षिकव्रत, किंवा स्वर्जितादि क्रतु व तीर्थयात्रा करावी. परंतु, अपहार करतां-क्षणींच ( लागलेंच ), ' अरेरे मी हें फार वाईट कर्म केलें,' असें वाटून जर त्याला पश्चात्ताप झाला व त्यानें तें स्वामीला परत दिलें किंवा टाकलें तर आपस्तंबानें म्हटल्याप्रमाणें चवथ्या वेळीं भोजन करून तीन वर्षें रहावें अथवा आंगिरसानें सांगितल्याप्रमाणें वज्राख्य त्रैवार्षिक-व्रत करावें.

अहो—पण चोरलेलें धन जरी परत दिलें किंवा त्याचा त्याग केला तरी अपहार शब्दा-चा धात्वर्थ त्यांत निष्पन्न होतोच. तेव्हां त्याला अल्पप्रायश्चित्त कसें ? बरें, अपहारधात्वर्थ निष्पन्न झाला नाहीं म्हणून म्हटलें तरी प्रायश्चित्ताचा अभावच झाला पाहिजे. तें अल्प होणें योग्य नव्हे—असें कोणी म्हणतील; पण तें बरोबर नव्हे. कारण, अपहारशब्दाच्या अर्थाची व्याप्ति उपभोगादि फलापर्यंत असते. यास्तव, उपभोगापूर्वी निवृत्त झाल्यास सर्व अपहारार्थ होत नाहीं. यास्तव, अपेय द्रव्य पिऊन उलटी करून सोडल्यास जसें अल्प प्रायश्चित्तच प्राप्त होतें त्याप्रमाणें प्रस्तुत प्रसंगींही अल्पप्रायश्चित्त होणें युक्तच आहे. पण तेवढ्यावरून चोराच्या हातांतून चोरलेली वस्तु बलात्कारानें हिसकावून घेतल्यास चोरालाही तिचा उपभोग घडत नसल्यामुळें त्यालाही अल्प प्रायश्चित्तच युक्त आहे, असें म्हणूं नये. कारण, चोरानें स्वतः तिचा त्याग केलेला नसतो व फलपर्यन्त अपहार करण्यासाठींच तो चौर्यांत प्रवृत्त झालेला असतो.

असो; जो रुपें, तांबें, इत्यादिकांमध्यें मिसळलेलें सोनें हरण करतो त्याला हें लघुप्रायश्चित्त नाहीं. कारण, इतर धातूंशीं संसर्ग पावलेल्याही सोन्याचें सुवर्णत्व पृषदाज्यांतील आज्यत्वाप्रमाणें गेलेलें नसतें. यास्तव, त्या अपहाराचें द्वादशवार्षिक प्रायश्चित्त होय. सुवर्णासारख्या दुसऱ्या द्रव्याचाच अपहार केल्यास तें उपपातक होत असल्यामुळें त्याला त्रैवार्षिकादि लघुप्रायश्चित्त प्राप्त होत नाहीं. आपस्तंबानें 'कृच्छ्रं सांवत्सरं चरेत्' असें म्हणून सुवर्णपरिमाणाहून न्यून व माषपरिमाणाहून अधिक सोन्याच्या अपहाराचें प्रायश्चित्त सांगितलें आहे. सुमन्तूनें 'सुवर्णस्तेय करणारानें एक महिना सावित्रीमंत्रानें आठ सहस्र घृताच्या आहुती याव्या व त्रिरात्र उपोषण करावें. नंतर तप्तकृच्छ्र केल्यानें तो शुद्ध होतो' असें जें सांगितलें आहे तें पूर्वोक्त माषपरिमाण सुवर्णापहाराचेंच दुसरें प्रायश्चित्त आहे. त्यानेंच 'बारा अहोरात्र वायुभक्षण करून राहिल्यास सुवर्णस्तेयी पावन होतो,' असें जें सांगितलें आहे तें मनानें अपहार करण्यास प्रवृत्त होऊन स्वतःच अपहारेच्छा सोडलेल्या विचारी पुरुषाविषयीं जाणावें.

या प्रकरणांतही बाल–वृद्ध इत्यादिकांना अर्धें प्रायश्चित्त जाणावें. चतुर्विंशतिमतांत–द्विजानें मोहानें रुप्याचा अपहार केल्यास चांद्रायणव्रत करावें. दहा गद्याणापासून शंभर गद्याणापर्यंत चोरल्यास दोन चांद्रायणें, सहस्रगद्याणापर्यंत तीन चांद्रायणें व त्यापुढें सुवर्णाचें प्रायश्चित्त करावें. सर्व धातूंचा अपहार केल्यास पराक, धान्याचा अपहार केल्यास कृच्छ्र, तिळ चोरल्यास ऐंदव व रत्नांचा अपहार केल्यास चांद्रायणव्रत करावें. इत्यादि जें सांगितलें आहे तेंही सहस्र गद्याणाहून अधिक रुपें हरण केल्यास सुवर्णस्तेयासारखें प्रायश्चित्त प्राप्त होते, हें प्रतिपादन करण्यासाठीं आहे. त्याची निवृत्ति करण्यासाठीं नव्हे. वर रत्नांचा अपहार केला असतां चांद्रायण जें सांगितलें आहे तेंही सहस्र गद्याणाहून हीन मूल्याच्या रत्नांचा अपहार केल्यास जाणावें. त्याहून अधिक मूल्याचीं रत्नें चोरल्यास सुवर्णस्तेयासारखें प्रायश्चित्त २५८.

इति सुवर्णस्तेयप्रायश्चित्तप्रकरणम् ३.

आतां क्रमप्राप्त गुरुतल्पगमन प्रायश्चित्त सांगतात––

**तप्तेऽयःशयने सार्धमायस्या योषिता स्वपेत् ।**
**गृहीत्वोत्कृत्य वृषणौ नैर्ऋत्यां चोत्सृजेत्तनुम् ॥ २५९ ॥**

पुढील श्लोकांतील गुरुतल्पग पदाचा संबंध येथें लावावा. तापवून लाल केलेल्या लोखंडी शय्येवर तापवून लाल केलेल्याच लोखंडी स्त्रीप्रतिकृतीसह गुरुभार्येशीं गमन करणारानें शयन करावें, अर्थात् अशा रीतीनें निजून शरीरत्याग करावा. त्या शय्येवर शयन करीत असतांना 'मी गुरुस्त्रीगमन केलें,' असें आपल्या तोंडानें प्रकट करावें. (मनु. अ. ११ श्लो. १०३ पहा.) वृद्ध हारीताच्या वचनाप्रमाणें शयन करावयाचें तें त्या स्त्रीला आलिंगन देऊन करावें. वसिष्ठाच्या आज्ञेप्रमाणें लोम व केंस काढून व सर्वांगास घृत लावून हें शयनरूप प्रायश्चित्त करावें. मनूचा वरील श्लोक पाहिला असतां तप्तलोहशयन व तप्तलोहस्त्रीचें आलिंगन हीं दोन स्वतंत्र प्रायश्चित्तें आहेत, असा भास होतो. पण तो एकच प्रायश्चित्तकल्प आहे, असें सम-

जून लोखंडी स्त्रीला आलिंगन देऊन तापलेल्या लोखंडी शय्येवर निजावें, असा परस्परसापेक्ष अर्थ करावा.

अथवा लिंगासह वृषण स्वतः कापून व त्यांना ओंझळींत घेऊन नैर्ऋत्य दिशेस सरळ मार्गानें देहपात होई तों गमन करावें. ( मनु० अ. ११ श्लो. १०४ पहा. ) शंखाच्या वचनाप्रमाणें शिश्न व दोन्ही वृषण वस्तऱ्यानें कापावे व मागें न पाहतां नैर्ऋत्य दिशेस जावें. पण जात असतांना पुढें भिंत वगैरे येऊन प्रतिबंध झाल्यास वसिष्ठवचनाप्रमाणें, मरेपर्यंत तेथेंच रहावें. नारदानेंही हें असेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. हा लिंगादिच्छेद दंडाकरितांही आहे व पापक्षयाकरितांही आहे. याच मरणान्तिक दंडास उद्देशून मनूनें (अ. ८ श्लो. ३१८) ' राजानें ज्यांना दंड दिला आहे ते पापी मानवही निर्मल होऊन पुण्यवानाप्रमाणें स्वर्गास जातात ' असें ह्मटलें आहे. धनदंडानेंही पुनः प्रायश्चित्त होतेंच. ( मनु. अ. ९ श्लो. २४० पहा ) या मरणान्तिक दोन प्रायश्चित्तांतील कोणत्या तरी एकाचें अनुष्ठान करून गुरुभार्यागामी शुद्ध होतो. येथील गुरुशब्द मुख्यवृत्तीनें पित्याचे ठिकाणींच प्रवृत्त होतो. कारण मनूनें ( अ. २ श्लोक १४२ ) गुरुत्व प्रतिपादनपर वाक्यांत निषेकादि ( गर्भाधानादि ) करणाऱ्या जनकालाच गुरुत्व सांगितलें आहे; व योगीश्वरानें निषेकादि कर्मांच्या अभिप्रायानें ' स गुरुर्यः क्रियां कृत्वा वेदमस्मै प्रयच्छति ' असें म्हटलें आहे.

**शंका**—अहो, पण गुरुशब्दाचा जनकावाचून दुसऱ्या पुरुषांचे ठायींही प्रयोग आढळतो. मनूनें ' उपनीय गुरुः शिष्यं ' या वचनानें आचार्याला व ' स्वल्पं वा बहु वा यस्य श्रुतस्योपकरोति यः ' या वचनानें उपाध्यायाला गुरु म्हटलें आहे. व्यासानेंही ' माता, पिता, पति, आचार्य, विद्यादाता, भ्राता, ऋत्विज, भयापासून रक्षण करणारा व अन्नदाता, हे सर्व गुरु आहेत,' असें म्हटलें आहे. एकाच शब्दाचे अनेक अर्थ कल्पिणें योग्य नव्हे म्हणून म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण, गुरुशब्दाच्या प्रवृत्तीचें निमित्त पूजायोग्यता असून ती या वरील सर्वांमध्यें असते. योगीश्वरानें ' एते मान्या ' व ' एभ्यो माता गरीयसी ' या वचनांनीं त्यांची पूजायोग्यताच सुचविली आहे. मनूनें ( अ. २ श्लो. १४५ ) दहा उपाध्यायांहून आचार्य व शंभर आचार्यांहून पिता श्रेष्ठ आहे, असें म्हटलेलें असल्यामुळें तोच सर्वांत अधिक पूज्य व त्यामुळेंच तो गुरु, असें म्हणाल तर तें बरोबर नाहीं. कारण, मनूनें पुढच्याच श्लोकांत ' उत्पादक व ब्रह्मदाता यांमध्यें ब्रह्मदाता श्रेष्ठ होय ' असें म्हणून आचार्याचे ठिकाणींही अतिशयितत्व तितकेंच सांगितलें आहे. गौतमानेंही 'आचार्यः श्रेष्ठो गुरूणाम्' असें म्हटलें आहे. शिवाय पुनः असें कीं, नुसत्या अतिशयितत्वामुळेंच जर गुरुत्व ठरवावयाचें ह्मटलें तर माता पित्याहूनही सहस्रगुण श्रेष्ठ असल्यामुळें तिलाच मुख्य गुरु म्हणावें लागेल. तस्मात् वर सांगितलेले सर्व गुरु आहेत, व त्यांच्या भार्येशीं गमन करणें हें गुरुतल्पगमनरूप महापातक आहे, असेंच म्हणणें उचित दिसतें.

**समाधान**--निषेकादि करणाराच मुख्य गुरु आहे व तो जनकच होय. दुसऱ्या कोणालाही निषेकादि अधिकार नसतो. आतां व्यास-गौतमादिकांचीं जीं वचनें वर दिलीं

आहेत तीं परिचर्या, पूजा इत्यादि विधींचीं शेष असल्यामुळें स्तुत्यर्थ आहेत. तस्मात् गुरुत्व प्रतिपादक ' निषेकादीनि कर्माणि ' या मनुवचनाच्या अनुरोधानें पित्यालाच मुख्य गुरुत्व आहे, हा सिद्धान्त ठरतो. म्हणूनच वसिष्ठानेंही ' आचार्यपुत्रशिष्यभार्यासु चैवम् ' असें म्हणून आचार्यभार्यागमन हेंही गुरुतल्पगमनवत् आहे, असा अतिदेश करून प्रायश्चित्त सांगितलें आहे. आचार्यच जर गुरु असता तर तें पृथक् सांगण्याचें कारणच नव्हतें. जातुकर्ण्यादिकांनींही ' आचार्यादेस्तु भार्यासु गुरुतल्पव्रतं चरेत् ' असें म्हटलें आहे. अर्थात् आचार्यादिकांना जर मुख्य गुरुत्व असतें तर गुरुशब्दानेंच त्यांचा संग्रह झाल्यामुळें अतिदेश व्यर्थ झाला असता. ( अतिदेश म्हणजे एकदा सांगितलेल्या गोष्टीचा उल्लेख करून तिच्याप्रमाणेंच ही असें सांगणें ) संवर्तानें तर ' पितृदारान्समारुह्य मातृवर्जं नराधमः ' असें म्हणून पित्याच्या स्त्रीचा स्पष्टच उल्लेख केला आहे. षट्त्रिंशन्मतांतही ' पितृभार्यां तु विज्ञाय ' असें म्हटलें आहे. यास्तव, निषेकादिकर्ता पिताच मुख्य गुरु आहे. हें गुरुत्व चारी वर्णांतील लोकांना एकसारखेंच लागू आहे. कारण, निषेकादिकर्तृत्व हें सर्वांच्याच ठिकाणीं असतें. अर्थात् ' स विप्रो गुरुरुच्यते ' या वाक्यांतील विप्रशब्दाचा-उपलक्षणेनें सर्व वर्ण-असा अर्थ करावा. सारांश, पितृपत्नीगमन हेंच महापातक आहे. गमन या शब्दाचा अर्थ शेवटचा धातु सोडणें येथवर घ्यावा. अर्थात् चरमधातूच्या त्यागापूर्वी निवृत्त झाल्यास महापातकित्व नाहीं.

असो; या महापातकाचीं दोन मरणान्त प्रायश्चित्तें या श्लोकांत सांगितलीं आहेत. पण त्यांतील कोणतें तरी एक प्रायश्चित्त जननीचे ठायीं अज्ञानतः गमन घडल्यास व तिच्या सवर्ण अथवा उत्तम जातीच्या सवतीशीं ज्ञानतः गमन केल्यास आचरावें. कारण, षड्त्रिंशन्मतांत तसें सांगितलें आहे. जननीचे ठायीं कामतः गमन केल्यास वसिष्ठांच्या वचनाप्रमाणें सर्व केंस व लोम काढून सर्वांगास घृत माखून शेणींच्या अग्नीनें पायापासून आपणांस जाळून घ्यावें. अज्ञानतः जननीगमनाचा अभ्यास घडल्यासही हेंच प्रायश्चित्त करावें. ' मातुःसपत्नीं भगिनीं आचार्यतनयां० ' इत्यादि वचनांत अतिदेश केलेला असल्यामुळें मातृसपत्नीगमनाचें ( मातेच्या सवतीशीं गमन केल्याचें ) औपदेशिक ( साक्षात् वचनानें उपदेशिलेलें ) प्रायश्चित्त अयुक्त आहे, असें कोणी म्हणेल तर तें बरोबर नाहीं. कारण, वरील षट्त्रिंशन्मतांत ' पितृभार्यां तु विज्ञाय सवर्णां योऽधिगच्छति ' असें म्हणून सवर्ण पितृभार्येचें ग्रहण केलेलें असल्यामुळें हें वरील आतिदेशिक वाक्य हीनवर्णाच्या सपत्नीविषयीं आहे. हें गमनसुद्धां मुख्य पुत्राचेंच घ्यावें. कारण, इतर पुत्रांना खरें पुत्रत्व नसून नुस्तें पुत्रकार्यकरत्व असतें. मनूनें ( अ. ९ श्लो. १८० ) क्षेत्रजादि इतर अकरा पुत्रांस क्रियालोप होऊं नये म्हणून पुत्राचे प्रतिनिधि म्हटलें आहे. त्यांतल्यात्यांत दोघांच्याही इच्छेनें हें निंद्य कर्म घडल्यास पहिलें ( तप्तायःशयन) प्रायश्चित्त, व स्वतः पुत्रानेंच त्याला प्रोत्साहन दिल्यास दुसरें ( वृषण कापून ओंझळीत घेऊन नैर्ऋत्येस जाणें ) कारण, निमित्ताच्या अधिकतेमुळें प्रायश्चित्तही गुरु होत असतें. पण स्त्रीनें आपण होऊन प्रोत्साहन दिलेलें असल्यास मनूनें सांगितलेल्या-तप्तलोहशयन व लोखंडाच्या तापवून लाल केलेल्या मूर्तीला आलिंगन-या दोन प्रायश्चित्तांतील कोणतें तरी एक करवावें. शंखानें ' अधःशायी जटाधारी० ' इत्यादि वचनानें जें द्वादशवार्षिकव्रत

सांगितलें आहे तें समवर्णाच्या किंवा उत्तमवर्णाच्या पितृपत्नीशीं गमन केल्यास किंवा अकामतः गुरुभार्यागमन झाल्यास जाणावें. तिच्याशींच कामतः प्रवृत्त होऊन रेतःसेकाच्या पूर्वी निवृत्त झाल्यास षड्वार्षिकव्रत, अकामतः प्रवृत्त होऊन चरम धातु सोडण्यापूर्वी निवृत्त झाल्यास त्रैवार्षिकव्रत, जननीच्या ठिकाणीं कामतः प्रवृत्त होऊन रेतःसेकाच्या पूर्वी निवृत्त झाल्यास द्वादशवार्षिकव्रत व अकामतः प्रवृत्त होऊन तत्काल निवृत्त झाल्यास सहा वर्षांचें व्रत कल्पावें. संवर्तानें ' पितृदारान्समारुह्य मातृवर्जं नराधमः ' इत्यादि वचनानें नुसत्या समारोहणाचेंच जें तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त सांगितलें आहे तें हीन वर्णाच्या गुरुभार्येशीं गमन करण्यास प्रवृत्त होऊन रेतःसेकापूर्वी निवृत्त झाल्यास, त्याकरितां जाणावें २५९.

आतां दुसरें प्रायश्चित्त सांगतात—

**प्राजापत्यं चरेत्कृच्छ्रं समा वा गुरुतल्पगः ।**
**चान्द्रायणं वा त्रीन्मासानभ्यसेद्वेदसंहिताम् ॥ २६० ॥**

अथवा गुरुतल्पग पुरुषानें पुढें सांगितलेलें प्राजापत्य तीन वर्षें करावें. पण हें प्रायश्चित्त ब्राह्मणीपुत्रानें शूद्रजातीच्या गुरुभार्येशीं बुद्धिपूर्वक गमन केल्यास जाणावें. जेव्हां एकादा पुरुष सवर्ण पण व्यभिचारिणी गुरुभार्येशीं अबुद्धिपूर्वक गमन करतो तेव्हां त्यानें वेदजपासह तीन चांद्रायणें करावीं. पण तिच्याशींच कामतः प्रवृत्त झाल्यास उशनानें सांगितलेलें एक संवत्सर ब्रह्मह्व्रत किंवा सहा महिने तप्तकृच्छ्र करावें. बुद्धिपुरसर क्षत्रियाजातीच्या गुरुभार्येशीं गमन केल्यास याज्ञवल्क्यानें सांगितलेलें नववार्षिकव्रत करावें. हें आतिदेशिक प्रायश्चित्त सवर्णगुरुभार्यागमनास लागू नाहीं. कारण, सवर्णगुरुभार्येशीं कामतः गमन केल्यास मरणान्तिक व अज्ञानतः गमन झाल्यास द्वादशवार्षिकव्रत विहित आहे. यास्तव, नववार्षिकव्रत क्षत्रिया गुरुभार्येकरितांच असणें युक्त होय. पण त्याच क्षत्रिया गुरुभार्येशीं कामतः वारंवार गमन केल्यास अंडसहित लिंगच्छेदनपूर्वक मरणान्त प्रायश्चित्त करावें, असें ' मत्या गत्वा पुनर्भार्यां गुरोः क्षेत्रसुतां द्विजः ' इत्यादि वचनांत कण्वानें सांगितलें आहे.

पण या निमित्तानें प्राप्त झालेलें प्रायश्चित्त करण्याची ज्याची इच्छा नसते ' त्याचें लिंग तोडून वध करावा व त्याच्याशीं स्वेच्छेनें रत होणाऱ्या स्त्रीचाही वध करावा.' या याज्ञवल्क्याच्या वचनांत सांगितलेला वधरूप दंड जाणावा. वैश्यजातीच्या गुरुभार्येशीं कामतः गमन केल्यास सहा वर्षांचें व्रत व शूद्रा गुरुभार्येशीं गमन केल्यास त्रैवार्षिक करावें. कारण, एका स्मृतींत तसें स्पष्ट सांगितलें आहे. याच न्यायानें क्षत्रियेच्या पुत्रानें वैश्या गुरुभार्येशीं गमन केल्यास नववार्षिक ( नऊ वर्षें ) व शूद्रा गुरुस्त्रीशीं गमन केल्यास षड्वार्षिकव्रत करावें. वैश्यापुत्राच्या प्रायश्चित्ताची अशीच कल्पना करावी. परंतु वैश्या गुरुपत्नीशीं कामतः वारंवार गमन केल्यास मरणान्त व शूद्रेशीं तसेंच केल्यास द्वादशवार्षिक, क्षत्रिय गुरुभार्येशीं अकामतः गमन केल्यास, त्रैवार्षिक व्रत व आठव्यावेळीं ( दिवसाचे आठ भाग करून त्यांतील शेवटच्या भागीं ) भोजन हें यथोक्त प्रायश्चित्त करावें. पण त्याचाच अभ्यास केल्यास जातुकर्ण्यानें सांगितल्याप्रमाणें अंडमात्र छेद करून नंतर तो जिवंत असला

किंवा मेला तरी शुद्ध होतो. वैश्या गुरुभार्येशीं अकामतः गमन केल्यास याज्ञवल्क्यांनीं सांगितल्याप्रमाणें प्राजापत्य कृच्छ्र करावें. वृद्ध मनूनेंही ' अकामतः गुरुभार्येशीं अथवा पितृभार्येशीं गमन केल्यास तीन वर्षेपर्यंत नित्यकृच्छ्र करीत रहावें.' असें म्हटलें आहे. त्याचाच अभ्यास घडल्यास हारीतानें सांगितलेलें मरणान्तिक ब्रह्मचर्य पाळावें. शूद्रजातीच्या गुरुभार्येशीं अकामतः गमन केल्यास मनूनें ( अ. ११ श्लो. १०५ ) सांगितलेलें–शरीरावर ब्रह्महत्येचें चिह्न करणें, वल्कलें नेसणें, केंस, नखें, श्मश्रु वाढविणें व मनाचें संयमन करून एक वर्षभर निर्जन वनांत राहणें, हें व्रत करावें. अथवा सुमन्तूनें सांगितल्याप्रमाणें–एकवर्षभर कांटेऱ्या झाडाच्या शाखेस आलिंगन देऊन, भूमीवर शयन करून, त्रिकालस्नान व भैक्ष्यचर्या करावी. परंतु, शूद्रागुरुभार्येशीं अकामतः गमनाचा अभ्यास झाल्यास मनूनें ( अ. ११ श्लो. १०६ ) म्हटल्याप्रमाणें इंद्रियांचें संयमन करून तीन महिने चांद्रायण करावें. क्षत्रिया गुरुभार्येशीं कामतः प्रवृत्त होऊन रेतःसेकापूर्वी निवृत्त झाल्यास व्याघ्रानें सांगितल्याप्रमाणें तीन महिने कृच्छ्र, अतिकृच्छ्र व कृच्छ्रातिकृच्छ्र व्रत करावें. पण या वचनाची अशी व्यवस्था करावी–तिनें प्रोत्साहन दिल्यास त्रैमासिक प्राजापत्य करावें. दोघांच्याही इच्छेनें प्रवृत्ति झाल्यास तीन महिने अतिकृच्छ्र करावें, व स्वतः पुरुषानेंच तिला प्रोत्साहन दिल्यास त्रैमासिक कृच्छ्रातिकृच्छ्र करावें. पण त्याच क्षत्रियेच्या ठिकाणीं कामतः प्रवृत्त होऊनही रेतःसेकाच्या पूर्वी निवृत्त झाल्यास वर सांगितलेल्या तीन अवस्थांमध्यें क्रमानें कण्वोक्त अतिकृच्छ्र, तप्तकृच्छ्र व चांद्रायण हीं तीन प्रायश्चित्तें करावीं.

वैश्या गुरुपत्नीचे ठिकाणीं कामतः प्रवृत्त होऊन रेतःसेकापूर्वी निवृत्त झाल्यास कण्वानें सांगितलेलें तप्तकृच्छ्र, पराक व सांतपन हीं तीन प्रायश्चित्तें जाणावीं. दोघांच्या इच्छेनें प्रवृत्ति झाल्यास तप्तकृच्छ्र, पुरुषानें स्वतः प्रोत्साहन दिल्यास पराक व तिनें प्रोत्साहन दिल्यास सांतपन, अशी त्यांची व्यवस्था लावावी. पण त्या वैश्या गुरुपत्नीच्या ठिकाणींच अबुद्धिपूर्वक गमन केल्यास प्रजापतीनें द्विजाला पंचरात्र, सप्तरात्र व अष्टरात्र उपवास करावयास सांगितलें आहे. या तीन पक्षांचीही क्रमानें तिनें प्रोत्साहन देणें, दोघांच्या इच्छेनें प्रवृत्त होणें व पुरुषानें प्रोत्साहन देणें, या तीन पक्षीं योजना करावी. आतां शूद्रा गुरुभार्येच्या ठिकाणीं कामतः प्रवृत्त होऊन रेतःसेकाच्या पूर्वी निवृत्त झाल्यास जाबालीनें वरील तीन प्रसंगीं क्रमानें अतिकृच्छ्र, तप्तकृच्छ्र व पराक हीं तीन प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. पण तेंच तिच्याशीं अकामतः गमन केल्यास वरील तीन अवस्थेंत प्राजापत्य, सांतपन व सप्तरात्रोपवास, हें दीर्घतमानें सांगितलेलें प्रायश्चित्त करावें, याच दिशेनें दुसऱ्याही स्मृतिवचनांची व्यवस्था लावावी.

पुरुषांप्रमाणें स्त्रियांनाही असल्या कर्मांनीं महापातकित्व येतें. म्हणूनच योगीश्वरानें पुरुषांना मरणान्तिक प्रायश्चित्त सांगून सकाम स्त्रियांनांही मरणान्तिक सांगितलें आहे. अकाम स्त्रियांना मनूनें षड्वार्षिकव्रत सांगितलें आहे. आतां वर ( श्लोक २३१–२३ ) गुरुभार्यासम व गुरुतल्पवत् असें म्हणून जीं प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत त्यांतील गुरुभार्यासम पापांचें

एकरात्रीहून अधिक अभ्यास घडल्यास षड्वार्षिक व गुरुभार्यावत् पापांचें नववार्षिक प्रायश्चित्त करावें. पण त्यांचाच कामतः अत्यंत अभ्यास केल्यास मरणान्तिक प्रायश्चित्त जाणावें. कारण बृहद्यमानें ' कुमारी, सगोत्रजा, अन्त्यजा, सपिण्डा व स्नुषा यांच्या ठिकाणीं रेतःसेक केल्यास मरणान्त प्रायश्चित्ताचें विधान केलेलें आहे, ' असें म्हटलें आहे. ' चांडाल, श्वपच ( कुत्र्याचें मांस शिजवून खाणारे ), क्षत्ता, सूत, वैदेहिक, मागध व अयोगव. हे सात अन्त्य होत. त्यांच्यापासून झालेल्या कन्या अन्त्यजा, असें मध्यमांगिरानें म्हटलें आहे. धोबी, चांभार इत्यादिकांना येथें अन्त्य म्हटलेलें नाहीं. कारण त्यांच्या कन्यांशीं गमन करणारास लघु प्रायश्चित्त सांगितलेलें आहे. तसेंच मनूनें ( अ. ११ श्लो. १७५ ) 'चांडाल व अन्त्यज यांच्या स्त्रियांशीं अज्ञानतः गमन करणारा, त्यांचें अन्न खाणारा व त्यांच्यापासून प्रतिग्रह घेणारा ब्राह्मण पतित होतो व ज्ञानतः हे वरील प्रकार केल्यास तो त्यांच्या जातीचा होतो.' असें म्हणून कामतः अत्यंताभ्यास करणारास मरणान्तिक सुचविलें आहे. सारांश, अज्ञानानें चांडालीगमनाचा अभ्यास झाल्यास पुरुष पतित होतो. यास्तव, त्यानें पतिताचें द्वादशवार्षिक प्रायश्चित्त करावें. कामतः अत्यंताभ्यास केल्यास चांडालादिकांशीं साम्य पावणाऱ्या त्यानें त्याहून अधिक म्हणजेच मरणान्तिक प्रायश्चित्त करावें. पण हें म्हणणें बहुकाल घडलेल्या अभ्यासास उद्देशून आहे. एकरात्राभ्यासाचें वर्षत्रय प्रायश्चित्त मनूनें सांगून ठेवलेलेंच आहे. ( मनु. अ. ११ श्लो. १७८ पहा. ) मनूच्या त्या वचनांत ' वृषलीसेवनाद्द्विजः ' असें म्हटलें आहे, त्यांतील वृषलीशब्दानें चांडाली सांगितली आहे. कारण, दुसऱ्या एका स्मृतींत ' चांडाली, स्वैरिणी, वेश्या, रजःस्था व सगोत्र विवाहित या पांच वृषली होत, ' असें सांगितलें आहे.

आतां अभ्यासाचें ज्ञान कसें होणार ? म्हणून कोणी विचारील तर सांगतों—' यत्करोत्येकरात्रेण ' येथील तृतीया अत्यंत संयोगाची वाचक आहे. पण एका रात्रींत अत्यंत संयोग गमनाच्या अभ्यासावांचून शक्य नाहीं. यास्तव, अनेकदां समागम करणें, हाच अभ्यास होय. म्हणूनच एक रात्रीहून अधिक काल अभ्यासास उद्देशून द्वादशवर्षादि (गुरुतल्पव्रतातिदेशिक) व मरणान्तिक प्रायश्चित्त पूर्वी सांगितलेलें आहे. पण जेव्हां पुरुष ज्ञानतः किंवा अज्ञानतः चांडाली प्रभृतींशीं एकदांच गमन करितो तेव्हां क्रमानें एक वर्षभर कृच्छ्र किंवा दोन चांद्रायणें करावीं. भगिनीप्रभृति आपल्या कुलांतील स्त्रियांशींही ज्ञानतः गमन केल्यास संवत्सर कृच्छ्र व अज्ञानतः गमन केल्यास दोन चांद्रायणें हेंच प्रायश्चित्त समजावें. ' जननी, भगिनी, आपली कन्या व सून यांच्याशीं गमन करणाऱ्या अति पाप्यांनीं अग्नींत प्रवेश करावा ' असें कात्यायनानें सांगितलेलें असल्यामुळें येथील मरणान्तिक प्रायश्चित्त म्हणजे अग्निप्रवेशच समजावा. पण जननीच्या ठिकाणीं एकदां व भगिनीशीं अनेकदां गमन केल्यास अग्निप्रवेश करावा. कारण, त्यांतील पहिलें महापातक असून दुसरें त्याच्या अतिदेशभूत अतिपातक आहे. यास्तव, दोघींशींही एकदां गमन एकाच प्रायश्चित्ताला योग्य होणार नाहीं. बृहद्यमानें चांडाली, पुल्कसी, म्लेच्छी, स्नुषा, भगिनी, सखी, आते, मावशी, रक्षणाकरितां ठेवलेली,

शरण आलेली, मामी, संन्याशीण, स्वगोत्राची, राजभार्या, शिष्यभार्या, गुरुभार्या इत्यादि॰ कांशीं गमन केल्यास चांद्रायण करावें,' असें व अंगिरानें 'पतित व अन्त्यज यांच्या स्त्रियांशीं गमन करून आणि भोजन व प्रतिग्रह करून मासोपवास किंवा चांद्रायण करावें.' असें जें सांगितलें आहे तें गुरुतल्पातिदेशाचा विषय झालेल्या स्त्रियांपाशीं कामतः प्रवृत्त होऊन रेतःसेक होण्यापूर्वीं निवृत्त झालेल्या पुरुषास उद्देशून आहे, असें जाणावें. पण या वरील स्त्रिया अत्यंत व्यभिचारिणी असून त्यांच्याशीं जर कोणी कामतः गमन केलें तर चांद्रायण व अकामतः गमन केलें तर तप्तकृच्छ्र करावें. वेश्याप्रभृति साधारण स्त्रियांचा गुरूंनीं उपभोग घेतलेला असून त्यांचा पुनः पुत्रांनीं घेतल्यास त्यांत गुरुतल्पगमन दोष नाहीं. कारण, व्याघ्रानें तसें स्पष्ट सांगितलें आहे. याच दिशेनें दुसरींही–उच्च नीच (गुरु-लघु) प्रायश्चित्तांचें प्रतिपादन करणारीं–स्मृतिवाक्यें हुडकून त्यांची व्यवस्था लावावी. ग्रंथगौरव-भयानें आम्ही तीं लिहीत नाहीं २६०.

इति गुरुतल्पप्रायश्चित्तप्रकरणम् ४.

याप्रमाणें ब्रह्महा-प्रभृति चारी महापातक्यांचीं प्रायश्चित्तें सांगून आतां प्रसंगप्राप्त त्यांच्याशीं संसर्ग ठेवणाराचें प्रायश्चित्त सांगतात—

**एभिस्तु संवसेद्यो वै वत्सरं सोऽपि तत्समः ।**

या पूर्वोक्त ब्रह्महादिकांबरोबर एक वर्षभर जो सतत व अगदीं निकट वास करतो तोही त्यांच्यासारखाच होतो. अर्थात् जो ज्याच्यासह आचरण करतो त्यानें त्याचेंच प्रायश्चित्त करावें, या न्यायानें त्याला त्यांच्या प्रायश्चित्ताचा अतिदेश करण्यासाठीं श्लोकांत 'तत्समः' म्हणजे त्यांच्यासारखा असें म्हटलें आहे. पातकत्वाचा अतिदेश करण्यासाठीं नव्हे. कारण, पातकत्वाचा अतिदेश 'यश्च तैःसह संवसेत्' या २२७ श्लोकाच्या चवथ्या चरणानेंच सिद्ध झालेला आहे. असो; येथें अतिदेशत्व जरी असलें तरी महापातक्यांशीं संसर्ग ठेवणाराला साक्षात् महापातकित्व असल्यामुळें त्यानें संपूर्ण द्वादशवार्षिकव्रत करावें. 'सोऽपि' येथें अपि शब्द असल्यामुळें केवल महापातक्यांशीं संसर्ग करणाराच नव्हे तर अतिपातकी, पातकी, उपपातकी इत्यादिकांतील जो ज्याच्याशीं संसर्ग करतो तोही त्याच्यासारखाच होतो. यास्तव, त्यानेंही त्याचेंच प्रायश्चित्त करावें. म्हणूनच मनूनें सकल प्रायश्चित्त सांगून (अ. ११ श्लो. १८१) 'जो मानव यांतील ज्या पतिताशीं संसर्ग पावतो त्यानें आपल्या संसर्गशुद्धीकरितां त्याचेंच व्रत करावें,' असें सांगितलें आहे. विष्णूनेंही सामान्यतः उपपातक्यादि पापवानाशीं संसर्ग झाला असतां प्रायश्चित्त-पात्रत्व सांगितलें आहे. एवढ्यासाठींच मनूनें सामान्यतः सर्व पाप्यांचा प्रतिषेध केला आहे. (अ. ११ श्लो. १८९ पूर्वार्ध पहा.) तसेंच प्रायश्चित्त केलें तरी सज्जनाशीं संसर्ग करूं नये, असेंही म्हटलें आहे. असो; हें द्वादशवार्षिकादि पतितप्रायश्चित्त बुद्धिपूर्वक संसर्ग केल्यास त्याविषयीं आहे. कारण, देवलानें 'पतितेन सहोषित्वा जानन्॰' असें म्हणून बुद्धिपूर्वक संसर्गाचा विशेषतः उल्लेख केला आहे. अज्ञानतः संसर्ग झाल्यास वशिष्ठानें सांगितल्याप्रमाणें

पतितांपासून प्राप्त झालेलें धनादि टाकून व त्यांचा संसर्ग सोडून उत्तरेकडे जावें. संहितेचा पाठ व उपोषण करावें. असो; पूर्वोक्त चार महापातक्यांशीं संसर्ग करणारेच महापातकी होत, असें म्हटलेलें असल्यामुळें त्यांच्याशीं पुनः संसर्ग करणारे तिसरे महापातकी ठरत नाहींत.

पण यावर कोणी म्हणेल कीं, महापातक्यांचा संसर्गच महापातकित्वाचा हेतु आहे. ब्रह्महा, सुराप इत्यादि चौघांशीं संसर्ग होणें, एवढाच नव्हे. अर्थात् ब्रह्महा इत्यादिकांशीं संसर्ग पावलेल्यांशींही संसर्ग करणारे महापातकी होतात. हे होत नाहींत, असा प्रतिषेधही कोठें आढळत नाहीं. परंतु तें बरोबर नाहीं. कारण, महापातकित्व हें जर दुसऱ्या प्रमाणांनीं गम्य असतें तर तसें झालें असतें. पण तें केवळ शब्द (शास्त्र) गम्य आहे. यास्तव, नुसत्या तर्कानें तुम्हीं समजतां तसें होणार नाहीं. शब्दांवरून तर केवळ त्यांच्याशीं संसर्ग करणारांना महापातकित्व येतें, एवढेंच कळत आहे. महापातक्यांशीं संसर्ग करणारांशीं संसर्ग करणारे महापातकी होत नाहींत, असा प्रतिषेध नसल्यामुळें ते महापातकीच आहेत असें म्हणणें योग्य नव्हे. कारण, प्राप्ति असल्यावाचून कशाचाही निषेध होत नाहीं. यास्तव, संसर्ग्यांशीं संसर्ग करणाऱ्यांच्या द्विजातिकर्मांची हानि होत नाहीं. प्रायश्चित्त मात्र अवश्य करावें लागतें. त्यांना जर पातित्य नाहीं, तर प्रायश्चित्त तरी कां ? म्हणून म्हणाल तर सांगतों—मनूनें 'प्रायश्चित्त करून शुद्ध न झालेल्या पाप्याशीं कोणत्याहि प्रकारचा व्यवहार करूं नये' असें म्हणून सामान्यतः पापवानांच्या संसर्गाचा निषेध करून त्याच्या द्वाराच महापातकिसंसर्गींच्या संसर्गाचाही निषेध केलेला असल्यामुळें पातित्य जरी न आलें तरी प्रायश्चित्त करणें युक्तच आहे. तेंही पाऊणपट करावें. कारण, व्यासानें तसें सांगितलें आहे. याच न्यायानें पतितसंसर्गींशीं संसर्ग करणाऱ्याबरोबर संसर्ग करणाऱ्या चवथ्या पुरुषाला त्याच्या अर्धें, पांचव्याला चतुर्थांश इत्यादि जाणावें. यास्तव, ब्रह्महा, सुराप इत्यादिकांशीं साक्षात् संसर्ग करणारालाच त्याच्या प्रायश्चित्ताचा अधिकार आहे. त्याच्याशीं संसर्ग करणाऱ्या तिसऱ्या पुरुषाला नाहीं, हें सिद्ध झालें.

ब्रह्महा—प्रभृति महापाप्यांना त्यांच्या इच्छेप्रमाणें मरणान्तिक प्रायश्चित्तही जरी सांगितलें आहे तरी त्यांच्याशीं संसर्ग करणाराला उद्देशून त्याचाच अतिदेश केलेला नाहीं तर 'स तस्यैव व्रतं कुर्यात्' असें म्हणून व्रताचाच अतिदेश केला आहे आणि मरणाला तर व्रत म्हणतां येत नाहीं. यास्तव, महापातक्यांशीं बुद्धिपुरःसर संसर्ग केल्यास द्वादशवार्षिकव्रत व अबुद्धिपुरःसर घडल्यास त्याच्या अर्धें. असो; हा संसर्ग अनेकप्रकारचा आहे. वृद्धबृहस्पतीनें—एकशय्येवर बसणें, एक पंक्ति, एका भांड्यांत शिजविणें, अन्नमिश्रण, याजन, अध्यापन, विवाहसंबंध व सहभोजन, असा नऊ प्रकारचा संकर सांगितला आहे. तो अधमांसह करूं नये, असें म्हटलें आहे देवलानेंही संभाषण, स्पर्श, निःश्वास, सहगमन, आसन, शयन, याजन, अध्ययन व विवाहसंबंध यांच्या योगानें एकाचें पाप दुसऱ्याचे ठिकाणीं जातें, असें सांगितलें आहे. ( एका खाटेवर बसणें, एका पंक्तींत बसून भोजन करणें, एकाच भांड्यांत दोघांचें अन्न शिजविणें, आपलें अन्न त्याला देऊन त्याचें आपण घेणें ( त्याचें अन्न खाणें, हा भावार्थ) पतिताकडून आपलें याजन करविणें किंवा स्वतः त्याचें याजन करणें, त्याला वेदाध्ययन सांगणें

अथवा त्याच्यापासून स्वतः शिकणें, त्याला कन्या देणें अथवा त्याची कन्या करणें व एका पात्रांत दोघांनीं भोजन करणें, त्याचप्रमाणें संभाषण, अंग रगडणें, पतिताच्या तोंडाच्या वायूशीं संपर्क करणें, अश्वादि एका वाहनावर बसून जाणें, असा वरील शब्दांचा स्पष्टार्थ आहे.

असो; पण यांतील कोणत्या कर्मानें किती काल पातित्य प्राप्त होतें, अशी आकांक्षा राहूं नये म्हणून विष्णूनें असें सागितलें आहे.—एका पंक्तींत बसून भोजन करणें व एका यानांतून जाणें, एका शय्येवर बसणें, ह्या क्रिया पतितावरोबर करणारा एका वर्षानें पतित होतो. पण विवाहसंवंध, याजनसंवंध व अध्यापनसंवंध यांच्यायोगानें पुरुष तत्काल पतित होतो. कारण, देवलानें तसें सांगितलें आहे. विवाहादिसंबंध हे पृथक् पतनहेतु आहेत. व एकशय्यासनादिक सर्व मिळून पतनाचे हेतु होतात. पण त्यांतील प्रत्येक पतनाचा हेतु जरी नसला तरी दोषोत्पादक आहेत. कारण, पराशरानें आसन–शयन–भोजन–यान–संभाषण, इत्यादिकांच्या योगानें पापें जलांतील तेलाच्या थेंबाप्रमाणें पसरतात ( एकांतून दुसऱ्यामध्यें जातात ), असें म्हणून तीं स्वतंत्रपणें पापांची निमित्तें होतात, असें सुचविलें आहे. संभाषण, स्पर्श व निःश्वास यानादि चतुष्टयाशीं आनुषंगिक असल्यामुळें त्या सर्वांना मिळूनच पतनहेतुत्व आहे; एकेकाला नाहीं. कारण, सहयान ( गमन करणें ), भोजन, आसन व शयन यांतील कोणतेंही एक कर्म हें अल्प पाप आहे. त्यामुळें तें पतनाचें निमित्त होऊं शकत नाहीं, पापाचें कारण मात्र होतें. यास्तव संभाषणादि न करितां नुस्तें सहगमनादि केल्यास द्वादशवार्षिकव्रतांतील पांचवा भाग कमी करून बाकीचीं वर्षें व्रत करावें. पण संभाषणादिकांसह यानादि केल्यास पूर्ण द्वादशवार्षिक प्रायश्चित्तच अवश्य आहे आणि अशी अवस्था असल्यामुळें यांच्यासह एक वर्षभर जो राहतो तोही त्यांच्यासारखाच होतो, असें जें योगीश्वराचें वचन आहे तें सहयानादिपरच आहे. तात्पर्य, संभाषणादिकांना पृथक् पातित्यहेतुत्व नाहीं. म्हणूनच मनूनें ( अ. ११ श्लो. १८० ) ‘ यान, आसन व शयन यांच्या योगानें पतिताशीं व्यवहार करणारा एका वर्षानें पतित होतो. पण याजन, अध्यापन व यौन ( विवाह ) संबंध यांच्या योगानें पुरुष तत्काल पतित होतो, ’ असें म्हटलें आहे, यास्तव, यौनादि चार संबंधांनीं पुरुष तत्काल पतित होतो व यानादि चार कर्मांचा एकसारखा वर्षभर अभ्यास केल्यास तो पतित होतो असें जाणावें. ‘ वत्सरं सोऽपि तत्समः ’ असें या श्लोकांत म्हटलेलें असल्यामुळें व ‘ वत्सरं ’ ही अत्यंत संयोगवाचिनी द्वितीया असल्यामुळें अंतरित दिवसांची गणना करावी. तीनशें साठ दिवस संसर्ग झाला पाहिजे. त्यांहून न्यून संसर्ग झाल्यास पतित प्रायश्चित्त करणें योग्य नव्हे. तर त्याकरितां दुसरेंच केलें पाहिजे. पराशरानें त्याविषयीं असें सांगितलें आहे. पतिताशीं अबुद्धिपुरःसर पांच दिवस संसर्ग करणारानें त्रिरात्र प्रायश्चित्त, दहा दिवस संसर्ग करणारानें कृच्छ्र; बारा दिवस संसर्ग करणारानें सांतपन पंधरा दिवस करणारानें दशरात्रव्रत, एक महिनाभर संसर्ग करणारानें पराक, तीन महिने संसर्ग करणारानें चांद्रायण, सहा महिने संसर्ग करणारानें दोन चांद्रायणें व एक वर्ष संसर्ग करणारानें सहा महिने कृच्छ्र करावें आणि त्यापुढें संसर्गः करणारा पतितासारखाच होतो. पण तोच

कामतः केल्यास सुमन्तूनें असें म्हटलें आहे–पांच दिवसांच्या संसर्गास कृच्छ्र, दहा दिवसांच्या संसर्गास तप्तकृच्छ्र, अर्धमास संसर्ग केल्यास पराक, मास संसर्गास चांद्रायण, तीन महिने बुद्धिपुरःसर संसर्ग घडल्यास कृच्छ्र व चांद्रायण, सहा महिने घडल्यास अर्धाब्द कृच्छ्र व एक वर्ष संसर्ग झाल्यास अब्द चांद्रायण करावें. या दोन्ही वचनांतील एक वर्ष संसर्ग याचा अर्थ एका वर्षाहून किंचित् न्यून असा समजावा. कारण, संपूर्ण एक वर्ष संसर्ग झाला असतां मन्वादिकांनीं द्वादशवार्षिकव्रत सांगितलें आहे.

आतां बृहस्पतीनें ' याजन, अध्यापन, यौनसंबंध, एकपात्रभोजन इत्यादिकांच्या योगानें सहा महिने पतिताशीं संसर्ग घडल्यास अर्धे प्रायश्चित्त करावें ' असें जें सांगितलें आहे तें अबुद्धिपुरःसर, अत्यंत आपत्तींत प्रायः पंचमहायज्ञादिकासारखें याजन, शिक्षा, व्याकरण इत्यादि अंगांचें अध्यापन, कन्या व भगिनी यांवाचून इतर योनिसंबंध यांस उद्देशून आहे, असें जाणावें. कारण, मुख्य याजनादि केल्यास सद्यःपातित्य सांगितलेलें आहे. असो; याच दिशेनें कामतः कन्या, भगिनी, स्नुषा यांच्याशीं गमन केलेल्या पतिताशीं संसर्ग करणारांस नववार्षिक प्रायश्चित्त व अकामतः त्यांच्याशीं संसर्ग करणारांस साडे चार वर्षे व्रत सांगावें. मित्राची स्त्री, चुलत्याची भार्या इत्यादिकांशीं गमन करणाऱ्या पतिताशीं कामतः संसर्ग करणारांस सहा वर्षें व अकामतः संसर्ग करणारांस त्रैवार्षिकव्रत सांगावें. उपपातकी प्रभृतींशीं कामतः संसर्ग केल्यास त्रैमासिक व अकामतः संसृष्ट झाल्यास त्याच्या अर्धे म्हणजे त्रैपाक्षिक जाणावें. महापातक्यांशीं संसर्ग केल्यानें पुरुषाप्रमाणें स्त्रियांनाही तसेंच पातित्य प्राप्त होतें. कारण, शौनकानें ' पुरुषांच्या पतनाचीं जीं निमित्तें तींच स्त्रियांच्या पतनाचींही आहेत, ' असें सांगितलें आहे. ब्राह्मणी हीनवर्णाच्या पुरुषाच्या सेवनानें अधिकच पतित होते. यास्तव, त्यांनाही महापातकिप्रभृतींतील ज्याच्याशीं संसर्ग होईल त्याचेंच अर्धे प्रायश्चित्त सांगावें. त्याचप्रमाणें बाल, वृद्ध व आतुर यांनींही कामतः संसर्ग केल्यास अर्धे व अकामतः संसर्ग घडल्यास पाद प्रायश्चित्त योजावें. अनुपनीत बालकानेंही कामतः संसर्ग केल्यास चतुर्थांश ( पाद ) व अकामतः पतितसंसर्ग केल्यास अर्धे प्रायश्चित्त योजावें. असो; आतां या श्लोकाच्या उत्तरार्धांत पतितसंसर्ग प्रतिषेधानें निषिद्ध झालेल्या यौनसंबंधाचा प्रतिप्रसव सांगतात——

## कन्यां समुद्वहेदेषां सोपवासामकिञ्चनाम् ॥ २६१ ॥

या पतिताच्या पतित अवस्थेंत उत्पन्न झालेल्या कन्येशीं विवाह करावा. पण तिच्याकडून उपवास व केलेल्या संसर्गकालास उचित प्रायश्चित्त हीं करवून विवाहसमयीं तिच्या पित्याचें वस्त्र, अलंकार इत्यादि कांहीं धन घेऊं नये. ' समुद्वहेत् ' असें म्हटलेलें असल्यामुळें जिनें पतित संसर्ग टाकला आहे , अशा कन्येचें वरानें स्वतः पाणिग्रहण करावें. तिच्या पित्यापासून प्रतिग्रह करूं नये. असें केल्यास पतितांच्या संसर्गाचा वर जो निषेध केला आहे त्याच्याशीं विरोध येत नाहीं. हाच अर्थ वृद्ध हारीतानें असा स्पष्ट केला आहे. वस्त्ररहित व अहोरात्र उपोषण केलेल्या पतिताच्या कुमारीस प्रातःकाळीं वरानें आपल्या अहत ( नव्या–

धुतलेल्या ) शुक्लवस्त्रानें आच्छादित करून तिच्याकडून ' मी त्यांची नव्हे ते माझे नव्हेत ' असें मोठ्यानें म्हणवावें. नंतर तीर्थाचे ठायीं अथवा स्वगृहीं तिच्याशीं विवाह करावा. ' एषां कन्यां ' असें ह्मणून योगीश्वर पतितांचीं कन्येवाचून इतर अपत्यें संसर्गास योग्य नाहींत, असें सुचवीत आहेत. वसिष्ठानेंही 'कन्येवांचून पतितानें उत्पन्न केलेला पतित होतो, कन्या मात्र परगामिनी असल्यामुळें पतित होत नाहीं. यास्तव , तिचें पाणिग्रहण धनावांचून करावें ' असें म्हटलें आहे २६१.

इति संसर्गप्रायश्चित्तप्रकरणम् ५.

निषिद्ध संसर्गाच्या प्रसंगानें निषिद्ध संसर्गानें उत्पन्न झालेल्या प्रतिलोम संततींतील एकाद्याचा वध केल्यास प्रायश्चित्त सांगतात--

## चान्द्रायणं चरेत्सर्वानवकृष्टान्निहत्य तु ।

अवकृष्ट म्हणजे सूतमागधादि प्रतिलोमोत्पन्न. त्यांतील प्रत्येकाला मारलें असतां चांद्रायण करावें. शंखानें सर्व जातींच्या अवकृष्टांना मारल्यास त्यांतील प्रत्येक वधाचें चांद्रायण प्रायश्चित्त करावें असें व अंगिरसानें सर्व अंत्यजांशीं गमन, भोजन व त्यांचा वध केल्यास पराक करावें, असें म्हटलें आहे. त्यांची व्यवस्था अशी–कामतः सूतादिकांस मारल्यास चांद्रायण व अकामतः सूताला मारल्यास पराक, वैदेहाला मारल्यास पादोन ( पाऊणपट ) पराक, चांडालाचा वध केल्यास अर्धें, मागधाला मारल्यास पादोन पराक, क्षत्त्याला मारल्यास द्विपाद ( अर्धें ) व आयोगवाला मारल्यासही द्विपाद पराक प्रायश्चित्त करावें. याच दिशेनें चांद्रायणाचेंही तारतम्य कल्पावें. ब्रह्मगर्भानें ' प्रतिलोम प्रसूत स्त्रियांचा वध केल्यास मासावधि व अंतरप्रभव सूतादिकांचा वध केल्यास चार, दोन व सहा मास प्रायश्चित्त करावें ' असें जें म्हटलें आहे तें त्या पापाची आवृत्ति केल्यास समजावें. सूतांना वारंवार मारल्यास प्रत्येक वधाचें षण्मास, वैदेहकवध केल्यास चार मास व चांडालवधाचें दोन मास व्रत करावें. त्याचप्रमाणें मागधवधाचें चार महिने, क्षत्त्याचें दोन महिने व आयोगव वधाचेंही तितकेंच प्रायश्चित्त जाणावें. आतां नैमित्तिक व्रतें जपादिकांनीं साध्य होणारीं असतात. यास्तव, अक्षरशत्रु शूद्रादिकांकडून तीं होणें शक्य नसतें. तस्मात् आज्यावेक्षण ( घृत पहाणें ) कर्मांत अंधाचा जसा अधिकार नसतो तसा या प्रायश्चित्तांचे ठिकाणीं शूद्रांचा अधिकार नाहीं अशी आशंका घेऊन सांगतात—

## शूद्रोऽधिकारहीनोऽपि कालेनानेन शुद्ध्यति ॥ २६२ ॥

जरी शूद्राला जपादिकांचा अधिकार नसला तरी द्वादशवार्षिकादि कालानें संपादन होणाऱ्या या व्रतानें तो शुद्ध होतो. येथील शूद्र हा शब्द प्रतिलोमज स्त्रियांचा उपलक्षक ( सूचक ) आहे. शिवाय शूद्र व स्त्रिया यांना गायत्रीमंत्राच्या जपाचा जरी संभव नसला तरी ' नमः शिवाय ' इत्यादि नमस्कारमंत्राच्या जपाचा संभव आहे. कारण, दुसऱ्या एका स्मृतींत ' अनुज्ञातोऽस्य नमस्कारो मन्त्रः ' असें म्हटलें आहे. किंवा या वचनबलानेंच त्यानें

जपादिकांवाचूनच व्रत करावें. अंगिरसानें ' धर्ममार्गांत स्थित असलेल्या शूद्राला जप-होम-रहित प्रायश्चित्त सांगावें ' असें म्हटलेंही आहे. त्याचप्रमाणें. ' गोब्राह्मणांच्या हितांत रत असलेला शूद्र कालानें, दानांनीं उपवासांच्या योगानें व ब्राह्मणांच्या शुश्रूषेनें शुद्ध होतो, ' असें त्यानेंच सांगितलें आहे. मनूनें ( अ. ४ श्लो. ८० ) त्याला व्रत व उपवास सांगूं नये, असें जें म्हटलें आहे तें स्वतः होऊन विचारावयास न आलेल्या शूद्राविषयीं आहे. ' कृच्छ्रें तीन वर्णांच्या लोकांनींच करावीं; तीं करण्याचा अधिकार शूद्राला नाहीं, ' असें जें एका स्मृतींत सांगितलें आहे तें काम्य कृच्छ्राविषयीं आहे, यास्तव, स्त्रिया, शूद्र व प्रतिलोमज यांना त्रैवर्णिकाप्रमाणेंच व्रताचा अधिकार आहे. ही गोष्ट सिद्ध झाली. प्रतिलोम जाति धर्महीन आहेत, असें जें गौतमाचें वचन आहे तें उपनयनादि विशिष्ट धर्मांविषयीं आहे २६२.

इति पंचमहापातकप्रायश्चित्तप्रकरणम् ६.

महापातकादि पंचविध पापांतील महापातक, अतिपातक व अनुपातक यांचीं प्रायश्चित्तें सांगून आतां उपपातकांचीं प्रायश्चित्तें सांगणारे योगीश्वर पाठक्रमाप्रमाणें प्रथम प्राप्त झालेल्या गोवधाचें प्रायश्चित्त प्रथम सांगतात—

**पञ्चगव्यं पिबेद्गोघ्नो मासमासीत संयतः ।**
**गोष्ठेशयो गोऽनुगामी गोप्रदानेन शुद्धयति ॥ २६३ ॥**
**कृच्छ्रं चैवातिकृच्छ्रं च चरेद्वापि समाहितः ।**
**दद्यात्त्रिरात्रं चोपोष्य वृषभैकादशास्तु गाः ॥ २६४ ॥**

गायीला जो मारतो तो गोघ्न. त्यानें एक मासपर्यंत गोमूत्र, गोमय, गोक्षीर, दहीं व घृत यांचें मिश्रण करून तेंच पीत रहावें. दुसरा कोणताही आहार न करितां भोजनाचें स्थानीं तें पीत रहावें. दिवसा निद्रा निषिद्ध आहे. यास्वत, रात्रीं गायींच्या गोठ्यांतच शयन करावें. गायींच्या मागून गमन करावें. हेंच त्याचें व्रत होय. यास्तव, रात्रीं ज्यांच्या समीप तो निजला असेल त्यांनाच प्रातःकाळीं सोडून वनांत जाणाऱ्या त्यांच्यामागून यानें गमन करावें. ' अनुगच्छेत् ' असें म्हटलेलें असल्यामुळें जेव्हां त्या जात असतील तेव्हां त्यांच्यामागून चालून त्या जेव्हां उभ्या राहतील किंवा बसतील तेव्हां अनुगमनाचा असंभव झाल्यामुळें त्यानेंही उभें रहावें किंवा बसावें. संध्याकाळीं त्यांच्या मागोमागच परत येऊन गोठ्यांत प्रवेश करावा. एक महिनाभर असें करून शेवटीं एक गाय दान दिल्यानें गोघ्न शुद्ध होतो. हें एक व्रत झालें.

दुसऱ्या प्रायश्चित्तांत ' गोष्ठेशयो गोऽनुगामी ' या पदांची अनुवृत्ति होऊन पंचगव्याहाराची निवृत्ति होते. कारण, कृच्छ्राचें पृथक् विधान केलें आहे. यास्तव, निरंतर एक महिनाभर सावधान चित्तानें कृच्छ्र करावें. हें दुसरें व्रत. जाबालानेंही ' अकामतः गायीचा वध घडल्यास एक मास प्राजापत्य करावें. गायींचें हित, अनुगमन व दान केल्यानें तो शुद्ध

होतो ' असें म्हटलें आहे. किंवा अतिकृच्छ्र करावें. हें तिसरें व्रत होय. कृच्छ्र, अतिकृच्छ्र इत्यादिकांचीं लक्षणें आतां पुढेंच सांगणार आहों. अथवा त्रिरात्र उपवास करून दहा गायी व अकरावा बैल यांचें दान द्यावें. हें चवथें व्रत. या चार व्रतांची व्यवस्था अशी–केवल जातीचा ब्राह्मण जिचा स्वामी आहे अशा सामान्य गायीला अबुद्धिपूर्वक मारल्यास त्रिरात्र उपवास करून दहा गायी व वृषभ यांचें दान करावें. गुणवान् ब्राह्मण जिचा स्वामी आहे, अशा गुणवती गायीचा वध केल्यास याहीपेक्षां गुरुप्रायश्चित्त पुढें सांगावयाचें आहे. क्षत्रियाच्या निर्गुण गायीला मारल्यास एक महिना पंचगव्य पिणें, इत्यादि पहिलें प्रायश्चित्त करावें. महिनाभर पंचगव्य पिणें हें अतिस्वल्प असल्यामुळें मासोपवासासारखेंच आहे. यास्तव, सहा सहा उपवासांनीं एकेका प्राजापत्याची कल्पना करून पांच प्राजापत्यांच्या प्रत्याम्नायानें पांच गायी व शेवटीं द्यावयाची एक अशा सहा गायी दिल्यानेंही शुद्धि होते. वरील अकरा गायींपेक्षां हें न्यूनही आहे. देव, ब्राह्मण व राजे यांचें द्रव्य उत्तम असतें, असें नारदानें म्हटलें आहे. यास्तव, ब्राह्मणाच्या गोवधापेक्षां क्षत्रियाच्या गायीच्या वधाचें प्रायश्चित्त न्यून असणें उचितच होय. वैश्याच्या गायीचा वध केल्यास एक मास अतिकृच्छ्र करावें. अतिरात्रींत पहिल्या नऊ रात्रीं हातभर अन्न खाणें व शेवटच्या तीन दिवस उपवास करावा लागतो. यास्तव अतिकृच्छ्रधर्मानें मासव्रत करूं लागलें असतां सहा दिवस उपवास पडतो व चोवीस दिवस हातांत मावेल तितकें अन्न खावयाचें असतें. परंतु कृच्छ्र प्रत्याम्नाय कल्पनेनें पांचापेक्षां कांहीं न्यून गायींच्या दानाची प्राप्ति होते व ती क्षत्रियाच्या गायीच्या वधाचें जें प्रत्याम्नाय प्रायश्चित्त सांगितलें होतें, त्याहून न्यून असल्यामुळें योग्यही आहे. तशाचप्रकारच्या शूद्राच्या गायीचा वध केल्यास वरील चार प्रायश्चित्तांतील दुसरें मासप्राजापत्य प्रायश्चित्त प्राप्त होतें. पण त्या अडीच प्राजापत्यांच्या प्रत्याम्नायानें दोन गायींपेक्षां कांहीं अधिक गायींच्या दानाची प्राप्ति होते व ती वैश्यगोवधाच्या प्रायश्चित्ताच्या अपेक्षेनें योग्यच आहे.

आतां या चारी प्रायश्चित्तांची योजना वर सांगितल्याप्रमाणें साक्षात् कर्ता, अनुग्राहक, प्रेरक व अनुमोदन देणारा, यांच्या ठिकाणीं करावी. विष्णूनें गोघ्नाला महिनाभर त्रिपलप्रमाण पंचगव्यप्राशन, पराक व चांद्रायण अशीं तीन व्रतें सांगितलीं आहेत. काश्यपानें ' मारलेल्या गायीचें चामडें पांघरून एक महिना गोठ्यांत शयन, त्रिकालस्नान व नित्य पंचगव्याहार ' असें प्रायश्चित्त सांगितलें आहे व शातातपानें एक महिना पंचगव्याचा आहार सांगितला आहे. पण तीं पांचीं व्रतें योगीश्वरांच्या पंचगव्याहारासारखींच आहेत. ( म्हणजे त्यांचा व याचा विषय एकच. ) शंख व प्रचेता यांनीं ' गोघ्नानें पंचगव्याहार करून पंचवीस दिवस उपवास करावा. शिखेसह वपन करावें. गायीचें चामडें पांघरावें. गायीच्या मागून गमन करावें. गोठ्यांत निजावें व गोप्रदान करावें ' असें जें सांगितलें आहे, तें याज्ञवल्क्यांनीं याच श्लोकांत सांगितलेल्या मासातिकृच्छ्र व्रतासारखें आहे. तीनरात्री उपोषण करून दहा गायी व एक बैल देणें हें गोघ्न अतिशय गुणी असल्यास त्याविषयीं जाणावें. पण एकादा पुरुष नुसत्या पंचगव्यावर रहावयास असमर्थ झाल्यास काश्यपानें सांगितल्याप्रमाणें ' त्यानें दूध पिऊन

गायींच्या मागून जाणें, त्यांना मारून पळावयास न लावणें, उंच जागीं किंवा अति खोल जागीं न नेणें, थोडक्या पाण्यांत नेऊन त्यांना पाणी दाखविणें व शेवटीं ब्राह्मणभोजन घालून तिलधेनु देणें ' हें व्रत करावें. पण हेंही करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषानें पैठीनसीनें सांगितल्याप्रमाणें एक महिना पसाभर तांदुळाची कण्हेरी पिऊन गायींचें प्रिय करावें.

पण सुमन्तूनें ' गोघ्नानें गोप्रदान, गोठ्यांत शयन, बारा अहोरात्र पंचगव्याशन व गायींचें अनुगमन करावें ' असें; संवर्तानें ' गोघ्नानें पंधरा दिवस शांत चित्तानें क्रमानें एकदां सातु, यव, भिक्षान्न, दूध, दहीं व घृत खावें व शेवटीं ब्राह्मणांस भोजन घालून गाय द्यावी,' व बृहस्पतीनें ' बारा अहोरात्र पंचगव्याचा आहार करावा,' असें जें सांगितलें आहे त्याचा व याज्ञवल्क्यांच्या मास-प्राजापत्याचा एकच विषय आहे. अथवा तें मेल्याप्रमाणें होऊन पडेपर्यंत गायीला मारल्यास, किंवा विषमप्रदेशीं नेऊन भय दाखविल्यामुळें किंवा कांहीं व्याधि उत्पन्न केल्यामुळें ती मेल्यास त्याविषयीं आहे, असें जाणावें. वर सांगितलेलें हें सर्व प्रायश्चित्त अबुद्धिपुरःसर घडलेल्या गोवधाविषयीं आहे.

परंतु, अशा प्रकारच्या सामान्य ब्राह्मणाच्या सामान्य गायीला बुद्धिपुरःसर मारल्यास मनूनें एक महिना कण्हेरी पिणें, दोन महिने चवथ्या प्रहरीं हविष्यान्न भोजन करणें, व तीन महिने दहा गायी व एक बैल यांचें दान देऊन शाकाहार करणें अशीं तीन व्रतें सांगितलीं आहेत. ( याविषयीं मनु. अ. ११ श्लो. १०८–११६ पहा.) त्यांचा व याज्ञवल्क्यांचें मास प्राजापत्य, मास पंचगव्याशन व दहा गायींचें दान यांचा विषय एकच आहे. अंगिरानें मनूच्या इति-कर्तव्यतेसह त्रैमासिकव्रत सांगून सहाव्या वेळीं अक्षारलवण भोजन, गोमती विद्या, ओंकार व वेद यांचा जप आणि दंड व मेखला यांचें ब्रह्मचर्यव्रताप्रमाणेंच धारण करावें, असें त्या-विषयींच अधिक सांगितलें आहे. किंवा तें त्याचें प्रायश्चित्त पुष्टि, तारुण्य, इत्यादि कांहीं अधिक गुणांनीं युक्त असलेल्या गायींविषयीं जाणावें. कारण, अति लहान, अति कृश, अति वृद्ध, रोगिणी इत्यादि प्रकारच्या गायीला मारल्यास द्विजानें अर्धे प्रायश्चित्त करावें, असें सांगितलें आहे. सामान्य ब्राह्मणाच्या सामान्य गायीला जर कोणी कामतः मारलें तर ' अकामतः केलेल्या दोषाला जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तेंच कामतः केलेल्या दोषाकरितां दुप्पट समजावें ' या विधानास अनुसरून वर सांगितलेलेंच मासातिकृच्छ्र व्रत दुप्पट करावें. हारीतानें मनूची–त्याच गायींचें चर्म परिधान करून–इत्यादि–इतिकर्तव्यता स्वतः सांगून, ' वृषभासह अकरा गायी देऊन गोघ्न तेराव्या महिन्यांत पवित्र होतो ' असें जें म्हटलें आहे तें सवनस्थ श्रोत्रियाच्या गायीचा अकामतः वध घडल्यास जाणावें. वसिष्ठानें षाण्मासिक कृच्छ्र व तप्त कृच्छ्र यांचें अनुष्ठान व देवलानें षाण्मासिक व्रत सांगितलें आहे. पण त्या दोन्हीं प्रायश्चित्तांचा व हारिताच्या प्रायश्चिताचा विषय एकच आहे. परंतु तोच वध बुद्धिपुरःसर केलेला असल्यास कात्यायनानें सांगितलेलें त्रैवार्षिक व्रत करावें. शंखानें सांगितलेल्या त्रैवार्षिकाचा व त्याचा विषय एकच. यमानें अंगिरसाची सर्व इतिकर्तव्यता सांगून सहस्र गायींच्या दानासह अथवा शंभर गायींच्या दानासह दोन महिन्यांचीं दोन प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत.

त्यांतील पहिलें प्रायश्चित्त कोणी धनवान् पण निर्गुण पुरुषानें खड्गादिकांच्या योगानें मोठ्या यत्नानें सवनस्थ, श्रोत्रिय, दरिद्र व बहुकुटुंबसंपन्न ब्राह्मणाच्या कर्मांगभूत, कपिला, गर्भिणी, तरुण, पुष्कळ दूध देणाऱ्या ( गुणसंपन्न ) गायीला मारल्यास, त्याला सांगावें. कारण, बृहस्पतीनें तसें म्हटलें आहे. प्रचेतानेंही 'गर्भिणी स्त्री, गर्भिणी गाय, बाल, वृद्ध इत्यादिकांचा वध करणारा भ्रूणहा होतो,' असें म्हणून व अशा प्रकारच्याच गोवधाला उद्देशून ब्रह्महत्याव्रताचा अतिदेश केला आहे. आणि दुसरें शंभर गायींच्या दानासह द्वैमासिकव्रत वरील कात्यायनानें सांगितलेल्या व्रताच्या जागीं धनवान् गोघ्नाकरितां आहे, असें जाणावें. गौतमानें–वैश्यवधाच्या निमित्तानें एक वृषभ व शंभर गाई यांच्या दानासह त्रैवार्षिक प्राकृत ब्रह्मचर्य सांगून त्याचाच अतिदेश गोवधाचे ठायीं केला आहे. पण तें प्रायश्चित्त पूर्वोक्त गायीला कामतः मारल्यास करावें. किंवा गर्भरहित गुणयुक्त गायींचा वध केल्यास तें समजावें. गर्भरहित गायीला अकामतः मारलें तरी कात्यायनानें सांगितलेलें नुस्तें त्रैवार्षिक व्रत करावें. पण वरील दोन्हीं प्रायश्चित्तें करण्यापूर्वीं त्या गायीला काष्ठानें मारल्यास सांतपन, ढेकळांनीं मारल्यास प्राजापत्य, दगडांनीं मारलेलें असल्यास तप्तकृच्छ्र व शस्त्रानें मारलेलें असल्यास अतिकृच्छ्र करून ब्राह्मणभोजन व दक्षिणा द्यावी. ( नंतर वरील सहस्र किंवा शत गोप्रदानरूप प्रायश्चित्तें करावीं. )

असो; विशेष वयाला अनुसरूनही विशेष प्रायश्चित्त सांगितलेलें आढळतें–अतिवृद्ध, अतिकृश, अतिबाला व रोगिणी गायीस मारल्यास द्विजानें पूर्व विधानानें अर्धें प्रायश्चित्त करावें. ब्राह्मणांस यथाशक्ति भोजन घालावें. सोनें व तिल द्यावे. ( नीरोगादि गायीला मारल्यास जें प्रायश्चित्त उक्त आहे त्याच्या अर्धें असें समजावें. ) वृद्धप्रचेतानेंही 'एका वर्षाच्या वत्सास अबुद्धिपूर्वक मारल्यास कृच्छ्रपाद, दोन वर्षांच्या वत्सास मारल्यास द्विपाद, तीन वर्षांच्या वासरास मारल्यास तीन पाद व त्यापुढें प्राजापत्य,' असें सांगितलें आहे. गर्भिणीला मारलें असतां तिच्या बरोबर गर्भही मेल्यास प्रत्येक निमित्ताबरोबर नैमित्तिकही आवृत्त होतें, या न्यायानें सामान्यतः द्विगुण प्रायश्चित्ताची प्राप्ति झाली असतां षट्त्रिंशन्मतांत 'गर्भ उत्पन्न होतांच त्याला मारल्यास पादकृच्छ्र, तो जरा दृढ झाल्यावर मारल्यास दोन पाद, अचेतन गर्भाचा घात केल्यास तीन पाद व अंग-प्रत्यंगयुक्त, संपूर्ण व सचेतन गर्भास मारल्यास दुप्पट गोव्रत करावें, असें सांगितलें आहे. अनेकांनीं मिळून अकामतः गायीचा वध केल्यास संवर्त व आपस्तंब यांनीं सांगितल्याप्रमाणें जशा प्रकारच्या गाईला मारलें असेल तिला योग्य असलेल्या प्रायश्चित्ताचा चतुर्थांश प्रत्येकानें करावा. अनेक गायींचा वध केल्यास त्यांच्या संख्ये इतकी प्रायश्चित्ताचीही आवृत्ती करावी. पण अनेकांनीं मिळून कामतः गोवध केल्यास प्रत्येकानें संपूर्ण प्रायश्चित्त करावें. एकानेंच बंधनादि व्यापारानें अनेक गाईंना मारल्यास संवर्त व आपस्तंब यांच्या सांगण्याप्रमाणें केवल दुप्पट प्रायश्चित्त करावें. जितक्या गायींना मारलें असेल तितके वेळ प्रायश्चित्ताची आवृत्ति करूं नये. वैद्यानेंही विरुद्ध औषध देऊन एका गायीलाच अनिच्छेनेंही जरी मारलें तरी द्विगुण गोव्रत करावें. वैद्य नसलेल्या एखाद्यानें परोपकारबुद्धीनेंही प्रतिकूल औषध दिल्यास व मरण आल्यास व्यासांच्या वचनाप्रमाणें

कृच्छ्रपाद प्रायश्चित्त करावें. ' औषध, लवण, भोजन, हीं पुण्याकरितांही अधिक कोणाला देऊं नये. तर योग्य वेळीं स्वल्प द्यावीं ' असें त्यांनीं म्हटलें आहे. आपस्तंबानें ' रोध करणारास ( अडविणारास ) एक पाद, बांधणारास–दोन पाद ' इत्यादि जें स्वल्प प्रायश्चित्त सांगितलें आहे तें साक्षात् मारणाराविषयीं नव्हे तर रोधादि करणाऱ्या दुसऱ्याचविषयीं तें आहे, पाषाण, तरवार इत्यादिकांच्या योगानें पाय तोडणें, मान मोडणें इत्यादि उपयांनीं जे गायीचीं अंगें भूमीवर पाडतात ते साक्षात् हिंसक होत. त्यांना सर्व प्रायश्चित्त उक्त आहे. वर सांगितलेलीं रोधादि कर्में करणारे निमित्तक होत. त्यांना पाद, द्विपाद इत्यादि प्रायश्चित्त सांगितलें आहे. पराशरानें बंधनादि करणाराला प्राजापत्य प्रायश्चित्त व तें करून झाल्यावर ब्राह्मणभोजन, दक्षिणा व वृषभयुक्त गाय द्यावयासही सांगितलें आहे. पण तें नुसत्या बांधणाराकरितां नसून बांधल्यानंतर तिनें सोडून घेऊं नये म्हणून तिची हिंसा होईतों पहात राहणाऱ्यास उद्देशून सांगितलेलें आहे. अतिदाह, अति वाहणें, नाक तोडणें, नदी, पर्वत इत्यादि विषम स्थानीं अडवून ठेवल्यामुळें मरणें, या दोषांचें त्रिपाद कृच्छ्र हें प्रायश्चित्त आहे. बैल व गायी यांच्या अंगावर कांहीं खूण करण्याकरितां थोडेसें डागण्यास शास्त्राची अनुज्ञा आहे. पण त्याचाच अतिरेक होऊं देऊं नये, असा याचा भावार्थ. अंकन व लक्षण याकरितां गुरांना डागीत असतात. अंकन म्हणजे स्थिर चिह्न करणें व लक्षण म्हणजे कांहीं काल टिकणारें चिह्न करणें. गायींच्या रक्षणाकरितांही त्यांना काथ्याच्या दोऱ्या, सणाच्या दोऱ्या इत्यादिकांनीं बांधून ठेवूं नये व प्रसंगोपात्त बांधल्यास आपल्या जवळच कुऱ्हाड ठेवावी. म्हणजे वेळ पडल्यास तिनें त्या दोऱ्या तोडतां येतील. वस्तुतः त्यांना कुश, काश इत्यादिकांच्या योगानें दोषरहित स्थानीं बांधावें, असें व्यासांनीं सांगितलें आहे. घंटा, आभरण इत्यादि दोषांनीं गायीचा प्राण गेल्यास गोकृच्छ्रार्ध करावें. अति दूध काढणें, अति दंड करणें, संघातांत सोडणें व लोखंडी सांखळ्या यांच्या योगानें गायीला मरण आल्यास त्रिपाद कृच्छ्र करावें.

स्वामीनें अथवा पालकानें गायीचें योग्य रीतीनें पालन न करितां उपेक्षा केल्यास व त्यामुळें ती जलौघांत व डबक्यांत पडून मेल्यास, पाऊस व वीज यांच्या योगानें मेल्यास, अकस्मात् मोठ्या खळग्यांत पडल्यास आणि श्वापदानें खाल्ल्यास, प्राजापत्य कृच्छ्र करावें. शीत, वात यांच्या योगानें मेल्यास, फांस लागून मेल्यास, शून्य गृहांत अडकवून शिवाय उपेक्षा केल्यास प्राजापत्यच करावें. पण दुसऱ्या कार्यांत व्यग्र नसतांना उपेक्षा केल्यास हें प्रायश्चित्त आहे. अन्यकार्यव्यग्र असल्यामुळें दुर्लक्ष्य होऊन गाय मेल्यास अर्धें प्राजापत्य करावें. कारण, विष्णूनें तसें सांगितलें आहे. पण गायीची चिकित्सा करण्याकरितां यंत्रण करीत असतांना, गर्भ सोडवीत असतांना व असाच कांहीं उपकार करीत असतांना जर तिचा प्राण गेला तर संवर्ताच्या वचनाप्रमाणें कांहीं दोष नाहीं. ( यंत्रण म्हणजे व्याधीचा परिहार करण्याकरितां चिमट्यासह अंकुश शरीरांत घालणें. ) त्याचप्रमाणें गाय व ब्राह्मण यांना औषध, स्नेह, आहार इत्यादि देत असतांना जर त्यांस मरण आलें तर तो देणारा पापी

होत नाहीं. अतिवृष्टि, आग लागणें, घर पडणें इत्यादि निमित्तानें गाय मेल्यास प्रायश्चित्त नाहीं असें पराशरानें सांगितलें आहे. पण हें म्हणणें पशु बंधनरहित असून अकस्मात् गृहादि दाह झाल्यास त्याविषयीं आहे. कारण, बांधून ठेवलेला पशु अरण्य, खळें, गृह इत्यादिकांच्या दाहामुळें मरण पावल्यास पादकृच्छ्र करावें, असें आपस्तंबानें सांगितलें आहे. गायीचें हाड मोडणें, शेंपुट तोडणें, दांत पाडणें, शिंगें उपटणें इत्यादि केल्यास अर्धमास यवाचें जल प्राशन करावें, असेंहि सांगितलें आहे. अंगिरसानें वरील दोष व मारून चामडें काढणें, यास दशरात्र वज्रपान (म्ह. दुग्धपान) करावयास सांगितलें आहे. पण तें अशक्ताकरितां आहे.

असो, मेलेल्या गायीसारखी गाय किंवा तिचें मूल्य स्वामीला देऊन गोघ्नानें हें प्रायश्चित्त करावें. कारण, यमानें तसें सांगितलें आहे. मनूनेंही (अ. ८ श्लो. २८८) 'ज्ञानतः किंवा अज्ञानतः ज्यानें ज्याच्या ज्या द्रव्याचा नाश केला असेल त्यानें त्याला तें द्रव्य भरून द्यावें व राजालाही तितकाच दंड द्यावा' असें म्हटलें आहे. वर सांगितलेलें हें सर्व प्रायश्चित्त ब्राह्मण गोघ्नालाच उद्देशून सांगितलें आहे. कारण, विष्णूनें 'ब्राह्मणाला सर्व प्रायश्चित्त सांगावें. क्षत्रियाला पाऊणपट, वैश्याला अर्धें व शूद्राला चतुर्थांश' असें सांगितलें आहे. पण अंगिरानें 'ब्राह्मणांना जी पर्षत् (सभा) उक्त आहे, तिच्या दुप्पट क्षत्रियाला, तिप्पट वैश्याला व चौपट शूद्राला आणि पर्षत्-प्रमाणेंच व्रताची योजना करावी,' असें जें म्हटलें आहे तें प्रातिलोम्यानें वाक्पारुष्य व दंडपारुष्य याविषयीं आहे, असें समजावें. स्त्री, वृद्ध व बाल यांना अर्धें व अनुपनीतांना पाव प्रायश्चित्त; वर सांगितलें आहे. त्याचीच येथेंही योजना करावी.

पराशरानें स्त्रियांविषयीं असें सांगितलें आहे. 'स्त्रियांना वपन, अनुगमन, जपादिक व गोष्ठांत गोचर्म नेसून शयन करणें, हीं नाहींत. तर सर्व केंस वर उचलून त्यांचीं दोन बोटें अग्रें कापावीं.' स्त्रियांच्या मस्तकाचें मुंडन सर्वत्र हेंच सांगितलें आहे. संवर्तानें पुरुषाविषयीं असा विशेष सांगितला आहे. पादप्रायश्चित्त करण्यास योग्य असलेल्या पुरुषानें कंठाच्या खालील (म्हणजे स्तन व अंगरोम) केंसांचें वपन करावें; अर्धप्रायश्चित्तार्हानें श्मश्रूचेंही वपन करावें; पादोनप्रायश्चित्तार्हानें शिखेवांचून मस्तकावरील केंस काढावे व संपूर्ण प्रायश्चित्तास योग्य असलेल्या पुरुषानें शिखेसह सर्व केंस काढावे. या दिशेनें दुसऱ्याही स्मृतिवचनांच्या विषयांचें निरूपण करावें २६३, २६४.

इति गोवधप्रायश्चित्तप्रकरणम् ७.

आतां दुसऱ्या उपपातकांचीं प्रायश्चित्तें सांगतात—

**उपपातकशुद्धिः स्यादेवं चान्द्रायणेन वा ।**
**पयसा वापि मासेन पराकेणाथवा पुनः ॥ २६५ ॥**

या वर सांगितलेल्या ( म्ह. महिनाभर पंचगव्य प्राशन करणें इत्यादि प्रकारच्या ) गोवधप्रायश्चित्तानें दुसऱ्याही व्रात्यतादि उपपातकांचीं शुद्धि होते. त्याचप्रमाणें चांद्रायण किंवा मास पयोव्रत अथवा पराक यांच्या योगानें शुद्धि होते. येथील या अतिदेशाच्या सामर्थ्यानें गायीचें चर्म नेसणें, गोपरिचर्या, इत्यादि गोवधालाच मात्र साधारण असलेल्या कांहीं धर्मांचें न्यूनत्व ध्यानांत येतें. हीं चार व्रतें अकामतः उपपातक करणाऱ्याच्या शक्तीस अनुसरून योजावीं. पण तींच कामतः केल्यास मनूनें ( अ. ११ श्लो. ११७ ) सांगितलेलें त्रैमासिक व्रत करावें. याच वचनावरून अवकीर्णीस मात्र सोडून बाकीच्या सर्व उपपातकांच्या उक्त व अनुक्त प्रायश्चित्तांचा अतिदेश जाणावा. रेतःस्खलनामुळें ब्रह्मचर्यापासून भ्रष्ट होणाऱ्या अवकीर्णीला तर जें प्रत्यक्ष वचनानें सांगितलें आहे तेंच प्रायश्चित्त होय.

आतां कोणी म्हणेल कीं, हीं अतिदेशना ज्यांचें प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं त्याविषयींच असणें युक्त आहे. नाहींतर प्रत्यक्ष शब्दांनीं सांगितलेल्या प्रायश्चित्तांचा बाध करून ती प्रवृत्त होऊं लागेल. पण हें म्हणणें उचित नव्हे. कारण, उपपातकांमध्यें सामान्यतः पठित असलेल्या उपपातकांचें अन्यत्र विशेषतः जर दुसरें प्रायश्चित्त सांगितलें तर त्याच तेवढ्या विषयाचा परिहार होणार. विशेषतः पठित उपपातकांचें दुसऱ्या जागीं विशेषतः दुसरें प्रायश्चित्त सांगितलें असल्यास त्याचाही परिहार होणार नाहीं. ( अर्थात् सामान्यतः उक्त प्रायश्चित्ताचा विशेषतः उक्त प्रायश्चित्तानें बाध होईल, हें खरें; पण विशेषतः उक्ताचा विशेषतः उक्त प्रायश्चित्तानें बाध होणार नाही. जसें-अयाज्यांचें याजन हें उपपातकांत सामान्यतः पठित पातक आहे. पण अभिचार कर्म करणाऱ्या व्रात्ययाजकानें तीन कृच्छ्रें करावीं. हें अन्यत्र विशेषतः उक्त आहे. यास्तव, यानें त्या सामान्याचा परिहार होतो. पण तेंच जळणाकरितां वृक्ष तोडणें, हें उपपातक असें विशेषतः सांगून वृक्ष, लता, गुल्म, वीरुध् यांना तोडल्यास शत ऋचांचा जप करावा, हें विशेषतः सांगितलें आहे. ) यास्तव, व्रात्यादिकांस उद्देशून या शास्त्रांत किंवा दुसऱ्या शास्त्रांत सांगितलेल्या प्रायश्चित्तांसह या ( २६५ व्या ) श्लोकांत प्रतिपादलेल्या चार व्रतांचा एकच विषय आहे, असें कल्पून विकल्प किंवा विषयविभाग यांचा आश्रय करावा. ( म्हणजे त्यांतील कांहीं, पाहिजे तर हें करा नाहीं तर हें करा अशा, विकल्पानें व कांहीं हें याच उपपातकाचें प्रायश्चित्त आहे व हें याचेंच, असा विषयविभाग करूच त्यांची योजना करावी. )

आतां दुसऱ्या स्मृतींत सांगितलेलीं प्रायश्चित्तें आम्हीं व्रात्यादिकांचे ठायीं क्रमानें योजतों. त्यांतील व्रात्यतेविषयी मनूनें ( अ. ११ श्लो. १९१ ) असें म्हटलें आहे -ज्या ब्राह्मण-क्षत्रिय-वैश्यांचें गौण कालींही यथाशास्त्र उपनयन होत नाहीं त्यांच्याकडून तीन प्राजापत्यें करवून यथाविधि उपनयन करावें. यमानेंही ' व्रात्यांचें शिखेसह वपन करून व्रत करावें. एकवीस रात्री पसाभर यवांचें पाणी प्यावें. हविष्यान्नानें सात किंवा पांच ब्राह्मणांस भोजन घालावें. आणि नंतर या यावक व्रतानें शुद्ध झालेल्या त्याचें उपनयन करावें ' असें म्हटलें आहे; पण हीं दोन्ही विधानें याज्ञवल्क्यांच्या मास-पयोव्रताच्या जागीं आहेत. वशिष्ठानें

'व्रात्यानें असें असें उद्दालक व्रत करावें. दोन महिने यवप्राशनावर काढावे, एक महिना दुधावर निर्वाह करावा. एक पक्ष आमिक्षेनें, आठ दिवस घृतानें, सहा रात्री अयाचितानें, तीन रात्री जलपानानें व अहोरात्र उपवासानें रहावें. अश्वमेधाच्या अवभृथांत जावें. किंवा व्रात्यस्तोम करावा.' असें जें सांगितलें आहे त्याची व्यवस्था अशी-उपनयन करणारा नसणें इत्यादि कारणामुळें ज्याच्या कालाचा अतिक्रम झाला असेल त्यानें स्वशक्तीप्रमाणें याज्ञवल्क्योक्त व्रतांतील कोणतें तरी एक व्रत करावें. पण आपत्ति नसतांना अतिक्रम झाल्यास मनूनें सांगितलेलें त्रैमासिक करावें. पंधरा वर्षांनंतरही बराचसा काल गेल्यास वरील उद्दालक व्रत अथवा व्रात्यस्तोम करावा. पण ज्यांचे पिता-पितामह इत्यादिकही अनुपनीत असतात त्यांच्याकरितां आपस्तंबानें असें म्हटलें आहे- ज्याचा पिता व पितामह या दोघांचेंचं उपनयन झालेलें नसेल त्यानें एक वर्षभर वेदविद्येसंबंधीं ब्रह्मचर्य करावें व ज्याच्या प्रपितामहाचेंही उपनयन झालें कीं नाहीं हें आठवत नसेल त्यानें बारा वर्षें त्रैविद्यक ब्रह्मचर्य पाळावें.

आतां स्तेयाविषयींही उपपातकत्वामुळें सामान्यतः प्राप्त झालेल्या वरील चार प्रायश्चित्तांचा अपवाद म्हणून मनूनें (अ.११श्लो. १६२) 'ब्राह्मणानें ब्राह्मणाच्या घरांतून धान्य, भात इत्यादि अन्नें व धन यांची बुद्धिपूर्वक चोरी केल्यास एक वर्षभर प्राजापत्य व्रत करावें.' असें सांगितलें आहे. क्षत्रियादिकांना यांहून न्यून कल्पावें. शूद्राला अष्टापाद्य चौर्यकिल्बिष (चोरीचा दोष) सांगून वैश्यादिकांना उत्तरोत्तर त्याच्या दुप्पट व विद्वानाला तर सर्वांहून अधिक असा नियम असल्यामुळें क्षत्रियादिकांना अल्प दंड होतो. 'विप्राला सर्व प्रायश्चित्त, क्षत्रियाला पाऊणपट, वैश्याला अर्धें व शूद्राला पाव' असेंही उत्तरोत्तर एकेक पाद न्यून प्रायश्चित्त सांगितलें आहे. त्याचप्रमाणें क्षत्रियादिकांची वस्तु चोरल्यासही कमी कमी प्रायश्चित्त कल्पावें, जसें— क्षत्रियाची वस्तु चोरल्यास षाण्मासिक व्रत, वैश्याची चोरल्यास त्रैमासिक गोवधव्रत व शूद्राची चोरल्यास चांद्रायण. अशीच पुढेही अन्त्यजादिकांविषयीं योजना करावी. येथें सांगितलेलें हें प्रायश्चित्त दहा कुंभांपर्यंत धान्य चोरल्यास त्याविषयीं जाणावें. कारण, दहा कुंभांहून अधिक धान्य चोरणारास उत्तम दम व पलसहस्राहून अधिक चोरणारास वध सांगितला आहे. कुंभ पंचपलप्रमाण असतो. इतक्याच धान्याच्या मूल्याचें अन्न व धन चोरल्यासही हाच दंड सांगितला आहे. येथील अन्नशब्दानें तंदुलादिक व धनशब्दानें तांबें रुपें इत्यादि घ्यावें. हें प्रायश्चित्त कामतः केलेल्या चोरीकरतां आहे. अकामतः केलेल्या चोरीचें त्रैमासिक गोवधव्रत सांगितलें आहे. मनुष्य, स्त्री, क्षेत्र, गृह, कूप व वापी यांचें जल यांचें हरण केल्यास चांद्रायणानें शुद्धि होते. हें चांद्रायण अडीचशें पणांनीं विकत मिळेल इतकें जल चोरल्यास प्राप्तच होतें. तरीसुद्धां इतर गोवधव्रताची निवृत्ति व्हावी एतदर्थ पुनः सांगितलें आहे. कारण, तेवढ्या मूल्याचें जल हरण केल्यास त्याच्या द्विगुण म्हणजे पांचशें पण दंड व तसेंच चांद्रायणाचा विषय होणाऱ्या दोषासही तितकाच दंड सांगितलेला असल्यामुळें आणि पांचशें पण दंड व चांद्रायण या दोघांचेंही गोवधादिकांत साहचर्य असून चांद्रायणाच्या जागींही पांचशें पण दंडाचें विधान असल्यामुळें वरील वाक्य इतर गोवध व्रतांच्या निवृत्यर्थच आहे. पण हें क्षत्रियादिकांच्या द्रव्याचा अपहार केल्यास

जाणावें. ब्राम्हणसंबंधीं द्रव्याचा अपहार केल्यास मनूनें ( अ. ११ श्लो. ५७ ) सांगितलेलें सुवर्णापहाराचें प्रायश्चित्त करावें. तसेंच त्यानें ( अ. ११ श्लो. १६४ ) सांतपन कृच्छ्र करावयास जें सांगितलें आहे तें शिसें, जस्त, इत्यादि अगदीं अल्प प्रयोजनाच्या वस्तूंच्या चोरीविषयीं असल्यामुळें सामान्यस्तेय प्रायश्चित्ताचा अपवाद आहे, असें समजावें. एकवार भोजनास पुरेल इतकें भक्ष्य भोज्य-फळ-मूळ इत्यादिकांचा अपहार केल्यास मनूनें ( अ. ११ श्लो. १६५ ) सांगितलेलें पंचगव्य प्राशन, हें प्रायश्चित्त व दोन वेळ भोजनास पुरेल इतकें भक्ष्यादि चोरल्यास त्रिरात्र पंचगव्याशन करावें. कारण, पैठीनसीनें तसा विकल्प सांगितला आहे. वरील मनुवचनांत यान, शय्या व आसन यांचाही उल्लेख आहे. पण तें एकवार किंवा द्विवार पुरणाऱ्या अन्नाच्या मूल्यांचेंच असल्यास त्याविषयीं समजावें. सारांश, सर्व प्रसंगीं हरण केलेल्या द्रव्याच्या न्यूनाधिकतेप्रमाणें प्रायश्चित्ताचाही लघु गुरुभाव कल्पावा. तसेंच मनूनें ( अ. ११ श्लो. १६६ ) 'तृण, काष्ठ, वृक्ष, शुष्क अन्न, गुड, वस्त्र, चर्म व मांस यांतील एकाद्याचा अपहार केला असतां तीन दिवस उपवास करावा' असें जें सांगितलें आहे तें वरील प्रायश्चित्ताहून तिप्पट प्रायश्चित्ताची उपपत्ति लागण्याकरितां भोज्यादिकांहून तिप्पट मूल्याचें तृणादि चोरल्यास त्याकरितां आहे असें समजावें. तसेंच मनूनें त्याच्या पुढच्याच श्लोकांत ' मणी, मोत्यें, पोंवळीं, तांबें, रुपें, लोखंड, कांसें व मूल्यवान् पाषाण यांतील एकाद्याचें हरण केलें असतां बारा दिवस तांदुळाच्या कण्या खाव्या.' असें सांगितलें असल्यामुळें भक्ष्यादिकांच्या बारापट किंमतीचे वरील पदार्थ चोरल्यास तें प्रायश्चित्त जाणावें. मनुस्मृतीच्या त्याच्याही पुढच्या म्हणजे १६८ व्या श्लोकांत ' कापूस, लोकर व रेशीम यांचीं वस्त्रें, गायी, घोडे इत्यादि दोन खुरांचे व एका खुरांचे प्राणी, शुक, सारिका, इत्यादि पक्षी, चंदनादि सुगंधी पदार्थ व रज्जु यांतील कशाचेंही हरण केलें असतां तीन दिवस दुग्धाहार करावा असें म्हटलें आहे.पण येथेंही भक्ष्यादि चौर्याच्या तिप्पट प्रायश्चित्त सांगितलेलें असल्यामुळें भक्ष्याच्या तिप्पट मूल्याचे ते पदार्थ चोरल्यास त्याकरितां हें प्रायश्चित्त समाजावें. तात्पर्य, हरण केल्या जाणाऱ्या द्रव्याच्या न्यूनाधिकतेप्रमाणें प्रायश्चित्ताचें अल्पत्व किंवा महत्त्व कल्पावें. येथें सांगितलेलें हें स्तेयाचें प्रायश्चित्त अपहार केलेलें द्रव्य स्वामीला परत दिल्यावरच करावें. कारण ' दत्त्वैवापहृतं द्रव्यं स्वामिने व्रतमाचरेत् ' असें विष्णूनें म्हटलें आहे.

आतां ऋणापाकरणा ( कर्जाच्या फेडी ) चें प्रायश्चित्त सांगतों—पुत्र व पौत्र यांनीं वडिलार्जित ऋण द्यावें, असें म्हणून ज्याचें विधान केलें आहे तें ऋण न फेडणें व त्याचप्रमाणें ' जायमानो वै ब्राह्मणो० ' या वैदिक वाक्यानें सांगितलेल्या ऋणाची यज्ञादि करून फेड न करणें, या दोषांपासून सामान्य उपपातकांस सांगितलेल्या चार व्रतांतील आपल्या शक्त्यनुसार कोणतें तरी एक व्रत केल्यानें शुद्धि होते. मनूनें ( अ. ११ श्लो. २७ ) याविषयीं दुसरेंही प्रायश्चित्त सांगितलें आहे. तें असें—चैत्रशुक्लपक्षाच्या आरंभीं शास्त्रविहित सोमयागाचा असंभव झाल्यास त्याच्या अकरणामुळें प्राप्त दोषाचा परिहार करण्यास्तव वैश्वानरी इष्टि करावी. त्याचप्रमाणें अधिकारी ब्राह्मणादि अनाहिताग्नि जरी असला तरी संवत्सरानंतर आपत्तिसमयीं त्याच्या शक्त्यनुसार याच चार व्रतांतील एखादें व्रत योजावें. पण आपत्ति नसल्यास मनूनें

सांगितलेलें त्रैमासिक व्रत करावें. वत्सराच्या पूर्वी कार्ष्णाजिनीनें असा विशेष सांगितला आहे.—विप्रानें योग्य समयीं अग्न्याधान करून यथाविधि कर्मे करावीं. पण तीं न झाल्यास त्यानें प्रतिमासीं त्रिरात्र व्रत करावें. पिता, पितामह इत्यादि आहिताग्नि नसल्यास पुत्र जर यज्ञ करूं लागला तर त्यानें त्याच्या निष्क्रयार्थ व्रात्यपशुयाग करावा. एकच अग्नि ठेवणाराविषयींही त्यानें असा विशेष सांगितला आहे—घरांतील जो ज्येष्ठ पुरुष विवाहित असूनही उपासनाग्नि ठेवीत नाहीं त्यानें प्रतिवर्षी चांद्रायण करावें अथवा प्रतिमासीं एकाह व्रत करावें

अपण्याचा विक्रय केल्यास त्याचें प्रायश्चित्त असें सांगितलें आहे. हारितः—गूळ, तिळ, पुष्पें, मूळें, फळें, व पक्वान्न यांचा विक्रय केल्यास सौम्य कृच्छ्र; लाक्षा, लवण, मध, मांस, तेल, दूध, दहीं, तूप, सुगंधी पदार्थ, ताक, चामडें व वस्त्र यांतील एकाद्याचा विक्रय केल्यास (विकल्यास) चांद्रायण; लोकर, चमरीचे केस, भूमि, धेनु, घर, दगड व शस्त्र आणि भक्ष्य मांस, स्नायु, अस्थि, शिंग, नख व शिंप यांतील एकाद्यास विकल्यास तप्तकृच्छ्र; हिंग, गुग्गुळ, हरताळ, मनःशील, सुरमा, काव, क्षारलवण, (समुद्राचें मीठ), मणी, मोत्यें, प्रवाल, वेळूचीं पात्रें, वेणु व मातीचीं भांडीं यांतील कशाचाहि विक्रय केल्यास तप्तकृच्छ्र; उपवन, सरोवर, विहीर, पुष्करिणी, डोह व सुकृत यांचा विक्रय करणारा एकवर्षभर त्रिकाल स्नान, अधःशय्या, चवथ्या प्रहरीं भोजन व दश सहस्र मंत्रजप इतकें केल्यानें शुद्ध होतो. कमी प्रमाणानें तोलून देणें, अधिक प्रमाणानें तोलून घेणें, चांगली व वाईट वस्तु यांचें मिश्रण करून विकणें इत्यादि दुष्कर्मांचेंही वरीलच प्रायश्चित्त जाणावें. शंख, विष्णु इत्यादिकांच्याही अशाच दुसऱ्या वचनांनीं ज्याचें विशेष प्रायश्चित्त सांगितलें नसेल त्याचें आपत्ति नसतांना मनूनें सांगितलेलें उपपातकांचें सामान्य त्रैमासिक व्रत व आपत्ति असेल तेव्हां याज्ञवल्क्यांच्या या चार व्रतांतील शक्त्यनुसार कोणतें तरी एक व्रत योजावें.

परिवेत्याविषयीं वसिष्ठानें असें विशेष प्रायश्चित्त सांगितलें आहे. परिवेत्ता म्हणजे ज्येष्ठ भ्राता अविवाहित असतांना स्वतः विवाह करणारा कनिष्ठ भ्राता. त्यानें कृच्छ्र व अतिकृच्छ्र करून स्वतः स्वीकारिलेली कन्या ज्येष्ठ भ्रात्याला देऊन (म्हणजे गुरूचा अपमान निवृत्त व्हावा म्हणून ब्रह्मचर्यावस्थेंत आणलेल्या भिक्षान्नाप्रमाणें ती ज्येष्ठ भ्रात्याला निवेदन करून) त्या ज्येष्ठ भ्रात्यानें अनुज्ञा दिली असतां तिच्याशींच पुनः विवाह करावा. पण हारीतानें ‘ परिवेत्ता, ज्येष्ठ परिवित्ति व कनिष्ठास कन्या देणारा परियष्टा हे तिघेही पतित होत. त्यांनीं शुद्ध होण्याकरितां एक संवत्सर प्राजापत्य करावें. ’ असें व शंखानें ‘ परिवित्ति व परिवेत्ता या दोघांनींही एक वर्षभर ब्राह्मणांच्या घरीं भिक्षा मागावी ’ असें जें सांगितलें आहे तें कामतः (मुद्दाम) कन्येच्या जनकादिकांच्या अनुमोदनावांचून विवाह केल्यास जाणावें. कारण, तें गुरुप्रायश्चित्त असल्यामुळें सामान्य परिवेत्ता इत्यादिकांना प्राप्त होत नाहीं. पण परिवेत्ता कामतः पिता, माता इत्यादिकांनीं दिलेल्या कन्येचेंच जेव्हां पाणिग्रहण करतो तेव्हां मनूनें सांगितलेलें त्रैमासिक व्रत करावें. वर सांगितलेलें कृच्छ्र व अतिकृच्छ्र आणि याज्ञवल्क्यांचें व्रतचतुष्टय हीं अज्ञानतः केलेल्या परिवेदनाविषयीं आहेत. यमानेंही ‘ दोघां भ्रात्यांना दोन कृच्छ्रें, कन्येला

एक कृच्छ्र, दात्याला अतिकृच्छ्र व होत्याला चांद्रायण ' असें सांगितलें आहे. हेंच प्रायश्चित्त ज्येष्ठ आहिताग्नि नसतांना कनिष्ठानें अग्न्याधान केल्यास जाणावें. कारण, या दोन्ही दोषांचा निर्देश एकाच वाक्यानें केला आहे. याविषयीं गौतमानें असें म्हटलें आहे—परिवित्ति-परिवेत्ता, पर्याहित-पर्याधातृ, अग्रेदिधिषू व दिधिषूपति यांना एक संवत्सर प्राकृत ब्रह्मचर्य हें प्रायश्चित्त उक्त आहे. एवढ्यासाठींच वसिष्ठानेंही अग्रेदिधिषूपति इत्यादिकांना हेंच प्रायश्चित्त सांगितलें आहे. (जसें—अग्रेदिधिषूपतीनें द्वादशरात्र कृच्छ्र करून व दिधिषूपतीनें कृच्छ्रातिकृच्छ्र करून पुनः त्यांच्याशीं विवाह करावा. ) ' वडील बहिणीचा विवाह होण्यापूर्वी धाकट्या बहिणीचा विवाह केल्यास ती अग्रेदिधिषू व वडील बहीण दिधिषू होते. ' असें दुसऱ्या स्मृतींत त्याचें लक्षण सांगितले आहे. त्यांतील अग्रेदिधिषूपतीनें प्राजापत्य करून त्याच ज्येष्ठेचें मागून दुसऱ्यानें तिला वरलें असलें तरी, पाणिग्रहण करावें; आणि दिधिषूपतीनें कृच्छ्रातिकृच्छ्र करून स्वतः वरलेली ज्येष्ठ कन्या कनिष्ठेशीं विवाह करणाराला देऊन दुसऱ्या कन्येशीं विवाह करावा. ( येथें परिवेदनविषय संपला. )

आतां वेतन घेऊन शिकविणारा व वेतन देऊन शिकणारा या दोघनींही दुधाबरोबर ब्राह्मीचें प्राशन करावें, असें विष्णूनें सांगून शिवाय अनुयोगप्रदानानें तीन पक्ष ( ४५ दिवस ) ब्राह्मीयुक्त दुग्धप्राशन करावें, असें म्हटलें आहे. उत्कर्षाकरितां अध्ययन करणारास ' तूं अध्ययन नाहींसं केलें आहेस, आतां आणखी काय पढतोस ? ' असा प्रश्न करणें, हेंच अनुयोगप्रदान आहे. म्हणूनच असा अनुयोग दिलेल्यांना दुसऱ्या स्मृतींत पतित म्हटलें आहे. असो; या प्रकरणांतही पूर्वोक्त व्रतासह या व्रताचा शक्तीच्या अपेक्षेनें विकल्प समजावा ( म्हणजे कर्त्याच्या शक्तीचा विचार करून त्यांतील कोणत्यातरी एका प्रायश्चित्ताची योजना करावी. )

तसेंच पारदार्य ( म्ह. परस्त्रीगमन ) या प्रकरणांतलि सामान्य उपपातक या दृष्टीनें मनूनें सांगितलेलें त्रैमासिक व याज्ञवल्क्यांचें व्रतचतुष्टय यांचा गुरुभार्यादिकांविषयीं अपवाद सांगितला. ( म्हणजे परस्त्रीगमनाला सामान्य उपपातकाचें मनुयाज्ञवल्क्यांनीं सांगितलेलें प्रायश्चित्त जरी प्राप्त असलें तरी तें गुरुस्त्रीगमनादि प्रसंगीं उपयोगीं पडत नाहीं. कारण, त्याला याहून अधिक प्रायश्चित्त सांगितलें आहे. ) तसेंच गौतमादिकांनीं दुसऱ्याही विशेष प्रकारच्या पारदार्याचा अपवाद सांगितला आहे. गौतमः—द्वे परदारे, त्रीणि श्रोत्रियस्य-तसेंच वार्षिक प्राकृत ब्रह्मचर्याचें प्रकरण आरंभून ' उपपातकेषु चैवम् ' असें त्यानेंच म्हटलें आहे. त्याविषयींची व्यवस्था अशी—ऋतुसमयीं कामतः केवल जातीच्या ब्राह्मणीशीं गमन केल्यास वार्षिक प्राकृत ब्रह्मचर्य; त्यावेळीं ( ऋतुकालीं ) कर्मसाधनत्वादि गुणशालिनी ब्राम्हणीशीं गमन केल्यास दोन वर्षं प्राकृत ब्रह्मचर्य; तसल्याच श्रोत्रिय भार्येशीं गमन केल्यास तीनवर्षें प्राकृत ब्रह्मचर्य किंवा श्रोत्रियपत्नी अशा गुणवती ब्राह्मणीशीं गमन केल्यास तीनवर्षें प्राकृत ब्रह्मचर्य, तशाच प्रकारच्या क्षत्रियेशीं गमन केल्यास द्वैवार्षिक, तसल्याच

वैश्येशीं गमन केल्यास वार्षिक ब्रह्मचर्य आणि तसल्याच शूद्रा स्त्रीशीं गमन केल्यास षाण्मासिक व्रत करावें. म्हणूनच शंखानेंही वैश्येच्या ठिकाणीं रेतःस्खलन करणारानें एक वर्ष ब्रह्मचर्य व त्रिकाल स्नान करावें. क्षत्रियेचे ठिकाणीं अवकीर्णीनें दोन वर्षे व ब्राह्मणीचे ठायीं अवकीर्णीनें तीन वर्षे व्रत करावें. ब्राह्मणानें ज्यांच्याशीं विवाह केला आहे अशा क्षत्रिया व वैश्या स्त्रीचे ठिकाणीं गमन केल्यास वर्णक्रमानें प्रायश्चित्ताचा ऱ्हास दाखविला आहे. त्याचप्रमाणें क्षत्रियालाही क्षत्रियादि स्त्रियांचे ठायीं पूर्वोक्त विषयामध्येंच द्विवार्षिक, वार्षिक व षाण्मासिक व्रतें योजावीं. वैश्याला वैश्या व शूद्री यांविषयीं वार्षिक व षाण्मासिक व शूद्राला शूद्री परस्त्रीशीं गमन केल्यास षाण्मासिकच व्रत उक्त आहे. आपस्तंबानें ‘ अनन्यपूर्व (म्ह. दुसऱ्या कोणाची भार्या न झालेल्या ) सवर्ण स्त्रीशीं एकदां गमन केल्यास एक पाद, दुसऱ्या व तिसऱ्या वेळीं गमन केल्यास क्रमानें दोन व तीन पाद आणि चवथ्या वेळीं संपूर्ण द्वादशवार्षिक ’ असें जें सांगितलें आहे तें गौतमाच्या त्रैवार्षिकाचे जागींच आहे. अनन्य पूर्व स्त्रीचे ठायीं गमनाचा चार वेळ अभ्यास केल्यास द्वादशवार्षिक प्रायश्चित्ताचें विधान केलेलें असल्यामुळें गमनाच्या अभ्यासाचें हें प्रायश्चित्त नसून प्रतिगमनाचें एक पाद आहे. हें सर्व कामतः गमन केल्यास जाणावें. अकामतः घडल्यास पूर्वोक्त विषयामध्यें हेंच अर्ध योजावें. ऋतुकाल नसतांना जातिमात्र ब्राह्मणीशीं कामतः गमन केल्यास मनूनें सांगितलेलें त्रैमासिक. जातिमात्र क्षत्रियादि स्त्रियांचें ठायीं याचविषयीं द्वैमासिक, चांद्रायण, मासिक यांची योजना करावी. क्षत्रियादि स्त्रियांचे ठायीं गमन करणाऱ्या क्षत्रियादिकांना द्वैमासिकादिक प्रायश्चित्तें सांगावीं. त्यांच्या ठिकाणीं अकामतः गमन केल्यास त्रैवर्णिकांना क्रमानें याज्ञवल्क्यांनीं सांगितलेलें बैलासह दहा गायींचें दान, एक मास पंचगव्याशन व एक मास प्राजापत्य सांगावें. शूद्रेशीं कामतः गमन केल्यास मास व्रत सांगितलें आहे. पण तेंच अकामतः केल्यास अर्धमास योजावें. म्हणूनच संवर्तानें ‘ ब्राह्मणानें शूद्रास्त्रीशीं कामतः गमन केल्यास एक मास व अकामतः गमन केल्यास अर्धामास पापशुद्धीकरितां गोमूत्रांत भिजविलेल्या यावकांचा आहार करावा’ असें सांगितलें आहे. ब्राह्मण बुद्धिपुरःसर ब्राह्मणानें विवाह केलेल्या शूद्रेशीं जर गमन करील व ती धर्मकर्मापासून निवृत्त झाली असेल तर कृच्छ्र व निवृत्त झालेली नसेल तर अतिकृच्छ्र करावें किंवा हें कृच्छ्र व अतिकृच्छ्र दोन व तीन वेळ व्यभिचार केलेल्या ब्राह्मणविवाहित द्विजस्त्रियांशीं अकामतः गमन केल्यास जाणावें. म्हणूनच संवर्तानें ‘ जिला स्वजन नाहींत अशा ब्राह्मणीशीं गमन केल्यास प्राजापत्य करावें ’ असें सांगितलें आहे. पण तेंच त्यांच्याशीं कामतः गमन केल्यास यमानें सांगितलेलें कृच्छ्रद्वय करावें. स्वैरिणी शूद्रीच्या ठिकाणीं चार वेळ किंवा त्याहून अधिक अभ्यास केल्यास सचैल स्नान करून ब्राह्मणास उदकुंभ द्यावा; वैश्येशीं तसेंच गमन केल्यास चवथ्या वेळीं भोजन करावें. ब्राह्मणास भोजन घालावें व गायींना गवताचा भारा खावयास घालावा. तसल्याच क्षत्रियेशीं तसेंच गमन केल्यास तीन अहोरात्र उपोषण करून घृतपात्र द्यावें. ब्राह्मणीशीं गमन केल्यास सहा अहोरात्र उपवास करून गाय द्यावी व गायींशीं दुष्कर्म करणारानें प्राजापत्य करावें. अविवाहित

कन्येशीं गमन केल्यास शंखानें सांगितल्याप्रमाणें कणसें काढून घेतल्यावर राहिलेल्या गवताच्या काड्यांचा भारा व एक मासाभर शिसें द्यावें. 'चवथ्यावेळीं व्यभिचार करणारी स्वैरिणी व पांचव्या वेळीं बंधकी होते' असें जें दुसऱ्या एका स्मृतींत सांगितलें आहे त्यावरून हें वरील प्रतिपादन चार वेळ किंवा त्याहून अधिक वेळ केलेल्या गमनाविषयीं आहे, असें कळतें. याचविषयीं षट्त्रिंशन्मतांतही असें सांगितले आहे-बंधकी ब्राह्मणीशीं गमन केल्यास ब्राह्मणानें ब्राह्मणाला कांहीं द्यावें. क्षत्रियेशीं गमन केल्यास धनुष्य, वैश्येशीं केल्यास वस्त्र, व शूद्रेशीं गमन केल्यास उदकुंभ द्यावा. त्यानें दिवसभर उपोषित असावें किंवा ब्राह्मणास भोजन द्यावें. अनुलोमगमनानें गर्भधारणा झाल्यास व ती स्त्री अतिदूषित व प्रतिलोमगा नसल्यास द्विगुण प्रायश्चित्त; अन्यजातीशीं गमन केल्यास प्रायश्चित्ताचें द्वैगुण्य युक्तच आहे. प्रतिलोमदूषित व अन्त्यज स्त्रियाशीं गमन केल्यास, चांडाली गर्भवती झाल्यास जसें गुरुतल्पव्रत उक्त आहे, तसेंच पण कांहीं न्यून प्रायश्चित्त योजावें. चांडालीशीं गमन केल्यास वार्षिक व तीच गर्भवती झाल्यास गुरुतल्पव्रत, असें सांगितलेंच आहे. वर सांगितलेलें हें सर्व प्रायश्चित्त गर्भ उत्पन्न झालेला नसल्यास त्याविषयीं जाणावें. पण तो उत्पन्न झाल्यास उशनाच्या वचनाप्रमाणें ज्याला जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तेंच दुप्पट समजावें. शूद्रीच्या ठिकाणीं गर्भाधान करणारास चतुर्विंशतिमतांत 'तीन वर्षे चवथ्यावेळीं नक्तभोजन करावें' असें सांगितलें आहे. आतां मनूनें (अ. ३ श्लो. १७) 'शूद्रासमागमानें ब्राह्मण अधोगतीस जातो व तिच्या ठिकाणीं गर्भ उत्पन्न करून तर ब्राह्मण्यापासूनच भ्रष्ट होतो' असें जें म्हटलें आहे तें शूद्रागमनांत पाप फार आहे, हें सुचविण्याकरितांच आहे.

प्रातिलोम्य समागमांत तर पुरुषाचा वध व स्त्रीचे कान, नाक इत्यादि तोडणें, हेंच प्रायश्चित्त आहे. पण वृद्धप्रचेतानें 'मोहानें ब्राह्मणीशीं गमन करून शुद्ध होण्याची इच्छा करणाऱ्या शूद्रानें द्वादशवार्षिक व्रतच करावें. कारण, ती त्याची माता, म्हणून म्हटलें आहे. आणि इतर वर्णांच्या स्त्रियांशीं गमन करणाऱ्या त्यानें उत्तरोत्तर चतुर्थांश कमी प्रायश्चित्त करावें,' असें जें म्हटलें आहे तें 'मोहानें' असें विशेषण असल्यामुळें स्वभार्येच्या भ्रांतीनें इतर ब्राह्मणीप्रभृतींशीं गमन करणाऱ्या शूद्राविषयीं आहे, असें जाणावें. क्षत्रिय किंवा वैश्य ब्राह्मणींशीं जर गमन करील तर त्यांतील एकानें कृच्छ्र व दुसऱ्यानें सांतपन करावें. अत्यंत काममोहित शूद्र जर तिच्याशीं गमन करील तर त्यानें एक मास गोमूत्रयावकाहार करावा. पण हें म्हणणें अत्यंत व्यभिचारिणीःब्राह्मणीविषयीं आहे.

बृहत्संवर्तानें अंत्यजागमनाचें चांद्रायण हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. पण तें ब्राह्मण एकदां कामतः गमन करील तर त्याविषयीं आहे. क्षत्रियादिकांना उत्तरोत्तर पादहीन जाणावें. आपस्तंबानें 'म्लेच्छी, नटी, चर्मकारी (चांभारीण), धोबीण, बुरुडीण, यांच्याशीं गमन केल्यास दोन चांद्रायणें करावीं,' असें म्हटलें आहे. 'धोबी, चांभार, नट, बुरूड, कोळी, मेद व भिल्ल हे सात अंत्यज आहेत,' असें त्यानेंच सांगितलें आहे. चांडालादिक जे अंत्यावसायी आहेत त्यांच्या स्त्रियाशीं गमन करण्यांत फार मोठा दोष असल्यामुळें तसेंच गुरुतर

प्रायश्चित्त गुरुतल्पप्रकरणांत सांगितलें आहे. येथें सांगितलेल्या या अंत्यजस्त्रियांतील एकीचें जें प्रायश्चित्त तेंच सर्वांचें. कारण, त्या सर्व समान असतात. 'समान धर्मवानांतील एकाला उद्देशून जें सांगितलेलें असतें तेंच सर्वांना कर्तव्य असतें,' असें उशनानें सांगितलें आहे, चांडाल, भेद, श्वपच व कपालव्रती यांच्या स्त्रियांशीं अकामतः समागम घडल्यास 'पराक व्रत आपस्तंबानें सांगितलें आहे. रजक, व्याध, नट इत्यादिकांच्या स्त्रियांशीं ब्राह्मणानें गमन केल्यास चांद्रायण करावें, असें जें संवर्तानें म्हटलें आहे तेंही अकामतःच समजावें. शातातपानें 'कोळीण, धोबीण बुरुडीण, चांभारीण इत्यादिकांशीं गमन करणारानें प्राजापत्य विधानानें एक कृच्छ्र करावें,' असें जें म्हटलें आहे तें रेतःसेकापूर्वी निवृत्त होणाराविषयीं आहे. उशनानें 'कापालिकांचें अन्न व स्त्रिया यांचा ज्ञानतः उपभोग घेणारानें कृच्छ्राब्द व अज्ञानानें भोग घेणारानें दोन चांद्रायणें करावी,' असें जें म्हटलें आहे तें गमनाचा अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे. पण चांडालीप्रभृति स्त्रियांशीं गमन करीत असतांना जर गर्भधारणा झाली तर गुरुतल्पव्रत करावें, असें म्हणून उशनानेंच द्वादशवार्षिक व्रत सांगितलें आहे. पण 'अंत्यजेच्या ठिकाणीं पुत्ररूपानें उत्पन्न झालेल्या पुरुषाला प्रायश्चित्तच नाहीं. मस्तकावर भगचिह्न करून त्याला घालवून द्यावें,' असें जें आपस्तंबाचें वचन आहे तें कामतः पुत्रोत्पादन केल्यास त्याविषयीं आहे, असें जाणावें.

स्त्रियांनाही सवर्ण अथवा अनुलोम समागम केल्यास पुरुषांना सांगितलेलेंच त्रैवार्षिकादि प्रायश्चित्त उचित आहे. ( मनु. अ. ११ श्लो. १७६ उत्तरार्ध पहा ) पण प्रातिलोम्य मैथुनाविषयींच्या स्त्रीपुरुषांच्या प्रायश्चित्तांत भेद आहे. वसिष्ठ म्हणतात—शूद्रानें जर ब्राह्मणीशीं गमन केलें तर त्याच्या अंगाला चटया बांधून अग्नींत फेकावें. पण ब्राह्मणीचें वपन करून, सर्वांगास तूप माखून, तिला नागवी करून, गाढवावर बसवून राजमार्गांतून नगरभर हिंडवावें म्हणजे ती पवित्र होते. वैश्यानें जर ब्राह्मणीशीं गमन केलें तर त्याच्या अंगास लाल दर्भ बांधून त्याला अग्नींत टाकावें व ब्राह्मणीचें वर सांगितल्याप्रमाणेंच करावें. क्षत्रियानें जर ब्राह्मणीगमन केलें तर त्याचें शरीर शरपर्णांनीं वेष्टित करून त्याला अग्नींत लोटावें व ब्राह्मणीचें वपन इत्यादि वर सांगितल्याप्रमाणेंच करून शुभ्र गाढवावरून धिंड काढावी. त्याचप्रमाणें वैश्य क्षत्रियेशीं व शूद्र क्षत्रिया व वैश्या यांच्याशीं संगत झाल्यास अशीच कल्पना करावी. वरील प्रत्येक वचनांत शेवटीं 'पूता भवति' असें म्हटलें आहे. त्यावरून राजमार्गांतून गमन करविणें हेंच दंडरूप असून तें दुसऱ्या प्रायश्चित्ताची अपेक्षा न धरितांच शुद्धीचें साधन होतें असें ठरतें.

संवर्तानें 'ब्राह्मणीनें अकामतः क्षत्रिय व वैश्य यांच्याशीं गमन केल्यास एक मास गोमूत्रयावक भक्षण करावें. व कामतः गमन केल्यास त्याच्या दुप्पट प्रायश्चित्त करावें.' असें ब्राह्मणीच्या प्रातिलोम्य द्विजगमनाविषयीं सांगितलें आहे. षट्त्रिंशन्मतांतही 'ब्राह्मणानें क्षत्रिय व वैश्य यांचें सेवन केल्यास अतिकृच्छ्र व कृच्छ्रातिकृच्छ्र करावें. क्षत्रियानें ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांचें सेवन केल्यास कृच्छ्रार्ध, प्राजापत्य, व अतिकृच्छ्र, वैश्येनें ब्राह्मणादि त्रैवर्णिकांचें सेवन केल्यास कृच्छ्रपाद, कृच्छ्रार्ध व प्राजापत्य, शूद्रेनें शूद्राचेंच सेवन केल्यास प्राजापत्य आणि ब्राह्मणादि त्रैवर्णिकांचें सेवन केल्यास क्रमानें अहोरात्र, त्रिरात्र व कृच्छ्रार्ध करावें,'

असें म्हटलें आहे. बृहत्प्रचेतानें शूद्राशीं संगत झालेली ब्राह्मणी जर त्याच्या गर्भास न प्रसवली तर तिला कृच्छ्र व चांद्रायणत्रय सांगितलें आहे. पण तें इच्छा नसतांना अथवा स्वपतीच्या भ्रांतीनें समागम घडल्यास जाणावें. विप्रास्त्रीनें वैश्य सेवन केल्यास दोन चांद्रायणें व कृच्छ्र; तिनें क्षत्रिय सेवन केल्यास एक चांद्रायण व कृच्छ्र; क्षत्रियास्त्रीनें शूद्र सेवन केल्यास कृच्छ्र व दोन चांद्रायणें, वैश्य सेवन केल्यास एक चांद्रायण व कृच्छ्र आणि वैश्येनें शूद्रसंपर्क केल्यास तिला कृच्छ्र व चांद्रायण प्रायश्चित्त उक्त आहे. पण अशा अकामतः अनुलोम समागमानें गर्भ राहिल्यास व तो ब्राह्मणाचा असल्यास पराक, क्षत्रियाचा असल्यास चांद्रायण, वैश्याचा असल्यास चांद्रायण व पराक आणि शूद्राचा असल्यास त्याग करावा. कारण, तो चांडाल निपजतो. धातुदोषामुळें गर्भस्राव झाल्यास तीन चांद्रायणें करावीं; पण तोच समागम कामतः झाल्यास पराकादि उक्त प्रायश्चित्तें दुप्पट करावींत. पण ती जेव्हां गर्भस्राव झाल्यावाचूनच दहा महिने राहून प्रसूत होते तेव्हां प्रायश्चित्त नाहीं. कारण 'शूद्राशीं संगत झालेल्या ब्राह्मणादि त्रैवर्णिकांच्या स्त्रिया प्रसूत न झाल्यासच प्रायश्चित्तानें शुद्ध होतात.' असें वसिष्ठांनीं सांगितलें आहे. पण गर्भवती असून त्यानंतरही जी शूद्रादिकाशीं व्यभिचार करते तिनें प्रसवानंतरच प्रायश्चित्त करावें. प्रसूतीनंतर एक मास यावक व्रत करावें. 'तिचा दोष गर्भाला लागत नाहीं. त्याचा यथाशास्त्र संस्कार करावा,' असें दुसऱ्या स्मृतींत सांगितलें आहे. पण स्त्री उद्धटपणानें प्रायश्चित्त करीत नसेल तर तिचे कर्णादि अवयव कापावे.

स्त्रियांनीं अंत्यजादिकांशीं गमन केल्यासही दुसऱ्या स्मृतींत असें प्रायश्चित्त सांगितलें आहे. धोबी, व्याध, नट, बुरुड व चांभार यांच्यांशीं अकामतः समागम करणाऱ्या ब्राह्मणीनें तीन चांद्रायणें; चांडाल, पुल्कस, म्लेच्छ, श्वपाक व पतित यांच्यांशीं अकामतः गमन केल्यास चार चांद्रायणें; व कामतः वरील सर्वांचें सेवन केल्यास वरील प्रमाणाच्या दुप्पट प्रायश्चित्त करावें. तसेंच-चांडालाशीं जर कोणत्याही प्रकारें संपर्क झाला तर वपन करावें. यवोदक प्राशन करावें, त्रिरात्र उपवास करून एकरात्र जलांत वसावें. तिच्या इतक्याच उंच कूपांत गोमय व जल यांच्या चिखलांत निराहार राहून तिनें तीन दिवस घालवावे. त्यानंतर दुधांत शंखपुष्पीचें मूळ, पर्ण, पुष्प, फळ, शाखा इत्यादिकांतील कांहींतरी घालून व तें शिजवून प्यावें आणि इतकें सर्व अनुष्ठान झाल्यानंतर पुनः रजस्वला होईतों तिनें एकमुक्त रहावें. व्रत करीपर्यंत तिनें बाहेर रहावें. प्रायश्चित्ताचें अनुष्ठान झाल्यावर ब्राह्मणभोजन घालावें आणि शुद्धीकरितां दोन गायी ही दक्षिणा द्यावी, असें स्वायंभुव मनूनें सांगितलें आहे. पण हेंही अकामतः चांडालसमागम घडल्यास समजावें. ऋष्यशृंगानेंही अंत्यजमैथुनाचें कृच्छ्राब्द प्रायश्चित्त सांगितलें आहे. तें कामतः एकदाच गमन केल्यास जाणावें. पण पूर्वी पतीच्या वीर्यानें गर्भवती असलेल्या स्त्रीनें मागून जर चांडालसमागम केला तर तिनें प्रसूतीपर्यंत प्रायश्चित्त करूं नये. तिनें घरांत प्रचार व वेणीफणी करूं नये. भर्त्याच्या शय्येवर शयन करूं नये. बांधवांसह भोजन करूं नये आणि गर्भ बाहेर आला म्हणजे कृच्छ्राब्द करावें.

ब्राह्मणाला हिरण्य किंवा धेनु ( नुकतीच व्यालेली गाय ) दक्षिणा द्यावी, असेंही त्यानेंच सांगितलें आहे. परंतु, तोच अंत्यजसमागम तिनें जर कामतः केलेला असला तर प्रदीप्त अग्नींत प्रवेश करून मरावें. मृत्यूनेंच ती शुद्ध होते, असें उशनानें सांगितलें आहे. पण तिनें उक्त प्रायश्चित्त न केल्यास तिच्या कपाळावर पुंलिंगाचें चिह्न करावें अथवा तिला मारावें. कारण हीन वर्णाच्या पुरुषानें जिचा उपभोग घेतला आहे ती अंकन करण्यास ( डागण्यास ) अथवा वधास पात्र होते, असें पराशरानें सांगितलें आहे.

परिवित्तीच्या प्रायश्चित्ताची व्यवस्था परिवेत्त्याच्या प्रायश्चित्तांप्रमाणेंच करावी. त्यांत विशेष इतकाच आहे. ज्या विषयांत परिवेत्त्याला कृच्छ्र व अतिकृच्छ्र सांगितलेलें असतें त्यांतच परिवित्तीला प्राजापत्य समजावें. कारण, वसिष्ठांचें तसें वचन आहे.

व्याजवट्टा व लवणक्रय ( मिठाचा व्यापार ) यांचीं मनु व योगीश्वर यांनीं सांगितलेलीं सामान्योपपातक प्रायश्चित्तें शक्तिगुण इत्यादिकांच्या अपेक्षेनें योजावीं २६५.

इति कतिचिदुपपातकप्रायश्चित्तप्रकरणम् ८.

उपपातकांमध्यें लवणक्रयानंतर स्त्रीशूद्र-विट्क्षत्रवधाचा पाठ आहे. यास्तव, त्याला आतां दुसरें प्रायश्चित्त सांगतात--

**ऋषभैकसहस्रा गा दद्यात्क्षत्रवधे पुमान् ।**
**ब्रह्महत्याव्रतं वापि वत्सरत्रितयं चरेत् ॥२६६॥**
**वैश्यहाब्दं चरेदेतद्दद्याद्वैकशतं गवाम् ।**
**षण्मासाच्छूद्रहाप्येतद्धेनूर्दद्याद्दशाथवा ॥ २६७ ॥**

क्षत्रियाचा वध केल्यास पुरुषानें एक बैल व सहस्र गायी द्याव्या.किंवा तीन वर्षेंपर्यंत ब्रह्महत्या व्रत करावें. वैश्यघातकानें तर हें ब्रह्महत्याव्रत एक वर्ष करावें. अथवा एक बैल व शंभर गायी द्याव्या. शूद्राचा घात करणारानें सहा महिने ब्रह्महत्या व्रत करून नुकत्याच व्यालेल्या सवत्स दहा गायी द्याव्या. हें वरील प्रायश्चित्त अकामतः जातिमात्र क्षत्रियादिकांचा वध केल्यास जाणावें. कारण मनुस्मृतींत ‘ अकामतः ’ असा प्रकरणारंभ करूनच या प्रायश्चित्तांचें विधान केलें आहे. दान व तप यांची व्यवस्था शक्तीच्या अपेक्षेनें करावी. स्ववृत्तामध्यें कांहीं प्रमाणानें राहणाऱ्या वैश्य व शूद्र यांना मनूनें (अ. ११ श्लो. १२६) सांगितल्याप्रमाणें क्रमानें ब्रह्महत्येचा अष्टमांश व सोळावा अंश कल्पावा. वृत्तस्थ क्षत्रियाचा वध केल्यास साडेचार वर्षें व्रत करावें. येथील वृत्त शब्दानें गुणादिक सांगितले आहेत. ‘ गुरुपूजा, दया, शौच, सत्य, इंद्रियनिग्रह व हितांचें प्रवर्तन हें सर्व वृत्त होय,’ असें मनूनेंच म्हटलें आहे. वृद्ध हारीतानें ‘ क्षत्रियास मारून ब्राह्मणानें सहा वर्षें, वैश्यास मारून तीन वर्षें, व शूद्रास मारून एक वर्ष व्रत करावें आणि वृषभासह दहा गायी द्याव्या,’ असें जें म्हटलें आहे तें बुद्धिपुरःसर मारल्यास जाणावें. पण श्रोत्रिय क्षत्रियादिकांचा वध केल्यास क्रमानें पाऊणपट, अर्धें व चतुर्थांश ब्रह्मव्रत, त्याच्याच ( वृद्ध हारीताच्या ) वचनाप्रमाणें कल्पावें. वसिष्ठानें ‘ ब्राह्मणानें

क्षत्रियास मारून आठ वर्षें, वैश्यास मारून सहा व शूद्रास मारून तीन वर्षें ब्रह्महव्रत करावें' असें जें म्हटलें आहे त्याचा व वरील हारीतवचनाचा विषय एकच आहे. पण क्षत्रियाच्या वधाचें नऊ वर्षांच्या ऐवजीं आठ वर्षें प्रायश्चित्त सांगितलेलें असल्यामुळें तो क्षत्रिय किंचित् न्यून गुणवान् असल्यास त्या ( वसिष्ठोक्त प्रायश्चित्ता ) ची योजना करावी. पण तोच जर श्रोत्रिय व वृत्तस्थ असला तर त्याच्या वधाचें आपस्तंबानें सांगितलेलें द्वादश वार्षिक व्रत करावें. आरंभिलेल्या यागांत अश्रोत्रिय क्षत्रियादिकांचा वध घडल्यास ब्रह्महत्याव्रत करावें. पण यागस्थ क्षत्रियादि श्रोत्रिय असून त्यांतील क्षत्रियाला ब्राह्मणानें मारल्यास षड्वार्षिक प्राकृत ब्रह्मचर्य करावें व वृषभासह एक सहस्र गायी द्याव्या; वैश्यवध केल्यास त्रैवार्षिक व्रत व वृषभासह शंभर गायी आणि शूद्राचा वध केल्यास एक वर्ष व्रत व वृषभासह दहा गायी द्याव्या. अर्थात् अशा प्रसंगीं गौतमोक्त दान-तपांचा समुच्चय जाणावा. पण हें अबुद्धिपूर्वक दोष घडल्यास त्याविषयीं आहे. कारण, शंखानें 'पूर्ववदमतिपूर्वं चतुर्षु वर्णेषु०' इत्यादि वचनांत तसें सांगितलें आहे. या विशेष प्रायश्चित्ताबरोबर उपपातकांचीं सामान्य प्रायश्चित्तेंही योजावीं. कारण, त्यांचा उत्सर्ग-अपवादन्यायानें बाध्यबाधकभाव नाहीं. त्यांतील दुर्वृत्त क्षत्रियाला कामतः ब्राह्मणादिकांनीं मारल्यास त्यांना क्रमानें त्रैमासिक, त्रैवार्षिक, द्वैमासिक व चांद्रायण सांगावें. वर सांगितलेलीं हीं सर्व व्रतें ब्राह्मणानें केलेल्या क्षत्रियादि वधाविषयीं आहेत असें जाणावें. कारण, मनु-गौतम-हारीतादिकांनीं ब्राह्मणशब्दाचें ग्रहण करून तसें सुचविलें आहे. क्षत्रियादिकांनीं क्षत्रियादिकांचा वध केल्यास पादन्यून प्रायश्चित्त योजावें. कारण, ब्राह्मणाला सपूर्ण, क्षत्रियाला पाऊणपट इत्यादि व्यवस्था वृद्ध विष्णूनें सांगितली आहे. आतां अंगिरानें 'ब्राह्मणांची जी पर्षत् सांगितली आहे तिच्या दुप्पट क्षत्रियांची, तिप्पट वैश्यांची आणि पर्षत्प्रमाणेंच व्रत' असें जें म्हटलें आहे तें प्रातिलोम्यानें वाक्पारुष्य व दंडपारुष्य यांविषयीं आहे, असें गोवधप्रकरणांत सांगितलें आहे. मूर्धावसिक्तादिकांचा वध केल्यास हें सर्व प्रायश्चित्त होत नाहीं. कारण, त्यांना क्षत्रियत्वादिकता नसते. यास्तव, दंडाच्या अनुरोधानेंच त्यांच्या वधप्रसंगीं पूर्वोक्त सर्व प्रायश्चित्तांची वृद्धि व ऱ्हास यांची कल्पना करावी. दंडाची वृद्धि व ऱ्हास कसा करावा, हें व्यवहाराध्यायाच्या २०६ व्या श्लोकाच्या उत्तरार्धांत सांगितलें आहे २६६, २६७.

इति क्षत्रियादिवधप्रायश्चित्तप्रकरणम् ९.

आतां स्त्रीवधाचें प्रायश्चित्त सांगतात—

**दुर्वृत्तब्रह्मविट्क्षत्रशूद्रयोषाः प्रमाप्य तु ।**
**दृतिं धनुर्बस्तमविं क्रमाद्दद्याद्विशुद्धये ॥ २६८ ॥**

ब्राह्मणादि चारी वर्णांच्या स्वैरिणी भार्यांस मारून क्रमानें दृति ( पाणी ठेवावयाची चामड्याची पिशवी ), धनुष्य, बकरा व मेंढा शुद्धीकरितां द्यावा. पण हें प्रायश्चित्त अंत्यजादिकांपासून प्रसूत झालेल्या ब्राह्मणीप्रभृति स्त्रियांचा अकामतः वध केल्यास त्याविषयीं जाणावें. पण कामतः ब्राह्मण्यादिकांचा वध केल्यास ब्रह्मगर्भानें सांगितल्याप्रमाणें सहा महिने, तीन

महिने, दोन महिने व मास व्रत योग्यतेप्रमाणें कल्पावें. पण वैश्यकर्मानें उपजीविका करणाऱ्या स्त्रीला जेव्हां एकादा मारतो तेव्हां जल द्यावें. कारण, अंगिरानें तसें सांगितलें आहे. पण क्षत्रियादिकांकडून प्रातिलोम्यानें व्यभिचार करविलेल्या ब्राह्मण्यादि स्त्रिया जेव्हां मारल्या जातात तेव्हां योग्यतेप्रमाणें गोवध प्रायश्चित्तें योजावीं २६८.

आतां किंचित् व्याभिचार केलेल्या ब्राह्मणीप्रभृतींचा वध केल्यास विशेष सांगतात—

## अप्रदुष्टां स्त्रियं हत्वा शूद्रहत्याव्रतं चरेत् ।

जेव्हां किंचित् व्यभिचार करणाऱ्या ( म्ह. फारशा दूषित न झालेल्या ) ब्राह्मण्यादिकांस कोणी मारतो तेव्हां त्यानें षाण्मासिक शूद्रहत्याव्रत करावें किंवा दहा धेनू ( नुकत्याच व्यालेल्या गायी ) द्याव्या. पण हें षाण्मासिक व्रत अकामतः ब्राह्मणीला व कामतः क्षत्रियेला मारल्यास जाणावें. कामतः वैश्येला मारल्यास दहा धेनू द्याव्या आणि कामतः शूद्रास्त्रीला मारल्यास उपपातकास साधारण असलेलें मासभर पंचगव्याशन योजावें. जेव्हां कामतः असल्या ब्राह्मणीला कोणी मारतो तेव्हां त्यानें द्वादशमासिक, पण क्षत्रिया, वैश्या व शूद्रा यांना जेव्हां अकामतः मारतो तेव्हां क्रमानें त्रैमासिक, दीडमास व साडेबावीस दिवस व्रत करावें. कारण, प्रचेतानें तसें म्हटलें आहे. आतां हारीतानें 'षड्वर्षाणि राजन्ये॰' इत्यादि वचनांत ब्राह्मणीच्या वधाचें षड्वार्षिक, क्षत्रियेचें त्रैवार्षिक, वैश्यावधाचें दीडवर्ष व शूद्रावधाचें नऊमास' असें जें व्रत सांगितलें आहे तें अग्निहोत्र, अतिथिसत्कार इत्यादि कर्मांच्या उपयोगीं असलेल्या गुणवती स्त्रियांना कामतः मारल्यास त्याविषयीं आहे, असें जाणावें. अकामतः तसल्या गुणवतींना मारल्यास प्रत्येकीं अर्धे योजावें. आत्रेयीविषयीं मागें सांगितलेंच आहे.

इति स्त्रीवधप्रायश्चित्तप्रकरणम् १०.

हिंसाप्रायश्चित्ताच्या प्रसंगानें, प्रकीर्णकशब्दानें सांगितल्या जाणाऱ्या व उपपातक नसलेल्या प्राणिवधाचेंही प्रायश्चित्त सांगतात—

## अस्थिमतां सहस्रं तु तथानस्थिमतामनः ॥२६९॥

ज्यांची निष्कृति सांगितलेली नाहीं अशा सरडे इत्यादि एकसहस्र अस्थिमान् प्राण्यांची हिंसा केल्यास व त्याचप्रमाणें उवा, ढेकूण, पिसा, मच्छर इत्यादि अस्थिरहित गाडाभर प्राण्यांना मारल्यास शूद्रहत्याव्रत म्हणजे षाण्मासिक प्राकृत ब्रह्मचर्य करावें. अथवा दहा धेनू ( नुकत्याच व्यालेल्या गायी ) द्याव्या. सहस्र, हा परिमाणाचा नियम केल्यामुळें त्याहून अधिक अस्थिमानांचा वध केल्यास त्याहून अधिक प्रायश्चित्त करावें. पण या प्रमाणाहून कमी प्राण्यांचा वध केल्यास अस्थिमानांच्या प्रत्येक वधाला कांहीं द्यावें व अनास्थिमान् प्रत्येक प्राण्याच्या वधाकरितां प्राणायाम करावा. 'अनस्थिमतामनः' ( गाडाभर अस्थिरहित ) असें जें वर म्हटलें आहे तें अति क्षुद्र जंतूंविषयीं आहे. कारण, लाकडें पोखरणारे वगैरे किडे अस्थिरहित असले तरी स्थूल असतात त्यामुळें कृमि, कीट पक्षी इत्यादिकांची हिंसा हें मलिनीकरण कर्म असून त्याचें तीन दिवस तप्तयावक हें प्रायश्चित्त मनूनें सांगितलें आहे, तेंच येथेंही समजावें २६९.

मार्जारगोधानकुलमण्डूकांश्च पतत्रिणः ।
हत्वा त्र्यहं पिबेत्क्षीरं कृच्छ्रं वा पादिकं चरेत् ॥ २७० ॥

मांजर, घोरपड, मुंगुस, बेडूक, चाप–कावळा–घुवड इत्यादि पक्षी यांना मारून त्रिरात्र दुग्धप्राशन करावें किंवा पादकृच्छ्र करावें. ( मनु. अ० ११ श्लो. १३२ पहा. ) हें वरील प्राण्यांतील प्रत्येकाच्या वधाचें प्रायश्चित्त आहे. सर्वांच्या मिळून वधाचें प्रायश्चित्त मनूनें ( अ. ११ श्लो. १३१ ) शूद्रहत्याव्रत ( अर्थात् षाण्मासिक ) सांगितलें आहे. वशिष्ठानें 'कुत्रें, मांजर, मुंगुस, बेडूक, सर्प, चिचुंदरी, उंदीर इत्यादिकांस मारून द्वादशरात्र कृच्छ्र करावें व कांहीं द्यावें, ' असें जें म्हटलें आहे, तें कामतः हिंसेचा अभ्यास केल्यास त्याविषयीं जाणावें २७०.

गजे नीलवृषाः पञ्च शुके वत्सो द्विहायनः ।
खराजमेषेषु वृषो देयः क्रौञ्चे त्रिहायनः ॥२७१॥

हत्तीला मारल्यास पांच काळे बैल द्यावे. पोपटाला मारल्यास दोन वर्षांचा गोवत्स द्यावा. गाढव, बकरा व एडका यांस मारल्यास त्यांतील प्रत्येकाकरितां एक वृषभ व क्रौंच-पक्ष्याला मारल्यास तीन वर्षांचा पाडा द्यावा. मनूनेंही ( अ. ११ श्लो. १३६ ) 'अश्वाचा वध केल्यास वस्त्र, गजाला मारल्यास पांच काळे बैल आणि अज, मेष व गर्दभ यांना मारल्यास एक वर्षाचा पाडा द्यावा; ' असें म्हटलें आहे २७१.

हंसश्येनकपिक्रव्याज्जलस्थलशिखण्डिनः ।
भासं च हत्वा दद्याद्गामक्रव्यादस्तु वत्सिकाम् ॥ २७२ ॥

क्रव्य म्हणजे न शिजलेलें मांस. तें जो खातो तो क्रव्याद. व्याघ्र, कोल्हा इत्यादि पशु. कारण, कपीबरोबर त्याची गणना केली आहे. असो; हंस, श्येन, कंक, गृध्रादि दुसरेही पक्षी, व्याघ्रादि क्रव्याद, बकादि जलचर पक्षी, बलाकाप्रभृति स्थलचर पक्षी, मोर, भास, यांतील प्रत्येकास मारून एक गाय द्यावी. त्याचप्रमाणें अपक्व मांस न खाणाऱ्या हरिणादि पशूंस व खंजरादि पक्ष्यांस मारल्यास कालवड द्यावी. ( मनु. अ. ११ श्लो. १३५ व १३७ पहा. ) २७२.

उरगेष्वायसो दण्डः पण्डके त्रपुसीसकम् ।
कोले घृतघटो देय उष्ट्रे गुञ्जा हयेंऽशुकम् ॥ २७३ ॥

सर्पाला मारल्यास ज्याचे दोन्ही प्रांत ( टोंकें ) तीक्ष्ण आहेत असा लोखंडी दंड द्यावा. नपुंसकाला मारल्यास मासाभर कथिल व शिसें द्यावें. अथवा दुसऱ्या स्मृतींत सांगितल्याप्रमाणें पलालभार ( भुसाचा भार ) द्यावा. पंढ लिंगहीन असतो व म्हणूनच तो संस्कारास योग्य नव्हे, असें देवलांचें वचन आहे. त्यामुळें पंडक ह्मणजे स्त्री–पुं–लिंगरहित, असाच सामान्यतः निर्देश केलेला आहे. परंतु येथें गोब्राह्मणरूप पंडकाची विवक्षा नाहीं. कारण, गोब्राह्मणांच्या निषेधाची प्रवृत्ति जातिधर्माला अनुलक्षून झालेली असते व लिंगरहित पंड-

काचे ठिकाणीं जातिसमवाय एकसारखाच असतो. येथें पंढत्वनिमित्तानेंच लघुप्रायश्चित्त सांगितलें आहे. यास्तव, येथें पंढक, पशु व पक्षीच विवक्षित आहेत. या वाक्यतांही पशु-पक्ष्यांचाच उल्लेख केलेला आहे. असो; सूकराला ( डुकराला ) मारल्यास घृतकुंभ द्यावा. उंटाला मारल्यास गुंजभर सोनें व घोड्याचा वध केल्यास वस्त्र द्यावें. ( मनु. अ. ११ श्लो. १३४ पहा ) २७३.

## तित्तिरौ तु तिलद्रोणं गजादीनामशक्नुवन् ।
## दानं दातुं चरेत्कृच्छ्रमेकैकस्य विशुद्धये ॥ २७४ ॥

तित्तिरी पक्ष्याला मारल्यास द्रोणभर तिळ द्यावे. ( द्रोण म्हणजे एक माप, आठ मुठी म्हणजे एक किंचित्, त्याच्या आठपट पुष्कल, चार पुष्कलांचा आढक व चार आढकांचा द्रोण, असें त्याचें प्रमाण सांगितलें आहे. ) वर सांगिल्याप्रमाणें गजादिकांना मारून निर्धनते-मुळें पांच काळे वृष इत्यादिकांचें दान करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषानें स्वशुद्धीकरितां कृच्छ्र करावें. येथील कृच्छ्रशब्द केवळ क्लेशसाध्य तपाचा वाचक आहे. गौतमानें तीं तपें अशीं सांगितलीं आहेत. एक संवत्सर, सहा महिने, चार महिने, तीन मास, दोन मास, एक मास, चोवीस दिवस, बारा दिवस, सहा दिवस, तीन व एक अहोरात्र असा तपाचा काल आहे. जेथें विशेष तप सांगितलें नसेल तेथें यांतील कोणतें तरी एक करावें. पाप गुरु असल्यास संवत्सरादि कालव्यापी गुरु तप व लघु असल्यास एकाहोरात्रादि लघु तप योजावें. आणि येथील कृच्छ्रशब्दाचा मुख्य अर्थच जर घेतला तर गज किंवा शुक यांतील कोणालाही जरी मारलें तरी सामान्यतः प्राजापत्यच व्रत प्राप्त होईल. पण तें युक्त नव्हे. तेंच, तो शब्द केवल तपःपर आहे असें समजल्यास दानाचा गुरुलघुभाव समजतांच त्याच्या अनुरोधानें तपा-चाही गुरुलघुभाव ठरवितां येतो. त्यामुळें गजवधाचें प्रायश्चित्त द्विमास यावकाशन व शुकाच्या वधाचें नुस्ता उपवास. येणेंप्रमाणें अन्यवधाचेंही दानानुसार प्रायश्चित्त कल्पावें २७४.

## फलपुष्पान्नरसजसत्त्वघाते घृताशनम् ।

औदुंबरादि फळ, मोहा इत्यादिकांचें पुष्प, पुष्कळवेळ राहिलेला भात, सातु इत्यादि अन्न, व गुडादिरस यामध्यें जे प्राणि होतात त्यांचा घात केल्यास घृताशन हें प्रायश्चित्त आहे. या घृतप्राशनाचें भोजनकार्यांतच ( भोजनाचे जागीं ) विधान केलें जातें. कारण, प्रायश्चित्तें तपोरूप असतात. अंगिरसस्मृतींत प्रायश्चित्तपदाच्या निर्वचनमिषानें त्याचें तपोरूपत्व दाखविलें आहे—'प्राय म्हणजे तप व चित्त म्हणजे निश्चय. यास्तव, निश्चयसंयुक्त तप म्हणजेच प्रायश्चित्त'

प्रत्येक प्राण्याचें पृथक् प्रायश्चित्त सांगूं लागल्यास त्याचा अंतच लागणार नाहीं यास्तव आतां सामान्यतः सांगतात—

## किञ्चित्सास्थिवधे देयं प्राणायामस्त्वनास्थिके ॥ २७५ ॥

सरडे इत्यादि अस्थिमान प्राण्यांचा ( सहस्रसंख्येहून कमी ) वध केल्यास प्रत्येक वधास उद्देशून कांहीं थोडेसें धान्य-सुवर्णादि द्यावें आणि अस्थिरहित प्राण्यांच्या प्रत्येक वधाकरितां

प्राणायाम करावा. किंचित् सोनेंच द्यावयाचें असल्यास तें पणमात्र द्यावें व धान्य द्यावयाचें झाल्यास आठ मुठी द्यावें. पण हें ज्या प्राण्यांच्या वधाची पृथक् निष्कृति सांगितलेली नसेल त्यांविषयीं आहे. कारण, ज्या वधाचें विशेष प्रायश्चित्त सांगितलें असेल त्याचें तेंच करणें उचित होय. पराशरानें म्हटलें आहे—हंस, सारस, चक्रवाक, क्रौंच, पाणकोंवडा, मयूर व मेष यांना मारणारा. एकभक्तव्रतानें शुद्ध होतो. मद्गु, टिट्टिभ, शुक, पारावत (कबूतर),आडिका, बक, यांना मारणारा नक्तभोजनानें शुद्ध होतो. चाष, काक, कपोत सारिका व तित्तिर यांना मारणारा दोन्ही संध्याकाळीं जलांत उभा राहून प्राणायाम केल्यानें शुद्ध होतो. गृध्र, श्येन, इतर पक्षी, उलूक यांना मारणारानें एक दिवस अपक्व पदार्थ खावे व दोन्ही वेळीं वायुभक्षण करावें. उंदीर, मांजर, सर्प, अजगर, डुण्डुभ यांतील कोणाला मारल्यास तीन तरी ब्राह्मणांना भोजन घालून पूर्वोक्त लोहदंड दक्षिणा द्यावी. सेधा, कांसव, घोरपड, ससा, साळशिंदर, यांना मारणारानें वायंगें व गुंजाफल यावर अहोरात्र रहावें. हरण, रोहितमृग, डुक्कर, बकरा, मेंढा, लांडगा, कोल्हा, आस्वल इत्यादिकांना मारणारानें शेरभर तिळ द्यावे व तीन दिवस वायुभक्षण करावें. गज, मेष, घोडा, उंट व गवय यांना मारणारानें अहोरात्र व्रतस्थ राहून त्रिकाल स्नान करावें. गाढव, वानर, सिंह, चित्ता व व्याघ्र यांना मारून त्रिरात्र व्रत व ब्राह्मणभोजन यांच्या योगानें शुद्ध व्हावें. याचप्रमाणें दुसऱ्याही स्मृतिवचनांची देशकालादिकांच्या अपेक्षेनें विषयव्यवस्था कल्पावी २७५.

इति हिंसाप्रायश्चित्तप्रकरणम् ११.

'इंधनाकरितां वृक्षच्छेद, ' असें उपपातकांचा नामनिर्देश करतांना म्हटलें. पण हिंसाप्रसंगाच्या लोभानें क्रम सोडून पठित असलेल्याही त्याचा अपकर्ष करून आतां त्याचें प्रायश्चित्त सांगतात—

**वृक्षगुल्मलतावीरुच्छेदने जप्यमृक्शतम् ।**
**स्यादोषधिवृथाच्छेदे क्षीराशी गोनुगो दिनम् ॥ २७६ ॥**

फळें देणाऱ्या आम्र-पनसादि वृक्षांना व गुल्म, लता, वीरुध् यांना यज्ञादि अदृष्टार्थावाचून तोडल्यास गायत्र्यादि शंभर ऋचा जपाव्या. गांवांतील व अरण्यांतील ओषधींना व्यर्थ तोडल्यास एक सर्व दिवस गायींच्या परिचर्येकरितां अनुगमन करून शेवटीं दुसरा सर्व आहार सोडून दूध प्यावें. पण त्या ओषधि पंचयज्ञाकरितां तोडल्यास कांहीं दोष नाहीं. हें येथील विधान फलादिकांच्या योगानें उपयोगी असलेल्या वृक्षादिकांविषयीं आहे. ( मनु. अ. ११ श्लो. १४२ पहा. ) ओषधी इत्यादिकांचा नांगरतांना वगैरे नाश झाल्यास त्यांत दोष नाहीं. कारण, वसिष्ठानीं ' फलपुष्पयुक्त वृक्षांची हिंसा करूं नये, पण कर्षण करावयाचें असल्यास त्यांची हिंसा करावी, ' असें म्हटलें आहे. जेथें विशेष स्थानास उद्देशून विशेष दंड सांगितलेला असतो तेथें प्रायश्चित्तही अधिक कल्पावें. चैत्य, श्मशान, सीमा, पुण्यस्थान, देवालय इत्यादि स्थानीं झालेल्या वृक्षांना तोडल्यास दुप्पट दंड करावा. त्याचप्रमाणें एखादा

प्रख्यात वृक्षाला तोडल्यासही दुप्पट दंड द्यावा. असो, वर जो शंभर ऋचांचा जप सांगितला आहे तो द्विजांकरितां आहे, शूद्राकरितां नव्हे. कारण, त्यांना जपाचा अधिकारच नसतो. यास्तव, त्यांना दंडानुसार द्विरात्रादिकांची कल्पना करावी. उपपातकांमध्यें यांचा जो पाठ केला आहे तो व्यर्थ होऊं नये म्हणून उपपातकांचें साधारण प्रायश्चित्तही या स्थानीं योजावें. आणि येथें सांगितलेलें हें गुरु ( प्रायश्चित्त ) असल्यामुळें वृक्षादिच्छेदनाच्या अभ्यासाविषयीं त्याची योजना करावी २७६.

आतां पुंश्चली-वानरादि वध प्रायश्चित्ताच्या प्रसंगानें त्यांच्या दंशाचें प्रायश्चित्त सांगतात—

**पुंश्चलीवानरखरैर्दष्टश्वोष्ट्रादिवायसैः ।**
**प्राणायामं जले कृत्वा घृतं प्राश्य विशुद्ध्यति ॥ २७७ ॥**

व्यभिचारिणी, वानर, खर, उंट, कावळे यांनीं दंश केल्यास पुरुषानें जलांत प्राणायाम करून व घृत प्राशन करून शुद्ध व्हावें. ' उष्ट्रादि ' येथील आदिशब्दानें शृगालादिकांचें ग्रहण करावें. मनूनें ( अ. ११ श्लो. १९९ ) ' कुत्रा, कोल्हा, गाढव, गांवांतील कच्चें मांस खाणारे मांजरासारखे प्राणी, मनुष्य, अश्व, उंट व वराह यांतील कोणी दंश केल्यास प्राणायामानें शुद्ध होतो, ' असें म्हटलें आहे. येथील हें घृतप्राशन भोजनाच्या जागीं आहे.कारण, प्रायश्चित्तांना तपोरूपत्व असल्यामुळें तीं शरीर संतप्त करण्यासाठींच करावयाचीं असतात. पण हें प्रायश्चित्त अशक्ताकरितां सांगितलें आहे. सुमंतूनें ' श्व-शृगाल-मृग-महिष० ' इत्यादिकांनीं दंश केल्यास ' आपोहिष्ठा ० ' इत्यादि तीन मंत्रांनीं स्नान व तीन प्राणायाम ' असें जें सांगितलें आहे तें नाभीच्या खालच्या शरीरभागास किंचित् दंश केल्यास जाणावें. अंगिरानें-कुत्रा चावल्यास ब्रह्मचाऱ्यानें तीन दिवस सायंकाळीं पयःपान करावें. गृहस्थानें द्विरात्र, तोच अग्निहोत्रवान असल्यास एक दिवस, पण नाभीच्या वर दंश केलेला असल्यास तेंच दुप्पट, तोंडाला चावल्यास तिप्पट, व मस्तकावर दंश केल्यास चौपट प्रायश्चित्त, असें जें सांगितलें आहे तें अगदीं चांगला चावा घेतलेला असल्यास त्याविषयीं समजावें. क्षत्रिय व वैश्य यांना क्रमानें एक पादन्यून व अर्धें व्रत सांगावें. शूद्राला तर उपवास किंवा गाय व बैल यांचें दान वृहदंगिरानें सांगितलें आहे. ' कुत्र्यानें ज्याला दंश केला आहे, अशा ब्राह्मणानें समुद्राला जाऊन मिळणाऱ्या नदीवर जाऊन शंभर प्राणायाम करावे, व घृतप्राशन करून शुद्ध व्हावें. ' असें जें वसिष्ठवचन आहे तें उत्तमांगीं ( मस्तकावर ) दंश केल्यास जाणावें. स्त्रीयांना तर पराशरानें सांगितल्याप्रमाणें उदय पावलेल्या ग्रहनक्षत्रांना पाहणें, हेंच प्रायश्चित्त आहे. पण कृच्छ्रादि व्रतांमध्यें स्थित असलेल्या स्त्रियांविषयीं त्यानें ( पराशरानें )च असा विशेष सांगितला आहे. कुत्रा चावलेल्या व्रतयुक्त स्त्रीनें त्रिरात्र उपवास करावा. व घृतासह यावक खाऊन राहिलेलें व्रत संपवावें. रजस्वलेविषयींही– कुत्रा, कोल्हा, गाढव यांनीं दंश केलेल्या रजस्वलेनें पांच दिवस उपवास करून पंचगव्य प्राशनानें शुद्ध व्हावें–पण नाभीच्या

वर दंश केल्यास त्याच्या दुप्पट, तोंडाला चावल्यास तिप्पट, व मस्तकाला चावल्यास चौपट प्रायश्चित्त करावें.– असा विशेष पुलस्त्यानें सांगितला आहे. पण ती रजस्वलावस्थेंत नसतांना नुस्ता दंश केल्यास जलांत स्नान करावें. आतां कुत्र्यानें हुंगल्यास किंवा नखांनीं ओरखडल्यास पाण्यानें प्रक्षालन करावें व अग्नीनें शेकावें. कुत्रा इत्यादि पशूंचे दंश व शस्त्रांचे व्रण यांत जेव्हां कृमि होतात तेव्हां मनूनें 'गायीच्या मूत्र-पुरीषानें त्रिकाल स्नान करावें व त्रिरात्र पंचगव्य प्यावें. म्हणजे नाभीच्या खालील व्रणाची शुद्धि होते. पण तोच कृमि-पू इत्यादिकांनीं युक्त असलेला व्रण नाभी व कंठ यांच्यामध्यें असल्यास षड्रात्र पंचगव्यप्राशन करावें,' असें सांगितलें आहे. त्यांतील कुत्रा इत्यादिकांच्या दंशाचा व्रण असल्यास त्याच्या दंशाकरितां सांगितलेलें प्रायश्चित्त केल्यानंतर हें करावें. पण शस्त्रादिकांपासून झालेला व्रण असल्यास हेंच करावें. क्षत्रियादिकांमध्यें पादपादऱ्हासानें याचीच योजना करावी २७७.

शरीराच्या त्वग्धातूचा विच्छेद करणाऱ्या दंशाच्या प्रायश्चित्ताच्या प्रसंगानें शरीरांतील शेवटच्या धातूचा विच्छेद करणाऱ्या स्कंदनाचें प्रायश्चित्त सांगतात.

**यन्मेऽद्य रेत इत्याभ्यां स्कन्नं रेतोऽभिमन्त्रयेत् ।**
**स्तनान्तरं भ्रुवोर्मध्यं तेनानामिकया स्पृशेत् ॥ २७८ ॥**

जर कांहीं कारणानें स्त्रीसंभोगावाचूनही हठानें चरम (शेवटच्या) धातूचा विसर्ग केला तर तें विसृष्ट रेत 'यन्मेद्यरेतः०' व 'पुनर्मामैत्विन्द्रियं' या दोन मंत्रांनीं अभिमंत्रित करावें व त्या अभिमंत्रित रेतानें दोन्ही स्तनांच्या व भुवयांच्या मध्यभागास करांगुलीजवळच्या बोटानें (म्हणजे अनामिकेनें) स्पर्श करावा. दुसरें कित्येक 'स्खलन पावलेलें रेत अशुचि असल्यामुळें स्पर्श करण्यास अयोग्य आहे. यास्तव येथील 'तेन' या शब्दानें स्वबुद्धिस्थ आंगठा घ्यावा. अर्थात् आंगठा व अनामिका यांनीं स्पर्श करावा. श्लोकांत अंगुष्ठ असें साक्षात् पद घातल्यास वृत्तभंग झाला असता, म्हणून 'तेन' असें म्हटलें आहे.' असें म्हणतात; पण तें बरोबर नाहीं. कारण, आंगठा बुद्धिस्थ आहे कोठें? शिवाय जवळ असलेला शब्द सोडून दुसऱ्या कल्पित बुद्धिस्थ शब्दाशीं अन्वय करणें युक्त नव्हे. रेत अशुचि असल्यामुळें स्पर्शाला अयोग्य आहे, असें म्हणणें अगदीं अयुक्त आहे, कारण, प्रायश्चित्तार्थरूप स्पर्शामध्यें त्याची योग्यता विधानावरूनच ज्ञात होते. हें प्रायश्चित्त अकामतः रेतःस्खलन करणाऱ्या गृहस्थालाच आहे. ब्रह्मचाऱ्याचें रेत स्वप्नांत किंवा जागरावस्थेंत स्कन्न झाल्यास गुरु प्रायश्चित्त आढळतें. गृहस्थानें कामतः भूमीवर रेतःस्खलन केल्यास सहस्र सावित्रीजप व तीन प्राणायाम करावे, असें मनूनें सांगितलें आहे २७८.

**मयि तेज इति च्छायां स्वां दृष्ट्वाम्बुगतां जपेत् ।**
**सावित्रीमशुचौ दृष्टे चापल्ये चानृतेऽपि च ॥ २७९ ॥**

आपलें प्रतिबिंब पाण्यांत जर दिसलें तर 'मयि तेज इंद्रियं०' हा मंत्र जपावा. अपवित्र द्रव्याचें दर्शन झाल्यास 'तत्सवितुः०' इत्यादि सावित्री ऋचेचा जप करावा. वाक्, हात,

पाय इत्यादिकांचें चापल्य केल्यास तिचाच जप करावा. व खोटें बोलल्यासही गायत्रीमंत्राचा जप करावा. पण हें सर्व बुद्धिपूर्वक केल्यास जाणावें. अकामतः केल्यास मनूनें सांगितल्याप्रमाणें नुस्तें आचमन करावें. शिंकणें, थुंकणें, दांताला हात लावणें; अनृत भाषण व पतितांशीं संभाषण इतकें केल्यास उजव्या कानाला स्पर्श करावा, असें जें संवर्तानें सांगितलें आहे तें अल्पप्रयोजनाकरितां हें सर्व केल्यास किंवा जलाचा अभाव असल्यास त्याविषयीं आहे, असें समजावें.

असो; स्त्री, शूद्र, वैश्य व क्षत्र यांच्या वधानंतर उपपातकांमध्यें निंदितार्थोपजीवन, हें सांगितलें आहे. त्याविषयीं मनु व योगीश्वर यांनीं सांगितलेलीं उपपातकप्रायश्चित्तें जाति-शक्ति-गुण यांच्या अपेक्षेनें जाणावीं. नास्तिक्यामध्येंही तीं प्रायश्चित्तें तशींच योजावीं. नास्तिक्य-शब्दानें वेदांची निंदा करणें व त्यावर उपजीविका करणें, यांचें कथन केलें आहे; पण त्या दोन्ही-विषयीं वासिष्ठानें क्रमानें द्वादशरात्र कृच्छ्र करून नास्तिक्य सोडणें व अतिकृच्छ्र करणें हीं दोन प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. पण हें एकदां करण्याविषयीं आहे आणि उपपातक प्रायश्चित्तें अभ्यासाविषयीं असतात. ' नास्तिक, नास्तिकवृत्ति, कृतघ्न, कूटव्यवहारी व मिथ्याकथक या पांचांनीं पांच वर्षें ब्राह्मणांच्या येथें भिक्षा मागावी, ' असें शंखानें व ' त्यांनीं ग्रीष्म, वर्षा व हेमन्त यांमध्यें पंचाग्निताप, उघडया अवकाशांत असणें व जलांत वास करणें हीं करावीं ' असें हारीतानें जें सांगितलें आहे तें अत्यंत अभिमानानें दीर्घकाल अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे २७९.

नास्तिक्यानंतर ' व्रतलोपश्च ' असें सांगितलें आहे. पण त्यांतलि अवकीर्ण अप्रसिद्ध असल्यामुळें प्रथम त्याचें लक्षण सांगून नंतर प्रायश्चित्तही सांगतात---

**अवकीर्णी भवेद्गत्वा ब्रह्मचारी तु योषितम् ।**
**गर्दभं पशुमालभ्य नैर्ऋतं स विशुध्यति ॥ २८० ॥**

उपकुर्वाण व नैष्ठिक, असा दोन्हीं प्रकारचा ब्रह्मचारी स्त्रीसमागम करून अवकीर्णी होतो. चरमधातूचा विसर्ग याला अवकीर्ण म्हणतात. तें ज्याला असतें तो अवकीर्णी. तो निर्ऋति ही ज्याची देवता आहे अशा गर्दभ पशूनें याग करून शुद्ध होतो. गर्दभ म्हटल्यानेंच पशुत्व सिद्ध असतांनाही पुनः पशुग्रहण जें केलें आहे तें आश्वलायनादि गृह्योक्त पशुधर्मप्राप्त्यर्थ आहे. हें प्रायश्चित्त अरण्यांत चव्हाट्यावर लौकिकाग्नींत करावें. कारण, वसिष्ठांनीं तसें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें मनूच्या सांगण्याप्रमाणें ( अ. ११ श्लो. ११८) रात्रीं ज्याचा एक डोळा फुटला आहे अशा रासभानें करावें. पशूच्या अभावीं चरूनें होम करावा. कारण, वासिष्ठानें ' अथवा निर्ऋति चरु करावा व त्याच्या ' कामायस्वाहा, कामकामायस्वाहा, निर्ऋत्यैस्वाहा व रक्षोदेवताभ्यःस्वाहा ' अशा आहुत्या द्याव्या ' म्हणून सांगितलें आहे. पण हें अशक्ताविषयीं आहे. जो शक्त असेल त्यानें गौतमानें ' गर्दभेनावकीर्णी निर्ऋतिं चतुष्पथे यजेत्० ' इत्यादि वचनांत सांगितल्याप्रमाणें वार्षिक तपासह पशुयाग किंवा चरु करावा. शिवाय मनूनें ( अ. ११ श्लो.

१२२, १२३ ) सांगितल्याप्रमाणें त्रिकालस्नान व एकवार भोजन करावें. हे वार्षिक व्रत अश्रोत्रिय ब्राह्मणपत्नीच्या ठिकाणीं व वैश्या श्रोत्रियपत्नीच्या ठिकाणीं अवकीर्ण झाल्यास करावें; पण तो ब्रह्मचारी गुणवती ब्राह्मणी व क्षत्रिया कीं ज्या श्रोत्रियभार्याही आहेत, त्यांच्या ठिकाणीं अवकीर्ण झाल्यास क्रमानें त्रिवार्षिक व द्विवार्षिक व्रताला पात्र होतो. कारण शंख व लिखित यांनीं तसें सांगितलें आहे. आतां अंगिरानें 'अवकीर्णनिमित्त सहा महिने ब्रह्महत्याव्रत करावें. चिंध्या नेसाव्या.' इत्यादि जें सांगितलें आहे तें अकामतः घडल्यास त्याविषयीं, मनुप्रोक्त वार्षिकव्रताच्या जागीं अथवा किंचित् व्यभिचारिणी स्त्रीविषयीं समजावें. अत्यंत व्यभिचारिणींच्या ठिकाणीं अवकीर्णी झाल्यास सचैल स्नान करून ब्राह्मणाला उदकुंभ द्यावा. वैश्येच्याठायीं भ्रंश पावल्यास चवथ्या प्रहरीं भोजन, ब्राह्मणभोजन व गायींना गवताचा भारा द्यावा. क्षत्रियेच्याठायीं अवकीर्णी झाल्यास त्रिरात्र उपोषण करून घृतपात्र द्यावें. ब्राह्मणीशीं गमन करणाऱ्या ब्रह्मचाऱ्यानें षड्रात्र उपोषित राहून गाय द्यावी व गायीचे ठायीं अवकीर्णी होणारानें प्राजापत्य करावें. षंढस्त्रीचेठायीं अवकीर्णी होणारानें भुसाचा भारा व एक मासा शिसें द्यावें, असें शंख-लिखितांनीं सांगितलें आहे. हें अवकीर्णिप्रायश्चित्त तिन्ही वर्णांच्या ब्रह्मचाऱ्यांना सारखेंच लागूं आहे. कारण, शांडिल्यानें तसें सांगितलें आहे. पण तो ब्रह्मचारी स्त्रीसंभोगावाचूनच कामतः दिवसा व रात्रीं स्वप्नांत जेव्हां चरमधातूचा त्याग करतो तेव्हां केवल नैर्ऋतयाग करावा. वसिष्ठानेंही प्रयत्नानें रेतोविसर्गाचें प्रायश्चित्त नुस्ता यागच सांगितलें आहे. तसेंच त्यानें 'व्रतान्तरेषु चैवं' असें म्हणून अतिदेश केलेला असल्यामुळें कृच्छ्रचांद्रायणादि दुसऱ्या व्रतांमध्यें सांगितलेल्या ब्रह्मचर्याचा भ्रंश झाला असतांही हेंच प्रायश्चित्त समजावें. स्वप्नांत अकामतः शुक्रस्कंदन झाल्यास मनूनें सांगितल्याप्रमाणें (अ २ श्लो. १८१ ) स्नान करून सूर्याची पूजा करावी व तीन वेळ 'पुनर्माम्०' ही ऋचा म्हणावी. वानप्रस्थादिकांच्या ब्रह्मचर्याचें खंडन झाल्यास हें अवकीर्णीव्रत तीन कृच्छ्रांसह उक्त आहे. कारण, शांडिल्यानें 'वानप्रस्थो यतिश्चैव स्कन्दने सति कामतः०' या वचनांत तसें सांगितलें आहे.

जेव्हां एकादा यति गृहस्थाश्रमाचा परिग्रह करून संन्यासापासून अगदीं 'च्युत' होतो तेव्हां त्यानें संवर्तानें सांगितलेलें अश्रान्त कृच्छ्र करावें. वसिष्ठानेंही 'संन्यास घेऊन पुनः गृहस्थाश्रमाच्या स्वीकारानें मैथुनसेवन करणारा साठ सहस्र वर्षें विष्ठेंत कृमि होतो' असें म्हटलें आहे. पराशरानेंही 'संन्यासापासून निवृत्त होऊन गार्हस्थ्य करण्याची इच्छा करणारानें तीन कृच्छ्रें व तीन चांद्रायणें करून जातकर्मादि सर्व संस्कार करावे, म्हणजे तो शुद्ध होतो,' असें म्हटलें आहे. त्यांतील ब्राह्मणाला षाण्मासिक कृच्छ्र व पुनः संन्याससंस्कार; क्षत्रियाला तीन चांद्रायणें व वैश्याला तीन कृच्छ्रें अशी व्यवस्था करावी किंवा ब्राह्मणालाच त्याची शक्ति व सुकृत किंवा अभ्यास-अनुष्ठान यांच्या अपेक्षेनें तीन प्रायश्चित्तें व्यवस्थित आहेत, असें जाणावें. मरणापासून आपणास सोडविणारांनाही यमानें असें प्रायश्चित्त सांगितलें आहे. जल, अग्नि व फांस लावून टांगून घेणें, यांपासून भ्रष्ट झालेले, संन्यास व उपवास यांपासून च्युत

झालेले, विष, भृगुपात व शस्त्रघात यांपासून हटलेले हे प्रत्यवसित नव्हेत तर सर्वलोकबहिष्कृत होत. ते शक्ति, गुण, इत्यादिकांच्या अपेक्षेनें चांद्रायण व दोन तप्तकृच्छ्रें यांच्या योगानें शुद्ध होतात. वसिष्ठानें 'आत्मत्यागी जिवंत राहिल्यास त्यानें द्वादशरात्र कृच्छ्र व त्रिरात्र उपवास करावा.' असें जें सांगितलें आहे तें ज्यानें अशास्त्रीय मरणाचा निश्चय करून कसातरी जीव वांचविला आहे त्याविषयीं जाणावें किंवा नुस्ता निश्चय केल्यास त्रिरात्र व शस्त्रादिकांनीं क्षत झाल्यास द्वादशरात्र असें समजावें.

हें अवकीर्णिप्रायश्चित्त गुरुभार्या किंवा तिच्यासारख्याच दुसऱ्या स्त्रिया यांस सोडून बाकीच्या सर्व अगम्य स्त्रियांविषयीं जाणावें. कारण, गुरुभार्या व तत्सम स्त्रियांविषयीं अतिशय गुरुप्रायश्चित्त सांगितलें आहे. लघु अवकीर्णीच्या व्रतानें द्वादशवार्षिकादिकानेंच जाणाऱ्या महापातकदोषाचें निरसन होणें योग्य नव्हे. ब्रह्मचारित्वामुळें लघुप्रायश्चित्ताचें विधान केलें आहे, असें म्हणणेंही सयुक्तिक नव्हे. कारण, अन्य आश्रमांच्या प्रायश्चित्तांची द्वैगुण्यादि वृद्धि ब्रह्महत्याप्रकरणांत सांगितली आहे. येथें अगम्यागमनाचें पृथक् प्रायश्चित्त करण्याचें कांहीं प्रयोजन नाहीं. कारण, ब्रह्मचाऱ्याचें कोणत्याही स्त्रीच्या ठायीं ब्रह्मचर्यस्खलन होणें, हें अगम्यागमनावांचून होणें शक्यच नाहीं. यास्तव, दुसऱ्याही ज्या निमित्तामध्यें जें दुसरें निमित्त, मग तें सम असो कीं न्यून असो, पण अवश्य होणारच, त्याच्याकरितां पृथक् नैमित्तिकाची योजना करीत नाहींत. जसें–मनूनें ( अ. ११ श्लोक २०८ ) 'ब्राह्मणाला मारण्याच्या इच्छेनें दंडादि उगारल्यास कृच्छ्र, मारल्यास अतिकृच्छ्र व रक्त काढल्यास कृच्छ्रातिकृच्छ्र करावें,' असें सांगितलें आहे. आतां येथें रक्त काढणें या निमित्तांत काठी उगारणें व मारणें हीं दोन निमित्तें अवश्य होणारीं आहेत; यास्तव, त्यांचीं कृच्छ्र व अतिकृच्छ्र हीं नैमित्तिकें पृथक् सांगितलेलीं नाहींत. यास्तव, दुसऱ्या ठिकाणींही असेंच तर्कानें जाणावें. पण जेथें निमित्तांचा अंतर्भाव होतोच असा नियम नाहीं तेथें नैमित्तिकांचा पृथक् प्रयोग केला जातो. जसें–जेव्हां पर्वाच्या दिवशीं रजस्वला परभार्येशीं तेलानें अभ्यंग करून दिवसा गमन करतो, इत्यादि. येथें परभार्या गमनाला पर्व, रजस्वलात्व, तैलाभ्यंग व दिवस हीं निमित्तें कांहीं अवश्य नाहींत, तर त्यांवाचूनही परस्त्रीगमन होऊं शकतें. यास्तव, त्यांस उद्देशून पृथक् नैमित्तिकांचा ( प्रायश्चित्तांचा ) प्रयोग होतो.

**शंका**--ब्रह्मचाऱ्याला स्त्रीगमनाचे वेळीं अगम्यागमन अवश्यच आहे, असें म्हणतां येत नाहीं. जसें–पुत्रिकागमनामध्यें अगम्यागमनाचा दोष नाहीं. कसा तो पहा–पुत्रिका कन्या तर नव्हेच. कारण, ती क्षतयोनि असते. परभार्याही नव्हे. कारण, तिचें प्रदान झालेलें नसतें. ती वेश्याही नव्हे. कारण, ती वेश्येची वृत्ति करीत नाहीं, व विधवाही नव्हे. कारण, तिचा भर्ता मेलेला नसतो. यास्तव, पुत्रिकेचा अगम्या स्त्रियांमध्यें कोठेंही अंतर्भाव होत नसल्यामुळें ती प्रतिषिद्ध नाहीं. तस्मात् तिच्या ठिकाणीं ज्याचें ब्रह्मचर्य स्खलन पावलें आहे त्याला केवल अवकीर्णिव्रतच युक्त होय. पण जो पुत्रिकेवांचून अन्य स्त्रीचे ठायीं अवकीर्ण झाला असेल त्यानें मात्र अवकीर्णिव्रत व दुसऱ्या निमित्ताचा संपात झाल्यामुळें त्याचें निराळें नैमित्तिक करावें.

**समाधान**--हें म्हणणें बरोबर नाहीं. पुत्रिकेचाही परभार्यांमध्यें अंतर्भाव होतो. तिचें प्रदान जरी केलेलें नसलें तरी ती गांधर्वादि विवाहविधीनें वरलेल्या भार्येप्रमाणें विवाह-संस्कारानें संस्कृत झालेली असते. जिचा भ्राता, पिता, इत्यादि कोण हें कळत नाहीं तिच्याशीं सुज्ञानें पुत्रिकाधर्मशंकेनें विवाह करूं नये, असा प्रतिषेध असल्यामुळें सगोत्रा कन्यांचे ठायीं जसें, तसेंच तिच्या ठायींही कोणाचें भार्यात्वच प्राप्त होत नाहीं, असेंही समजूं नये. कारण, व्यंग अंगांच्या कन्येच्या प्रतिषेधाप्रमाणें हा वरील प्रतिषेधही दृष्ट प्रयोजनार्थ आहे. 'पुत्रिकाधर्मशंकया' अशा हेतूचें ग्रहण केलेलें असल्यामुळें तो ( निषेध ) दृष्टार्थ आहे, हें अगदीं स्पष्ट होय. विवाह केवल पुत्राकरितांच करीत नसतात तर तो धर्मा-करितांही करावयाचा असतो. वास्तव, ज्यानें पुत्राला उत्पन्न केलें आहे व नंतर ज्याची भार्या मरण पावली आहे त्यानें धर्माचरणाकरितां पुत्रिकेशीं विवाह केल्यास काय विरोध आहे ? याविषयीं अधिक प्रपंच पूर्वी केला आहे. वास्तव, त्यांतच अत्यासक्ति पुरे झाली. तस्मात् ब्रह्मचाऱ्याचें ब्रह्मचर्य स्त्रीचे ठायीं स्खलन पावल्यास त्यांत अगम्यागमनाचा अंतर्भाव अवश्य होत असल्यामुळें त्याकरितां पृथक् नैमित्तिक योजावयास नको, असें जें वर म्हटलें आहे, तें अगदीं उचित आहे २८०.

ब्रह्मचारिप्रायश्चित्ताच्या प्रसंगानें दुसरेंही अनुपातक प्रायश्चित्त सांगतात—

**भैक्षाग्निकार्ये त्यक्त्वा तु सप्तरात्रमनातुरः ।**
**कामावकीर्ण इत्याभ्यां जुहुयादाहुतिद्वयम् ॥ २८१ ॥**
**उपस्थानं ततः कुर्यात्समासिञ्चन्त्वनेन तु ।**

जो व्याधीनें आतुर नसलेला ब्रह्मचारी सात अहोरात्र निरंतर भैक्ष व अग्निकार्य यांचा त्याग करितो त्यानें 'कामावकीर्णोऽस्म्यवकीर्णोस्मि कामकामायस्वाहा' व 'कामावपन्नोस्म्यव-पन्नोस्मि कामकामायस्वाहा' या दोन मंत्रांनीं आहुति देऊन 'समासिञ्चन्तु मरुतः०' इत्यादि मंत्रांनीं अग्न्युपस्थान करावें. हें प्रायश्चित्त गुरुपरिचर्यादि गुरुतर कार्यांमध्यें व्यग्र असल्यामुळें भैक्ष व अग्निकार्य यांचा लोप झाल्यास समजावें. पण व्यग्र नसतांनाच जेव्हां ब्रह्मचारी हीं दोन्हीं सोडतो तेव्हां मनूनें सांगितल्याप्रमाणें अवकीर्णिव्रत करावें. यज्ञोपवी-ताचा विनाश झाल्यास हारीतानें असें प्रायश्चित्त सांगितलें आहे. 'मनोज्योतिः०' इत्यादि मनोलिंगयुक्त व 'त्वमग्ने व्रतपा०' इत्यादि व्रतलिंगयुक्त मंत्रांनीं चार घृताहुती होमून पुनः उपनयनोक्त मार्गानें समंत्रक नवें यज्ञोपवीत धारण करावें. तसेंच असद्भैक्ष खाल्ल्यास, शय्येवर शयन करीत असतानांच सूर्योदय अथवा सूर्यास्त झाल्यास, वान्ति झाल्यास, दिवसा निजल्यास, नग्न स्त्री दृष्टी पडल्यास, नग्न शयन केल्यास, स्मशानादिकावरून चालून गेल्यास, घोड्यावर बसल्यास, व पूज्यांचा अतिक्रम केल्यास याच चार आहुती द्याव्या. वृक्षादि स्थावर व सर्पादि यांचा वध झाल्यास 'यद्देवा देवहेडनं' इत्यादि कूष्मांडींनीं घृतहोम करावा. रत्न, वस्त्र, गृह इत्यादिकांचा प्रतिग्रह केल्यास आठसहस्र सावित्रीजप करावा. यज्ञोपवीतावाचून भोजन व विष्ठा-मूत्रत्याग केल्यास 'आठसहस्र गायत्री व प्राणायाम यांनीं शुद्ध होतो,' असें मरीचीनें सांगितलेलें प्रायश्चित्त जाणावें २८१.

मधुमांसाशने कार्यः कृच्छ्रः शेषव्रतानि च ।
प्रतिकूलं गुरोः कृत्वा प्रसाद्यैव विशुद्ध्यति ॥ २८२ ॥

ब्रह्मचाऱ्यानें अबुद्धिपुरःसर मधु व मांस यांचें भक्षण केल्यास कृच्छ्र करावें व त्यानंतर अवशिष्ट व्रतें संपवावीं. पण हें शिष्टांच्या भोजनास योग्य असलेल्या सशादिकांच्या मांसभक्षणाविषयीं जाणावें. कारण, वसिष्ठानें तसें सांगितलें आहे. वसिष्ठांच्या वचनांत 'द्वादशरात्र कृच्छ्र' असें म्हणून कामतः अभ्यास केल्यास अतिकृच्छ्र, पराक इत्यादिकांची प्राप्ति सुचविली आहे. पण तो ब्रह्मचारी केवल मांसानेंच नष्ट होणाऱ्या व्याधीनें आकुल झाला असल्यास त्यानें तें मांस गुरूकडून उच्छिष्ट करवून नंतर स्वतः खावें. कारण, त्याच महर्षींनीं 'स चेद्व्याधितः कामं गुरोरुच्छिष्टं भेषज्यार्थं सर्वं प्राश्नीयात्' असें म्हटलें आहे. त्यांतील सर्व हें पद मांस-लसुण इत्यादि सर्व अभक्ष्यांचा संग्रह करण्याकरितां आहे. त्याच्या भक्षणानें व्याधि नष्ट झाला असतां बौधायनाच्या सांगण्याप्रमाणें 'हंसः शुचि षद्०' या मंत्रानें आदित्याचें उपस्थान करावें. मधुही अज्ञानतः प्राशन केल्यास कांहीं दोष नाहीं, असें वसिष्ठांचें म्हणणें आहे. अन्यसूतकान्नादि भक्षणाचें प्रायश्चित्त अभक्ष्यभक्षण प्रायश्चित्त प्रकरणांत सांगूं. आज्ञे-प्रमाणें न वागतां तिचा प्रतिघात करणें इत्यादिकांच्या योगानें गुरूच्या प्रतिकूल आचरण करणारा ब्रह्मचारी पायांवर प्रणाम करणें, इत्यादिकांच्या योगानें गुरूला प्रसन्न केल्यानें शुद्ध होतो २८२.

ब्रह्मचारिप्रायश्चित्ताच्या प्रसंगानें गुरूचेंही प्रायश्चित्त सांगतात—

कृच्छ्रत्रयं गुरुः कुर्यान्म्रियते प्रहितो यदि ।

जो गुरु शिष्याला चोर, सर्प, व्याघ्र, इत्यादिकांच्या भयानें आकुल असलेल्या प्रदेशीं गर्द अंधकारानें व्यापलेल्या मध्यरात्रीं कांहीं कार्याकरितां धाडतो व ज्यानें प्रेरणा केल्यामुळेंच तो ( शिष्य ) अशा वेळीं व जागीं जाऊन दैववशात् मरतो त्या गुरूनें तीन प्राजापत्यादि कृच्छ्रें करावीं. तीन प्राजापत्यें असें समजूं नये. कारण, तसें समजल्यास पृथक् निवेशिनी संख्या अयोग्य होईल. 'एकादश प्रयाजान् यजति' येथील अकरा ही आवृत्ति सुचविणारी संख्या जशी आहे तशी 'त्रयं' ही प्राजापत्याची आवृत्ति सुचविणारी संख्या आहे, असें म्हणतां येत नाहीं. कारण, पृथक् स्वरूप संभवत असतांना आवृत्तीची अपेक्षा करणें हा अन्याय आहे. ही उत्पन्न झालेल्या वस्तूची संख्या जर असती तर कशीतरी आवृत्तीची अपेक्षा आहे असें म्हणतां आलें असतें. पण ही उत्पत्तिगत आहे. यास्तव 'तिस्र आज्याहुतीर्जुहोति' या वाक्याप्रमाणें पृथक् स्वरूपाच्या अपेक्षेनेंच तीन या संख्येची योजना करणें युक्त आहे.

आतां सकलहिंसाप्रायश्चित्ताचा अपवाद सांगतात—

क्रियमाणोपकारे तु मृते विप्रे न पातकम् ॥२८३॥

आयुर्वेदांतील उपदेशानुसार औषध-पथ्यान्न इत्यादि देऊन चिकित्सेच्या योगानें ज्या ब्राह्मणादिकांवर उपकार करावयास आरंभ केलेला असतो तो दैववशात् मेल्यासही चिकित्स-काला पातक लागत नाहीं. येथें विप्राचें ग्रहण प्राणिमात्राच्या उपलक्षणार्थ आहे. म्हणूनच

संवर्तादिकांनीं ' गायीच्या चिकित्सेकरितां यंत्रणप्रसंगीं, मूढगर्भ सोडवितांना गाय मरण पावल्यास कांहीं दोष नाहीं,' असें सांगितलें आहे. व आम्हीही त्याचा वर विस्तार केला आहे. २८३.

मिथ्या आरोप करणाराला प्रायश्चित्त सांगण्याच्या इच्छेनें प्रथम तदुपयोगी अर्थवाद सांगतात—

**मिथ्याभिशंसिनो दोषो द्विः समो भूतवादिनः ।**
**मिथ्याभिशस्तदोषं च समादत्ते मृषा वदन् ॥२८४॥**

दुसऱ्याचा उत्कर्ष, ईर्ष्या, इत्यादिकांमुळें उत्पन्न झालेल्या रोषानें ज्याचें अंतःकरण कलुषित झालें आहे तो लोकांसमक्ष ( यानें ब्रह्महत्यादि पाप केलें इत्यादि प्रकारचा ) खोटाच आरोप जेव्हां त्या दुसऱ्यावर करतो तेव्हां त्याला तोच आरोपित दोष दुप्पट लागतो. जो एकाद्यामध्यें खरोखर विद्यमान असलेलाच, पण लोकांना माहित न झालेला दोष लोकांसमक्ष प्रकट करतो त्यालाही त्या पातक्याइतकाच दोष लागतो. आपस्तंबानें असेंच सांगितलें आहे. मिथ्या आरोप करणारा केवळ त्या द्विगुण दोषास पात्र होतो इतकेंच नव्हे तर ज्याच्यावर आरोप केला त्याचें दुसरें जितकें दुरित असतें त्याचेंही तो ग्रहण करतो. हा पुढें सांगावयाच्या प्रायश्चित्ताविषयी अर्थवाद आहे. पापद्वैगुण्यादि प्रतिपादन येथें विवक्षित नाहीं. कारण, निमित्त लघु आहे, व लघु प्रायश्चित्तच पुढें सांगावयाचें आहे. शिवाय येथें सांगितलेलें हें खरेंच आहे, असें समजल्यास कृतनाश व अकृत-अभ्यागम याचा प्रसंग येतो. ( केलेल्या कर्माचा फलभोगावांचून नाश व स्वतः न केलेल्या कर्माचा फलभोग घेण्याची प्राप्ति यांना कृतनाश व अकृताभ्यागम म्हणतात ) २८४.

आतां त्याला प्रायश्चित्त सांगतात--

**महापापोपपापाभ्यां योऽभिशंसेन्मृषा परम् ।**
**अब्भक्षो मासमासीत स जापी नियतेन्द्रियः ॥ २८५ ॥**

जो ब्रह्महत्यादि महापापानें किंवा गोवधादि उपपापानें दुसऱ्यावर खोटाच आरोप करतो त्यानें एक महिनाभर जलभक्षण करून जपशील व जितेंद्रिय होऊन रहावें. शुद्धशब्दानें युक्त असलेल्या ऋचांचा जप करावा. कारण वाशिष्ठानें तसें करण्यास अथवा अश्वमेधाच्या अवभृथांत जाण्यास सांगितलें आहे. दुसऱ्या अतिपातकांचाही महापापादि शब्दानें संग्रह करावा. हें प्रायश्चित्त ब्राह्मणानेंच ब्राह्मणावर मिथ्या आरोप केल्यास जाणावें. पण जेव्हां ब्राह्मण क्षत्रियादिकांवर किंवा क्षत्रियादि ब्राह्मणावर आरोप करितात तेव्हां 'प्रतिलोमापवादामध्यें द्विगुण, त्रिगुण दंड जाणावा. व आनुलोम्यानें अर्ध-अर्ध न्यून करावा ' या वचनानुसार दंडाच्या अनुरोधानेंच प्रायश्चित्ताची कल्पना करावी. परंतु, विद्यमान असलेलाच दोष जो प्रकट करतो, त्याला पूर्वोक्त अर्थवादानुसार व दंडानुसार त्याच्या अर्धें प्रायश्चित्त सांगावें. त्याचप्रमाणें अतिपातकाचा मिथ्या आरोप करणाराला हेंच पाऊणपट व्रत. पातकाचा आरोप करणाराला अर्धें व उपपातकाचा आरोप करणाराला पाद. कारण, मनूनें ( अ. ११ श्लो. १२६ ) उपपातकभूत क्षत्रियवधाला महापातकाच्या प्रायश्चित्ताचा चतुर्थांश सांगितला आहे. याचप्रमाणें

प्रकीर्ण आरोप करणारालाही उपपातकाहून न्यून प्रायश्चित्त सांगावें. कारण ' शक्ति व पाप यांचा विचार करून प्रायश्चित्ताची कल्पना करावी,' असें स्मृतिवचन आहे. शंख-लिखितांनीं ' नास्तिक, कृतघ्न, कूटव्यवहारी, ब्राह्मणवृत्तीचा घात करणारा, व मिथ्या आरोप करणारा यांनीं सहा वर्षे ब्राह्मणाच्या येथें भिक्षा मागावी. एक वर्षभर भिक्षान्न पाण्यानें धुवून खावें किंवा सहा महिने गायींचें अनुचरण करावें ' असें जें सांगितलें आहे तें गुरुप्रायश्चित्त असल्यामुळें, त्या पापांच्या अभ्यासाच्या तारतम्याप्रमाणें योजावें २८५.

आतां अभिशस्ताला ( ज्याच्यावर आरोप केला आहे त्याला ) प्रायश्चित्त सांगतात-

**अभिशस्तो मृषा कृच्छ्रं चरेदाग्नेयमेव वा ।**
**निर्वपेत्तु पुरोडाशं वायव्यं पशुमेव वा ॥ २८६ ॥**

पण ज्याच्यावर मिथ्या आरोप झाला असेल त्यानें कृच्छ्र प्राजापत्य करावें. किंवा अग्नि ज्याची देवता आहे अशा पुरोडाशानें यजन करावें. किंवा वायुदैवत्य पुरोडाश अथवा वायुदैवत्य पशु यानें यजन करावें. या तीन पक्षांची शक्ति व संभव यांच्या अपेक्षेनें व्यवस्था लावावी. वसिष्ठानें 'अभिशस्तालाही एक मास जलभक्षण ' जें सांगितलें आहे तें कांहीं काल प्रायश्चित्त न करितांच राहिलेल्याविषयीं आहे. कारण ' संवत्सराभिशस्तस्य दण्डस्य द्विगुणो दमः । अभिशस्तानें वर्षभर तसेंच राहिल्यास दुप्पट दंड द्यावा, ' असें ह्मणून दंडाचें आधिक्य दाखविलें आहे. पैठीनसीनें ' मिथ्या आरोप केल्या जाणाऱ्या पुरुषानें सामान्य पातकाचें एकमासकृच्छ्र व महापातकाचें द्विमासकृच्छ्र हें प्रायश्चित्त करावें, ' असें जें सांगितलें आहे त्याचा व वरील वसिष्ठप्रोक्त प्रायश्चित्ताचा विषय एकच आहे. बौधायनानें ' पातकाचा मिथ्या आरोप करणाराला कृच्छ्र व आरोपिताला त्याच्या अर्धे ' असें जें म्हटलें आहे तें उपपातकादिकाविषयीं अथवा अशक्ताविषयीं आहे. अशाचरीतीनें दुसऱ्याही अभिशस्तविषयक उक्तींच प्रायश्चित्तांची काल, शक्ति इत्यादिकांच्या अपेक्षेनें व्यवस्था जाणावी. कारण, मनूनें ( अ. ११ श्लो २०० ) ' अपांक्तय जे पतितादिक त्यांनीं एक महिनाभर दोन दिवस मुळींच न जेवतां तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं एकदां जेवावें. किंवा वेदाच्या संहितेचा जप करावा. अथवा ' देवकृतस्यैनसो ० ' या मंत्रानीं होम करावा. कारण, त्यांच्या पापाचें हेंच प्रायश्चित्त आहे. ' असें सांगितलें आहे. अपांक्त्यामध्यें अभिशस्तादिक पठित आहेत. असो; असल्या मिथ्या आरोपांत अभिशस्ताचें निषिद्धाचरण जरी उपलब्ध होत नाहीं तरी त्याच्यावर मिथ्या अभिशाप येणें, ह्याच लिंगावरून पूर्वजन्मांतील निषिद्धाचरणाच्या अपूर्वामुळें हें प्रायश्चित्त, ज्यांना कृमींचा दंश झाला आहे त्यांच्याप्रमाणें प्राप्त आहे. यास्तव, त्यांत कांहीं विरोध नाहीं २८६.

**अनियुक्तो भ्रातृजायां गच्छंश्चान्द्रायणं चरेत् ।**

जो नियोगावाचून ज्येष्ठ किंवा कनिष्ठ भ्रात्याच्या भार्येशीं गमन करतो त्यानें चांद्रायण करावें. हें एकदा अबुद्धिपूर्वक गमन केल्यास जाणावें. पण शंखानें त्यांना एक संवत्सर ब्राह्मणाच्या येथें भैक्षचर्या करावयास जें सांगितलें आहे, तें कामतः गमन केल्यास त्याविषयीं आहे. शिवाय,

त्रिरात्रान्ते घृतं प्राश्य गत्वोदक्यां विशुद्ध्यति ॥ २८७ ॥

जो आपल्याच रजस्वला भार्येशीं गमन करतो तो त्रिरात्र उपोषण करून व शेवटीं घृत प्राशन करून शुद्ध होतो. पण हें अबुद्धिपूर्वक एकदांच गमन केल्यास जाणावें. त्याचाच अभ्यास केल्यास शातातपानें सांगितलेलें सात अहोरात्र उपोषण करावें. कामतः एकवार गमन केल्यासही हेंच. बृहत्संवर्तानें 'रजस्वला, गर्भिणी व पतिता यांच्याशीं जो गमन करतो त्याच्या त्या पापशुद्ध्यर्थ अतिकृच्छ्र उक्त आहे' असें जें सांगितलें आहे तें कामतः अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे. शंखानें तीन वर्ष जें सांगितलें आहे तें कामतः अगदीं लागोपाठ (सतत) अभ्यासाविषयीं आहे. रजस्वलांनीं परस्परांस स्पर्श केल्यास व त्या सवर्ण व एकाच पतीच्या भार्या असल्यास तत्काल स्नानानें शुद्धि. त्या सवती नसून, सवर्ण असल्यास व अकामतः स्पर्श झाला तरी नुस्तें स्नान. कारण, बृहद्वसिष्ठ व मार्कंडेय यांनीं तसें सांगितलें आहे. काश्यपानें 'ब्राह्मणी रजस्वलेला ब्राह्मणी रजस्वला शिवल्यास एकरात्र निराहार राहून पंचगव्य प्राशन करावें' असें जें म्हटलें आहे तें कामतः स्पर्श केल्यास जाणावें. ब्राह्मणविटाळशीला शूद्रा रजस्वला शिवल्यास ब्राह्मणी कृच्छ्रानें व शूद्री पादकृच्छ्र प्रत्याम्नायभूत निष्काच्या चतुर्थांशाच्या दानानें शुद्ध होते. वैश्या विटाळशी शिवल्यास ब्राह्मणीनें पाऊण कृच्छ्र व वैश्येनें पादकृच्छ्र, क्षत्रिया रजस्वलेचा स्पर्श झाल्यास ब्राह्मणीनें अर्धकृच्छ्र व क्षत्रियेनेंही अर्धकृच्छ्र करावें. क्षत्रिया व शूद्रजा या दोघी रजस्वलांनीं परस्परांस स्पर्श केल्यास क्षत्रियेनें तीन उपवास व शूद्रीनें अहोरात्र उपवास करावा. वैश्या व शूद्री यांचा परस्पर संसर्ग झाल्यास पहिली त्रिरात्र–उपवासानें व दुसरी दोन उपवासानें शुद्ध होते. पण ही सर्व शुद्धि कामतः स्पर्श केल्यास जाणावी. अकामतः स्पर्श केल्यास बृहद्विष्णूनें सांगितल्याप्रमाणें केवळ स्नानानें शुद्धि होते. पण शुद्धि होईतों कांहीं खाऊं नये. पतित, अंत्य, श्वपाक इत्यादिकांनीं स्पर्श केलेल्या रजस्वलेनें रजाचे चार दिवस होऊन गेले म्हणजे पहिल्या दिवशीं स्पर्श झालेला असल्यास त्रिरात्र, दुसऱ्या दिवशीं झालेला असल्यास द्विरात्र व तिसऱ्या दिवशीं झाल्यास एकरात्र उपोषण व त्यापुढें नक्त करावें. उष्ट्री शूद्री व कुत्रें यांचा स्पर्श झाल्यास दोन दिवस उपोषण करावें. हें कामतः स्पर्श केल्यास जाणावें; पण अकामतः चांडाल, अंत्य, कुत्रें, कावळा इत्यादिकांनीं स्पर्श केल्यास बौधायनानें सांगितल्याप्रमाणें शुद्ध होईतों निराहार रहावें. गांवकोंबडें, डुक्कर, कुत्रें इत्यादिकांनीं रजस्वलेला स्पर्श केल्यास तिनें स्नान करून चंद्रदर्शन होईतों उपोषण करावें, असें जें बौधायनानेंच म्हटलें आहे तें अशक्त स्त्रीविषयीं आहे. पण रजस्वला भोजन करीत असतांना कुत्रें इत्यादिकांचा स्पर्श झाल्यास सहा दिवस गोमूत्रयावकाहार करावा. पण हें करण्याचें सामर्थ्य नसल्यास ब्राह्मणास सोनें अथवा भोजन घालावें. दोघी उष्ट्या रजस्वलांचा परस्पर स्पर्श झाल्यास ब्राह्मणी कृच्छ्रानें व शूद्रा उपोषण व दान यांनीं शुद्ध होते, असें अत्रीचें वचन आहे. उच्छिष्ट ब्राह्मणांना रजस्वलेचा जर स्पर्श झाला तर ते ब्राह्मण अधरोच्छिष्ट असल्यास अहोरात्र व ऊर्ध्वोच्छिष्ट असल्यास तीन दिवस उपवासास योग्य होतात. (अधरोच्छिष्ट म्हणजे मूत्र–पुरीषोत्सर्ग

केल्यावर शौच करीपर्यंतची अवस्था व ऊर्ध्वोच्छिष्ट म्हणजे भोजनोत्तर मुखप्रक्षालनादि शौच करीपर्यंतची अवस्था. )

असो; याप्रमाणें अवकीर्णिप्रायश्चित्ताच्या प्रसंगानें कांहीं अनुपातक प्रायश्चित्तेंही सांगून आतां पुनः प्रकृत विषयाकडे वळूं या. उपपातकांत अवकीर्णानंतर सुतांचा विक्रय, या उपपातकाची गणना केली आहे. त्याची मनु व योगीश्वर यांनीं सांगितलेलीं सामान्य उपपातकांचीं त्रैमासिकादि प्रायश्चित्तें कामतः, अकामतः, जाति, शक्ति इत्यादिकांच्या अपेक्षेनें पूर्वींप्रमाणें व्यवस्थापित करावीं. शंखानें ' देवगृह, धर्मशाला, उद्यान, आराम, सभा, पाणपोयी, तडाग, पुण्य, सेतु व पुत्र यांचा विक्रय केल्यास तप्तकृच्छ्र करावें, ' असें व पराशरानें ' कन्या व गाय यांचा विक्रय करून सांतपन करावें ' असें जें म्हटलें आहे तें दोन्ही आपत्तींत अकामतः जाणावें. कामतः तर ' स्त्रियांचा विक्रय केल्यास चांद्रायण व्रत व पुरुषांचा विक्रय केल्यास द्विगुण व्रत विद्वानांनीं सांगितलें आहे, ' असें चतुर्विंशातिमतांत सांगितलें आहे. पैठनिसीनें ' आराम, तडाग कूपादिजलाशय, पुष्करिणी, पुण्य व पुत्र यांचा विक्रय केल्यास त्रिकाल स्नान, अधःशयन, व चवथ्यावेळीं भोजन एक संवत्सर सतत करावें, ' असें जें म्हटलें आहे तें एकच पुत्र असून त्याचा विक्रय झाल्यास त्याविषयीं जाणावें.

असो; सुतविक्रयानंतर धान्यकुप्यपशुस्तेय याची गणना केली आहे; पण त्याचें प्रायश्चित्त स्तेयप्रकरणांत विस्तारपूर्वक सांगितलें आहे २८६, २८७.

त्यानंतर ' अयाज्यांचें याजन, ' सांगितलें आहे, त्याचें प्रायश्चित्त सांगतात—

**त्रीन्कृच्छ्रानाचरेद्व्रात्ययाजकोऽभिचरन्नपि ।**
**वेदप्लावी यवाश्यब्दं त्यक्त्वा च शरणागतम् ॥ २८८ ॥**

जो सावित्रीपतितांचें याजन करतो त्यानें प्राजापत्यप्रमृति तीन कृच्छ्र करावे. गुरुलघुभूत तीन कृच्छ्रांची निमित्तांच्या गुरुलघुभावानें कल्पना करावी. त्याचप्रमाणें अभिचार करणारानेंही हेंच प्रायश्चित्त करावें. पण हें कथन अग्निद, विषद, इत्यादि आततायांस सोडून बाकीच्याविषयीं आहे. कारण, त्या सहा आततायींना मारण्याकरितां अभिचारकर्म केल्यास अभिचारक पतित होत नाहीं, असें वासिष्ठवचन आहे. अभिचरन्नपि येथलि अपि शब्द मनूनें (अ० ११ श्लो. १९७) सांगितलेल्या—हीनयाजक व अंत्येष्टियाजक—यांचा संग्रह करण्याकरितां योजला आहे. शातातपानें ' जो सावित्रीपतितांचें उपनयन करतो, वेदाध्यन सांगतो किंवा त्याच्याकडून यज्ञ करवितो त्यानें उद्दालकव्रत करावें, ' असें जे म्हटलें आहे तें बुद्धिपुरःसर केल्यास जाणावें. उद्दालकव्रताचें स्वरूप पूर्वीं सांगितलें आहे. हें कृच्छ्रत्रय साधारण उपपातकांच्या प्रायश्चित्ताचें अपवादक आहे. यास्तव, शूद्रादि अयाज्ययाजनामध्यें उपपातकसाधारणप्रायश्चित्त उपस्थित होतें. त्यांतील कामतः शूद्रयाजन केल्यास त्रैमासिक व अकामतः केल्यास योगीश्वरानें सांगितलेलें मासव्रतादि. प्रचेतानें शूद्रयाजकास उद्देशून ग्रीष्म, वर्षा व हेमन्त यांत पंचाग्नितपन, उघड्या अवकाशांत राहणें व जलवास आणि एक मास गोमूत्रयावक भोजन, असें जें सांगितलें आहे तें कामतः अभ्यास

केल्यास त्याविषयीं आहे. यमानें–स्नेहानें किंवा द्रव्यलोभानें शूद्रवर्णाच्या याजक ब्राह्मण पुरोताला कृच्छ्र सांगितलें आहे. पण तें अशक्ताविषयीं आहे. पैठीनसीनें 'शूद्रयाजक सर्व द्रव्य, परित्यागानें व दशसहस्र प्राणायामांचा अभ्यास केल्यानें पवित्र होतो,' असें जें सांगितलें आहे तेंही अकामतः घडलेल्या अभ्यासाविषयीं आहे. गौतमानें निषिद्ध पतितांच्या याजन-अध्यापनात्मक मंत्रप्रयोगाचा पुष्कळ अभ्यास केल्यास प्राकृत ब्रह्मचर्याचा जो उपदेश केला आहे तो कामतः केलेल्या अभ्यासाविषयीं आहे. जो आपल्या वेदाचा विप्लव करतो (पर्व-चांडालसांनिध्य इत्यादि अनध्यायप्रसंगीं अध्ययन करतो) व जो रक्षण करण्यास समर्थ असूनही चोरावांचून इतर शरणागतांचें रक्षण करीत नाहीं त्यानेंही एक संवत्सर यवोदन भोजन करावें. (विप्लव याचा आणखी एक असा अर्थ संभवतो. उत्कर्षाकरितां अध्ययन करणाराला 'काय पढतोस, तूं पठनाचा नाश केलास,' असा पर्यनुयोग देणें हा विप्लव होय.) वसिष्ठानें 'पतित, चांडाल, शव इत्यादिकांच्या संनिध अध्ययन केल्यास त्रिरात्र मौन धरून उपोषण करावें किंवा 'सहस्रपरमं' याचा अभ्यास करावा, असें म्हटलें आहे यावरून निंद्यलोकांना अध्ययन सांगणाऱ्या व त्यांच्याकडून यजन करविणाऱ्याविषयीं काय करावें तेंही सांगितल्यासारखेंच आहे. ते वरील प्रायश्चित्त करून दक्षिणात्यागानें पवित्र होतात, असें जें म्हटलें आहे तें बुद्धिपूर्व केल्यास त्याविषयीं आहे. षट्त्रिंशन्मतांत 'चांडाळाला ऐकूं जाईल अशा जागीं श्रुति व स्मृति यांचा पाठ केल्यास एकरात्र भोजन करूं नये,' असें अबुद्धिपूर्व पाठ केल्यास सांगितलें आहे. सर्प, नकुल, बकरें, मांजर, उंदिर, उंट, बेडूक, स्त्री, पुरुष, एडका, कुत्रा, घोडा, गाढव इत्यादि मध्यें आले असतां त्रिरात्र उपोषण करावें, त्रिकाल स्नान करावें किंवा रांगत दुसऱ्या गांवास जावें, असें यमानें सांगितलें आहे.

माता-पिता-पुत्र यांचा त्याग, तडाग, आराम इत्यादिकांचा विक्रय यांविषयीं मनु व योगीश्वर यांनीं सांगितलेल्या उपपातक साधारण प्रायश्चित्तांची पूर्वीप्रमाणेंच जाति, शक्ति, गुण इत्यादिकांच्या अपेक्षेनें योजना करावी. त्यांतील आईबापांच्या त्यागाचें अपांक्त्यनिमित्त प्रायश्चित्तही होतें. कारण, आई, बाप व गुरु यांचा निष्कारण त्याग करणाराची अपांक्त्यांमध्यें गणना केली आहे. (मनु. अ. ११ श्लो. २०० पहा.) या स्मृतींतही श्राद्धकांडांत स्तेन, पतित, क्लीव इत्यादि अपांक्त जन सांगितले आहेत. तडाग, आराम इत्यादिकांच्या विक्रयाविषयीं कांहीं विशेष प्रायश्चित्तें विषयांसह सुतविक्रयाचीं प्रायश्चित्तें सांगत असतांना वर्णिलीं आहेत.

त्यानंतर कन्यादूषण हें उपपातक आहे. त्यामध्यें ब्राह्मणादि वर्णांना सवर्ण कन्येला दूषित केल्यास त्रैमासिक, द्वैमासिकचांद्रायण इत्यादि सांगावीं. अनुलोम कन्यांना दूषित केल्यास एक मास पयःपान अथवा प्राजापत्य. कारण, त्या अनुलोम–कन्या सकाम असल्यास दोष नाहीं; नाहींतर दंड, असें म्हणून अल्प दंड सांगितला आहे. शंखानें 'कन्यादोषी व सोमविक्रयी यांनीं कृच्छ्र व जलपान करावें,' असें व हारीतानें 'कन्यादोषी, सोमविक्रयी, वृषलीपति, कौमारस्त्रीत्यागी, सुरा व मद्यपान करणारा, शूद्रयाजक, गुरूचा प्रतिघात करणारा, नास्तिक, नास्तिकवृत्ति, कृतघ्न, कूटव्यवहारी, मित्रद्रोही, शरणागतघाती व प्रतिरूपक-( अक्षरा-

सारखें अक्षर वगैरे काढून त्यावर ) वृत्ति यांनीं ग्रीष्मादि तीन ऋतूंत पंचाग्नितपनादि करावें, एक महिना गोमूत्रयावक भक्षण करावें; असें जें सांगितलें आहे तें दोन्ही क्षत्रिय व वैश्य यांना प्रातिलोम्यानें कन्यादूषण केल्यास उचित आहे. शूद्राचा तर वधच करावा. परिविंदकाचें याजन अथवा त्याला कन्यादान करणें, कौटिल्य, शिष्टांनीं प्रतिषेध न केलेल्या व्रताचा लोप करणें, आपल्या शरीरपोषणाकरितांच मिश्र अन्न शिजविणें व मद्यपान करणाऱ्या स्त्रीचें सेवन, या उपपातकांना साधारण उपपातकांचें प्रायश्चित्त पूर्वीप्रमाणें व्यवस्थापित करावें. पहिल्या दोघांविषयीं विशेष प्रायश्चित्तें परिवेदन–अयाज्ययाजन–प्रायश्चित्तांचें वर्णन चाललेलें होतें तेव्हां सांगितलीं आहेत.

त्यानंतर स्वाध्यायत्याग हें उपपातक गणलें आहे. व्यसनासक्त होऊन त्याचा त्याग केल्यास ' अधीतस्य च नाशनं ' या वाक्यानें ब्रह्महत्यातुल्य प्रायश्चित्त सांगितलें आहे. पण दुसऱ्या शास्त्राच्या श्रवणादिकांत आकुल झाल्यामुळें त्याचा त्याग झाल्यास त्रैमासिकादि उपपातकसाधारण प्रायश्चित्तांची जाति-शक्ति इत्यादिकांच्या अपेक्षेनें योजना करावी. वसिष्ठानें ' स्वाध्यायत्याग करणारानें द्वादशरात्र कृच्छ्र करून पुनः आचार्यापासून वेद शिकावा, ' असें अत्यंत आपत्कालास अनुलक्षून म्हटलें आहे. अग्नित्यागाचेंही त्यानेंच द्वादशरात्र कृच्छ्र हें प्रायश्चित्त करून पुनराधान करण्याविषयीं सांगितलें आहे. अग्नीच्या उत्सन्नकालाच्या अपेक्षेनें प्राजापत्यादि गुरुलघुकृच्छ्रांची प्राप्ति व्हावी म्हणून वर द्वादशरात्रीचें ग्रहण केलें आहे. अग्नीचा दोन महिने उच्छेद झाल्यास प्राजापत्य, चार महिन्यांत सतत उत्सन्न झाल्यास अतिकृच्छ्र व षण्मासोच्छेद झाल्यास पराक, त्यापुढेंही अग्नीचा उत्सन्नकाल वाढल्यास योगीश्वरानें सांगितलेलीं उपपातकसामान्य प्रायश्चित्तें कालादिकांच्या अपेक्षेनें योजावीं. आणि वर्षानंतर मनूनें सांगितलेलें त्रैमासिक, द्वैमासिक इत्यादि व्यवस्था जाणावी. पण हें नास्तिक्यानें अग्नित्याग केल्यास त्याविषयीं आहे. कारण, व्याघ्रानें तसें सांगितलें आहे. ' प्रमादानें जेव्हां अग्नीचा त्याग होतो तेव्हां शंभर प्राणायाम व तीन पासून वीस रात्रीपर्यंत अग्नित्याग झालेला असल्यास उपवास; त्यापुढें साठ रात्रीपर्यंत तीन उपवास; त्यापुढें वर्षापर्यंत प्राजापत्य; त्यापुढें जसा जसा काल वाढत जाईल तसा तसा दोष गुरु होईल, ' असें भारद्वाज गृह्यामध्यें सांगितलें आहे. पण आळसादिकांमुळें जेव्हां तो त्याग करितो तेव्हां त्यानेंच ' बारा दिवस अग्नीचा अतिक्रम झाल्यास तीन दिवस उपवास, एक मास अतिक्रम झाल्यास बारा दिवस उपवास, संवत्सराचा अतिक्रम झाल्यास मासोपवास किंवा जलपान, ' असें सांगितलें आहे. संवत्सराच्या पुढें तर वृद्ध हारीतानें असा विशेष सांगितला आहे–अग्निहोत्र एक संवत्सर उत्सन्न झाल्यास चांद्रायण करून पुनः आधान करावें. दोनवर्षें उत्सन्न झाल्यास चांद्रायण व सोमायन करावें. तीन वर्षें उत्सन्न झाल्यास एक संवत्सर कृच्छ्राचा अभ्यास करून पुनः आधान करावें. सोमायन पुढें कृच्छ्रकांडांत सांगूं. शंखानेंही ' अग्नीचा उत्साद करणारानें एक संवत्सर प्राजापत्य करून गाय द्यावी. कामतः सुतत्याग व बंधुत्याग केल्यास त्रैमासिक गोवधव्रत करावें आणि अकामतः त्याग घडल्यास योगीश्वरोक्त व्रतचतुष्टय शक्त्यनुसार योजावें ' असें सांगितलें आहे.

वृक्षच्छेदाचें प्रायश्चित्त पूर्वी सांगितलें. स्त्री व प्राणि यांचा वध, वशीकरण इत्यादिकांवर निर्वाह केल्यास व तिळ, ऊंस यांचा घाणा चालविल्यास तींच प्रायश्चित्तें तशींच योजावींत. द्यूत–मृगया इत्यादि व्यसनांचे ठायींही तींच प्रायश्चित्तें तशींच योजावीं. बौधायनानें द्यूत, अभिचार, अनाहिताग्नीची उञ्छवृत्ति, समावर्तन झालेल्याची भिक्षावृत्ति, व चार महिन्यांपुढें गुरुकुलांत वास, व्रात्याला अध्ययन सांगणें व नक्षत्रांचा निर्देश करणें यांचीं क्रमानें बारा महिने, सहा महिनें, द्वादश दिवस, बारा षडह, बाराव्यह, तीन दिवस व एक दिवस, प्रायश्चित्तें सांगून अशुचिकर कर्मांचा निर्देश केला आहे व त्यांत द्यूताला वार्षिक व्रत सांगितलें आहे. पण तें अभ्यासाविषयीं आहे. प्रचेतानें 'असत्यभाषी, चोर, राजभृत्य, वृक्षांचीं रोपें लावून निर्वाह करणारा, विष घालणारा आग लावणारा, अश्व, रथ, गज यांवर आरोह करून पोट भरणारा, रंगावर निर्वाह करणारा, कुत्रे बाळगून त्यावर उपजीविका करणारा, भाण्डिक ( बंदी नव्हे, पण मंगलवाद्यें वाजवून राजाला पहाटे उठविणारा, ) शूद्राचा उपाध्याय, शूद्रापति, नक्षत्रविद्येवर उपजीविका करणारा, सेवक, ब्राह्मणांची कार्यें मूल्य घेऊन करणारा, चिकित्सक ( वैद्य ), देवपूजा करून निर्वाह करणारा, पुरोहित, कितव ( जुगारी ), मद्यपान करणारा, कूट करणारा, अपत्यांचा विक्रय करणारा, मनुष्य व पशु यांचा विक्रय करणारा, या सर्व अशुचिकरांचा न्यायतः उद्धार करावा. ब्राह्मणव्यवस्थेनें सर्व द्रव्यत्याग केल्यावर एक संवत्सर चतुर्थकालाहार, व त्रिकालस्नान करावें. नंतर देवपितृतर्पण व गवान्हिक करावें. म्हणजे ते सर्व व्यवहारास योग्य होतात, ' असें जें सांगितलें आहे त्याचा व वरील बौधायनोक्त प्रायश्चित्तांचा विषय एकच. मासभर षष्ठान्नकालता इत्यादि मनूक्त अपांक्तेय प्रायश्चित्तेंही जात्यादिकांच्या अपेक्षेनें योजावीं. कारण, त्यानें सांगितलेल्या अपांक्तयांमध्यें कितवादि व्यसनी पुरुषांची गणना केलेली आहे. आत्मविक्रय व शूद्रसेवा यांच्या ठिकाणीं पूर्वीप्रमाणेंच सामान्य प्रायश्चित्तें योजावीं. बौधायनानें 'ब्राह्मणाचें समुद्रयान, ठेवीचा अपहार, सर्व अपण्यांचा व्यवहार, भूमीविषयीं मिथ्या भाषण, शूद्रसेवा व शूद्रास्त्रीचे ठायीं संतान निर्माण करणाराचें अपत्य होणारा यांनीं चतुर्थकालीं मित भोजन, त्रिकालस्नान, इत्यादि अनुष्ठान तीन वर्षें केल्यास शुद्धि होते ' असें जें सांगितलें आहे तें त्या पापांचें बहुकाल सेवन केल्यास होय. हीन जातीच्या लोकांशीं सख्य केल्यास उपपातक सामान्य प्रायश्चित्तेंच करावीं. पण प्रचेतानें ' मित्रभेद केल्यास अहोरात्र उपवास करावा व हवन करून जलपान करावें,' असें जें प्रायश्चित्त सांगितलें आहे तें अहीन पुरुषांच्या सख्याचा भेद केल्यास जाणावें. हीन योनीचें सेवन केल्यासही उपपातक सामान्य प्रायश्चित्तें योजावीं. क्षत्रियकन्यापूर्वी ब्राह्मणानें द्वादशरात्र कृच्छ्र करून तिच्याशींच विवाह करावा. वैश्याकन्येशीं विवाह होण्यापूर्वी समागम करणाऱ्या त्यानें तप्तकृच्छ्र व शूद्रापूर्वानें कृच्छ्रातिकृच्छ्र करून त्यांचें पाणिग्रहण करावें. क्षत्रिय वैश्यापूर्वी असल्यास त्यानेंही द्वादशरात्र कृच्छ्र व शूद्रापूर्वी असल्यास अतिकृच्छ्र करावें व तिच्याशीं विवाह करावा. शूद्रापूर्वी वैश्यानें द्वादशरात्र अतिकृच्छ्र करावें व तिचें पाणिग्रहण करावें,'

असें शातातपानें सांगितलें आहे. येथें कृच्छ्रादि प्रायश्चित्त केल्यावर प्रथम आपल्या सवर्ण कन्येशीं विवाह करून नंतर त्या दुसऱ्या वर्णाच्या कन्येशीं करावा, असें जाणावें. पण हें सर्व प्रायश्चित्त अज्ञानतः दोष घडल्यासच आहे. ज्ञानतः झाल्यास उपपातक सामान्य प्रायश्चित्तच निश्चित आहे. साधारण स्त्रीचा संभोग घेतल्यास हीनयोनिसेवनाचें जें प्रायश्चित्त तेंच करावें. कारण, हीनयोनिसेवनांत त्याचाही संग्रह होतोच. पण त्यांतूनही पशुवेश्यादिकांशीं अकामतः गमन केल्यास संवर्तोक्त प्राजापत्य, व कामतः गमन केल्यास यमानें सांगितलेलें सात दिवस प्रत्यहीं एकदां तापलेलें कुशोदक पिणें, हें प्रायश्चित्त करावें. त्याचेच ठिकाणीं उपपातकसामान्य प्रायश्चित्तें कामतः, अकामतः व अभ्यास यांच्या अपेक्षेनें योजावीं. पण त्याचा बुद्धिपुरःसर अभ्यास केल्यास प्रतिनिमित्ताबरोबर नैमित्तिक आवृत्त होतें, या न्यायानें प्रत्येक निमित्ताचें पृथक् नैमित्तिक प्रायश्चित्त प्राप्त झालें असतां लौगाक्षीनें त्याविषयीं असा विशेष सांगितला आहे–वेश्यादि गमनाचा अभ्यास केल्यास एक महिनापर्यंत जितके दिवस तो केला असेल तितकीं प्रायश्चित्तें करावीं. त्यापुढें एक वर्षपर्यंत जितके महिने अभ्यास झाला असेल तितकीं प्रायश्चित्तें करावीं. त्यापुढें जितके संवत्सर पापाचा अभ्यास केला असेल तितकीं प्रायश्चित्तें आचरावीं. पण हें प्रायश्चित्त बुद्धिपुरःसर केलेल्या अभ्यासाविषयीं आहे. अबुद्धिपूर्वक घडल्यास चतुर्विंशतिमतांत असा विशेष सांगितला आहे–एकदां केलेल्या पापाला जें प्रायश्चित्त सांगितलेलें असतें तेंच तीन दिवस केल्यास तिप्पट, महिनाभर केल्यास पांचपट, सहा महिने केल्यास दहापट, वर्षभर केल्यास पंधरापट व तीन वर्षें केल्यास वीसपट करावें. आणि त्यापुढें शातातपाच्या वचनाप्रमाणें कल्पना करावी. पहिल्यावेळीं सांगितलेल्या प्रायश्चित्ताहून दुसऱ्यावेळीं दुप्पट, तिसऱ्या वेळीं तिप्पट इत्यादि म्हणून प्रतिनिमित्ताबरोबर नैमित्तिकाची आवृत्ति होते, असें जें म्हटलें आहे तें महापातकाविषयीं होय, असें वरही एकदां सांगितलें आहे. यमानें साधारण स्त्रीगमनाचें गुरुतल्पव्रत जें सांगितलें आहे तें जन्मप्रभृति (बारा–चवदा वर्षांपासून) आग्रहानें सतत अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे.

असो; त्यानंतर 'अनाश्रमे वासः' ह्या उपपातकाचा निर्देश केला आहे व त्याविषयीं हारीतानें असा विशेष सांगितला आहे–एक संवत्सर अनाश्रमी राहणारानें कृच्छ्र प्राजापत्य करून आश्रमांत यावें. दोन वर्षें अनाश्रमी राहिल्यास अतिकृच्छ्र करावें. तिसऱ्या वर्षी कृच्छ्रातिकृच्छ्र करावें व त्यापुढें चांद्रायण करावें. हें असंभवाविषयीं आहे. पण जेव्हां संभव असेल तेव्हां सामान्यतः उपपातक प्रायश्चित्तें कामतः व अकामतः व्यवस्थापित करावीं. परपाकरुचि, असच्छास्त्राचें ज्ञान, खाणीचा अधिकार, व भार्याविक्रय यांमध्यें मनु व योगीश्वर यांनीं प्रतिपादिलेलीं उपपातकसामान्य प्रायश्चित्तें जाति, शक्ति, गुण इत्यादिकांच्या अपेक्षेनें कल्पावीं २८८.

'भार्याया विक्रयश्चैषां' येथील चशब्द मन्वादिकांनीं सांगितलेल्या असत्प्रतिग्रह–निंदित अन्न–इत्यादि उपपातकांचा द्योतक आहे, असें वर सांगितलें. आतां त्यांतलि असत्प्रतिग्रहाचें प्रायश्चित्त सांगतात.––

**गोष्ठे वसन्ब्रह्मचारी मासमेकं पयोव्रतः ।**
**गायत्रीजाप्यनिरतः शुद्ध्यतेऽसत्प्रतिग्रहात् ॥ २८९ ॥**

जो असत् ( निषिद्ध ) प्रतिग्रह करतो त्यानें ब्रह्मचर्ययुक्त होऊन, गोठ्यांत वास, गायत्री जप व एकमास पयोव्रत करावें, म्हणजे तो शुद्ध होतो. प्रतिग्रहाला असत्त्व दात्याची जाति व कर्म यांच्या योगानें येते. जसें, चांडालादि जाति व पतितादिकांचें कर्म. तसेंच देश-काल इत्यादिकांमुळेंही प्रतिग्रह असत् होतो. जसें–कुरुक्षेत्र, उपराग ( ग्रहण ) इत्यादि. ( कुरुक्षेत्रांत दान देणें दात्याला हितकर असलें तरी प्रतिग्रह करणाराला हितावह नाहीं. ग्रहणाचे वेळीं दात्याला पुण्य लागलें तरी प्रतिग्राहकाला दोष लागतो. ) तसेंच, प्रतिग्रह करावयाच्या द्रव्यामुळेंही तो असत् होतो. जसें–सुरा, मेषी ( बकरी ), मृतशय्या, उभयतोमुखी गाय इत्यादि, असो; पतितापासून जेव्हां कोणी मेष्यादिकांचा प्रतिग्रह करतो तेव्हां हें गुरु-प्रायश्चित्त करावें. कारण, या प्रतिग्रहांत पतित व मेषी, असे दोन व्याक्रम असल्यामुळें हें निमित्त गुरु आहे. असो; त्यांतील जपाविषयीं मनूनें ( अ. ११ श्लो. १९४ ) प्रत्यहीं गायत्रीचा तीन सहस्र जप हा विशेष सांगितला आहे. जेव्हां न्यायवर्ति ब्राह्मणादिकांपासून निषिद्ध मेष्यादि घेतो अथवा पतितादिकांपासून अनिषिद्ध भूम्यादिकांचा प्रतिग्रह करतो तेव्हां षट्त्रिंशन्मतांत सांगितल्याप्रमाणें पवित्रेष्टि, चांद्रायण, मृगारेष्टि, अथवा मित्रविन्द ऋचेचा लक्ष जप करावा. वृद्धहारीतानें–राजापासून प्रतिग्रह घेऊन एक महिनाभर सतत जलांत वास करावा. सहाव्या वेळीं म्हणजे तिसऱ्या दिवशीं सायंकाळीं जलभक्षण करावें. याप्रमाणें महिना पूर्ण झाला असतां शुद्ध होतो, असें जें सांगितलें आहे तें पूर्वोक्ताचाच अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे. अथवा तें पतितादिकांपासून कुरुक्षेत्रादिकांत ग्रहणादि समयीं कृष्णाजिनादिकांचा प्रतिग्रह केल्यास त्याविषयीं आहे, असें जाणावें. प्रतिग्रह करावयाचें द्रव्य अल्प असल्यामुळें प्रायश्चित्त अल्प. ‘ रत्न, वस्त्र, गायी इत्यादिकांचा प्रतिग्रह केल्यास सावित्री ऋचेचा आठ सहस्र जप करावा,’ असें हारीतानें व ‘ भिक्षापात्र घेऊन पुण्य मंत्राचा जप करावा. सर्व प्रतिग्रहांतील सहावा भाग दान करावा. ’ असें षट्त्रिंशन्मतांतही म्हटलें आहे. हें सर्व प्रायश्चित्त प्रतिग्रह केलेल्या द्रव्याचा त्याग केल्यानंतर जाणावें. कारण, मनूनें ( अ. ११. श्लो. १९३ ) तसें सांगितलें आहे. याच रीतीनें दुसरींही स्मृतिवाक्यें द्रव्याचें सार, अल्पत्व, महत्व इत्यादिकांच्या अनुरोधानें व्यवस्थापित करावीं.

इति उपपातकप्रायश्चित्तप्रकरणम् १०.

मिताक्षराकार म्हणतात–आतां आम्ही जात्याश्रयादि दोषानें व निंधान्नादिकांच्या निर्देशानें योगीश्वरानें सांगितलेल्या व्रतसमूहाचा विस्तार करितों. त्यांतील जातितः दुष्ट अशा पलांडु ( कांदा ) इत्यादिकांचें कामतः एकदांच भक्षण केल्यास चांद्रायण, कामतः निषिद्ध भक्षणाचा अभ्यास केल्यास सुरापानसमप्रायश्चित्त, अकामतः एकदांच भक्षण केल्यास सांतपन व अकामतः अभ्यास केल्यास यतिचांद्रायण करावें. बृहद्यमानें ‘ खट्वावार्ताक० ’

इत्यादिवचनानें प्राजापत्याचें जें विधान केलें आहे तें कामतः केलेल्या अभ्यासाविषयीं आहे. कारण, योगीश्वरानें मत्स्यादिकांस कामतः एकदांच भक्षण केल्यास तीन दिवस उपवास सांगितला आहे. यमानें तांदुळजा, पावसाळ्यांत उगवणारें कुत्र्याचें मूत, भूतृण इत्यादिकांचे भक्षण केल्यास प्राजापत्य करावें ह्मणून जें सांगितलें आहे तेंही बुद्धिपुरःसर अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे असें जाणावें. पण त्याच वरील शाका वगैरे अकामतः एकदांच भक्षण केल्यास मनूक्त एक अहोरात्र उपवास जाणावा. पण त्याचीच आवृत्ति (अभ्यास, वारंवार भक्षण) केल्यास प्रायश्चित्तांचीही आवृत्ति योजावी. अत्यंत अभ्यास केल्यास 'संसर्गदुष्ट, क्रियादुष्ट व स्वभावदुष्ट अन्न अकामतः भक्षण करून तप्तकृच्छ्र करावें' असें जें प्रचेतानें सांगितलें आहे त्याप्रमाणें करावें. नीळीचें अकामतः एकदांच भक्षण केल्यास आपस्तंबमुनींच्या वचनाप्रमाणें चांद्रायण करावें. कामतः अभ्यास केल्यास चांद्रायणाचीही आवृत्ति करावी. षट्त्रिंशन्मतांत 'शणपुष्प, शाल्मल, हातानें सारखें केलेलें दहीं, यज्ञस्थानावांचून इतरत्र पुरोडाश यांचें भक्षण केल्यास अहर्निश उपवास' असें जें सांगितलें आहे तेंही अकामतः भक्षण केल्यास जाणावें. 'लसूण, कांदा, गाजर व कवकभाजी यांचें भक्षण केल्यास आठ सहस्र गायत्री मंत्रांनीं त्याच्या मस्तकावर जलाभिषेक करावा.' असें जें सुमन्तूनें सांगितलें आहे तें बलात्कारानें इच्छा नसतांना भक्षण केल्यास त्याविषयीं अथवा केवल त्यांच्या योगानेंच शांत होणाऱ्या एकाद्या व्याधीकरितां खाल्ल्यास त्याविषयीं जाणावें. कारण, त्यासाठींच पुढें लागलेंच सुमन्तूनें 'हींच व्याधिताला भिषक्क्रियेंत अनिषिद्ध होतात,' असें म्हटलें आहे. यास्तव, अशाप्रकारचींच आणखीं दुसरी जीं कांहीं अभक्ष्य अन्नें आहेत तींहीं औषधोपचारार्थ भक्षण करण्यांत दोष नाहीं.

आतां जातिदुष्ट (वाफेस आलेल्या गायीचें दूध वगैरे) पदार्थांचें भक्षण केल्यास प्रायश्चित्त सांगतों. मनूनें (अ. ५ श्लो. ८–१०) गायीचें सुत्रेरांतलें दूध; उंट, गाढव वगैरे एकशफ प्राणी, बकरी, वाफेला आलेली गाय इत्यादिकांचें दूध इत्यादि अनेक अपेय पदार्थ सांगितले आहेत. त्यांचें अकामतः एकदांच पान केल्यास मनूनेंच 'शेषेषूपवसेदहः' या वचनानें सांगितलेला एक उपवास व कामतः पान केल्यास योगीश्वरोक्त त्रिरात्र उपवास करावा. पैठीनसीनें 'बकरी, गाढवी, उंटीण, व मानुषी यांचें दूध प्राशन केल्यास तप्तकृच्छ्र प्रायश्चित्त करून पुनरुपनयन करावें, सुत्रेरांतल्या गायीचें व म्हशीचें दूध प्याल्यास सहा रात्रीं उपोषण, व बकरीवाचून बाकीं सर्व द्विस्तनवतीचें दूध प्याल्यासही हेंच,' असें जें म्हटलें आहे तें व शंखानें 'वाफेस आलेल्या व विष्ठादि अशुद्ध भक्षण करणाऱ्या गयांचें दूध प्याल्यास पक्षव्रत' असें सांगितलें आहे तें अशीं दोन्ही कामतः अभ्यास व अकामतः अभ्यास या दोन पक्षीं क्रमानें योजावीं. कारण, त्यांचें एकदांच पान केल्यास विष्णूनें नुस्ता उपवास सांगितला आहे. तसाच याविषयीं वर्णसंबंधानें निषेधही आढळतो. तो असा–वृत्तस्थ क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र यांतील जो कोणी कपिला गायीचें दूध पितो त्याच्यासारखा अपुण्य करणारा आणखी कोणी नाहीं. पण या आणि अशाच दुसऱ्याही ज्या अपेय वस्तूंच्या पानाविषयीं प्रत्यक्ष शब्दांनीं प्रायश्चित्त सांगितलेलें नसेल तेथें मनूक्त एकदिन उपवास हें सामान्य प्रायश्चित्त जाणावें.

आतां स्वभावदुष्ट मांसादि भक्षणाचें प्रायश्चित्त सांगतों—तें कामतः एकदां भक्षण केल्यास मनूक्त साधारण प्रायश्चित्त ( एक उपवास ) करावें—पण कामतः चाषादि प्राण्यांस खाल्ल्यास योगीश्वरानें ( आचा. श्लो. १७५ ) सांगितलेलें त्रिदिन उपवास हें प्रायश्चित्त करावें. कामतः अभ्यास केल्यास मनूक्त ( अ. ११ श्लो. १५२ ) सप्तरात्र यवांची कण्हेरी प्यावी; पण हें विष्ठा खाणाऱ्या डुकरावाचून इतरांच्या मांसाविषयीं आहे, असें जाणावें. कारण, मनूनें ( अ. ११ श्लो. १५६ ) त्याकरितां तप्तकृच्छ्र सांगितलें आहे. डुक्कर, गाढवादि एकशफ, काक, कोंबडें, सर्व अभक्ष्य क्रव्याद यांचें मांस, मूत्र, पुरीष, गोमांस आणि कुत्रा, कोल्हा व वानर यांचें मांसादि खाल्ल्यास तप्तकृच्छ्र करावें, असें म्हटलेलें असल्यामुळें त्यांच्या मूत्र—पुरीषप्राशनाचेंही तेंच प्रायश्चित्त करावें. पण त्यांतल्यात्यांत त्यांचें कामतः प्राशन केल्यास तप्तकृच्छ्र व वारंवार प्राशन केल्यास कूष्मांडीसहित पराक अशी व्यवस्था करावी. प्रचेतानेंही कुत्रा, कोल्हा, कावळा, कोंबडा इत्यादिकांचें मांस कामतः खाल्ल्यास तप्तकृच्छ्र व मूत्रपुरीषप्राशन केल्यास अतिकृच्छ्र करावें. उशनानें ‘ नरमांस, श्वमांस, गोमांस, अश्वमांस व पंचनखांनीं युक्त असलेल्या प्राण्यांचें मांस खाल्ल्यास महा सांतपन करावें, ’ असें जें म्हटलें आहे तें अकामतः खाल्ल्यास समजावें. अंगिरानें ‘ बलाका, भास, गृध्र, उंदीर, गाढव, वानर, सूकर, यांस पाहून व त्यांच्या विष्टेस स्पर्श करून आचमन करावें. इच्छेनें यांचीं विष्टादि अभेध्यें खाल्ल्यास द्विजांनीं महासांतपन कृच्छ्र व अनिच्छेनें खाल्ल्यास प्राजापत्य करावें, ’ असें जें म्हटलें आहे तें भक्षण करून लागलींच उलटी केल्यास त्याविषयीं समजावें. वर, काक, खर, अश्व, व गज यांचें मांस किंवा विष्ठा—मूत्र खाल्ल्यास द्विजानें चांद्रायण करावें, असें व शुष्क मांस खाल्ल्यास विप्रानें चांद्रायण करावें, असें क्रमानें अंगिरा व वृद्धयम यांचें जें वचन आहे तें अकामतः अभ्यास घडल्यास त्याविषयीं आहे. शंखानें याचाविषयीं जें षण्मास व्रत सांगितलें आहे तें कामतः अत्यंत अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे. दुसऱ्या एका स्मृतींत त्याचेंच एक संवत्सर व्रत सांगितलें आहे. तें अत्यंत सतत अभ्यासाकरितां आहे. या प्रकरणांत मूत्र व पुरीष यांचें ग्रहण वसा, शुक्र, रक्त व मज्जा यांच्या उपलक्षणार्थ आहे. कानांतील मळ इत्यादि सहा मळांकरितां अर्धें प्रायश्चित्त. केशादिकांविषयीं कामतः त्रिरात्र उपवास व अज्ञानानें खाल्ल्यास एकरात्र उपवास. प्रचेतानें नख-केंस—माती इत्यादि अकामतः एकदांच भक्षण केल्यास अहोरात्र अभोजन सांगितलें आहे. ‘ केंस, कीट, नख, मत्स्यांचे कांटे यांचं भक्षण केल्यास सोनें घालून तापविलेलें घृत प्राशन करावें. म्हणजे तत्क्षणीं शुद्धि होते. ’ असें जें एका स्मृतींत सांगितलें आहे तें केंसादिक नुस्ते तोंडांत गेल्यास त्याविषयीं जाणावें. आतां पात्रांतील अन्न केंसादिकांनीं दूषित झालें असल्यास केंस, माक्षिका इत्यादि काढून टाकून हात धुवावे. पण हें प्रासंगिक आहे. अतिसूक्ष्म कृमि-कीट—हाड इत्यादिकांचें भक्षण केल्यास हारीतानें सांगितल्याप्रमाणें त्रिरात्र गोमूत्र-गोमयाहार करावा. असो; येणेप्रमाणें पशु—पक्षी, जलचर इत्यादिकांचें मांसादि खाल्ल्यास संक्षेपतः प्रायश्चित्तें सांगितलीं. ग्रंथविस्तार होईल या भीतीनें प्रत्येक व्यक्तीचें प्रायश्चित्त सांगत बसलों नाहीं.

आतां अशुचिसंस्पृष्ट भक्षणाचें प्रायश्चित्त सांगतों. पण त्यांतल्यात्यांत अगोदर उच्छिष्टभक्षणाचें प्रायश्चित्त सांगावयाचें आहे. मनूनें (अ. ११ श्लो. १५९) 'मांजर, कावळा, उंदीर कुत्रा, मुंगूस यांचें उष्टें अन्न खाल्ल्यास ब्रह्मसुवर्चला औषधि घालून कढविलेलें पाणी प्यावें,' असें सांगितलें आहे. पण त्यांत किती दिवस हें सांगितलें नसल्यामुळें अकामतः भक्षण केल्यास एक दिवसच करावें. विष्णूनें उच्छिष्टभक्षणाचें कृच्छ्रपाद सांगितलें आहे. तें कामतः भक्षण केल्यास जाणावें. संस्कार मनुस्मृतींतील द्रव्यशुद्धिकरणांत सांगितल्याप्रमाणें जाणावा. शातातपानें कुत्रा, कावळा इत्यादिकांनीं तोंड लावलेलें व शूद्राचें उच्छिष्ट खाल्ल्यास अतिकृच्छ्र प्रायश्चित्त अकामतः अभ्यासाविषयीं सांगितलें आहे. शंखानेंही त्याचाच कामतः अभ्यास केल्यास यावकव्रताचा उपदेश केला आहे. विष्णूनें ब्राह्मणादिकांच्या उच्छिष्ट भोजनाविषयीं असें सांगितलें आहे—ब्राह्मणानें शूद्राचें उच्छिष्ट खाल्ल्यास सात अहोरात्र, वैश्याचें उच्छिष्ट खाल्ल्यास पांच रात्र व क्षत्रियाचें खाल्ल्यास तीन रात्र पंचगव्य प्राशन करावें. आणि ब्राह्मणाचेंच उच्छिष्ट ब्राह्मणानें खाल्ल्यास एक दिवस पंचगव्य प्राशन करावें. पण तें कामतः खाल्ल्यास जाणावें. यमानें 'ब्राह्मणासह (एका पात्रांत) भोजन केल्यास प्राजापत्यानें, क्षत्रियासह केल्यास तप्तकृच्छ्रानें, वैश्यासह केल्यास अतिकृच्छ्रानें व शूद्रासह भोजन केल्यास चांद्रायणानें शुद्धि होते' असें जें सांगितलें आहे तें कामतः अभ्यासाविषयीं आहे. 'आतां ब्राह्मणाचें उष्टें खाल्ल्यास महाव्याहृतींनीं जल अभिमंत्रित करून प्यावें. क्षत्रियोच्छिष्ट भक्षण केल्यास ब्राह्मीचा रस घालून शिजविलेलें दूध तीन दिवस प्राशन करावें. वैश्योच्छिष्ट भक्षण केल्यास त्रिरात्र उपोषण करून ब्रह्मसुवर्चला औषधी घालून तापविलेलें दूध प्यावें व शूद्राचें उच्छिष्ट भक्षण केल्यास सहा अहोरात्र भोजन करूं नये' असें शंखाचें वचन आहे. तें अकामतः भक्षण करण्याविषयीं समजावें. त्याचाच अभ्यास झाल्यास द्वैगुण्यादिकांची योजना करावी. परंतु, पिता व ज्येष्ठ भ्राता यांचें उच्छिष्ट भक्षण करावें, असें आपस्तंबाचें वचन असल्यामुळें हें त्यास सोडून इतरांविषयीं आहे. आतां बृहद्व्यासानें 'माता, भगिनी, भार्या व दुसऱ्या स्त्रिया यांसह भोजन करूं नये व केल्यास चांद्रायण करावें' असें जें म्हटलें आहे तें सह भोजनाविषयीं आहे. उच्छिष्ट भोजनाचें आपस्तंबाच्या म्हणण्याप्रमाणें सप्तरात्र अभोजन हें प्रायश्चित्त करावें. अंगिरानें 'ब्राह्मणीसह किंवा तिचें उच्छिष्ट खाल्ल्यास कांहीं दोष नाहीं. असें सर्व विद्वान् मानतात' असें जें म्हटलें आहे तें विवाह किंवा आपत्काल यांस लागू आहे. अन्त्योच्छिष्ट भोजन केल्यास ब्राह्मणानें चांद्रायण, क्षत्रियानें कृच्छ्र व वैश्यानें अर्धकृच्छ्र करावें. चांडालादि अंत्यावसायी व पतित यांचें उच्छिष्ट खाल्ल्यास ब्राह्मणानें चांद्रायण, क्षत्रियानें महा सांतपन, वैश्यानें षड्रात्र व शूद्रानें त्रिरात्र व्रत करावें. आपत्तींत ब्राह्मणानें शूद्राचें अन्न खाल्ल्यास तो मनस्तापानें शुद्ध होतो. त्यानें द्रुपदांचा शंभर जप करावा. आपलेंच उष्टें पाणी व आपल्याच तोंडांतून खालीं पानांत पडलेलें अन्न जो खातो त्यानें चांद्रायण करावें. पण येथें निमित्त अतिलघु असल्यामुळें अत्यंत अभ्यासाविषयीं नैमित्तिक योजावें. ब्राह्मणानें भांड्यांत पिऊन राहिलेलें पाणी पुनः प्याल्यास किंवा तें उजव्या हातानें बुद्धिपुरःसर

प्याल्यास त्रिरात्र व्रत करावें. पण तेंच अकामतः प्याल्यास त्याच्या अर्धे. दीपोच्छिष्ट व अभ्यंग करून राहिलेलें तेल खाल्ल्यास षट्त्रिंशन्मतांत सांगितल्याप्रमाणें नक्त करावें.

आतां अशुचिद्रव्याचा ज्याला स्पर्श झाला आहे त्याचें भक्षण केल्यास प्रायश्चित्त सांगतों—केंस, कीट पडलेलें, स्नायु, अस्थि, चर्म यांचा स्पर्श झालेलें व नीली, मेंदीचा रस यांनीं भ्रष्ट झालेलें अन्न खाऊन एक दिवस उपवास करावा, असें संवर्त म्हणतो. ‘ केंस, कीट, रक्त, मांस, अस्पृश्य माणसानें स्पृष्ट, भ्रूणहानें पाहिलेलें, पक्ष्यानें तोंड घातलेलें, कुत्रा, डुक्कर, गाय यांनीं हुंगलेलें, आंबलेलें, शिळें, व्यर्थ शिजविलेलें, देवान्न व हवि यांचें भोजन केल्यास उपवास व पंचगव्याशन करावें, ’ असें शातातप म्हणतो. पण हें दोन्ही प्रकारचें प्रायश्चित्त अकामविषयक आहे. कारण, विष्टा—मूत्रादिकांनीं दूषित झालेलीं फळें, कंद, ऊंसादि मुळें, माती, जल, पुष्पें इत्यादिकांचा स्वाद कामतः घेतल्यास कृच्छ्रपाद सांगितला आहे. पण अल्प संसर्ग झाल्यास एक पाद व पुष्कळ संसर्ग झाल्यास अर्ध कृच्छ्र अशी योजना करावी. व्यासानें ‘ संसर्गदुष्ट, क्रियादुष्ट व स्वभावदुष्ट अन्न कामतः खाल्ल्यास तप्तकृच्छ्र करावें ’ असें जें म्हटलें आहे तें संसर्ग पावलेले अमेध्यादि रस प्रत्यक्ष दिसत असल्यास त्याविषयीं जाणावें. शंखानें, अमेध्य, पतित, चांडाल, पुल्कस, रजस्वला, नग्न, थोटा, कुष्टी, व ज्याचीं नखें वाईट आहेत अशांचा स्पर्श झालेलें अन्न बुद्धिपुरःसर खाल्ल्यास कृच्छ्र करावें म्हणून सांगितलें आहे. पण तेंच अबुद्धिपुरःसर भक्षण केल्यास अर्धे कृच्छ्र उक्त होय. अशक्ताकरितां विष्णूनें कुश, उदुंबर, बिल्व, फणस, कमळ, यांचीं पानें शंखपुष्पी व सुवर्चा हीं घालून केलेला काढा प्यावयास सांगितलें आहे. किंवा हा काढा रजकादिकांनीं स्पर्श केलेलें अन्न खाल्ल्यास त्याकरितां सांगितला आहे, असें जाणावें. शूद्र, अमेध्यसेवन करणारे किडे इत्यादिकांनीं भ्रष्ट केलेलें अन्न खाल्ल्यास अहोरात्र प्रायश्चित्त करावें. पंक्तींत इतर लोक भोजन करीत असतांना उठून जो उच्छिष्ट देतो, किंवा आचमन करितो किंवा निंदा करून जेथें अन्न दिलेलें असतें, त्या सर्वांचें हेंच प्रायश्चित्त जाणावें. उच्छिष्ट पंक्तींत भोजन करणारानेंही हेंच करावें व पंचगव्यानें शुद्ध व्हावें. डाव्या हातानें वाढलेलें अन्न खाल्ल्यास, उठून भोजन केल्यास, दुसऱ्यानें पात्र सोडल्यावर जेवल्यास सांतपन करावें. एका पंक्तींत वसून जेवणारांतील एकानेंही जरी पात्र सोडलें तरी बाकीच्यांनीं राहिलेलें अन्न खाऊं नये व मोहानें खाल्ल्यास तो उच्छिष्टभोजी होतो; इत्यादि पराशरानेंही याचविषयीं सांगितलें आहे. ज्यांत पंचनखप्राणी मरून पडले आहेत अथवा दुसऱ्या कांहीं निमित्तानें जो अत्यंत भ्रष्ट झाला आहे, अशा कूपाचें जल प्याल्यास ब्राह्मणानें त्रिरात्र, क्षत्रियानें दोन दिवस व वैश्यानें एकाह उपोषण करावें. शूद्रें नक्त करावें. शेवटीं सर्वांनीं पंचगव्य प्राशन करावें. पण एकाद्या जलाशयांत शव पडून व तें फुगून फुटून जल घाण झाल्यास व तेंच प्राशन केल्यास शुद्धीकरितां चांद्रायण किंवा तप्तकृच्छ्र करावें. कोणी ब्राह्मणानें प्रमादानें त्यांत स्नान केल्यास त्रिकाल स्नान व अहोरात्र जप करावा. वर शवानें दूषित झालेलें जल प्याल्यास चांद्रायण व्रत जें सांगितलें आहे तें मानुष मृतशरीर पडून भ्रष्ट झालेलें जल कोणी बुद्धिपुरःसर प्याल्यास त्याच्याकरितां आहे, पण तेंच

अकामतः प्याल्यास षड्रात्र. कारण, देवलानें इतर शवाच्या योगानें दूषित झालेलें जल प्याल्यास त्रिरात्र पयःपान व मानुष शवसंसृष्ट जल प्याल्यास षड्रात्र पयःपान सांगितलें आहे. चांडालाची विहीर, भांडें इत्यादिकांतील जल कामतः प्राशन केल्यास ब्राह्मणानें सांतपन, क्षत्रियानें प्राजापत्य, वैश्यानें त्याच्या अर्धें व शूद्रानें पाद प्राजापत्य करावें. पण तेंच अज्ञानानें प्याल्यास ब्राह्मण तीन दिवसाच्या व्रतानें शुद्ध होतो. क्षत्रिय दोन दिवस, वैश्य दीड दिवस व शूद्र एक दिवस व्रत करून शुद्ध होतो. चांडालादिकांचा ज्यांच्याशीं संबंध आहे अशा अल्पजलाशयाविषयींही अशीच शुद्धि जाणावी. मोठे जलाशय तर मुळीं दूषितच होत नाहींत. म्लेंच्छादिकांच्या पुष्करिणींत अथवा ऱ्हदांत गुडघाभर पाणी असे तों तें शुद्ध असतें. त्याहून कमी झालें असतां तें दूषित होतें. तें एकाद्या विप्रानें कामतः प्याल्यास अहोरात्र उपोषण करावें व अकामतः प्याल्यास नक्त भोजन करावें. रजकादिकांच्या भांड्यांतील जल, दधि, दूध इत्यादि प्याल्यास त्रैवर्णिकांची ब्रह्मकूर्चोपवासानें व शूद्राची उपवास व यथाशक्ति दान यांच्या योगानें शुद्धि होते. पण तेंच बुद्धिपुरःसर प्राशन केल्यास दुप्पट प्रायश्चित्त करावें. अंत्यजांनीं खणविलेले कूप, तडाग किंवा वापी यांमध्यें स्नान करून जलपान केल्यास प्राजापत्य करून शुद्ध व्हावें असें जें आपस्तंबानें सांगितलें आहे तें अभ्यासाविषयीं आहे. त्यानेंच चांडालांच्या कूपादिकांतील जलप्राशन केल्यास अशक्तांना नुसत्या पंचगव्यानें शुद्धि सांगितली आहे. पाणपोयींत जाऊन जलावाचून शरीराचा जो निषेक करतो त्यानें एकाह उपोषण व सचैल स्नान करावें. सुराघट, पाणपोयी व नौका यांतील जल प्याल्यास अहोरात्र उपोषण करून पंचगव्य प्राशन करावें.

आतां भावदुष्ट अन्नभक्षणाचें प्रायश्चित्त सांगतों--पदार्थाचा रंग व आकार यांच्या योगानें कांहीं विलक्षणता येऊन निंद्य शरीरमलादिकांची कल्पना होणें, हेंच भावदुष्टतेचें लक्षण होय. (जसें-शेवयांस पाहून जंताची भावना होणें अथवा या अन्नांत शत्रूंनीं विष तर घालविलें नसेल अशी शंका येणें. हेंही भावदुष्टतेचें लक्षण आहे.) त्याविषयीं पराशरानें असें म्हटलें आहे.-भावदूषित पात्रांत वाग्दुष्ट अथवा भावदुष्ट अन्न कामतः भक्षण केल्यास ब्राह्मणानें त्रिरात्र उपोषण करावें. गौतमानें त्याचीच उलटी करून घृतप्राशन करण्याविषयीं सांगितलें आहे. अभोज्य व अभक्ष्य यांच्या भक्षणाची शंका आल्यास ब्राह्मणानें त्रिरात्र समुद्रलवणावाचून रूक्ष ब्रह्मसुवर्चलेचें प्राशन करावें किंवा शंखपुष्पीचें जलपान करावें किंवा वसिष्ठानें सांगितल्याप्रमाणें पलाश, बेल, कुश, कमल व उदुंबर यांचीं पानें घालून केलेला काढा त्रिरात्र प्यावा. मनूनेंही (अ. ५ श्लो. २१) 'द्विजानें प्रतिवर्षी अज्ञानानें घडलेल्या अभक्ष्यभक्षणरूप दोषाचें निरसन व्हावें म्हणून एक तरी प्राजापत्यकृच्छ्र करावें. आणि ज्ञानतः जर असा कांहीं दोष केला असेल तर त्या त्या दोषास सांगितलेलें प्रायश्चित्त करावें' असें म्हटलें आहे.

आतां कालदुष्ट भक्षणाचें प्रायश्चित्त सांगतों-शिळें, दहा दिवसांतील सुवेराचें दूध, इत्यादि कालदुष्ट होय. तें अकामतः भक्षण केल्यास मनूक्त एकाह उपवास. पण कामतः

भक्षण केल्यास शंखानें सांगितलेलें त्रिरात्र व्रत करावें. सुवेरांतलें गायींचें दूध वगैरे प्याल्यास त्याचें प्रायश्चित्त वर सांगितलें आहे. नवें जल प्राशन केल्यास पंचगव्यप्राशन करावें, असें बृहद्याज्ञवल्क्यानें सांगितलें आहे. पण तेंच बुद्धिपुरःसर प्याल्यास उपवास करावा. योग्यकाळीं पाऊस पडून नदीला जें नवें पाणी येतें तें तीन दिवस पिऊं नये. पण अकालीं वृष्टि होऊन पाणी आल्यास तें दहा दिवस पिऊं नये, असें दुसऱ्या स्मृतींत सांगितलें आहे. असो. ग्रहण-कालीं भोजन केल्यास चांद्रायण करावें. कारण, शातातपानें नवश्राद्ध, ग्रामयाजकांचें अन्न, ग्रहणभोजन व स्त्रियांच्या प्रथम गर्भप्रसंगीं दिलेलें अन्न खाल्ल्यास चांद्रायण करण्याविषयीं सांगितलें आहे. त्याचप्रमाणें सूर्य व चंद्र यांच्या ग्रहणाच्या पूर्वी ( वेधकालीं ), ग्रस्तास्त झाल्यास पुनः उदय होईतों, संधिवेळा, अगदीं पहाट, अगदीं सायंकाळ, इत्यादि वेळीं भोजन वर्ज्य करावें. शातातपानें ' रात्रीं दान, दहीं, सातु, तिलमिश्रित अन्न व स्नान हीं करूं नयेत,' असें सांगितलें आहे; पण ज्यांचीं प्रायश्चित्तें सांगितलेलीं नाहींत असल्या दोषांचें शंभर प्राणायाम हेंच प्रायश्चित्त आहे. यास्तव, वरील निषेधांचें अतिक्रमण झाल्यास सर्व पापांच्या निरसनार्थ शंभर प्राणायाम करावे. योगीश्वरानें ' उपपातकजातानामनादिष्टस्य चैव हि' या वचनानें त्यास अनुमोदन दिलें आहे. पण तेच दोष अकामतः घडल्यास मनूक्त एक उपवास करावा.

आतां गुणदुष्ट शुक्तादिकांचें भक्षण केलें असतां प्रायश्चित्त सांगतों–याविषयीं मनूनें ( अ. ११ श्लो. १५३ ) ' शुक्त (आंबलेलें, नासलेलें दूध इत्यादि पदार्थ ), कषाय व अमेध्य ( मूत्रादि ) यांचें प्राशन केल्यास द्विज तीं खालीं निघून जात तों अशुद्ध असतो, ' असें म्हटलें आहे. यांचें अकामतः प्राशन केल्यास एक दिवस उपवास व कामतः प्राशन केल्यास शंखानें सांगितल्याप्रमाणें त्रिरात्र. पण हें प्रायश्चित्त आवळे घातलेल्या कांजीस वगैरे सोडून इतरांविषयीं आहे. ज्यांतील स्नेह काढून घेतला आहे अशी पेंड, खरवड इत्यादि खाऊं नये, असा निषेध आहे. पण खाल्ल्यास गौतमानें सांगितलेलें, उलटी करून घृतप्राशन, हें प्रायश्चित्त करावें. अग्नींत न होमिलेलें व अतिथीस न दिलेलें अन्न खाल्ल्यास एक दिवस उपवास करावा. आहिताग्नि द्विजानें वृथा ( आपल्या करितांच केलेली ) खिचडी, सांजा, खीर, अनरसे, करंज्या खाल्ल्यास प्राजापत्य करावें. पण अनाहिताग्नीनें त्यांतील कांहीं खाल्ल्यास मनूक्त उपवास करावा. फुटलेल्या पात्रादिकांत भोजन केल्यास संवर्तानें अहोरात्र उपोषण व पंचगव्य सांगितलें आहे. वड, रुई, अश्वत्थ, कुंभा, तिन्दुक, कोविदार व कळंब यांच्या पानावर भोजन केल्यास चांद्रायण करावें. तसेंच गृहस्थानें पळस व कमलिनी यांच्या पानावर भोजन केल्यास चांद्रायण करावें. पण वानप्रस्थ आणि यति यांनीं त्यांवर भोजन केल्यास त्यांना चांद्रायणाचें फल मिळतें.

आतां हस्तदानादि–क्रियादुष्ट अभोज्य भक्षण केल्यास प्रायश्चित्त सांगतों–मध, काकवी, शाक, गोरस, मीठ व तूप हीं हातांनीं वाढल्यास क्रियादुष्ट होतात. यास्तव, तीं खाल्ल्यास एक दिवस भोजन करूं नये. पण तेंच कामतः खाल्ल्यास गौतमानें ' हातानें वाढलेलें

खाल्ल्यास, अब्राह्मणाजवळ बसून भोजन केल्यास, दुष्ट पंक्तींत बसून भोजन केल्यास, पंक्तीच्या पूर्वींच जेवण करून घेतल्यास, अंगास तेल लावून मूत्रादि-उत्सर्ग केल्यास, मृत सूतक्यांचें व शूद्रांचें अन्न भक्षण केल्यास व शूद्राबरोबर निजल्यास त्रिरात्र अभोजन;' या वचनांत सांगितलेलें प्रायश्चित्त करावें. आतां ब्राह्मणाचें अन्न शूद्रानें व शूद्राचें अन्न ब्राह्मणानें दिल्यास तीं दोन्हीं अभोज्य आहेत. यास्तव, त्यांचें भोजन केल्यास वृद्ध याज्ञवल्क्योक्त एक दिवस उपवास करावा. शूद्राच्या हातचें अन्न किंवा जलभक्षण केल्यास अहोरात्र उपोषण करून पंचगव्य घेतल्यानें शुद्धि होते. पायावर पाय टाकून, अर्धें वस्त्र नेसून व अर्धें पांघरून किंवा तोंडानें फुंकून अन्न भक्षण केल्यास कृच्छ्र सांतपन करावें. पित्रादिकांच्या उद्देशानें त्याग केलेलें अन्न खाल्ल्यास भारद्वाजानें सांगितल्याप्रमाणें खालील प्रायश्चित्तें करावीं. पार्वणश्राद्धीय अन्न भक्षण केल्यास सहा प्राणायाम करावे. तीन महिन्यांपासून एक वर्षपर्यंत जीं श्राद्धें करितात त्यांतील अन्न खाल्ल्यास उपवास, वृद्धिश्राद्धांत तीन प्राणायाम, सपिंडन श्राद्धांत जेवल्यास अहोरात्र उपोषण व असरूप व्रतपारणकांत नक्त सांगितलें आहे. हेंच क्षत्रियाला दुप्पट, वैश्याला तिप्पट व शूद्राला चौपट सांगितलें आहे. अतिथि दारावर येऊन उभा असतांना जे द्विज घरांत पाणी पितात त्यांचें तें जल रक्त होतें. यास्तव, तें प्राशन केल्यास चांद्रायण करावें. हारीतानेंहीं अकराव्या दिवशीं व अस्थिसंचयनाचे वेळीं श्राद्धान्न भक्षण केल्यास यथाशास्त्र उपवास व स्नान करून कूष्माण्डमंत्रांनीं घृताचा होम करावा. विष्णूनेंही 'नवश्राद्धांत भोजन केल्यास प्राजापत्य, आद्य मासिकांत भोजन केल्यास पादोनकृच्छ्र, त्रैपक्षिकांत जेवल्यास त्याच्या अर्धें व द्विमासिकांत भोजन केल्यास पंचगव्य' असें सांगितलें आहे. पण तें आपत्कालीं जाणावें. आपत्ति नसेल तेव्हां नवश्राद्धांत चांद्रायण, मिश्रकांत (आद्यमासिकांत) प्राजापत्य व पुराणश्राद्धांत एकाह. पण द्वितीयादि मासिकांत भोजन केल्यास 'नवश्राद्धांत प्राजापत्य, आद्यमासिकांत पादोन (पाऊण), त्रैपक्षिकांत अर्धें व द्वैमासिकांत पाद, षण्मास व आब्दिक यांत पादोनकृच्छ्र, अन्य मासांत त्रिरात्र आणि प्रत्यहश्राद्धांत एकाह.' असें षट्त्रिंशन्मतोक्त जाणावें. आपत्ति नसतांना क्षत्रियादिकांच्या श्राध्दांत भोजन केल्यास षट्त्रिंशन्मतांतच 'नवश्राद्धांत चांद्रायण, मासिकांत पराक, त्रैपाक्षिकांत सांतपन व द्वैमासिकांत कृच्छ्र, हें क्षत्रियाच्या नवश्राद्धाचें व्रत, वैश्याच्या नवश्राद्धांतील अन्न खाल्ल्यास वरच्याच्या अर्धें, शूद्राच्या नवश्राद्धांत दोन चांद्रायणें, मासिकांत दीड चांद्रायण, त्रैपक्षिकांत एक चांद्रायण व द्वैमासिकांत पराक, आणि त्यापुढें सांतपन' असें सांगितलें आहे. परंतु 'नवश्राद्धांत चांद्रायण, मासिकांत पराक, त्रिपक्षांत अतिकृच्छ्र, षण्मासांत कृच्छ्र, आब्दिकांत पादकृच्छ्र व दुसऱ्या वार्षिकांत एकाह आणि त्यापुढें श्राद्धांत भोजन केल्यास कांहीं दोष नाहीं,' असें जें शंखाचें म्हणणें आहे तें सर्पादि चावून मेलेल्या लोकांच्या अथवा 'ये स्तेनाः पतिताः क्लीबाः' इत्यादि वचनांत सांगितलेल्या अपांक्तेयांच्या श्राद्धाविषयीं आहे. कारण, भारद्वाजानें 'चांडाळ, उदक, सर्प, ब्राह्मण, वीज, दंष्ट्रावान् पशु, यांच्या योगानें मेलेले, घाल्वून घेऊन, उपाशीं राहून, विष खाऊन व फास लावून मेलेले यांच्या षोडश श्राद्धांत भोजन करणाऱ्या द्विजानें चांद्रायण करावें. तसेंच अपांक्तेयांना

उद्देशून अकराव्या दिवशीं जें श्राद्ध केलें जातें त्यांत भोजन करणाऱ्या द्विजानें शिशुचांद्रायण करावें. आमश्राद्धांत भोजन केल्यास तो तप्तकृच्छ्रानें शुद्ध होतो. संकल्पित श्राध्दान्न खाल्ल्यास त्रिरात्र उपवास,' असें त्याचें गुरु प्रायश्चित्त सांगितलें आहे. ब्रह्मचाऱ्यानें मासिकादिकांत अज्ञानतः भोजन केल्यास त्रिरात्र उपवास, तीन प्राणायाम व घृतप्राशन हें प्रायश्चित्त करावें व कामतः मधु, मांस, श्राद्धान्न, सूतकान्न इत्यादि भक्षण केल्यास प्राजापत्य कृच्छ्र करावें. हीं दोन्हीं प्रायश्चित्तें बृहद्यमानें सांगितलीं आहेत. आमश्राध्दांत सर्वत्र अर्धं प्रायश्चित्त षट्त्रिंशन्मतकारानें सांगितलें आहे. उशनानें श्राद्धभोजी ब्राह्मणानें गायत्रीमंत्रानें दहा वेळ जल प्यावें व नंतर संध्योपासना करावी, असें जें म्हटलें आहे तें ज्याचें विशेष प्रायश्चित्त सांगितलेलें नाहीं अशा सामान्य श्राध्दाविषयीं आहे. संस्कारांगभूत श्राध्दांत भोजन केल्यास जातकर्म, नामकरण व चूडा यांत सांतपन आणि इतर संस्कारांत उपवास करावा. पण ब्रह्मौदन, सोम, सीमन्तोन्नयन, जातश्राध्द व नवश्राध्द यांत भोजन करणाऱ्या ब्राह्मणानें चांद्रायण करावें. ( ब्रह्मौदन हें एक यज्ञांगभूत कर्म आहे. )

आतां परिग्रहाशुचि भोजनाचें प्रायश्चित्त सांगतों— जें स्वरूपतः निषिद्ध नसलें तरी विशिष्ट पुरुषाच्या स्वामित्वामुळें अभोज्य म्हटलें जातें तें परिग्रहाशुचि होय. योगीश्वरानें आचाराध्यायांत ( श्लो. १६० उत्तरार्ध )—( १६५ पूर्वार्ध. ) ज्यांचें अन्न अभोज्य आहे त्यांचा निर्देश केला आहे. मनूनें ( अ. ४ श्लो. २०५—२१७ ) तेच व त्याहून कांहीं अधिकही अभोज्यान्न सांगितले आहेत व त्यांच्याकडून अभक्ष्य पदार्थ कोणते घेऊं नयेत त्याचेंही व्याख्यान अभक्ष्यकांडांत व श्राद्धकांडांत केलें आहे. त्यांचें अबुद्धिपूर्वक भक्षण केल्यास त्रिरात्र उपवास व बुद्धिपूर्वक भक्षण केल्यास कृच्छ्र मनूनें ( अ. ४ श्लो. २२२ ) सांगितलें आहे. पैठीनसीनेंही ' कुनखी, काळ्या दांतांचा, पित्याशीं विवाद करणारा, स्त्रीजित, कुष्ठी, पिशुन, सोमविक्रयी, वाणिज्य करणारा, ग्रामयाजक ( गांवजोशी), आरोप केला गेलेला, शूद्रीच्या ठिकाणीं संतान उत्पन्न करणारा, परिवित्ति, परिविंदान, दिधिषूपति, पुनर्भूपुत्र, चोर, कांडपृष्ठ व सेवक हे अभोज्यान्न, अपांक्तेय, व अश्राद्धार्ह आहेत. यांचें अन्न अज्ञानतः खाल्ल्यास अथवा यांना श्राद्धादिकांत भोजन घातल्यास त्रिरात्र उपोषण करावें. ' असें म्हटलें आहे. शंखानें यांचाच व आणखी दुसऱ्यांचाही निर्देश करून चांद्रायण सांगितलें आहे. यास्तव, तें अभ्यासाविषयीं समजावें. गौतमानें ' उलटी करून घृतप्राशन करण्याविषयीं सांगितलें आहे; पण तें आपत्कालास लागू आहे. आतां म्लेच्छ, चांडाल, दस्यु, इत्यादिकांनीं बलात्कारानें दास केलेल्या लोकांकडून गायीसारख्या प्राण्यांची हिंसा करविली, उष्टें काढविलें, उष्टें अन्न खावविलें. गाढव, उंट, विष्ठा खाणारे वराह इत्यादिकांचें मांस खावविलें, त्यांच्या स्त्रियांशीं संग करविला व त्यांच्याशीं सहभोजन करविलें असल्यास त्यांच्यामध्यें एक महिना निवास केलेल्या त्या द्विजांनीं प्राजापत्य करावें. आहिताग्नीनें चांद्रायण किंवा पराक करावें. एक संवत्सर त्यांच्यामध्यें रहावें लागल्यास चांद्रायण व पराक करावें. एक संवत्सर राहिलेल्या शूद्रानें अर्धामास यावक प्राशन करावें. पण तो एक महिनाभरच त्यांच्या स्वाधीन राहिला असल्यास पादकृच्छ्रानें शुद्ध होतो. एकावर्षाहून

अधिक राहणें भाग पडल्यास ब्राह्मणांनीं त्याच्या प्रायश्चित्ताची कल्पना करावी. पण ब्राह्मणादि कोणीही त्यांच्यामध्यें सतत तीन वर्षे राहिल्यास तो त्यांच्याच जातीचा होतो.

सुतक्यांपासून घेतलेल्या अन्नाचें भक्षण केल्यास छागल प्रायश्चित्त सांगतात—सूतकांत किंवा मृतकांत अज्ञानानें ब्राह्मणांनीं भोजन केल्यास शूद्रसूतकांत शंभर, वैश्याच्या सूतकांत साठ, क्षत्रियाच्या वीस व ब्राह्मणाच्या दहा प्राणायाम करावे. त्याचप्रमाणें ब्राह्मणादिक्रमानें एकदिवस, तीन दिवस, पांच दिवस व सात दिवस भोजन करूं नये. म्हणजे पंचगव्यप्राशनानें शुद्धि होते. पण हें प्रायश्चित्त अकामविषय आहे. कामतः त्याचें अन्न खाल्ल्यास ब्राह्मणाशौचांत ब्राह्मणानें सांतपन, क्षत्रियाच्या आशौचांत तप्तकृच्छ्र, वैश्याशौचांत महा सांतपन व शूद्राशौचांत ष्मासव्रत करावें. आतां वैश्य, क्षत्रिय व ब्राह्मण यांच्या आशौचांत त्यांचें अन्न खाणाऱ्या ब्राह्मणाला क्रमानें तीन मास, दोन मास व एक मास व्रत जें सांगितलें आहे तें अभ्यासाविषयीं आहे. पण हें प्रायश्चित्त आशौचानंतर जाणावें. कारण ' ब्राह्मणादिकांच्या आशौचांत जो एकदांच अन्न खातो त्याला त्या ब्राह्मणादिकांचें आशौच संपेपर्यंत आशौच असतें. यास्तव, तें निवृत्त झाल्यावर प्रायश्चित्त करावें, असें विष्णूचें स्मरण आहे. व्याजबट्टा करणारा, व्रतरहित, ज्याला पुत्र नाहीं असा व शूद्र यांचें अन्न भक्षण केल्यास लिखितानें त्रिरात्र उपोषण सांगितलें आहे. त्याचप्रमाणें परपाकनिवृत्त, परपाकांतच रत व स्वतः गृहांत अन्न न शिजविणारा, यांचें अन्न खाल्ल्यास द्विजानें चांद्रायण करावें, असें जें म्हटलें आहे तें अभ्यासाविषयीं होय. ( अभिग्रहण करून व त्याचा समारोप करून जो पंचयज्ञनिर्वाप करीत नाहीं तो परपाकनिवृत्त होय. जो रोज सकाळीं उठून व पंचयज्ञ करून परान्नानें उपजीविका करितो तो परपाकरत. जो परिवर्जित ( बहिष्कृत ) असूनही गृहस्थधर्मवृत्तींत दानादि देतो तो अपच होय. )

यति व ब्रह्मचारी हे दोघे पक्व ( शिजलेल्या ) अन्नाचे स्वामी आहेत; त्यांचें अन्न खाऊं नये. खाल्ल्यास चांद्रायण करावें; असें ब्रह्मचाऱ्यादिकांच्या अन्नभोजनाविषयीं वृद्धयाज्ञवल्क्यानें व ' प्रत्येक पक्षास किंवा मासास ज्याच्या येथील अन्न देवता खात नाहींत त्या दुरात्म्याच्या येथील अन्न खाणाऱ्या द्विजानें चांद्रायण करावें ' असें पार्वणश्राद्धादि न करणाऱ्यांच्या अन्नभोजनाविषयीं भरद्वाजानें जें सांगितलें आहे तें अभ्यासाविषयीं आहे. पूर्वी ज्यांची गणना केली आहे त्याहून आणखी दुसरे जे निषिद्ध आचरणशील पुरुष आहेत त्यांचें अन्न भक्षण केल्यास षट्त्रिंशन्मतांत सांगितल्याप्रमाणें एक दिवस उपोषण करावें. पण त्याचाच एक वर्षभर एकसारखा अभ्यास झाल्यास पराक करण्याविषयीं त्यांतच सांगितलें आहे. अभक्ष्यभक्षणप्रायश्चित्तांत सांगितलेलीं हीं सर्व व्रतें ब्राह्मणश्रेष्ठांकरितांच आहेत. क्षत्रियादिकांना तींच क्रमानें एकेक पाद न्यून करून सांगावीं.

इति अभक्ष्यभक्षणप्रायश्चित्तप्रकरणम् ११.

निमित्तांची गणना करीत असतांना उपपातकांनंतर जातिभ्रंशकरादिकांची गणना केली आहे. आतां त्यांचीं प्रायश्चित्तें सांगतों. त्याविषयीं मनूनें(अ.११ श्लो.१२४,२५,) ' कोणतेंही

जातिभ्रंशकर कर्म बुद्धिपुरःसर केल्यास सांतपन कृच्छ्र व अकामतः केल्यास प्राजापत्य संकर व अपात्र कर कर्म केल्यास एक मास चांद्रायण.व मलिनीकरण केल्यास तीन दिवस तप्त यावक प्रायश्चित्त करावें असें सांगितलें आहे. यमानें संकरीकरणाचें मास, यावक, अथवा कृच्छ्रातिकृच्छ्र,अपात्री-करणाचें तप्तकृच्छ्र, शीतकृच्छ्र अथवा महासांतपन व मलिनीकरणाचें तप्तकृच्छ्र सांगितलें आहे. बृहस्पतीनें जातिभ्रंशकराविषयीं कृच्छ्रार्ध व्रत निश्चित केलें आहे. पण या वरील मन्वा-दिकांनीं सांगितलेल्या प्रायश्चित्ताची जाति-शक्ति इत्यादिकांच्या अपेक्षेनें विषयव्यवस्था करावी.असो,याप्रमाणें योगींद्रांच्या हृदयांतील अभक्ष्यभक्ष्यादि प्रायश्चित्त संक्षेपतः दाखविलें२८९

आतां पुनः आम्ही चालू विषयाकडे वळूं या. महापातक, अतिपातक, अनुपातक व प्रकीर्णक असे पातकांचे पांच प्रकार सांगून त्यांतील चार प्रकारांचीं प्रायश्चित्तें वर्णिलीं.आतां राहिलेल्या पांचव्या प्रकीर्णकांचें प्रायश्चित्त सांगतात--

**प्राणायामी जले स्नात्वा खरयानोष्ट्रयानगः ।**
**नग्नः स्नात्वा च भुक्त्वा च गत्वा चैव दिवा स्त्रियम् ॥२९०॥**

ज्यास गाढव किंवा उंट जोडले आहेत अशा रथादि वाहनानें मार्गक्रमण केल्यास, नग्न स्नान व भोजन केल्यास, दिवसा आपल्या स्त्रीचा संभोग घेतल्यास, तडाग, नदी इत्या-दिकांत स्नान करून प्राणायाम केल्यानें पुरुष शुद्ध होतो. पण हें कामतः केल्यास जाणावें. कारण, मनूनें ( अ. ११ श्लो. २०१ ) तसें सांगितलें आहे. पण तेंच अकामतः घडल्यास नुस्तें स्नान करावें. साक्षात् गाढवावर आरोहण केल्यास, तें निमित्त गुरु असल्यामुळें दुप्पट प्रायश्चित्त योजावें २९०.

**गुरुं हुङ्कृत्य त्वङ्कृत्य विप्रं निर्जित्य वादतः ।**
**वध्द्वा वा वाससा क्षिप्रं प्रसाद्योपवसेद्दिनम् ॥ २९१ ॥**

जनकादि गुरूंची 'तूं असें बोल्लास, तूं असें केलेंस' असा एकवचनान्त प्रयोग करून निर्भर्त्सना केल्यास किंवा वडील, बरोबरीच्या अथवा कनिष्ठ विप्राला 'हूं गप्प बैस, हूं. फार बडबड करूं नकोस' इत्यादि म्हणून आक्षेप केल्यास, विजय हें ज्यांचें फल आहे, अशा जल्प-वितंडांच्या योगानें विप्रास जिंकून, अथवा त्याच्या गळ्यांत ज्याचा स्पर्श अगदीं मृदु आहे, अशाही वस्त्राचा फांस घालून त्याचा अपमान केल्यास, तत्काल पायां पडणें इत्यादि उपायांनीं त्याला प्रसन्न करावें व त्याच्याकडून क्रोधाचा त्याग करवून एक दिवस उपवास करावा. ( कांहीं न खातां सर्व दिवस घालवावा. ) यमानें 'ब्राह्मणाला वादानें जिंकल्यास प्रायश्चित्त करण्याच्या इच्छेनें तीन रात्रीं उपोषण करून स्नानपूर्वक प्रणाम करावा व त्याला प्रसन्न करून घ्यावें,' असें जें सांगितलें आहे तें अभ्यासाविषयीं होय २९१.

**विप्रदण्डोद्यमे कृच्छ्रस्त्वतिकृच्छ्रो निपातने ।**
**कृच्छ्रातिकृच्छ्रोऽसृक्पाते कृच्छ्रोऽभ्यन्तरशोणिते ॥ २९२ ॥**

विप्राला मारण्याच्या इच्छेनें दंडादि वर उचलला असतां कृच्छ्र करावें. ताडन केल्यास अतिकृच्छ्र, रक्त काढल्यास कृच्छ्रातिकृच्छ्र व रक्त आंतल्या आंत ( काळें होऊन ) राहिल्यासही कृच्छ्र शुद्धीकरितां करावें. बृहस्पतीनें ' काष्ठादिकानें मारून चामडी काढल्यास कृच्छ्र, हाड मोडल्यास अतिकृच्छ्र, अंग कापल्यास पराक, ' अशीं विशेष प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ब्राह्मणाला पादप्रहार केल्यास दिवसभर उपोषण करून स्नान करावें. व पायां पडून प्रसन्न करावें, असें यमानें सांगितलें आहे. मनूनें तर दुसरींच प्रकीर्णक प्रायश्चित्तें सांगितलीं आहेत. ' वेगानें आर्त झालेल्या पुरुषानें पाण्यावाचून किंवा पाण्यांत मूत्र–पुरीषोत्सर्ग केल्यास सचैल स्नान करून गायीला स्पर्श करावा. ' असें ( अ. ११ श्लो. २०२ ) म्हटलें आहे. पण हें अकामतः घडल्यास जाणावें. कामतः घडल्यास यमानें त्यालाच एकाह उपवास व सचैल स्नान सांगितलें आहे. सुमन्तूनें जलांत किंवा अग्नींत विष्ठात्याग करणाराला तप्तकृच्छ्र जें सांगितलें आहे तें जो आर्त नसतांना असें अकृत्य करील किंवा वारंवार करील त्याविषयीं आहे. दर्शपौर्णमासादि श्रौत व नित्यहोमादि स्मार्त नित्यकर्मांचा लोप झाल्यास मनूनें ( अ. ११ श्लो. २०३ ) ' इष्टयादिकांच्या इतरत्र सांगितलेल्या प्रायश्चित्ताबरोबर उपवासही करावा, ' असें सांगितलें आहे. स्नातकव्रतें ' वैभव असल्यास जीर्ण व मलिन वस्त्र नेसून राहूं नये ' इत्यादि वाक्यांनीं पूर्वी आचाराध्यायांत सांगितलीं आहेत. त्यांचा लोप झाल्यासही मनूनें एक अहोरात्र उपवास सांगितला आहे. क्रतूनें त्याच स्नातकव्रतास उद्देशून त्यांतील एकेकाचें अतिक्रमण केल्यास आठ सहस्र गायत्रीचा जप केल्यास पुरुष पवित्र होतो, असें म्हटलें आहे. बृहस्पतीनें पंचमहायज्ञ न करितां भोजन करणाऱ्या अनातुर व धनी गृहस्थास अर्धें कृच्छ्र हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. जो आहिताग्नि पर्वाचे दिवशीं अग्न्युपस्थान व ऋतुकालीं भार्यागमन करीत नाहीं, त्यानेंही कृच्छ्रार्ध करावें. ' दुसरी भार्या मेली असतां तिला प्रथम भार्या विद्यमान असतांनाही जो वैताग्नीनें जाळतो त्याचें तें कर्म सुरापानासारखें आहे, ' असें देवलानें सांगितलें आहे. जो क्रोधानें आपल्या भार्येला ' अगम्य ' असें म्हणतो त्या ब्राह्मणानें प्राजापत्य, क्षत्रियानें नऊ दिवस, वैश्यानें षड्रात्र, व शूद्रानें त्रिरात्र कृच्छ्र करावें. ' रिकामा कमंडलु वाहिल्यास व स्नान न करितां भोजन केल्यास अहोरात्र उपवास व दिवसभर जप केल्यानें शुद्धि होते, ' असें हारीतानें सांगितलें आहे. यमानें ' एका पंक्तींत बसलेल्यांना स्नेहादिकांमुळें विषम अन्न दिल्यास, देवविल्यास व मागितल्यास ते तिघेही स्वर्गगामी होत नाहींत. त्यांनीं प्राजापत्य कृच्छ्रानें शुद्ध व्हावें. नदीचा घाट किंवा नदींत उतरण्याचा मार्ग तोडल्यास, कन्येच्या विवाहाला विघ्न केल्यास किंवा सारख्या योग्यतेच्या पुरुषांचीं विषम पूजा केल्यास त्या दोषांची निष्कृति दिसत नाहीं. पण पुष्कळ विचार व शोध केल्यावर त्या द्विजानें भिक्षा मागून मिळविलेल्या अन्नानें चांद्रायण करावें, ' असें म्हटलें आहे.

इंद्रधनुष्य व पलाशाग्नि, दुसऱ्यास दाखविल्यास अहोरात्र प्रायश्चित्त करावें व धनुर्दंड दक्षिणा द्यावी. म्लेच्छ, अशुचि व अधार्मिक यांच्याशीं संभाषण करूं नये व केल्यास पुण्यवानाचें मनानें ध्यान करावें किंवा ब्राह्मणाशीं संभाषण करावें. भार्या, अन्न व धन यांच्या

त्याभांत विघ्न केल्यास प्रत्येकाकारितां एक संवत्सर प्राकृत ब्रह्मचर्य करावें. ब्रह्मसूत्रावांचून भोजन किंवा विष्ठा व मूत्र यांचा उत्सर्ग केल्यास क्रमानें अहोरात्र उपवास किंवा आठशें गायत्रीमंत्राचा जप करावा. पण अकामतः यज्ञोपवीतावाचून जलपान, विष्ठात्याग व भोजन केल्यास क्रमानें तीन व सहा प्राणायाम व नक्त करावें. भोजन केल्यावर शौच व आचमन न करितां उठल्यास तत्काल स्नान करावें. चोरादिकांना दंड न करितां सोडल्यास राजानें एकरात्र, पुरोहितानें त्रिरात्र आणि अदंड्यास दंड केल्यास राजाने त्रिरात्र व्रत व पुरोहितानें कृच्छ्र करावें. कुनखी व श्यामदंत ( श्यावदन्त ) यांनीं द्वादशरात्र कृच्छ्र करून निंद्य नखें व दांत यांना काढावें. जो द्विजोत्तम अपांक्तेयांच्या पंक्तींत भोजन करतो त्यानें अहोरात्र उपोषण करून पंचगव्यानें शुद्ध व्हावें. निळीनें रंगविलेलें वस्त्र जो द्विज अंगावर धारण करतो त्यानेंही वरील प्रायश्चित्त करावें. नीळीरस अंगांत भिनल्यास तिन्ही वर्णांना तप्तकृच्छ्र हें एकच प्रायश्चित्त. नीळ जवळ ठेवणें, तिचा विक्रय करणें व तिच्यावर निर्वाह करणें यांच्या योगानें विप्र पातकी होतो. आणि तो तीन कृच्छ्रांनीं त्या पातकाला घालवितो. पण स्त्रियांनीं क्रीडेकरितां तिचें धारण केल्यास कांहीं दोष नाहीं. पर्व दिवसास वर्ज्य करून बाकीच्या वेळीं राजानें व वैश्यानेंही वृद्धिप्रसंगीं नीळीचें धारण केलें तरी चालेल. कंबल ( शाल वगैरे ) रेशमी वस्त्र यावरील नीलीराग दूषित होत नाहीं. पलाशवृक्षाच्या काष्ठानें निर्माण केलेल्या खाटेवर निजल्यास, आसनावर बसल्यास व पादुका पायांत घातल्यास द्विजानें त्रिरात्र व्रती रहावें. रणांत पाठ दाखवून प्राण वांचविण्याकरितां पळणारा क्षत्रिय व फलयुक्त वृक्ष तोडणारा या दोघांनींही संवत्सर व्रत करावें. दोन ब्राह्मण, ब्राह्मण व अग्नि व पति व पत्नी आणि गाय व ब्राह्मण यांच्या मधून जाणारानें सांतपन कृच्छ्र करावें. होमकालीं, सान्नायादिकांच्या अंगभूत दोह-( दूध काढण्याच्या ) समयीं, स्वाध्यायाचे वेळीं व स्त्रीपरिग्रह करितांना जो त्या त्या दोघांच्या मधून जातो त्या द्विजानें चांद्रायण करावें. पण हें अभ्यासविषयक आहे. दुःस्वप्न-अरिष्ट इत्यादि पाहिल्यास घृत व सुवर्ण द्यावें. सिंध, कच्छ, गुजराथ व अशाच दुसऱ्या ( अंग, वंग कलिंगादि ) प्रत्यंत ( सीमेवरील ) देशांत तीर्थयात्रा प्रसंगावाचून गेल्यास द्विज पुनः संस्कारास योग्य होतो. सूर्याच्या सन्मुख विष्ठात्याग करूं नये व आपली विष्ठा आपणच पाहूं नये; पण ती पाहिल्यास सूर्य, गाय, अग्नि व ब्राह्मण यांचें दर्शन घ्यावें, अग्नीवर पाय धरून तापविल्यास किंवा अग्नीला खालीं ठेवून आपण वर बसल्यास दर्भांनीं दोन्ही पायांचें मार्जन करून एक दिवस व्रतस्थ रहावें. क्षत्रियादिकांना अभिवादन केल्यास अहोरात्र, वैश्याला पाय धरून नमस्कार केल्यास द्विरात्र, व शूद्राला केल्यास त्रिरात्र उपवास करावा. त्याचप्रमाणें पादुका किंवा जोडा घातलेला, उच्छिष्ट, अंधकारस्थ, श्राद्धकृत, जप-देवपूजानिरत इत्यादिकांस अभिवादन केल्यास त्रिरात्र उपवास करावा. एकानें निमंत्रण दिलें असतां दुसऱ्याच्याच येथें जाऊन भोजन करणारासही हेंच प्रायश्चित्त. समिधा, पुष्पें, कुश, आज्य, जल, मृत्तिका, अन्न व अक्षता ज्याच्या हातांत आहेत त्याला अभिवादन करूं नये. केल्यास वरचेंच प्रायश्चित्त. जप व होम करीत असलेल्या पुरुषाला अभिवादन केल्यासही हेंच. त्याचप्रमाणें ज्याच्या हातांत उदकुंभ आहे, जो भिक्षाचरण करीत आहे, ज्याच्या हातांत पुष्प-आज्य इत्यादि

पदार्थ आहेत, जो अशुचि आहे, जो जप व देव-पितृकार्य करीत आहे व जो शय्येवर पडला आहे त्यानेंही दुसऱ्या कोणाला नमस्कार करूं नये. असें शंखानें सांगितलें आहे. अशीच दुसरींही वचनें निरानिराळ्या ग्रंथांतून शोधून काढावीं. ग्रंथगौरवभयानें आम्ही तीं सर्व येथें लिहीत नाहीं २९२.

इति प्रकीर्णकप्रायश्चित्तप्रकरणम् १२.

निमित्तें अनंत असल्यामुळें प्रत्येक व्यक्तीच्या प्रायश्चित्ताचें निमित्त पृथक् सांगत बसतां येणें अशक्य आहे, यास्तव, सामान्यतः सांगितलेल्या अथवा न सांगितलेल्या निमित्तांच्या विशेष प्रायश्चित्ताचें ज्ञान होण्यास्तव योगीश्वर म्हणतात--

**देशं कालं वयः शक्तिं पापं चावेक्ष्य यत्नतः ।**
**प्रायश्चित्तं प्रकल्प्यं स्याद्यत्र चोक्ता न निष्कृतिः ॥ २९३ ॥**

मागें सांगितलेलीं किंवा पुढें सांगावयाचीं जेवढीं प्रायश्चित्तें आहेत त्यांची-देश, काल, वय, शक्ति व पाप यांचा विचार करून जशा रीतीनें कर्त्याचे प्राण जाणार नाहींत तशा रीतीनें--विशेष विषयांमध्यें योजना करावी. नाहींतर प्रधानाचीच (कर्त्याचीच) निवृत्ति होण्याचा प्रसंग यावयाचा. जसें पुढें--रात्री पाण्यांत राहून दिवसां वायुभक्षण करीत व सूर्याला पहात उभें रहावें--असें सांगणार आहेत, पण हिमालय पर्वताच्या समीप राहणाऱ्या पुरुषाला या व्रताचा उपदेश केल्यास अथवा फार थंडीच्या दिवसांत इतरत्रही तें व्रत करावयास लावलें तर कर्त्याचा प्राणवियोग झाल्यावांचून राहणार नाहीं. यास्तव, तसल्या देशाचा व कालाचा परिहार करून व्रतयोजना करावी. त्याचप्रमाणें वयाविषयींही विचार करावा. कारण, नव्वद वर्षानंतर एकाद्या म्हाताऱ्याला अथवा बारावर्षांच्या आंतील मुलाला द्वादशवार्षिकव्रताचा उपदेश केल्यास त्या दोघांचेही प्राण निघून जातील. यास्तव, त्यांहून भिन्न वयाच्या पुरुषाला तें व्रत सांगावें. एवढ्यासाठींच वृद्धादिकांना उद्देशून कोठें अर्ध, कोठें पाद इत्यादिप्रकारें प्रायश्चित्ताचा ऱ्हास अन्य स्मृतींत सांगितला आहे. आणि आम्हीही त्याचा पूर्वीं प्रपंच केला आहे. त्याचप्रमाणें धनदान, तपश्चरण इत्यादिकांची शक्तीच्या अपेक्षेनें योजना करावी. कारण निर्धनाला 'पात्रे धनं वा पर्याप्तं' (म्हणजे पात्राला पुष्कळ धन देऊन) इत्यादि प्रायश्चित्त सांगणें अयोग्य आहे. तसेंच ज्याला अतिशय पित्त झालें आहे त्याला पराक व स्त्री-शूद्रांना जपादिक सांगणेंही अनुचित आहे. म्हणूनच 'गजादिकांचें दान देण्यास असमर्थ असलेल्या पुरुषानें एकेक दोषाच्या शुद्धीकरितां कृच्छ्र करावें; आणि स्त्रिया व रोगी यांनीं अर्धें प्रायश्चित्त करावें' असें विधान करून तप करण्यास असमर्थ असलेल्या स्त्री--पुरुषांच्या प्रायश्चित्ताचा ऱ्हास करावयास स्मृतिकारांनीं सांगितलें आहे व आम्हीही त्याचा वर उल्लेख केला आहे. त्याचप्रमाणें पापाविषयीं तें महापातक आहे, कीं अनुपातक? कीं अतिपातक? कीं उपपातक? तसेंच तें जाणूनबुजून केलें कीं अज्ञानतः? तसेंच तें एकदां केलें आहे कीं त्याचा अभ्यास (वारंवार) केला आहे-इत्यादि विचार करून 'यत्नतः'--म्हणजे सर्व धर्मशास्त्राचें

पर्यालोचन करून प्रायश्चित्ताची योजना करावी. अकामतः केलेल्या पापाचें जें प्रायश्चित्त सांगितलें असेल तेंच कामतः केल्यास दुप्पट व अभ्यास केल्यास चौपट करावें, या दुसऱ्या स्मृतींतील विधानाप्रमाणें योजना करावी. जसें–महापाप व अतिपाप यांचा दुसऱ्यावर मिथ्या आरोप करणारास एक महिना जल भक्षण करून रहावयास सांगितलें आहे. पण महापाप व अतिपाप यांना एकत्र प्रायश्चित्त सांगणें युक्त नसल्यामुळें अतिपापाच्या मास प्रायश्चित्ताचा ऱ्हास करावा. अकस्मात् हंसणें, जांभयी देणें, शङ्कू ठोकणें, गर्भिणीपतीनें समुद्राच्या जलांत स्नान करणें, श्मश्रू इत्यादि मुखावरील केंस कातरणें इत्यादि करूं नये, असें सांगितलें आहे. पण त्यांचें प्रायश्चित्त कांहीं सांगितलें नाहीं. तथापि अशा निषेधातिक्रमाचें प्रायश्चित्तही देशादिकांच्या अपेक्षेनें योजावें.

**शंका**—अहो; पण ज्याची निष्कृति सांगितलेली नाहीं, असें मुळीं निमित्तच आढळत नाहीं. कारण सर्व पापांच्या निरसनार्थ शंभर प्राणायाम करावे, असें पुढें सांगावयाचेंच आहे. गौतमानेंही 'एकाहादिक प्रायश्चित्तें अनादिष्ट पापांचे ठायीं योजावीं,' असें सांगितलें आहे.

**समाधान**—खरें आहे. सामान्यतः प्रायश्चित्तांचा उपदेश केलेला आहे. पण सर्व प्रसंगीं देश-कालादिकांची अपेक्षा असल्यामुळें कल्पनेला अवकाश आहेच. हंसणें, जांभई देणें, इत्यादि सर्व निमित्तांना शंभर प्राणायाम हें एकच नैमित्तिक सांगणें मुळींच योग्य नाहीं. कारण तीं निमित्तें अगदींच अल्प आहेत. यास्तव पापाच्या अपेक्षेनें एक तर मुख्य नैमित्तिकाचा ऱ्हास करावा किंवा दुसरें अल्प प्रायश्चित्त योजावें.

**शंका**—पण ज्याच्या योगानें प्रायश्चित्ताच्या अल्पत्वाची योजना करावयाची तें पापाचें लघुत्वच कसें कळणार? कारण प्रायश्चित्त मुळीच सांगितलेलें नसल्यामुळें त्याचें अल्पत्व समजणें शक्य नाहीं.

**समाधान**—खरें आहे, पण अर्थवादाचें संकीर्तन ( कथन ) व बुद्धिपूर्व, अबुद्धिपूर्व इत्यादि कारणें यांच्या अपेक्षेनें दोषाचा गुरुलघुभाव सहज कळण्यासारखा आहे. त्याचप्रमाणें त्या त्या अपराधाला सांगितलेल्या दंडाचा ऱ्हास व वृद्धि यांच्या अपेक्षेनें प्रायश्चित्ताचाही गुरु-लघुभाव कळणें शक्य आहे. तसेंच ब्राह्मणानें ब्राह्मणावर दंडादि उगारल्यास प्राजापत्य सांगितलेलें आहे. पण तेंच दंडादि उगारणें, हें निमित्त आनुलोम्यानें किंवा प्रातिलोम्यानें ( म्ह. उत्तम वर्णानें हीनावर किंवा हीनवर्णानें उत्तमावर ) अथवा मूर्द्धावसिक्ताकडून केलें जातें तेव्हां दंडाचें तारतम्य ( न्यूनाधिकता ) दिसत असल्यामुळें त्यावरून दोषाचें अल्पत्व किंवा महत्त्व कळतें आणि त्याच्या अनुरोधानें प्रायश्चित्ताचें गुरुत्व-लघुत्वही तर्कानें ध्यानांत येतें. दंडाचा गुरु-लघुभाव व्यवहाराध्यायाच्या २०७ श्लोकांत ( १८ वाक्पारुष्य प्रकरणांत ) सांगितला आहे २९३.

याप्रमाणें महापातकादिकांच्या योगानें पतित झालेल्या पुरुषांस प्रायश्चित्तें सांगितलीं. पण औद्धत्यामुळें कोणी तीं न करण्याची इच्छा केल्यास काय करावें तें सांगतात—

दासीकुम्भं बहिर्ग्रामान्निनयेरन्स्वबान्धवाः ।
पतितस्य बहिः कुर्युः सर्वकार्येषु चैव तम् ॥ २९४ ॥

जिवंत असतांनाच पतित झालेल्या पुरुषाचे जे ज्ञातीचे लोक ( अर्थात् पितृ-मातृ-पक्षाचे बांधव ) त्या सर्वांनीं मिळून दासी पाठवावी. तिनें आणलेल्या जलाच्या पूर्ण घटास त्यांनीं गांवाच्या बाहेर न्यावें. हें चतुर्थी, अष्टमी इत्यादि रिक्ता तिथीस दिवसाच्या पांचव्या भागीं गुरुप्रभृतींच्या सन्निध करावें. ( मनु. अ. ११ श्लोक. १८२ पहा. ) अथवा पाप्याच्या सपिंडांनीं जिला प्रेरणा केली आहे त्या दासीनेंच तो घट गांवाबाहेर न्यावा. कारण मनूनें ( अ. ११ श्लो. १८३ ) दासीनें जलानें भरलेला घट प्रेतोद्देशानें दिलेल्याप्रमाणें ( म्हणजे दक्षिणेकडे तोंड करून व अपसव्यानें ) पायानें ढकलून पालथा करावा आणि सर्व बांधवांनीं त्याच्याकरितां अहोरात्र आशौच धरावें. पण हें कुंभाचें ग्रामाबाहेर नेणें, उदकदान, पिंडदान इत्यादि प्रेतक्रिया केल्यानंतर करावें. याविषयीं गौतमानें असें विधान केलें आहे.-पतिताच्या-विद्यागुरु-योनिसंबंध-इत्यादि लोकांनीं ( म्हणजे सर्व आप्तबांधव आणि गुरु यांनीं ) एकत्र जमून सर्व उदकदानादि प्रेतकार्यें करावीं. व त्याला उद्देशून पात्र उपडें करावें. दास किंवा दुसरें कांहीं हलकें काम करणारा यांतील कोणी तरी उकिरड्यावरून मडकें आणावें. दासीनें तें भरावें व दक्षिणेकडे तोंड करून तें ( मडकें ) पायानें लवंडावें. पतिताच्या ज्ञातिबांधवांनीं पतिताचें नांव घेऊन या अमुक अमुक पुरुषाला अनुदक ( उदकाधिकाररहित ) करतों; असें म्हणून प्राचीनावीति करून व केंस मोकळे सोडून घटास हात लावावा. विद्यागुरु व योनिसंबंधानें युक्त असलेले लोक यांनीं तें कर्म पहावें आणि नंतर जलस्पर्श करून गांवांत प्रवेश करावा. पण हा त्याग बांधव प्रेरणा करीत असतांनाही प्रायश्चित्त न करणाऱ्या पतितास उद्देशून करावा. कारण " गुरु, बांधव व राजा यांच्या समक्ष त्याचा दोष प्रकट करून ' आतां तूं प्रायश्चित्त करून शुद्ध हो, ' असा वारंवार उपदेश करावा. पण तरी सुद्धां प्रायश्चित्ताविषयीं त्यानें आपलें चित्त स्थिर न केल्यास शेवटीं त्याला उद्देशून वर सांगितल्याप्रमाणें पात्रविपर्यास ( घटस्फोट ) करावा, " असें शंखानें सांगितलें आहे. असो; त्यानंतर ज्याला हें घटोदक मिळालें आहे, त्या पतिताला संभाषण, एकत्र बसणें इत्यादि सर्व कार्यांत वर्ज्य करावें. कारण मनूनें ( अ० ११ श्लो. १८४ ) संभाषण, सह आसन, दायभाग व लौकिकयात्रा या सर्वांस तो मुकतो, असें सांगितलें आहे. पण स्नेहादिकांमुळें जर कोणी त्याच्याशीं संभाषणादि केलें तर त्यानें प्रायश्चित्त करावें. ' त्यापुढें त्याच्याशीं अज्ञानतः भाषण केल्यास एक रात्र व ज्ञानतः तें केल्यास त्रिरात्र गायत्रीचा जप करीत रहावें, ' असें स्मृतिवचन आहे २९४.

पण बांधवांच्या त्यागामुळें अथवा दुसऱ्या कांहीं कारणानें त्या पतिताला जेव्हां आपल्या कृत्याचा पश्चाताप होतो व तो आपण होऊनच प्रायश्चित्त करतो तेव्हां बांधवांनीं काय करावें तें सांगतात—

**चरितव्रत आयाते निनयेरन्नवं घटम् ।**
**जुगुप्सेरन्न चाप्येनं संवसेयुश्च सर्वशः ॥ २९५ ॥**

पतित प्रायश्चित्त करून आपल्या बंधुसमीप आला असतां त्याच्या सपिंडादि बांधवांनीं त्यासहवर्तमान नव्या व न फुटलेल्या शुद्ध घटाला पाण्यानें भरून आणवावें. हें उदकपूर्णघटानयन पुण्य डोहादि जलाशयांत स्नान केल्यावर मग करावें. ( मनु अ. ११ श्लो. १८६ पहा. ) गौतमानें त्यासंबंधीं असा विशेष सांगितला आहे—जो प्रायश्चित्त करून शुद्ध होतो त्याच्याकडून; त्याच्या बांधवांनीं अतिशय पवित्र ऱ्हदांतून किंवा नद्यांतून सोन्याचा किंवा रुप्याचा घट भरवून आणून त्यांतील जलानें उपस्पर्श करवावा. नंतर त्यांनीं त्याला तें पात्र देववावें. त्यानें तें घेऊन 'शान्ता द्यौः शान्ता पृथिवी, शान्तं शिवमन्तरिक्षं यो रोचनस्तमिह गृह्णामि ' इत्यादि यजुर्मंत्रांनीं तरत्समन्दी-'पावमानी' व 'कूष्मांड मंत्र' यांनीं आज्याचा होम करावा. आचार्याला सोनें व गाय द्यावी. पण ज्याला प्राणान्तिक प्रायश्चित्त सांगितलेलें असतें तो मेला असतां, त्या मरणानेंच शुद्ध होतो. असो, सर्व उपपातकांत हेंच शांत्युदक होय.

याप्रमाणें ज्यानें प्रायश्चित्त केलें आहे त्याची त्यानंतर कोणी ( ज्ञातिबांधवांनीं ) निंदा करूं नये. क्रय-विक्रयादि सर्व व्यवहारांत त्यांच्याशीं चांगल्याप्रकारें व्यवहार करावा. २९५.

आतां पूर्वोक्त पतितपरित्यागादिविधीचा अतिदेश सांगतात—

**पतितानामेष एव विधिः स्त्रीणां प्रकीर्तितः ।**
**वासो गृहान्तिके देय अन्नं वासः सरक्षणम् ॥ २९६**

हा जो पुरुषांच्या परित्यागाचेवेळीं सांगितलेला पिंडोदकदानविधि व प्रायश्चित्त केलेल्यांना पुनः ज्ञातींत घेण्याचा विधि तोच पतित स्त्रियांविषयींही जाणावा. तथापि त्यांत एवढा विशेष आहे—त्या पतित स्त्रियांनाही, त्यास उद्देशून उदकदानादि केल्यावर, आपल्या घरापाशींच तृणपर्णमय कुटी ( झोंपडी ) करून द्यावी. केवल प्राणधारण होईल इतकें अन्न द्यावें. मलिन वस्त्र द्यावें व दुसरा कोणी पुरुष तिचा उपभोग घेणार नाहीं अशी व्यवस्था करावी २९६.

कोणी म्हणेल कीं ज्यांच्या परित्यागाचा हा विधि सांगितला आहे त्या पतित स्त्रिया कोणत्या? तर त्याचें उत्तर सांगतात—

**नीचाभिगमनं गर्भपातनं भर्तृहिंसनम् ।**
**विशेषपतनीयानि स्त्रीणामेतान्यपि ध्रुवम् ॥ २९७ ॥**

हीनवर्णाच्या जातीशीं गमन करणें, गर्भपात करणें, ब्राह्मण नसलेल्याही स्त्रीनें ब्राह्मणेतर पतीचीही हिंसा करणें हीं स्त्रियांचीं असाधारण पतननिमित्तें आहेत.या श्लोकाच्या चवथ्या चरणांत ' अपि ' असा शब्द आहे, त्यामुळें पुरुषाच्या पतनाचीं महापातक, अतिपातक, अनुपातक व अभ्यस्त उपपातक अशीं जीं निमित्तें सांगितलेलीं आहेत तींही स्त्रियांच्या पत-

नाचीं कारणें होतात, असें ठरतें. म्हणूनच ' पुरुषांचीं जीं पतननिमित्तें तींच स्त्रियांचींही आहेत. पण ब्राह्मणी हीनवर्णाच्या पुरुषाच्या सेवनानें अधिक पतित होते ' असें शौनकानें म्हटलें आहे. परंतु वसिष्ठानें ' पतिवध, भ्रूणहत्या व गर्भपात ' अशीं स्त्रियांचीं तीन पतनीय पातकें सांगून त्यांत भ्रूणहत्येचें जें ग्रहण केलें आहे जें दृष्टान्ताकरितां आहे. पतनाचीं निमित्तें होणाऱ्या या महापातकादिकांना पतनहेतुत्वच नाहीं, असें म्हणून त्याचें निवारण करण्याकरितां नव्हे. त्यानेंच पुनरपि ' शिष्यगा, गुरुगा, पतिघ्नी व जुंगितोपगता या चौघीजणींचाच मात्र परित्याग करावा ' असें जें म्हटलें आहे तेंही—प्रायश्चित्त करण्याची इच्छा न करणाऱ्या पातकी स्त्रियांतील या चौघीजणींनाच अन्न-वस्त्र-कुटी इत्यादि जीवनास अत्यंत उपयोगी असलेल्या वस्तूही न देतां सोडावें; ( त्यांचा त्याग करावा ). दुसऱ्या कोणाचाही इतका त्याग करूं नये; हा अभिप्राय व्यक्त करण्यासाठीं आहे. अर्थात् या चौघीजणींवांचून बाकीच्या पतित स्त्रियांनीं प्रायश्चित्त जरी न केलें तरी त्यांना वरच्या ( २९६ व्या ) श्लोकांत सांगितल्याप्रमाणें अन्नवस्त्रादि द्यावें; असें सूचित होतें २९७.

२९५ व्या श्लोकाच्या उत्तरार्धाचा अपवाद सांगतात—

**शरणागतबालस्त्रीहिंसकान्संवसेन्न तु ।**
**चीर्णव्रतानपि सतः कृतघ्नसहितानिमान् ॥ २९८ ॥**

शरणागत, बाल व स्त्रिया यांची हिंसा करणाऱ्या पाप्यांनीं व कृतघ्नानें प्रायश्चित्त करून आपापला दोष जरी क्षीण केला तरी त्यांच्याशीं व्यवहार करूं नये हा वाचनिक प्रतिषेध आहे. वचनाला कशाचाही अतिभार नसल्यामुळें तें काय करणार नाहीं ? वास्तव व्यभिचारिणी स्त्रीच्या वधांत प्रायश्चित्त जरी थोडेंच असलें तरी या वचनानें त्याच्याशीं होणाऱ्या व्यवहाराचा प्रतिषेध केला आहे २९८.

याप्रमाणें प्रसंगानें स्त्रियांविषयीं विषेश सांगून प्रकृत चरितव्रताविधींतील विशेष सांगतात—

**घटेऽपवर्जिते ज्ञातिमध्यस्थो यवसं गवाम् ।**
**प्रदद्यात्प्रथमं गोभिः सत्कृतस्य हि सत्क्रिया ॥ २९९ ॥**

घट ( कुंभ ) ऱ्हदांतून भरून वर काढून तो पृथ्वीवर ओतला असतां त्या चरितव्रत व सापिंडादिकांमध्यें असलेल्या पुरुषानें गायींना गवत घालावें. त्या गायींनीं प्रथम ज्याचा सत्कार केला आहे अशा त्याचा ज्ञातीच्या लोकांनीं मागून सत्कार करावा. त्यानें दिलेलें गवत खाणें, हाच गायींनीं त्याचा केलेला सत्कार होय. पण त्याचें घातलेलें कोवळें गवत त्यांनीं ( गायींनीं ) जर न खाल्लें तर त्या पाप्यानें पुनः प्रायश्चित्त करावें. हरीतानें ' त्यानें आपल्या मस्तकावरून गवत आणावें व गायींना घालावें. त्याचा त्यांनीं स्वाद घेतल्यास ज्ञातीच्या बांधवांनीं त्याला आपल्यामध्यें घेऊन त्याच्याशीं व्यवहार करावा, नाहीं तर करूं नये. ' असा आपला अभिप्राय प्रकट केला आहे २९९.

महापातकादि पांचौ प्रकारच्या दोषांतील प्रत्येकांचें स्वतंत्र व्रत सांगून आतां सकल व्रतांस साधारण असा धर्म सांगतात—

**विख्यातदोषः कुर्वीत पर्षदोऽनुमतं व्रतम् ।**

ज्याचा दोष इतरांना कळला आहे अशा पुरुषानें पर्षत्-नें उपदेशिलेलें व्रत करावें. तो स्वतः सकल शास्त्रार्थाचा विचार करण्याविषयीं चतुर जरी असला तरी त्यानें पर्षत्-पाशीं जाऊन व तिच्याशीं विचार करून तिला संमत असलेलेंच व्रत करावें. अंगिरसानें पर्षत्-पाशीं जाण्याविषयीं असा विशेष सांगितला आहे-आपल्या हातून पाप घडलें आहे, असें निःसंशय कळलें असतां पर्षत्-पाशीं गेल्यावांचून भोजन करूं नये. पण जो तें ( भोजन ) करतो त्याचें पाप पर्षत्-ला निवेदन करीपर्यंत वाढत राहतें. यास्तव, मौन धरून सचैलः स्नान करावें आणि ओल्या वस्त्रांसह शांत चित्तानें पर्षत् पाशीं जावें. तिनें संमति दिली असतां आपल्या हातून घडलेलें पाप खरें खरें निवेदन करावें आणि त्या सभेनें व्रत सांगितलें असतां पुनः स्नान करून त्याचें अनुष्ठान करावें. दाक्षिणादानानंतर पाप निवेदन करावें. कारण ' धेनु व वृष देऊन नंतर पाप्यानें पाप सांगावें ' असें पराशरानें म्हटलें आहे. पण हें उप पातका विषयीं आहे. महापातकाविषयीं अधिक दान योजावें. प्रकीर्णक पापाचें निवेदन करतांना पर्षद्-ला किंचित् ( आठ मुठी धान्य ) द्यावें. पर्षद्-चें स्वरूप मनूनें असें सांगितलें आहे. एक वेदज्ञ, एक मीमांसाकुशल, एक न्यायशास्त्रज्ञ, एक निरुक्तज्ञ, एक धर्मपाठक व ( यती वाचून बाकीचे पहिले ) तीन आश्रमी यांचा समूह ही दशावरा पर्षत् आहे. ऋग्वेद, यजुर्वेद व सामवेद यांतील प्रत्येकास जाणणारा एकेक, अशा तिघांचीही पर्षत् होते. (ही दुसरी व ) शांत मनानें एकही वेदवेत्ता धर्माचा निर्णय करूं शकतो(ही तिसरी पर्षत् आहे)या वरील तीन पर्षत्-ची संभव व महापातकादि पापें यांच्या अपेक्षेनें व्यवस्था करावी.(कोठें कोणत्या पर्षत् चा उपयोग करावा हें ठरवावें.) आतां ' पातकाच्या निवेदनसमयीं पर्षत्-मधील पुरुषांची संख्या शंभर असावी, महापातकाचे वेळीं सहस्र असावी, उपपातकांत पन्नास असावी'इत्यादि जें एका स्मृतींत सांगितलें आहे तेंही महापातकादि दोषानुसार पर्षत्च्या गुरुलघुभावाचें प्रतिपादन करण्यासाठीं आहे;संख्येचा नियम करण्यासाठीं नाहीं.कारण तें वचन संख्येचा नियम करण्यासाठींच आहे, असें म्हटल्यास मन्वादि महास्मृतींशीं विरोध येतो. देवलानेंही याविषयीं असाच नियम दाखविला आहे. ' अल्पदोषामध्यें स्वतः ब्राह्मणांनींच निष्कृति सांगावी आणि महादोषांमध्यें राजा व ब्राह्मण यांनीं मिळून चांगली परीक्षित निष्कृति सांगावी. ' त्याचप्रमाणें पर्षत्नें व्रताचा अवश्य उपदेश करावा.कारण, 'आर्त होऊन पापक्षयाच्या उपायाचा शोध करणारांस जे द्विज तें सांगत नाहींत ते त्या पाप्यासारखे होतात,'असें अंगिरानें म्हटलें आहे.पर्षत्नें धर्मशास्त्राचा चांगला विचार करूनच धर्मशास्त्र जाणूनच व्रताचा उपदेश करावा. कारण वासिष्ठानें 'धर्मशास्त्र न जाणतां प्रायश्चित्त सांगणारास पाप्याचें सर्व पाप लागतें व प्रायश्चित्त करणारा पावन होतो, ' असें म्हटलें आहे. पापी क्षत्रियादिकाला ब्राह्मणानें दुसऱ्या ब्राह्मणाच्या द्वारां सर्व व्रतांचा उपदेश करावा. अर्थात् त्या ब्राह्मणेतर पाप्याला जवळ बसवून त्याच्या समक्ष

एका ब्राह्मणाला व्रत सांगावें. व तें ऐकून त्या ब्राह्मणेतर पाप्यानें करावें. ) शूद्राला जप-होमरहित प्रायश्चित्त सांगावें. त्यांतूनही यागादिकांचें अनुष्ठान करण्याचें ज्यांचें शील असेल त्यांना जपादिक व इतरांना तप सांगावें. कारण कदाचित् पापी झालेल्या कर्मनिष्ठ व तपोनिष्ठ पुरुषांना विशेषतः जपहोमादिक सांगावें ' असें म्हटलें आहे. परंतु जे ब्राह्मण मूर्ख; केवल ब्राह्मणनामधारक व धनरहित असतात त्यांना विशेषें करून चंद्रायणादि व्रतें अनुष्ठानाकरितां द्यावीं.

इति प्रकाशप्रायश्चित्तप्रकरणम्.

आतां येथून रहस्यप्रायश्चित्तांचें वर्णन करितात व आरंभीं सकल रहस्यव्रतास साधारण असा धर्म सांगतात—

## अनभिख्यातदोषस्तु रहस्यं व्रतमाचरेत् ॥ ३०० ॥

स्वतः कर्त्यावांचून दुसऱ्या कोणालाही ज्याचा दोष ज्ञात झालेला नसतो तो अनभिख्यात दोष होय. त्यानें रहस्य प्रायश्चित्त करावें. ( रहस्य म्हणजे अप्रकाश, गुप्त ) स्त्रीसंभोगादिकांत स्वतः स्त्रीगही संभोगक्रियेचें कारक असल्यामुळें तिच्यावांचून दुसऱ्या कोणाला ज्याचा दोष कळलेला नाहीं त्याच्यासाठीं रहस्यव्रत आहे, असें जाणावें. अशा प्रसंगीं कर्ता स्वतः जर धर्मशास्त्रकुशल असला तर त्यानें दुसऱ्या कोणाला न विचारतांच आपल्या हातून घडलेल्या निमित्ताला उचित असें प्रायश्चित्त करावें पण जो स्वतः अनभिज्ञ असतो त्यानें कोणा धर्मशास्त्रज्ञापाशीं जाऊन ' कोणी एकानें गुप्तपणें ब्रह्महत्यादि पाप केलें आहे तर त्यानें कोणतें प्रायश्चित्त करावें ? ' असें दुसऱ्याच्या मिषानें तें जाणून घेऊन रहस्यव्रत करावें. स्त्रिया व शूद्र यांनाही याच मार्गानें रहस्यव्रतांचें ज्ञान होणें शक्य असल्यामुळें त्यांनाही त्यांचा अधिकार आहे. रहस्यव्रतें जपादिप्रधान असल्यामुळें विद्यारहित स्त्री-शूद्रांकडून जपादि होण्याचा संभव नसतो. यास्तव रहस्यव्रतांत त्यांचा अधिकार नाहीं, असें म्हणूं नये. कारण रहस्यव्रतांत जपादिकच मुख्य असतात असाच कांहीं अबाधित नियम नाहीं. कारण त्याकरितां दानादिकांचाही उपदेश केलेला असतो. त्याचप्रमाणें गौतमोक्त प्राणायामादिकांचाही संभव आहे. मंत्र-देवता-ऋषि व छंद यांचें केवलज्ञानच इतरांच्याही अधिकाराच्या उपयोगी आहे; दुसरें कांहीं नाहीं. एकाचा विषय दुसऱ्याच्या उपयोगी नसणें, हें साहजिक आहे. तडागादिकांना निर्माण करावयाचें असतांना ज्योतिष्टोमसंबंधीं ज्ञान कांहीं उपयोगाचें नसतें. जपादिकांमध्यें देवतादिज्ञान अवश्य आहे. कारण, व्यासांनीं ' ऋषि, छंद, देवता व विनियोग यांस न जाणतां जो अध्यापन किंवा जप करतो तो पापी होतो ' असें सांगितलें आहे. या रहस्यप्रायश्चित्तांतही आहारादिकांचा विशेष सांगितलेला नसल्यास गौतमानें सांगितलेलें दुग्धादि, विशेष काल सांगितलेला नसल्यास संवत्सरादि व विशेष देश सांगितलेला नसल्यास शिलोच्चयादि ( शिलांचा ढीग वगैरे ) यांचें प्रकाश प्रायश्चित्ताप्रमाणेंच ग्रहण करावें. ३००.

याप्रमाणें सकल रहस्यव्रतांच्या साधारण धर्माचा उपदेश करून प्रकाश-प्रायश्चित्ता-प्रमाणेंच ब्रह्महत्यादिक्रमानें रहस्यप्रायश्चित्तें सांगतात—

त्रिरात्रोपोषितो जप्त्वा ब्रह्महा त्वघमर्षणम् ।
अन्तर्जले विशुद्ध्येत दत्वा गां च पयस्विनीम् ॥३०१॥

तीन रात्रीं उपोषित राहून जलामध्यें अघमर्षण ऋषीनें पाहिलेलें ‘ ऋतं च सत्यं चाभीद्धा–’ इत्यादि अघमर्षणसूक्त जपून व दुभती गाय देऊन ब्रह्महा विशुद्ध होतो. त्या सूक्ताच्या ऋचा तीन आहेत. छंद अनुष्टुभ असून देवता भाववृत्त आहे. जलांत बुडून तीन वेळां त्याची आवृत्ति करावी. कारण सुमन्तूनें तसें सांगितलें आहे. त्याचप्रमाणें माता, भगिनी, मावशी, सून, सखी किंवा अशीच दुसरी कोणतीही अगम्य स्त्री यांच्याशीं गमन केल्यास जलांत बुडी मारून या अघमर्षणाचीच तीन वेळां आवृत्ति करावी. म्हणजे पुरुष त्या दोषापासून मुक्त होतो. पण हें कामतः केलेल्या दोषाविषयीं आहे. मनूनें ( अ. ११ श्लो. २४८ ) एक महिनाभर प्रत्यहीं व्याहृति व प्रणव यांसह सोळा प्राणायाम केल्यास भ्रूणहत्येचा दोष नाहींसा होतो, असें जें म्हटलें आहे तेंही याचविषयीं; पण गोदान देण्याचें सामर्थ्य नसल्यास जाणावें. गौतमानें छत्तीस रात्री करावयाचें व्रत सांगून प्राणायामांसह स्नान व अघमर्षण केल्यास पुरुष इत्यादि ब्रह्मचारी महापातकांपासून मुक्त होतो, असें अकामतः केलेल्या पापाविषयीं सांगितलें आहे. बौधायनानें ‘ गांवांतून निघून पूर्व किंवा उत्तर दिशेकडे जावें. स्नान करून शुचि व्हावें. शुचिवस्त्र नेसावें. उदकापाशींच स्थंडिल करून व त्याला सारवून ओलेत्यानें एकदाच पवित्र केलेल्या हातानें सूर्याच्या सन्मुख होऊन अघमर्षण सूक्ताचा जप करावा. प्रातःकाळीं शंभर, मध्याह्नीं शंभर व अपराह्णीं शंभर असा सूक्तजप करून नक्षत्रें उगवलीं असतां पसाभर यवांचें जल प्राशन करावें. म्हणजे सात रात्रींतच पुरुष ज्ञानतः किंवा अज्ञानतः केलेल्या पापापासून मुक्त होतो. बारा रात्री हें अनुष्ठान केल्यानें ब्रह्महत्या, सुरापान व सुवर्णस्तेय यांस सोडून बाकीच्या महापातकांपासून मुक्त होतो. पण एक दिवस तें केल्यास या तीन महापातकांतून तो तरून जातो, ’ असें जें म्हटलें आहे तें कामतः केलेल्या त्या त्या दोषांविषयीं आहे. अथवा अकामतः केलेल्या श्रोत्रियाच्या आचार्याच्या किंवा सवनस्थ त्रैवर्णिकाच्या वधाविषयीं आहे, असें समजावें. मनूनें ( अ. ११ श्लो. २५८ ) तीन पराकांनीं शुद्ध झालेल्या पुरुषानें पवित्र होऊन अरण्यांत तीनदां वेदसंहिता म्हणावी. म्हणजे तो सर्व पापांपासून मुक्त होतो, असें म्हटलें आहे. पण तें कामतः केलेल्या श्रोत्रियादिकांच्या वधाविषयीं किंवा इतरांच्या कामतः केलेल्या वधाच्या अभ्यासाविषयीं आहे, असें जाणावें. वृहद्विष्णूनें ‘ ब्रह्महत्या करून गांवाच्या बाहेर पूर्वेस किंवा उत्तरेस जाऊन पुष्कळ इंधनानें अग्नीला प्रज्वलित करून अघमर्षण मंत्रानें आठ सहस्र आज्याहुति द्याव्या. म्हणजे वधक दोषापासून मुक्त होतो ’ असें निर्गुण पुरुषाच्या वधाविषयीं अथवा वधकावर अनुग्रह करणाराविषयीं सांगितलें आहे. यमानें ‘तीन दिवस त्रिकाल स्नान व उपोषण करून तीनदां अघमर्षण मंत्राचा जप करावा. ’ असें गुणवान् मनुष्यानें गुणरहित

पुरुषाचा वध केल्यास त्याकरितां किंवा वधप्रयोजक अथवा अनुमोदक यांविषयीं सांगितलें आहे. हारीतानें 'निमित्तकर्त्याला तीनदां अघमर्षण' हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. दुसऱ्या स्मृतिवचनांचा शोध करून त्यांचीही अशीच विषयव्यवस्था करावी. यागस्थ स्त्री, क्षत्रिय, वैश्य, आत्रेयी, अग्निहोत्र्याची भार्या, गर्भिणी व अज्ञात गर्भ यांचा नाश घडल्यास हें वरील व्रतच चवथा भाग न्यून करून योजावें ३०१.

आतां आणखी एक प्रायश्चित्त सांगतात—

**लोमभ्यः स्वाहेत्यथवा दिवसं मारुताशनः ।**
**जले स्थित्वाभिजुहुयाच्चत्वारिंशद्धृताहुतीः ॥ ३०२ ॥**

अथवा अहोरात्र उपोषण करून रात्रीं जलांत निवास करावा व प्रातःकाळीं त्यांतून उठून 'लोमभ्यः स्वाहा०' इत्यादि पूर्वोक्त आठ मंत्रांनीं प्रत्येकीं पांच या हिशोबानें चाळीस घृताहुती द्याव्या. या प्रायश्चित्ताचा व वरील प्रायश्चित्ताचा विषय एकच. कारण रात्रभर जलांत राहणें क्लेशावह आहे ३०२.

आतां क्रमप्राप्त सुरापानाचें प्रायश्चित्त सांगतात—

**त्रिरात्रोपोषितो हुत्वा कूष्माण्डीभिर्घृतं शुचिः ।**

'चत्वारिंशद्धृताहुतीः । ( म्हणजे तुपाच्या चाळीस आहुति )' या वरील श्लोकांतील पदांची अनुवृत्ति या श्लोकांतही होते. त्रिरात्र उपोषण करून 'यद्देवा देव हेडनं०' इत्यादि कूष्मांड ऋषींनीं पाहिलेल्या अनुष्टुभ मंत्रांनीं चाळीस घृताहुति होमून सुरापी पवित्र होतो. याविषयीं बौधायनानेंही असें म्हटलें आहे—"जो आपणाला अपवित्रसें समजत असेल त्यानें कूष्मांड-ऋषि-दृष्ट मंत्रांनीं हवन करावें म्हणजे तो भ्रूणहत्येपर्यंत जेवढीं पापें आहेत त्यांतून पावन होतो. स्वप्नातिरिक्त काळीं अयोनींत रेतःसेक केल्यासही हेंच प्रायश्चित्त करावें." मनूनें ( अ. ११. श्लो. २६२ ) एक महिनाभर प्रत्यहीं 'अपनः शोशुचदघं०' व 'महित्रीणामवो०' इत्यादिकांतील एकाचा जप केल्यास सुरापान करणारा पवित्र होतो, असें जें म्हटलें आहे तें त्रिरात्र उपोषण व कूष्माण्ड मंत्रांनीं हवन करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषाकरितां आहे. असो; हें प्रायश्चित्त पैष्टि सुरेचें एकदांच व गौडी आणि माध्वी यांचें वारंवार पान केल्यास त्याकरितां आहे, असें समजावें. मनूनें ( अ. ११ श्लो. २५६ ) एक वर्षभर प्रत्यहीं 'देवकृतस्यैनसो०' इत्यादि आठ मंत्रांनीं होम व 'इदुग्रंनम आविवास०' या ऋचेचा जप करावयास जें सांगितलें आहे तें कामतः केलेल्या सुरापानाविषयीं आहे. महापातकयुक्त पुरुषानें एक वर्षभर शांतमनानें गाईंच्या मागोमाग गमन करावें. पावमानी ऋचांचा जप करावा व भिक्षान्न खावें, असें जें एक व्रत सांगितलें आहे तें वारंवार केलेल्या पापासाठीं अथवा समुच्चित महापातकांविषयीं आहे, असें समजावें. आतां या श्लोकाच्या उत्तरार्धांत सुवर्णस्तेयाचें प्रायश्चित्त सांगतात—

**ब्राह्मणः स्वर्णहारी तु रुद्रजापी जले स्थितः ॥ ३०३ ॥**

सुवर्ण चोरणाऱ्या ब्राह्मणानें त्रिरात्र उपोषण करून व जलांत स्थित होऊन 'नमस्ते रुद्र मन्यव०' या शतरुद्रियाचा जप करावा. म्हणजे तो शुद्ध होतो. शातातपानें याविषयीं असा विशेष सांगितला आहे. मद्यपान, गुरुभार्येशीं गमन, स्तेय व ब्रह्महत्या यांतील कोणतेंही पाप घडल्यास पुरुषानें आपल्या शरीराला भस्मानें आच्छादित करावें, (अंगाला पुष्कळ भस्म लावावें), भस्मशय्येवर शयन करावें व रुद्राचें अध्ययन करावें, म्हणजे तो सर्व पापांपासून मुक्त होतो. रुद्राचीं अकरा आवर्तनें करावीं. कारण 'अकरा वेळ रुद्रावृत्ति करणारा धर्मज्ञ महापापापासूनही मुक्त होतो' असें अत्रीनें सांगितलें आहे. मनूनें (अ. ११ श्लो. २५०) 'अस्य वामस्य पलितस्य होतुः' इत्यादि बावन् ऋचांच्या सूक्ताचा अथवा 'यज्जाग्रतो दूरमुदैतु दैवम्०' इत्यादि सहा ऋचांच्या सूक्ताचा एकवारच जप करावयास सांगितलें आहे. पण तें अतिशय निर्गुण स्वामिचें सुवर्ण हरण करणाऱ्या गुणवान् अपहर्त्याकरितां आहे, असें जाणावें. अथवा सुवर्ण परिमाणाहून न्यून परिमाण सोनें चोरल्यास त्याकरितां किंवा अनुग्राहक, प्रयोजक इत्यादिकांविषयीं आहे, असें समजावें. पण या चौर्याची आवृत्ति केल्यास वरच्या श्लोकाच्या व्याख्यानांत सांगितलेलें-एक वर्षभर गायींचें अनुगमन, पावमानीचा जप व भैक्षाहार हें व्रत करावें. ३०३.

आतां क्रमानेंच प्राप्त झालेल्या गुरुभार्यागमनाचें प्रायश्चित्त सांगतात—

**सहस्रशीर्षाजापी तु मुच्यते गुरुतल्पगः ।**
**गौर्देया कर्मणोऽस्यान्ते पृथगेभिः पयस्विनी ॥ ३०४ ॥**

सहस्रशीर्षा, हें सोळा ऋचांचें नारायणानें पाहिलेलें व पुरुष ही ज्याची देवता आहे असें आरंभीं अनुष्टुभ् व अन्तीं त्रिष्टुभ् छंदोयुक्त सूक्त जो म्हणतो (त्याचा जप करतो) तो पापापासून मुक्त होतो. या श्लोकांत 'सहस्रशीर्षाजापी' असें म्हणून जापी येथील इन् (णिनि) प्रत्यय तच्छील (म्ह. तेंच ज्याचें शील आहे) या अर्थीं योजलेला असल्यामुळें त्या सूक्ताची सतत आवृत्ति करावी, असें सूचित होतें. येवढ्यासाठींच 'यमानें पुरुषसूक्ताची आवृत्ति केल्यानें पुरुष सर्व पापापासून मुक्त होतो' असें म्हटलें आहे. आतां आवृत्ति किती वेळां करावी? अशी अकांक्षा आली असतां खालील श्लोकांतील चाळीस या संख्येचें अनुमान होतें. येथेंही वरील 'त्रिरात्रोपोषितः' इत्यादिकाचा अन्वय होतो. त्याकरितांच तर वृद्धविष्णूनेंही 'त्रिरात्र उपोषण, पुरुषसूक्ताचा जप व होम यांच्या योगानें गुरुभार्यागामी शुद्ध होतो' असें म्हटलें आहे. असो. सुराप, गुरुभार्यागामी व सुवर्णस्तेन या तिघांनींही पृथक् पृथक् त्रिरात्रव्रत करून त्याच्या शेवटीं पुष्कळ दूध देणारी गाय द्यावी. हें विधान अकामतः केलेल्या पापाविषयीं आहे. मनूनें (अ. ११ श्लो २५१) हविष्यान्तमजरं०' 'नतमंहो न दुरितं०' 'सहस्रशीर्षा०' इत्यादि सूक्तांतील कोणत्या तरी एका सूक्ताचा एक महिनाभर प्रत्यहीं चाळीस वेळ जप करण्याविषयीं सांगितलें आहे.पण तेंही अकामतः केल्यास पापाविषयीं आहे. कामतः केल्यास त्यानेंच अकराव्या अध्यायाच्या २५६ व्या श्लोकांत सांगितलेलें व्रत करावें. षट्त्रिंशन्मतांत 'ब्राह्मणानें महाव्याहृतींनीं तिळांचा सहस्र होम उपपातकांच्या शुद्ध्यर्थ

करावा;पण महापातकी एकलक्ष होमानें शुद्ध होतो' असें जें म्हटलें आहे तें त्या त्या पापांच्या आवृत्तींकरितां आहे. यमानें ' अस्यवामीय०, पावमानी०, कुन्तापवालखिल्य० ' इत्यादिकांचा जप व्यभिचारिणी स्त्रीशीं गमन करणारास उद्देशून सांगितला आहे.गुरुतल्पाच्या अतिदेशाचा विषय झालेली किंवा त्याच्यासारखीं अशी जीं दुसरीं अतिपातक व उपपातक या नांवाचीं पापें त्याच्या ठिकाणीं क्रमानें चतुर्थांश न्यून व अर्धें व्रत योजावें. किंवा पातक,अतिपातक उपपातक व महापातक यांतील कोणतें तरी एक अथवा दोन-तीन यांचा समुच्चय झाल्यास हारीतानें सांगितल्याप्रमाणें अघमर्षणाचाच तीनदां जप करावा. महापातक्याशीं संसर्ग करणाऱ्याविषयीं ' स तस्यैव व्रतं कुर्यात् ' असें वचन असल्यामुळें त्याचा ज्या पातक्यानाशीं संसर्ग झाला असेल त्याचें व्रत त्यानें करावें. अध्यापनादि संसर्ग अनेक कर्त्यांकडून होत असल्यामुळें त्याला रहस्यत्व रहात नाहीं, तर तें प्रकाशपापच होतें, असें कोणी म्हणेल तर तें बरोबर नाहीं. कारण ज्याचे कर्ते एकाहून अधिक नसतील तेंच रहस्यपाप, असें म्हणणें योग्य नव्हे; तर कर्त्यावाचून इतर कोणाला जें कळलेलें नसतें तें रहस्यपाप व एक किंवा अनेक कर्त्यांहून इतरांना जें कळलेलें असतें तें प्रकाशपाप होय. अर्थात् परस्त्रीगमनांत पुरुष व स्त्री या दोघांनाही जरी तें ज्ञात होत असलें तरी त्या दोघांनाही त्या कृत्याचें कर्तृत्व असल्यामुळें जसें रहस्यपापच होय, त्याप्रमाणेंच एक किंवा अनेक कर्त्यांना सोडून बाकीच्या कोणालाही न कळलेलें कोणतेंही दुष्कृत्य रहस्यपापच होय आणि त्याच्याकरितांच रहस्यप्रायश्चित्त होतें. याच न्यायानें अतिपातक्यानादिकांशीं संसर्ग करणारालाही त्याचेंच प्रायश्चित्त करणें उचित आहे, असें जाणावें.

इति महापातकरहस्यप्रायाश्चित्तप्रकरणम्.

आतां क्रमानेंच प्राप्त झालेल्या गोवधादि छपन्न उपपातकांचें प्रायश्चित्त सांगतात--

**प्राणायामशतं कार्यं सर्वपापापनुत्तये ।**
**उपपातकजातानामनादिष्टस्य चैव हि ॥ ३०५ ॥**

गोवधादि छपन्न उपपातकें व जातिभ्रंशकरादि अनादिष्ट रहस्यव्रतें यांच्या निरसनार्थ शंभर प्राणायाम करावे. त्याचप्रमाणें महापातकांपासून प्रकीर्णकापर्यंत जेवढीं म्हणून पापें आहेत त्यांच्या निरसनाकरितांही प्राणायाम करावे. त्यांतील महापातकांकरितां चारशें, अतिपातकांकरितां तीनशें व अनुपातकांकरितां दोनशें अशी प्राणायामांच्या संख्येची कल्पना करावी. कारण, प्रकाशप्रायश्चित्तांचें प्रकरण चाललें असतांना उपपातकांमध्यें महापातकाच्या चतुर्थांशाचें विधान केलें आहे. यास्तव त्याच्या अनुरोधानें व प्रकीर्णकामध्येंही प्रायश्चित्ताच्या ऱ्हासाची योजना करावी. म्हणूनच यमानेंही ' दशप्रणवयुक्त चारशें प्राणायामांच्या योगानें पुरुष ब्रह्महत्येपासूनही मुक्त होतो, ' असें सांगितलें आहे. मग बाकीच्या क्षुद्र पातकांपासून तो मुक्त होईल हें काय सांगावें ? याविषयीं बौधायनानें "१ वाणी, नेत्र, कान, त्वचा, घ्राण व मन यांच्या योगानें कांहीं दोष केल्यास तीन प्राणायामांनीं शुद्धि होते. २ शूद्रस्त्रीगमन व

शूद्रान्नभोजन यांतील प्रत्येकाकरितां सात दिवस सात सात प्राणायाम करावे. ३ अभक्ष्य, अभोज्य, अमेध्य अन्न खाणें, मधु-मांस-घृत-तैल-लाक्षा-लवण इत्यादिकांस सोडून बाकीच्या अपण्यांचा विक्रय करणें इत्यादि दोषांच्या निरसनार्थ बारा दिवस बारा बारा प्राणायाम करावे. ४ पातक व उपपातक यांस वर्ज्य करून बाकीचें असेंच कांहीं पाप घडल्यास पंधरा दिवस बारा बारा प्राणायाम करावे. ५ पतनीय पापें व उपपातकें यांस सोडून बाकीच्या-करितां एक महिना प्रत्यहीं बारा प्राणायाम करावे. ६ अतिपातकांस सोडून बाकीच्या असल्याच पातकाकरितां सहामहिने व ७ पातकांच्या निरसनार्थ एक संवत्सर बारा प्राणायाम करावे," इत्यादि म्हटलें आहे.

यांतलि पहिले तीन प्राणायामांचें प्रायश्चित्त प्रकीर्णक पापाकरितां आहे. दुसरें विशेष प्रकारच्या उपपातकांकरितां आहे. तिसरेंही विशेष उपपातकांकरितां आहे. चवथें पातक व उपपातक यांस सोडून बाकीच्या जातिभ्रंशरादि पापाकरितां आहे. पांचवें तीनशेंसाठ प्राणा-यामात्मक प्रायश्चित्त गोवधादि उपपातकांकरितां आहे. सहावें दोन सहस्र एकशेंसाठ प्राणा-यामात्मक प्रायश्चित्त अतिपातक व अनुपातक यांसाठीं आहे आणि सातवें चार सहस्र तीनशेंवीस प्राणायाम हें प्रायश्चित्त महापातकांकरितां सांगितलें आहे. यांतील तिसऱ्या प्रायश्चित्तापासून पुढचीं पांच प्रायश्चित्तें पापाच्या अत्यंत अभ्यासाकरितां आहेत. अथवा एकाच वेळीं केलेल्या अनेक पापाविषयीं आहेत. मनूनें ( अ. ११ श्लो २५२ ) एक वर्षभर प्रत्यहीं दुसऱ्या कोणत्याही कार्यास प्रतिबंध न होईल अशा रीतीनें करावयास सांगितलेला--'अव ते हेळोवरुण०' व 'यत्किंचेदं०' या ऋचांचा-जपही अभ्यासाकरितांच आहे ३०५.

आतां सामान्य उपपातकांस सांगितलेल्या शंभर प्राणायामात्मक प्रायश्चित्ताचा अप-वाद सांगतात--

ओङ्काराभिष्टुतं सोमसलिलं पावनं पिबेत् ।
कृत्वा तु रेतोविण्मूत्रप्राशनं तु द्विजोत्तमः ॥ ३०६ ॥

द्विजानें रेत, विष्ठा व मूत्र यांतील कांहीं प्राशन केल्यास ओंकारानें अभिमंत्रित केलेल्या सोमरसाचें प्राशन करावें; म्हणजे तेंच त्याच्या शुद्धीचें साधन होतें. पण हें प्राय-श्चित्त अकामतः केलेल्या दोषाकरितां आहे. कामतः केलेल्या दोषाकरितां सुमन्तूनें 'रेतविष्ठा-मूत्र-लसूण-कांदा इत्यादि अभक्ष्यांचें व हंस-गांवकोंबडें इत्यादिकांचें भक्षण केल्यास गळाभर पाण्यांत उतरून शुद्धवती ऋचांनीं स्नान करावें आणि प्राणायाम व महाव्याहृति यांच्या योगानें उगमाजवळच्या जलाचें प्राशन करावें; म्हणजे शुद्धि होते,' असें सांगितलें आहे. मनूनें ( अ. ११ श्लो, २५३ ) अप्रतिग्राह्य वस्तूंचा प्रतिग्रह व सात प्रकारच्या निंद्य अभक्ष्यांचें भक्षण केल्यास तीन दिवस तरत्समंदीऋचेचा जप हें प्रायश्चित्त सांगितलें आहे. जलांत रेत, विष्ठा, मूत्र इत्यादिकांचा त्याग केल्यास एक महिना भिक्षान्न खाऊन रहावें, असेंही त्यानेंच सांगितलें आहे ३०६.

अज्ञानानें केलेलें प्रकीर्णक व मानस पाप यांचें प्रायश्चित्त सांगतात--

निशायां वा दिवा वापि यदज्ञानकृतं भवेत् ।
त्रैकाल्यसन्ध्याकरणात्तत्सर्वं विप्रणश्यति ॥ ३०७ ॥

रात्रौ किंवा दिवसा प्रमादानें केलेलें प्रकीर्णक व मानस अथवा वाचिक उपपातक इत्यादि सर्व पाप त्रिकालीं शास्त्रविहित संध्योपासना केल्यानें नष्ट होतें. यमानें ' दिवसा शरीरचेष्टा, मन व वाणी यांच्या योगानें पुरुष जें पाप करतो त्याचा नाश सायंकाळीं बसून केलेल्या सायंसंध्येंतील प्राणायामांच्या योगानें होतो, ' असें म्हटलें आहे. शातातपानेंही गांवाच्या बाहेर नद्यादिकांच्या तीरीं जाऊन जो संध्योपासना करतो तो मिथ्या भाषण, मद्याचा वास, दिवसा स्त्रीसंयोग व शूद्रान्नभक्षण या दोषापासून मुक्त होतो, ' असें सांगितलें आहे ३०७.

सर्व महापातकादिकांस साधारण असे पवित्र मंत्र सांगतात—

शुक्रियारण्यकजपो गायत्र्याश्च विशेषतः ।
सर्वपापहरा ह्येते रुद्रैकादशनी तथा ॥ ३०८ ॥

शुक्रिय या नांवाचें एक आरण्यक आहे. तें वाजसनेयकामध्यें असून ' विश्वानि देवसवितर० 'इत्यादि त्याचा आरंभ आहे. यजुः ऋचं वाचं प्रपद्ये; मनो यजुः प्रपद्ये, इत्यादि आरण्यकही त्याच शाखेंत आहे. त्यांचा जप सकल महापातकादिकांचें हरण करणारा आहे. त्याचप्रमाणें महापातकांमध्यें गायत्रीचा एक लक्ष जप, अतिपातक व उपपातक यांमध्यें दश सहस्र, सामान्य उपपातकांत सहस्र व प्रकीर्णकांमध्यें शत जप सांगितला आहे. तात्पर्य, गायत्रीचा जप सर्व पापांचें हरण करणारा आहे. गायत्रीविषयीं असा शंखानें श्लोक लिहिला आहे—शतं जप्त्वा तु सावित्री महापातकनाशिनी । सहस्रं जप्त्वा तु तथा पातकेभ्यः प्रमोचिनी॥ दशसाहस्रजाप्येन सर्वकिल्बिषनाशिनी । लक्षं जप्त्वा तु सा देवी महापातकनाशिनी ॥ या श्लोकांचें तात्पर्य वर सांगितलेंच आहे. शिवाय शंखानेंच ' सुवर्णस्तेयकृद्विप्रो ब्रह्महा गुरुतल्पगः सुरापश्च विशुद्ध्यन्ति लक्षं जप्त्वा न संशयः ' असें म्हणून एक लक्ष गायत्रीजप केल्यास सुवर्णाचा अपहार करणारा, ब्रह्मघातकी, गुरुभार्यागामी व सुरापान करणारा विप्र निःसंशय शुद्ध होतो, असें म्हटलें आहे. चतुर्विंशतिमतांत एक कोटी गायत्रीचा जप ब्रह्महत्येचा नाश करतो. जो ऐशीं लक्ष जप करतो तो सुरापान दोषापासून मुक्त होतो. सत्तर लक्ष जप केल्यानें सुवर्णाचा हर्ता दोषमुक्त होतो; आणि साठ लक्ष जप करणारा गुरुभार्यागमनापासून मुक्त होतो, ' असें जें सांगितलें आहे तें गुरुप्रायश्चित्त असल्यामुळें उघड उघड केलेल्या दोषाविषयीं आहे. त्याचप्रमाणें अकरा रुद्रानुवाकांच्या समुदायास रुद्रैकादशनी म्हणतात. तिचा विशेषें करून जप केल्यास ती सर्व पापांचें हरण करते. महापातकांचें निवारण करण्यासाठीं अकरा वेळा रुद्र म्हणावा. अतिपातकादिकांमध्यें चतुर्थ चतुर्थांशाची हानि करीत जावें. अर्थात् अतिपातकाला महापातकाच्या पाऊणपट प्रायश्चित्त, उप॰

पातकाला अर्धे इत्यादि या श्लोकांत ‘ गायत्र्याश्च ’ येथें जो चकार आहे तो अघमर्षणादि इतर प्रायश्चित्तांच्या समुच्चयाकरितां आहे. कारण वासिष्ठांनीं असें म्हटलें आहे–ज्यांच्या जपांनीं व होमांनीं मनुष्यें निःसंशय पावन होतात तीं सर्व वेदपवित्रें मी आतां यापुढें सांगतों. ‘ ऋतं च सत्यं० ’ इत्यादि अघमर्षण, ‘ देवकृतस्यैनसः० ’ इत्यादि देवकृत ऋचा ‘एतो-न्विन्द्रं स्तवाम ’ इत्यादि शुद्धवती ऋचा, ‘ तरत्समंदी, ’ इत्यादि तरत्समाः ऋचा, ‘यद्देवा देवहेडनं ’ इत्यादि कूष्मांडी ऋचा, ‘ स्वादिष्ठया मदिष्ठया ’ इत्यादि चार अध्याय ह्या पावमानी, ‘ जातवेदसे सुनुवाम ’ इत्यादि सूक्त हीच दुर्गा, ‘देवस्य त्वा ’ इत्यादि ऋचा हीच सावित्री, अभिषंग नांवाचे मंत्र, ‘ उत्सोदेवा हिरण्यया ’ इत्यादि पदस्तोम, साधारण सामें, ‘ भूरग्नये च पृथिव्यै च ’ इत्यादि व्याहृति, ‘ अग्न आयाहि० ’ इत्यादि सामें, गायत्र या नांवाचें साम, ‘ रैवतीर्न समाधा ’ इत्यादि रैवत सूक्त, वैश्वानरं ’ इत्यादि पुरुषव्रत, ‘ अग्ने व्रतपत ’ इत्यादि भास, ‘ अनृतात्सत्यमुपैमि इत्यादि देवव्रत, बौधायनीयांचे ‘ ऋतयग्रेष० ’ इत्यादि मंत्र, ‘ बृहस्पते प्रथमं वाचो ’ इत्यादि बार्हस्पत्य, ‘ ओष्ठापिधान ’ इत्यादि वाक्सूक्त ‘ मधुवाता० ’ इत्यादि मध्वृचा, ‘ नमस्ते रुद्र मन्यव ’ इत्यादि शतरुद्रिय, ‘ देवा ह वै स्वर्गं इत्यादि अथर्व शिर, ‘ ब्रह्ममेतु मां ’ इत्यादि त्रिसुपर्ण, ‘ अथ महाव्रतं ’ इत्यादि महाव्रत, ‘ आगावो अग्मन्० ’ इत्यादि गोसूक्त, ‘ अयन्तु अस्तु हर्यत० ’ इत्यादि अश्वसूक्त, ‘इंद्राय साम गायन ’ इत्यादि इंद्रशुद्ध सामें, ‘ आज्यदोहं० ’ इत्यादि तीन आज्य दोहसूक्तें, रथन्तर नांवाचें साम, ‘ अग्नेर्व्रतं ’ हें अग्निव्रत, ‘ कयानश्चित्र ’ इत्यादि वामदेव्य व बृहत्साम नांवाचें एक प्रकारचें साम, ही गीतें प्राण्यांस पावन करितात, फार काय पण त्यांना इच्छा असल्यास यांच्यायोगानें जातिस्मरत्वही प्राप्त होतें ३०८.

**यत्र यत्र च संकीर्णमात्मानं मन्यते द्विजः ।**
**तत्र तत्र तिलैर्होमो गायत्र्या वाचनं द्विजः ॥ ३०९ ॥**

ज्या ज्या ब्राह्मणवधादि पातकांत तज्जनित सकल दोषानें कोणी द्विज आपणास दूषित समजतो त्या त्या दोषांचें निरसन व्हावें म्हणून गायत्रीच्या मंत्रानें तिलांचा होम करावा. महापातकांत गायत्रीनें लक्ष होम करावा. यमानें ‘ गायत्रीच्या लक्ष होमानें पुरुष सर्व पापां-पासून मुक्त होतो ’ असें म्हटलें आहे. अतिपातकादिकांत पाद पाद ऱ्हास कल्पावा. त्याच-प्रमाणें तिलांनीं वाचन म्हणजें दान करावें. वसिष्ठानें रहस्याधिकारांत तसें सांगितलेंही आहे. वैशाखी पौर्णिमा असेल त्या दिवशीं पांच किंवा सात ब्राह्मणांस मधुयुक्त काळ्या किंवा पांढऱ्या तिलांनीं ‘धर्मराजः प्रीयतांन्’ असें म्हणून संतुष्ट करावें. म्हणजे पुरुष यावज्जीव केलेल्या पापा-पासून तत्क्षणीं मुक्त होतो. त्याचप्रमाणें हव्या त्यावेळीं दान करावयासही त्या ( वसिष्ठानेंच ) सांगितलें आहे. कृष्णाजिनावर तिल सोनें, मध व घृत ठेवून जो ब्राह्मणाला देतो तो सर्व दुष्कर्मांपासून मुक्त होतो. व्यासानेंही ‘ जो शांतचित्त पुरुष ब्राह्मणाला तिलधेनु देतो तो ब्रह्महत्यादि पापांपासून मुक्त होतो, ’ असें म्हटलें आहे. असो. रहस्यकांडांत सांगितलेलें हें अशाप्रकारचें सर्व दान अविद्वान् द्विज, स्त्रिया आणि शूद्र यांच्याकरितां आहे. असें जाणावें.

यमानेंही ‘ जो तिलाचें दान करतो, प्रातःकाळीं त्यांना स्पर्श करतो, तिळच खातो, त्यांचा कल्क अंगास लावून स्नान करतो व त्याचेंच हवन करतो, तो सर्व पापांपासून मुक्त होतो; ’ असें म्हणून शिवाय ‘ प्रत्येक पक्षांतील अष्टमी, चतुर्दशी, अमावस्या, पौर्णिमा, सप्तमी, द्वादशी या तिथींस भोजन न करतां एक वर्षभर सतत जितेंद्रिय राहणारा पुरुष सर्व पातकांपासून मुक्त होऊन स्वर्गलोकास जातो. अत्रीनें ‘ हरि आषाढीस क्षीरसागरांत शेषाच्या पर्यंकावर शयन करतो व कार्तिकीस निद्रेचा त्याग करतो. यास्तव त्या दोन्ही तिथींस हरीचें पूजन करावें; म्हणजे ब्रह्महत्यादि पाप तत्काळ नष्ट होतें ’ इत्यादि जें सांगितलें आहे तें सर्व विद्यारहित पुरुषांचे ठायीं काम, अकाम, एकदांच अनुष्ठान, वारंवार अनुष्ठान, इत्यादि विषयांच्या अनुरोधानें व्यवस्थापित करावें ३०९.

शिवाय--

वेदाभ्यासरतं क्षान्तं पञ्चयज्ञक्रियापरम् ।
न स्पृशन्तीह पापानि महापातकजान्यपि ॥ ३१० ॥

प्रथम स्वतः वेदांचा स्वीकार करणें, त्यांचा विचार करणें, अभ्यास करणें, जप करणें व शिष्यांस त्यांचें दान करणें, असा पांच प्रकारचा वेदाभ्यास आहे. त्यांत वर सांगितलेल्या क्रमानेंच निरत असणाऱ्या तितिक्षायुक्त व पंचमहायज्ञांच्या अनुष्ठानांत तत्पर राहणाऱ्या पुरुषास महापातकजन्य पापेंही स्पर्श करीत नाहींत. मग प्रकीर्णक अथवा वाङ्मनसजन्य उपपातकें यांच्याविषयीं काय बोलावें ? या श्लोकांतील अपिशब्दानें हा वरील कैमुतिकन्याय सुचविला आहे. पण हें प्रायश्चित्त कामतः केलेल्या दोषांविषयीं आहे. म्हणूनच वसिष्ठानेंही ‘ शेंकडों अकार्यें जरी कोणी केलीं असलीं तरी त्या सर्वांस वेदरूप अग्नि जाळून सोडतो, ’ असें प्रकीर्णकादिकांस उद्देशून म्हटलें आहे; पण वेदाच्या या बलाचा आश्रय करून पुरुष पापामध्येंच रत होईल, असेंही म्हणूं नये. कारण अज्ञान व प्रमाद यांच्या योगानें झालेल्या कर्मांनाच वेद जाळतो, इतरांना नाहीं, असाही नियम आहे ३१०.

वायुभक्षो दिवा तिष्ठन् रात्रिं नीत्वाप्सु सूर्यदृक् ।
जप्त्वा सहस्रं गायत्र्याः शुद्ध्येद्ब्रह्मवधादृते ॥ ३११ ॥

उपवास करून सर्व दिवसभर राहणारा व पाण्यांत बसून रात्र घालविणारा पुरुष ती रात्र संपून सूर्योदयानंतर एक सहस्र सावित्री मंत्राचा जप केल्यानें एका ब्रह्मवधास मात्र सोडून बाकीच्या सकलमहापातकांपासून मुक्त होतो. हें प्रायश्चित्त उपपातकादिकांचा अभ्यास झाल्यास अथवा अनेक पापांचा समुच्चय झाल्यास करावें. कारण, ज्यांचा विषयच विषम आहे त्यांना सम करणें हा अन्याय आहे. एवढ्याकरितांच वृद्धवसिष्ठानें महापातक व उपपातक या दोघांना उद्देशून विशेष काळीं विशेष व्रत सांगितलें आहे. जसें—पसाभर किंवा ओंजळभर यव आणि कढणारें घृत यांचे ‘ यवोसि धान्यराजो वा० ’ या मंत्रानें अभिमंत्रण करावें. अथवा ‘घृतं यवा मधुयवाः पवित्रममृतं यवाः। सर्वं पुनन्तु मनः मे पापं वाङ्मनः काय-

संभवं ' या मंत्रानें त्यांचें अभिमंत्रण करावें. त्यानें अग्निकार्य करूं नये. भूतबलिही देऊं नये. भिक्षा, आतिथ्य इत्यादि सर्व वर्ज्य करावें. उच्छिष्टाचा त्याग करूं नये. तर ' ये देवा मनोजाता मनोयुजः सुदक्षा दक्षपितरः ते नः पान्तु ते नोऽवन्तु तेभ्यो नमस्तेभ्यः स्वाहा ' असें म्हणून आत्म्यामध्येंच त्यांचें हवन करावें. हें हवन धारणाशक्तीच्या वृद्धीकरितां त्रिरात्र, पापक्षयार्थ त्रिरात्र, ब्रह्महत्यादिकांच्या निरसनार्थ सात रात्री व पतितोत्पन्नानें बारा रात्री करावें आणि याच दिशेचा अवलंब ( आश्रय )करून दुसऱ्याही स्मृतिवचनांचें विवेचन करावें३११.

इति रहस्यप्रायश्चित्तप्रकरणम् ।

आतां एवढा वेळ ज्यांचा विनियोग केला आहे त्या व्रतसमूहाचें पृथक् स्वरूप जाणतां यावें म्हणून त्याचें स्वरूप सांगतात. पण त्यांतल्या त्यांत अगोदर सर्व प्रकाश व रहस्य व्रतांच्या अंगभूत धर्मांचा निर्देश करितात—

**ब्रह्मचर्यं दया क्षान्तिर्दानं सत्यमकल्कता ।**
**अहिंसाऽस्तेयमाधुर्ये दमश्चेति यमाः स्मृताः॥ ३१२ ॥**
**स्नानं मौनोपवासेज्यास्वाध्यायोपस्थनिग्रहाः ।**
**नियमा गुरुशुश्रूषा शौचाक्रोधाप्रमादता ॥ ३१३ ॥**

सर्व इंद्रियांचा संयम, दया, क्षान्ति, दान, सत्य, अकुटिलता, अहिंसा, अस्तेय, वाणीची मधुरता व दम हे यम म्हणून सांगितलेले आहेत. स्नान, मौन, उपवास, पूजन, स्वाध्याय, उपस्थेंद्रियाचा निग्रह, गुरुशुश्रूषा, शौच, अक्रोध व अप्रमादता हे नियम आहेत. मनूनें ' अहिंसा, सत्य, अक्रोध व आर्जव ( सरळभाव ) यांचें आचरण करावें, ' असें जें सांगितलें आहे तें यमांची गणना करण्याकरितां नसून ( म्हणजे यम कायते इतकेच, यांहून अधिक नाहींत, असें सांगण्याकरितां नसून ) केवल उपलक्षणार्थ आहे. यास्तव त्यांच्याबरोबर यांचीही गणना करावी. दया, शान्ति इत्यादि गुणांची पुरुषार्थतेनें प्राप्ति असतांनाहि पुनः जें विधान केलें आहे तें प्रायश्चित्तांचीं तीं अंगं आहेत, असें दाखविण्याकरितां आहे. कोठें कोठें त्यांहून विशेषही आहे. जसें—विवाहादिकांत असत्य भाषण करण्याची अनुज्ञाही दिलीं आहे; पण प्रायश्चित्तसमयी त्याचीही निवृत्ति होण्यासाठीं सत्यत्वाचें विधान केलें आहे. पुत्रशिष्यादिकांनाही ताडण करूं नये. म्हणून अहिंसेचें विधान आहे आणि असेंच दुसऱ्याविषयींही समजावें ३१२,३१३

आतां पूर्वोक्त अनेक व्रतांतील सांतपन या नांवाचें व्रत अगोदर सांगतात—

**गोमूत्रं गोमयं क्षीरं दधि सर्पिः कुशोदकम् ।**
**जग्ध्वा परेह्न्युपवसेत्कृच्छ्रंसांतपनं परम् ॥ ३१४ ॥**

आदल्या दिवशीं दुसऱ्या सर्व आहारांचा परित्याग करून गोमूत्र, गोमय, गोदुग्ध, गोदधि व गोघृत हीं पांच पंचगव्यें घेऊन व तीं कुशोदकांत मिसळून प्यावीं आणि

दुसऱ्या दिवशीं उपवास करावा. हें द्वैरात्र सांतपन कृच्छ्र आहे. पुढच्या श्लोकांत या पांच गव्यांचें पृथक् विधान केलेलें असल्यामुळें त्यावरूनच येथें त्यांचें मिश्रण करावें, असें सूचित होतें. कृच्छ्र ही याला अन्वर्थ संज्ञा आहे. कारण हें व्रत तपोरूप असल्यामुळें क्लेशसाध्य आहे. गोमूत्रादिकांचें परिमाण पुढें सांगूं. जेव्हां आदल्यादिवशीं उपोषण करून दुसऱ्या दिवशीं समंत्रक मिश्रण करून तें पंचगव्य समंत्रकच प्राशन केलें जातें तेव्हां त्याला ब्रह्मकूर्च असें म्हणतात, याविषयीं पराशरानें असें म्हटलें आहे– गोमूत्र, गोमय, दूध, दही, तूप व कुशोदक यांच्या मिश्रणास पंचगव्य म्हणतात. यांतील प्रत्येक वस्तु शरीरशोधक आहे. ताम्रवर्ण गायीचें गोमूत्र, श्वेतवर्ण गाईचें गोमय, सोन्यासारख्या वर्णाच्या गायीचें दूध, साधारण काळ्या गायीचें दहीं, व चांगल्या काळ्या गायीचें घृत घ्यावें किंवा भिन्न भिन्न वर्णाच्या गायी न मिळाल्यास गोमूत्रादि सर्वच कपिला गायीचें घ्यावें. गोमूत्र आठ मासे, गोमय सोळा मासे, दूध बारा मासे, दहीं दहा मासे, घृत आठ मासे व कुशोदक चार मासे घ्यावें. गायत्रीमंत्रानें गोमूत्र, 'गंधद्वारां दुरा०' या मंत्रानें गोमय, 'आप्यायस्व०' या मंत्रानें दूध, 'दधिक्राव्णो०' इत्यादि मंत्रानें दहीं, 'तेजोऽसि शुक्रं' या मंत्रानें आज्य व 'देवस्यत्वा०' या मंत्रानें कुशोदकाचें संमिश्रण करावें. ऋचेनें पवित्र केलेल्या पंचगव्याचा अग्निसंनिध होम करा. ज्यांना सात पानें आहेत व ज्यांचीं अग्रें तोडलेलीं नाहींत अशा शुद्ध दर्भांनीं पंचगव्य उचलून यथाविधि अग्नींत होमावें. 'इरावतीं०,' 'इदं विष्णुः०,' 'मानस्तोके०' व 'शंवती' या मंत्रांनीं होम करून द्विजानें बाकी राहिलेलें पंचगव्य प्राशन करावें. प्रणवानें त्याला ढवळून, प्रणवानेंच अभिमंत्रित करून, प्रणवानेंच उचलून प्रणवानेंच प्राशन करावें, पळसाच्या तीन पानांतील मधल्या पानानें, कमळाच्या पानानें, स्वर्णाच्या किंवा तांब्याच्या पात्रानें, अथवा ब्राह्मतीर्थानें तें प्यावें. 'यत्त्वगस्थिगतं पापं०' या मंत्रानें त्याचें पान करावें. याच मिश्रित पंचगव्याचा जेव्हां त्रिरात्र अभ्यास केला जातो तेव्हां त्याला यतिसांतपन ही संज्ञा प्राप्त होते. याला शंखाचें वचन प्रमाण आहे. जाबालानें 'गोमूत्रादि पांच गव्यें व सहावें कुशोदक यांतील प्रत्यहीं एकेक अशा क्रमानें सहा दिवस प्राशन करून सातव्या दिवशीं अहोरात्र उपोषण करावें. हें सांतपन कृच्छ्र असून तें सर्व पापांचा नाश करतें असें म्हणून सात दिवसांनीं साध्य होणारें सांतपन सांगितलें आहे. या गुरु-लघु कृच्छ्रांची व्यवस्था शक्ति, दोष, इत्यादिकांच्या अपेक्षेनें करावी. पुढेंही सर्वत्र अशीच व्यवस्था जाणावी ३१४.

आतां महासांतपनाख्य कृच्छ्र सांगतात—

**पृथक्सान्तपनद्रव्यैः षडहः सोपवासकः ।**
**सप्ताहेन तु कृच्छ्रोऽयं महासान्तपनः स्मृतः ॥ ३१५ ॥**

सात दिवसांनीं साध्य होणारें महा सांतपनाख्य कृच्छ्र जाणावें. पंचगव्यांच्या सहा द्रव्यांपैकीं प्रत्यहीं पृथक् एकेक द्रव्य प्राशन करून सातव्या दिवशीं उपवास केल्यानें तें साध्य होतें. यमानें तर पंधरा दिवसांनीं साध्य होणारें महासांतपन सांगितलें आहे. त्याचा प्रकार

असा— तीन दिवस गोमूत्र प्राशन करावें. तीन दिवस गोमय, तीन दिवस दही, तीन दिवस दूध व तीन दिवस घृत प्राशन करावें म्हणजे पुरुष शुचि होतो. हें सर्व पापांचा नाश करणारें महासांतपन आहे. तसेंच जाबालानें एकवीस दिवसांनीं सिद्ध होणारें महासांतपन सांगितलें आहे, तें असें–पंचगव्याच्या सहा द्रव्यांतील प्रत्येक द्रव्याचा तीन तीन दिवस उपयोग करून शेवटीं तीन दिवस उपवास करावा. त्यालाच विद्वान् महासांतपन म्हणतात. यमानें सांगितल्याप्रमाणें पंचगव्यद्रव्यांतील एकेक दोन दिवस घेतल्यानें अतिसांतपन होतें. ' तें श्वपाकालाही शुद्ध करतें, ' असें जरी यमानें म्हटलें आहे तरी तो अर्थवाद आहे, असें जाणावें. कारण वस्तुस्थिति तशी असणें शक्य नाहीं ३१५.

आतां पर्णकृच्छ्र या नावांचें व्रत सांगतात—

**पर्णोदुम्बरराजीवबिल्वपत्रकुशोदकैः ।**
**प्रत्येकं प्रत्यहं पीतैः पर्णकृच्छ्र उदाहृतः ॥ ३१६ ॥**

पळस, उदुंबर, कमल व बिल्व यांचीं पानें आणि कुश यांतील एकेका जातीचीं पानें प्रत्यहीं घालून उकळविलेलें जल पांच दिवस प्यावें, म्हणजे पांच दिवसांनीं साध्य होणारें तें पर्णकृच्छ्र होतें; पण वरील चारी प्रकारचीं पानें व कुश हीं एकत्र घालून व काढा करून तो जेव्हां तीन दिवस प्याला जातो तेव्हां त्याला पर्णकूर्च म्हणतात. कारण यमानें तसें म्हटलें आहे. जेव्हां बिल्वादि फळांतील प्रत्येक जातींच्या फळांचा काढा करून एक महिनाभर प्यावा तेव्हां त्याला फलकृच्छ्र इत्यादि नांवें प्राप्त होतात. फळांच्या योगानें फलकृच्छ्र, श्रीफळांच्या योगानें श्रीकृच्छ्र, पत्रांच्या योगानें पत्रकृच्छ्र, पुष्पांच्या योगानें पुष्पकृच्छ्र, मुळांच्या योगानें मूलकृच्छ्र व जलानें तोयकृच्छ्र होतें ३१६.

आतां तप्तकृच्छ्र व्रत सांगतात—

**तप्तक्षीरघृताम्बूनामेकैकं प्रत्यहं पिबेत् ।**
**एकरात्रोपवासश्च तप्तकृच्छ्र उदाहृतः ॥ ३१७ ॥**

पहिल्या दिवशीं तापलेलें दूध, दुसऱ्या दिवशीं तापलेलें घृत व तिसऱ्या दिवशीं तापलेलें जल पिऊन चवथ्या दिवशीं उपवास करावा. हें चार दिवसांनीं साध्य होणारें महातप्तकृच्छ्र आहे. एकच दिवस हीं तिन्हीं प्राशन करून दुसऱ्या दिवशीं उपवास केल्यानें दोन रात्रींत संपादन होणारें तप्तकृच्छ्र होतें. मनूनें तर ( अ. ११ श्लो. २१४ ) ' पहिल्या तीन दिवस उष्णजल, नंतर तीन दिवस उष्ण दूध, पुढें तीन दिवस तप्त घृत आणि शेवटीं तीन दिवस नुस्तें उष्ण वायुभक्षण एकदांच स्नान करून करावें. ' असें सांगितलें आहे. दुग्धादिकांचें प्रमाण पराशरानें असें सांगितलें आहे—जल त्रिपल, क्षीर द्विपल, घृत एक पल व उष्ण वायु तीन रात्री प्राशन करावा. वायूच्या जागीं उष्णजलाची वाफ प्यावी. पण वरील क्षीरादि पदार्थ थंडच प्याल्यास त्याला शीतकृच्छ्र म्हणतात. यमानें त्याचें विधान केलें आहे ३१७.

आतां पादकृच्छ्र सांगतात—

**एकभक्तेन नक्तेन तथैवायाचितेन च ।**
**उपवासेन चैवायं पादकृच्छ्रः प्रकीर्तितः ॥३१८ ॥**

केवल दिवसाच एकदां भोजन केल्यानें, नक्तानें, अयाचितानें व उपवासानें पादकृच्छ्र होतें. नक्तेन असें पुनः पृथक् म्हटलेलें असल्यामुळें दिवसा एकवार भोजन करूनच एक अहोरात्र घालवावी. ' दिवा ' असें म्हणून रात्रीचा, एकवार असें म्हणून द्विवाराचा व ' भोजनेन ' असें ह्मणून उपवासाचा निरास केला आहे. कृच्छ्रादिकांना व्रतरूपत्व असल्यामुळें पुरुषार्थ भोजनाचा निषेध करून कृच्छ्रांगभूत भोजनाचें विधान केलें आहे. आपस्तंबानें ' तीन दिवस रात्रीं भोजन न करणारा, तीन दिवस दिवसा भोजन न करणारा, त्यानंतर तीन दिवस अयाचित व्रत करणारा व तीन दिवस मुळींच न खाणारा पुरुष बारा दिवसांत व्रत संपादन करतो. ' असें म्हटलें आहे. या वचनांत दिवसा भोजनाचा नियम सांगितला आहे. गौतमानेंही असेंच स्पष्ट करून सांगितलें आहे. कोणापाशीं कांहीं मागितलेलें नसतांना यदृच्छेनें प्राप्त होणारें जें अन्नादि तें अयाचित. त्याच्याकरितां विशेष काल सांगितलेला नसल्यामुळें दिवसा किंवा रात्रीं, जेव्हां मिळेल त्यावेळीं, एकदां रहावें. कारण, अयाचितसुद्धां तपोरूप असून दोनदां भोजन केल्यास कोणतेंही कृच्छ्र साध्य होणें शक्य नसतें. अयाचित म्हणजे केवळ दुसऱ्याच्या अन्नाची याचना करावयाची नाहीं, इतकेंच नव्हे तर आपल्याही परिचारक–भार्या इत्यादिकांपासून तें मागून घ्यावयाचें नाहीं. यास्तव, स्वगृहांतही भृत्य–भार्यादिकांनीं आज्ञा केल्यावाचूनच जर भोजन आणून दिलें तर तें खावें. याच अभिप्रायानें गौतमानेंही ' अथपरत्र्यहं न कंचन याचेत ' असें म्हटलें आहे. यांतील ग्रासांच्या संख्येचा नियम पराशरानें असा सांगितला आहे—सायंकाळीं बाराग्रास, प्रातःकाळीं पंधरा व अयाच्य चोवीस ग्रास हें उत्तम निरशनच आहे. आपस्तंबानें तर त्यांची संख्या निरानिळीच सांगितली आहे. सायंकाळीं बावीस ग्रास, प्रातःकाळीं सव्वीस व अयाच्य चोवीस हीं तिन्हीं निरशनेंच आहेत. प्रत्येक ग्रास कोंबड्याच्या अंड्याच्या प्रमाणाचा असावा. तात्पर्य, तो मनुष्याच्या तोंडांत अनायासानें गेला पाहिजे. असो; या वरील दोन कल्पांतील कोणत्या तरी एका कल्पाची योजना पुरुषाच्या शक्तीच्या अनुरोधानें करावी. आपस्तंबानें तर प्राजापत्य प्रायश्चित्ताचे चार विभाग करून म्हणचे चार पादकृच्छ्रें करून ब्राह्मणादि वर्णांच्या अनुरोधानें व्यवस्था करावी, असें म्हटलें आहे. तीन दिवस निरशन करणें, हा एक पाद; तीन दिवस अयाचित, हा दुसरा; तीन दिवस सायंकाळीं भोजन करणें, हा तिसरा आणि तीन दिवस प्रातःकाळीं भोजन करणें, हा चवथा पाद होय. यांतील चवथा म्हणजे प्रातःपाद शूद्रानें करावा. वैश्यानें तिसरा, क्षत्रियानें दुसरा, अयाचित व ब्राह्मणानें पहिला निरशन पाद करावा. जेव्हां तीन दिवस अयाचित व तीन दिवस निरशन या दोन पादांचें अनुष्ठान केलें जातें तेव्हां तें अर्धकृच्छ्र होतें. त्यांतच तीन दिवस प्रातःकाळीं भोजन, या त्र्यह व्रताची भर घातली असतां तेंच पादोनकृच्छ्र होतें. एके दिवशीं

सायंकाळीं भोजन करणें, दुसऱ्या दिवशीं प्रातःकाळीं जेवणें, त्यानंतर दोन दिवस अयाचित व दोन दिवस उपोषण, अशा सहा दिवसांच्या अनुष्ठानानें कृच्छ्रार्ध होतें, असा आणखी एक प्रकार त्यानें ( आपस्तंबानें ) च सांगितला आहे ३१८.

आतां प्राजापत्य कृच्छ्र सांगतात—

**यथाकथञ्चित् त्रिगुणः प्राजापत्योऽयमुच्यते ।**

या पादकृच्छ्राच्या अनुष्ठानक्रमांत दंडकलितवत्–आवृत्ति, स्वस्थानवृद्धि, त्यांचेंच आनुलोम्य किंवा प्रातिलोम्य अनुष्ठान, त्याचप्रमाणें पुढें सांगितलेल्या जपादिकानें युक्त अथवा तद्रहित,–इत्यादि बदल करून त्याचें कसेंही अनुष्ठान तीन वेळ जर केलें तर त्यालाच प्राजापत्य म्हणतात. त्यांतील दंडकलितवत्–आवृत्तिपक्ष वसिष्ठानें असा दाखविला आहे. एक दिवस प्रातःकाळीं भोजन, एक दिवस रात्रीं, एक दिवस अयाचित व एक दिवस उपोषण आणि अशीच आणखी दुसऱ्या चार दिवसांची दोनदां आवृत्ति. याप्रमाणें बारा दिवसांनीं साध्य होणारें हें शिशुकृच्छ्र धर्मज्ञांतील श्रेष्ठ मनूनें ब्राह्मणांवर अनुग्रह करण्याकरितां बाल, वृद्ध व आतुर यांच्यासाठीं सांगितलें आहे. आनुलोम्यानें स्वस्थानवृद्धीचा पक्ष मनूनें ( अ. ११ श्लो २११ ) असा सांगितला आहे–तीन दिवस प्रातःकाळीं, तीन दिवस सायंकाळीं व तीन दिवस अयाचित भोजन करून पुढें तीन दिवस कांहीं खाऊं नये. द्विजांना हें योग्य प्राजापत्य आहे. प्रातिलोम्य आवृत्ति वसिष्ठानें ' प्रातिलोम्यं चरेद्विप्रः कृच्छ्रं चाद्रायणोत्तरं ' असें म्हणून सांगितलि आहे. स्त्री-शूद्रादिकांकरितां जपादिरहित पक्ष अंगिरानें 'तस्माच्छूद्रं समासाद्य सदा धर्मपथे स्थितम् । प्रायश्चित्तं प्रदातव्यं जपहोमादिवर्जितम् ।' या वचनानें सांगितला आहे. अर्थात् अवशिष्ट राहणारा जपादियुक्त पक्ष त्रैवर्णिकांकरितांच आहे. कारण,जपादिकांची योग्यता त्यांच्यामध्येंच असते. गौतमादिकांनीं त्याचें असें वर्णन केलें आहे.-आतां आह्मी कृच्छ्रांचें व्याख्यान करतों. मोठ्याही पापापासून सत्वर एकाच कृच्छ्रानें मी मुक्त व्हावें अशी ज्याची इच्छा असेल त्यानें तीन दिवस प्रातःकाळीं हविष्यान्न खाऊन रात्रीं भोजन करूं नये. पुढें तीन दिवस नक्त भोजन करावें. नंतर तीन दिवस कोणापाशीं न मागतां यदृच्छेनें मिळेल तें खाऊन रहावें व शेवटीं तीन दिवस उपोषण करावें. जपादि काम नसेल तेव्हां दिवसा उभें रहावें आणि रात्रीं बसावें. सत्य भाषण करावें. अनार्याशीं भाषणही करूं नये. रौरवयोधा या नांवाच्या सामाचा जप करावा. त्याचा नेहमीं पाठ करावा. त्रिकाल स्नान करावें. 'आपोहिष्ठा०' इत्यादि तीन पवित्रवती ऋचांनीं अप-उप-स्पर्शन करावें. ' हिरण्यवर्णा शुचयः पावकाः० ' इत्यादि आठ ऋचांनीं मार्जन करावें. नंतर तर्पण अशा रीतीनें करावें. ' नमोहमाय मोहमाय मंहमाय धन्वने तापसाय पुनर्वसवे नमः । मौंजाय और्म्याय वसुविन्दाय सर्वविदाय नमः । पाराय सुपाराय महापाराय परपाराय पारयिष्णवे नमः । रुद्राय पशुपतये महते देवाय त्र्यम्बकाय एकचराय अधिपतये हराय शर्वाय ईशानाय उग्राय वज्रिणे घृणिने कपर्दिने नमः । नीलग्रीवाय शितिकण्ठाय नमः । कृष्णाय पिंगलाय नमः । ज्येष्ठाय श्रेष्ठाय वृद्धाय इन्द्राय हरिकेशाय ऊर्ध्वरेतसे नमः । सत्याय पावकाय पावकवर्णाय एकवर्णाय कामाय कामरूपिणे नमः । दीप्ताय

दीप्तरूपिणे नमः । तीक्ष्णाय तीक्ष्णरूपिणे नमः । सौम्याय पुरुषाय महापुरुषाय मध्यमपुरुषाय उत्तमपुरुषाय ब्रह्मचारिणे नमः । चन्द्रललाटाय कृत्तिवाससे नमः ॥ ' हेंच आदित्याचें उपस्थान व याच मंत्रांनीं आज्याहुती द्याव्या. बारा दिवसांनंतर चरु शिजवून अग्नये स्वाहा, सोमाय स्वाहा, अग्नीषोमाभ्यां स्वाहा आणि त्याचप्रमाणें इन्द्राग्निभ्यां, इन्द्राय, विश्वेभ्यो देवेभ्यः ब्रह्मणे, प्रजापतये व अग्नये स्विष्टकृते या देवतांच्या चतुर्थ्यन्त नांवापुढें स्वाहाशब्द योजून होम करावा व शेवटीं ब्राह्मणभोजन घालावें.

योगीश्वरानें स्वतः जरी यांतील कांहींएक सांगितलेलें नाहीं तरी सत्वर पापमुक्त होण्याची इच्छा करणारानें हें सर्व ( जप-तर्पण-उपस्थान-होम-चरुश्रपण ) अनुष्ठान करावें अर्थात् योगीश्वरानें सांगितलेल्या दोन प्राजापत्यांचे ठिकाणीं गौतमानें सांगितलेलें व अनेक इतिकर्तव्यतेनें युक्त असलेलें हें एकच जाणावें. याचप्रमाणें दुसऱ्या स्मृतींत सांगितलेले दुसरेहि सर्व प्रकार शोधून त्यांचें अनुष्ठान करावें.

आतां अतिकृच्छ्र सांगतात—

**अयमेवातिकृच्छ्रः स्यात्पाणिपूरान्नभोजनः ॥ ३१९ ॥**

अतिकृच्छ्र एक भक्तादि प्राजापत्याच्या धर्मांनीं युक्तच असतें. तथापि त्यांत इतका विशेष आहे. पहिल्या त्र्यहत्रयांत ( म्ह. नऊ दिवस ) केवल हातांत मावेल तितकेंच अन्न खाऊन रहावें बावीस, चोवीस इत्यादि ग्रास खाऊं नयेत. येथें प्राप्त भोजनाचा अनुवाद करून पाणिपूर्ण अन्नभक्षणाचे विधान केलेलें असल्यामुळें शेवटच्या तीन दिवशीं करावयाच्या उपवासाशीं कांहीं विरोध येत नाहीं. अर्थात शेवटीं तीन दिवस उपवासच करावा. येथेंही पूर्वीप्रमाणेंच पादशः व्यवस्था जाणावी. ' अतिकृच्छ्र करणाऱ्या द्विजानें नऊ दिवस एकेक ग्रास खावा व शेवटीं तीन दिवस उपवास करावा,' असें मनूनें जें ( अ. ११ श्लो. २१३. ) म्हटलें आहे तें समर्थ पुरुषांकरितां आहे. कारण पाणिपूर्ण अन्नापेक्षांही हें प्रमाण अल्प आहे ३१९.

आतां कृच्छ्रातिकृच्छ्र सांगतात--

**कृच्छ्रातिकृच्छ्रः पयसा दिवसानेकविंशतिम् ।**

एकवीस अहोरात्र नुसत्या दुधावर राहणें, हें कृच्छ्रातिकृच्छ्र व्रत आहे. गौतमानें तर बारा अहोरात्र नुसत्या जलावर राहणें, हें कृच्छ्रातिकृच्छ्र आहे, असें सांगितलें आहे. यास्तव व्रत करणाऱ्या पुरुषाच्या शक्तीच्या अपेक्षेनें या दोन्ही पक्षांची योजना करावी.

आतां पराक सांगतात--

**द्वादशाहोपवासेन पराकः परिकीर्तितः ॥ ३२० ॥**

बारा दिवस उपवास केल्यानें पराक व्रत होतें ३२०

आतां सौम्यकृच्छ्र सांगतात--

**पिण्याकाचामतक्राम्बुसक्तूनां प्रतिवासरम् ।**
**एकरात्रोपवासश्च कृच्छ्रः सौम्योऽयमुच्यते ॥ ३२१ ॥**

पिण्याक ( तेल काढून घेतलेले तिळ, पेंड ), पेज, ताक, जल व सातु या पांच पदार्थांतील रोज एकेक खाऊन सहाव्या दिवशीं उपवास करावा. याला सौम्य या नावांचे कृच्छ्र म्हणतात. प्राणरक्षण होईल इतकच द्रव्याचें परिमाण समजावें. जाबालानें तर 'पिण्याक सातु व तक यांचा एकेक दिवस उपयोग करून चवथ्या दिवशीं उपवास करावा. वस्त्राची दक्षणा द्यावी,' असें म्हणून चार दिवसांत साध्य होणारें सौम्यकृच्छ्र सांगितलें आहे३२१.

आतां तुलापुरुषसंज्ञक कृच्छ्र सांगतात--

**एषां त्रिरात्रमभ्यासादेकैकस्य यथाक्रमम् ।**
**तुलापुरुष इत्येष ज्ञेयः पञ्चदशाहिकः ॥ ३२२ ॥**

वर सांगितलेल्या पिण्याकादि पांच पदार्थांतील एकेकाचा क्रमानें तीन तीन दिवस अभ्यास केल्यास पंधरा दिवस चालणारें तुलापुरुष या नावाचें कृच्छ्र होतें, असें जाणावें. येथें पंधरा दिवसांचेंच विधान असल्यामुळें उपवासाची निवृत्ति होते. यमानें तर एकवीस रात्रींत साध्य होण्याच्या तुलापुरुषाचें असें विधान केलें,आहे. आचाम, पिण्याक, तक्र, उदक व सक्तुयांचें क्रमानें तीन तीन दिवस भक्षण करावें आणि शेवटीं सहा दिवस वायुभक्षण करावें. या व्रतामध्यें हारीतादिकांनीं पुष्कळ इतिकर्तव्यता सांगितली आहे. पण ग्रंथविस्ताराच्या भयानें आम्ही तीं येथें लिहित नाहीं ३२२

आतां चांद्रायण सांगतात--

**तिथिवृद्ध्या चरेत्पिण्डान् शुक्ले शिख्यण्डसंमितान् ।**
**एकैकं ऱ्हासयेत्कृष्णे पिण्डं चांद्रायणं चरन् ॥ ३२३ ॥**

चांद्रायणसंज्ञक व्रत करणाऱ्या पुरुषानें मोराच्या अंड्याएवढाले पिंड जशी जशी तिथि वाढत जाईल तसे तसे वाढवीत खावे. शुक्ल प्रतिपदेपासून सर्व पक्षभर रोज चंद्राची एकेक कला वाढत असते. त्याच्या अनुरोधानें प्रतिपदेच्या दिवशीं एक पिंड, द्वितीयेस दोन, अशा क्रमानें वाढवित पौर्णिमेपर्यंत पंधरा ग्रास वाढवावे. पौर्णिमेस पंधरा ग्रास खाऊन कृष्णप्रतिपदेस चवदा द्वितीयेस तेरा, तृतीयेस बारा असे उतरीत यावें. चतुर्दशीच्या दिवशीं एकच ग्रास खाऊन अमावास्येच्या दिवशीं अर्थातच उपवास करावा. वासिष्ठानें असेंच सांगितलें आहे. चंद्राच्या गतीप्रमाणें याचें आचरण करावयाचें असल्यामुळें याला चांद्रायण म्हणतात. यवाप्रमाणें हें व्रत आरंभी व अंतीं ( दोन्ही टोकांना ) सूक्ष्म व मध्यें मात्र स्थूल असल्यामुळें याला यवमध्य असें म्हणतात. पण याचेंच कृष्णप्रातिपदेपासून आरंभ करून जेव्हां अनुष्ठान केलें जातें तेंव्हां त्याचा मध्य मुंगीचा मध्याप्रमाणें अतिशय सूक्ष्म होतो. यास्तव त्याला पिपीलिकामध्य म्हणतात. यालाही वासिष्ठाची संमति आहे. पण हें व्रत करीत असतांना जेव्हां एकाद्या पक्षांत तिथींची वृद्धि होऊन सोळा दिवस अथवा क्षय होऊन चवदाच दिवस येतात तेंव्हां ग्रासांचीही वृद्धि अथवा ऱ्हास करावा, कारण 'तिथिवृद्ध्या पिण्डान् चरेत् ।'

असा त्याविषयीं नियम आहे. गौतमानें या व्रताविषयीं कांहीं विशेष सांगितला आहे. कृच्छ्र कर्तव्य असतां प्रथम वपन करावें. पौर्णिमेच्या आदल्या दिवशीं म्हणजे शुक्ल चतुर्दशीस उपवास करावा. ' आप्यायस्व० ' इत्यादि मंत्रांनी तर्पण, आज्य, होम, हवीचें अनुमंत्रण व ' यद्देवा देवहेडनम् ' या चार आणि ' देवकृतस्य ' या एका ऋचेनें चंद्राचें उपस्थान करावें. घृताचें हवन करावें. शेवटीं समिधांनी ' ॐ भूः स्वाहा, ॐभुवः स्वाहा, ' इत्यादि म्हणून होम करावा व त्याच मंत्रांचा उच्चार करून ग्रास खावे. खाणाऱ्याचें तोंड वांकडें-तिकडें न होईल अशा बेतानें ग्रासाचें प्रमाण ठेवावें. चरु, भैक्ष, सातूचे कण, यावक, शाक, दूध, दहीं, घृत, मुळें, फळें, उदक हीं हव्यें उत्तरोत्तर प्रशस्त आहेत. पौर्णिमेस पंधरा ग्रास खाऊन सर्व कृष्णपक्षभर उत्तरोत्तर एकेक कमी करीत जावें, अमावास्येच्या दिवशीं उपोषण करावें. नंतर शुक्लपक्षांत एकेक ग्रास वाढवीत जावें. याप्रमाणें एका महिन्यांत चांद्रायण सिद्ध होतें. खातांना तोंड वांकडें न होईल. अशा बेताचे ग्रास करावयास जें सांगितलें आहे तें बालकादि अशक्तांकरितां आहे. कारण त्यांना मोराच्या अंडया एवढाले ग्रास खातां येणें शक्य नसतें. क्षीरादि पेय इ. हवींचें प्रमाण मोराच्या अंडयाएवढा पानांचा द्रोण लावून त्यावरून ठरवावें. दुसऱ्या स्मृतींत कोंबडयाचें अंडें. आंवळा, इत्यादि दुसरींही ग्रास-प्रमाणें सांगितलीं आहेत. पण तीं अशक्तांकरितां आहेत. येथें चतुर्दशीच्या दिवशीं उपवास करावयास जें सांगितलें आहे तें सार्वत्रिक नसून एकपक्षी आहे. कारण तें सार्वत्रिक आहे, असे म्हटल्यास चांद्रायण बत्तीस दिवसांत साध्य होतें, असें होईल. पण योगीश्वराच्या वचनाप्रमाणें तें तीस दिवसांत होतें आणि तेंच उचित होय. कारण बत्तीस दिवसांत तें होतें, असें म्हटल्यास एक वर्षभर सतत चांद्रायणाचें अनुष्ठान होणें शक्य नाहीं. कारण त्यांत चंद्राच्या गतीचें अनुवर्तन होत नाहीं. ३२३.

आतां दुसरें चांद्रायण सांगतात--

**यथाकथञ्चित्पिंडानां चत्वारिंशच्छतद्वयम् ।**
**मासेनैवोपभुञ्जीत चान्द्रायणमथापरम् ॥ ३२४ ॥**

एक महिन्यांत कसे तरी दोनशेंचाळीस ग्रास खावेत. कसे तरी म्हणजे प्रत्यहीं दुपारीं आठ ग्रास अथवा दिवसा चार व रात्री चार; किंवा एकेदिवशीं चार व दुसऱ्या दिवशीं बारा, अथवा एक दिवस उपोषण व दुसऱ्या दिवशीं सोळा ग्रास, इत्यादि प्रकारांतील कोणत्या तरी एका प्रकारानें शक्त्यनुसार भोजन करावें. वर सांगितलेल्या दोन प्रकारच्या चांद्रायणाहून हें निराळेंच तिसरें चांद्रायण आहे.यास्तव येथील ग्रासांचा नियम त्यांना लागू नाहीं.तर त्या दोन्ही चांद्रायणांत दोनशें पंचवीस ग्राससंख्याच नियत आहे. मनूनेही ( अ. ११ श्लो.-२१८–२२० ) हे प्रकार असे दाखविले आहेत. दुपारीं हविष्यान्नाचे आठ आठ ग्रास महिनाभर खावे; हें यतिचांद्रायण होय. विप्रानें चार ग्रास प्रातःकाळीं खावे व चार सूर्यास्तानंतर; म्हणजे तें शिद्रायण होतें. कोणत्याहीं रीतीनें एका महिन्यांत दोनशें चाळीस ग्रास भक्षण करणारा चंद्रलोकास प्राप्त होतो. असो; या श्लोकाच्या शेवटीं ' अथापरम् ' येथें

अपर असा जो शब्द योजला आहे तो दोनशें चाळीसांहून कमी ग्रासांनीं सिद्ध होणाऱ्या व्रताचाही चांद्रायणांत समावेश होण्याकरितां आहे. यमानें 'एक मासभर हविष्यान्नाचे तीन तीन ग्रास खाऊन दृढव्रत व समाहित रहावें, म्हणजे तें ऋषिचांद्रायण होतें,' असें म्हटलें आहे. या यतिचांद्रायणादिकांमध्यें चंद्राच्या गतीच्या अनुसरणाची अपेक्षा नाहीं. यास्तव तीस दिवसांचा एक मास या साधारण मासप्रमाणास धरून निरंतर चांद्रायणाचें अनुष्ठान केल्यास तिथीची वृद्धि व क्षय झाल्यामुळें एकादे वेळीं पंचमी, षष्ठी इत्यादि तिथींतील एकाद्या तिथीसही जरी चांद्रायणाचा आरंभ होण्याचा प्रसंग आला तरी त्यांत कांहीं दोष नाहीं. 'सात दिवस गायीच्या चारी स्तनांतलि दूध प्यावें. सात दिवस तिन्ही स्तनांतील दूध प्यावें. तिसऱ्या सप्ताहांत दोन स्तनांतील दूध पिऊन निर्वाह करावा आणि पुढच्या सहा दिवस एकाच स्तनांतील दूध प्यावें. नंतर महिन्यांतील बाकी राहिलेल्या तीन दिवशीं वायुभक्षण करावें. हे सोमायन नांवाचें व्रत असून सर्व पापनाशक आहे. दुसऱ्या एका स्मृतींतही सोमायनाचें असेंच विधान केलें आहे व चांद्रायणाचेच धर्म त्याच्या ठिकाणीं आहेत. हारीतानेंही आतां आम्ही चांद्रायणास आरंभ करतों, असें म्हणून व सर्व इतिकर्तव्यतेसह त्याचें व्याख्यान करून 'एवमेव सोमायनं' असें म्हणून त्याचाच अतिदेश केला आहे. त्यानेंच कृष्णचतुर्थीपासून शुक्लद्वादशीपर्यंत साध्य होणारें सोमायन जें सागितलें आहे तें अशक्तांविषयीं आहे. त्याचें त्यानें संक्षेपतः असें विधान केलें आहे. चतुर्थीपासून तीन दिवस चार स्तनांनीं, पुढें तीन दिवस तीन स्तनांनीं, नंतर तीन दिवस दोन स्तनांनीं व शेवटीं तीन दिवस एका स्तनानें निर्वाह करून पुनः त्याचीच उलट आवृत्ति करावी. म्हणजे तेरा, चवदा व पंधरा या तीन दिवशीं एका स्तनांतील दुधावर, पुढें तीन दिवस दोन स्तनावर त्यापुढील तीन दिवस तीन स्तनांवर व शेवटच्या तीन दिवशीं चारी स्तनांतील दुधावर निर्वाह करून 'या ते सोम चतुर्थी तनूस्तया नः पाहि तस्यै नमः स्वाहा,' 'या ते सोम पंचमी तनूः' इत्यादि मंत्रांनीं तिथिहोम करावा. असें स्तुतिपूर्वक व्रताचरण करणारा पुरुष सर्व पापांपासून मुक्त होऊन चंद्राच्या समानतेस, सलोकतेस व सायुज्यास प्राप्त होतो ३२४.

आतां कृच्छ्र व चांद्रायण यांस साधारण असलेली इतिकर्तव्यता सांगतात—

**कुर्यात्त्रिषवणस्नायी कृच्छ्रं चान्द्रायणं तथा ।**
**पवित्राणि जपेत्पिण्डान्गायत्र्या चाभिमन्त्रयेत् ॥ ३२५ ॥**

पुरुषानें प्राजापत्यादि कृच्छ्र व चांद्रायण त्रिषवण स्नानयुक्त होऊन करावें. पण हें विधान तप्तकृच्छ्रास सोडून बाकीच्या व्रतांस लागू आहे. कारण, त्याविषयीं मनूनें एकदांच स्नान करण्याचें विधान केलें आहे. शंखानें 'त्रिरह्नि त्रिर्निशायां तु सवासा जलमाविशेत्' असें जें सांगितलें आहे तें अशक्तांकरितां आहे. वैशंपायनानेंही त्रिषवण स्नान करण्यास असमर्थ असलेल्या ब्राह्मणास दोनदांच स्नान करावयास सांगितलें आहे. गार्ग्यानें 'एकाच वस्त्रानें भिक्षा मागावी. स्नान केल्यावर वस्त्र पिळूं नये ( अंगावर तसेंच सुकवावें )' असें जें म्हटलें

आहे तें शक्तांकरितांच आहे. मिळेल तें खाऊन स्थंडिलावर शयन करावें, असें म्हणून शंखानेंही एकवस्त्रतेचें एकापक्षीं विधान केलें आहे. शुद्धवती मंत्रांनी कमीत कमी तीन वेळ जलांत बुडी मारून जलांतच अघमर्षणाचा जप करून धौत व अहत वस्त्र नेसून सौम्य सामानें आदित्याचें उपस्थान करावें. स्नानानंतर अघमर्षण, देवकृत, शुद्धवती, तरत्समा, इत्यादि पवित्रें व वसिष्ठांनीं सांगितलेल्या ( ज्यांचा निर्देश याचप्रकरणाच्या ३०८ या श्लोकाच्या व्याख्यानांत केला आहे त्या )पवित्रांतील एकादे पवित्र अन्य अनुष्ठानाला व्यत्यय न येईल अशावेळीं जलांत उभें राहून म्हणावें. त्याचा जप करावा ' सावित्रीं वा जपेन्नित्यं पवित्राणि च शक्तितः ' असें मनूनेंही म्हटलें आहे. गौतमानें ' रौरवयोधा ' सामाचा नित्य जप करावा,इत्यादि जें सांगितलें आहे तेंही तें साम पवित्र आहे म्हणूनच होय. त्याचाच जप करावा, असा निश्चय करण्यासाठीं नव्हे. तस्मात् ज्यानें सामवेदाचें अध्ययन केलें नसेल त्यानें गायत्रीप्रभृति मंत्रांचाच जप करावा. गौतमानेंच ' नमो हमाय मोहमाय ' इत्यादि म्हणून त्याच आज्याहुती असें म्हटलें आहे तेंही नियम करण्यासाठीं नव्हे. कारण मनूनें महाव्याहृतींनीं तिळांचा होम करण्याचें विधान केलें आहे. षट्त्रिंशन्मतांतही कृच्छ्रांत करावयास सांगितलेलें जपहोमादि जें कांहीं संभवणार नाहीं तें सर्व गायित्री, प्रणव व व्याहृती यांनीं करावें. असें म्हटलें आहे. जपहोमादि येथील आदि शब्दानें उदकतर्पण, आदित्योपस्थान, इत्यादि दुसऱ्या कृत्यांचें ग्रहण करावें. कारण वैशंपायनानेंही स्नानानंतर आदित्योपस्थान करण्याविषयीं सांगितलें आहे. याप्रमाणें दुसऱ्याही विरोधी वाक्यांचा विकल्प व अविरोधी विधींचा समुच्चय ( सहानुष्ठान ) करावा. कारण मीमांसेच्या शाखान्तराधिकरणन्यायानें ( गुणोपसंहारन्यायानें ) कर्माला सर्व स्मृतिप्रत्ययत्व आहे. अर्थात् सर्व स्मृतींत सांगितलेले धर्म कोणत्याही त्याच एका कर्मांत एकत्र समुच्चित करणें योग्यच आहे. अघमर्षण, गायत्री, इत्यादिकांचा शंभर, आठशें अथवा सहस्र जप मनांतल्या मनांत किंवा उपांशु करावा. पितर व देवता यांस उद्देशून तर्पण करावें. मानव व इतर भूतें यांना मस्तकानें प्रणाम करावा. चांद्रायणादिकांत भक्षण करावयाच्या प्रत्येक ग्रासास हातावर घेऊन गायत्रीनें अभिमंत्रित करावें. नंतर त्याला भक्षण करून आचमन करावें त्यानंतर दुसरा ग्रास घेऊन त्याचें अभिमंत्रण–भक्षण व आचमन करावें. हाच क्रम सर्व ग्रासांत योजावा. अर्थात् गौतमोक्त ' भूर्भुवःस्वर ' इत्यादि अभिमंत्रणमंत्राशीं या मंत्राचा विकल्प समजावा. आप्यायस्व, संतेपयांसि मंत्रांनीं पिंड करण्यापूर्वी हविष्यान्नाचें जें अभिमंत्रण सांगितलें आहे तें निराळेंच कार्य असल्यामुळें त्याचा इतर कर्तव्याशीं समुचय करावा ( म्हणजे तें करावें ). हीं कृच्छ्रादि व्रतें प्रायश्चित्तार्थ जेव्हां केलीं जातात तेव्हां केंसादिकांचें वपन करूनच तीं करावीं.कारण गौतमानें तसें म्हटलें आहे, पण तींच व्रतें जर अभ्युदयाकरितां करावयाचीं असलीं तर वपन करूं नये. वसिष्ठानें व्रतरूप कृच्छ्राच्या आरंभी कुशीवरील केंस व शिखा सोडून श्मश्रु—प्रभृति केंसांचें वपन करावें, असें म्हटलें आहे. व्रताच्या अनुष्ठानास ज्या दिवशीं आरंभ करावयाचा असेल त्याच्या आदल्या दिवशीं सायंकाळीं पर्यंत-पासून व्रताचा उपदेश घ्यावा. त्याविषयीं वसिष्ठानें असें म्हटले आहे. कोणत्याही पापाचें प्रायश्चित्त करावयाचें असतां सायंकाळीं नख–रोमादिकांचें वपन करून भस्मगोमय, मृत्तिका, जल, पंचगव्य

इत्यादिकांनीं मलापकर्षण स्नान बाह्यशौचासिद्धि होण्यास्तव करावें. त्यापूर्वी पंचगव्यानें दंतधावन करावें. गांवाबाहेर रात्र सुरू होऊन नक्षत्रें दिसूं लागलीं असतां व्रताचा उपदेश घ्यावा. नंतर आचमन करून व्रत करणाऱ्या पुरुषानें मौन धरावें. मनात आपल्या दुष्कृताचें ध्यान करीत मोठा पश्चात्ताप करावा. स्त्रीनेंहीं व्रताच ग्रहण असेंच कराव. तिला वपन मात्र नाहीं कारण बौधायनानें 'चान्द्रायणादिषु एतदेव स्त्रियाः केशवपनवर्ज्यम्' असें म्हटलें आहे. केसांचें वपन करण्याची ज्याची इच्छा नसेल त्याविषयीं हारीतानें असें सागितलें आहे-राजा, राजपुत्र किंवा बहुश्रुत ब्राह्मण यांतील कोणीही केसांचें वपन करूनच प्रायश्चित्त करावें. पण केसांचें रक्षण करण्याची ज्याची इच्छा असेल त्यानें तेंच व्रत द्विगुण करावें व्रत द्विगुण केलें असतां दक्षिणाही द्विगुण द्यावी लागते. पण हे महापातकादि विशेष दोषाच्या अभिप्रायानें म्हटलें आहे. कारण, मनूनें 'विद्वान ब्राह्मण, राजा व स्त्री यांचें वपन, गोवध, अवकिरण (गुरुभार्यागमन) इत्यादि महापातकावाचून इतरत्र करूं नयें, असें म्हटलें आहे. जाबालानेंही 'सर्व कृच्छ्रांच्या आरंभीं व विशेषतः समाप्तीच्यावेळीं अन्नानेंच शालाग्नींत पृथक् व्याहृतिहोम करावा, व्रताच्या अंतीं श्राद्ध करावें. गाय, हिरण्य इत्यादि दक्षिणा द्यावी.' असें म्हटलें आहे. यमानें तर 'दुष्कृत्याचा पश्चत्ताप, त्याच्यापासून निवृत्ति, तदंगभूत स्नान व स्वतः आपला दोष सांगणें, हीं चार कर्मे सर्व प्रायश्चित्तास साधारण आहेत,' असें सांगितलें आहे. शरीरास तेल लावणें, मस्तकाला तेल चोळणें, विडी खाणें, उटी लावणें व अशाच प्रकारचें दुसरेंही बल व आसक्ति वाढविणारें सर्व प्रकारचें आचरण व्रतस्थ पुरुषानें वर्ज्य करावें. असो. हें व असेंच दुसरेंही सर्व कर्तब्य अन्य स्मृतींवरून जाणावें. येणेंप्रमाणें पूर्वोक्त विधीनें व्रतग्रहण करून तें अवश्य संपवावें. कारण 'अगोदर व्रत घेऊन नंतर तें जो काममोहित झालेला पुरुष संपवीत नाहीं तो जिवंत असतांनाच चांडाल होतो व मेल्यावर कुत्र्याच्या जन्मास जातो,' असें छागलेयाचें वचन आहे. असो; आतां आणखी अधिक विस्तार पुरे झाला ३२५.

येणेंप्रमाणें ज्याचा विनियोग सांगितला आहे अशा चांद्रायणादिकांचें स्वरूप सांगून आतां प्रसंग प्राप्त झाला असतां दुसऱ्या कार्यांतही त्याचा विनियोग सांगतात—

**अनादिष्टेषु पापेषु शुद्धिश्चान्द्रायणेन तु ।**
**धर्मार्थं यश्चरेदेतच्चन्द्रस्यैति सलोकताम् ॥ ३२६ ॥**

ज्या पापांचें विशेष प्रायश्चित्त सांगितलेलें नसतें त्याची शुद्धि चांद्रायणानें होते. केवल त्यानेंच नव्हे तर त्या चांद्रायणासह अथवा त्यावांचून नुसत्या प्राजापत्यादि कृच्छ्रांनींही ती (शुद्धि) होते. षट्त्रिंशन्मतांत 'गुरूहून गुरु अशीं जीं कांहीं पापें असतील तीं सर्व कृच्छ्र; अतिकृच्छ्र. चांद्रायण इत्यादिकांच्या योगानें क्षीण होतात' असें म्हणून त्या तिन्ही प्रकारच्या प्रायश्चित्तांचा समुचय (एकत्र अनुष्ठान) प्रतिपादिला आहे. 'कृच्छ्र व चांद्रायण उपपातक, पातक व महापातक या सर्वांचा नाश करणारें आहे,' असें म्हणून उशनानें दोघांचा समुच्चय सांगितला आहे. गौतमानें तर 'कृच्छ्रातिकृच्छ्रौ चांद्रायणमिति सर्व प्राय-

श्चित्त' असें म्हणून समासांतर्भूत कृच्छ्रातिकृच्छ्रांना समासांतून पृथक् केलेल्या चांद्रायणाच्या अपेक्षा नाहीं, असें सुचविलें आहे. चांद्रायणालाही त्याची अपेक्षा नाहीं, असेंही त्यावरून ठरतें. शिवाय इतिशब्दानें त्यांचा समुच्चयही दाखविला आहे. अनादिष्ट लघु दोषाच्या निरसनार्थ प्राजापत्य करावें, असें म्हणून चतुर्विंशति मतांत केवल प्राजापत्याला दुसऱ्या प्रायश्चित्ताची अपेक्षा नाहीं, असें सुचविलें आहे. गौतमानेंही प्राजापत्यादिकांची निरपेक्षता सांगितली आहे. या तीन व्रतांतील प्रथम व्रत केलें असतां पुरुष शुचि, पावन व कर्माचा अधिकारी होतो. दुसरें अतिकृच्छ्र केल्यानें महापातकांवांचून दुसऱ्या सर्व पापांसून मुक्त होतो व तिसरें चांद्रायण करून महापातकादि सर्व पापांपासून तो मुक्त होतो, असें त्याचें (गौतमाचें) म्हणणें आहे. मनूनेंही 'हा पराक नांवाचा कृच्छ्र सर्व पापांचा नाश करणारा आहे,' असें म्हटलें आहे. हारीतानेंही 'चांद्रायण यावक, तुलापुरुष व गायींच्या मागून गमन करणें, हीं व्रतें सर्व पापनाशक आहेत. गोमूत्र, गोमय, गोक्षीर, दहीं, घृत, कुशोदक व एकरात्रोपवास श्वपाकालाही शुद्ध करितात असें म्हटलें आहे. तप्तकृच्छ्रास उद्देशून तोच पुनः म्हणतो—याच कृच्छ्राचें दोनदां अनुष्ठान केलें असतां तें मानवाला पातकांपासून मुक्त करतें. तीनदां यथाशास्त्र अनुष्ठान केलें असतां शूद्राच्या हत्येचें निरसन होतें. उशनानेंही 'महापातकाचें प्रायश्चित्त कोठें सांगितलेलें असो किंवा नसो; पण प्राजापत्य कृच्छ्रानें त्याचें निरसन होतें, यांत कांहीं संशय नाहीं.' असें म्हटलें आहे. हीं प्राजापत्यादि व्रतें अनादिष्ट उपपातकामध्यें, त्यांचें एकदांच अनुष्ठान किंवा वारंवार अभ्यास, यांतील जो प्रकार असेल त्याच्या अनुरोधानें व्यस्त किंवा समस्त योजावीं. (म्हणजे एकदांच एकादें पाप केल्यास त्यांतील एकच व्रत करावयास सांगावें. वारंवार अनेक पापें केल्यास त्यांतील अनेक किंवा सर्व व्रतें करवावीं) त्याचप्रमाणें ज्यांचीं व्रतें सांगितलीं आहेत अशा महापातकादिकांचे ठायींही, त्यांच्या अभ्यासाच्या अपेक्षेनें, या व्रतांची योजना करावी. महापातकांची निष्कृति सांगितलेली असतेच. तथापि त्यांच्या ठिकाणींही प्राजापत्यादिकांची योजना करावी. द्वादशवार्षिक व्रतांत बारा बारा दिवसांनीं एकेक प्राजापत्य होतें, अशा कल्पनेनें गणना केली असतां बारा वर्षांत तीनशें साठ प्राजापत्यें होतात व द्वादशवार्षिक व्रताचें अनुष्ठान करण्याची उपपत्ति नसल्यास एकापक्षीं तितकीं प्राजापत्यें करण्याचा प्रसंग येतो. परंतु तीं करण्याचेंही सामर्थ्य नसल्यास तीनशेंसाठ नुकत्याच व्यालेल्या धेनु द्याव्या. त्यांचाही असंभव झाल्यास तीनशें साठ निष्क द्यावे. ते देण्याचेंही सामर्थ्य नसल्यास त्याचा अर्ध किंवा चतुर्थांश द्यावा. पण तेवढेंही सामर्थ्य नाहीं, असें झाल्यास तितकेंच उदकवास करावे. ते करण्याचीही शक्ति नसल्यास छत्तीस लक्ष गायत्री मंत्राचा जप करावा. कारण 'कृच्छ्र, गायत्रीचा अयुत जप, उदकवास व ब्राह्मणांस धेनूंचें दान हीं चारी समान आहेत,' असें पराशरानें म्हटलें आहे. चतुर्विंशतिमतांत 'गायत्रीचा एक कोटी जप करणारा ब्रह्महत्येचा नाश करतो, ऐशीं लक्ष जप करणारा सुरापानापासून मुक्त होतो, सत्तर लक्ष जपानें सुवर्णहर्ता शुद्ध होतो आणि साठ लक्ष जपानें गुरुभार्यागमनाचा दोष निवृत्त होतो,' असें द्वादशवार्षिक व्रताच्या समान प्रायश्चित्त म्हणून सांगितलें आहे. अर्थात

तें अशक्तांकरितां नव्हे. त्यामुळेंच वरलि दोन विधानांत कांहीं विरोध नाहीं. चतुर्विंशतिमत–मनुस्मृति इत्यादिकांत सांगितलेले दुसरेही कृच्छ्र अयुत गायत्री जप, दोनशें प्राणायाम, एक सहस्र तिलहोम, वेदपारायण इत्यादि प्रत्याम्नाय तनिशें साठपट करून महापातकांत योजावे. अतिपातकांत दोनशें सत्तर प्राजापत्यें करावीं. अथवा तितक्याच गायी, निष्क, जप इत्यादि प्रत्याम्नाय करावे. पातकांमध्यें एकशें ऐशीं प्राजापत्यें अथवा तितक्या धेनु इत्यादि प्रत्याम्नाय करावे. चतुर्विंशतिमतांत तसें स्पष्ट सांगितलें आहे. तें वचनच द्वादशवार्षिक व्रतांत बारा बारा दिवसांचें एकेक प्राजापत्य, अशी कल्पना करण्याचें लिंग आहे. असो. त्याचप्रमाणें त्रैवार्षिक प्रायश्चित्ताला विषय होणाऱ्या उपपातकांमध्यें नव्वद प्राजापत्यें किंवा तितकेच प्रत्याम्नाय; त्रैमासिक व्रतांत साडेसात प्राजापत्यें अथवा तितक्याच गायी, उदकवास इत्यादि प्रत्याम्नाय, मासिकव्रतास निमित्त होणाऱ्या पातकाकरितां अडीच प्राजापत्यें अथवा त्याचे प्रत्याम्नाय चांद्रायणास विषय, होणाऱ्या उपपातकामध्यें तीन प्राजापत्यें किंवा तीं करण्यास समर्थ नसलेल्या पुरुषास तितकेच प्रत्याम्नाय सांगावे. चतुर्विंशतिमतांत 'अष्टौ चान्द्रायणे देयाः' इत्यादि जे पक्ष सांगितले आहेत ते धनिकांच्या पिपीलिकामध्यादि चांद्रायणाच्या प्रत्याम्नायाविषयीं आहेत. मासातिकृच्छ्राचा विषय होणाऱ्या उपपातकामध्यें साडेसात प्राजापत्य व्रतें किंवा तितकेच प्रत्याम्नाय करावे. प्राजापत्यांत एक गाय द्यावी. सांतपनांत दोन गायी द्याव्या. पराकतप्तकृच्छ्र व अतिकृच्छ्र यांत तीन गायी द्याव्या इत्यादि जें चतुर्विंशतिमतांत सांगितलें आहे तें आवळ्या एवढा एकेक ग्रास खावा, इत्यादि जो पक्ष सांगितला आहे त्याविषयीं आहे. हातांत मावेल तितकें अन्न खाण्याचा जो दुसरा पक्ष आहे त्यांत दोन गायी द्याव्या. कारण प्राजापत्य व सहा उपोषणें हीं दोन्हीं तुल्य आहेत. अतिकृच्छ्राची योग्यता त्याच्या दुप्पट आहे. त्यांत नऊ दिवस पाणिपूर्ण अन्न भक्षण करावयाचें जरी असलें तरी निरंतर बारा दिवस त्याचें अनुष्ठान कर्तव्य असल्यामुळें तें अतिक्लेशावह आहे. यास्तव, सहा उपवासांसारखें असलेलें जें प्राजापत्य त्याच्या दुप्पट त्याचें महत्व आहे. प्राजापत्यही सहा उपवासांसारखें असणें युक्तच आहे. कारण पहिल्या तीन दिवसांत सायंकाळच्या तीन भोजनांची निवृत्ति झाली असतां एका उपवासाची सिद्धि होते. दुसऱ्या तीन दिवसांत प्रातःकाळच्या तीन भोजनांनीं दुसरा उपवास सिद्ध होतो. तिसऱ्या तीन दिवसांत तीन अयाचितांचा तिसरा उपवास घडतो. आणि शेवटीं तीन प्रत्यक्ष उपवासच करावयाचे असतात. मिळून प्राजापत्याला षडुपवासतुल्यता उचितच आहे.

आतां एक बैल व दहा गायी यांच्या दानासह त्रिरात्र उपवासात्मक गोवधव्रतांत साडे अकरा प्राजापत्य व्रतें अथवा तितकेच प्रत्याम्नाय, मास पयोव्रतांत अडीच प्राजापत्यें, पराकरूप उपपातकव्रतांत तीन प्राजापत्यें व पराकतप्तातिकृच्छ्रस्थानीं तीन कृच्छ्रें करावीं. चांद्रायण, पराक व कृच्छ्रातिकृच्छ्र हीं तीन प्राजापत्यांच्या बरोबर आहेत. यास्तव द्विशवार्षिकव्रताच्या स्थानीं तीं एकशें वीस करावीं. त्याचे प्रत्याम्नाय मात्र तिप्पट द्यावे-

(म्हणजे ३६० गायी, तितकेच जलवास इत्यादि. अतिपातकांत नब्वद चांद्रायणादि करावीं, पातकांत साठ चांद्रायणादिक; त्रैवार्षिक व्रतास योग्य असलेल्या उपपातकांमध्यें तीस चांद्रायणादिक, त्रैमासिक गोवधव्रतांत तीन चान्द्रायणादिक व योगीश्वरानें सांगितलेल्या मासिक व्रताचे जागीं एकच चांद्रायण करावें. पण त्या चांद्रायणादिकांचे गायी, उदकवास इत्यादि प्रत्याम्नाय करावयाचे झाल्यास ते त्याच्या तिप्पट करावे. प्रत्येक प्रकीर्णकास सांगितलेल्या प्रायश्चित्ताच्या अनुरोधानें पाद, अर्ध व पादोन प्राजापत्याची योजना करावी. पण त्याच दोषाची वारंवार आवृत्ति केल्यास चांद्रायणादिक करावें. याच दिशेनें दुसऱ्या सर्व दोषांमध्येंही व्रतांची कल्पना करावी. बृहस्पतीनें जन्मप्रभृति केलेल्या पातकांचें व उपपातकांचें साठपट कृच्छ्र हें प्रायश्चित्त सांगितलें इ. पण गौतमानें सांगितलेल्या द्विवार्षिक व्रताचा व त्याचा विषय एकच आहे. अथवा तें त्रैमासिकादि व्रतास योग्य असलेल्या उपपातकाच्या आवृत्तीकरितां आहे. अथवा पातक या नांवास पात्र झालेल्या चांडालादि स्त्रीगमनाचा दोनदां अभ्यास केल्यास त्याविषयीं आहे. कारण, 'ज्ञानात् कृच्छ्राब्दमुद्दिष्टं अज्ञानादैन्दवद्वयं' असें म्हणून एकदां बुद्धिपुरःसर गमन केल्यास कृच्छ्राब्दाचें विधान केलें आहे. त्यामुळें त्याचाच अभ्यास केल्यास द्विवर्षतुल्य साठ कृच्छ्रांचें विधान करणें युक्तच होय. सुमन्तूनें 'महापातकावांचून बाकीचें वारंवार बुद्धिपूर्वक केलेलें मोठें पातकही अब्दकृच्छ्रानें नाश पावतें,' असें जें म्हटलें आहे तेंही उपपातकांच्या आवृत्तीविषयीं आहे; किंवा तें यमानें 'अज्ञानादैन्दवद्वयं' या वचनांत सांगितल्याप्रमाणें दोन चांद्रायणास योग्य असलेल्या पातकवृत्तीविषयीं आहे.

जो असलें तप करण्यास असमर्थ पण धान्यानें समृद्ध असेल त्यानें कृच्छ्रादि व्रतें ब्राह्मणांना भोजन देऊन त्यांच्या द्वारा संपादन करावीं. कृच्छ्रांत प्रत्यहीं पांच उत्तम ब्राह्मणांस भोजन घालावें. अतिकृच्छ्रांत पंधरा ब्राह्मणांस, कृच्छ्रातिकृच्छ्रांत तीस ब्राह्मणांस, तप्तकृच्छ्रांत प्रत्यहीं चाळीस ब्राह्मणांस, पराकांत प्रत्यहीं साठ ब्राह्मणांस, सांतपन कृच्छ्रांत सव्वीस ब्राह्मणांस व चांद्रायणांत चोविस ब्राह्मणांस प्रत्यहीं भोजन घालावें. (म्हणजे प्रत्यक्ष तें तें व्रत न करतां त्याच्या स्थानीं तें व्रत जितके दिवस करावयाचें असेल तितके दिवस रोज विद्वान् ब्राह्मणांस भोजन द्यावें.) प्राजापत्याचें अनुष्ठान बारा दिवस करावयाचें असल्यामुळें प्रत्यहीं पांच या क्रमानें एकंदर साठ ब्राह्मणांस भोजन द्यावें लागतें. चतुर्विंशतिमतांत 'बारा ब्राह्मणांला भोजन तरी घालावें किंवा पावकेष्टि करावी अथवा असेंच दुसरें एकादें उत्तम कृत्य करावें. कारण तीं तिन्हीं सारखींच आहेत,' असें म्हणून प्राजापत्याचे जागीं बारा ब्राह्मणांचें भोजन जें सांगितलें आहे तें निर्धन पुरुषांकरितां आहे. याच ग्रंथांत चांद्रायणाचे—मृगारेष्टि, पवित्रेष्टि, मित्रविन्दापशु, मासत्रय कृच्छ्र, चरु इत्यादिक जे प्रत्याम्नाय सांगितले आहेत तेही चांद्रायण करण्यास असमर्थ असलेल्या पुरुषांकरितां आहेत. मासत्रय कृच्छ्र म्हणजे कृच्छ्राष्टकच होय. पण तेंही जरठमूर्खांकरितां आहे. कारण चांद्रायण तीन कृच्छ्रांनीं होतें असें वर दाखविलें आहे. असो, आतां अधिक प्रपंच न करितां प्रकृत विषयाचें अनुसरण करूं या. या श्लोकाच्या उत्तरार्धाचा अर्थ असा—आपल्या अभ्युदयाची इच्छा करणारा जो

कोणी धर्म, अर्थ व काम्य नियोगाच्या निष्पत्त्यर्थ चांद्रायणाचें अनुष्ठान करतो, प्रायश्चित्ता-करितां त्याचें अनुष्ठान करित नाहीं, तो चंद्रसालोक्य या नांवाच्या एका प्रकारच्या स्वर्गास जातो. परंतु हें म्हणणें एक वर्षभर चांद्रायणाची आवृत्ति केल्यास त्याविषयीं आहे. कारण गौतमानें ' एका चांद्रायणाचें अनुष्ठान केल्यानें पुरुष निष्पाप होतो; तें दोनदां केल्यानें मागचे दहा, पुढचे दहा व स्वतः कर्ता अशा एकवीस पुरुषांचा उद्धार होतो. आणि तेंच व्रत सतत एक वर्षभर करणारा चंद्रसलोकतेस प्राप्त होतो. ' असें म्हटलें आहे ३२६.

शिवाय—

कृच्छ्रकृद्धर्मकामस्तु महतीं श्रियमाप्नुयात् ।
यथा गुरुक्रतुफलं प्राप्नोति सुसमाहितः ॥ ३२७ ॥

अभ्युदयाची इच्छा करणारा जो कोणी प्राजापत्यादि कृच्छ्रांचें अनुष्ठान करतो तो राज्यादिरूप मोठ्या लक्ष्मीचा अनुभव घेतो. ज्याप्रमाणें राजसूयादि मोठमोठ्या क्रतूंचा कर्ता त्यांच्या स्वाराज्यादि महत्फलास प्राप्त होतो त्याप्रमाणें हाही कृच्छ्रादिकर्ता कोणत्याही अंगाची उपेक्षा न करितां सावधान मनानें यथाशास्त्र अनुष्ठान केल्यामुळें त्याच्या फलास प्राप्त होतो. येथें फलाचा महिमा प्रकट करण्याकरितां क्रतू ( यज्ञ ) चा दृष्टान्त दिला आहे. ' सुसमाहितः ' असें म्हणून थोडेंसेंही न्यून पडूं न देतां सर्व शास्त्रविधानाचें अनुष्ठान करणा-ऱ्याविषयीं सुचविणाऱ्या योगीश्वरानें काम्यकर्मांत अंगविकल ( कोणत्याही अंगावाचून ) अनुष्ठान केल्यास त्याचें फल सिद्ध होत नाहीं, हें दाखविलें आहे. प्रायश्चित्तामध्यें जेवढ्या अंगांचा संभव असेल तेवढ्यांच्या अनुष्ठानांचाच स्वीकार करावयाचा असतो. यास्तव काम्या-नुष्ठानांत प्रत्याम्नायाचें ग्रहण तर दूरच राहतें. कृच्छ्रादिकांचें अनुष्ठान वारंवार केल्यास कर्त्याला तितकेंच अधिक फल मिळणें, हा न्यायच आहे म्हणून तें अविवक्षित आहे, असें नाहीं. तर विवक्षितच आहे ३२७.

पूर्वीं सांगितलेल्या सर्व विषयांचा उपसंहार करण्याच्या मिषानें अर्थवादांसह धर्मशा-स्त्राच्या धारणादिकांचे प्रार्थना व वरदान या रूपानें सांगतात—

श्रुत्वैतानृषयो धर्मान्याज्ञवल्क्येन भाषितान् ।
इदमूचुर्महात्मानं योगीन्द्रममितौजसम् ॥ ३२८ ॥

या शास्त्रांत वर्णाश्रमादिकांमुळें पृथक् झालेले सहाप्रकारचे धर्म प्रतिपादिले आहेत. योगीश्वरानें सांगितलेल्या त्या सर्वांचें श्रवण करून ऋषि हर्षानें उत्फुल्लनयन झाले आणि महिमा व गुण यांनीं अतिशय शोभणाऱ्या, अचिंत्यशक्तिमान् योगीश्वरास ते असें म्हणाले ३२८.

य इदं धारयिष्यन्ति धर्मशास्त्रमतन्द्रिताः ।
इह लोके यशः प्राप्य ते यास्यन्ति त्रिविष्टपम् ॥ ३२९ ॥

विद्यार्थी प्राप्नुयाद्विद्यां धनकामो धनं तथा ।
आयुष्कामस्तथैवायुः श्रीकामो महतीं श्रियम् ॥ ३३० ॥
श्लोकत्रयमपि ह्यस्माद्यः श्राद्धे श्रावयिष्यति ।
पितॄणां तस्य तृप्तिः स्यादक्षय्या नात्र संशयः ॥ ३३१ ॥
ब्राह्मणः पात्रतां याति क्षत्रियो विजयी भवेत् ।
वैश्यश्च धान्यधनवानस्य शास्त्रस्य धारणात् ॥ ३३२ ॥

जे कोणी आळस सोडून या धर्मशास्त्राचें धारण करतील ते या लोकीं यशास प्राप्त होऊन स्वर्गास जातील. विद्यार्थी विद्येस प्राप्त होईल, धनाची इच्छा करणारास धन मिळेल. आयुष्कामास आयुष्य व श्रीकामास मोठी लक्ष्मी प्राप्त होईल. जो या शास्त्राचे तीन श्लोक तरी श्राद्धांत ऐकवील त्याच्या पितरांची अक्षय्य तृप्ति होईल, यांत कांहीं संशय नाहीं. या शास्त्राच्या अध्ययनानें ब्राह्मण पात्रत्वास प्राप्त होतो ( सत्पात्र होतो. ) क्षत्रिय विजयी होतो व वैश्य धनधान्यवान् होतो ३२९–३३२.

आतां आणखींही एक प्रार्थना सांगतात—

य इदं श्रावयेद्विद्वान्द्विजान्पर्वसु पर्वसु ।
अश्वमेधफलं तस्य तद्भवाननुमन्यताम् ॥ ३३३ ॥

जो कोणी विद्वान् हें धर्मशास्त्र प्रत्येक पर्वास द्विजांना ऐकवील त्याला अश्वमेधाचें फल प्राप्त व्हावें, अशी आमची ( सामश्रवःप्रभृति मुनींची ) प्रार्थना आहे. तिला तुमचें अनुमोदन असावें. ( अश्वमेधाचें फल हा श्रावणविधीचा अर्थवाद आहे.) ३३३.

आतां वरदान सांगतात—

श्रुत्वैतद्याज्ञवल्क्योऽपि प्रीतात्मा मुनिभाषितम् ।
एवमस्त्विति होवाच नमस्कृत्य स्वयंभुवे ॥ ३३४ ॥

ऋषींनीं म्हटलेलें हें वरील वचन ऐकून स्वनिर्मित धर्मशास्त्राच्या धारणादिकांच्या फलप्रार्थनेनें ज्याचें मुखकमल विकसित झालें आहे असा तो भगवान् ब्रह्मदेवाला प्रणाम करून तुम्ही प्रार्थिलेलें सर्व तसेंच होवो असें बोलला ३३४.

इति प्रायश्चित्त प्रकरणम् ५

इति श्रीशंकराचार्यभक्त विष्णुकृत श्रीयाज्ञवल्क्यस्मृतीच्या प्रायश्चित्तसंज्ञक तृतीयाध्यायाचें मिताक्षरेच्या अनुरोधानें केलेलें मराठी विवरण समाप्त झालें.

श्रीकृष्णार्पणमस्तु..

ॐ

---

# याज्ञवल्क्यस्मृति ।

## श्लोक-सूचि.

## ध



## न

## श

## ष

---

## विनंती

खालील दोन श्लोक नजरचुकीनें छापावयाचे राहिले होते ते तेथें वाचावे.:—

पृ. ९२—

कृत्तिकादिभरण्यन्तं सकामानाप्नयादिमान् ॥
आस्तिकः श्रद्दधानश्च व्यपेतमदमत्सरः ॥ २६८ ॥

पृ. ४०१ पृष्ठाच्या आरंभीं—

सखिभार्याकुमारीषु स्वयोनिष्वन्त्यजासु च ॥
सगोत्रासु सुतस्त्रीषु गुरुतल्पसमं स्मृतम् ॥ २३१ ॥



